# हैद्राबाद व देशी संस्थानें

अर्थात्

## हैद्राबादची राज्य-पद्धति

आणि

## संस्थानी स्वराज्याच्या चळवळी.




लेखकः

राघवेंद्र भीमराव शर्मा, माजी हायकोर्ट वकील,

एच. ई. एच. निझाम हैद्राबाद

---

इ. स. १९२८

किंमत ३ रुपये

पुणें येथें

**आर्यभूषण** छापखान्यांत **अनंत विनायक पटवर्धन**

यांनीं छापिलें व **राघवेंद्रराव शर्मा** हैद्राबाद यांनीं

पुणें येथें प्रसिद्ध केलें.




# समर्पण.

माझे परमपूज्य वडील कै. तीर्थरूप भीमराव हणमंत ऊर्फ बाबा, ( पेनशनर पेषकार एच. ई. एच. निझाम सिव्हिल सर्व्हिस. ) जे मी हैद्राबाद सोडल्यानंतर ता. १४।१०।२४ इ. रोजीं निवर्तले व ज्यांच्या अंत्य-दर्शनासही मी अंतरलों, त्यांच्या पवित्र चरणीं ही अल्पसेवा अत्यंत नम्र भावानें सादर करीत आहें.



एच. एच. महात्मा मीर **महबूब अलीखांबहादुर** अत्यंत लोकप्रिय व दानशूर, प्रजाहिततत्पर, हैद्राबादचे माजी निझाम.

श्री

# प्रस्तावना.

१ वाईटापासून केव्हां केव्हां चांगलेंही निर्माण होतें याचेंच एक उदाहरण रा. राघवेंद्रराव शर्मा यांचें हैद्राबाद संस्थानांतून झालेलें उच्चाटन. राघवेंद्रराव यांची जी माहिती मला आहे तिजवरून त्यांनीं हैद्राबादेहून येऊन पुण्यास वास्तव्य केल्यापासून एक तप सुरु केलें आहे; तें तप म्हणजे हैद्राबाद संस्थानाविषयीं योग्य तें लोकमत खालसा इलाख्यांत बनविणें. लोकमत योग्य बनविण्यास लोकांना खरी माहितीही द्यावी लागते व तें कामही राघवेंद्रराव यांनीं अत्यंत आस्थेनें व परिश्रमानें आजवर चालविलें आहे.

२ या तपाची फलसिद्धि केव्हां दृष्टीस पडेल ती पडो, परंतु राघवेंद्रराव यांनीं मात्र अंगीकृत कार्य वाखाणण्यासारखें केलें. त्यांच्या अंगीं असलेली चिकाटी, उद्योगप्रियता व कार्यतत्परता क्वचितच दिसून येते. त्यांनीं स्वतःकरितां तर स्वार्थत्यागाचा मार्ग स्वीकारला असल्यामुळें त्यांच्या तपश्चर्येला व्यक्तिविषयक फळाची अपेक्षाच नाहीं, तथापि फलसिद्धींतही औचित्य म्हणून कांहीं असतें, व त्या दृष्टीनें पाहतां निदान माझें तरी तेव्हांच समाधान होईल कीं ज्या दिवशीं राघवेंद्रराव यांजवरील बहिष्कार निघून जाऊन ते आपल्या हक्कानें पुनः हैद्राबादेस जाऊन चार दिवस राहून नांदून येतील. असा बहिष्कार व हद्दपारी या दिवसांत कां चालावी ? व तो पडण्याइतकें मोठें अपकृत्य तरी त्यांच्या हातून काय झालें होतें ? असो.

३ राघवेंद्ररावांच्या उद्योगाचें एक फळ प्रस्तुत पुस्तक हें होय. यांतील बराच भाग हैद्राबाद संस्थानचे वर्णनाला दिला असून शेवटच्या भागांत संकीर्णपणें इतर देशी संस्थानें व विशेषतः संस्थानी

प्रजेतर्फे चाललेली चळवळ यांची माहिती दिली आहे. हैद्राबाद संस्थानच्या सर्वच गोष्टी आजवर अज्ञात अशाच आहेत; परंतु त्या अंधाऱ्या प्रदेशावर या पुस्तकानें फार चांगला प्रकाश पडेल यांत शंका नाहीं.

४ सर्व हिंदी संस्थानांतील पहिलें संस्थान असें असतां त्याबद्दल लोकांना काहीं माहिती नसावी हा दोष लोकांचा नसून स्वतः संस्थानाचाच आहे. पण संस्थानचे अधिकाऱ्यांना लोकमतावर जगावयाचें नसून आपल्या सत्तेवर जगावयाचें असल्यामुळें ते संस्थानची माहिती बाहेर मिळूं देण्याची इच्छा किंवा आस्था कशाला धरितील? परंतु हे दिवस असेच आहेत कीं संस्थानचे अधिकाऱ्यांनीं आपल्या हातानें कितीही अंधार निर्माण करण्याची खबरदारी घेतली तरी लोक त्यांना तो अंधार टिकूं देणार नाहात, हर प्रयत्नाने त्यांचे घरांत भोकसे पाडून प्रगतीच्या प्रकाशाचे किरण त्यांचे डोक्यावर पाडून त्यांच्या निद्रेचा भंग करितील व त्यांना उठवून प्रजासंतोषाचे कार्यास प्रवृत्त करितील.

५ या जगांत आतां कोणास स्वस्थ बसतां येणार नाहीं, फार काय हैद्राबादच्या अधिपतींनाही नाहीं. राजा असेल त्यानें आपल्या नशीबाप्रमाणें इतमाम, ऐषआराम भोगावा, परंतु त्याचबरोबर प्रजेलाही जे हक्क योग्य ते त्याला आज नाहीं तर उद्यां देणेंच प्राप्त आहे. व लोकशाहीची नवी अवतरलेली देवताच त्यांनां तें करण्याला लावील.

६ संस्थान प्रजाजनांच्या चळवळीत दोन प्रकारचे लोक आहेत; एक प्रकारचे लोकांना संस्थाने सर्वस्वी बुडून ब्रिटिश मुलखांत सामिल व्हावयास पाहिजेत, परंतु हा वदतो व्याघात होय. संस्थाने बुडवावयाचीच तर ती संस्थानी चळवळ होऊं शकत नाहीं, ब्रिटिश राज्याच्या अभिवृद्धीचीच ती चळवळ होय. परंतु दुसऱ्या प्रकारचे लोक संस्थाने शिल्लक रहावी व तशी ती राहून त्यांची सुधारणा होऊन प्रजेला **स्वराज्याचे** अधिकार मिळावे असे त्यांचे मत असते. हीच माझ्या-

मतें खरी संस्थानी प्रजेची चळवळ. मी स्वतः या दुसऱ्या वर्गांतला आहे व राघवेंद्ररावही याच मताचे आहेत, असो.

७ राघवेंद्रराव यानीं इतके परिश्रम घेऊन पुस्तक लिहिलें व छापविलें त्याचा उपयोग केवळ हैद्राबाद संस्थानापुरता नसून सामान्यतः यच्चयावत् संस्थानांचे कामीं लक्ष घालणारासही होण्यासारखा आहे. हें एक पुस्तक जवळ ठेविलें म्हणजे केव्हांही कोठेंही संस्थानी प्रश्नाची चर्चा निघाली असता चर्चेला किंवा विचारविनियमाला इतर कोणतेंही साधन नसलें तरी चालण्याससारखें आहे.

पुणें,<br>ता ६।१०।२८. } न. चिं. केळकर.



संपादक

श्री. राघवेंद्रराव शर्मा, हायकोर्ट वकील, हैद्राबाद.



श्री. **राघवेंद्रराव शर्मा** हायकोर्ट वकील, ( इ. स. १९२३ )
हैद्राबाद सोडण्यापूर्वी

# लेखकाचे दोन शब्द



हैद्राबाद संस्थान व विशेषतः तेथील राज्यकारभारासंबंधींचें एकही पुस्तक मराठींत अद्यापपर्यंत लिहिलें गेलें नाहीं. ही उणीव दूर करण्याचा पुष्कळ दिवसांपासून माझा मानस होता. कारण हैद्राबादच्या प्रजेला आपल्या संस्थानासंबंधींची माहिती काय आहे हें समजून घेण्याची जरूर वाटल्यास त्यांची अडचण कांहीं अंशानें तरी दूर व्हावी व हैद्राबाद संस्थानाबाहेरील महाराष्ट्रीयांस व मराठी भाषा जाणणाऱ्या लोकांसही हैद्राबाद हें काय गूढ आहे हें समजावें ह्या उद्देशानें हें पुस्तक प्रसिद्ध करण्यांत येत आहे.

परमेश्वरकृपेनें हें पुस्तक आज प्रसिद्ध होत आहे. तथापि हें पुस्तक इतक्या लवकर प्रसिद्ध व्हावयास हिज एक्झाल्टेड हायनेस नवाब मीर **उस्मान अलीखां बहादुर** निझामुलमुल्क आसफजाह यांचा माझी हायकोर्ट वकीलीची सनद रद्द करण्याबद्दलचा, **फर्मान** हेंही एक कारण आहे; याबद्दल मी त्यांचे मनःपूर्वक आभार मानतों.

एच. ई. एच. निझाम सरकारच्या फर्मानामुळें मला हैद्राबाद सोडणें भाग पडल्यामुळेंच आज हें पुस्तक प्रसिद्ध करण्याचा सुप्रसंग लाभला आहे.

आजवर इंग्रजी व उर्दू भाषेंत कांहीं थोडीं पुस्तकें प्रसिद्ध झालीं आहेत. तथापि त्यांत अशा प्रकारची सर्व तऱ्हेची माहिती नसून तीं पुस्तकें थोड्या किंमतींत व सर्वसाधारण लोकांना घेतां येण्यासारखीं नाहींत व सरकार आपल्या राज्यकारभारासंबंधी जे रिपोर्ट प्रसिद्ध करितें ते इतरांना विकत देखील देण्यांत येत नाहींत; त्यामुळें माहिती मिळवूं इच्छिणारांना मोठी अडचण उत्पन्न होते.

हिंदुस्थानाला स्वराज्य पाहिजे व त्यांत संस्थानांचाही अंतर्भाव होतो. संस्थानी स्वराज्याचा प्रश्न हा केवळ हैद्राबादेपुरताच नसून

सात कोट संस्थानी प्रजेचा व ५६३ लहान मोठ्या संस्थानांचा आहे. अशी वस्तुस्थिति असतांना हैद्राबादचे निझाम मुसलमान आहेत म्हणून तेथील प्रजेनें ही चळवळ चालू केलेली आहे असें म्हणणें किती हास्यास्पद आहे हें सांगावयास नको.

डॉ. अनसारी यांच्या अध्यक्षतेखालीं मद्रास येथें भरलेल्या १९२७ च्या काँग्रेसनें संस्थानांत जबाबदार राज्यपद्धती ( **स्वराज्य** ) संस्थानिकांनीं स्थापन करावी असा ठराव पास केला आहे आणि अखिल भारतीय संस्थानप्रजापरिषदेनेंही त्या बाबतींत चळवळ चालविली आहे व आपलें एक शिष्ट मंडळ विलायतेस पाठवून ब्रिटिश-जनता व **बटलर** कमेटीकडे संस्थानी प्रजेच्या मागण्या व तक्रारी काय आहेत त्या मांडण्याची व्यवस्था केली आहे ही गोष्ट सर्वश्रुत आहे. अशा स्थितींत केवळ हैद्राबाद संस्थानापुरतीच माहिती ह्या पुस्तकांत देणें अपुरें वाटल्यामुळें संस्थानी प्रजेची स्वराज्यप्राप्तीसंबंधीं ज्या चळवळी चालविल्या आहेत त्याचीही माहिती देण्यांत आली आहे आणि हिंदुस्थानांतील एकंदर संस्थानांसंबंधींची संक्षिप्त माहितीही दिली आहे. ह्या पुस्तकाचा उपयोग हैद्राबादी प्रजेपुरताच नसून इतर संस्थानी प्रजेलाही कांहीं अंशानें होईल अशी आशा आहे.

हें पुस्तक तयार करण्यासंबंधांत खालीं लिहिलेल्या पुस्तकांची मदत घेण्यांत आली आहे. करितां त्या त्या ग्रंथकर्त्यांचे आभार मानणें जरूर आहे.

१—' हैद्राबाद संस्थानच्या राज्यकारभाराचे रिपोर्ट व खानेसुमारीचा रिपोर्ट '

२—' बुस्तान आसफिया, ' श्री. माणिकराव विठलराव जाहागिरदार, हैद्राबाद.

३—' दि इंडियन स्टेट्स, ' हिंदुस्थान सरकारानीं ( इ. स. १९२७) प्रसिद्ध केलेलें पुस्तक

४–‘ प्रॉब्लेम्स ऑफ इंडियन स्टेट्स,’ प्रो. ग. र. अभ्यंकर, सांगली

५–‘ देशी नरेश,’ श्री. गहलोत, जोधपूर

६–‘ इंडियन ईयरबुक,’ टाइम्स ऑफ इंडिया, मुंबई

तसेंच नवाकाळ, ज्ञानप्रकाश, संस्थानी स्वराज्य, टाइम्स, डेली-मेल, निझाम विजय, इ. पत्रांतील हैद्राबादे संबंधी प्रसिद्ध झालेला मजकूर घेतला आहे याबद्दल त्या सर्व पत्र कर्त्यांचे आभार मानतो.

हैद्राबादच्या प्रजेला ह्या गोष्टीचा अभिमान आहे कीं श्री. **माणिकराव विठ्ठलराव** जाहगिरदार यांनीं ‘**बुस्तान आसफिया**’ या नांवाचें पुस्तक उर्दू भाषेंत लिहिलें असून त्याचे पांच भाग आजवर प्रसिद्ध झाले आहेत. त्यांनीं हें पुस्तक प्रसिद्ध करून हैद्राबादच्या प्रजेवर मोठे उपकार केले आहेत.

हें पुस्तक तयार करण्याच्या बाबतींत श्री. **कृ. ग. लिमये**, एम् ए. एलएल्. बी., संपादक ज्ञानप्रकाश, व मुंबईच्या तेलगू समाजाचे पुढारी श्री. **शंकर सायण्णा परशा** व इतर ज्या सद्गृहस्थांनीं ( हैद्राबाद, पुणें व मुंबईच्या मित्रांनीं ) मदत केली त्यांचा नामनिर्देश न करितांच आभार मानणें जरूर आहे.

ह्या पुस्तकाच्या छपाईचे कामास आरंभ झाल्यावर कांहीं दिवसांनीं आर्यभूषण छापखाना अग्निनारायणाचे भक्ष्यस्थानीं पडल्यामुळें पुनः छपाईचें काम आरंभणें जरूर झालें. मूळ प्रती, टांचणें, वगैरेंचा नाश झाल्यामुळ पुस्तकांत पुष्कळशा चुका राहणें साहजिक आहे. करितां सहृदय वाचक क्षमेच्या दृष्टीनें पाहतील अशी आशा आहे.

संस्थानी प्रजेच्या हिताबद्दल झटणारे महाराष्ट्राचे सुप्रसिद्ध पुढारी दे. भ. श्री. **न. चिं. केळकर** यांनीं माझ्या विनंतीस मान देऊन ह्या

पुस्तकाची प्रस्तावना लिहिण्याची कृपा केली याबद्दल मी त्यांचा ऋणी असून कृतज्ञताव्यक्त करणें हें माझें कर्तव्य आहे.

ह्या पुस्तकाच्या छपाईंचे बाबतींत आर्यभूषण प्रेसचे म्यानेजर श्री. केशवराव बाळ व श्री. अ. वि. पटवर्धन बी. ए. सेक्रेटरी सर्व्हंट्स् ऑफ इंडिया सोसायटी, पुणें यांच्याकडून जी मदत झाली त्याबद्दलही मी त्यांचे आभार मानतों.

वैदिकाश्रम.
पुणें, ता २१।११।२८ इ.

सर्वांचा नम्र सेवक,
**राघवेंद्र भीमराव शर्मा.**



एच. इ. एच. नवाब **सर उस्मान अलीखांबहादुर** ( हल्लींचे सुप्रसिद्ध निझाम हे इ. स. १९११ सालीं गादीवर बसले. ) व त्यांच्या उजवीकडे त्यांचे ज्येष्ठ पुत्र **युवराज** ( भावी निझाम. )

# हैद्राबाद व देशी संस्थानें

## अनुक्रमणिका.

### भाग पहिला

## भाग तिसरा

# हैद्राबाद संस्थानची राज्यपद्धति.



## प्राचीन इतिहास.



दक्षिण हिंदुस्थानचा जो प्राचीन इतिहास उपलब्ध आहे त्यावरून पहातां येथील अगदीं पहिले राज्यकर्ते आंध्र होत. सध्यां गोदावरी व कृष्णा या नद्यांच्या दरम्यान तेलगू भाषा बोलणारे जे द्रावीडियन लोक रहातात त्यांच्यापैकींच आंध्र राजे या प्रदेशावर राज्य करीत असत. त्यांनीं सुमारें साडेचार शतकें म्हणजे इ. स. २२५ पर्यंत या प्रदेशावर राज्य केलें. आंध्रांच्या राज्यांत मजबूत तट-बंदीचीं ३० मोठीं शहरें असून अगणित खेडीं होतीं व त्यांच्या फौजेंत एक लक्ष पायदळ, दोन हजार घोडेस्वार व एक हजार हत्ती होते असें वर्णन सांपडतें. पुढें मगध देशाचे चंद्रगुप्त मौर्य व बिंबसार हे राजे प्रबळ झाल्यामुळें आंध्रांना त्यांचें स्वामित्व कबूल करून राहणें भाग पडलें. अशोकाच्या साम्राज्यांत आंध्रांचें राज्य समाविष्ट झालेलें नव्हतें. आंध्र राज्यावर अशोकाची सार्वभौम सत्ता जरी प्रस्थापित झाली होती तरी अशोकाच्या साम्राज्याच्या सरहद्दी-पलीकडे आंध्रांचें वास्तव्य असल्याचा उल्लेख आहे. अशोकानंतर किंबहुना त्याच्या कारकीर्दीच्या अखेरी अखेरसिच त्याच्या साम्राज्याचे तुकडे होऊं लागले व या संधीचा फायदा घेऊन आंध्रांनीं सिमुक या राजाच्या प्रमुखत्वाखालीं आपलें स्वातंत्र्य पुन्हा मिळविलें. त्यानंतरच्या कृष्ण व श्री शतकर्णी या दोघां आंध्र राजांनीं आपल्या राज्याचा विस्तार पुष्कळच वाढवून नाशीकपर्यंत आपल्या राज्याची सीमा पोंचविली. या घराण्यांतील यज्ञश्री नांवाच्या राजाचें जें नाणें आहे त्यावर जहाजाचा ठसा आहे त्यावरून त्याचें राज्य समुद्रापर्यंत पसरलें होतें असें दिसतें. इ. स. २२५ च्या सुमारास आंध्रांच्या सत्तेचा अंत झाला. त्याला कोणतीं कारणें झालीं व त्यानंतर तीन शतकें कोणी राज्य केलें याचा इतिहास मुळींच उपलब्ध नाहीं. त्यानंतरचे राजे म्हटलें म्हणजे चालुक्य होत. हे उत्तरेकडील रजपूत वंशाचे होते. त्यांचा पहिला पुलिकेशी यानें

वातापी येथें म्हणजे सध्यां विजापूर जिल्ह्यांत बदामी नांवानें प्रसिद्ध असलेल्या शहरीं इ. स. ५५० च्या सुमारास आपलें राज्य स्थापन केलें. या घराण्यांतील कीर्तिवर्मा व मंगलेश या राजांनीं आपलें राज्य बरेंच वाढविलें, पण चालुक्य घराण्याची विशेष भरभराट इ. स. ६०८ पासून दुसरा पुलिकेशी गादीवर बसल्यापासून झाली. नर्मदा नदीच्या खालील सबंध दक्षिण हिंदुस्थानावर त्याचा अमल प्रस्थापित झाला. कनोजच्या हर्षवर्धन राजापर्यंत त्याचा संबंध पोहोंचला येवढेंच नव्हे तर इराणचा राजा दुसरा खुस्रू याच्या कानावरही पुलिकेशी राजाची कीर्ति पोहोंचली व त्यानें इ. स. ६२५–२६ सालीं पुलिकेशीकडून आलेल्या वकिलास सन्मानानें भेट दिली व उलट खुस्रूकडून आलेल्या वकिलाचाही पुलिकेशीनें आपल्या राजधानींत सत्कार केला. अजिंठा येथील नं. १ च्या लेण्यांत या प्रसंगाचें एक चित्र कोरलेलें आहे.

प्रसिद्ध चिनी प्रवासी ह्युएन संग हा इ. स. ६४१ या वर्षीं पुलिकेशीच्या दरबारांत आला होता व त्यानें पुलिकेशीचें लष्करी सामर्थ्य व प्रजेचा आज्ञाधारकपणा यांची फारच प्रशंसा केलेली आहे. चालुक्य घराण्याच्या अमदानींत त्यांच्या कांची येथील पल्लव राजाशीं बहुधा एक सारख्या लढाया चालू असत. या लढायांमुळें तीं दोन्ही राज्यें आठव्या शतकांत इतकीं कमजोर झालीं कीं राष्ट्रकूट नांवाच्या लोकांतील दंतिदुर्ग नांवाच्या एका धाडसी सरदारानें चालुक्यांचा दुसरा विक्रमादित्य राजा याचा मोड करून आपली सत्ता प्रस्थापित केली. या राष्ट्रकूट घराण्यानें दक्षिण प्रदेशांत जवळ जवळ २२५ वर्षें म्हणजे इ. स. ९७३ पर्यंत राज्य केलें. या घराण्यांतील पहिल्या कृष्ण राजाच्या कारकीर्दींत शिल्पकलेचीं अनेक आश्चर्यकारक कामें करण्यांत आलीं. वेरूळ येथील सुप्रसिद्ध कैलासाचें लेणें त्याच्या अमदानींतच कोरण्यांत आलें. या राजाचा उदार आश्रय मिळाल्यामुळें संस्कृत वाङ्मयाची ही फार वाढ झाली. राष्ट्रकूटांची हाजधानी एन. जी. एस. रेलवेवरील मलखेड येथें होती.

राष्ट्रकुटांतील शेवटचा राजा कक्क हा होय. त्याचा चालुक्य वंशांतील तैल किंवा तैलप या सरदारानें पाडाव करून कल्याणचें चालुक्य या नांवानें प्रसिद्ध असलेलें राजघराणें स्थापन केलें. व त्याचा अंमल पुढें सुमारें दोन शतकें चालू राहिला. या घराण्यांतील सर्वांत बलाढ्य राजा म्हटला म्हणजे सहावा विक्रमादित्य हा होय, तो इ. स. १०७६ सालीं गादीवर आला व त्यानें

कांची शहरही जिंकल्याचें सांगतात. त्यानें सुमारें अर्धशतक राज्य केलें. व त्याच्या अमदानींत या राज्याची सत्ता इतकी वाढली कीं, या विक्रमादित्यानें आपल्या नांवाचा शकही सुरू केला. पण तो प्रचारांत न येतां मागें पडला. सुप्रसिद्ध मिताक्षरा ग्रंथाचा कर्ता विज्ञानेश्वर हा या विक्रमादित्याच्या दरबारांतीलच एक पंडित होता. ( कल्याण हें गुलबर्ग्याजवळ आहे )

विक्रमादित्यानंतर चालुक्य घराण्याच्या सत्तेस उतरती कळा लागली. व इ. स. बाराव्या शतकाच्या अखेरीस देवगिरीच्या यादवांनीं पश्चिमेकडून हल्ला करून चालुक्यांचा पाडाव केला. नंतर देवगिरीच्या यादवांचें राज्य सुरू झालें. या घराण्यांत बिल्हण हा पराक्रमी राजा झाला. पण त्याहूनही अधिक पराक्रमी सिंघण राजा या घराण्यांत उदयास आला. त्यानें गुजराथ व इतर दूरच्या प्रदेशावरही मोहिमा केल्या.

इ. स. १२९४ मध्यें अलाउद्दीन खिलजी यानें यादवांच्या राज्याची उत्तर सरहद्द जी नर्मदा नदी ती ओलांडून देवगिरीवर हल्ला केला व ती राजधानी विशेष विरोध न येतां काबीज केली. त्या वेळीं यादव घराण्यांतील राज्य करीत असलेला राजा रामचंद्र यानें स्वतःचा जीव बचावण्यासाठीं अल्लाउद्दीनला सहाशें मण मोतीं, व दोन मण हिरे, पाचू वगैरे रत्नें नजर केलीं. १३०७ सालीं मलिक काफर यानें देवगिरीवर हल्ला केला तेव्हांही रामचंद्र राजानें प्रतिकार न करितां नमतें घेतलें. रामचंद्र हाच दक्षिणेंतील स्वतंत्र असा शेवटचा राजा होय.

त्या नंतर १३२२ सालीं महमद बिनतघलख यानें तेलंगणावर स्वारा करून दक्षिणेंतील अधिक प्रदेश जिंकला व देवगिरीला "दौलताबाद" हें नवीन नांव देऊन ती आपली राजधानी केली.

## बहामनी घराणें.

दिल्ली येथील एका ब्राह्मणाचा गुलाम जफरखान हा धाडशी लोकांच्या एका मोठ्या टोळीचा नायक होऊन दक्षिणेंत आला व त्यानें गुलबर्गा येथें १३४७ सालीं आपलें राज्य स्थापिलें व अलाउद्दीन हसनशाह गंगू बहामनी ही पदवी धारण करून तो राज्य करूं लागला. उत्तरेस वऱ्हाडपर्यंत, पश्चिमेस तेलंगणापर्यंत व दक्षिणेस व पश्चिमेस कृष्णानदी व समुद्रकिनारा येथपर्यंत बहामनी घराण्यानें आपली सत्ता प्रस्थापित केली. या घराण्यानें सुमारें दोन

शतकें राज्य केलें. तेलंगण व विजयानगर येथील राजेही त्यांना भिऊन वेळोवेळीं खंडणी देत होते. बहामनी घराण्यानें कोंकण व गुजराथ हे प्रांतही आपल्या सत्तेखालीं आणले, पण या राज्यांतही पुढें फाटाफूट सुरू होऊन कित्येक सरदार व सेनापती आपलीं स्वतंत्र राज्यें स्थापूं लागले. बहामनी राजाचा सेनापती युसफ आदिलशहा विजापूर प्रांत बळकावून स्वतंत्र बादशहा झाला. निजाम उल्मुल्क, इमादुलमुल्क, हेही स्वतंत्र राज्यें स्थापून बसले. अशा रीतीनें बहामनी राज्याचा अंत होऊन वऱ्हाड, अहमदनगर, बेदर, विजापूर व गोवळकोंडा येथें स्वतंत्र मुसलमानी राज्यें उदयास आलीं.

## कुतुबशाही.

कुतुबशाही घराण्याचा संस्थापक सुलतानकुली हा तुर्क वंशाचा असून बहामनी घराण्यांतील शेवटच्या राजाचा एक सेनापति होता. बहामनी राज्याचे तुकडे होऊं लागतांच त्यानेंही गोवळकोंडा येथें आपलें राज्य स्थापन केलें. याच घराण्यांतील महमद कुली कुतुबशहा यानें हैद्राबाद शहर वसविलें. पुढें अबदुल्ला शहाचा धाडसी सेनापति मीरजुम्ला यानें गोवळकोंड्याच्या राज्याचा विस्तार बराच वाढविला पण मीर जुमलानें पुढें आपल्या धन्याशीं वांकडें आल्यावरून त्यानें गोवळकोंड्यावर स्वारी करण्याविषयीं औरंगजेबास विनंति केली. व औरंगजेबानेंही ती तात्काळ मान्य करून १६५५ मध्यें गोवळकोंड्यावर हल्ला केला व हैद्राबाद शहर लुटलें. नंतर अबदुल्लाकुतुबशहा त्याला शरण गेला व त्यानें त्यास बरीच खंडणी देऊं केली इतकेंच नव्हे तर औरंगजेबाच्या मुलाला आपली मुलगी देण्याचें व स्वतःस मुलगा नसल्यामुळें जांवयास आपल्या पश्चात् राज्य देण्याचेंही त्यानें तहनाम्यांत कबूल केलें. परंतु अबदुल्लाच्या आधींच त्याचा हा जांवई मरण पावल्यामुळें हें राज्य आपोआप मोगलाकडे जावयाचें तें गेलें नाहीं. १६८६ मध्यें औरंगजेबानें विजापूर जिंकल्यानंतर पुढच्या वर्षी गोवळकोंड्यावर त्यानें आपला मोर्चा वळविला व कुतुबशाहीचा अंत केला.

# निजामचें घराणें.



सध्यांच्या निजाम साहेबांच्या घराण्याच्या हकीकतीचा सारांश पुढील प्रमाणें आहे:—

हिंदुस्थानांत आलेल्या मुसलमान घराण्यांतील अत्यंत महत्त्वाच्या व प्रमुख घराण्यांपैकीं हें घराणें आहे. बापाच्या बाजूनें त्याचा संबंध पहिल्या खलीफाशीं पोहोंचतो व आईच्या बाजूनें तर त्याचा संबंध खुद्द महमद पैगंबरापर्यंत पोहोंचतो. या वंशांत होऊन गेलेला आणखी एक प्रसिद्ध पुरुष म्हटला म्हणजे शेख शाहाबुद्दीन उमर हा होय. तो विद्वान् व साधु पुरुष म्हणून प्रसिद्ध आहे. त्याचा एक वंशज नवाब आबीद् कुलीखान हा बुखारा येथील शेख–उल्–इसलामचा काजी होता. तो शहाजहान बादशाहाच्या कारकीर्दीच्या अखेरीस म्हणजे १६५५ मध्यें हिंदुस्थानांत दिल्ली येथें आला व मोगल बादशाहाच्या दरबारांत तो वाढत जाऊन लौकरच अजमेरचा गव्हर्नर झाला. तो गोवळकोंड्याच्या वेढयांत १६८७ सालीं मारला गेला. त्याचा मुलगा शहाबुद्दीन ऊर्फ गाझीउद्दीन खान हा औरंगजेबाच्या फौजेचा मुख्य सेनापति होता. त्याचा औरंगजेबाचा मुख्य प्रधान असदुल्ला खान याच्या कन्येशीं विवाह झाला होता त्याचा मुलगा मीर कमरुद्दीन हाच पुढें निजामुलमल्क या नांवानें प्रसिद्धीस आला. त्याचा जन्म सन १७७४ मध्यें ( रबिवुःसानी १०८२ हिजरी ) झाला. तो वीस वर्षांचा असतांनाच औरंगजेबाकडून त्याला चेनकिलीज खान ही बहुमानाची पद्वी मिळून विजापूर प्रांतावर मुख्याधिकारी म्हणून त्याची नेमणूक झाली. औरंगजेबाच्या मरणानंतर त्याचा दुसरा मुलगा अझमशहा गादीवर आला तेव्हां त्यानें चेनकिलीज खानास अधिक बहुमानाची अशी " खान–ई दौरान " ही पदवी व सहा हजार स्वारांची मनसबी देऊन बऱ्हाणपुरावर त्याची नेमणूक केली. आझम शाहानंतर बाहादुरशहा ( औरंगजेबाचा वडील-मुलगा व गादीचा खरा वारस ) हा गादीवर आला तेव्हां त्यानें खान–ई दौरांन यांस अयोध्या प्रांताचा मुख्य अधिकारी व लखनौ येथील फौजदार नेमिलें. पण बहादुरशाहाची राज्यकारभाराची तऱ्हा खान–ई दोरान यांस अयोग्य वाटल्यावरून त्यांनीं आपली जागा सोडली व दिल्ली येथें विद्वान् लोकांच्या

समागमांत पांच वर्षेपर्यंत शांततेनें काळ घालविला. बहादुरशाहानंतर जहांदारशहा दिल्लीच्या गादीवर आला तेव्हां त्यानें मोठ्या मिनतवारीनें खान-ई दौरान यांस अधिकाराची जागा पत्करण्यास लाविलें. जहांदारशहा नंतर फरूकसिअर गादीवर आला तेव्हां त्यानें त्यांस "निजामुलमुल्क फतेहजंग" हा किताब देऊन दक्षिण व कर्नाटक या भागावर त्याची नेमणूक केली. त्या वेळीं निजामानें दक्षिणेमध्यें पुंडाई करणाऱ्या मराठ्यांचें पारिपत्य करून मोगल बादशहांची महत्त्वाची कामगिरी केली. पण पुढें दिल्लीच्या दरबारांत सय्यद बंधूचें प्रस्थ फार वाढलें व त्यांपैकीं एकाला डेक्कनची सुभेदारी देण्याचें ठरल्यामुळें निजामास कमी दर्जाची जागा मान्य करून रहावें लागलें. पुढें फरूकसेर, रफिउद्दरजन व दुसरा शहाजहान हे दिल्लीच्या गादीवर येऊन मरण पावेपर्यंत निजाम आपल्या कमी दर्जाच्या जागेवरच स्वस्थ राहिला. औरंगजेबानंतरचा ११ वा बादशहा महमदशहा दिल्लीस राज्य करूं लागला, त्यावेळीं सय्यद बंधूंनीं निजामास मुरादाबाद येथून काढून माळव्यास पाठविलें. पण तेथूनही त्यास काढून टाकण्याचा सय्यद बंधूंनीं प्रयत्न चालविला तेव्हां निजामानें एकदम दक्षिणेंत आपल्या पूर्वीच्या प्रांतांत येऊन तो प्रांत हस्तगत केला. दिल्लीहून सय्यद बंधूंनीं पाठविलेल्या दोन मोठ्या फौजांचा निजामानें पराभव करून आपलें स्वतंत्र राज्य स्थापन केलें. मध्यंतरीं कांहीं काळ दिल्लीच्या बादशहाचे मुख्यवजीर या नात्यानेंही काम केलें. पण तेथें न जमल्यामुळें त्यास पुन्हां दक्षिणेंतील आपल्या स्वतंत्र राज्याधर यावें लागलें. दक्षिणेंतील मराठ्यांशींच निजामास विशेष झगडावें लागलें. त्याची ही कामगिरी पाहून त्याची मर्जी राखण्याकरितां दिल्लीच्या बादशहानें हिजरी ११३८ सालीं त्यास आसफजाह हा किताब देऊन दक्षिणेंतील आपला प्रतिनिधी ही पदवी दिली व मराठ्यांविरुद्ध लढणाऱ्या फौजांचें सेनाधिपत्य दिलें.

इराणचा बादशहा नादिरशहा यानें दिल्लीवर स्वारी केली व ३० हजार माणसांची कत्तल केली तेव्हां त्याच्या पुढें जाऊन ही कत्तल बंद करण्याची विनंति करण्याचें धैर्य दिल्लीच्या बादशाहालाही होईना. तेव्हां निजाम स्वतः पुढें झाला व त्यानें नादिरशहाला शांत केलें. असें सांगतात कीं, नादिरशहाची त्या वेळीं निजामावर इतकी मर्जी बसली कीं त्यानें सबंध मोगल साम्राज्य निजामास देऊं केलें पण मी बादशाहांचा नोकर आहे व नोकरानें असें करणें कृतघ्नपणाचें

होईल; शिवाय तुम्हालाही वचनभंगाचा दोष लागेल असें निजामानें उत्तर दिलें व तें ऐकून नादिरशहा फार खुष झाला.

अहमद खान अबदाली यानें दिल्लीवर स्वारी केल्याचें ऐकून बादशहांच्या मदतीकरितां निजाम दक्षिणेहून निघाला. पण बादशहा ( महमद शहा ) याचा मुलगा अहमद शहा यानेंच अबदालीचा मोड केल्याचें ऐकून निजाम ब-हाणपूर येथील छावणी सोडून पुढें दिल्लीस गेला नाहीं. तेथेंच तो आजारी पडला व हैद्राबाद येथें नवीन उपस्थित झालेलें बंड मोडण्यासाठीं परत फिरत असतां मरण पावला.

निजामाच्या मृत्यूनंतर त्याचे दोन मुलगे व एक नातू यांच्यांत गादी-करितां तंटा लागणार परंतु त्यांतील दोघे मयत अथवा ठार होऊन सलाबत जंग ( पुत्र ) हाच अखेर शिल्लक राहिला व तो फ्रेंचांच्या मदतीनें गादीवर बसला. आसफजहाचा चौथा पुत्र निजामआलीखान यानें इंग्रजांच्या मदतीनें सलाबत जंगास १७५१ सालीं पदच्युत केलें व स्वतः ४२ वर्षें राज्य केलें. त्याच्या कारकिर्दीत त्याचें इंग्रजाशीं कित्येक तहानामे झाले. एका तहानें निजामसरकारनें उत्तर सरकार व सीडेड डिस्ट्रिक्टस हे इंग्रजांना दिले व इंग्रजांची सबसिडियरी फौज ठेवली.

निजामअलीखान १८०३ सालीं मरण पावला. व त्याचा मुलगा शिकंदर जहा गादीवर आला. १८१८ मध्यें इंग्रजांनीं पेशवाई नष्ट केल्यानंतर स्वतः इंग्रजच निजामाकडून चौथाई वसूल करून घेत होते. पण ती रद्द करण्याचें १८२२ सालीं निजाम व ब्रिटिश यांच्यामधील करारनाम्यांत ठरलें.

सिकंदरजहा १८२९ मध्यें वारला व त्याचा मुलगा नासिरुद्दौला राज्यावर आला. निजाम सरकारकडे फौजेच्या खर्चाची बाकी थकल्यामुळें १८५३ सालीं निजामानें वऱ्हाड व उस्मानाबादचे कांहीं जिल्हे इंग्रजांना दिले. १८५७ सालीं नासिरुउद्दौला मरण पावला व त्याचा पुत्र अफजुलउद्दौला गादी-वर बसला.

याच सालीं शिपायांचें मोठें बंड हिंदुस्थानांत उत्पन्न झालें व हैद्राबाद संस्थानासही त्याची बाधा होण्याची भीति होती, पण त्यावेळचे मुख्य प्रधान पहिले सर सालारजंग यांनीं धोरण राखून ब्रिटिश सरकारास साह्य केलें. यामुळें

ब्रिटिश सरकारनें पुढें १८६० सालीं १८५३ चा तहनामा बदलून उस्मानाबाद, रायचूर, गोदावरी कांठचा कांहीं प्रदेश निजामास परत दिला. फक्त वऱ्हाड मात्र ट्रस्ट म्हणून १८५३ मधील तहनाम्यांत नमूद केलेल्या कारणासाठीं आपणांकडे ठेविला. १८६१ सालीं इंग्रजसरकारनें अफ्जुलद्दौला यास जी. सी. एस्. आय्. ही पदवी दिली.

अफ्जुलउद्दौला १८६९ सालीं मरण पावल्यानंतर त्याचे पुत्र मीर महबूब अलीखां हे गादीवर आले. त्यांचं वय त्यावेळीं अवघें तीन वर्षांचें असल्यामुळें एक रीजन्सी नेमण्यांत आली व त्यांस लॉर्ड रिपन यांनीं १८८४ सालीं गादीवर बसविलें. १९०१ सालीं महाराजा सर किसन प्रसाद बहादुर यांना दिवाण नेमण्यांत आलें. १९०२ सालीं वऱ्हाडप्रांत इंग्रजांना कांहीं शर्तींवर कायम पट्टयानें देण्यांत आला. सर मीर महबूब अलीखान यांच्या मागून त्यांचे चिरंजीव म्हणजे सध्यांचे निजामसाहेब नबाब सर मीर उस्मान आली खान बहादुर फतेह जंग हे ता. २९ आगष्ट १९११ रोजीं गादीवर आले. जुलै १९१२ पासून नोव्हेंबर १९१४ पर्यंत नबाब तिसरे सालारजंग बहादुर हे दिवाणपदावर होते. पण त्यापुढें निजामानें सर्व राज्यकारभार स्वतःच्या हातीं घेतला. १९१९ सालीं त्यांनीं एक फर्मान काढून राज्यकारभार चालविण्याकरितां एक कार्यकारी मंडळ नेमिलें.



# राज्यपद्धति.

सध्याचे निजाम एच. ई. एच. मीर उस्मान अलीखान निझामुलमुल्क आसफजाह बहादुर हे ता. २९ आगष्ट १९११ रोजीं राज्यपदारूढ झाले. तिसरे नबाब सालारजंग बहादुर हे त्यांचे पहिले मुख्य प्रधान होत. नबाब सालारजंग यांनीं ता. ११ जुलै १९१२ पासून १ डिसेंबर १९१४ पर्यंत म्हणजे सुमारें अडीच वर्षें मुख्य प्रधानाचें काम केलें. यानंतर निजामसाहेब मीर उस्मान अली खान बहादूर यांनीं राज्याचीं सर्व सूत्रें आपल्या हातांत घेतलीं व ते स्वतःच सर्व कारभार पाहूं लागले. ही पद्धति पांच वर्षें चालूं होती. यानंतर ता. १७ नोव्हेंबर १९१९ रोजीं निजाम साहेबांनीं एक फर्मान काढून मुख्य राज्यकारभाराचें काम कार्यकारी मंडळ ( एक्झिक्यूटिव्ह कौन्सिल ) यांच्याकडे सोंपविण्याचें जाहीर केलें. या फर्मानांत निजामसाहेबांनीं कोणतीं कामें पहावयाचीं, त्यांची मंजुरी कोणत्या कामांना पाहिजे, कार्यकारी मंडळाच्या अध्यक्षाकडे कोणतीं कामें सोंपवायचीं व कार्यकारी मंडळाला कोणतीं कामें पहाण्याचा अधिकार असावा हें सर्व जाहीर करण्यांत आलें होतें. १९१४ सालीं निजाम साहेबांनीं स्वतःकडे सर्व अधिकार घेतांना जें मंत्रिमंडळ ( कॅबिनेट कौन्सिल ) अस्तित्वांत आणलें होतें तें १९१९ च्या फर्मानानें रद्द करण्यांत आलें व नवीन एक्झिक्यूटिव्ह कौन्सिल अस्तित्वांत येऊन ह्या ए. कौन्सिलचे अध्यक्ष सर अली इमाम यांना नेमण्यांत आलें.

सर अली इमाम यांनीं १९२२ सालीं अध्यक्षत्वाच्या जागेचा राजिनामा दिला व त्यांच्या जागीं सर फरिदूनमुल्क बहादुर यांची अध्यक्ष म्हणून नमणूक झाली. याच वेळेला मि. ग्लॅन्सी यांच्या जागीं मि. हैदरी यांना फडणीस नेमण्यांत आलें. या शिवाय कार्यकारी मंडळांत आणखीही कांहीं फेरफार झाले. कार्यकारी मंडळाच्या सात सभासदांखेरीज ( सदरुलमहामां खेरीज ) पेशीखातें व धर्मखातें अशीं दोन आणखी खातीं आहेत. पण त्या खात्याचे मुख्य अधिकारी हे कार्यकारी मंडळाचे सभासद नाहींत.

निजाम सरकारांचें ११ सेक्रेटरी असून त्यांच्याकडे पुढील खातीं देण्यांत आलीं आहेत.

सेक्रेटरी खात्याचें नांव.

१ चीफ सेक्रेटरीः— पेशी हुजूर खातें.

२ पोलिटिकल सेक्रेटरीः— राजकीय व म्युनिसिपल खातें.

३ फिनॅन्शियल सेक्रेटरीः— जमाखर्च, टांकसाळ, विद्युत् व दप्तर दिवाणी.

४ ज्युडिशियल सेक्रेटरीः— न्याय, पोलिस, पोष्ट, शिक्षण, नोंदणी व पुराणवस्तु संशोधन.

५ रेव्हिन्यू सेक्रेटरीः— जमीनवसूल, धारेबंदी, जकाती, जंगलें, अबकारी, अज्ञानांच्या इस्टेटी.

६ लेजिस्लेटिव्ह सेक्रेटरीः— कायदे मंडळाचें काम पहाणें.

७ पी डब्ल्यू. सेक्रेटरीः— सार्वजनिक बांधकामें व पाणीपुरवठा.

८ पी. डब्ल्यू. सेक्रेटरी नं २:— कॉलवे टेलिफोन.

९ मिलिटरी सेक्रेटरीः— लष्कर, वैद्यकीय, आरोग्य व पशुवैद्यक हीं खातीं.

१० कॉमर्स सेक्रेटरीः— व्यापार, खाणी, लोकलफंड, सहकारी चळवळ, शेती व फॅक्टऱ्या.

११ धर्मखातें:— धार्मिक संस्थांची व्यवस्था.

## राज्यकारभाराच्या पद्धतीचा विकास.

हैद्राबाद संस्थानचा राज्यकारभार मुख्यत्वेंकरून तेथील मुख्य प्रधानांनीं पहावा अशी पूर्वींची वहिवाट होती. एकादें विशेष प्रकरण आपणांकडे आलें पाहिजे असें निजामांनीं फर्माविलें असल्यास तेवढेंच प्रकरण त्यांच्या हुकमासाठीं पाठविण्यांत येत असे. १८५४ सालीं पहिले सर सालारजंग हे मुख्य दिवाण असतांना दफ्तर–ई–माल व दफ्तर–ई–दिवाणी अशीं सरकारचीं मुख्य दोन ऑफिसें राजधानीमध्यें असत. तेथेंच सरकारचा सर्व कारभार चाले. या दोन ऑफिसावरील मुख्याधिकाऱ्यांना दफ्तरदार असें म्हणत. जहागिरींची नोंद ठेवणें व सरकारचे हिशोब राखणें हीं कामें दफ्तरदार पहात. खुद्द हैद्राबाद शहरांत न्यायाचें कोर्ट व पोलिसांची व्यवस्था होती. परंतु राजधानीच्या बाहेर पोलिस नव्हते, व कोर्टेंही नव्हतीं. तेथील सर्व व्यवस्था तालुकदारांच्याकडे सोंपविण्यांत आलेली होती. त्यांजकडून जमीनमहसूल घेणें येवढेंच निजाम सरकार आपलें काम समजत असे.

# सर सालारजंग यांच्या सुधारणा.

पहिले सर सालारजंग यांनीं ही अव्यवस्था मोडून टाकली व ठिकठिकाणीं तालुकदारांचा मुशाहिरा ठरवून देऊन न्यायदानासाठीं मुन्सफांच्या नेमणुका केल्या. यानंतर त्यांनीं प्रत्येक तालुकदाराच्या हाताखालीं कांहीं पोलिस व लष्करी शिपाई देऊन त्यांनीं आपापल्या भागांत शांतता ठेवावी अशी जबाबदारी त्यावर टाकली. या पद्धतीला जमीयत जिल्हादारी असें म्हणतात. या जमयित जिल्हादारीवर देखरेख करण्याकरितां हैद्राबाद येथें एक कमिटी नेमण्यांत आली होती. यानंतर मुनशीखाना या नांवाचें एक ऑफिस सुरू करण्यांत आलें. १८५६ सालीं सरकारी तिजोरी खातें, १८६१ सालीं जकात खातें, १८६२ सालीं न्याय खातें, १८६३ सालीं सेक्रेटरीयट, हीं सुरू करण्यांत आलीं. १८६५ सालीं मुनशी खात्याचें काम बोर्ड ऑफ रेव्हिन्यूकडे देण्यांत आलें. येथून जमीन-महसुलाच्या पद्धतींत क्रांति घडून आली. तालुकदारांच्या हाताखालीं तहशीलदार नेमण्यांत येऊन प्रत्येक तालुक्यांत-सरकारी तिजोरी स्थापन करण्यांत आली. यानंतर "बोर्ड ऑफ् रेव्हिन्यू" हें रद्द करून जमीनमहसुलाचें मुख्य काम सदरुलमहाम व त्याजकडील अधिकारी यांजकडे देण्यांत आलें.

हैद्राबाद संस्थानांतील प्रत्येक खेड्यांत एक पाटील व पटवारी (कुलकर्णी) असतो. ज्या खेड्यांतील महसूल रु. ५०० पेक्षां अधिक तेथें दोन पाटील असतात एकाला माली (रेव्हिन्यू) व दुसऱ्याला पोलिस पाटील म्हणतात. १८७७ सालापर्यंत पाटील-पटवाऱ्यांना इनामी जमिनी देण्यांत आलेल्या होत्या. परंतु त्यानंतर त्यांच्या जमिनीवर इतरांप्रमाणें सारा बसविण्यांत आला व मुशाहिऱ्याबाबत त्यांना त्यांच्या गांवांत होणाऱ्या वसुलापैकीं कांहीं भाग द्यावयाचा असें ठरलें.

१८८० सालच्या सुमारास पोलिस, वैद्यकीय, जंगल, शिक्षण वगैरे खातीं सुरू करण्यांत आलीं. १८८२ सालीं बोर्ड ऑफ रेव्हिन्यूचें पुनरुज्जीवन झालें व १८८५ सालीं तें पुन्हा रद्द करण्यांत आलें. १८९३ सालीं तें पुन्हा पुनरुज्जीवित झालें पण १९०१ सालीं मात्र त्यानें शेवटचा राम म्हटला. यानंतर जमीनमहसुलाचें खातें मुख्य प्रधानाकडेच ठेवण्यांत येत असे.

१८९३ सालीं मुख्य प्रधानांना सल्ला देण्यासाठीं कॅबिनेट कौन्सिल ( मंत्रिमंडळ ) या नांवाची एक संस्था निर्माण करण्यांत आली. संस्थानचें वार्षिक बजेट तयार करणें, कायदे मंडळाच्या कामकाजांतून उत्पन्न झालेल्या महत्त्वाच्या प्रश्नांचा निर्णय करणें, जादा कमिशनांनीं केलेल्या शिफारशींचा विचार करणें वगैरे प्रश्न या कॅबिनेट कौन्सिलकडे सोंपविण्यांत आलेले होते. या कौन्सिलचे अध्यक्ष मुख्य प्रधान हेच असत. कौन्सिलनें बहुमतानें ठरविलेली योजनाही नामंजूर करण्याचा अधिकार त्यांना देण्यांत आलेला होता. ही व्यवस्था १९१४ सालापर्यंत अमलांत होती. यानंतर पांच वर्षें निजामांनीं स्वतःच राज्यकारभार पाहिला व त्यानंतर वर वर्णन केलेलें सध्यांचें कार्यकारी कौन्सिल अस्तित्वांत आलें.

## कायदे कौन्सिल.

कार्यकारी मंडळानंतर दुसरें महत्त्वाचें कौन्सिल म्हटलें म्हणजे लेजिस्लेटिव्ह कौन्सिल ( कायदे मंडळ ) हें होय. ले० कौन्सिलची स्थापना १८९३ सालीं झाली. फक्त कायदे करणें हा या कौन्सिलचा उद्देश होय. कायदे कौन्सिलचा इतिहासही कांहींसा मनोरंजक आहे. १८७० सालीं सर सालारजंग यांनीं कायदे करण्याकरितां एक कमिटी नेमली. तिचे सर्व सभासद मुसलमान कायदे पंडित होते. नंतर कांहीं दिवसांनीं कॅबिनेट कौन्सिलकडेच लेजिस्लेटिव्ह कौन्सिलचें काम सोंपविण्यांत आलें. १८९० सालीं लॉ कमिशन नांवाची एक संस्था निर्माण करण्यांत आली. या कमिशनच्या अध्यक्षानें संस्थानच्या कायद्याची तपासणी करावी व त्यांत दुरुस्त्या सुचवाव्या असें ठरलें होतें. व त्याप्रमाणें कांहीं कायदे पासही करण्यांत आले. १८९३ सालीं स्वतंत्र ले० कौन्सिल निर्माण करण्यांत येऊन एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलच्या अध्यक्षानेंच ले० कौन्सिलच्या अध्यक्षाचें काम करावें अशी व्यवस्था झाली. या कौन्सिलच्या सभासदांची संख्या २५ आहे. त्यांची वर्गवारी पुढील प्रमाणें करतां येईलः— ( १ ) अध्यक्ष, ( २ ) चीफ जस्टिस, ( ३ ) ज्युडिशियल सेक्रेटरी, ( ४ ) लीगल ॲडव्हायसर, ( ५ ) उपाध्यक्ष; ( कौन्सिलपुढें जें बिल विचारासाठीं येईल तें ज्या खात्यांतील असेल त्या खात्याचा मुख्य अधिकारी हा त्या बिलाच्या वेळीं उपाध्यक्षाचें काम करतो ).

या पांच सभासदांखेरीज बाकीचे वीस समासद् दोन वर्षे काम करतात. दोन वर्षांनंतर पुन्हा त्यांची नेमणूक किंवा निवडणूक होऊं शकते. २५ सभासदांपैकीं १४ सरकारी अधिकारी व ११ बिन सरकारी समासद् असतात. ११ बिन-सरकारी सभासदांची वर्गवारी पुढीलप्रमाणें आहे:—

दोन जहागिरदारांचे निवडलेले प्रतिनिधी—दरसाल सहा हजार रुपयांपेक्षां अधिक उत्पन्न असलेल्या जहागिरीच्या मालकांनीं हे दोन प्रतिनिधी निवडून द्यावयाचे.

दोन हायकोर्ट वकिलांनीं निवडलेले प्रतिनिधी.

एक हैद्राबाद म्युनिसिपालिटीचा प्रतिनिधी.

दोन डिस्ट्रिक्ट बोर्डाचे प्रतिनिधी.

चार कौन्सिलच्या अध्यक्षांनीं नॉमिनेट केलेले ( नेमलेले ) पुढील चार सभासद:—

एक पायगा इलाख्यांतून पाळीपाळीनें नेमलेला प्रतिनिधी.

एक सामान्य जनतेकरितां नेमलेला प्रतिनिधी.

दोन ज्या समासदांची मुदत मरत आली असेल किंवा ज्यांचा कौन्सिलच्या कामाला उपयोग होईल असे दोन समासद्.

यावरून असें दिसून येईल कीं, कौन्सिलच्या २५ समासदांपैकीं १४ सरकारी अधिकारीच असतात. ४ अध्यक्षांनीं नेमलेले म्हणजे सरकारनियुक्तच बिन सरकारी समासद् असतात. बिनसरकारी हें नांव ज्यांना देतां येईल अशा सभासदांची संख्या अवघी ७ च आहे.

## कौन्सिलचे अधिकार.

लेजिस्लेटिव्ह कौन्सिलचे अधिकारही अत्यंत मर्यादित आहेत. ( १ ) सार्वजनिक पैशासंबंधाचें कोणतेंही बिल कौन्सिलपुढें आणतां येत नाहीं. ( २ ) धर्मविषयक कायदे या कौन्सिलपुढें आणण्याची मनाई आहे. ( ३ ) निजाम सरकारचें लष्कर, व ब्रिटिश सरकार बरोबरचे संबंध यांच्यासंबंधाचें बिलही कायदे कौन्सिलपुढें आणण्याला प्रतिबंध आहे. ( ४ ) कायदे कौन्सिलची घटना किंवा अधिकार यांत फेरफार करण्यासंबंधाचें बिलही एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलच्या अध्यक्षांच्या परवानगीखेरीज कौन्सिलपुढें आणतां येत नाहीं. ( ५ ) वरील चार

बाबींसंबंधाचें कोणतेंही बिल कौन्सिलनें पास केले तरी निजाम सरकारच्या परवानगीशिवाय त्याला कायद्याचें स्वरूप प्राप्त होत नाहीं. ( ६ ) वरील बाबीं-खेरीज इतर प्रश्नासंबंधाचीं बिलें कौन्सिलनें पास केल्यानंतर त्यांना अध्यक्षांची संमति मिळाली म्हणजे कायद्यांचें स्वरूप प्राप्त होतें. ( ७ ) असे कायदे नामंजूर करण्याचा किंवा दुरुस्त करण्याचा पूर्ण अधिकार निजाम सरकारास आहे. परंतु अशा प्रत्येक कायद्याला त्यांची संमति लागत नाहीं. ( ८ ) कायदे कौन्सिलानें कोणतेही कायदे करतांना मुसलमानांचा कायदा, हिंदूंचीं शास्त्रें, जनतेच्या चालीरीती व ब्रिटिश हिंदुस्थानांतील व सुधारलेल्या देशांतील न्यायाचीं तत्त्वें यांना सोडून कायदा करतां कामा नये. ( ९ ) कौन्सिलच्या कोणत्याही कायद्यान्वयें निजाम सरकारच्या कोणत्याही हक्कांना बाध येणार नाहीं अशा तऱ्हेची मर्यादा कायदे कौन्सिलच्या अधिकाऱ्यांना घातलेली आहे. लीगल सेक्रेटरी हे कौन्सिलच्या सेक्रेटरीचें काम पहातात.

खरें सांगावयाचें म्हणजे हें कायदे कौन्सिल केवळ एक नामधारी सभा असून इंग्रजी कायद्याचें भाषांतर व त्यांत कांहीं फेरफार करून ते प्रसिद्ध करणारें एक खातें होय, कारण प्रजाजनांचा हितचिंतक असा प्रजेनीं निवडून दिलेला एकही प्रतिनिधी त्यांत नाहीं व प्रजेला अद्याप निवडणुकीचा हक्कही देण्यांत आला नाहीं. राज्यकारभारासंबंधीं कसलीही चर्चा होऊं शकत नाहीं. बजेट मांडणें, प्रश्न विचारणें, ठराव आणणे हें तर दूरच राहिलें, बरें पास केलेल्या कायद्याप्रमाणें तरी स्वतः निझाम साहेब वागतात काय ? तेंही नाहीं. सर्व कायदेकानू धाब्यावर बसवून कोर्टामार्फत चौकशी न करितां आपल्या लहरीप्रमाणें पाहिजे त्याला कैदेत टाक व पाहिजे त्याचीं इस्टेट जप्त करण्याचा व मनास येईल तसें वागण्याचा त्यांना निरंकुश अधिकार आहे व त्याचा ते उपयोग करितात.



( निझामसरकारच्या इ. स. १९२४, १९२५ म्हणजे फसली स. १३३४ च्या रिपोर्टांवरून )

# संस्थानचें उत्पन्न व खर्च.

हैद्राबाद संस्थानचें उत्पन्न व खर्च यासंबंधाचे तपशीलवार आंकडे देण्यापूर्वी वाचकांना संस्थानमार्फत होणाऱ्या एकंदर उलाढालींची कल्पना यावी म्हणून स. १३३४ फसली मध्यें झालेल्या जमाखर्चाचे वट्ट आंकडे पुढें देतों.

| | | |
|---|---|---|
| जमा | — | ७, ८२, ६६००० रु. |
| खर्च | — | ५, ९३, ८२००० रु. |
| शिल्लक | — | १, ८८, ८४००० रु. |

वरील आंकड्यांची स. १३३२ ते १३३४ या तीन वर्षांतील जमा खर्चांच्या सरासरीशी तुलना केल्यास असें दिसून येतें कीं, निझामसरकारचें उत्पन्न वाढत असून खर्च मात्र कमी होत चालला आहे. अर्थात् सरकारच्या शिलकेची वाढ होत चालली आहे. स. १३३२ सालचे आंकडे पुढें देतों. ते पाहिले म्हणजे वाचकांची खात्री होईल.

| | | |
|---|---|---|
| जमा | — | ७०१४९००० |
| खर्च | — | ६६०९६००० |
| शिल्लक | — | ४०५३००० |

याचा अर्थ असा कीं, स. १३३४ सालीं निझाम सरकारांनीं रयतेकडून जरूरीपेक्षां ( ८१००००० ) एक्याशीं लक्ष रु. अधिक उकळले व विशेष गमतीची गोष्ट ही कीं, लोकहितासाठीं खर्चीं पडणारी रक्कम मात्र ( ६७००००० ) सदुसष्ट लक्षांनीं कमी करण्यांत आली, अशा रीतीनें निजामांच्या गंगाजळींत १३३२ सालापेक्षां १३३४ सालीं एककोट अठ्ठेचाळीस लक्ष रुपये लोकांच्या खिशांतून अधिक घेतले गेले अर्थात् संस्थानांतील रयतेच्या दारिद्र्याची वाढ होण्यास कराचा बोजा हें एक मुख्य कारण आहे.

## खातेवार जमाखर्च.

वर लिहिलेली ७, ८२, ६६००० ही संस्थानच्या उत्पन्नाची रक्कम निरनिराळ्या खात्यांकडून कशी जमा होते याचे स. १३३४ फ. मधील आंकडे पुढें दिले आहेत.

## जमा

| खात्याचे नांव | रक्कम |
|---|---|
| जमिनमहसूल | २, ९३, ९२००० |
| जंगल | ८, ४३००० |
| कस्टम्स ( करोडगिरी ) | १, ३३, ८७००० |
| आबकारी | १, ५७, १२००० |
| अफू व गांजा | १४, ५०००० |
| स्टांप | १९, ४३००० |
| रजिस्ट्रेशन | २, ५८००० |
| खाणी | १, ०८००० |
| वऱ्हाडबद्दलचा मोबदला | २९, १७००० |
| व्याज | ४९, ७९००० |
| टांकसाळ | १, १९००० |
| नोटा ( पेपर करन्सी ) | ९, २९००० |
| पोस्ट ( टप्पा ) | ८, ४१००० |
| पाटबंधारे | १३००० |
| आगगाड्या ( रेलवे ) | ३७, ७३००० |
| इलेक्ट्रिसिटी | ३०००० |
| टेलीफोन | ५००० |
| वर्क शॉप | १६००० |
| हुंडणावळ | ३८००० |
| किरकोळ | ५, १०००० |
| एकूण | ७, ८२, ६६००० |
| जादा | जमा |
| डेव्हलपमेंट ( तरकियात ) | ९००० |
| दुष्काळ फंड | ४२००० |
| एकूण जमा | ७, ८३, १७००० |

या आंकड्यांवरून असें दिसून येतें कीं, निझाम सरकारचे आबकारी खात्याचें उत्पन्न सालोसाल वाढत चाललें आहे. अफू खात्याचे उत्पन्नांतही वाढ झाली आहे. मुसलमानांच्या राज्यांत दारूला उत्तेजन मिळणें हें इस्लामचा कट्टर

अभिमान बाळगणाऱ्या निझामांना व त्यांच्या अधिकारी वर्गाला कसें शोभतें ? तसेंच व्याज घेणें हें दारूप्रमाणेंच मुसलमानी धर्माच्या विरुद्ध असूनही त्याचें उत्पन्न दरसाल वाढतच जात आहे, ह्या संस्थानाला इस्लामी रियासत, इस्लामी रियासत, व संस्थानचा सरकारी धर्म इस्लामी आहे असें वेळीं अवेळीं ओरड करणाऱ्या स्थानिक व बाहेरच्या स्वार्थपरायण मुसलमानांना व निझाम शरकारला इस्लामचें खरें तत्व समजलें आहे काय ? तसेंच करोडगिरी ( कस्टम ) रेलवे व स्टॅंप इ. खात्यांचें उत्पन्न झपाट्यानें वाढत आहे.

## खर्च

| खात्याचें नांव | रक्कम |
|---|---|
| जमीन महसूल | ६१, ७६००० |
| पाटबंधारे | ८, ६१००० |
| जंगल | ७, ०५००० |
| करोडगिरी, ( कस्टम्स ) | १५, २१००० |
| आबकारी | २२, ९८००० |
| अफू | १, १०००० |
| स्टॅंप | १, ७५००० |
| रजिस्ट्रेशन | १, ०९००० |
| खाणी | ४८००० |
| व्याज | १९, ५९००० |
| टांकसाळ | २, ५१००० |
| नोटा तयार करणें | ८९००० |
| हुंडणावळ | ६२००० |
| पोस्ट | ९, ९३००० |
| निझामांच्या खाजगी खर्चाकरितां देणगी | ५०, ००००० |
| राज्यकारभार | ३०, १०००० |
| पोलीटिकल खर्च | ३, ९६००० |
| लाइफ इन्शुरन्स | ४२००० |
| मनसब | १६, ११००० |
| लष्करी खर्च ( फौज ) | ६०, ६०००० |

# खर्च.

| खात्याचें नांव | रक्कम |
| --- | --- |
| न्यायखातें ( अदालत ) | १८, ६००० |
| तुरुंग ( जेल ) | ३, ७९००० |
| पोलीस | ५५, ८१००० |
| शिक्षण ( तालीमात ) | ५५, ८६००० |
| मेडिकल ( दवाखाना ) | १७, ३०००० |
| धर्मखातें ( उमूर मजहबी ) | ९, ९६००० |
| शेतकी | १, ७०००० |
| व्हेटरनरी ( चतुष्पादखातें ) | २, ७८००० |
| कोऑपरेटिव्ह | १, ८२००० |
| किरकोळ खातीं | ९३००० |
| म्युनिसिपालिट्या ( सफाई ) | २६, ४५००० |
| रस्ते व बांधकामें | ५०, ३९००० |
| कालवे व पाटबंधारे | २०, ८३००० |
| आगगाड्या | १०, ८००० |
| छापखाना | ६००० |
| उद्योगधंदे | ९२००० |
| डेव्हलपमेंट ( तरक्कियात ) | ७, ५५००० |
| किरकोळ | ३, ८९००० |
| एकूण खर्च | ५, ९३, ८२००० |

# जादा खर्च

| | |
| --- | --- |
| कर्जफेड | १०, ००००० |
| दुष्काळ फंड | १५, ४२००० |
| पोलिटिकलबाबी | २०००० |
| धर्म खातें | ५१००० |
| रस्ते व बांधकामें | २, ५९००० |
| डेव्हलपमेंट | ३, ००००० |
| किरकोळ | ३, १७००० |
| एकंदर खर्च | ६, २८, ७१००० |

खर्चाच्या बाबींवर पुष्कळ टीका करतां येईल. खर्चाच्या बाबींपैकीं वाचकांच्या पहिल्या प्रथम एकदम डोळ्यांत भरणारी अवाढव्य प्रचंड बाब म्हटली म्हणजे निझाम साहेबांच्या खासगी खर्चाकरितां देण्यांत येणारी पन्नासलक्ष रुपयांची सरकारी देणगी ही होय. हिंदुस्थानांतील कोणताही संस्थानिक अथवा सर्व संस्थानिक ज्यांचे मांडलिक आहेत त्या सार्वभौम सरकारचे प्रतिनिधी अर्थात् ना. व्हाइसरॉय लॉर्ड अर्विन यांना देखील सरकारी तिजोरींतून इतका वडा तनखा दिला जात नाहीं. ह्या देणगीखेरीज निझामाचें खासगी जहागिरी ( सर्फेखास इलाख्याचेंच ) उत्पन्न वार्षिक दीड कोट असून नक्क कोट्यावधि रुपयांचें व्याजाचें उत्पन्न येत असेल तें निराळेंच आहे. लोकशिक्षणासाठीं खर्ची पडावयाची रक्कम मात्र वाढावयाच्या ऐवजीं कमीच होत चालली आहे ! स. १३३४ फ. च्या बजेटमध्यें शिक्षण खात्यासाठीं ६८००००० अडुसष्ट लक्ष रुपये खर्च करावयाचे ठरलें होतें पण साल अखेर शिक्षणाप्रीत्यर्थ अवघे ५५००००० पंचावन लाख खर्ची पडले. वैद्यकीय खात्यावरही तोच प्रकार घडून आला आहे. लोकांकडून दवाखान्याची मागणी केली जात असूनही या खात्यांत दोन लाखांची छाटाछाट करण्यांत आली.

## शिक्षण.

हैद्राबाद संस्थानांत लोकशिक्षणाची तरतूद योग्य रीतीनें झालेली नाहीं ही गोष्ट सर्वश्रुत आहेच. मुसळमानांची लोकसंख्या शेंकडा १० देखील नसून त्यांच्या शिक्षणासाठीं लक्षावधि रुपये खर्च केले जातात परंतु शेंकडा ९० हिंदुप्रजेच्या शिक्षणाकडे दुर्लक्ष केलें जातें. मुख्यत्वेंकरून हिंदुलोकांनीं चालविलेल्या खासगी शाळांवर सरकारची कशी करडी नजर आहे हें कांहीं दिवसांपूर्वीं खासगी शाळांसंबंधीं निघालेल्या हुकमावरून लोकांना दिसून आलेंच आहे. याचा परिणाम असा होतो कीं, हिंदूंच्या शिक्षणाला सरकार तर पुरेशी मदत करीत नाहींच, परंतु स्वतंत्र रीतीनें खासगी शिक्षणसंस्था चालविण्याला त्यांना बंदी करण्यांत आली आहे; अशा स्थितींत लोकांनीं काय करावें हा महत्त्वाचा प्रश्न आहे.

हिंदूंच्या तीन संस्कृत व वैदिक शाळा औरंगाबाद, पट्टण व बीदर येथें चालू असलेल्या १३३४ सालीं बंद पडल्या. पण त्या उलट उस्मानिया

हायस्कूल व उस्मानिया विश्वविद्यालयावर अधिक पैसा खर्च होत आहे. गेलीं तीन वर्षें संस्थानांतील शाळांची संख्या कशी कमी होत गेली आहे हें खालील आंकड्यांवरून दिसून येईल.

| स. फसली | शाळांची संख्या |
|---|---|
| १३३२ | ४१४१ |
| १३३३ | ४०४० |
| १३३४ | ४००१ |

एकंदर तीन वर्षांत निझाम सरकारांनी हिंदू प्रजेला उपयोगी पडणाऱ्या १४० शाळा बंद केल्या. सरकारचें शिक्षणविषयक धोरण कसें पिछेहाटीचें आहे हें यावरून दिसून येतें. स. १३३३ फ. मध्यें, ११३ व स. १३३४ सालीं ५१ शाळा काटकसरीच्या सबबीवर बंद करण्यांत आल्या !

ब्रिटिश हद्दींत सर्वत्र सक्तीच्या प्राथमिक शिक्षणाची योजना केली जात असतांना निझाम सरकार अस्तित्वांत असलेल्या प्राथमिक शाळांवरच गदा घालीत आहे हा देखावा खरोखरच विचित्र नव्हे काय ?

शाळेंत जाणाऱ्या विद्यार्थ्यांची एकंदर संख्या २४४२३४ आहे. ही संख्याही फारच कमी आहे. एकंदर लोकसंख्येच्या मानानें पाहिलें तर शें. २ टक्के या प्रमाणांत लोकांना शिक्षण मिळतें, शिक्षणाची इतकी दुर्दशा दुसरीकडे कोठेंही पहावयास सांपडणार नाहीं.

खासगी शाळांची संख्या ४०५३ आहे व त्यांत ७६६५४ विद्यार्थी शिक्षण घेत आहेत. हैद्राबाद संस्थानांत सरकारी शाळांची सं. ४००१ आहे, अर्थात् सरकारी शाळांपेक्षां खासगी शाळांचा संख्या जास्त आहे. ह्यावरून ही गोष्ट सिद्ध होत आहे कीं सरकार आपल्या प्रजेच्या शिक्षणाकरितां पुरेशा शाळा काढीत नसल्यामुळें प्रजेला स्वावलंबनाची कास धरणें भाग पडतें.

## शिक्षणासंबंधी खर्च.

लोकशिक्षणासाठीं निझाम सरकाराकडून सरकारी तिजोरींतून होणारा वार्षिक खर्चही हळू हळू कमी होत चालला आहे. या संबंधाचे गेल्या तीन वर्षांचे आंकडे पुढें दिले आहेत.

| वर्ष | खर्च रु. |
|---|---|
| १३३२ | ६०, ५०, ४१९ |
| १३३३ | ५९, १५, ९४२ |
| १३३४ | ६०, १८, २११ |

## उच्च शिक्षण.

उस्मानिया युनिव्हर्सिटी ही संस्थानांतील मध्यवर्ती शिक्षणसंस्था होय. युनिव्हर्सिटी कॉलेजांत आर्टम् फ्याकल्टीकडे ५६० विद्यार्थी असून ( थिऑलॉजिकल ) धर्मशाखेकडे शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्या अवघी १७ आहे! पण या १७ विद्यार्थ्यांच्या शिक्षणासाठीं निझाम सरकार ४१९१२ रु. खर्च करितें. आर्टस् शाखेकडील विद्यार्थ्याला प्रत्येकीं ३०७ रु. १४ आणे खर्च येतो. पण धर्मशाखेकडील प्रत्येक विद्यार्थ्यामागें निझाम सरकार त्याच्या आठपट म्हणजे सालीना प्रत्येकीं २४६५ रु. ६ आ. ३ पै. खर्च करितें आणि हे विद्यार्थी बहुतेक मुसलमान असतात हें सांगावयास नको. धर्मशाखेकडे होणाऱ्या एवढ्या अवाढव्य खर्चांत निझाम सरकार १५० विद्यार्थ्यांच्या उच्चशिक्षणाची सोय करूं शकेल.

मद्रास युनिव्हर्सिटीला जोडलेलें निझामकॉलेज ह्या नांवाचें एक कॉलेज येथें असून तेथें २७० विद्यार्थी आहेत. निझाम कॉलेजांत प्रत्येक विद्यार्थ्यामागें सरकारला ४५१ रु. ४ आणे खर्च येतो.

संस्थानांत तीन इंटरमीजियट कॉलेजें आहेत. परंतु त्यांतील विद्यार्थ्यांची संख्या दरवर्षी कमी कमी होत चालली आहे. सध्या हैद्राबादच्या इं. कॉलेजांत १०७ व औरंगाबादच्या कॉलेजांत फक्त ३८ विद्यार्थी आहेत, तिसरें हैद्राबाद येथें एक झनाना इं. कॉलेज असून त्यांत फक्त ८ मुली आहेत.

## दुय्यम ( सेकंड्री ) शिक्षण.

स. १३३३ सालीं संस्थानांत दुय्यम शिक्षणाचीं पंधरा हायस्कूल्स होतीं. पण त्यांपैकीं एक हायस्कूल बंद करण्यांत आलें. उत्तरोत्तर हायस्कूलमधील विद्यार्थ्यांची संख्या कशी कमी होत चालली आहे ती पहा.

| वर्ष. स. क. | संख्या. |
|---|---|
| १३३२ | ६३८३ |
| १३३३ | ५६८५ |
| १३३४ | ५७१३ |

इंग्लिश हायस्कूलमध्यें प्रत्येक मुलाला ८४–९–४ खर्च येतो. उस्मानिया विद्यालयाला जोडलेल्या हायस्कूलांची संख्या १७ असून त्यांत ६८३८ विद्यार्थी आहेत व प्रत्येक विद्यार्थ्यामागें सरकारला ५९ रु. खर्च येतो.

## मिडल स्कूल्स.

मिडल स्कूलांची संख्या ९६ आहे व त्यांत २३६४४ विद्यार्थी असून प्रत्येक विद्यार्थ्यामागें ३८ रु. ८ आ. खर्च येतो. पण शिक्षणाची कार्यक्षमता कमी प्रतीची असल्यामुळें उस्मानिया विश्वविद्यालयाच्या प्रवेश परीक्षेंत शेंकडा १७ टक्के व मिडलस्कूल परीक्षेंत शे. ४० टक्के विद्यार्थी पास होतात.

## प्राथमिक शिक्षण.

प्राथमिक शाळांची संख्या ३१४२ आहे व त्यांमध्यें १,६९७९५ विद्यार्थी आहेत. शाळांची व विद्यार्थ्यांची संख्या कशी कमी होत आहे हें यापूर्वी दाखविलेंच आहे. प्राथमिक शाळांची वर्गवारी पुढील प्रमाणें आहे––

| संस्था. | संख्या. | खर्च रु. |
|---|---|---|
| सरकारी | ६९७ | १२८२७६४ |
| सर्फेखास इलाखा | १२८ | ७४३९७ |
| लोकलबोर्ड | १९६२ | २,४२२१३ |
| खासगी ( सरकारी मदत घेणाऱ्या ) | २९१ | ५६५२५ |
| खासगी ( सरकारची मदत न घेणाऱ्या ) | ६४ | २५३८४ |

प्राथमिक शिक्षणावर सरकार एकंदर १६,८४,२८३ रु. खर्च करितें. ह्यावरून निझाम सरकार प्राथमिक शिक्षणाकडे किती कमी रक्कम खर्च करितें हें दिसून येईल. त्रावणकोर, म्हैसूर वगैरे संस्थानांत शिक्षणासाठीं सरकारच्या

एकंदर उत्पन्नापैकीं १/५ एकपंचमांश भाग खर्चीं पडतो पण निझाम सरकार आपल्या उत्पन्नापैकीं १/४० एक चाळसांश भाग देखील खर्च करीत नाहीं. ह्यावरून आपल्या प्रजेस शिक्षित करण्याच्या बाबतींत निझाम सरकार किती बेफिकिर मागासलेले आहे ही गोष्ट सिद्ध होते.

दरवर्षीं प्राथमिक शिक्षणाच्या शाळांची संख्या कमी होत आहे. सन १३३४ व १३३५ फसली ह्या दोन वर्षांचे आंकडे काय दाखवितात ते पहा.

| संस्था. | स. क. १३३३ | स. क. १३३४ |
|---|---|---|
| | शाळांची | संख्या. |
| प्राथमिक शाळा ( सरकारी ) | ७१८ | ६९७ |
| लोकलबोर्ड ( लोकलफंड ) प्रा. शा. | २०५५ | १९६२ |

## प्राथमिक शाळांवर होणारा खर्च.

| शाळा. | सन. १३३३ | सन. १३३४ |
|---|---|---|
| | खर्च रु. | खर्च रु. |
| सरकारी प्राथमिक शाळा | १३२१०१ | १२८२७६४ |
| लोकल बोर्डाच्या प्रा. शाळा | २५६०३६ | २४५२१३ |

## स्त्रीशिक्षण.

मुलींच्या शिक्षणाची तर गेली तीन वर्षे सारखी पिछेहाट होत चालली आहे ह्यासंबंधाचे गेल्या तीन सालचे आंकडे पुढे देतों.

| सन फ. | शाळांची संख्या | विद्यार्थिनींची संख्या |
|---|---|---|
| १३३२ | ७३४ | ३४७५८ |
| १३३३ | ६९८ | ३३८०८ |
| १३३४ | ६८२ | ३३५६२ |

गेल्या तीन वर्षांत मुलींच्या शाळांची संख्या ४२ नें व त्यांतील विद्यार्थिनींची संख्या सुमारें १२०० नीं कमी झाली आहे.

मुलींच्या शाळांची वर्गवारी पुढील प्रमाणें करितां येईल. पांच हायस्कुलें, १५ मिडल स्कूल व ६६२ प्राथमिक शाळा. यांपैकीं २ हायस्कुलें, २ मिडल स्कुलें आणि ३६४ प्राथमिक शाळाच काय तें सरकार चालवितें बाकीच्या सर्व शाळांचा बोजा मुख्यत्वें करून खासगी संस्थांवरच पडतो. मुलींच्या तीन हायस्कुलांना सरकारकडून मदत मिळत नाहीं आणि लोकल फंडाकडूनही मुलींच्या प्राथमिक शिक्षणाच्या अवघ्या सहाच शाळा चालविल्या जातात.

## अस्पृश्य वर्गांचें शिक्षण.

अस्पृश्य वर्गाच्या शिक्षणाकडे तर निझाम राज्यांत फारच दुर्लक्ष केलें जातें. अस्पृश्यांची लोकसंख्या एकंदर २१ लाख असूनही अस्पृश्यांकरितां चालविलेल्या शाळांत अवघे १४०० ही विद्यार्थी असूं नयेत ही सरकारांस अत्यंत लांछनास्पद गोष्ट नव्हे काय ?

त्यांच्यासाठीं नवीन शाळा काढण्याची गोष्ट तर बाजूलाच राहिली पण असलेल्या शाळाही बंद करण्याचा धडाका कसा सुरू आहे तो पहा.

| सन | अस्पृश्यांच्या शाळा | विद्यार्थ्यांची संख्या |
|---|---|---|
| १३३२ | ८८ | २९७८ |
| १३३३ | ५२ | १२५९ |
| १३३४ | ५२ | १३९५ |

याचा अर्थ हा कीं गेल्या तीन वर्षांत अस्पृश्य विद्यार्थ्यांची संख्या निम्म्याहून कमी झाली.

## पुरुष शिक्षकांकरितां ट्रेनिंगस्कूल्स.

हैद्राबाद, औरंगाबाद, वरंगल, या तीन ठिकाणीं शिक्षकांकरितां ट्रेनिंगस्कूल्स सुरू आहेत. त्यांत एकंदर १९६ विद्यार्थी असून त्यांच्यासाठीं स. १३३४ सालीं ३६०३३ रु. खर्च झाला.

## स्त्री शिक्षकांकरितां ट्रेनिंग स्कूलस.

स्त्री शिक्षकांकरितां हैद्राबाद, औरंगाबाद व वरंगल आणि गुलबर्गा ह्या चार ठिकाणीं अनुक्रमें उरदू, मराठी, तेलगू, व कानडी भाषेंतून स्त्रीशिक्षकांना ट्रेनिंग देण्याची व्यवस्था केली आहे. स्त्रियांच्या ट्रेनिंगस्कूलासाठीं अदमासें ३०००० रु. खर्च केले जातात.

## औद्योगिक शाळा.

हैद्राबाद आणि औरंगाबाद येथें सरकारनीं चालविलेली एक एक औद्योगिक शिक्षणाची शाळा आहे त्याशिवाय ( ७ ) खासगी शाळा आहेत, ह्या सर्व शाळांत ( ६७८ ) विद्यार्थी असून स. १३३३ सालीं त्यांच्या शिक्षणासाठीं ९१२०२ रु. खर्च झाला.

## व्हिक्टोरिया मेमोरियल ऑर्फनेज.

ह्या ऑर्फनेजमध्यें सन १३३४ सालीं ११३ मुलगे व १८८ मुली होत्या.

## धर्म शिक्षण.

धर्मशिक्षण देणाऱ्या शाळांची संख्या २१ आहे. त्यांत १०८१ विद्यार्थी शिक्षण घेतात त्यांना स. १३२४ सालीं ३३६०१ सरकारी ग्रयांट होती, परंतु औरंगाबाद, पट्टण व बिदर येथील तीन संस्कृत शाळा मात्र बंद झाल्या.

## स्कॉलर्शिपा.

स. १३३४ साली ५६४८८६ रु. शिष्यवृत्त्या देण्यासाठीं खर्च करण्यांत आले त्यांचा तपशील पुढील प्रमाणें.

| | | |
|---|---|---|
| जनरल स्कॉलर्शिप | — | १२८७७१ |
| स्पेशल स्कॉलर्शिप | — | १४३१५१ |
| एशियाटिक स्कॉलर्शिप | — | ४९८९० |
| यूरोपियन स्कॉलर्शिप | — | १५१७२८ |
| किरकोळ स्कॉ. | — | ९१३४६ |
| एकूण | — | ५६४८८६ |

ह्या स्कॉलर्शिपां पैकीं बहुतेक ९/१० रक्कम मुसलमान विद्यार्थ्यांनाच मिळते, हिंदूंना त्याचा फायदा मिळत नाहीं अशी तक्रार आहे. सरकार याचें कारण दाखवील काय? व हिंदू त्यांची प्रजा नाहीं कीं काय?

## वाचनालयें.

निजाम सरकारकडून खासगी वाचनालयांना कांहींच मदत मिळत नाही असें म्हटलें तरी चालेल.

सन १३३४ सालीं वाचनालयाकरितां एकंदर ९३६६९ रु. खर्ची पडले असें दाखविण्यांत आलें आहे, परंतु यापैकी २१६६५ रु. आसफिया लायब्ररीकरितां, ५३१८५ रु. सरकारी शाळा व कॉलेजांनां जोडलेल्या लायब्रऱ्यांकरितां आणि १३२७६ रु. सरकारी आफिसांना जोडलेल्या लायब्रऱ्यांकरितां देण्यांत आले होते. सामान्य जनतेला उपयोगी पडणाऱ्या वाचनालयांना सरकार कडून मुळींच मदत होत नाहीं तर उलट त्यांच्या मार्गांत अडचणी उत्पन्न करण्यांत येतात.

## वर्तमानपत्रें, छापखाने, व ग्रंथ प्रकाशन.

हैद्राबाद संस्थानांत मुद्रणस्वातंत्र्य मुळींच नाहीं. ब्रिटिश सरकारनेंही मान्य ठरविलेल्या वजनदार आणि भारदस्त वर्तमानपत्रांनाही बंदी करण्यांत आली आहे त्याचा तपशील परिशिष्टांत पहा.

अशा तऱ्हेच्या अरेरावी धोरणामुळें संस्थानांत वर्तमानपत्रें फारशीं निघूं शकत नाहींत व निघालेलीं जगूं शकत नाहींत. सन १३३४ सालीं संस्थानांतील सर्व लहानमोठ्या सरकारी व खासगी छापखान्यांची संख्या अवघी १०५ च होती ह्यांपैकीं बहुतेक छापखाने शिळाप्रेसवर उरदू कामाकरितां आहेत.

नवीन वर्तमानपत्र, मासिक अथवा छापखाना काढवयाचा असल्यास त्याला ( एक्झिक्यूटिव्ह कौन्सिल ) सरकारची परवानगी काढावी लागते आणि एखाद्यानें परवानगी मागितल्यास त्याच्यासंबंधानें पोलीसकडून अभिप्राय मागविण्यांत येतो पोलीसचा अभिप्राय प्रतिकूल असल्यास परवानगी मिळूं शकत नाहीं ही गोष्ट सांगावयास नको.

राजकीय ( पोलीटिकल ) बाबतींत चर्चा करूं इच्छिणाऱ्या पत्राला तर मुळींच परवानगी देण्यांत येत नाहीं. अर्थात् जीं कांहीं पत्रे आहेत तीं राजकीय

बाबतींत मौन धरणारीं किंवा सरकारची खुशामत करून पोट भरणारीं अशीं आहेत. संस्थानांत हैद्राबाद् येथें निघणारें फक्त एकच "निझाम विजय" हें मराठी साप्ताहिक असून, मुशीरद्कन, सहीफा, रहबरद्कन, अशीं तीन उर्दू दैनिक पत्रें आहेत. मुशीर द्कन हें पत्र हिंदूच्या मालकीचे असून दुसरीं दोन पत्रें कट्टर इस्लामी व हिंदूंच्या हितसंबंधाला विरोध करणारीं व तिन्हीं पत्रें सरकारच्या प्रतिगामी धोरणाला पाठिंबा देणारीं अशी आहेत. आणि मुशीर व सहीफा या दोन पत्रांना महिना ३०० रु. सरकारी मदत मिळते.

सन १३३४ सालीं लहान मोठीं अशीं २५० चोपडीं प्रसिद्ध झालीं. त्या पैकीं ९५ धार्मिक, ३५ कायद्यासंबंधाचीं, ८ इतिहास, ९ काव्यें, ३ कादंबऱ्या, २२ आरोग्य, २५ शिक्षण, ६० किरकोळ होतीं.

ह्याखेरीज उस्मानिया युनिव्हर्सिटीनें १० पुस्तकांची उर्दु भाषांतरें करवून प्रसिद्ध केलीं. प्रसिद्ध झालेलीं पुस्तकें बहुतेक उर्दू भाषेचींच असल्यामुळें रिपोर्टांत त्या संबंधीं भाषावार वर्गीकरण करण्यांत आलें नाहीं असे दिसते.

## म्युनिसिपालिट्या व लोकलबोर्डें.

ह्या संस्थानांत फक्त हैद्राबाद् शहरांतच काय ती एक म्युनिसिपालिटी आहे. औरंगाबाद् गुलबर्गा वरंगल सारख्या मोठमोठ्या गांवांत देखील म्युनिसिपालिट्या नाहींत, स्थानिक स्वराज्याच्या कल्पनेचा मागमूसही दिसत नाहीं. आरोग्य, दिवाबत्ती, रस्ते इत्यादि सारख्या सर्वमान्य व साध्या गोष्टींतदेखील लोकांच्या प्रतिनिधींवर विश्वास टाकावयाला निझाम सरकार कसें तयार नाहीं याचा ह्या प्रत्यक्ष पुरावा होय.

हैद्राबाद् म्युनिसिपालिटींत कांहीं सरकारी अधिकारी व कांहीं सरकारनीं नेमलेले सभासद् असतात, परंतु लोकनियुक्त प्रतिनिधींना निवडून देण्याचा हक्क हैद्राबादसारख्या राजधानीच्या शहरांत देखील दिला गेला नाहीं हें आश्चर्य नव्हे काय ? हैद्राबाद् सारख्या प्रमुख शहरांत शिकलेल्या लोकांची कांहीं वाण नाहीं पण निझाम सरकार लोकांवर विश्वास ठेवावयास कोठें तयार आहे.

तसेंच शहरांतील प्राथमिक शिक्षणाचें खातें म्युनिसिपालटीकडे देण्यांत आलेलें नाहीं.

## हैद्राबाद म्युनिसिपालिटीचे स. १३३४ फसलीचे जमाखर्चांचे आंकडे खालीं दिलेले आहेत.

## उत्पन्न.

| बाब | रक्कम |
|---|---|
| सरकारी ग्र्यांट | ५००००० |
| घरपट्टी | २१३७२७ |
| गाडी घोड्यावरील कर | ३३१२७ |
| भंगीपट्टी | ८१२३ |
| भाडोत्री गाड्यावरील कर | २२५२७ |
| कत्तल खान्यावरील कर | २७३ |
| बाजार व जमीन भाडें | १९५२६ |
| पाणी पट्टी | ९७७९ |
| काँट्राक्टरची फी | ६२३४ |
| दंड | १२४४३ |
| किरकोळ | २८०२५ |
| एकूण | ८५३७८४ |

## खर्च.

| बाब | रक्कम |
|---|---|
| सेक्रेटरी ऑफिस | ५९२५० |
| वसूली खातें | ५८१६९ |
| सफाई खातें | ३५६००८ |
| इंजिनियरिंग खातें | २२४४५ |
| रस्ते व बांधकाम | ११२०८० |
| रस्त्यावर पाणी शिंपडणें | १३५९१ |
| दिवा बत्ती | ७८५९१ |
| वर्कशॉप | ७६५२ |
| हिशोब खातें | ५३३० |
| किरकोळ | ६५३६५ |
| एकूण | ७७८३९३ |

हैद्राबाद म्युनिसिपालिटीस कत्तलखान्यापासून अवघें २७३ रु. उत्पन्न येतें. यावरून वाचकांची अशी समजूत होईल कीं, हैद्राबाद शहरांत गाय, बैल, बकरी, इ० जनावरांची कत्तल फारच कमी होत असावी, पण वस्तुस्थिति याच्या अगदीं उलट आहे. स. १३३३ व १३३४ फ. मध्यें हैद्राबाद म्युनिसिपल कत्तलखान्यांत कापल्या गेलेल्या जनावरांची संख्या पुढील प्रमाणें होती–

| जनावरें. | स १३३३ | स १३३४ |
|---|---|---|
| गाई बैल वगैरे | ७४९० | १०३५७ |
| बकरी मेंढ्या वगैरे | ३९४३४० | ६३७१६० |

यावरून असें दिसून येईल कीं, कत्तलखान्यांत कापल्या गेलेल्या गाई, बैल वगैरे जनावरांची संख्या दीड पटीनें व बकऱ्यामेंढ्यांची संख्या दुपटीनें वाढली आहे ! !

पण कत्तलखान्याचें उत्पन्न मात्र वाढलेलें नाहीं उलट तें थोडेसें कमीच झालेलें आहे. म्युनिसिपालिटीकडून कत्तलखान्याला विशेष सवलती मिळतात असें समजावयाचें कीं काय ?

## लोकलबोर्ड.

हैद्राबाद संस्थानांत १५ जिल्हा बोर्डें व १०३ तालुका बोर्डें आहेत जिल्हा बोर्डांत ७ सरकारी व ७ बिन सरकारी सभासद असतात आणि जिल्ह्याचा कलेक्टर ( अव्वल तालुकदार ) हा बोर्डाचा अध्यक्ष असतो.

तालुका बोर्डांत चार सरकारी व चार बिन सरकारी सभासद असतात आणि तहसिलदार हा तालुका बोर्डाचा अध्यक्ष असतो. जिल्हा व तालुका बोर्डांत एकही लोकनियुक्त सभासद नाहीं. निवडणुकीचा हक्क अल्पांशानेंही देण्याची निझाम सरकारची तयारी झालेली नाहीं. बिन सरकारी सभासदांची नेमणूकही सरकारच करिते आणि सरकारच्या मर्जींतीलच लोकांना बहुतेक या जागा देण्यांत येतात व ते सहसा सरकारी अधिकाऱ्याच्या विरुद्ध मत देत नाहींत.

## बोर्डाचें उत्पन्न.

शेतसाऱ्यावर रुपयास एक आणा लोकल फंड शेतकरी वर्गाकडून वसूल केला जातो हेंच बोर्डाचें मुख्य उत्पन्न. या उत्पन्नाचा विनियोग दर आण्यापैकीं शिक्षणाकडे ३ पै, आरोग्याकडे २ पै, रस्ते दुरुस्तीकडे २ पै, व इतर सार्वजनिक उपयोगाचे कामीं ५ पै. ह्या प्रमाणें करण्यांत येतो. स. १३३४ फ. मध्यें १८९४१६२ रु. लोकल फंड सेसच्या रूपानें व ५३२५३९ रु. इतर मार्गांनीं उत्पन्न झालें. पण त्यापैकीं फक्त १८९९७४६ रुपयेच खर्च करण्यांत आला. या वर्षाच्या सुरुवातीला सर्व बोर्डाजवळ मिळून ४८११२३० रु. शिल्लक होते. वर्षअखेर ही शिल्लक सव्वा पांच लाखांनीं अधिक वाढून हा आंकडा ५३३८१९४ इतका फुगला आहे. याचा अर्थ असा कीं सार्वजनिक उपयुक्त कामासाठीं लोकांकडून घेतलेला फंड देखील पूर्णपणें खर्च करण्यांत येत नाहीं. बोर्डाच्या वार्षिक उत्पन्नाच्या दुपटीहून अधिक रकम आज त्यांजवळ शिल्लक पडली आहे.

इतके पैसे शिल्लक असून ही प्राथमिक शाळांची संख्या वाढविण्यांत येत नाहीं इतकेंच नव्हे तर एज्युकेशनल सेसची रक्कम ही पूर्णपणें शिक्षणाकडे खर्च केली जात नाहीं. स. १३३४ फ. मध्यें एज्युकेशनल सेसचें उत्पन्न ३९९९३४ झालें. पण त्यापैकीं फक्त ३१२८६३ रु. च शिक्षणाकडे खर्ची पडलें.

लोकल बोर्डाच्या ताब्यांत ७ आलोपॅथिक, २७ आयुर्वेदिक, आणि ७७ यूनानी दवाखाने आहेत त्यांच्यासाठीं २५४१३ रु. खर्च करण्यांत आले. याही बाबतींत मेडीकल सेसची पूर्ण रक्कम आरोग्याकडे खर्ची पडली नाहीं. बाकीचे पैसे मैलासफाई व बांधकामें यांजकडे खर्ची पडतात.

---

## खर्चाचा तपशील पुढीलप्रमाणें आहे.

| बाब. | रक्कम. |
|---|---|
| नोकर वर्ग | २२४५२४ |
| शिक्षण | ३१२८६३ |
| दवाखाने | २५४१३ |
| बांधकामें | ५२६०५१ |
| रस्ते | १४१८१६ |
| सफाई व बागबगीचे | ४३४५५१ |
| पाटील पटवाऱ्यांना वसूलीबद्दल मुशाहिरा | ५४५१९ |
| एकूण | १८९९७३६ |

## दवाखाने.

हैद्रबाद संस्थानांतील दवाखान्यांची संख्या एकंदर १४६ आहे. सव्वा कोट लोक वस्तीच्या मानानें ही संख्या अत्यंत अपुरी असल्याचें खुद्द सरकारी रिपोर्टांतच कबूल केलें आहे असें असूनही या पुढें नवीन दवाखाने निघाल्यास त्यांचा खर्च लोकल बोर्डानें चालवावा असें सरकारने ठरविलें आहे, वस्तुतः ही जबाबदारी सरकारनींच आपल्याशिरावर घेतली पाहिजे. स. १३३४ फ. मध्यें ह्या खात्यावर ११६०२०६ रु. खर्च झाला. यांत दवाखान्यांखेरीज केमिकल व जंतुशास्त्रविषयक लाबारेटरी, उस्मानिया मेडिकल कॉलेज यांचाही समावेश होतो. उस्मानिया मेडिकल कॉलेजांत ३०२ विद्यार्थी आहेत व त्यांत पांच स्त्रिया आहेत. व्हिक्टोरिया झनाना इस्पितळांत स्त्रियांना सुईण काम शिकविण्याची नुकतीच थोडी व्यवस्था करण्यांत आली आहे.

## देवीखातें.

देवी डॉक्टरांची संख्या १३१ आहे. या खात्यासाठीं स. १३३४ मध्यें ४६७५५ रु. खर्च आला.

## आरोग्य खातें.

स. १३३४ मध्यें ११३५२८ मुले जन्माला आली व १,२०९५७ माणसे मृत्यु पावली या वरून असें दिसून येईल कीं जननां पेक्षां मृत्यूचें प्रमाण जास्त आहे. गेलीं तीन वर्षें हाच प्रकार सुरु आहे हें पुढील आकड्या वरून कळेल.

| सन | जनन | मरण |
|---|---|---|
| १३३२ | १०९३०७ | १३५८६५ |
| १३३३ | ११३२८४ | १४३४९४ |
| १३३४ | ११३५२८ | १२०९५७ |

या संख्येवरून प्रजेचा वाढतान्हास आणि सरकारचा निष्काळजीपणा ह्या- संबंधीं वाचकांनीं कायतें अनुमान काढावें. खेडेगांवांतील लोकांच्या औषधपाण्याची व्यवस्था जवळ जवळ सरकार मुळींच करीत नाहीं असें म्हटलें तरी चालेल मध्यंतरी १५ फिरते दवाखाने सुरू करण्यांत आले होते परंतु हीं कामें करणाऱ्या डाक्टरांचा भत्ता ५० टक्के कमी करण्यांत आल्यामुळें त्यांची उपयुक्तता कमी झाली आहे. संस्थानांतील ( २० ) हजार खेड्यांपैकीं ह्या फिरत्या दवाखान्यांचा आवघ्या ४८२ खेड्यांना वर्षातून एखादे दिवशीं फायदा झाला असेल.

आरोग्य खात्यासाठीं १३३४ सालीं १५९००८ रु. खर्च करण्यांत आले.

## गुरांचे दवाखाने.

गुरांच्या दवाखान्यांची संख्या ८० आहे या खात्यासाठीं २७८३३६ रु. खर्च येतो.

## जमीनमहसूल-माल गुजारी.

जमीन महसूलाचे उत्पन्न हें संस्थानच्या उत्पन्नांतील महत्वाचे उत्पन्न होय. येथील जमीन महसूलाची पद्धती मुंबई इलाख्यांतील पद्धती सारखीच आहे. रयतवारी पद्धत या नांवानें जमीन महासूलाच्या पद्धतीचे वर्णन करावयला हरकत नाहीं. रयतवारी पद्धतीनें सरकारला शेतसारा मिळणारी जमीन २,१६,३२५८७ एकर आहे व तिच्या पासून सरकारला एकंदर २९३१४१४ रुपये स. १३३४ फसली मध्यें वसूल झाला, गेली कित्येक वर्षें जमीन धारा सारखा

वाढविण्याचा सपाटा चालू आहे हें गेल्या तीन वर्षांच्या आंकड्यांवरून कळून येईल.

| सन | रक्कम |
|---|---|
| १३३२ | २७२६३५८१ |
| १३३३ | २८२९६१८५ |
| १३३४ | २९३१४१४० |

वरील आंकड्यांवरून दरवर्षी आदमासें १०।११ लाख जमीनधान्यांत वाढ होत आहे हें दिसून येईल.

दुष्काळ तर पुष्कळ ठिकाणीं पडतो पण त्या मानानें साऱ्याची सूट मिळत नाहीं. दरवर्षी साऱ्याचें प्रमाण वाढत असून माफीचें प्रमाण मात्र कमी होत आहे हें खालील आंकड्यांवरून कळून येईल.

| सन | माफी रक्कम |
|---|---|
| १३३२ | ६८३९८३३ |
| १३३३ | ५६२५११९ |
| १३३४ | ५४४४७७६ |

या माफीचा बहुतेक उपयोग तेलंगण प्रांतास होतो, मराठ वाडीला कांहींच मिळत नाहीं असें म्हटलें तरी चालेल. सन १३३३ फ. मध्यें शें. २$\frac{७६}{१००}$ या प्रमाणांत मराठ वाड्यांतील शेतकऱ्यांना साऱ्याची माफी मिळाली व तेलंगणांत शेंकडा २८ पेक्षां अधिक प्रमाणांत शेतकऱ्यांना साऱ्याची माफी मिळाली. ही शेतसाऱ्याची माफी केवळ दुष्काळामुळें शेतकऱ्यांना देण्यांत येते असें कोणी समजूं नये. पिकांना पुरेसें पाणी न मिळल्यामुळें जी माफी देण्यांत येते त्याचाच

येथें उल्लेख करण्यांत आला आहे आणि तेलंगणांत बहुतेक पिकांना तलावांतील पाणी दिलें जातें.

सन १३३४ फसलीमध्यें माफीच्या ५४ लक्षां पैकीं ३२ लक्ष रुपये याच कारणामुळें माफ करण्यांत आले. सारा वसूल करण्याच्या कामीं लोकांच्या दारिद्र्यामुळें सरकार पुष्कळ वेळां त्यांविरुद्ध जुलुमानें वारंटें सोडतें व त्यांच्या जमीनी विक्रीला काढते. अशा रीतीनें सक्तीनें सारा वसूल करण्याबद्दल सन १३३३ फ. मध्यें ४०२ वारंटें सोडण्यांत आलीं होतीं. विशेषतः नलगुंडा व वरंगल ह्या जिल्ह्यांत सक्तीनें सारा वसूल करण्याचे प्रकार अनेक घडले.

## जमीनमहसुलाचे प्रकार

संस्थानांतील जमीनमहसुलाच्या पद्धतीचे सामान्यतः दोन प्रकार आहेत, एकाला दिवाणी किंवा खालसाजमीनी असे म्हणतात व दुसऱ्या वर्गात निझामाच्या सर्फखास, व इतर जाहागिरी वगैरेंचा समावेश होतो. खालसा जमीनी रयतवारी पद्धतीनें शेतकरी वर्गाकडे आहेत. या जमीनीची मालकी सरकारची नसून सरकार फक्त साऱ्यापुरतेच हक्कदार आहे. जोंपर्यंत रयत जमीनीचा सारा देते तोंपर्यंत त्यांजकडून जमीन हिरावून घेण्याचा सरकारला अधिकार नाहीं. दर तीस वर्षांनीं साऱ्याची फेर आकारणी म्हणजे वाढ केली जाते. ज्या ठिकाणीं कालवे नाहींत त्या जमीनींतील पीक बुडालें अथवा त्या पडित राहिल्या तरी साऱ्याची माफी दिली जात नाहीं. तळ्याचें किंवा ओढ्याचें पाणी ज्या शेतांना मिळतें तेथें पाण्याची कमतरता पडल्यास कांहीं प्रमाणांत साऱ्याची माफी मिळूं शकते.

पट्टेदारांना ( शेताचा खातेदार ) शेतावर राहण्यासाठीं घरें बांधण्याची परवानगी आहे, परंतु शेतीच्या जमीनीचा उपयोग शेती शिवाय इतर कामाला केल्यास साऱ्याच्या दसपट दंड करून त्याचें शेत देखील काढून घेण्याचा सरकारला अधिकार आहे. शेतांत खाणी आणि भूमिगत द्रव्य ( दफीना ) निघाल्यास त्याचे मालक सरकार आहे, मात्र शेतीच्या कामाकरितां लगतच्या नदीनाल्यांतील दगड माती घेण्याची रयतेला परवानगी आहे.

रयतवारी पद्धतीचे पट्टेदार, पोटपट्टेदार, शिकमीदार, आणि असामीशिकमी, असे चार वर्ग केले आहेत. पट्टेदार हा जमीनीचा मालक असून सरकारी कागद-पत्रांत त्याचें नांव नोंदलेलें असतें व त्याच्या मृत्यूनंतर त्याच्या कायदेशीर वारसदाराचे नांवीं शेत नोंदलें जातें. तो स्वतः किंवा कुळाकडून आपली जमीन पिकवितो.

ज्या वेळीं दोन किंवा दोहोंपेक्षा अधिक शेतकरी एकत्र जमीनीची मशागत करितात तेव्हां तिला पोटपट्टेदारी असें म्हणतात. शेतकीचा खर्च व शेताचें नफानुकसान पोटपट्टेदारांत सारखें वाटलें जातें. पट्टेदार हा पोटपट्टेदाराला काढूं शकत नाहीं.

रयतवारी खेरिज पनमक्ता, ताहुद अथवा सरबस्ता, आणि इजारा असे जमीनमहसुलाचे तीन प्रकार आहेत.

पनमक्तेदाराकडे असलेल्या जमीनीचा सारा वाढवितां येत नाहीं. तो कायम असतो. इनाम कमीशननें पनमक्तेदारांच्या पुष्कळशा जमिनी खालसा केल्या. ताहुद अर्थात सरबस्त्याची पद्धत इ. स. १८६६ सालीं सर सालारजंग यांनीं बंद केली. सर सालारजंगांनींच पडित जमिनी लागवडीस देण्याकरितां म्हणून इजाऱ्याची पद्धत सुरु केली. इजाऱ्यामध्यें प्रथम कांहीं वर्षे साऱ्याची माफी करून पुढें हळू हळू सारा बसविला जातो व तो ३० किंवा ४० वर्षांत नेहमींच्या प्रमाणांत येऊन पोंचतो. ही पद्धत इ. स. १९०९ सालीं निझामांनीं बंद केली.

## सर्फेखासच्या जमीनी

ज्या जमीनींचा वसूल निझामांच्या खासगी खर्चाकडे जातो त्यांना सर्फे-खासच्या जमीनी असें म्हणतात. त्यांचें क्षेत्रफळ ८११० चौरस मैल आहे. यांत, 'अतराफे बलदा, म्हणजे हैद्राबादच्या भोंवतालचा भाग येतो. त्या शिवाय आणखी ११ तालुके त्यांत येतात त्या संबंधीची माहिती खालील तक्त्यावरून कळून येईल.

| तालुका | व्यवस्था | क्षेत्रफळ चौरसमैल | लोकसंख्या |
|---|---|---|---|
| पाटोदा | मुकबेजा (खालसा) | ५०५ | २४६२९ |
| शाहपूर | ,, | ५४६ | ९१३९७ |
| शोरापूर | ,, | ५२७ | ८११३३ |
| अंदोला | ,, | ७०९ | ६२९३७ |
| उस्मानाबाद | ,, | ४७३ | ९७१७५ |
| कळम | ,, | ६०५ | १०४२२५ |
| परंडा | ,, | ७३४ | ८९५४३ |
| खुलदाबाद | जेर निगरानी | १२९ | १२१७७ |
| सिलवड | ,, | २४९ | ३५३८७ |
| पालम | ,, | ५४३ | १०२००५ |
| जनवाडा | ,, | ४४० | ६२७३२ |
| अतराफ बलदा (जिल्हा) यांत एकंदर ७ तालुके आहेत | सर्फेखास इलाख्याचे प्रत्यक्ष व्यवस्थे खाली | २६५२ | ४९७४९८ |
| एकूण तालुके १८ | | ८११० | १२५०८३८ |

## सर्फेखास इलाख्याची उत्पती.

निजामांचा खासगी व व्यक्तीविषयक खर्च प्रथम सरकारी तिजोरींतून दिला जात असे; परंतु निझाम नासिरुद्दौला यांनीं अशी युक्ती काढिली कीं आपल्या खासगी खर्चासाठीं सरकारी तिजोरींतून नक्त रक्कम घेण्याच्या ऐवजीं कांहीं स्वतंत्र तालुकेच राज्यांतून तोडून निराळे करून टाकावे, म्हणजे पैशासाठीं वरचेवर दिवाणांकडे मागणी करण्याचें कारण पडणार ? एकदम एवढा मोठा प्रदेश आपल्या ताब्यांत घेणें हें निझामांना सोईचें झालें, मात्र प्रजेचे हक्क पूर्णपणें संतुष्टांत आले, खासगी खर्चासाठीं राज्याचा एवढा

मोठा भाग एखाद्या राजानें तोडून घेतल्याचीं उदाहरणें क्वचितच सांपडतील. हा भाग स्वतंत्र रीतीनें घशांत टाकावयाला सांपडल्यामुळें पैशांच्या बाबतींत निझामांना सरकारची मुळींच पर्वा राहिली नाहीं, परंतु त्या उलट तेथील प्रजेला मात्र सरकारी इलाख्यांत होणाऱ्या सुधारणांपासून अलिप्त रहावें लागत आहे.

सर्फखास इलाख्याचें एकंदर उत्पन्न स. १३३५ फ. मध्यें ( सरकारी व गैर सरकारी बाबीसह ) २०३३२३७५ रु. झालें, ज्या अर्थी पन्नास लाख रुपये सरकारी तिजोरींतून दरवर्षी खासगी खर्चासाठीं निझाम साहेब उचलून घेतात त्या अर्थी सर्फेखास इलाखा त्यांच्याकडे राहणें आतां प्रजेच्या हिताच्या दृष्टीनें योग्य नाहीं. सर्फेखास इलाखाही दिवाणीकडे देऊन ह्या दुहेरी राज्यकारभाराच्य भानगडींतून मोकळें होणें बरें.

नासिरुद्दौलाच्या वेळीं सर्फेखास जमिनीचें जें क्षेत्रफळ होतें तें आतां कितीतरी पटीनें वाढलें आहे. ह्याचीं कारणें पुढील प्रमाणें आहेतः—

१— निझामांचा कोणीही नातेवाईक निपुत्रिक मेला कीं त्याच्या जमिनी व जाहगिरी खालसा किंवा जप्त करून निझाम सरकार त्या **सर्फेखास**मध्यें सामिल करून घेतात. अशा जमीनी वस्तुतः सरकारी मालकीच्या झाल्या पाहिजेत.

२— इ. स. १८५८ सालीं ब्रिटिश सरकारनीं **सुरापूर** हा तालुका निझामांना दिला तो त्यांनीं सरकारी मुलखांत सामिल न करितां स्वतःच घेऊन आपल्या खासगींत सर्फेखास इलाख्यांत सामिल करून घेतला. तसें करण्याचा त्यांना कांहींच अधिकार नव्हता. ( सुरापूर ही एका हिंदू संस्थानिकाची जहागिर होती. )

३— इ. स. १८६० सालीं उस्मानाबाद आणि बिदर जिल्ह्यांतील कांहीं तालुके मोबदला म्हणून ब्रिटिश सरकारनीं निझामांना दिले, तेही त्यांनीं खासगींत सामील करून घेतले.

जिल्हे अतराफ बलद्यापैकीं सात तालुक्यांचा कारभार सर्फेखास इलाख्याकडून चालतो. सर्फेखास इलाखा निझामांच्या खास देखरेखीखालीं आहे. आणि मुफवेजा तालुक्याची व्यवस्था सरकारांतून होते आणि निवळ उत्पन्न निझामांना

मिळतें. **जेर निगराणी** तालुक्यांत फक्त देखरेख करण्याचें काम सरकाराकडे असतें.

याशिवाय पेषकष, जाह्गीर, आणि इनाम असे जमीनीसंबंधीचे आणखी तीन वर्ग आहेत.

स. १३३१ फसली अर्थात् इ. स. १९२१ मध्यें निरंनिराळ्या जमीनमहसुलाच्या पद्धतीखालीं असलेल्या खेडेगांवांची संख्या पुढील प्रमाणें होती—

| पद्धत | खेडयांची संख्या |
|---|---|
| सरकारी– रयतवारी | १३६१७ |
| पेषकष जमींनदारी | ७२३ |
| पन मक्ता | ७१३ |
| मोकासा | २८३ |
| उमली | २०६ |
| इजारा | ५० |
| अग्रहार | १२६ |
| बेचिराग | ७७८ |
| एकूण | १६४९६ |

## पट्टेदारांची संख्या

मराठवाड्यांत पट्टेदारांची संख्या ५०८६८७ होती. आणि तेलंगणांत ५२६४५४ होती अर्थात् एकंदर पट्टेदार १०३५१४१ आहेत.

मराठवाड्यांत खुष्की जमीनींस सरासरी दर एकरीं १ रु. १ पै. सारा आहे व तेलंगणांत दर एकरीं खुष्की जमीनींवर १२ आ. ५ पै. सारा असतो.

तरीच्या जमिनींना मराठवाडींत ५ रु. ८ आ. ४ पै. व तेलंगणांत ११ रु. ६ आ. ७ पै. सारा दर एकरीं घेण्यांत येतो. निझामाबादेंत कांहीं ठिकाणीं साऱ्याचें प्रमाण तरी जमिनीस १९ रु. ३ आ. ९ पै. पर्यंत वाढलें आहे.

## सेटलमेंट ( बंदोबस्त ) खातें.

शेतसाऱ्याची फेर तपासणी करणें याचा अर्थ सारावाढ करणें असाच केला जातो. स. १३३४ फ. मध्यें हैद्राबाद डिव्हिजन मधील २५ खेड्यांची सर्व्हे करण्यांत आली. पूर्वी प्रत्येक एकरीं सर्व्हेचा खर्च चार आणे ७ पै होत असे व तो आतां त्यांचे उलट ७ आणे ४ पै होत आहे. यावर्षी हैद्राबाद डिव्हिजन-मध्यें ६६३ व वरंगल डिव्हिजनमध्यें ३२१ खेड्यांतील शेतसाऱ्याची फेर आकारणी करून ४५२४३९ रु. सारा वाढविण्यांत आला. या खात्याकडून नकाशे तयार करण्याचें काम चालू असतें. १४८५ नकाशे तयार करावयास स. १३३४ सालीं २३००० खर्च लागला. सर्व्हेखात्याचा एकंदर खर्च स. १३३४ मध्यें ५२२९९७ झाला. या खात्याचा खर्च हळूहळू वाढत चालला आहे.

संस्थानांतील शेतकऱ्यांची स्थिती दिवसेंदिवस खालावत चालली असून त्यांचें दारिद्र्य वाढत आहे आणि सरकारी सारा जबर असल्याबद्दल शेत-कऱ्यांच्या तक्रारीही आहेत सरकारी सारा व शेतकीचा सर्व खर्च वजा जाऊन जेम तेम एक वेळ पोटाला मिळणें देखील बहुतेक शेतकऱ्यांना कठिण जात आहे अशी स्थिति असतांना सुद्धां दर खेपेस सारावाढ होणें हें अन्यायाचें आहे, शेतकऱ्यांच्या ह्या तक्रारीबद्दल निझाम सरकारानीं एखादें कमिशन नेमून चौकशी करणें व त्यांची स्थिति सुधारण्याचा प्रयत्न करणें जरूर नाहीं काय ?

## इनाम ( सेटलमेंट ) बंदोबस्त.

संस्थानांत हळू हळू सर्व इनामें जप्त करून खालसा करण्याचा सपाटा चालू आहे.

सन. १३३३ फ. मध्यें ५८७१ रु. चीं इनामें खालसा करण्यांत आलीं होतीं, परंतु स. १३३४ फ. मध्यें हा आंकडा सहापटीनें वाढून ३०३१० रु. चीं इनामें जप्त करण्यांत आलीं, विशेषतः जाहगिरीवर निझामांची वक्र दृष्टि आहे.

सन १३३४ फसली मध्यें १०४ इनाम प्रकरणांचा निकाल लागला तो पुढील प्रमाणें.

| प्रकार | बहाल | जप्त |
|---|---|---|
| जाहगीर | ३३३२९ | २४९८२ |
| मक्ते | २१७५ | २५८२ |

| | | |
|---|---|---|
| अग्रहार | ८२८१ | ० |
| इनाम | ३३६७ | २२७८ |
| सेरी | ८८८ | १२९ |
| नगद् रुसुम | १२९८ | ३३९ |
| योमिया | ४७८ | ० |

## जंगल ( जंगलात ) खातें

ह्या संस्थानांत एकंदर ९६१४ चौरस मैल जंगल आहे त्या पैकीं ७२४५ चौरसमैल जंगल संरक्षित व २३६८ चौरसमैल असंरक्षित असें खुलें जंगल आहे. दरवर्षी जंगलाच्या कांहीं भागाची नवी तपासणी केली जाते. जंगल-खात्याच्या नोकरवर्गासाठीं बंगले वगैरे बांधण्याचें काम हळू हळू सुरू आहे. शेतकरी लोकांना जंगलांत गुरें चारावयाला परवानगी मिळत नाहीं व त्यामुळें प्रतिवर्षी हजारों शेतकऱ्यांवर जंगलाची मर्यादा अतिक्रमण केल्याच्या आरोपा-वरून खटले भरण्यांत येतात. स. १३३४ फ. मध्यें ९१८८ खटले रयतेविरुद्ध भरण्यांत आले, परंतु त्यां पैकीं अवघ्या २६८६ खटल्यांचाच निकाल लागला. ६५०२ खटले वर्ष अखेरीला निकाल न लागतांच लोंबकळत राहिले होते. खटल्यांचा निकाल योग्यवेळीं न लागला म्हणजे अधिकारी वर्गाला रयतेला त्रास देण्यास चांगलीच संधी सांपडते. इतके खटले भरले जातात तरी प्रत्यक्ष कोर्टापुढें अवघ्या दोन खटल्यांतच आरोपींना शिक्षा झाली व १२ आरोपी दोषमुक्त होऊन सुटले व बाकीच्यांना जंगल खात्याकडूनच दंड ठोठावण्यांत आला असें दिसतें.

दरवर्षी दंडाची रक्कम सारखी वाढत चालली आहे. त्याचे आंकडे पुढें दिले आहेत.

| सन. | दंडाची रक्कम रु. |
|---|---|
| १३३२ | ४३०४१ |
| १३३३ | ४५९४५ |
| १३३४ | ५४९६१ |

7275

अग्नीपासून जंगलांचें संरक्षण करण्याचा प्रयत्नही हळू हळू चालला आहे.

एकंदर जंगला पैकीं ९७ टक्के जंगल चराईसाठीं मोकळें ठेवण्यांत येतें असें सरकारी रिपोर्टात म्हटलें आहे, परंतु यांपैकीं बरेंचसें रान अगदीं निरुपयोगी असतें. जंगलांतील गवत गुरांना चारण्याबद्धल शेतकऱ्यांकडून जबरदस्त फी घेण्यांत येते. शेंकडा २ गुरांना देखील सरकारी रानांतील गवत फुकट मिळत नाहीं. स. १३३४ फ. मध्यें ८१९०३४ गुरांबद्धल निझाम सरकारनीं वनचराईची फी घेतली पण फक्त १३९५० म्हणजे जवळ जवळ शेंकडा दीड गुरांना मोफत गवत मिळूं शकलें.

जंगला पासून निझाम सरकारला होणारें उत्पन्न दरवर्षी वाढत चाललें आहे. उत्पन्नाचे गेल्यातीन वर्षांचे आंकडे पुढील प्रमाणें आहेत.

## उत्पन्न

| सन. | उत्पन्न |
|---|---|
| १३३२ | १२१९७१ |
| १३३३ | १५३८९७५ |
| १३३४ | १८४२४५३ |

खर्च मात्र दरवर्षी कमी कमी होत चालला आहे. व त्यामुळें निव्वळ उत्पन्न गेल्यातीन वर्षांत जवळ जवळ चौपटीनें वाढलें आहे असें म्हटलें तरी चालेल. खर्च व निवळ उत्पन्नाचें प्रमाण खालीं दिलें आहे.

| सन. | खर्च. | निव्वळ उत्पन्न |
|---|---|---|
| १३३२ | ८४२७७९ | ३५९१९२ |
| १३३३ | ७८९००३ | ७४९९७२ |
| १३३४ | ६९७४२६ | ११४५०२७ |

# कालवे, पाटबंधारे व विहिरी

तामीरात ( पब्लिकवर्क्स ) खात्याची इरिगेशन ब्रांच म्हणून एक शाखा असते व ह्या खात्याकरितां स. १३३४ सालीं ८४०६०८ रु. नोकरवर्गाकरितां खर्च झाला. या खात्याचें एकंदर बजेट २१८६७५८ रु. होतें पण प्रत्यक्ष खर्च १९५३४७६ रु. झाला. त्यापैकीं ५६८५९३ रु. पाटबंधान्यांच्या नवीन कामासाठीं, ८६१३४१ कालव्यांच्या दुरुस्तीसाठीं, २६४६४२ पूल व रस्ते वगैरे करितां व २५८९०० बंगले वगैरे करितां खर्च करण्यांत आले.

आतांपर्यंत पाटबंधान्यांचीं निरनिराळीं कामें पुढील प्रमाणें झालीं आहेत.

| नांव | एकंदर खर्च | आतांपर्यंत झालेला खर्च |
|---|---|---|
| निझाम सागर | ३०५०००० | ६९५२२७३ |
| वायरा प्रॉजक्ट | २४९०००० | १६००६६० |
| पालेर प्रॉजक्ट | २२२५००० | १०११५९० |
| फतेह नहर | ५००००० | ४८३२२६ |
| रायनपल्ली प्रॉजक्ट | २८३००० | २१५३४३ |
| सिंग भूपल्ली | २२८७४० | ११५१२० |
| | ३६२२६७४० | १०३७८२१२ |

ह्या शिवाय स. १३३४ फ. मध्यें एकंदर ८७१ विहिरी खोदण्यांत आल्या, त्यांचा खर्च पुढील प्रमाणें झाला.

| जिल्हा | विहिरी | खर्च |
|---|---|---|
| करीमनगर | ४९४ | १०८९८ |
| बिदर | १४२ | ६३३७ |
| आदिलाबाद | ११२ | २१११५ |
| वरंगल | ४८ | ५२५६ |
| परभणी | २७ | २४९२५ |
| नलगोंडा | २६ | ५७७६ |
| उस्मानाबाद | १५ | १८७५० |
| महबूबनगर | ४ | २०५० |
| निजामाबाद | ३ | १५० |

ह्या नवीन विहिरिचा उपयोग १७१६ एकर जमीनीला होईल.

२२० तलाव दुरुस्त करण्याबद्दल सुमारें ८४५८३ रु. खर्चाच्या योजना सरकाराकडे पाठविण्यांत आल्या आहेत.

## शेतकी खातें

ह्या राज्यांत शेतकीच्या जमिनीचें क्षेत्र जरी भरपूर आहे तरी सरकार शेतीच्या सुधारणेकडे जवळ जवळ दुर्लक्षच करीत आहे. ह्या खात्याचा एकंदर खर्च स. १३३४ फ. मध्यें १७०१३६ रु. होता ह्या पैकीं बहुतेक रक्कम अधिकारी वर्गाच्या पगाराकडेच खर्ची पडते. सबंध राज्यांत एकंदर पांच शेतकीचीं प्रयोग क्षेत्रें आहेत तेथें पुढील प्रयोग चालू आहेत.

१ परभणी येथें कापसाच्या सुधारणेचे प्रयोग चालू आहेत.

१ आले, रु, येथें रेशमाचे प्रयोग व क्षार जमिनीची सुधारणा.

१ कामारड्डी, येथें उंसाचे प्रयोग चालू आहेत.

१ संगारड्डी, येथें बागाईत आणि कोंबडी व मेंढ्यांची पैदास वाढविण्याचे प्रयोग चालू आहेत.

१ महबूबनगर येथें कांबोडिया कापूस, भुईमुग, एरंडी, वगैरे तेलंगणांतील पिकांचे प्रयोग चालू आहेत.

सन १३३४ सालीं ९००० खंडी सरकी बियाण्यासाठीं चार तालुक्यांत बिनव्याजीं कर्जाऊ देण्यांत आली. कपाशीचें पीक वाढविण्याकडे सरकारचें बरेंच लक्ष आहे याचें मुख्य करण हें कीं, येथून कापूस परदेशाला रवाना करितां येतो व त्यामुळें करोडगिरीचे उत्पन्नाची वाढ होते.

सन १३३३ फ० मध्यें १०३५०००० रु. चा कापूस निझाम हद्दींतून परदेशांत रवाना झाला, कपाशीची लागवड वाढावी अशी परदेशांतील व्यापाऱ्यांची मागणी असते. पण त्यामुळें देशांत लागणाऱ्या गहूं वगैरे धान्यांची पैदास कमी होते.

शेतकीखात्याकडून तीन हातांनीं व दोन वाफेच्या साह्यानें चालणारीं ( जलसंशोधक यंत्रें ) बोरिंग मशिन्स चालू आहेत. त्यांच्या साह्यानें स. १३३४ सालीं २९ ठिकाणीं विहिरी खोदण्याचा प्रयत्न झाला. संस्थानांत एकंदर ३३ शेत-

कऱ्यांचे संघ स्थापन करण्यांत आले आहेत; पण ह्या संघांकडून काय उपयुक्त काम होत आहे याचा सरकारी रिपोर्टांत कांहींच उल्लेख करण्यांत आला नाहीं.

सन १३३४ सालीं निरनिराळ्या पिकांची लागवड व उत्पन्नाचे आंकडे खालीं दिले आहेत.

| धान्य | एकर | उत्पन्न टन |
|---|---|---|
| तांदूळ | ६२३५१६ | २४०२८९ |
| ज्वारी | ८३९५४९२ | ९८००१४ |
| गहूं | ८००२३८ | ७३३४८ |
| गळिताचीं धान्यें | ११४९४१७ | १३०९५१ |
| कापूस | ३४११६९२ | ८९८६२९– गांठी |

तांदुळाची पैदास हळू हळू वाढत असून ज्वारीची कमी होत आहे. कापूस आणि गळिताच्या धान्यांची पैदास मोसमाप्रमाणें बदलते.

## सहकारी पतपेढ्या.

सहकारी ब्यांका व पतपेढ्यांची संख्या अनुक्रमें १९ व १७४७ अशी आहे. १७४७ पतपेढ्यांपैकीं १४९० शेतकऱ्यांच्या व २५७ इतर लोकांच्या आहेत. सेंट्रल ब्यांकांच्या मेंबरांची संख्या ३३७३ असून शेतकी पतपेढ्यांच्या सभासदांची संख्या ३३१८५ व इतर पतपेढ्यांच्या सभासदांची संख्या १०१४५ आहे. सर्व पतपेढ्यांचें व ब्यांकांचें भांडवल १२४७८९६६ रु. आहे. सभासदांकडे थकलेल्या बाकीची रक्कम स. १३३४ फ. मध्यें ६८०५२१० रु. होती. यावरून पतपेढ्यांचा व्यवहार कसा चालत असावा याची कल्पना करितां येईल. १९ सेंट्रल ब्यांकांचें भांडवल ५१८९८२७ रु. आहे. शेतकी पतपेढ्यांना स. १३३४ फ. मध्यें ५६६२३० रु. कर्जाऊ देण्यांत आले. परंतु वर्षाच्या अखेरीला या सोसायट्यांकडून फक्त २७१४५३ रु. च परत करण्यांत आले, या पतपेढ्यांकडे ४७५७९०८ रु. बाकी स. १३३४ अखेर थकलेली होती, बिन शेतकी-पतपेढ्यांमध्यें ११ स्टोअर्स, ७३ विणकऱ्यांच्या सोसायट्या आणि ९२ निर-

निराळ्या खात्यांतील नोकर वर्गाच्या सोसायट्या आहेत. कागदाच्या कारखान्याच्या ५ सोसायट्या आहेत. या खात्याकरितां स. १३३४ सालीं एकंदर २२१९५८ रु. खर्च झाला.

## आबकारी खातें

देशी व विलायती दारू, अफू, गांजा, शिंदी वगैरे मादक पदार्थांच्या विक्रीचें उत्पन्न या संस्थानांत ( ज्यास मुसलमान भाई इस्लामी संस्थान म्हणतात ) वाढत चाललें आहे. त्या बरोबरच प्रजेमध्यें दुर्व्यसन, गुन्हेगारी, आणि दारिद्र्य ह्यांची यथेच्छ वाढ होण्याला सरकारची मदत होत आहे. राजकीय किंवा सामाजिक बाबतींत निझाम सरकारांनीं आपल्या प्रिय प्रजेला काडीचेंही स्वातंत्र्य दिलें नसलें तरी त्यांनीं आपल्या प्रजेला भरपूर प्रमाणांत पानस्वातंत्र्य दिलें आहे.

गेल्या दहा पंधरा वर्षांत आबकारी खात्याचें उत्पन्न कसें झपाट्यानें वाढत आहे तें पाहिलें म्हणजे वरील विधानांची सत्यता वाचकांना पटेल.

| सन फसली. | उत्पन्न |
|---|---|
| १३२१ | ८९६५७६५ |
| १३३१ | १,५१२८६५८ |
| १३३२ | १,६३४६७५६ |
| १३३३ | १,६७९७७८३ |
| १३३४ | १,७६७७३३६ |

यावरून आबकारी खात्याचें उत्पन्न गेल्या १४ वर्षांत दुपपीहून अधिक झालें आहे असें दिसून येईल.

प्रजेला दारू पाजपून निझाम सरकार पावणे दोन कोटींहून अधिक रुपये दर साल प्रजेच्या खिशांतून काढून घेते, आणि तितकीच किंवा त्याहूनही अधिक रक्कम दारू विकणारे कलाल आणि मक्तेदार हें कायद्याच्या रूपानें मिळ-

चीत असले पाहिजेत. अशा रीतीनें सुमारें चार कोट रुपयाला निझामांची प्रजा दरसाल बुचाडली जात आहे.

पूर्वी मोहाची दारू तयार करण्याचे मक्ते लिलावानें देत असत ज्याची मुदत एक पासून दहा वर्षांपर्यंत असे. यापूर्वी दारू गाळण्याचा धंदा कलाल वर्ग करीत असे. त्यांच्या जवळ दारू गाळण्याचीं साधनें वंशपरंपर असत. त्यांचें नियंत्रण करणें प्रथम प्रथम सरकारला फार कठिण जाई. ह्याशिवाय सर्फेखास, पायगा, जाहगिरी यामध्येंही दारू बाळण्याचे हक्क तेथील जाहगीरदारांना होते. त्यांना कांहीं नक्त नेमणूक देऊन हा हक्क विकत घेण्याची योजना स. १२२९ फ. मध्यें सरकारनें करून पाहिली पण ती फसली. नंतर स. १३१७ फ. मध्यें एक कमिशन नेमण्यांत आलें. या कमिशननें जाहगीर दारांच्या आबकारी हक्कांची चौकशी करून कांहीं ठिकाणीं त्यांना मोबदला देऊन ह्या खात्याचा सर्व अधिकार आपल्याकडे घेतला.

पूर्वी सिकंदराबाद वगैरे कँटोन्मेंट भागांतील दारूची दुकानें ब्रिटिश लष्करी अधिकाऱ्यांच्या हुकमतींत होती. पुढें इ० स. १८७९ साली दरसाल २७३००० रु. निझामानीं ब्रिटिश सरकारास द्यावे ह्या अटीवर हीं दुकानें निझाम सरकारच्या ताब्यांत देण्यांत आलीं, परंतु सध्या क्यांटोन्मेंट मधील सर्व दुकानांचें निवळ उत्पन्न ब्रिटिशांना दिलें जातें व तें क्यांटोन्मेंटकडे खर्चीं पडतें. अशारीतीनें सध्यां तेथील दारूविक्रीचा धंदा निझाम सरकारकडे असून उत्पन्न मात्र ब्रिटिशांकडे जातें. स. १३३४ फ. मध्यें सिकंदराबाद आणि औरंगाबाद येथील क्यांटोन्मेंटच्या दारूविक्रीपासून ब्रिटिश सरकारला ११, ३७८३५ रु. उत्पन्न मिळालें. स. १३२३ फ. मध्यें नाझमे–अबकारी या नांवानें एक स्वतंत्र अधिकारी नेमण्यांत आला.

स, १३३३ मध्यें संस्थानांत देशी दारूच्या दुकानांची एकंदर संख्या २९७३१ होती या उलट संस्थानांत शाळांची संख्या मात्र अवघी ४००१ आहे, व संबंध राज्यांत सर्व खेड्यांची संख्या १६४९६ आहे. याचा अर्थ हाच कीं, प्रजाहितदक्ष निझाम सरकारांनीं प्रत्येक खेड्यांत विद्यामृताच्या ऐवजीं मद्यप्राशनाची व्यवस्था करून ठेविली आहे. शाळांची संख्या कमी केली जात असून व शिक्षणसंस्थांचा कायदा करून शिक्षणप्रसार कमी करण्याकडे सर-

कार विशेष लक्ष देतें पण मद्यपानाला पायबंद घालीत नाहीं हें देशाचें दुर्दैवच नव्हे काय !

## दारूचा खप

दारूचा खप दिवसें दिवस कसा वाढत चालला आहे याचे आंकडे पुढें दिले आहेत.

| सन. फ. | प्रूफ ग्यालन |
|---|---|
| १३३२ | ८५७९९३ |
| १३३३ | ९९३७६५ |
| १३३४ | ११०१०४२ |

## अफू

स. १८८१ फ. पर्यंत संस्थानांत अफू पिकविली जात असे, पण ती हिंदुस्थान सरकाराबरोबर करार होऊन बंद करण्यांत आली. व पुढें माळव्यांतून अफू इकडे येऊं लागली. स. १३२४ फ. पर्यंत कंत्राटदारामार्फत अफू विकली जात असे. अलीकडे हें काम स्वतः सरकारच करितें. अर्थात सरकार अफू स्वतः आणवून त्याची विक्री एजंटांमार्फत करिते. आणि जे एजंट जास्त अफू खपवितील त्यांना उत्तेजनार्थ जास्त कमिशन मिळतें. अफूचें उत्पन्नही दरसाल वाढत चाललें आहे.

| सन | उत्पन्न |
|---|---|
| १३२१ | ७१८२३७ |
| १३३१ | १०२०३७७ |
| १३३२ | ११५१३८० |
| १३३३ | १३१६३९८ |
| १३३४ | १५५३६७६ |

स. १३३२ फ. मध्यें १८४ पेट्या अफू माळव्यांतून आणविण्यांत आली. प्रत्येक पेटींत अदमासें ७० शेर अफू असते. व स. १३३४ फ. मध्यें २४४ पेट्या अफू विकली गेली.

## गांजा

इ. स. १९०९ पर्यंत संस्थानांत वाटेल त्या ठिकाणीं गांजा पिकवितां येत असे, आतां मात्र सरकार ठरवील त्या ठिकाणीं गांजाचें पीक काढतां येतें. हें सर्व पीक सरकारी वखारींत ठेवण्यांत येतें व तेथून तें मक्तेदारांना विक्रीकरितां दिलें जातें.

स. १३३४ फ. मध्यें निझाम सरकारला गांजाविक्रीचें उत्पन्न २५१८१३ रु. झालें.

आवकारी खात्याचा खर्च स. १३३४ फ. मध्यें ८८१९८६ रु. झाला.

## स. १२६३ फ. पासूनचें आवकारी उत्पन्न.

संस्थानांत गेल्या ७० वर्षांत अबकारी खात्याच्या उत्पन्नाची वाढ कशी होत गेली हें खालील आंकड्यावरून कळून येईल.

| सन फसली | उत्पन्न | सन फ. | उत्पन्न |
|---|---|---|---|
| १२६३ | १७२९२५ | १३०५ | ५३०७५०१ |
| १२७० | ५२९०७९ | १३१० | ४९०३०९३ |
| १२७५ | १९६२४८९ | १३१५ | ६०२६५०८ |
| १२८० | २१८१८४१ | १३२० | ८५६९०९६ |
| १२८५ | २७१०३८३ | १३२५ | १,१७३५३५८ |
| १२९० | २९७१३९५ | १३३१ | १५१२८६५८ |
| १२९५ | ३९२१७५० | १३३४ | १७६७७३३६ |
| १३०० | ४३१४९९४ | | |

## कस्टम ( करोडगिरी ) जकात खातें.

ह्या संस्थानच्या उत्पन्नांची आणखी एक महत्त्वाची बाब म्हणजे कस्टम उर्फ जकात खातें हें होय. निझाम सरकारच्या हद्दींतून बाहेर जाणाऱ्या व बाहेरून आंत येणाऱ्या मालावर कस्टम ड्यूटी अर्थात करोडगिरी द्यावी लागते. त्याचप्रमाणें हैद्राबाद आणि सिकंद्राबाद ह्या शहरांत येणाऱ्या मालावर ॲक्ट्राय ड्यूटी घेतली जाते. ही ड्यूटी संस्थानांतून येणाऱ्या स्थानिक मालावर देखील बसविली जाते व तिचें उत्पन्न निझामांच्या खासगीकडे दिलें जातें.

इ. स. १८६० च्या पूर्वी ह्या राज्यांत (करोडगिरी) कस्टम खातें अस्तित्वांत आलें नव्हतें. तरीही कित्येक जाहगीरदार व्यापाऱ्यांकडून मालाच्या नेआणीवर रहदारी, हकदारी, वगैरे नांवानें जकात घेत असत. तसेंच खुद्द हैद्राबाद शहरांत येणाऱ्या मालावर चुंगी ह्या नांवाचा स्थानिक कर घेण्यांत येत असे, व्यापारी वर्गावर शेंकडा १५ टक्के कर मालाच्या किंमतीच्या मानानें पडत असे. हे कर वसूल करण्याचें काम मक्त्यानें दिलें जाई व त्यामुळें लोकांना अतिशय त्रास होत असे.

इ. स. १८७६ सालीं सध्यांचें करोडगिरी खातें नवीन तऱ्हेनें काम करूं लागलें. सध्यां ह्या खात्यावर नाझम करोडगिरी ह्या नांवाचा मुख्य अधिकारी असतो.

पूर्वी मालाच्या किंमतीच्या मानानें सररहा शें. पांच टक्के जकात घेत असत, पण आतां हें प्रमाण बदललें असून वाढलेंही आहे. मिठाच्या आयातीवर जवळ जवळ २५ टक्के जकात घेण्यांत येते. निझाम सरकारचे ग्याझेटेड अधिकारी व ब्रिटिश सरकारचे लहान मोठ्या लष्करी व बिनलष्करी अधिकाऱ्यांना कस्टम ड्यूटी ( करोडगिरी ) माफ आहे, खरें पाहतां ज्या सवलती गरीब प्रजेला द्यावयास पाहिजेत त्या अधिकारी व सुसंपन्न लोकांना दिल्या जातात. हा निझाम सरकारचा उलटा न्याय नव्हे काय ? निझाम हद्दींत प्रत्येक ठिकाणीं गरीब प्रजेला, प्रवाशांना, बायाबापड्यांना गुन्हेगाराप्रमाणें त्यांची झडती घेतांना करोडगिरीवर किती त्रास व खोळंबा होतो व कशी लांचलुचपत चालते ह्या गोष्टी जगप्रसिद्ध आहेत. तिकडे निझाम सरकार व त्यांचा अधिकारी वर्ग लक्ष देईल काय ?

ह्या खात्याचें उत्पन्न कसें वाढत चाललें आहे ह्याचे आंकडे खालीं दिले आहेत.

| सन फसली | उत्पन्न |
|---|---|
| १३२१ | ७४४२७२० |
| १३३१ | १,२९,६९१३८ |
| १३३३ | १,३१,८३३८५ |
| १३३४ | १,२८,८११७५ |

स. १३३४ साली संस्थानांत बाहेरून येणाऱ्या मालावरील जकातीचें उत्पन्न ५१५०७३२ रु. होतें व बाहेर जाणाऱ्या मालावरील जकातीचें उत्पन्न ७७०२७४२ रु. या भयंकर जकातीमुळें निझाम हद्दींतील व्यापाऱ्यांना इतर ठिकाणच्या व्यापाऱ्यांबरोबर नीट चढाओढ करितां येत नाहीं. कारण त्यांना दुप्पट कर द्यावा लागतो. परदेशांत कापूस पाठविल्यास निझामांची करोडगिरी व इंग्रजांची जकात द्यावी लागते. त्याशिवाय करोडगिरीच्या जकातीमुळें निझाम हद्दींतील प्रजेला मिठासारखी अत्यंत अवश्यक वस्तू देखील इंग्रजी हद्दींपेक्षां महाग घ्यावी लागते. ह्याशिवाय हैद्राबाद शहारांतील चुंगीचें उत्पन्न सुमारें २५–२६ लक्ष रुपयांचें आहे. हें सर्व उत्पन्न निझामांच्या सर्फेखास खासगी खर्चाकडे दिलें जातें. हें उत्पन्न आपल्या खासगीकडे घेण्याचा निझामाला कसा अधिकार पोंचतो हें समजत नाहीं व निझामांना सरकारी तिजोरींतून दरसाल मिळणाऱ्या ५० लक्ष रुपयांखेरीज ही रक्कम घेतली जाते. सुधारलेल्या प्रत्येक देशांत कोठेंही कर घेण्याचा हेतु जनतेला त्यापासून कांहीं सुखसोईचा फायदा मिळावा हा असतो. परंतु हैद्राबाद शहरांतील ( अक्ट्रॉय-ड्यूटी ) चुंगीचा विनियोग केवळ निझामसरकारच्या खासगीकडे केला जातो अशारीतीनें विनाकारण गरिब प्रजेवर कराचा बोजा पडतो. त्यासंबंधीं सरकार कांहीं योग्य विचार करील काय ?

स. १३३४ फ. मध्यें ह्या खात्याचा एकंदर खर्च १५२७७३९ रु. झाला.

## पुराणवस्तु संशोधन खातें.

हें खातें स. १३२३ फ. मध्यें सुरु करण्यांत आलें. स. १३२५ मध्यें अजिंठा येथील लेण्यांच्या व्यवस्थेसाठीं एका क्युरेटरची नेमणूक करण्यांत आली. अजिंठा व वेरूळ येथील लेण्यांवर होणाऱ्या खर्चाखेरीज बहुतेक सर्व खर्च मुसलमानी इमारतींच्या संरक्षणावर केला जातो. कित्येक हिंदूंच्या सुप्रसिद्ध इमारती व देवळ धूळ खात पडलीं आहेत त्याची दाद कोणीच घेत नाहीं.

वेरूळ व अजिंठा येथील लेण्या जगप्रसिद्ध अशा असून त्या पहावयास व्हाइसरॉय, राजघराण्यांतील इंग्रजलोक, बडे लाट, जंगी लाट, छोटे लाट वगैरे यूरोपियन येत असतात, म्हणूनच त्यांची व्यवस्था ठेवण्यात आली आहे. नाहीं तर काय स्थिति झाली असती कोणी सांगावें.

स. १३३४ फ. मध्यें ना. व्हाइसरॉय लॉर्ड रेडिंग हे अजिंठ्याची लेण्या पाहून गेले.

ह्या खात्याचा खर्च स. १३३४ फ. मध्यें ४१३४. रु. झाला.

## व्यापार खातें

ह्या संस्थानांतून ब्रिटिश हद्दीशीं व परदेशशीं जो व्यापार चालतो तो साधारणपणें दरसाल ३६ व ३७ कोट रुपयांचा असतो. स. १३३३ फ. मध्यें १९—२० कोट रुपयांचा माल बाहेरून निझामांचे राज्यांत आला व जवळ जवळ तितक्याच किंमतीचा माल बाहेर रवाना झाला. परंतु गेल्या १३ वर्षांचा इतिहास पाहिल्यास एकंदरीनें बाहेरचा मालच संस्थानच्या हद्दींत विशेष येतो व दरसाल जवळ जवळ दोन कोट रुपये परदेशांत अधिक रवाना होतात असें म्हणावें लागेल.

स. १३२१ ते १३३१ फ. या ११ वर्षांचें आयात व निर्गत व्यापाराचे आकडे सरकारनीं आपल्या रिपोर्टांत प्रसिद्ध केले आहेत व त्यांत असें म्हटलें आहे कीं. सरासरीनें दरसाल १३४६५१००० रु. चा माल परदेशांतून

संस्थानांत येतो व दरसाल ११८८०६००० रु. चा माल येथून परदेशांत जातो. यावरून येथील व्यापारांत प्रजेला दोन कोट रुपयांची तूट येते व तेवढा पैसा परदेशीं जातो असें दिसतें.

ब्रि. इंडियाशीं तुलना केल्यास असें दिसतें कीं, तेथील निर्गत व्यापार आयातीपेक्षां पुष्कळ अधिक असतो त्यामुळें परदेशांतून अधिक पैसा स्वदेशांत येतो, पण निझाम सरकारच्या राज्याची स्थिति मात्र याहून उलट आहे. येथें निर्गत व्यापारापेक्षां आयात अधिक असल्याकारणानें प्रजेच्या पैशाचा ओघ दरवर्षीं दोन कोट ह्या प्रमाणांत सारखा वहात आहे. इकडे निझाम सरकार लक्ष देईल काय ?

स. १३३२ ते ३४ चे आंकडे देखील वरील विधानाला पुष्टी देणारेच आहेत.

| सन | आयात | निर्गत | तूट |
|---|---|---|---|
| १३३२ | १९१३१४००० | १७१०१२००० | २०३०२००० |
| १३३३ | १९८७८०००० | १९२५२४००० | ६२५६००० |
| १३३४ | २१६५६१००० | १५७८३१००० | ५८७३०००० |

दररर्षी इतका पैसा परदेशीं जातो ह्यामुळें प्रजेचें नकळत द्रव्यशोषण चालूं असून दारिद्र्य वाढत आहे.

हा पैसा कोणत्या मार्गानें परदेशांत जातो ह्याचें परीक्षण करूं. आयात=बाहेरून येणारा मुख्य माल म्हणजे कापड, सूत, मीठ, रेशिम, साखर, गूळ, फळें, सुपारी, जनावरें, इमारतीचें लांकूड, तांबे, पितळ, भांडीं, राकेल तेल, सोनें, चांदी, हे होत. निर्गत=संस्थानांतून बाहेर जाणाऱ्या मालांत कापूस, सरकी, धान्य, एरंडी, कातडी, हे जिन्नस मुख्य असून तीळ, जवस, जनावरें, भुईमूग, तूप, तेल, व थोडें कापड याचाही त्यांत समावेश होतो.

स. १३३४ फ. मध्यें आयात व्यापाराचे आंकडे पुढील प्रमाणें होते

| माल | किंमत | वजन–टन |
| --- | --- | --- |
| कापड | ३५८२०००० | |
| सूत | १५८५०००० | |
| मीठ | ४१५९००० | ४९२१५ |
| रेशीम | २१४६००० | |
| साखर, गूळ | १००३७००० | २५३७० |
| फळें | ४१९४००० | |
| सुपारी | १६१६००० | |
| जनावरें | ३८८६००० | |
| इमारतीचें लाकूड | ८५७००० | ५२६५ |
| तांबें पितळीचीं भांडीं | २९१६००० | |
| लोखंड | ३१००००० | २५८३८ |
| चांदी | ७७७२००० | |
| सोनें | ३४६९३००० | |
| इतर जिन्नस | ४३१८२००० | |
| एकण | १७०२२८००० | |
| माफीचे जिन्नस | ४६३३३००० | |
| एकूण | २१६५६१००० | |

## रेलवे खातें

ह्या राज्यांत रेल्वेचे रस्ते बांधण्याचा व वाहतुक करण्याचा मुख्य मक्ता एन. जी. एस. रेलवे कंपनी ह्या नांवाच्या ब्रिटिश कंपनीकडे असून तिचें मुख्य ऑफिस लंडन येथें आहे. फक्त बार्शी ते लातूर ह्या सुमारें चाळीस मैल लांबीचा

रेलवे फाटा बार्शी लाइट रेलवेनें बांधला आहे. एन. जी. एस. रेलवे रस्त्याची लांबी ९६८ मैल आहे त्यापैकीं ३८७ मैल ब्रॉड गेज व ५८० मैल मिटर-गेज आहे.

एन. जी. एस. रेलवे ही विलायती कंपनी असल्यामुळें तिच्या कारभारांत निझामांच्या प्रजेला तर काय पण खुद्द निझाम सरकारला फारसा हात घालतां येत नाहीं. या कंपनीनें केलेल्या अटींनीं निझाम सरकार बांधलें गेलें आहे. ही कंपनी विलायतेंत असल्यामुळें तिच्या नफ्यावर विलायत सरकार इनकम टॅक्स वगैरे कर बसवितें. हे कर जबर आहेत हें सांगावयास नकोच. हे कर वजा करून मग जो नफा उरेल त्यांतला कांहीं भाग निझाम सरकारला मिळतो.

स. १३३४ फ. मध्यें निझाम सरकारला २९५१८२९ रु. रेलवे वरील फायद्याच्या रूपानें मिळाले. आणि ह्या फायद्याची हळू हळू वाढ होत आहे.

ब्रॉड गेज लाईनी ( वाडी ते बेझवाडा ) करितां ६०६७२३८४ रु. खर्च करण्यांत आले आहेत. स. १३३४ फ. मध्यें ह्या भांडवलावर ९८२५४२५ रु. कंपनीला फायदा झाला व निव्वळ नफा ६४४१४४५ इतका पडला. शेंकडा १० $\frac{62}{100}$ हें नफ्याचें प्रमाण समाधानकारक नाहीं असें कोण म्हणेल ? इतका जास्त नफा होत असूनही रेलवेचें भाडें कमी करणें, प्रवाशांच्या सुखसोई वाढविणें व तिसऱ्या वर्गांतील गरीब उतारूंचे रेलवेवर नित्यशः होणारे हाल कमी करण्याचा प्रामाणिकपणें प्रयत्न करणें, रेलवेमधील चालू असलेल्या लाचलुचपतीला आळा घालणें, निदान तिसऱ्या वर्गाचें भाडें कमी करणें, या सुधारणांकडे कंपनी किंवा सरकार यांपैकीं कोणीच लक्ष देत नाहीं. या रेलवेचा कारभार अत्यंत अंदाधुंदीचा आहे. उतारूंच्या व व्यापाऱ्यांच्या तक्रारींकडे द्यावें तसें लक्ष दिले जात नाहीं. ब्रि. हिंदुस्थानांतील इतर रेलवे कंपन्यांनाही, एन. जी. एस. रेलवे इतका फायदा होत नाहीं. फायदा अधिक व प्रजेला सोई कमी असा येथील न्याय आहे.

संस्थानांतील रेलवे लाइनी व त्यांत अडकलेलें भांडवल व त्यावर होणारा निवळ नफा ह्याचे आंकडे खालीं दिले आहेत.

| | लाइनी | मैल | भांडवल | निवळ नफा |
|---|---|---|---|---|
| ब्रॉड गेज | वाडी बेझवाडा | ३३० | ६ कोट | ६४ लक्ष |
| मिटर गेज | हैद्राबाद ते मनमाड | ३८५ | ३$\frac{3}{4}$ कोट | ४० लक्ष |
| ” | सिकंदराबाद आलंपूर | १४४ | १$\frac{1}{4}$ कोट | २$\frac{1}{4}$ लक्ष |
| ” | पूर्णा हिंगोली | ५० | ३० लक्ष | १$\frac{1}{4}$ लक्ष |

“ब्रॉडगेज कंटिंजंट लायबलीटी अकाउंट” ह्या नांवाखालीं निझाम सरकारला रेलवे कंपनीकडून तीन कोट रुपये येणें होते. या कंपनीस दर वर्षी मोठा फायदा होत असतांना या रकमा कां थकतात याची चौकशी झाली पाहिजे.

स. १३२२ फ. मध्यें सिकंदराबाद ते कर्नूल हा ७० मैलांचा फाटा निझाम सरकारनें (सरकारी मालकीची) स्टेट रेलवे म्हणून तयार केला. हा फाटा आणखी पुढें आलंपूरपर्यंत नेला असून त्याची लांबी १४४ मैल आहे. हा फाटा सरकारी असून त्यावर नफा फक्त १$\frac{1}{2}$ टक्केच पडतो याचें कारण रेलवेच्या व्यवस्थेंतील सांवळा गोंधळ हेंच असलें पाहिजे. कंपनीला फायदा व्हावा पण सरकाला तो कां होऊं नये ह्याबद्धल चौकशी झाली पाहिजे.

## पोस्ट ( टपाल ) खातें

संस्थानचें स्वतंत्र पोस्ट खातें आहे. व पोस्टाचीं तिकिटें, पाकिटें कार्डें वगैरे संस्थानांतच तयार केलीं जातात. पत्रव्यवहाराच्या देवघेवीबद्धल निझाम सरकारांनीं हिंदुस्थान सरकाराबरोबर करार केलेला आहे. ब्रिटिश हद्दींतून येणाऱ्या पत्रांवर निझामसरकार कांहीही पोस्टाचा स्टँप न घेतां ते मालकाला पोंचविते. त्या उलट निझामांचीं तिकिटें लावलेलीं पत्रें मात्र ब्रिटिश सरकार आपल्या राज्यांत आपलें तिकिट असल्याखेरीज पोंचतीं करीत नाहीं असा हा एकतर्फी आणि उलटन्यायाचा करार आहे.

इ. स. १८६९ साला पावेतों पत्रें वांटण्याचें काम कंत्राटानें दिलें जात असे. त्यानंतर सरसालार जंग यांनीं पोस्टखातें निर्माण करून तें स्वतंत्र करून घेतलें व हळू हळू पोस्टांची संख्या वाढविण्याला सुरवात केली. स. १३३४ सालीं

पोस्ट आफिसांची संख्या ७६१ आणि पोस्टमनांची संख्या ८३२ होती. ह्या हिशेबानें दर पोस्टाला अजमासें एक पोस्टमन पडतो.

३२२ पोस्ट ऑफिसांत सेव्हिंगबयांकेची व्यवस्था केली गेली आहे, त्यांमध्यें स. १३३४ फ. च्या अखेरीस अदमासें १६ लक्ष रु. ची ठेव ठेवण्यांत आली होती, ह्या सालांत सुमारें ९० लक्ष रु. किंमतीच्या मनिऑर्डरीचा बटवडा करण्यांत आला व त्यावर सरकारला ११३८१० रु. कमिशन मिळालें याच सालीं सुमारें ९४००० व्ही. पी. व २१००० इन्शुअर्ड लेटर्स पोस्टांतून पाठविलीं गेलीं त्यांचें उत्पन्न २९३२० रु. झालें.

अलीकडे पोस्ट आफिसें बंद करण्याचा सपाटाही सुरू आहे. स. १३३३ फ. मध्यें दर १०८ चौरस मैलाला एक पोस्ट आफिस असें प्रमाण पडत असें तें स. १३३४ मध्यें दर ११५ चौ. मैलाला एक पोस्ट आफिस असें झालें. पोस्टांची संख्या वाढविण्याच्या ऐवजीं कमी करण्यांत येत आहे !

ह्या खात्याचें स. १३३४ फ. चें उत्पन्न, ८७०९५६ रु. असून खर्च ९१३७७४ झाला. व ४२८१८ रु. तूट आली. ह्या तुटीचें मान दर वर्षी कमी होत चाललें आहे.

निझाम सरकारांचें स्वतंत्र तारखातें नाहीं. ब्रिटिश सरकारचे तार खात्याकडून हैद्राबाद व इतर जिल्ह्यांच्या कांहीं मुख्य ठिकाणीं तार ऑफीसें उघडण्यांत आलीं आहेत.

## टेलीफोन खातें

संस्थानांत टेलीफोन खातें सुरू असून स. १३३४ अखेर पर्यंत त्यावर ९६३१५८ रु. खर्च झाला. ह्या वर्षी या खात्याचें उत्पन्न १२२९४९ रु. झालें. व खर्च १५०६२० रु. झाला. अशा रीतीनें २७६७१ रु. बूड आली.

## इलेक्ट्रिसिटी ( विद्युत ) खातें

संस्थानांत स. १३१८ फ. मध्यें हें खातें सुरू झालें. व हें खातें भरभराटीस आणण्याचें श्रेय मिंट मास्टर मि. ग्यांबलेन यांना दिलें पाहिजे. एकंदर ४३१७ घरवाले विजेच्या पुरवठ्याचा फायदा घेतात व कांहीं फ्याक्टऱ्यांनाही

वीज पुरविली जाते. आतांपर्यंत विजेच्या पुरवठ्यासाठीं ८३३६१६७ रु. बुडित खर्च करण्यांत आला आहे, पण त्यावर ह्या वर्षी फक्त ११०५६६ रु. च फायदा झाला. शेंकडा १$\frac{1}{2}$ टक्के व्याज पडलें. ह्याला जोडून एक वर्कशॉप आहे. त्यांत यंत्राची दुरुस्ती वगैरे कामें करण्यांत येतात स. १३३४ मध्यें ह्या वर्कशॉपपासून ३७८०१ रु. फायदा झाला.

## पोलीस खातें

सर सालारजंग दिवाण होण्यापूर्वी संस्थानांत पोलीस खातें नव्हते. रेव्हिन्यु ( माली ) अधिकारी आपल्या सोई व जरूरी प्रमाणें थोडे बहुत शिपाई नोकरीला ठेवीत, पण प्रजेला त्यांचा फारसा उपयोग होत नसे त्याच प्रमाणें त्यावेळीं पोलीसच नसल्यामुळें त्यांच्या कडून होणाऱ्या जुलमाचाही प्रश्न उत्पन्न होत नसे.

इ. स. १८६६ मध्यें प्रथम पोलीस खातें सुरू झालें व त्याचें नियंत्रण रेव्हिन्यू अधिकारी ( तालुकदार ) करीत असत. परंतु ही पद्धत समाधानकारक वाटली नाहीं आणि अखेर इ. स. १८८४ साली इन्पेक्टर जनरल ऑफ डिस्ट्रिक्ट पोलीस ह्या नांवाचा एक स्वतंत्र अधिकारी नेमून त्याच्याकडे ह्या खात्याची व्यवस्था देण्यांत आली. पुढें एक डिटेक्टिव्ह ( खुफिया ) ब्यॉच सुरू करण्यांत आली स. १३२२ फ. मध्यें पोलीस कमिशनच्या शिफारसीप्रमाणें पोलीसांची संख्या वाढविली गेली.

## सिटी पोलीस

संस्थानांत पोलीस खात्याचे दोन विभाग केले आहेत. एक सिटी पोलीस, ह्यांत हैद्राबाद शहर व त्या लगतच्या ३२ चौ. मैलाचा भाग येतो व त्याच्या मुख्य अधिकाऱ्याला शहरकोतवाल असें म्हणतात. स. १३३४ फ. मध्यें सिटी पोलीसांत अधिकारी व शिपाई यांची संख्या ३५२१ होती परंतु त्यांपैकीं अवघी ७३४ मंडळी साक्षर असून बाकीच्या सुमारें २७०० हून जास्त लोकांना लिहितां वाचतांही येत नाहीं यावरून पोलीसांची अपात्रता सिद्ध होते.

पोलीस शिपायांपैकीं शेंकडा ७$\frac{1}{8}$ लोकांना दुर्वर्तनाबद्दल शिक्षा द्यावी लागली. ह्या वर्षी पोलीसांनीं १२४४ गुन्हे कोर्टाच्या नजरेला आणले. निरनिराळ्या वेळीं झालेल्या चोऱ्यांत ५३७०७ रु. माल चोरीला गेल्याची वर्दी पोलीसांना देण्यांत आली. त्यांपैकीं २२२३८ रु. चा माल पोलीसांच्या मदतीनें मालकाला परत मिळाला.

स. १३३४ मध्यें राजधानींत ३ खून, १७ आत्महत्या व ६५ अपघाताचे मृत्यू झाले. सीटी पोलीसचा एकंदर खर्च ७८५ ६३७ रु. झाला.

## डिस्ट्रिक्टपोलीस

डिस्ट्रिक्ट ( जिल्हा ) पोलिसमध्यें स. १३३४ फ. त अधिकारी आणि शिपाई मिळून ११०९८ लोक होते अधिकाऱ्यांपैकीं १४४७ आणि शिपायांपैकीं ४५९३ लोकांना लिहितां वाचतां येतें, बाकीचे पांच हजार पूर्ण निरक्षर आहेत. केवळ शिपांयातच नव्हे तर अधिकाऱ्यांत देखील पुष्कळ निरक्षर लोकांचा भरणा झाला आहे. निरक्षर आणि अडदांड लोकांच्या हातून प्रजेचें कल्याण व संरक्षण होण्याचेऐवजीं त्यांना त्रास जास्त होतो. ही गोष्ट निझाम सरकारच्या ध्यानांत कां येऊं नये !

पोलीसांपैकीं जवळ जवळ शें. वीसटक्के लोक कोणताना कोणता तरीं गुन्हा करतात व त्यांना शिक्षा देण्याचा प्रसंग येतो. स. १३३४ मध्यें पोलिसांपैकीं १९१५ लोकांना गुन्ह्याबद्दल शिक्षा देण्यांत आली. ह्यावरून पोलिसाच्या पात्रापात्रतेबद्दलची वाचकांना कल्पना येईल.

ह्या वर्षी ४७५९ गुन्हे पोलिसांनीं कोर्टापुढें आणिले, व ७३३६ इसमांना अटक केली. परंतु त्यांपैकीं ५५२ इसमांच्या विरुद्ध कांहींच पुरावा नसल्यामुळें त्यांच्यावर कांहीं आरोप न ठेवतां पोलिसांना सोडून देणें भाग पडलें. पोलीसांनीं कोर्टापुढें भरलेल्या ३०२० खटल्यांपैकीं फक्त १५८३ खटल्यांत आरोपींना शिक्षा देण्यांत आली.

वरील आंकड्यांवरून पोलीसांच्या नालायकीमुळें प्रजेला किती त्रास होतो व आपलें घरदार व काम धंदा सोडून पोलीसचौकी व कोर्टाच्या खेपा करण्यामध्यें किती नुकसान होत असेल ह्याची कल्पना करणें कठीण आहे. अब्रूचा तर प्रश्नच नको. आतां संस्थानांत पोलीस खात्यावर इंग्रज सरकारच्या सूचनेवरून यूरोपियन अधिकारी नेमण्यांत आले आहेत. यापुढें तरी पोलीस खात्यामधील अंधेर व प्रजेवर होणारा जुलूम जबरदस्ती नाहींशी होईल अशी आशा कां करूं नये ?

सी. आय. डी. ( खुफिया ) कडे स. १३३४ फ. मध्यें १४० खटल्यांची चौकशी करण्याचें काम आलें होतें त्यांपैकीं १२१ खटल्यांत आरोपींना शिक्षा देण्यांत आल्या.

पोलीस खात्यामध्यें एक पोलीस ट्रेनिंग स्कूल सुरू आहे. त्यांत स. १३३३ फ. मध्यें ५९ अधिकारी व ९२ शिपाई शिक्षण घेत होते. १३३४ मध्यें आणखी ११ अधिकारी व १२० शिपाई दाखल झाले. येथील शिक्षणक्रम १८ महिन्यांचा असतो.

## शीख पोलीस

पोलीस खात्यांत शिखांची एक तुकडी असून त्यांची संख्या ७२९ आहे. व स. १३३४ फ. मध्यें शिखांकरितां १९९७५७ रु. खर्च झाले, पोलीस व शिखांच्या मुलांकरितां ह्या खात्याकडून एक शाळा चालविण्यांत येते. त्यांत शिखांचीं मुलें ६० असून पोलीसांची १५० आहेत. ह्या शाळेला वार्षिक खर्च १९००० रु. झाला.

स. १३३४ मध्यें ७४१ इसम सर्पदंशानें व २५७३ पाण्यांत बुडून अपघातानें मेले. सरकारांनीं इकडे जास्त लक्ष देणें जरूरीचें आहे.

तुळजापूर येथील श्री. अंबा **भवानी** स्वराज्यसंस्थापक श्री. **शिवाजी महाराजांचे** ( महाराष्ट्राची ) कुलस्वामिनीच्या देवळाची आणि नांदेड येथील शिखांचे श्री. **गुरु गोविंदसिंग** ह्यांच्या गुरुद्वाराची व्यवस्था पोलीस खात्याकडे आहे. नांदेडच्या गुरुद्वाराच्या नांवानें स. १३३४ फ. अखेर २४८३२८ रु. शिल्लक होते. त्यापैकीं १९१३०० रु. इंपीरियल ब्यांकेंत ठेव म्हणून ठेविले आहेत. व तुळजापूरच्या देवालयाच्या नांवानें २७८५३० रु. शिल्लक आहेत व त्या पैकीं २५३२२२ इंपीरियल ब्यांकेंत ठेविले आहेत. बाकीचे पैसे देवालयांतील खजीन्यांत शिल्लक आहेत.

डिस्ट्रिक्ट पोलीसचा एकंदर खर्च स. १३३४ फ. मध्यें ३६५०२४९ रु. होता.

## तुरुंग खातें

संस्थानांत एकंदर १९ जेल असून त्यांपैकीं ४ सेंट्रलजेल व २५ डिस्ट्रिक्ट जेल आहेत. स. १३३४ सालच्या सुरवातीला १९३६ कैदी तुरुंगांत होते. त्या सालांत नवीन कैदी ७१८२ दाखल करण्यांत आले तसेंच या सालांत ७२७६ कैद्यांची मुक्तता करण्यांत आली व वर्ष अखेरीस १८४२ कैदी तुरुंगांत कायम राहिले.

चौकशीसाठीं ५४२९ पुरुष व २३३ स्त्रियांना अटकेंत ठेवण्यांत आले. परंतु त्या पैकीं फक्त ११७५ इसमांनाच कोर्टानें शिक्षा ठोठावल्या, बाकीचे ३७८० निर्दोषी ठरले, ह्या वरून निष्कारण तुरुंगवास भोगण्याचा प्रसंग ह्या संस्थानांत कसा येतो हें दिसून येईल.

बाल गुन्हेगारांची संख्या ३३ होती. परंतु रेफर्मेटरीमध्यें फक्त १० च मुलांची सोय करण्यांत आली. बाकीच्या मुलांना निढावलेल्या कैद्यांमध्यें ठेवण्यांत आले, ही शरमेची गोष्ट होय. तुरुंगाच्या सुधारणेच्या बाबतींत निझाम सरकारांनीं सुधारलेल्या सरकाराकडून पुष्कळ गोष्टी शिकण्या-सारख्या आहेत.

एकंदर कैद्यांपैकीं ११ इसमांना १४ वर्षांच्या सक्तमजुरीच्या शिक्षेपेक्षां अधिक, व दोघांना १० ते १४ वर्षें, व ३८४ इसमांना १ ते १० वर्षें, व १०५६ कैद्यांना एक महिना ते एक वर्ष, व ६९० कैद्यांना एक महिन्यापेक्षां कमी मुदतीच्या शिक्षा झालेल्या होत्या. तुरुंगांतील शिस्त मोडल्याबद्दल २६४ इसमांना फटके वगैरे किंवा कांहीं सौम्य शिक्षा देण्यांत आल्या.

सन खालीं १३३४ मध्यें तुरुंग खात्याचा एकंदर खर्च ५३३४६२ रु. झाला. दर कैद्यामागें १९० रु. ११ आ. ७ पै. खर्च करण्यांत आला. कैद्यांनीं केलेल्या कामाबद्दल किंवा त्यांनीं तयार केलेल्या सामानाच्या विक्रीच्या रूपानें १६३८१३ रु. सरकारला उत्पन्न झाले.

संस्थानच्या तुरुंगांतून मुसलमान गुन्हेगारांना इस्लामी धर्मोपदेशकाकडून धर्मोपदेशाची व्यवस्था करण्यांत आली आहे. तशीच हिंदु गुन्हेगारांना धर्मोप-देशाची जरूरी नाहीं कीं काय? ह्याबद्दल हिंदु धर्माभिमान्यांनीं व सरकारांनीं व्यवस्था करावयास नको काय? अशी कांहीं व्यवस्था नसल्यामुळें हिंदु कैदी मुसलमानी धर्माचा स्वीकार करितात. त्यांना तुरुंगांत देखील धर्मत्याग कर-ण्याची कां इच्छा व्हावी! तशा कांहीं सोई तेथें अधिकाऱ्यांकडून करण्यांत येतात कीं काय! ह्याची चौकशी सरकारनीं केली पाहिजे, व तुरुंगांत असतांना धर्मांतर करण्याची कायद्यानें मनाई करण्यांत यावी. खरोखरीच एखाद्या कैद्याची तशी इच्छा असल्यास त्यासंबंधीं स्वतंत्रपणें विचार करण्याची तुरुंगाबाहेर आल्यावरच जास्त मोकळीक असते. तसेंच हिंदू व मुसलमान कैद्यांस धार्मिक

सोई करण्याबाबत कांहीं पक्षपात होतो कीं काय! हें पाहणेंही सरकारचें कर्तव्य नाहीं काय ?

## फौज खातें

संस्थानांतील लष्कराचे चार विभाग केले आहेत. त्यांची संख्या व खर्च खालीं दिला आहे.

| | नांव. | संख्या. | खर्च रु. |
|---|---|---|---|
| १ | रेग्यूलर ट्रूप्स | ४९५७ | २३४८९३३ |
| २ | इंपीरियल सर्व्हिस ट्रूप्स | १०४५ | १०००२२५ |
| ३ | गोवळकोंडा ब्रिगेड | १११० | ५०३४०९ |
| ४ | इरेग्यूलर ट्रूप्स (जमीअत बेकायदा) | ११३३८ पायदळ *<br>१२४८ स्वार * | २२१२५८८ |

लष्करी खात्यासाठीं स. १३३४ सालीं ६०७९९१० रु. खर्च झाला.

इरेग्यूलर फौजेमधील कांहीं लोकांना रेग्यूलरमध्यें घेतलें जातें. स. १३३४ सालीं अशा निवडलेल्यांची संख्या ६५६ होती निझाम सरकारनीं लष्करी कॉलेज काढण्याची एक योजना मंजूर केली आहे. त्याचप्रमाणें जाहगिरदार संस्थानिक अमीरउमराव व मनसबदार यांच्या मुलांची एक स्वयंसेवकांची पलटण काढण्यांत आली आहे.

## संस्थानी न्याय खातें.

संस्थानांतील न्याय खात्याच्या व्यवस्थेंत स. १३३१ फ. मध्यें कांहीं महत्त्वाचे फेरफार झाले. त्या पूर्वी रेव्हिन्यू ( माली ) अधिकाऱ्याकडेच फौजदारी खटले चालविण्याचें काम सोंपवीत असत. स. १३३१ फ. मध्यें फौजदारीचें

* ह्याशिय त्यांत १४ हत्ती, २ ऊंट, ३६ बैल, ५ तोफा, ६ पालख्या, ३१ मेणे आहेत.

काम मालीखात्याकडून काढून ज्यूडीशल खात्याकडे देण्यांत आलें. ही योजना अंमलांत येण्यापूर्वी संस्थानांत एकंदर २६४ कोर्टें होतीं, परंतु या योजनेमुळें त्यांची संख्या १७२ झाली, न्याय व अंमलबजावणी खात्याचे विभागणीचा फायदा **सर्फेखास** इलाख्याला देण्यांत आलेला नाहीं. हा तेथील प्रजेवर अन्याय झाला आहे म्हणूनच सर्फेखास इलाखा निझामानीं आपल्याकडे ठेवणें हें प्रजेच्या हिताचें नाहीं. तो इलाखा त्यांनीं दिवाणीकडे देऊन त्याचें निवळ उत्पन्न घेणें बरें असें म्हणणें प्राप्त आहे.

न्याय व अंमलबजावणी खात्याची विभागणी झाली असली तरी तिचा खरा फायदा प्रजेला मुळींच मिळत नाहीं. हें नेहमीं लोकांच्या प्रत्ययाला येत आहे त्याचें ढळढळित उदाहरण म्हणजे **गुलबर्गा** येथील मुसलमानांनीं केलेल्या दंग्यासंबंधीं झालेला चौकशीचा फार्स होय. न्यायखात्यांत स्वतंत्र विचाराचे, व नोकरीची पर्वा न बाळगणारे आणि वरिष्ठ अधिकाऱ्यांना नाखुष करून देखील न्याय देणारे अधिकारी असल्याखेरीज या योजनेचा तादृश फायदा नाहीं.

संस्थानांत बहुतेक न्यायाधिशाच्या नेमणुका, बढती वगैरे सर्व कांहीं वरिष्ठांच्या मर्जीवर व शिफारस आणि नजरनजराणे व जाति पक्षपात यांवर अवलंबून असतात. त्यामुळें अंमलबजावणी खातें आणि, सरकाच्या विरुद्ध प्रजेला न्याय देण्याला न्यायाधीश धजावत नाहींत. त्याचप्रमाणें धार्मिक तंट्याच्या बाबतींतही न्यायाचा काटा राज्यकर्त्यांच्या कलाकडे झुकलेला असतो.

तसेंच दिवाणी खटल्यांच्या बाबतींतही प्रजेला न्याय मिळणें हें कसें मुष्किलीचें झालें आहे. व खुद्द निझामसाहेब वेळीं अवेळीं फर्मानें काढून कशी ढवळाढवळ करितात. व कायदेकानू धाब्यावर बसवितात. ह्याचें उदाहरण म्हणजे कांहीं दिवसांपूर्वीं मद्रास हायकोर्टापुढें आलेला सुप्रसिद्ध खटला होय.

ह्या संस्थानांतील मुख्य कोर्ट म्हणजे **हायकोर्ट** हें होय. व हायकोर्टाच्या निकालाविरुद्ध मोठ्या व महत्त्वाच्या खटल्यांत अपील करावयाला तेथें **ज्यूडिशल कमेटी**ही आहे. हायकोर्टांत एकंदर ७ न्यायाधीश असून त्यांतील एक मुख्य न्यायाधीश असतो, त्याखेरिज जिल्ह्यांत चार सेशन्स सज्ज, दोन ॲडिशनल सेशन जज्ज, १६ जिल्हा जज्ज, ८ ॲडिशनल सिव्हिल जज्ज, ६ सिटी सिव्हिल जज्ज, व ९५ तालुका म्याजिस्ट्रेट ( मुन्सिफ ), आणि ७ तहसिलदार

अशा एकंदर १४६ अधिकाऱ्यांना दिवाणी दावे चालविण्याचा अधिकार देण्यांत आला आहे.

सन १३३४ फ. मध्यें निरनिराळ्या कोर्टांत पुढील प्रमाणें दावे दाखल करण्यांत आले.

हायकोर्ट ४१, डिव्हिजनल कोर्ट ७१, डिस्ट्रिक्ट (जिल्हा) कोर्ट २१००, सिटीसिव्हिल कोर्ट २२८१, मुनसिफ कोर्ट २१३११, तहसील कोर्ट २३, एकूण २५८२७, ह्या शिवाय ११५५२ किरकोळ स्वरूपांच्या अर्जांचा निकाल कोर्टानें केला. कोर्टापुढें आलेल्या सर्व दाव्याची रक्कम १२५६०१८६ रु. होती.

एक वर्षापेक्षां अधिक काळपर्यंत लोंबकळत पडूनही शेवटीं निकालांत न निघालेल्या दाव्यांची संख्या २६९२ होती. सरासरीनें प्रत्येक दाव्याचा निकाल व्हावयाला २२१ दिवस लागतात. परंतु ज्या खटल्यांत प्रतिवादी हजर न झाल्यामुळें एकतर्फी निकाल होतो त्यांनाही किती दिवस लागतात हें खालील आंकड्यांवरून कळून येईल.

| कोर्ट | दावा(दिवस) | एकतर्फी(दिवस) |
|---|---|---|
| हायकोर्ट | ७१३ | २०९ |
| डिव्हिजनल कोर्ट | ८६९ | ५१० |
| डिस्ट्रिक्ट कोर्ट | ३५९ | २२१ |
| सिटी सिव्हिल कोर्ट | २७८ | २१२ |
| मुनसिफ कोर्ट | १९२ | १६८ |
| तहसील कोर्ट | ७६ | १०० |

दिवाणी अपीलांची संख्या स. १३३४ मध्यें ११९२१ होती त्यांपैकीं हायकोर्टाकडे १९७० अपीलें लावण्यांत आलीं व त्यांचा निकाल लागावयास प्रत्येक अपीलास सरासरीनें ३१६ दिवस लागले.

डिव्हिजनल कोर्टाकडे ३६८०, डिस्ट्रिक्ट कोर्टाकडे ५२१५, व सिटी कोर्टाकडे २५६ अपीलें लावण्यांत आलीं. तेथें अनुक्रमें २६७, १६९, व १७२ दिवस प्रत्येक अपीलाला लागले.

अपील कोर्टाकडे केलेल्या किरकोळ अर्जांच्या निकालालाही साधारणपणें ११४ दिवस लागतात. दिवाणी कोर्टांचें एकंदर उत्पन्न म्हणजे स्टॉंप, कोर्ट फी, दंड वगैरे मिळून १२० १४१५ रु. होते. **पायगा** व जाहगिरी इलाख्यांत मिळून एकंदर ५७ दिवाणी कोर्टें आहेत. त्यांजकडे ११९९६१३ रु. किमतीचे, ५८५८ दावे व अर्ज स. १३३४ फ. मध्यें दाखल झाले, साधारणपणें पायगाच्या कोर्टांत अशा दाव्याचा निकाल व्हावयाला २८६ दिवस लागतात, ५०२ दावे एका वर्षापेक्षां अधिक काळपर्यंत थकून राहिले होते. पायगा व जाहगीर इलाख्यांतील दिवाणी कोर्टांचा वसूल ९६४५३ रु. झाला.

स्मॉलकॉज कोर्टांत १९७१ दावे दाखल करण्यांत आले होते व त्यांपैकीं १४७६ निकालांत निघाले.

## फौजदारी कोर्ट

संस्थानांत फौजदारी कोर्टांचीं संख्या १५९ असून त्यांपैकीं १३१ सरकारी व २८ सर्फेखास इलाख्यातील आहेत. स. १३३४ फ. मध्यें ३११४३ फौजदारी खटले कोर्टांपुढें आले.

त्यामध्यें ६९७०१ आरोपी गोंविले गेले होते. त्यांपैकीं २५०४५ आरोपी दोषमुक्त होऊन सुटले व १५८२९ इसमांना शिक्षा झाल्या. कोर्टांपुढें आरोपी म्हणून उभे केलेल्या लोकांपैकीं फक्त शेंकडा २२ इसमच अखेर दोषी ठरतात हें पाहिलें म्हणजे पुष्कळ लोकांना विनाकारण कोर्टांपुढें खेंचलें जातें व त्यांचा छळ होतो असें म्हणणें भाग पडतें.

संस्थानांत एकंदर ७ सेशन्स कोर्टें असून त्यापुढें एकंदर २४२ खटले आले होते त्यांपैकीं १९७ निकालांत निघाले. दोषी ठरलेल्या इसमांपैकीं शें. १४ नां कैदेची, शे. ८५ नां दंडाची, व एकाला फटक्याची शिक्षा देण्यांत आली.

हायकोर्टाकडे ४३६ फौजदारी अपीलें, १२३१ रिव्हीजनचे अर्ज निकालासाठीं आले. त्या पैकीं २२७ अपीलें व १०८६ अर्ज यांचा निकाल लागला. शें. ७० या प्रमाणांत खालच्या कोर्टांनीं दिलेल्या शिक्षा कायम करण्यांत आल्या. शें. १८ चे निकाल फिरविण्यांत आले. शें. १३ त शिक्षेंत बदल करण्यांत आला व शें. १४ परत चौकशीसाठीं पाठविण्यांत आले.

एकंदर फौजदारी कोर्टाचें उत्पन्न ४११८०४ होतें, दिवाणी व फौजदारी दोन्हीचा एकंदर खर्च, २१२३०२० रु. झाला. पायगा आणि जहागीर इलाख्यांत २८५९ फौजदारी खटले कोर्टापुढें आले. त्यांत ८०४ आरोपी होते. पण अखेर ४७० लोकांना शिक्षा होऊन २९६६ इसम दोषमुक्त होऊन सुटले.

पायगाचे फौजदारी कोर्टाचें उत्पन्न १६९५५२ रु. असून खर्च ३१६९१८ रु. आहे.

## कोर्ट ऑफ वॉर्डस् खातें

स. १३३४ फ. च्या सुरवातीला कोर्ट ऑफ वार्डसूच्या ताब्यांत एकंदर ७७ इस्टेटी होत्या व या सालांत आणखी १९ इस्टेटी ताब्यांत घेण्यांत आल्या, वर्षअखेरीला ८ इस्टेटी वार्ड सज्ञान झाल्यामुळें सोडण्यांत आल्या व एक रेव्हिन्यू डिपार्टमेंटकडे देण्यांत आली. अशा रीतीनें वर्ष अखेर ८७ इस्टेटी कोर्ट ऑफ वॉर्डसूकडे होत्या. ह्या ८७ पैकीं ६५ ची व्यवस्था प्रत्यक्ष कोर्टाकडून होत होती व १६ इस्टेटींची व्यवस्था पाहण्याकरितां ऑनररी सुपरिंटेंडेंट नेमण्यांत आले होते. कोर्ट ऑफ वार्डसूच्या देखरेखीखालीं एकंदर ८२० खेडीं आहेत त्यांपैकीं ३४० खेड्यांची सर्वे झाली असून ८४ खेड्यांतील जमिनीवरचा सारा वाढविण्यांत आला.

कोर्टाच्या देखरेखीखालीं एकंदर मुली आणि मुलें मिळून १०७ वॉर्ड आहेत, त्यांपैकीं २० मुलगे सरकारी शाळांत शिक्षण घेतात, ३५ मुलगे व १० मुलींना खासगी शिक्षण दिलें जातें. २४ मुलें आणि १६ मुली अद्यापि लहान आहेत, व दोन मुलें वेडीं आहेत.

स. १३३४ फ. मध्यें कोर्ट ऑफ वार्डसूचें उत्पन्न, ३०८५४६३ रु. होतें व खर्च २६४७१०५ रु. झाला. वर्ष अखेरीला कोर्टाजवळ २९१९५२० रु. शिलकेंत आहेत. या सालीं कोर्ट ऑफ वार्ड खात्यानें अज्ञानांच्या इस्टेटीकडून व्यवस्थेसाठीं २१६१६२ रु. वसूल केले.

## स्टँप व रजिस्ट्रेशन खातें

### रजिस्ट्रेशन

संस्थानांत इ. स. १८८९ मध्यें रजिस्ट्रेशन खातें सुरू करण्यांत आलें. आठ वर्षेपर्यंत या खात्यावर हायकोर्टाची देखरेख असे. इ. स. १८९७ सालीं

या खात्यासाठीं एक अधिकारी इन्स्पेक्टर जनरल नेमण्यांत आला. प्रथम रेजिस्ट्रेशनचे काम ज्यूडिशियल अधिकाऱ्यांकडे दिलं होतें व त्यांना निम्मे कमिशन मिळत असे, सध्या रजिस्ट्रारला निम्मी व सब रजिस्ट्रारांना ⅓ फी कमिशन म्हणून दिली जाते.

सध्यां २५ रजिस्ट्रार व १५१ सब रजिस्ट्रारचीं आफिसें आहेत, स. १३३४ फ. मध्यें ३१८८८२२९ रु. किमतीच ३९३८६ दस्तऐवज नोंदण्यांत आले. सरासरीनें प्रत्येक दस्तऐवजाची किंमत ८०९ रु. होती ह्या वर्षी ह्या खात्याचें उत्पन्न ३६०७८० रु. व खर्च १७५ ३४१ रु. झाला.

## स्टँप

स. १३३४ फ. मध्यें निरानिराळ्या इलाख्यांत किती किंमतीचे किती स्टँप विकण्यांत आले हें पुढें दिलें आहे.

| इलाखा | संख्या स्टँप. | किंमत |
|---|---|---|
| सरकारी | २३३१९९५९ | ३३०८५१७ |
| जाहागीर | ३०००१२ | १३८१७८ |
| रेसिडेन्सी व सिकंद्राबाद | १०४२२३ | २६८६०१ |

एकूण २३७२४१९४ स्टँप विकण्यांत आले. त्यांची किंमत ३७१५२९६ रु. वसूल झाली. सरकारी रिपोर्टांत असें म्हटलें आहे कीं, **सर्फेखास** इलाख्याचें स्टँपाचें उत्पन्न वगळल्यास सरकारचें उत्पन्न १९४२९९३ आणि खर्च १७६११८ रु. झाला. यावरून पाहतां जवळ जवळ निम्मी रक्कम म्हणजे १७ लाख रुपये सर्फेखासकडे जातात असें दिसतें. त्या संबंधी रिपोर्टांत सरकारांनीं स्पष्ट खुलासा करावयास पाहिजे होता. तसें नसल्यास इतकी तफावत कोठें जाते याचा उलगडा होत नाहीं.

## खाणीं खातें.

संस्थानांत सिंगारनी, सास्ती, व पावनी, ह्या ठिकाणीं कोळशाच्या खाणी आहेत. या खाणीबद्दल निझामसरकारला खाणीवाल्या इंग्रज कंपन्यांकडून **रॉयल्टी** म्हणून सुमारें ७५००० रु. मिळतात. ह्याशिवाय हैद्राबाद डेक्कन कंपनीला रायचूरजवळ सोन्याच्या खाणींची पाहाणी करण्याकरितां वार्षिक ५४३५ रु. भाड्यानें जमीन देण्यांत आली आहे.

इ, स. १९२५ सालीं कोळशाच्या खाणींतून ६६०००० टन कोळसा निघाला व सरकारला ७५६१३ रु. रॉयल्टी मिळाली. कोळशाच्या खाणींत ३१ अपघात होऊन १५ इसम ठार व २३ जखमी झाले. ह्या खात्याचा १३३४ फ. मधील खर्च ४७९४७ रु. होता.

## मिंट ( टांकसाळ ) खातें.

संस्थानांत स. १२६२ फ. मध्यें सर सालार जंग दिवाणांनीं टांकसाळ सुरू केली त्यावेळीं जुन्या पद्धतीप्रमाणें हातांनींच नाणीं पाडीत असत, पूर्वी व्यापारी व अमीर उमराव चांदी आणून देत व कांहीं थोडी फी देऊन नाणीं पाडून नेत.

स. १३०२ फ. पासून यंत्रानें नाणीं पाडण्याची पद्धत सुरू झाली. सध्या संस्थानी रुपयावर **चारमिनार** ह्या इमारतीचा शिक्का व निझामांचें नांव असतें व त्याला उस्मानिया शिक्का असें म्हणतात. ह्या रुपयाचें वजन १७२$\frac{१}{२}$ ग्रेन असतें व इंग्रजी रुपयाचें वजन १८० ग्रेन असतें. चांदीचें प्रमाण मात्र एकास १$\frac{१२}{९००}$ असतें.

स. १३२१ ते १३३२ फ. पर्यंत ११३१२५१११ रु. चीं नाणीं पाडण्यांत आलीं.

हुंडणावळीचा भाव इंग्रजी १०० रुपयांला हैद्राबादी ( उस्मानिया ) शिक्याचे ११६ रु. १० आ. ८ पै असा असतो.

संस्थानांत अर्धा आणा, दोन पै, व एक पै अशीं तांब्याचीं नाणीं पाडलीं असून शिवाय एक आण्याचें निकलचें नाणें पाडलें आहे. त्याशिवाय चांदीची अधेली, पावली, चौली अशीं नाणीं आहेत.

स. १३३४ फ. मध्यें १६०७२९०० रुपये, ३३२८०० रु. च्या पावल्या व १७७८७६० रु. च्या चवल्या पाडण्यांत आल्या. या सालाच्या सुरवातीला टांकसाळींत ११९४१४१९ $\frac{6}{10}$ इतके तोळे चांदी होती.

टांकसाळींत **अशरफी** ( मोहोर ) ह्या नांवाचीं सोन्याचीं नाणीं पाडण्यांत येतात. स. १३३४ फ. मध्यें टांकसाळ खात्याचा एकंदर खर्च ३११९९२ रु. झाला.

## नोटा ( पेपर करन्सी ) खातें.

संस्थानांत कागदी नोटांचें चलन इ. स. १९१८ ( स. १३२७ फ. ) पासून सुरू झालें. ह्या वर्षी १०० आणि १० रुपयांच्या नोटा काढण्यांत आल्या. पुढें दोन वर्षांनीं ५ आणि १ रुपयाची नोटही चालू करण्यांत आली, पण एक रुपयाच्या नोटा लोक हातांत धरीनात म्हणून सरकारनें त्या काढून घेतल्या. सध्या २७९९७००० रु. च्या नोटा व्यवहारांत आहेत.

स. १३३४ फ. अखेर सरकारजवळ पुढील नोटा शिल्लक आहेत.

| | |
|---|---|
| एकरुपयाच्या | १७८९८८९२ |
| पांच रु. च्या | ७३०००० |
| दहाच्या | ५९००००० |
| शंभरच्या | ५८००००० |
| एकूण | ३३२८८९२ रु. च्या नोटा. |

नोटांबद्दल गंगाजळींत शिल्लक असलेली रकम व्याजीं लावून ६४७२६७ रु. व्याज आलें. पेपरकरन्सी खात्याचा चालू खर्च फक्त ५२०९ रु. होता.

नोटा छापाव्यासाठीं ७६०००० रु. भांडवल म्हणून अडकलें आहे.

## इस्लाम हिंदू धर्म खातें.

संस्थानांत एक स्वतंत्र धर्म खातें आहे. आणि ह्या खात्याचा अधिकार हिंदूंचीं देवालयें, धार्मिक संस्था व तत्संबंधीं देणग्या आणि मुसलमानांच्या मशीदी इ० वर चालतो. अर्थातच ह्या खात्याचा मुख्य अधिकारी एका इस्लामी म्हणविणाऱ्या संस्थानांत मुसलमानाशिवाय दुसरा कसा असूं शकेल ? ह्या खात्यांत बहुतेक सर्व अधिकारी मुसलमानच आहेत. संस्थानांत शेंकडा ९० प्रजा हिंदु-

धर्मीय असूनही त्यांच्या धर्मासंबंधीं खात्यांत एकही मुख्य अधिकारी हिंदु नसल्यामुळें त्यांची बाजू सरकारापुढें मांडणारा व योग्य सल्ला देणारा असा कोणीच नाहीं. त्यामुळें हिंदूंच्या धार्मिक बाबतींत अन्याय होतो व अनेक भानगडी व तंटे उपस्थित होतात.

स. १३३४ फ. मध्यें धर्मखात्याकरितां पुढीलप्रमाणें खर्च झाला.

| | |
|---|---|
| नोकर वर्गाचा खर्च | १८६५५६ |
| मशीदी व देवळें | १२६२२२ |
| धार्मिक संस्थांना मदत | १७३८९६ |
| मामूलदार | ५८३१२ |
| योमियाद्दार आणि वर्षासन | २३७५३६ |
| हज यात्रेकरु | ५५० |
| उत्सव | ६८१६६ |
| धर्मादाय देणग्या | २१९५६१ |
| एकूण | १०७०७९९ |

स. १३३३ फ. मध्यें हज ( मक्केच्या यात्रेकरूंसाठीं ) करितां ३५९६० रु. आणि यरुशलेम येथील सुप्रसिद्ध मशीद **अकसा**च्या दुरुस्तीसाठीं ११६६९९ रु. देण्यांत आले.

आपल्या राज्यांतील कर देणाऱ्या प्रजेचीं अर्थात् हिंदूंचीं देवळें दुरुस्त अथवा जीर्णोद्धार करण्याची बंदी करणाऱ्या निझाम सरकाराला आपल्या येथीलच नव्हे तर परदेशांतील अनेक नवीन मशीदी बांधणें आणि जुन्या दुरुस्त करण्याबद्दल हिंदू प्रजेकडून घेतलेल्या पैशांतून अशा सढळ देणग्या देण्याचा काय अधिकार आहे ! शिवाय मुसलमानी धर्मामध्यें मशीदी-करितां हिंदू ( काफिर ) लोकांकडून घेतलेल्या पैशांचा उपयोग करूं नये असेंही आहे त्याची वाट काय !

या खात्यामार्फत मुसलमान धर्मोपाध्यायांना शिक्षण देण्याचें काम चालतें. उदाहरणार्थ मुसलमानांचा अंत्येष्टि संस्कार करणारे पुरुष व स्त्रियांना धर्मशिक्षण देऊन सर्टिफिकिटें दिलीं जातात. १३३४ मध्यें १७ पुरुष व १० स्त्रियांना **घिसालाचीं** सर्टिफिकिटें देण्यांत आलीं.

कत्तल खान्यांत मुल्लांचें काम करणाऱ्यांची परीक्षाही याच खात्यामार्फत घेतात. कत्तलखान्यावर आतां या धर्मखात्याची देखरेख असते. मुल्लांना पगार मात्र कत्तलखान्याच्या फीमधून देतात.

कुराणांतील अथवा धर्मग्रंथांतील वाक्यें असलेलीं छापील अथवा इतर चिटोरीं गलिच्छ आणि अपवित्र जागीं पडून तीं तुडविलीं जाऊं नयेत म्हणून अशीं चिटोरीं जमा करण्याची आणि तीं सर्व एके ठिकाणीं पुरून टाकण्याची व्यवस्था या खात्याकडून केली जाते.

संस्थानांत १३२६ फ. इ. स. १९१७ मध्यें ( दहा वर्षांपूर्वी ) एकंदर १८६० मशीदी, १५५१६ देवळें व मठ, १०४ धर्मशाळा व सराई, ५६ चर्च व मिशन स्कूल्स, आणि एक आग्यारी होती. एकूण—१७५३७.

सन १३२७ फ. मध्यें एकूण २२००४ धर्मगृहांची संख्या होती त्यांपैकीं ९०१० गृहांना सरकारी नेमणुका आहेत. बाकीच्यांसंबंधींची माहिती रिपोर्टावरून मिळत नाहीं.

वरील माहितीसंबंधीचे तक्ते खालीं दिले आहेत.

## देवळांच्या जीर्णोद्धारास मनाई.

निजाम सरकारच्या ग्याझेटांत सन १३०८ फ. २४ माहे रोजीं खालीं दिलेला हुकूम प्रसिद्ध करण्यांत आला आहे.

नवाब मदारुलमहाम बहादुर ( दिवाण ) यांच्या आज्ञेवरून ह्या जाहिरनाम्याद्वारें सर्वांना कळविण्यांत येतें कीं, हैद्राबाद शहर व शहराबाहेर अथवा संस्थानांत ज्या ज्या ठिकाणीं मुसलमानांची संख्या जास्त आहे अशा ठिकाणचीं देवळें आणि गुडीं ( लहान देऊळ ) जे पूर्वीपासून कायम आहेत त्यांच्या सद्यःस्थितींत वाढ अथवा ती नीट करण्यांत येऊं नयेत. त्यांना आहेत त्या स्थितींतच पूर्ववत् राहूं द्यावें. ( या हुकुमाचा उद्देश स्पष्ट आहे डागडुजी न करणें म्हणजे आजाऱ्यास औषधोपचार न केला तर तो आपोआपच मरून जाईल )

दुसरा हुकूम नं. $\frac{36}{16}$ २१ आगस्ट इ. सन. १९०२. ह्यापुढें कोणत्याही प्रकारचें देऊळ मग तें लहान असो कीं मोठें असो सरकारच्या मंजूरीशिवाय बांधण्यांत येऊं नये. ( मशीदींनांही परवानगीची जरूर आहे पण इस्लामी राज्यांत त्याला मुळींच अडचण नसून् उलट प्रोत्साहन व मदत दिली जाते )

वरंगल जिल्ह्यांत एक चर्च परवानगी न घेतां बांधण्यांत आलें. ह्या पुढें असें न होण्याबद्दल ताकीद देण्यांत आली ( तच देऊळ असतें तर पाडून टाकिलें असतें. )

मठ सुद्धां सरकारच्या परवानगी वांचून बांधतां येत नाहीं.

रेव्हिन्यू सेक्रेटरी ( मालगुजारी ) चा हुकूम नं. ४६ स. १३११ फ. मध्यें असें फर्माविण्यांत आलें आहे कीं जर सरकारचे परवानगीशिवाय एखाद्या धार्मिक इमारतीची दुरुस्ती अथवा बांधणें झालें असल्यास तें तत्काल पाडण्यांत येऊन तसें करणाऱ्यावर खटला भरावा.

" नांदेडच्या तालुकदारांनीं एका खटल्यांत विचारिलें आहे कीं सरकारी परवानगी न घेतां एखाद्या मूर्तीची पूजे करितां स्थापना केली असल्यास तालुकदार ( कलेक्टर ) स्वतःच्या अधिकारांत मूर्ती काढून टाकूं शकतो कीं नाहीं. ह्यासंबंधीं नाझमसाहेब उमूरमजहबी ( धर्मखातें ) च्या मताप्रमाणें अव्वल तालुकदारांना असा अधिकार देण्यांत येतो कीं जरुरीच्या वेळीं त्यांनीं आपल्या अधिकारांत जेथें परवानगीशिवाय मूर्तीची स्थापना करण्यांत आली असेल तेथून मूर्ती काढून टाकण्याचा हुकूम द्यावा.

पूजेनिमित्त जनावरांचे बळी व त्यांच्या वधानंतर हिंदूलोकांकडून जी क्रूरता करण्यांत येते ती यापुढें बंद करण्यांत येत आहे ( स. १३१७ फ. )

## हिंदू प्रजेच्या सणांनां व धार्मिक विधींनां प्रतिबंध.
## दसरा, रामनवमी, गणेशचतुर्थी इ. ची मनाई

मोहरम असतांना दसरा, रामनवमी, गणेशचतुर्थी इ. हिंदूंचे महत्त्वाचे सण आले असतां संस्थानांतील श. ९० हिंदूप्रजेला आपले सण करण्याची देखील बंदी करण्यांत येते. अशा स्थितींत ह्या राज्यांत हिंदूंना धर्मस्वातंत्र्य नाहीं व त्यासंबंधीं अनेक प्रतिबंध व अडचणी उत्पन्न करण्यांत येतात हें खालील हुकमांवरून कळून येईल.

जाहिरनामा { नि. ३ ता. १५ आबान स. १३२६ फ. व
नि. ४ ता. १२ आबान सं. १३२८ फसली

ज्यूडीशल व पोलीस सेक्रेटरांच्या धर्मखात्याकडून, **दसरा** मोहरमा मध्यें येत असल्यामुळें निझाम साहेबांच्या मंजूरीनें खालील हुकूम देण्यांत येत आहे त्याप्रमाणें वागणें सर्वधर्मीयांना भाग आहे

१ सर्व राज्यांतील ( शहर व जिल्हे ) हिंदूंनीं आपापल्या घरांत कसलीं-ही वाद्यें न वाजवितां पूजा व आपले धार्मिक विधी उरकून घ्यावेत.

२ ज्यांनां सीमोल्लंघनाला बागेंत जावयाचें असेल ते कसल्याही वाद्या-शिवाय व कोणतेंही वाद्य न वाजवितां व कसल्याही आनंददर्शक व आनंद-दायक वस्तचा उपयोग न करितां बागेंत जाऊन पूजा करूं शकतात. कोणत्याही राजमार्गावर अथवा धार्मिक जागेंत सार्वजनिक रीत्या दसऱ्याचे धार्मिक विधी करण्यांत येऊं नयेत. ( अर्थात् हिंदूंनांही मोहरमचें सूतक पाळणें भाग आहे. )

३ बदकम्मा देवीस बाहेर घेऊन निघूं नये आणि हिंदूंनीं आपापल्या घरांतील लहान लहान देवळांत ( अर्थात् देवघरांत ) देखील कसलेंही वाद्य वाजवूं नये.

४ मोठमोठ्या खास देवळांत, देवळाचे आवारांत सेवा आणि पूजा मामूली वाद्यें वाजवून करावी आणि देवळाबाहेर मुळींच निघूं नये आणि मुसल-मानांनीं देवळांत शिरून पूजेंत व्यत्यय आणूं नये, परतु घरांतील लहान लहान देवळांना ( अर्थात देवघरांना ) हा हुकूम लागू नाहीं म्हणजे तेथें वाद्यें मुळींच वाजविण्यांत येऊं नयेत. ( मुसलमांनां देवळांत न शिरण्याबद्धल उपदेश कशाला ! )

५ दसऱ्यानिमित्त जे झेंडे, गुढ्या वगैरे उभे केले जातात ते दसऱ्याचे दिवशीं करूं नयेत, मोहरम संपल्यावर ता. १५ मोहरमला उभे करण्यांत येऊन ह्यासंबंधाचे धार्मिक विधी व पूजा, बलिदान वगैरे करण्यांत यावे.

कोणी हिंदू अगर मुसलमान ह्या आज्ञेविरुद्ध वागल्यास तो गुन्हेगार समजण्यांत येऊन त्याला कायद्याप्रमाणें पोलीस आणि फौजदारीकडून कारवाई करण्यांत येईल.

पोलीसचें हें कर्तव्य आहे कीं तिनें या हुकमाचे अंमलबजावणीमध्यें पूर्ण लक्ष ठेवावें, तसेंच पायगा, जाहगीर, व संस्थानांतून या हुकुमाची पूर्णपणें बजावणी करण्याची व्यवस्था करावी.

मि. हैदरी ज्यू. सेक्रेटरी.

## रामनवमीस मनाई.

मदारुल महाम सरकारच्या हुकुमावरून नि. १३ ता. ३१ फरवर्दी स. १३३१ फ. यंदा रामनवमी मोहरममध्यें येते करितां ताकीदी हुकूम देण्यांत येत आहे कीं संस्थानांतील सर्व हिंदूंनीं आपापल्या घरांतच पूजा इ० धार्मिक विधी उरकून घ्यावेत. पालखी वगैरेची मिरवणूक रस्त्यावर काढतां कामा नये. मुसलमानांनीं त्यांच्या घरांत जाऊन पूजा व धर्मविधीमध्यें कशाप्रकारची तक्रार व प्रतिबंध करूं नये, विरुद्ध वागल्यास गुन्हेगाराला दंड आणि सक्त-मजुरीची शिक्षा दिली जाईल, सर्व पोलिसांनीं शिपायांपासून ते अधिकाऱ्या-पर्यंत काळजीपूर्वक हुकुमाची बजावणी करण्यांची व्यवस्था ठेवावी.

## गणेशचतुर्थीस मनाई.

हुकूम नि. ४ ता. माहे आबान् स. १३२९ फ. धर्मखात्याच्या सेक्रेटरीकडून.

यंदा गणेश चतुर्थी मोहरमांत येते करितां दसऱ्यासंबंधीं काढलेले जे ( प्रतिबंधाचे ) हुकूम आहेत तेच ह्यालाही लागू होतील, हिंदूलोक धार्मिकविधी पाळण्यांत कदाचित् वाद्यें वगैरे वाजविण्याचा सार्वजनिक ठिकाणीं उपयोग करितील आणि तें दंग्यास कारण होईल करितां तात्काळ यासंबंधी व्यवस्था करण्यांत यावी.

## नवीन चालीसंबंधीं सरकारची परवानगी.

२५ जानेवारी इ. स. १९१० मध्यें मदारुल महाम सरकारच्या आज्ञे-वरून इन्स्पेक्टर जनरल पोलीसकडून कळविण्यांत आलें आहे कीं, पूर्वी शाळेंतील मुलें गणपती काढीत असत. पुढें पुढें इंग्रजी हद्दींतील प्रजेचे विशेषतः पुण्यांतील

ब्राह्मणांच्या अनुकरणानें हा उत्सव निझाम इलाख्यांतही थाटांत होऊं लागला, येवढेंच नव्हेतर खास औरंगाबाद येथें ह्या उत्सवाची येथपर्यंत मजल पोंचली कीं हिंदु–मुसलमानांत तंटे उत्पन्न झाले आणि शांतताभंगाचा प्रसंग आला आणि बेजापूर येथेंही हिंदू मुसलमानांत मारामारी झाली व एक दुसऱ्याच्या पाळतीवर आहेत, त्यामुळें आतां पर्यंत तेथें प्युनिटिव्ह पोलीस बसविले असून त्याचा खर्च दोघांकडून घेण्यांत येतो.

कसबें **आळंद** इलाखे पायगा येथेंही गणपतीच्यासंबंधीं हिंदूमुसलमानांत झगडा होता. मुसलमानांचें म्हणणें असें होतें कीं, मशीदीवरून मिरवणूक जाऊं देणार नाहीं व ही चाल नवीन आहे पण त्यासंबंधीं तेथील अधिकाऱ्यांनीं आपसांत समेट करविला ( समेट कसा काय झाला माहीत नाहीं )

कसबे टेकमाल येथेंही बालाजीचे रथाची मिरवणूक मशीदीवरून नेण्यासंबंधानें मुसलमानांची तक्रार होती व असें नव्यानें करणें म्हणजे इस्लामाची ( तोहीन ) अब्रूची हानि असल्यामुळें त्यांनीं मिरवणुकीस मनाई केली, त्यामुळें दंगा झाला. ह्याशिवाय कळून आलें आहे कीं अशा प्रकारचें तंटे पुष्कळ ठिकाणीं उत्पन्न होतात. करितां निझाम सरकारांनीं खालील फर्मान काढिलें आहे.

## फर्मान.

एखादा धार्मिक उत्सव अथवा तो उत्सव पुनः सुरू करावयाचा असेल ( जो पुष्कळ कालापासून सोडून देण्यांत आला असेल ) तर जो कोणी असा उत्सव सार्वजनिक ठिकाणीं नव्यानें करूं इच्छित असेल आणि त्यामुळें इतर कोणतीही जात नाराज असेल अथवा शांतता आणि आरोग्याच्या दृष्टीनें तो उत्सव अपायकारक असेल तर असल्या नवीन उत्सवास धर्मखात्याचे अधिकारी ( जोंवर अशा उत्सवासंबंधीं सरकारची मंजुरी मिळविण्यांत येणार नाहीं. तोंवर ) प्रतिबंध करूं शकतात. ( असा फर्मान झाल्यावर पावलोपावलीं नाराजी व प्रतिबंध ठेवलेलाच )

# देवळें, मशीदी, दरगा, मठ, व चर्चेसची संख्या.

( सन १३२६ फ. इ. स. १९१७ मधील )

| नं. | सन. फसली. | मशीदी | | | दरगा व आशुरखाने | | | देऊळ व मठ | | | धर्मशाळा व सराई | | | चर्च मिशन स्कूल | आग्यारी |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | शहर है. | जिल्हे | एकूण | है. शहर | जिल्हे | एकूण | है. शहर | जिल्हे | एकूण | शहर | जिल्हे | एकूण | | |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ | १३ | १४ | १५ | १६ |
| १ | १३०३ | २५४ | १३१३ | १५६७ | २८६ | ५०३० | ५३१६ | ९३ | १५२६२ | १५३५५ | ७ | ९७ | १०४ | ० | १ |
| २ | १३०७ | २६० | १३२२ | १५८२ | २८६ | ४९३१ | ५२१७ | ९१ | १५२६२ | १५३५३ | ७ | ९७ | १०४ | २ | १ |
| ३ | १३१५ | ४६५ | १३१३ | १७७८ | | | ४९९० | | | | | | १०४ | १२ | २ |
| ४ | १३१८ | | | १८०४ | | | | | | १५३८० | | | | २१ | २ |
| ५ | १३२२ | | | १८०८ | | | | | | १५३८६ | | | १०४ | ३० | २ |
| ६ | १३२५ | | | १८५५ | | | | | | १५५१० | | | १०४ | ५१ | २ |
| ७ | १३२६ | | | १८६० | | | | | | १५५१६ | | | १०४ | ५६ | २ |

सन १३०३ फ. मध्यें ज्यांना सरकारकडून मदत मिळत त्यांची फक्त संख्या दाखविण्यांत आली आहे.

# धर्मगृहांची जिल्हेवारी.

संस्थानांत प्रत्येक जिल्ह्यांत किती धर्मगृहें ( देवळें, मशीदी वगैरे ) आहेत त्यासंबंधीं नक्की आंकडा मिळत नाहीं. धर्मखात्याकडून त्याबद्दल चौकशी चालू आहे. स. १३२७ फ. च्या रिपोर्टांत खालील माहिती दिली आहे.

| | जिल्हा. | धर्मगृहें. | नेमणुका असलेले. | नेमणुका नसलेले. |
|---|---|---|---|---|
| १ | औरंगाबाद | ४३३६ | १३९४ | |
| २ | परभणी | २७८० | ४२१ | २३५९ |
| ३ | नांदेड | १४०९ | ७२० | |
| ४ | बीड | २०४२ | कळलें नाहीं | ६२३ |
| ५ | वरंगल | ८२६ | ४८१ | |
| ६ | करीमनगर | ७४९ | ४८७ | |
| ७ | आदिलाबाद | ८७७ | १५० | |
| ८ | मेदक | १८५२ | १३६२ | |
| ९ | निझामाबाद | ११०२ | ८११ | |
| १० | नलगुंडा | ८३३ | कळलें नाहीं | |
| ११ | महबूबनगर | १८५५ | ८१५ | |
| १२ | गुलबर्गा | कळत नाहीं | | |
| १३ | रायचूर | ३३४३ | २३६९ | |
| १४ | उस्मानाबाद | कळत नाहीं | | |
| १५ | बेदर | कळत नाहीं | | |
| | एकूण | २२००४ | ९०१० | |



# धर्मखात्याकडून होणारा खर्च.

| | संस्था. | देणग्या वार्षिक रु. |
|---|---|---|
| १ | मद्रसे हिफाज मक्कामशीद | ३५५७ |
| २ | मद्रसे दीनियात बग्गीखाना | २८९४ |
| ३ | जिल्ह्यांतील काजी व पेष इमामांना, ( यांतील १०००० रु. देवळें व दरग्यांच्या नौबती व दिव्यांच्या खर्चाकरितां ) | ५६५१२ |
| ४ | मद्रसे दीनियात खुलदाबाद | २१६० |
| ५ | यतीमखाना ( अनाथालय ) सरुनगर | ५०००० |
| ६ | तोषक खान्यामार्फत दानधर्म | ४०००० |
| ७ | खास धार्मिक दरमहा जो सर्व हिंदुस्थानांत व इतरत्र दिला जातो. | १५८४०२ |
| ८ | औरंगाबाद व खुलदाबाद येथील लंगरच्या खर्चाकरितां | ७००० |
| ९ | मछली बंदरच्या मार्गातील सराईच्या देखरेखीकरितां | ४५०० |
| १० | पंगूगृह | १२००८ |
| ११ | सणांच्या खर्चाकरितां ( तोषकखान्यामार्फत होणाऱ्या ) * | १२४१९ |
| १२ | सणांच्या खर्चाकरितां ( धर्मखात्याकडून होणाऱ्या ) | ४२३७३ |
| १३ | सणांच्या खर्चाकरितां ( जिल्हाधिकाऱ्यांकडून होणाऱ्या ) | ७३५७३ |
| १४ | मामूलदार | ५३७६५ |
| १५ | योमियादार वगैरे | २६३९०० |
| १६ | धार्मिक शिक्षणसंस्थांना मदत | १५९४५५ |
| १७ | हाजी लोकांना पाठविण्याचा खर्च | ५००० |
| १८ | राखून ठेवलेली रक्कम | ६५११७ |
| १९ | मशीदी व इतर धर्मगृहांच्या डागडुजीकरितां | १७१४७ |
| २० | पेन्शन | १३०८० |

* तोषकखाना हा निझामांच्या खाजगींतील असून तेथून निझामांच्या हस्तें जो दानधर्म केला जातो तो.

## डेव्हलपमेंट ( तरकीयात ) खातें.

संस्थानांत पडित जमिनींची सुधारणा करण्याचें एक खातें निर्माण करण्यांत आलें आहे. आतांपर्यंत ९ लक्ष एकर जमिनी कांहीं अटींवर लोकांन देण्यांत आल्या आहेत. या पूर्वी ६७७६१७ एकर जमीन सर्व्हे नंबर देऊन पट्टेदारांना देण्यांत आली आहे. स. १३३४ साली डेव्हलपमेंट बोर्डानें आणखी ३४२४७३ एकर जमीन खंडानें देण्यासाठीं काढली. तिचे लहान लहान तुकडे करून ते घेण्याबद्दल लोकांकडून अर्ज मागविण्यांत आले एकंदर २९१८ अर्ज आले पण त्यांपैकीं फक्त ८० इसमांचेच अर्ज मंजूर होऊन त्यांना ३५९९४ एकर जमीन लागवडीसाठीं देण्यांत आली. तिजबद्दल सरकारला १४६५४३६ रु. मिळाले. त्यांपैकीं ६५३६४ रु. निझामसाहेबांनीं रॉयल्टी म्हणून खासगींत घेनले. हे पैसे घेण्याचा त्यांनां मुळींच अधिकार नाहीं.

या खात्याचा हेतु पडित जमिनी लागवडीला गरीब प्रजेस द्याव्या असा दिसत नसून मोठमोठ्या अधिकाऱ्यांना व परकीय मुसलमानांना एक प्रकारची जाहगीर करून देऊन रॉयल्टी म्हणून आपलाही कांहीं फायदा करून घ्यावा असा आहे असें म्हणणें हें वस्तुस्थितीस सोडून नाहीं.

## कायदे कौन्सिल खातें.

स. १३३४ फ. मध्यें कौन्सिलच्या घटनेंत कांहीं फेरफार झाला नाहीं, कौन्सिलच्या एकंदर २ बैठकी होऊन ४ कायदे पास झाले.

कोंबड्याचीं झुंज व बैलांच्या टक्करीची मनाई करणारा कायदा पास झाला असून तें कृत्य फौजदारी गुन्हा समजलें जाईल.

काजी पेठ बलारशाह रेलवेच्या फायद्याकरितां एक रेलवे ॲक्ट पास करण्यांत आला आहे. संस्थानांतील इतर रेलवे ब्रिटिश हद्दींत व त्यांच्या कायद्या खालीं असून तेथील सर्व अधिकार इंग्रजी इलाख्याला आहे.

कायदे कौन्सिलचा एकंदर खर्च ७२३८७ रु. झाला, ह्या कौन्सिलच्या एकंदर सभासदांची संख्या २० आहे.

## सरकारी छापखाना.

ह्या खात्याचा स. १३३४ फ. मध्यें एकंदर खर्च १९०२९९ रु. झाला, परंतु निरनिराळ्या खात्यांकडून कामांचीं बिलें वसूल केल्यामुळें सरकारला १९४८०१ रु. वसूल झाले. अशा रीतीनें सरकारी छापखान्यावर निवळ नफा ४५०२रु. उरला. ह्या छापखान्यांत (जरीदा) गव्हर्नमेंट ग्याझेट छापतात, त्याच्या एकंदर ९०० प्रती छापण्यांत येतात त्यापैकीं ७८७ अंक सरकारी अधिकाऱ्यांकडे पाठविण्यांत येतात, पण वर्गणीदारांची संख्या ८७ आहे.

ह्या छापखान्यांत आतांपर्यंत एकंदर २२३४७४ रु. भांडवल गुंतलें आहे

## स्टेशनरी खातें.

सरकारी खात्यांना लागणाऱ्या कागद, पेन्सिली, शाई वगैरे पुरविण्याकरितां सरकारकडून एक खातें काढण्यांत आलें आहे. स. १३३४ फ. मध्यें ११७७४८ रु. ची स्टेशनरी खरेदी करण्यांत आली. ह्यापैकीं ६०४७५ रु. ची आफिसांनां देण्यांत आली व बाकीची कोठारांत पडली आहे.

ह्या खात्याचा एकंदर खर्च ११२४४ रु. झाला, ह्यापैकीं ४५०० खुर्च्या टेबलें वगैरेसाठीं खर्च करण्यांत आले.

## स्टॅटिस्टिकल ( आंकडे ) खातें.

संस्थानांत एक आंकडे खातें असून तें सं. १३२८ मध्यें सुरुं झालें. ह्या खात्यामार्फत पीकपाणी, बाजार भाव, व्यापार, शेतकी, जन्ममृत्यू, वगैरे विषयाचे आंकडे जमवणें व ते प्रसिद्ध करण्याचें काम होतें. त्याचप्रमाणे संस्थानचें ग्याझेटियर तयार करण्याचें कामही ह्याच खात्याकडे आहे. व खानेसुमारीचा ( सेन्सस ) रिपोर्ट व गुरांचे खानेसुमारीचा रिपोर्टही ह्याच खात्याकडून प्रसिद्ध होतो. स. १३३४ मध्यें ह्या खात्याचा खर्च ३४७७३ रु. झाला व ग्याझेटियर शाखेसाठीं ८३९४ रु. खर्ची पडले.

# भाग दुसरा.

## हैद्राबाद संस्थानासंबंधीं महत्त्वाची

## व

## उपयुक्त माहिती

# कांहीं महत्त्वाची उपयुक्त माहिती.

संस्थानांत केव्हांपासून कोणकोणतीं वर्तमानपत्रें, मासिकें इ. निघालीं व तीं किती अल्पायुषी होतीं हें खालील तक्त्यावरून कळून येईल. एकंदरींत ह्या संस्थानचें हवापाणी वर्तमानपत्रांना मुळींच मानवत नाहीं हें सिद्ध होत आहे.

| नं. | नांव | इ. स. केव्हां सुरू झालें | इ. स. केव्हां बंद झालें | कोणीं सुरू केलें |
|---|---|---|---|---|
| | **इंग्रजी.** | | | |
| १ | डेक्कन टाइम्स * | १८६४ | १८९१ | * अ. |
| २ | हैद्राबाद टेलिग्राफ | १८८२ | १८८६ | मि. वेस्टर एडवर्ड |
| ३ | हैद्राबाद रेकार्ड | १८८५ | १८९१ | मि. जोब्स सालोमन |
| ४ | डेक्कन स्टँडर्ड | १८८६ | १८८९ } | मि. ग्यालीगर |
| ५ | डेक्कन बजेट | १८९१ | १८९७ } | „ „ |
| ६ | डेक्कन मेल | १८९६ | १८९८ | रा. अय्या शास्त्री. त्यांजवर खटला झाल्यामुळें बंद झालें. |
| ७ | हैद्राबाद क्रॉनिकल | १८९७ | १९०५ | ब. |
| ८ | डेक्कन टाइम्स | १९०२ | १९०५ | मि. फर्न्यांडिस |
| ९ | डेक्कन पोस्ट | १९०३ | १९०६ | क. |
| १० | बुलेटिन (दैनिक) | १९०४ | अ. चा. आ. | चालू आहे. ड. |
| ११ | डेक्कन हेरल्ड | १९०६ | मे. १९०६ | मि. उजाना |
| १२ | डेक्कन गॅझेट | १९०७ | जा. १९०८ | आ. |
| | **उर्दू पत्रें.** | | | |
| १३ | षिफक (फारशी) | १८७८ | १८७८ | रेसिडे. हद्दींत सरकारांनीं बंद केलें. |
| १४ | शौकतुल इसलाम | हि. स. १३०० | चालू आहे. | हाजी कतानि रेसि. ह. |
| १५ | ह-दास्तान (दैनिक) | हि. स. १३०१ | १३०५ | मौ. महमद सुलतान |
| १६ | अखबारे आसफी | हि. स. १३०१ | कांहीं वर्षें | मौ. महमद सुलतान |
| १७ | अफसरुल अखबार | हि. स. १३०४ | कांहीं वर्षें | कर्नल अफसरुल मुल्क (पेट्रन). |
| १८ | सफीरे दकन | „ „ १३०५ | „ „ | रेसिडन्सी हद्दींत अमजद अली |
| १९ | सय्यदुल अखबार (फारशी) | „ „ १३०६ | स. हि. १३०८ | रेसिडन्सी हद्दींत |

| नं. | नांव | इ. स. केव्हां सुरुं झालें | इ. स. केव्हां बंद झालें | कोणीं सुरूं केलें |
|---|---|---|---|---|
| २० | महबूबुल कुलूब | १३०७ | ,, ,, | इमादुःसलतनत ( पेट्रन ) |
| २१ | मुल्कव मिल्लत | १३१३ | १३१८ | काजी रफिओद्दीन ( सरकारी मदत होती ) |
| २२ | नजारे आलम | १३१४ | १३१७ | मुनशी कुद्रर तुल्ला ( सरकारांनीं बंद केलें ) |
| २३ | जामे जमषीद् | १३१९ | स. १३१३ फ. | मौ. इब्राहिमखां ( तीन वेळ सरकारांनीं बंद केलें. ) |
| २४ | अझीजुल अखबार | स १३११ फ. | अ. स. ११ फ. | नबाब अझीज जंग |
| २५ | दक्नी | हि. स. १३२१ | १३२३ हि. | मौ. अब्दुल रहीम वकील |
| २६ | जलवए महबूब | १३२१ | कांहीं वर्षे | मौ. गुलाम समदानी |
| २७ | इलमं व अमल–( दैनिक् ) | १३२२ | १३२३ हि. | मौ. मोहिबे हुसेन. |
| २८ | महिबूब गॅझेट | १३२३ | कळत नाहीं. | मुनशी प्यारेलाल ( रेसिडन्सी हद्दींत ) |
| २९ | अल महबूब | इ. स. १९०६ | १९०७ इ. | मुनशी महमद् कासीम |
| ३० | दक्न पंच व मुशीरे दक्न ( दैनिक ) | इ. स. १८८७ | चालूं आहे | माहिती खाली दिली आहे. |
| ३१ | खुरशीदे दक्न–( फारशी ) | इ. स. १८७७ | अखेर १८७८ | मिरझा काजिमन माझी |
| ३२ | मजल्मे दक्न | हि. स. १३१५ | ,, ,, | माहिती खालीं दिली आहे. |
| ३३ | जरीदा ( सरकारी गॅझेट ) | स. १२७९ फ. | चालूं आहे | माहिती खालीं दिली आहे. |
| ३४ | पोलिस गॅझेट | स. १३०८ फ | चालूं आहे | ,, ,, ,, |
| | **मराठी पत्रें** | | | |
| ३५ | निजाम वैभव | इ. स. १८९७ | तीन महिने चाललें | सोलापूर येथून रा. विष्णुपंत खेडकर वकील काढीत असत. |
| ३६ | भाग्येश नगर | हि. स. १३०४ | कांहीं वर्षें | रा. नर्सो मुकुंदराव |
| ३७ | भाग्य नगर | ,, ,, | ,, ,, | } कोणी काढलें व केव्हां बंद झालें याचा पत्ता लागत नाहीं. |
| ३८ | हैद्राबाद् समाचार | ,, ,, | ,, ,, | |
| ३९ | श्री. भाग्येश विजय | इ. स. १९०६ | इ. स. १९०८ | माहिती खालीं दिली आहे. |

| नं. | नांव | इ. स. केव्हां सुरू झाले | इ. स. कव्हां बंद झाले | कोणीं सुरू केलें |
|---|---|---|---|---|
| ४० | आसफे दकन | स. फ १३०८ | स. फ. १३१२ | ता. सुरापुर येथून निघत असे. |
| ४१ | निजाम गॅझट | ,, ,, | ,, ,, | हैद्राबाद येथून |
| ४२ | अखबारे हैद्राबाद | ,, ,, | ,, ,, | ,, ,, |
| ४३ | तालीमुलमो अल्लु-मीन | ,, ,, | ,, ,, | ,, ,, |
| ४४ | चंपावती ( मराठी व उर्दू ) | ,, ,, | ,, ,, | जिल्हेबीड येथे |
| ४५ | दिन वर्तमाने— ( तेलगू ) | ,, ,, | ,, ,, | रेसिडन्सी हद्दींत. |
| ४६ | गुलबर्गा समाचार | स. १३०८फ. | स. १३१२फ. | ( मराठी व उर्दू ) गुलबर्गा |
| | **उर्दू पत्रे.** | | | माहिती खालीं दिली आहे. |
| ४७ | हैद्राबादी | ,, ,, | ,, ,, | |
| ४८ | आसफिया गॅझॅट | इ. स. १९११ | इ. स. १९१३ | मौ. सय्यद महमद अल्ली. |
| ४९ | निझामुल अखबार | इ. स. १८७८ | हि. स. १२९५ | माहिती खालीं दिलीं आहे. |
| ५० | आसफुल अखबार | हि. स. १२९५ | ,, ,, १२९७ | ,, ,, |
| ५१ | सहीफा | ,, ,, १३२४ | चालू आहे | माहिती खालीं पहा. |
| ५२ | मुआरिफ | स. १३२२फ. | अखेर २२ फ. | मौ. अमीर हसन |
| ५३ | निझामी | इ. स. १९०४ | १९१५ | मौ. अमीर हमजा |
| ५४ | उस्मान गॅझट— | हि. स. १३३१ | एक वर्ष | मौ. अबदुल हे. |
| ५५ | रहबर दकन— ( दैनिक ) | स. १३३०फ. | चालू आहे | मौ. सय्यद अहमद मोहिमोद्दीन |
| | **मराठी.** | (इ. स. १९२०) | | |
| ५६ | निझाम विजय | | चालू आहे. | श्री. एल. बी. फाटक |
| ५७ | तेलगू पत्रिका | | चालू आहे. | रा. सीताराम चंद्रराव ( वरंगल ) |
| ५८ | निलगिरी( तेलगू ) | | चालू आहे. | नलगुंडा येथें रा. वेंकट नरसिंहराव |
| ५९ | गोलकुंडा पत्रिका ( तेलगू ) | | चालू आहे. | हैद्राबाद येथें रा. प्रताप रड्डी हें प्रसिद्ध करितात. |
| ६० | रयत ( उर्दू ) | इ. १९२७ | चालू | एम. नरसिंगराव |
| ६१ | निझाम गॅझट | १९२७ | चालू | ,, ,, |

१ **डेक्कन टाइम्स**– हें वर्तमानपत्र आरंभीं नवें मुसलिम अबदुल कादर यांनीं इ. स. १८६४ मध्यें सिकंद्राबाद ( रेसिडन्सी हद्दींतून ) येथून सुरू केलें. नंतर डॉ. सॉसमन व फॉर्बस वकिलीच्या सहकारितेनें चालविलें इ. स. १८८५ मध्यें मि. शापूरजी चिनॉय यांनीं वर्तमानपत्र छापखान्यासह विकत घेऊन बॅ. ग्रिबॅल यांच्या शराकतीनें चालविलें. नंतर इ. स. १८९१ मध्यें निझाम सरकारांनीं वर्तमानपत्र व प्रेस विकत घेऊन तें बंद पाडिलें.

२ **हैद्राबाद क्रॉनिकल**– बॅ. टेंपलटन एडिटर होते. कांहीं अंक मुंबईहून निघून पुढें बंद पडले. नंतर बॅरिस्टरांना हद्दपार करण्यांत आलें.

३ **डेक्कन पोस्ट**– हैद्राबाद येथील एक प्रसिद्ध बॅरिस्टर. मि. मित्र यांनीं सुरू केलें. मुंबई व नंतर मद्रास येथून प्रसिद्ध होत असे. यांनाही हद्दपार केलें.

४ **हैद्राबाद बुलेटिन**– मेजर कॅमरान यांनीं सिकंद्राबाद ( रेसिडन्सी हद्दींत ) प्रसिद्ध करण्यास सुरवात केली. चालू आहे.

५ **डेक्कन गॅझेट**– आरंभीं हें पत्र मि. ब्राइट यांनीं काढलें. नंतर कांहीं महिने मि. डिसॉंटॉस बॅरिस्टरांकडे होतें.

६ **मुशीर दकन**– दकन पंच ह्या नांवानें आरंभीं हें साप्ताहिक निघालें, नंतर इ. स. १८९२ पासून ह्याचें नांव मुशीरे दकन ठेवण्यांत येऊन तें दैनिक करण्यांत आलें तें १८९८ पर्यंत चालून पुढें बंद झालें. नंतर कांहीं दिवस मद्रास येथून साप्ताहिक निघूं लागलें. त्यानंतर हैद्राबाद ( रेसिडन्सी हद्दींतून ) पुनः दैनिक स्वरूपांत निघालें, पुढें निझाम हद्दींत आलें व तें अद्यापपर्यंत चालू आहे. ह्याचे एडिटर व मालक श्री. कृष्णराव उर्फ बाजीराव हे आहेत.

७ **मजलूम दकन**– मौ. अझी मोद्दीन या पत्राचे एडिटर व मालक होते. ह्यांत अश्लील व मनोभंग करणारे लेख प्रसिद्ध होत असल्यामुळें गव्हर्नमेंटच्या हुकमांनीं तें पत्र बंद करण्यांत आलें. परंतु त्यानंतर तें मुंबईहून निघूं लागलें, हि. स. १३१५ मध्यें एडीटराला हद्दपार करण्यांत आलें म्हणून पत्र बंद पडलें. नंतर इ. स. १८९८ मध्यें तें पत्र पॉंडीचरीहून निघत असे असें समजतें.

**८ जरीदे-एअलामिया**— निझाम गव्हर्नमेंट गॅझेट हें साप्ताहिक प्रथम स. १२७९ फ. मध्यें फार्शी भाषेंत निघूं लागलें, कारण त्यावेळीं सरकारी दफ्तरीं भाषा फार्शीच होती. नंतर जेव्हां दफ्तरी भाषा उर्दू झाली तेव्हां हें उर्दूत निघूं लागलें.

**९ पोलीस गॅझेट**- हें पोलीस खात्यासंबंधीचें साप्ताहिक इन्स्पेक्टर जनरल डिस्ट्रिक्ट पोलीसच्या व्यवस्थेखालीं निघत असतें.

**१० निझाम वैभव**- हें पत्र इ. स. १९०५ मध्यें मराठींत हैद्राबाद येथें के. श्रीपतराव हायकोर्ट वकील यांनीं सुरू केलें. ६ महिने चालून पुढें बंद पडलें.

**११ भाग्येशविजय**- हें मराठी मासिक इ. स. १९०६ मध्यें माजी दयाळू निझाम सरकार नवाब **मीर महबूब अलीखां बहादुर** यांच्या रौप्य ज्युबिलीच्या शुभ प्रसंगाची आठवण म्हणून श्री. रामचंद्र वासुदेव कुळकर्णी ( संपादकांचे बंधू ) यांनी हैद्राबाद येथें सुरू केलें; नंतर इ. स. १९०८ मध्यें महिन्यांतून तीन वेळ प्रसिद्ध होत असे. पुढें संपादकाला वऱ्हाडांत बाळापूर येथें आपल्या आजोळीं दत्तक घेतल्या ठिकाणीं जाऊन रहाणें भाग पडल्यामुळें हें चांगलें मासिक बंद पडलें.

**१२ निझामुल अखबार दकन** हैद्राबादचें ब्रि. रेसिडेंट कर्नल सर रिचर्ड मीड यांनीं ज्या चार वर्तमानपत्रांना आपल्या हद्दीत प्रसिद्ध करण्याची परवानगी दिली होती; त्यांपैकीं एक होतें, हें उर्दू भाषेंत साप्ताहिक निघत असे. हें इ. स. १८७८ ( हिजरीसन १२६५ मध्यें निघून, हि. स. १२९५.) म्हणजे ३० वर्षें चालून बंद पडलें.

**१३ सहीफा**- हें उर्दू मासिक प्रथम हि. स. १३२३ मध्यें हैद्राबाद येथें सुरू होऊन एका वर्षांत बंद पडलें. नंतर मौ. अकबरअली यांचे संपादकत्वाखालीं हि. स. १३२४ मध्यें पुनः कांहीं दिवस निघून पुढें तें **दैनिक** करण्यांत आलें. व अद्यापपर्यंत चालू आहे. ह्याला सरकारी मदत मिळते ( दरमहा ३०० रु. ) या पत्रांत शिक्षणखात्यासंबंधी कांहीं आक्षेपार्ह मजकूर आल्यामुळें त्या खात्याचे डायरेक्टरांच्या तक्रारीवरून हि, स. १३३६ ( इ. स. १९१८ ) मध्यें निझाम सरकाराचें फर्मान निघालें कीं सहीफ्यांतील लेख खोटे असल्यामुळें ६ महिन्या-

करितां त्याची मदत बंद करण्यांत यावी आणि यापुढें काळजीपूर्वक वागण्या-बद्दल तंबी द्यावी.

**१४ निझाम विजय–** हें मराठी साप्ताहिक इ. स. १९२० मध्यें हैद्राबाद येथें सुरू झालें. आतां त्याला सातवें वर्ष लागलें आहे. ह्याचे मालक व संपादक श्री. लक्ष्मण बळवंत फाटक हे आहेत. त्यांचें धैर्य, चिकाटी वाखाणण्यासारखी आहे. ही गोष्ट एवढ्यावरूनच सिद्ध आहे कीं हैद्राबादच्या सध्याचे वातावरणांत निराश न होतां हें पत्र त्यांनीं चालू ठेविलें आहे व सरकारच्या कृपेनें तें अद्याप जिवंत आहे. हें पत्र काढण्यासंबंधीं परवानगी देण्यास निझाम सरकारानीं फक्त चार वर्षें लाविलीं असें म्हणतात. पण उर्दूपत्रांना मात्र सरकारची सढळ हातानें मदत होते. ह्या पत्राला कां होऊं नये ? पत्र जिवंत ठेविलें तर पुरे आहे हीच मोठी मदत झाली. जनतेनें तरी सढळ हातांनीं मदत करणें हें त्यांचें कर्तव्य आहे. कांहीं पुढाऱ्यांची त्याला मदत आहे. सध्या संस्थानांत हें एकच चांगलें असें वृत्तपत्र आहे.

**१५ बेदारी–** ह्या नांवाचें एक उर्दू भाषेंत द्विसाप्ताहिक पत्र काढण्या-बद्दलची परवानगी श्री. राघवेंद्रराव शर्मा हायकोर्ट वकील हैद्राबाद यांना सर-कारांतून मिळाली होती; पण डिसेंबर इ. स. १९२३ मध्यें त्यांची सनद निझाम साहेबांनी फर्मान काढून रद्द केली व त्यांना हैद्राबाद सोडणें भाग पडल्यामुळें पत्र प्रसिद्ध होण्याचा प्रसंगच आला नाहीं.

**१६ रय्यत–**ह्या नांवाचें एक उर्दू साप्ताहिक आक्टोबर इ. स. १९२७ मध्यें हैद्राबाद यंगमेन्स यूनिअनमधील तरुण व उत्साही वकील आंध्रबंधू श्री. एम. नरसिंगराव यांनीं काढिलें आहे. जनतेचे विचार मांडणारें उर्दू भाषेंत असें हें एकच पत्र आहे. संस्थानांतील प्रजेनीं त्याची मदत करणें जरूर आहे. हें पत्र चिरायु होवो.



# पुस्तकांना बंदी.

**खालील पुस्तकांना ( सरकार जमा ) राज्यांत येण्यास बंदी करण्यांत आलेली आहे.**

| नं. | पुस्तकाचें नांव | कर्त्याचें नांव |
|---|---|---|
| १ | शिवाजीचा पोवाडा | कवी दास |
| २ | मनसारामाचा पोवाडा | पांडव |
| ३ | तांत्या भिलाची लावणी | मुरली मनोहर |
| ४ | न्यू इंग्लिश टीचर | यज्ञेश्वर गो. दीक्षित प्र. पुणें. |
| ५ | तानाजी मालुसरे याचा पोवाडा | शंकर सुखपाल |
| ६ | महाराणा प्रतापसिंग | अनंत वामन बर्वे |
| ७ | नरवीर मालुसरे | वि. द. बिवलकर |
| ८ | लोकमान्य टिळक व प्रो. शि. म. परांजपे यांच्यावर इ. स. १९०८ सालीं झालेले राजद्रोहाचे खटले | महादेव नारायण कर्वे |
| ९ | उषःकाल | हरी नारायण आपटे |
| १० | मूर्तिमंत देशाभिमान | वासुदेव गोविंद आपटे |
| ११ | फर्मारवायान इस्लान ( इस्लामी राज्यकर्ते ) | नझीर हुसेन फारुकी |
| १२ | मकासिद हसरत व नझम गिरांमाया | मिर्झा सुलतान अहमद गुरगानी |
| १३ | चोर लालटेन | नझीर हुसेन सखा |
| १४ | बरबाद मुसाफिर | माहिती नाहीं |
| १५ | विश्वासघात | ” ” |
| १६ | अल्लामियांका हुलिया | ” ” |
| १७ | अल्लामियांका फोटो | ” ” |
| १८ | अल्लामियांकी सुन्नत | ” ” |
| १९ | इस्लामी गीतें | ” ” |
| २० | विचित्र जीवन | ” ” |
| २१ | अल्लामिया और शैतानकी झडप | ” ” |
| २२ | कुराण काबिल एतेबार नहीं | ” ” |
| २३ | मिसरुल ऑफ निझाम | रा. डी. राघवेंद्रराव. |

# वर्तमानपत्रांना बंदी.

संस्थानांत निझामसाहेबांनीं खालील वर्तमानपत्रांनां येण्यास बंदी केली आहे. अर्थात् हीं वर्तमानपत्रें कोणीहि आणवूं शकत नाहीं. आणविल्यास तो शिक्षेस पात्र होईल.

| नं. | वर्त. नांव. | कोठें प्रसिद्ध होतें. | नं. | नांव. | कोठें प्र. होतें. |
|---|---|---|---|---|---|
| १ | हितवादी | कलकत्ता | २३ | स्वराज्य उर्दू | लाहोर |
| २ | सोनार भारत | ,, ,, हावरा | २४ | सियासत उर्दू | ,, ,, |
| ३ | भाला | पुणें | २५ | कर्तव्य | ठाणा |
| ४ | काळ | ,, | २६ | संदेश | मुंबई |
| ५ | केसरी | ,, | २७ | हिंदू | मद्रास |
| ६ | हिंदू पंच | ठाणें | २८ | स्वराज्य | ,, ,, |
| ७ | प्रतोद | सातारा | २९ | डेली एक्सप्रेस | ,, ,, |
| ८ | हिंद स्वराज्य | मुंबई | ३० | मराठा | पुणें |
| ९ | विहारी | ,, | ३१ | सर्वंटऑफ इंडिया | ,, ,, |
| १० | विश्ववृत्त | कोल्हापूर | ३२ | ज्ञानप्रकाश | ,, ,, |
| ११ | सिंधी | सक्कर | ३३ | मिलाप उर्दू | लाहोर |
| १२ | राष्ट्रमुख | कुलाबा | ३४ | तेज उर्दू | दिल्ली |
| १३ | स्वराज्य | सोलापूर | ३५ | अमृतबझार पात्रि. | कलकत्ता |
| १४ | अरुणोदय | ठाणे | ३६ | ट्रिब्यून | लाहोर |
| १५ | देशसेवक | नागपूर | ३७ | इंग्लिशमन | कलकत्ता |
| १६ | कर्तव्य | उमरावती | ३८ | रियासत | दिल्ली |
| १७ | स्वावलंबन | अकोला | ३९ | हिंदुस्थान टाइम्स | ,, ,, |
| १८ | बारिसालहितैषा | बारिसाल | ४० | जमीनदार | लाहोर |
| १९ | पूर्व बंगाल | ढाका | ४१ | आर्यामुसाफिर | आग्रा |
| २० | इंडिया | पांडीचरी | ४२ | मुखबिरदकन | मद्रास |
| २१ | पंजाबी | लाहोर | ४३ | गुरुघंटाल | लाहोर |
| २२ | हिंदुस्थान उर्दू | लाहोर | | | |

# निझामांच्या खासगीचा ( सर्फेखास ) जमाखर्च.

## जमा.

| उत्पन्नाची बाब. | स. १३३६ फ. ( इ. स. १९२६ –२७ ) मधील उत्पन्न. |
|---|---|
| सर्फेखासचे तालुके ( मुफवेजा दिवाणी ) जे सरकारी व्यवस्थेखालीं आहेत त्यांचें उत्पन्न वार्षिक– | ( ५०००००० ) पन्नास लक्ष |
| बागा व तालुके वगैरेंचें इतर उत्पन्न | ९२३८२९६ ब्याण्णव लक्ष |
| हैद्राबाद शहरच्या करोडगिरी (कस्टम) व आबकारीचें उत्पन्न | १५००००० पंधरा लक्ष |
| अत्राफ बलद्याचें ( सर्फेखासच्या तालुक्याचें ) उत्पन्न | १४१२३९९ चौदा लक्ष |
| एकूण | १७१५०६९५ |

| बाब खर्च | संख्या. |
|---|---|
| सर्फेखासचा एकंदर खर्च | ८०२६३१२ ऐशी लक्ष |
| अत्राफ बलद्याचा खर्च | ७१९१२३ सात लक्ष |
| एकूण | १७१५०६९५ |

एकूण जमा—१७१५०६९५
एकूण खर्च— ८७४५४३५ = शिल्लक = ८४०५२६०

## कांहीं संस्थांना वार्षिक मदत.

( स. १३३९ फ. इ. स. १९२६,२७ मधील )

वार्षिक–महिबूब आलम एडीटर पैसा अखबारलाहोर २३३४ रु. यांनी पल्या पत्रांत संस्थानाविरुद्ध कांहीं लिहूं नये, या अटीवर दिले जातात.

खाजा कमालोद्दीन महामेडन मिशनरी २८०० रु. हे इंग्लंडांत राहून इस्लामी धर्माचा प्रचार करीत असतात.

इतर सर्व मिळून एकंदर---२०८९२
अनियमित —१६८००
वर्तमानपत्रांना तुकडे —२७२८४

एकंदर —६४९७६

## हैद्राबाद संस्थानांतील राज्यकर्ते.

| नं. | नांव. | आयुष्य. | किती वर्षें राज्य केलें. |
|---|---|---|---|
| १ | नबाबमीर कमरोद्दीन खां फत्तेहजंग निझामुलमुल्क आसफजाह ( पहिले ) | ७९ | २८ |
| २ | नवाबमीर अहमदखां नासिरजंग निझामुद्दोला | ४० | २ वर्षें ७ महिने |
| ३ | नबाब हिदायत मोहियोद्दीन खां मुजफ्फरजंग | | २ |
| ४ | नवाब सय्यमहम्मद खां सलाबत जंग आसफुद्दोला अमीरुल मुमालिक | | ११ वर्षें ८ महिने |
| ५ | नवाब मीर निझाम अलीखां फत्तेहजंग निझामुद्दोला निझामुलमुल्क आसफजाह ( दुसरे ) | ७१½ | ४२ व. ४ म. |
| ६ | नवाब सिकंदर जाहमीर अकबर अलीखां आसफजाह ( तिसरे ) | ६२ व. ४ म. | २६ व. ६ म. |
| ७ | नवाब नासिरुद्दोला मीर फरखुंदा अलीखां आसफजाह ( चौथे ) | ६४ व. ११ म. | २८ व. १० म. |
| ८ | नवाब अफजलुद्दोला मीर तहनियत अलीखां आसफजाह ( पांचवे ) | ४२ व. ७ म. | १२ व. १ म. |
| ९ | नवाब मीर महबूब अलीखां निझामुलमुल्क आसफजाह ( सहावे ) | ४७ | ४५ |
| १० | नवाब मीर उस्मान अलीखां निझामुलमुल्क आसफजाह ( सातवे ) | हयात | १५ चालू |

## संस्थानांतील ( मिनिस्टर ) दिवाण

निझामांचें राज्य दक्षिणेंत संस्थापन होऊन दोनशें वर्षे झालीं; तेथें आज-पर्यंत जे दिवाण झाले त्यांची माहिती खालीं दिली आहे.

| | नांव | कारकीर्द वर्षे | | नांव | कारकीर्द वर्षे |
|---|---|---|---|---|---|
| १ | राजा रघुनाथदास | २ | १३ | सयफ जंग | १ महिना |
| २ | सय्यद लष्करखान | ३ | १४ | नवाब षमसुल उमरा कमरीरुद्दीनखां | |
| ३ | शाह नवाजखान | ३ | १५ | राजाराम बखष | कांहीं महिने |
| ४ | नबाब सलाबत जंग | ३ | १६ | नवाब सिराजुल मुल्क ( पुनः दिवाण झाले ) | २ वर्षें |
| ५ | राजा प्रतापवंत ऊर्फ-विठ्ठल सुंदर | | १७ | नबाबसर सालारजंग | ३० वर्षें ७ म. |
| ६ | सय्यद लष्करखान-( पुनः दिवाण झाले ) | ११½ | १८ | महाराजा नरेंद्र बहादुर | १ महिना |
| ७ | नबाब सुमसामुल मुल्क | ३ | १९ | नवाबमीर लायक अली खां (सालरजंग दुसरे) | ३ वर्षे २ म. |
| ८ | अरस्तू जाह | २३¼ | २० | नबाबसर आसमान-जाह | ६½ वर्षे |
| ९ | मीरआलम सय्यद-अबुल कासिम | ४½ | २१ | नबाबसर विकारुल-उमरा | ८ वर्षें |
| १० | नबाब मुनीरुल मुल्क | २३½ | २२ | महाराजा सर कृष्ण-प्रसाद | १२ वर्षें |
| ११ | राजा चंदुलाल | ११ | २३ | नवाबसालर जंग ( तिसरे ) | २ वर्षें |
| १२ | नबाब सिराजुलमुल्क | २ | | | |

नवाब सालारजंग ( तिसरे ) यांनीं दिवाणपदत्याग केल्यावर कोणीही दिवाण न नेमतां स्वतः निझामसाहब मीर उस्मान अलीखां ( सध्याचे ) हे सुद्ध दिवाणाचें काम ५ वर्षे पर्यंत करीत व राज्यकारभार पहात.

असत व दिवाणाचा पगार म्हणून दरमहा दहा हजार उचलीत असत. अशा रीतीनें ६ लक्ष रुपये त्यांनी माठ्या युक्तीनें खिशांत टाकिले! पण शेवटीं एवढ्या मोठ्या राज्याचे महत्त्वाच्या कामाचा बोजा असह्य होऊन त्यांनी राज्यघटनेची नवीन-व्यवस्था करून ( बाबे हुकूमत ) एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलची इ. स. १९१९ मध्यें स्थापना केली, आणि दिवाणांचे ऐवजीं आतां संस्थानांत ह्या कार्यकारी कौन्सिलचा अध्यक्षच मुख्य प्रधान समजला जातो व त्याला सदर, इ, आझम, असें नांव देण्यांत आलें आहे.

## संस्थानांतील जाहगिरदारांची संख्या.

ह्या संस्थानांत एकंदर ११६७ जाहगीरदार असून त्यांत हिंदू ६३२, मुसलमान ५३४, व एक पार्शी आहे.

| नं. | वार्षिक उत्पन्न. | हिंदू. | मुसलमान. | एकूण. | १ पार्शी. |
|---|---|---|---|---|---|
| १ | ज्यांचे उ. वार्षिक १० रु. पासून ५०० पर्यंत | १०० | ४२ | १४२ | |
| २ | ,, ,, ,, ५०० पासून १००० | १०९ | ४२ | १५१ | |
| ३ | ,, ,, ,, १००० ते ३००० | २४१ | १६१ | ४०२ | |
| ४ | ,, ,, ,, ३००० ते ५००० | ६५ | ७३ | ३७ | |
| ५ | ,, ,, ,, ५००० ते ६००० | २५ | २२ | ४७ | |
| ६ | ,, ,, ,, ६००० ते १०००० | २९ | ७२ | १०१ | |
| ७ | ,, ,, ,, १०००० ते १२००० | १० | २३ | ३४ | १ पार्शी |
| ८ | ,, ,, ,, १२००० त २५००० | २० | ५५ | ७५ | |
| ९ | ,, ,, ,, २५००० ते ५ ००० | २० | २४ | ४४ | |
| १० | ,, ,, ,, ५०००० ते १००००० | ६ | ९ | १५ | |
| ११ | ,, ,, ,, एक लक्षावरील | ७ | १२ | १९ | |

## पदव्या

१– संस्थानांत माजा निझामसरकार मीर महबूब अलीखां यांच्या कारकीर्दींत ज्या लोकांना पदव्या देण्यांत आल्या त्यांची एकंदर संख्या ३६५ आहे त्यांचा तपशील पुढें दिला आहे.

खान १, खानबाहादुर ३४, जंग १७६, दौला ३१; मुल्क ३०, खान दौरान व खानखानान २, सलतनत २, उमरा २, अमीर कबीर व अमीरअकबर २, जाह १, उलेमा ५, हुकमा १७, राजा ७, राजा बाहादुर १८, पाल २, वंत १२, महाराज १, राणी १ इतर,

२– सध्याचे निझामांच्या ( मीर उस्मान आलीखां ) कारदीर्दीत एकंदर १०१ इसमांना पद्व्या देण्यांत आल्या त्यांचा तपशील–७६ जंग, १२ जाह, ५ राजा बाहादुर, ३ महाराज, २ दौला, २ मुल्क, वंत १,

एकूण पदवीवाल्यांची संख्या ४६६ आहे. त्यांत हिंदु ५१, पार्शी ३, ४१२ मुसलमान आहेत.

ह्या पदवीवाल्यांमध्यें बहुतेक सर्व सरकारी अधिकारीच जास्त असून जाहगिरदार, व्यापारी, निझामांचे आप्त इष्ट, खाजगी नोकर, हेही आहेत. ह्या संस्थानांत पद्व्या द्यावयाला कोणत्याही विशिष्ट अशा लोकोत्तर अर्थात लोकोपयोगी गुणांची अवश्यकता मुळींच नाहीं. वाटेल त्याला वाटेल त्या पद्व्या त्यांच्या योग्यायोग्यतेकडे लक्ष न देतां व बहुजन समाजांत त्या माणसाची कितपत किंमत आहे याची पर्वा न करतां देण्यांत येतात. पदवीवालेच लोक ही गोष्ट पूर्णपणें ओळखून आहेत कीं त्यांच्या ह्या पद्व्यांची संस्थानांत व इंग्रजी इलाख्यांत काय किंमत आहे ? बहुजन समाज एखाद्या व्यक्तीस केवळ त्याच्या आगंतुक पदवीमुळें मोठा समजत नसून त्याच्या आंगच्या सद्गुणांवरूनच त्याला ओळखतात. ही गोष्ट पदवीवाले व निझाम सरकार यांनी लक्षांत ठेवावी व ह्यापुढें पद्व्यांची खैरात गुणांत विचार करून काळजीपूर्वक करण्यांत येईल अशी आशा आहे.



## अस्पृश्य वर्गाची संख्या

| | महार | मांला | मदिगा | मांग | चांभार |
|---|---|---|---|---|---|
| इ. स. १९११ | ६८९५४३ | ४४८०४६ | ८०४३९३ | ३४०९५९ | ७०६१८ |
| इ. स. १९२१ | ४९४३१६ | ३७५७४८ | ६६९२०३ | ३३०८४० | ११३५३४ |

## ख्रिस्ती लोकांची एकंदर संख्या

| सन. इ. | एकंदर | युरोपियन | युरेशियन | देशी ख्रिस्ती |
|---|---|---|---|---|
| १८८१ | १३६१४ | ४०१६ | १९५६ | ७९४२ |
| १८९१ | २०४२९ | ५२६१ | २५०७ | १२६६१ |
| १९०१ | २२९९६ | ४३४७ | ३२९२ | १५३५७ |
| १९११ | ५४२९६ | ५३८४ | ३००४ | ४५९०८ |
| १९२१ | ६२६५६ | ५६५४ | २२३७ | ५६७२९ |

## सरकारी नोकऱ्या.

स. १२९६ ते १३३५ फ. पर्यंत (गेल्या ४० वर्षांत) सरकारी अधिकाराच्या जागेवर हिंदु मुसलमानांची कशा रीतीनें वाढ होत आहे हें खालीं दिलें आहे.

| नं. | स. फ. | हिंदू | | मुसलमान | | पार्शी | | इंग्रज, व ख्रिस्ती | | एकूण इसम |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | इसम | पगार | इसम | पगार | इसम | पगार | इसम | पगार | |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ |
| १ | १२९६ | ६१ | २८२७२ | २८२ | १२३९२३ | ३८ | १६३६० | ६० | ४२१५८ | ४४१ |
| २ | १३०३ | ६५ | २५१८९ | ३८३ | [illegible]५४६७ | ४१ | १७२६२ | ८६ | ५३३११ | ५७५ |
| ३ | १३१० | ७८ | २९५९२ | ६१६ | १९४६२० | ४६ | १७८९७ | ८८ | ६४९६९ | ८२८ |
| ४ | १३२१ | ९२ | ५४०७५ | ४६५ | १७०४२० | ४४ | २०३६० | ९८ | ७०२८९ | ६९९ |
| ५ | १३२४ | ९२ | ४२१९७ | ५१८ | २१९१३२ | ४४ | १९६६५ | १११ | ७७५५५ | ७६५ |
| ६ | १३२८ | १३१ | ६३१८० | ५६४ | २५३४४२ | ३३ | १८८३२ | ८५ | ६८४१४ | ८१६ |
| ७ | १३३१ | १६१ | ८२८७८ | ६५९ | ३५६१५१ | २६ | १३८६० | ६२ | [illegible]९१६१ | ९०८ |
| ८ | १३३४ | १८४ | ९४९६८ | ७७२ | ३९९९१४ | ४१ | २१९८० | ६४ | ५७१४१ | १०६१ |
| ९ | १३३५ | १७५ | | ७५२ | | | | | | १०२१ |

## स्यालरी कमिशन.

स. १३० मध्यें अधिकारी वर्ग व नौकरांच्या पगारवाढीसंबंधीं नेमलेल्या स्यालरी कमिशनचा रिपोर्ट सरकारांनीं मंजूर केला त्यामुळें खर्च वाढला व पूर्वीं किती होता हें खालीं दाखविलें आहे.

| पूर्वीं व आतां | अधिकारी वर्गाचा खर्च रु. | नोकर वर्गाचा खर्च रु. |
|---|---|---|
| स. १३३० पूर्वींचा खर्च | ३५९३७३२ | १०६६८५६९ |
| कमिशनमुळें वाढलेला सध्यांचा खर्च | ४२४९६८६ | १५७१२०७५ |

अधिकारी वर्गाच्या खर्चांत ६५६७५४ ची व नोकर वर्गाच्या खर्चांत ५०४३५०५ रु.ची वाढ झाली. एकूण ५६९९२५९ रु. वार्षिक खर्च जास्त अशा रीतीनें संस्थानांतील एकंदर नोकरांकरितां एकंदर १५७३२०७५ रु. दरवर्षी खर्च होतो.

## शिक्षण

इ. स. १८८१ ते इ. स. १९२१ ह्या चाळीस वर्षांत प्रत्येक खानेसुमारीचे वेळीं दर दहा वर्षांत शिक्षणाच्या बाबतींत हिंदू मुसलमानांची कितपत प्रगती झाली हें खालीं दिलें आहे.

### हिंदू

| सन | पुरुष | | स्त्रिया | | एकूण |
|---|---|---|---|---|---|
| | शिक्षित | अशिक्षित | शिक्षित | अशिक्षित | |
| इ. स. १८८१ | २६२६१७ | ४२५५१९५ | १८८९ | ४३७३४८० | ८८९३१८१ |
| ,, ,, १८९१ | ३४०१५८ | ४९०५८१३ | ५३१७ | ५०६२९६१ | १०३१५२४९ |
| ,, ,, १९०१ | २४०८१० | ४८८३३९२ | ९४७५ | ४८३७१६२ | ९८७०८३९ |
| ,, ,, १९११ | २६४५७८ | ५६३२५८० | ११२२८ | ५७१७७६० | ११६२६१४६ |
| ,, ,, १९२१ | २२३६८७ | ५१८२९०६ | १७३१५ | ५२३२५४४ | १०६५६४५३ |

### मुसलमान

| सन | पुरुष शिक्षित | पुरुष अशिक्षित | स्त्रिया शिक्षित | स्त्रिया अशिक्षित | एकूण |
|---|---|---|---|---|---|
| इ. स. १८८१ | ४४५२३ | ४२४९२३ | १२२९ | ४५५२५४ | ९२५९२९ |
| ,, ,, १८९१ | ६४६४० | ५१६८७६ | ५३०७ | ५५२१३३ | ११३८६६६ |
| ,, ,, १९०१ | ५७२९४ | ५३२९३६ | ५८१६ | ५५९७०४ | ११६५७५० |
| ,, ,, १९११ | ८९४७५ | ६३४०३८ | ८८०५ | ६६५६९२ | १३८०९९० |
| ,, ,, १९२१ | ८२४१४ | ५८१६०८ | १९५९९ | ६१४६५६ | ११९८२७७ |

# वकिलांची जिल्हेवार संख्या.

( स. १३२९ फसली मधील )

| ठिकाण | | दर्जे अव्वल | | | | दर्जे दुयम | | | | दर्जे सुवम | | | | एकूण | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | हिंदु | मुस. | इत. | एकूण | हिंदु | मु. | इ. | एकूण | हिंदु | मुस. | इ. | एकू. | हिंदु | मुस. | इत. | एकूण |
| हैद्राबाद | वकील | ५५ | १३३ | ८ | १९६ | २७ | ४१ | ० | ६८ | ३२ | १२६ | ० | १५८ | ११४ | ३०० | ८ | ४२२ |
| | बॅरिस्टर | ४ | ७ | ३ | १४ | ० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० | ४ | ७ | ३ | १४ |
| एकूण | | ५९ | १४० | ११ | २१० | २७ | ४१ | ० | ६८ | ३२ | १२६ | ० | १५८ | ११८ | ३०७ | ११ | ४३६ |
| औरंगाबाद | | ८ | ६ | ० | १४ | ९ | १३ | ० | २२ | ३८ | ४८ | ० | ८६ | ५५ | ६७ | ० | १२२ |
| बीड | | २ | २ | ० | ४ | ५ | ० | ० | ५ | ७५ | १८ | ० | ९३ | ८२ | २० | ० | १०२ |
| परभणी | | २ | १ | ० | ३ | ४ | १ | ० | ५ | ६८ | ३६ | ० | १०४ | ७४ | ३८ | ० | ११२ |
| नांदेड | | १ | १ | ० | २ | ७ | ३ | ० | १० | ३५ | ३१ | ० | ६६ | ४३ | ३५ | ० | ७८ |
| गुलबर्गा | | १२ | ६ | ० | १८ | २८ | ९ | ० | ३७ | ४५ | ३२ | ० | ७७ | ८५ | ४७ | ० | १३२ |
| रायचूर | | ५ | ५ | ० | १० | १७ | ३ | ० | २० | ४९ | २० | ० | ६९ | ७१ | २८ | ० | ९९ |
| उस्मानाबाद | | २ | २ | ० | ४ | ३ | १ | ० | ४ | ५८ | १२ | ० | ७० | ६३ | १५ | ० | ७८ |
| बेदर | | ३ | ३ | ० | ६ | १० | ३ | ० | १३ | ५७ | ३५ | ० | ९२ | ७० | ४१ | ० | १११ |

| ठिकाण | दर्जे अव्वल | | | | दर्जे दुयम | | | | दर्जे सुवंम | | | | एकूण | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | हिंदु | मुस. | इत. | एकूण | हिंदु | मु. | इ. | एकूण | हिंदु | मुस. | इ. | एकू. | हिंदु | मुस. | इत. | एकूण |
| मेदक | १ | ४ | ० | ५ | ० | ० | ० | ० | १० | ११ | ० | २१ | ११ | १५ | ० | २५ |
| निझामाबाद | २ | १ | ० | ३ | ० | २ | ० | २ | २६ | ११ | ० | २७ | २८ | १४ | ० | ४२ |
| महबूब नगर | १ | १ | ० | २ | ० | १ | ० | १ | ५ | १७ | ० | २२ | ६ | १९ | ० | २५ |
| नलगुंडा | १ | ० | ० | १ | ० | १ | ० | १ | ७ | १२ | ० | १९ | ८ | १३ | ० | २१ |
| वरंगल | ३ | ६ | ० | ९ | १३ | २ | ० | १५ | २८ | १६ | ० | ४४ | ४४ | २४ | ० | ६८ |
| करीम नगर | ० | १ | ० | १ | २ | ० | ० | २ | १० | २० | ० | ३० | १२ | २१ | ० | ३३ |
| आदिलाबाद | १ | ० | ० | १ | ० | १ | ० | १ | १६ | १२ | ० | २८ | १७ | १३ | ० | ३० |
| अतराफ बल्दा | १ | ० | ० | १ | ० | ० | ० | ० | ७ | ९ | ० | १९ | ८ | ९ | ० | १७ |
| एकूण जिल्हे | ४९ | ३९ | ० | ८४ | ९८ | ४० | ० | १३८ | ५३४ | ३४० | ० | ८७४ | ६७७ | ४१९ | ० | १०९६ |
| एकूण संस्थान | १०४ | १७९ | ११ | २९४ | १२५ | ८१ | ० | २०६ | ५६६ | ४६६ | ० | १०३२ | ७९५ | ७२६ | ११ | १५३२ |

एकंदर वकील १५३२ ७९५ हिंदु, ७२६ मुसलमान, ११ इतर

# गुरांची संख्या

संस्थानांतील एकंदर गुरें, नांगर, व गाड्यांची संख्या खालीं दिली आहे.

| नं. | गुरांचे प्रकार | सन. १३२९ फ. | सन. १३३४ फ. |
|---|---|---|---|
| १ | सांड | ७१२६५५ | ५३२३०३ |
| २ | बैल | ४०३७४९४ | ३२१३३२७ |
| ३ | गायी | २५६५१७३ | २३४५४३४ |
| ४ | बछडे ( कालवडी ) | २३५८६८२ | २१७२९७१ |
| ५ | रेडे | ५५३१३३ | ४५२८६० |
| ६ | म्हशी | ११८८८२४ | १०१८९४८ |
| ७ | बछडे ( म्हशीचे ) | ९०२८५० | ९११०२२ |
| ८ | बकरी | ४८२५६४८ | ४७६८८२७ |
| ९ | शेळ्या | २१२७५२९ | ३६२२०६७ |
| १० | घोडे | ७४९६६ | ५५७१८ |
| ११ | घोड्या | ७५०४१ | ५८३१२ |
| १२ | बछडे ( घोड्याचे ) | ३१४८७ | २३७०६ |
| १३ | खेचरें | १९२७ | १४९७ |
| १४ | गाढव | ८३४६९ | ७०९८३ |
| १५ | उंट | २३५७ | १७३८ |
| १६ | नांगर | ११९७२११ | ११९८१८५ |
| १७ | गाड्या | ४०६६२८ | ४७३६७५ |



## स. १२६३ फ. पासूनचें संस्थानचें उत्पन्न

पहिल्या सर सालारजंग दिवाणांच्या कारकीर्दीस फ. स. १२६३ पासून सुरवात झाली व स. १२८८ फ. पासून बजेट तयार होऊं लागलें.

| सन फ. | उत्पन्न | खर्च |
|---|---|---|
| १२६३ | १८१४०४७ | समजला नाहीं |
| १२७० | १८०६४०६३ | ,, ,, |
| १२७५ | २८४९९४१९ | ,, ,, |
| १२८० | २८६५४३१४ | स. १२८७ मधील |
| १२८५ | ३९५६१८९५ | ४९५३७२५१ |
| १२९० | ४१७००८९२ | ४१७००८९२ |
| १२९५ | ४९५३०४९१ | ४९५३०४९१ |
| १३०० | ५७८५४६६२ | ६७८५४६६२ |
| १३०५ | ८३२७६२०७ | ८३२७६२०७ |
| १३१० | ८२४८३९०५ | ८२४८३९०५ |
| १३१५ | १०२०७१४८६ | १०२०७१४८६ |
| १३२० | १०३७००४९४ | ८०८५५८७७ |
| १३२५ | ७४१७३१९७ | ६९३५१३९९ |
| १३३० | ६४८१७६७० | ६४०१४३६५ |

# हैद्राबाद कायदे कौन्सिलच्या सुधारणेची योजना

जी

" हैद्राबाद स्टेटरिफॉर्म असोसिएशननें तयार करून इ. स. १९२४ मध्यें "

निझाम सरकार व कार्यकारी कौन्सिलकडे सादर केली.

# हैद्राबाद कायदे कौन्सिलच्या सुधारणेची योजना.

## उपोद्घात.

ता. १४ जमादी–उल–अव्वल स. १३३८ हिजरी रोजीं H. E. H. निजामसाहेब यांनीं कृपाळू होऊन खालील आशयाचें एक फर्मान काढलें:—

ता. २२ सफर सन १३३८ हिजरी रोजीं आम्ही फर्मानानें संस्थान मजकुरीं आमच्या राज्याचा कारभार जास्त कार्यक्षम व्हावा या हेतूनें कार्यकारी कौन्सिलची स्थापना केली होती आणि त्याच फर्मानमध्यें हल्लीं अस्तित्वांत असलेलें कायदे-मंडळ त्यांत मागें पुढें सुधारणा होईपर्यंत आहे या नियमाबरहुकूम काम करीत राहील असेंहि जाहीर केलें होतें. आमच्या परमपूज्य वडिलांनीं संस्थानमजकुरीं ज्या कांहीं सुधारणा केल्या त्यांत कायदे मंडळाची स्थापना ही एक बाब विशेष होती. हें कायदेमंडळ अस्तित्वांत आल्यापासून यांत कांहीं चालचलाऊ किरकोळ सुधारणा करण्यांत आल्या आहेत; परंतु त्या नवीन बदललेल्या परिस्थितीस अनुरूप अशा नाहींत अगर आमच्या प्रिय प्रजाजनांच्या इच्छा–आकांक्षा फलद्रूप होऊन त्यांना उन्नतीच्या मार्गावर लौकर नेतील अशाही स्वरूपाच्या नाहींत असें आम्हांस वाटतें. कार्यकारी कौन्सिलला हल्लीं जें स्वरूप देण्यांत आलें आहे त्यावरून राज्यकारभार जास्त कार्यक्षम होईल असें वाटतें. व त्याप्रमाणें आरंभही बरा झाला असून हल्लीं जी कामाची पद्धत आहे त्यावरून जो मार्ग आम्हीं स्वीकारला त्याचा चांगुलपणा दिसून येईल. यापुढें आम्हांस संस्थानांत ज्या सुधारणा कराव्याशा वाटतात त्या बाबतींत आम्हीं एक योजना मनांत आणली आहे आणि त्या योजनेप्रमाणें अधिकारी मंडळाचें क्षेत्र जास्त वाढून कायदे मंडळाची जास्त व हितकर वाढ होऊन तें जास्त उपयोगी कसें होईल याची आमूलाग्र चौकशी करावी असें ठरविलें आहे. म्हणून वरील ध्येयसिद्धीकरतां आम्ही या फर्मानाचे द्वारें असें फर्मावितों कीं सदर–इ–आझम सर अल्ली इमाम यांनीं वरील कामासाठीं शक्य तितकी लौकर माहिती गोळा करून सादर करावी. म्हणजे पुढें त्याप्रमाणें योजना करण्यास बरें पडेल. व ही चौकशी सुरू करतांना लोकांची

सामाजिक व शैक्षणिक प्रगति किती आहे याकडे लक्ष्य देऊन पुढील गोष्टींचा त्यांत विचार करावा असें आमचें मत आहेः—

( १ ) जास्त प्रमाणांवर निवडणूकीच्या तत्वाचा अंगिकार.

( २ ) प्रत्यक्ष मतदान पद्धत

( ३ ) सर्व वरिष्ठ ज्ञातींतील लोकांतर्फें निवड

( ४ ) अल्पसंख्यांकांच्या हक्कांचें संरक्षण

( ५ ) मतदानाच्या अटी

( ६ ) अधिकारी वर्गाचा समावेश

( ७ ) अधिकार व कार्यें.



या फर्मानावरून पुन्हां असेंही फर्माविण्यांत येतें कीं सद्र-इ-आजम यांनीं एक चौकशी कमेटी नेमून तिचें अधिकारी मंडळ नेमण्याचा अधिकार देण्यांत आला आहे. या कमेटीनें वर सांगितलेल्या पद्धतीनें सांगोपांग चौकशी करून वरील गोष्टी साध्य होण्यास कशा प्रकारची योजना अमलांत आणावी याबद्दल सविस्तर रिपोर्ट कार्यकारी कौंसिलकडे अगोदर करावा व नंतर कार्यकारी कौन्सिलचें मत घेऊन त्यावर आम्हांस जो कांहीं हुकूम करावयाचा तो करूं."

हें फर्मान निजामसाहेबांनीं काढून हैद्राबादच्या इतिहासांत एका नवीनच मनूचा प्रारंभ केला असें मात्र कोणीही समजूं नये. माजी निजामसाहेब व त्यांचे दिवाण यांनीं या संस्थानचा कारभार प्रगतिपर होण्याकडे जसें लक्ष्य पुरविलें होतें व त्यास अनुसरून ज्या सुधारणा संस्थानांत केल्या होत्या त्यांचाच पुरस्कार निजामसाहेबांनीं हें फर्मान काढून केला आहे.

इ. स. १८८३ मध्येंच सरकारांनीं खालीलप्रमाणें जाहीर केलें होतें.

" संस्थानच्या राज्यकारभारांत सरदारांच्या मुलांनीं व त्यांतल्यात्यांत **जनतेनें** भाग घ्यावा असें सरकारचें मत आहे व त्याप्रमाणें त्यांना शिक्षणही देण्यांत यावें असें सरकारांस वाटतें." आणि याच ध्येयास अनुसरून परिस्थितीनुरूप राज्याचा कारभार चालविला गेला व जात आहे पण अपेक्षेच्या मानानें प्रगति कांहीं जास्त झाली नाहीं. हल्लीं अस्तित्वांत असलेलें कायदे-

कौन्सिल प्रथम इ. स. १८०२ सालीं माजी दिवाण सर **सालरजंगांचे** कारकीर्दींत स्थापन झालें. त्यावेळीं माजी निजामसाहेबांनीं संस्थानचा राज्यकारभार कार्यक्षम व्हावा म्हणून कांहीं नियम "कानूनचे मुबारक" म्हणून प्रसिद्ध केले आहेत. आणि याच नियमानुसार कॅबिनेट व कायदेकौन्सिल निर्माण झालें. गेल्या ३३ वर्षांत जे कायदेकानू अस्तित्वांत आले आहेत त्यांस हीच संस्था जबाबदार आहे. आणि याच कायदेकौन्सिलची घटना जास्त लोकप्रिय व्हावी अशी हल्लींच्या निझामसाहेबांची उत्कट इच्छा आहे. लोकांनीं चळवळ केल्यामुळें संस्थान मजकुरीं असें फर्मान निजामसाहेबांनीं काढलें असा समज होण्यापेक्षां राजकर्त्यांनीं आत्मस्फूर्तीनें अशा प्रकारचें फर्मान काढून आपला उद्देश जाहीर केला अशी सर्वांची समजूत होईल तेव्हांच अशा फर्मानाचें महत्त्व असतें हें ध्यानांत येईल.

वर निर्दिष्ट केलेल्या फर्मानास अनुसरून सद्र–इ–आझम यांनीं हायकोर्टाचे अनुभवी व लोकप्रिय माजी न्यायाधीश राय **बालमुकुंद** बी. ए. यांनीं लोकांच्या स्थितीची चौकशी करून रिपोर्ट करावा म्हणून त्यांना या कामगिरीवर नेमलें. व त्यांचेकडून जो रिपोर्ट येईल त्यावरून निजाम साहेबांच्याकडे योजना सादर करावी असें ठरलें. या विशिष्ट कामाकरितां नेमलेल्या अधिकाऱ्यांनीं दीड वर्ष खपून सक्त मेहनत घेऊन सर्व तऱ्हेची चौकशी करून सद्र–इ–आझम यांचेकडे आपला रिपोर्ट सादर केला. आणि याच अवधींत आमचें "**हैद्राबाद संस्थान सुधारणा मंडळ**" अस्तित्वांत आलें. या मंडळाचा मूळ उद्देश लोकांना या राजकीय प्रश्नाची माहिती देणें व सरकारला या सुधारणा लौकर अमलांत आणण्यास मदत करणें हा आहे, हें येथें नमूद करणें अवश्य आहे. परंतु कांहीं आकस्मिक कारणानें आमच्या मंडळास ( संघास ) कांहींच करणें शक्य झालें नाहीं व सरकारही तूर्त स्वस्थ बसल्याचें निदर्शनास आलें. हा जो विलंब झाला तो सरकार आपल्या जाहीर केलेल्या ध्येयापासून परावृत्त झालें असें नसून या कार्यसिद्धीच्या मार्गांत इतर अडथळे उत्पन्न झाले यामुळें हें सरकारचें काम थंडावलें. हे इतर अडथळे कां व कसे आले याचें विवेचन करण्याचें हें स्थळ नाहीं. पुन्हां अलीकडे आपल्या मंजुरीकरतां कांहीं निश्चित योजना तयार करून पाठवाव्या म्हणून दुसरी एक कमेटी निझाम साहेबांनीं

नेमली. त्या कमेटींत नबाब निझामत जंग बहादूर, नबाब हैदर नवाझजंग बहादूर, नबाब तिलावत जंग बहादूर आणि दिवाण बहादूर जी. कृष्णमाचार्य या गृहस्थांचा समावेश करण्यांत आला होता. कमेटीनें आपल्या कामास नेटानें सुरुवात केल्याचें दिसत आहे. सरकार संस्थानामध्यें राज्यकारभार सुधारण्याची घटना निश्चित करीत असतांना लोक उदासीन राहून सरकरला या कामीं बिलकुल मदत करीत नाहींत असा एक आपेक्ष लोकांवर नेहमीं करण्यांत येत असे. परंतु हा आक्षेपच अगदीं निराधार होता हें येथें स्पष्ट सांगितलें पाहिजे. कारण लोकांतर्फे काय काय मागणें आहे व कसकशा सुधारणा पाहिजेत याबद्दल विचारविनिमय होऊन एक निश्चित घटना तयार करण्याचे उद्देशानें राजकीय परिषद् भरविण्याची परवानगी द्यावी म्हणून एक शिष्टमंडळ सद्र–इ. आझम यांचेकडे दोन वर्षें सारखें हेलपाटे घालीत बसलें होतें. परंतु अर्थातच अशा तऱ्हेची परवानगी नाकारण्यांत आली. म्हणून प्रजा-पक्षीय लोकांतर्फे कांहींच प्रत्यक्ष काम करण्यांत आलें नाहीं. परंतु निरनिराळ्या ठिकाणीं परिषदा भरवून निजाम साहेबांना त्यांनीं काढलेल्या जाहीरनाम्याची त्यांना वारंवार आठवण देण्याची कामगिरी मात्र केली! कोणत्याही तऱ्हेच्या राजकीय सभेस बंदी करणारें फर्मान कायम होतेंच, तेव्हां आमच्या संघास कांहींच काम करतां आलें नाहीं यांत नवल नाहीं. वरील प्रकारची राजकीय परिषद् बोलावण्यास परवानगी मिळावी म्हणून होम सेक्रेटरीकडे बराच पत्र-व्यवहार संघानें केला; परंतु कोणत्या ना कोणत्या तरी निमित्तानें परवानगी देण्याचें अधिकाऱ्यांनीं टाळलें व आजवर ही परिषद् भरविण्याची परवानगी दिली जात नाहीं. राजकीय गोष्टींविषयीं चर्चा करणारें एकही स्थानिक वर्त-मानपत्र नाहीं त्यामुळें या विषयाचा ज्यांनीं अभ्यास केला आहे त्यांचीं मतें काय आहेत हें समजण्यास मार्ग नाहीं. तेव्हां वरील गोष्टींवरून या मंडळानें राजकीय सुधारणांचा हप्ता मिळविण्यास कसकसे प्रयत्न केले व ते कसे निष्फळ झाले याची चांगली कल्पना येईल.

निजामसाहेबांनीं जी दुसरी नवीन कमिटी नेमल्याचें वर सांगितलें त्या-बद्दल आम्ही एक सभा भरवून सार्वजनिक रीतीनें निजामसाहेबांचे आभार मानले. व जी सुधारणा करूं इच्छितां त्याबद्दल आपली काय काय योजना

आहे ती प्रसिद्ध केल्यास लोकांना त्याची माहिती होऊन त्यांचे त्याबद्दल विचार प्रदर्शित करण्यास बरें पडेल असेंही त्यांना सुचविण्यांत आलें. व त्याप्रमाणें त्यांचेकडे विनंतिपत्र धाडलें. यासही नकारात्मक अगर होकारात्मक कांहींच उत्तर मिळालें नाहीं म्हणून पुन्हां एकवार निजामसाहेब व निजामसाहेब्यांच्या मंत्रिमंडाळाकडे या प्रश्नाचा खल करण्याकरतां अर्ज करावा असें वाटल्यावरून तो धाडण्याचें धाडस आम्ही करीत आहों.

या नियोजित अर्जाच्या द्वारें जी योजना आम्ही पुढें मांडणार आहोंत त्याची माहिती होण्याकरतां प्रथम संस्थान मजकुरीं अस्तित्वांत असलेल्या कायदेकौन्सिलची घटना काय आहे हें येथें थोडक्यांत सांगण्याचें योजिलें आहे. स. १३०९ फसलीच्या हैद्राबाद कौन्सिल रेग्युलेशन नंबर तीनप्रमाणें वरील कौन्सिलला स्वरूप देण्यांत येऊन त्याप्रमाणें त्याची घटना बनविली आहे, पुढें त्यांत सन १३१५ फसलीच्या अॅक्ट एकनें व १३०९ च्या अॅक्ट ८ नें थोडासा फरक केला आहे. कौन्सिलच्या सभासदांची संख्या २१ आहे. प्रेसिडेंट व व्हॉईस प्रेसिडेंट यांखेरीज ११ सभासद सरकारतर्फे असावयाचे असून ६ बिन सरकारी आहेत. बाकीचे दोन जादा सभासद म्हणून असावयाचे आहेत. सर्व सभासद नेमण्याचा अधिकार मुख्य प्रधानांचे हातीं आहे. फक्त चीफ जस्टिस, लीगल अॅडव्हॉयसर, व ज्युडिशियल सेक्रेटरी हे तीन अधिकारी एक्स ऑफीशियो म्हणून बसावयाचे आहेत. वर जे सहा, बिन सरकारी अधिकारी सभासद म्हणून सांगितले आहेत त्यांतील जहागीरदार वर्गांतील ज्यांचें वार्षिक उत्पन्न सहा हजार किंवा त्याचे वर असेल त्यांपैकीं दोन, तसेंच दोन हायकोर्ट वकील असे असावयाचे असून त्यांची निवड त्या त्या वर्गांनीं करावयाची व बाकी राहिलेल्या दोन बिन अधिकारी इसमांची निवड मुख्य दिवाणांनीं संस्थानांतील प्रजाजनांमधून करावयाची असून पुन्हां त्यांतील एक सभासद पायगाचे जहागीरदारांतील असावा. सन १३१५ फसलीच्या अॅक्ट नं. १ च्या कायद्यांतील कलम ८ मध्यें कौन्सिलनें कोणकोणतीं कामें करावयाचीं याची माहिती दिली आहे ती थोडक्यांत येणेंप्रमाणें:---( अ ) अर्जांची सुनावणी व इतर पत्रव्यवहार पाहणें. ( ब ) कौन्सिलमध्यें सभासद ज्या ज्या सुधारणा व्हाव्या असें इच्छितात त्यांचा विचार व ( ३ ) बिलांचा विचार; कौन्सिलमध्यें बिलें आणणें व सूचना आणणें यास सन १३१५ फसलीच्या

ॲक्ट नं. १ कलम १५ नें निर्बंध घातले आहेत; त्यांत मुख्य दिवाणांच्या अनुमतीवांचून खालील प्रश्नांसंबंधींचीं बिलें अगर सूचना आणावयाच्या नाहींत:—

( अ ) एकंदर वसूल व एकंदर कर्ज अथवा

अशा वसूलावर अगर सरकारी ट्रेझरीवर कर्जाचा बोजा किती आहे.

( ब ) संस्थानांत असलेल्या कोणत्याही वर्गाच्या अगर धर्माच्या प्रजाजनांचे धार्मिक आचार अगर विचार यासंबंधी प्रश्न.

( क ) फौजेच्या शिस्तीसंबंधीं प्रश्न.

( ड ) सरकारचे ब्रिटिश गव्हर्नमेंटशी असलेल्या संबंधाचे प्रश्न.

( इ ) या कायद्याबद्दलचे आणि

( फ ) निझाम साहेबांच्या **हुकमानें** व **फर्मानांनीं** हल्लीं ज्या गोष्टी होत आहेत त्यांस बाध येईल अगर बंधनकारक होतील असे कोणतेही प्रश्न. वरील सहा बाबींसंबंधानें मुख्य दिवाणांची अनुमती अगाऊ मिळवून जर कौन्सिलपुढें सूचना अगर बिलें आणलीं तरी निझामसाहेबांनीं त्यांना मंजुरी दिल्याशिवाय त्या पास झालेल्या बिलांना अगर सूचनांना कायद्याचें स्वरूप येणार नाहीं.

कौन्सिलच्या घटनेसंबंधी वरील जी माहिती दिली आहे त्यावरून या कौन्सिलचें कार्यक्षेत्र किती **आकुंचित** व मर्यादित आहे हें दिसून येईल. वरील बंधनामुळें या संस्थेस उपयुक्त व प्रातिनिधिक स्वरूपाची कामगिरी करतां येत नाहीं. स. १३२९ फसलीच्या १६ व्या तारखेस जें फर्मान निजामसाहेबांनीं काढलें त्यांत आम्ही वर जे दोष दाखविले आहेत ते एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलची स्थापना करतांना मान्य केले आहेत.

यावरून ध्यानांत येईलच कीं जर लेजिस्लेटिव्ह कौन्सिलचें काम खरोखरींच जर जास्त उपयुक्त व भरींव व्हावें असें वाटत असेल तर सभासदांची संख्या वाढविली पाहिजे. तसेंच दुसरी गोष्ट म्हटली म्हणजे **लोकांनीं निवडून** दिलेल्या सभासदांची संख्या जास्त असावयास पाहिजे. व ही मतदानपद्धति प्रत्यक्ष मतानें व लोकांच्या शैक्षणिक, आर्थिक व सामाजिक स्थितीकडे लक्ष-

देऊन शक्य तितक्या जास्त मतदानपद्धतीवर अमलांत आणिली पाहिजे. याबरोबरच तिसरी गोष्ट ध्यानांत ठेविली पाहिजे कीं या कौन्सिलचें क्षेत्र व अधिकार जरा जास्त वाढविले पाहिजेत. पुढेंमागें आपल्या संस्थानांत राज्यकारभार कसा हांकला जातो याचे बव्हंशीं अंशभागी या प्रजाप्रतिनिधिमंडळानें व्हावें अशा पद्धतीनें ती अधिकाराची व्याप्ती व्हावी. आतां जीं वर तीन तत्वें सांगितलीं त्याप्रमाणानें त्या घटनेंत सुधारणा व्हावयास पाहिजे. आणि सुधारणा करावयाची झाल्यास मग त्या फर्मानविरोधक आहेत वगैरे गोष्टी पुढें आणतां कामा नये. हिंदी जनतेला लोकनियुक्त संस्था वावडया आहेत व ते राजकीय घटक होण्यास नालायक आहेत वगैरे जीं विधानें आपल्यापुढें आणण्यांत येतात त्यांबद्दल सविस्तर उहापोह करण्याचें हें स्थळ नव्हे. अगर लोकनियुक्त संस्था लोकांच्या आर्थिक अगर शिक्षणविषयक परिस्थितीमुळें बरोबर काम करूं शकत नाहींत वगैरेही म्हणणें त्याच मासल्याचें आहे. लोकनियुक्त संस्था शिक्षणाची वाढ अगर उच्च रहाणी, आर्थिक भरभराट आणि पद्धतशीर मतदानपद्धत या सर्वांचा विकास झाल्यास चालतात असें नाहीं तर लोकांमध्यें सार्वजनिक काम करण्याची हौस, आपल्यावर असलेल्या जबाबदारीची जाणीव व प्रामाणिकपणा या मूलभूत तत्वांवर त्या संस्था सर्वतोपरी कार्यक्षम होतात असाच अनुभव आहे. त्याबरोबर हेही पण ध्यानांत ठेविलें पाहिजे कीं लोकांमध्यें वरील गुणांबरोबर जो मनुष्य निवडून घ्यावयाचा तो कसा काय आहे व त्याचें शिक्षण कोठपर्यंत झालें आहे याचें ज्ञान असणें त्यांना जरूर आहे. या बाबतींत ब्रिटिश हिंदुस्थानांतील इलाख्यापेक्षां हैद्राबाद संस्थानांतील लोक मागें पडले आहेत असें नाहीं. हैद्राबाद संस्थानांतील प्रजाजनांचे अंगांत अशा संस्था चालविण्याची पात्रता आहे वगैरेचा खल करण्याची कांहीं आवश्यकता आहे असें आम्हांस प्रतिपादन करण्याचें कारणच नाहीं; कारण हल्लीं ज्या सुधारणा व्हाव्यात अशी निजामसाहेबांची व प्रजेची इच्छा आहे त्यांसंबंधी कोणाचाही मतभेद नाहीं एवढें सांगितलें म्हणजे पुरें आहे.

लेजिस्लेटिव्ह कौन्सिलची घटना आमच्या मतें कशी असावी याचें विवरण या ठिकाणीं युक्त होईल व ती योजना खालीलप्रमाणें आहे.

## कायदेकौन्सिलची घटना.

या कौन्सिलचे अध्यक्ष, व उपाध्यक्ष मिळून एकंदर १२९ सभासद असावेत. परिशिष्ट **अ** व **ब** मध्यें दिलेल्या मतदानपद्धतीस अनुसरून यांपैकीं १०६ सभासद असावेत; सात सभासद एक्सऑफिशियो सभासद असावेत व त्यांचेकडे निरनिराळ्या खात्यांचे सात पोर्ट फोलिओ देण्यांत यावेत; सरकारतर्फे १२ सभासदांची निवड करण्यांत यावी; ती अधिकारी व बिन अधिकारी वर्गांतील असून त्यांतील एक सर्फे खास इलाख्यातर्फे प्रतिनिधि असावा. कौन्सिलच्या अध्यक्षांनीं कांहीं विशेष विषयांत तज्ज्ञ म्हणून दोघां सभासदांना जादा सभासद, म्हणून नेमावे. आम्ही वर जी कौन्सिलच्या सभासदांची संख्या १२९ असावी. असें म्हटलें आहे ती जास्त आहे अशी हरकत घेण्यांत येईल, परंतु इ. स. १९२१ च्या खानेसुमारींत हैद्राबाद संस्थानची लोकसंख्या १, २४, ७१, ७७० अशी आहे; त्यावरून सर्वसाधारण एक लाखास एक या प्रमाणांत ही संख्या धरली आहे; तेव्हां त्या मानानें ही सुचविलेली सभासदांची संख्या पुष्कळच कमी आहे असें दिसून येईल. जर लोकनियुक्त मंडळ म्हणून कांहीं संस्था स्थापन करण्याचें असेल अगर तें नांव सार्थ व्हावें असें वाटत असेल तर कमींत कमी ही सभासदांची दिलेली संख्या असली पाहिजे असें आमचें मत आहे.

## मताधिकार.

खानेसुमारीच्या आंकड्यांवरून २० किंवा त्याहून जास्त वयाचे असे एकंदर ६७, ९२, ९१७ लोक आहेत आणि २० किंवा त्याहून जास्त वयाचे साक्षर असे २, ६६, ५४८ लोक आहेत. मताधिकार सर्वांना आहे हें तत्व मान्य केल्यास ५५००० हजारांस एकप्रति निधि हें प्रमाण पडेल, आणि साक्षरता हेंच तत्व मान्य केल्यास २७०० ला एक हें प्रमाण पडेल. सर्वांना मताधिकार असावा या तत्वाचा आम्ही येथील प्रजेची परिस्थिति ध्यानांत आणून पुरस्कार करीत नाहीं. व तसें करणेंही फायदेशीर होणार नाहीं. सर्वांना मताधिकार आहे म्हणणें म्हणजे सर्वांना राजकीय बाबींबद्दल बरेंच ज्ञान मिळालेलें आहे असेंच समजण्यासारखें आहे. आणि या तत्वाचा आम्हीं

पुरस्कार केला तर आम्हांवर अप्रामाणिकपणाचा आरोप येईल. कारण लोक-नियुक्त सभांचें महत्त्व काय आहे, तसेंच प्रजेनें आपल्याकरतां कायदे कसे निर्माण केले पाहिजेत व आपल्यातर्फे आपलें म्हणणें अशा संस्थेमार्फत कसें मांडलें पाहिजे वगैरे गोष्टी आमच्या प्रजेस अजून शिकावयाच्या आहेत; तेव्हां ही गोष्ट वरील तत्वाचा पुरस्कार करतांना डोळ्यांआड करणें वाजवी होणार नाहीं. आमच्या प्रजेस पंचायत म्हणजे काय अगर म्युनिसिपल बोर्ड म्हणजे काय व त्यांची उपयुक्तता कशा प्रकारची आहे याचें ज्ञान आहे; परंतु याहीपेक्षां वरिष्ठ प्रकाराचा राज्यकारभार कसा असावयास पाहिजे याचें ज्ञान होण्यास वाढता अनु-भव व याहीपेक्षां व्यापक दृष्टी असावयास पाहिजे. खानेसुमारीच्या आंकड्यां-वरून जें साक्षरतेचें प्रमाण दिसून येतें त्या कसोटीवरून मतदार संघाची स्थिति कशी आहे याचें ज्ञान होण्यास मदत होत नाहीं. परंतु याच्या उलट स्थिति आपल्या देशांत निदर्शनास येते. देशांतील बहुजनसमाज जरी निरक्षर आहे तरी त्यांना आपल्या मताचा परिणाम काय होतो व आपल्या गरजा काय आहेत याची पूर्ण जाणीव झाली आहे. आपलीं मतें कोणांस द्यावींत व कोणास देऊं नयेत याचा योग्यायोग्य विचार करण्याची पात्रता त्यांच्या आंगीं आली आहे. म्हणून साक्षरता हें प्रमाण सोडून दिल्यास लोकांजवळ अस-लेल्या मालमत्तेचा विचार करणें अवश्य आहे. आणि निवडून येणाऱ्या माणसास ही अट जाचक होऊं नये म्हणून त्याचाही योग्य विचार करून कांहीं मर्यादाही ठरविली आहे. मतदानपद्धतीचें मान किमानपक्षीं उतरण्यांत येऊं नये म्हणून सर्व बाजूनें योग्य विचार करून खालील निर्बंध असावा असें ठरविलें आहे.

## मतदानाची लायकी.

मतदारांची व उमेदवारांची लायकी खालील चार गोष्टींवरून ठरविण्यांत येत आहे. ( १ ) वसतिस्थान ( २ ) घरांची मालकी अगर भोगवटा ( ३ ) म्युनिसिपल कर, घरभाडें व स्थानिक इतर कर ( ४ ) विशिष्ट वर्गातर्फे उभे राहणाऱ्या उमेदवाराचें ठरविलेलें उत्पन्न. जेव्हां अविभक्त कुटुंबांतील मनुष्यें समायिक कोणतीही मिळकत धारण करित असतील किंवा तिचा भोगवटा करीत असतील किंवा पैका देत असतील किंवा घेत असतील तेव्हां नियमा-

प्रमाणें जरूर असलेली लायकी आहे किंवा नाहीं हें ठरविण्यासाठीं तें कुटुंब एक व्यक्ति म्हणून समजलें पाहिजे; आणि जर ती लायकी असेल तर त्या कुटुंबाचा मॅनेजर फक्त अशा मिळकतीच्या किंवा पैशाच्या संबंधानें मतदार म्हणून लायक समजला जाईल.

## मतदार संघ.

संस्थानच्या खानेसुमारीच्या आंकड्यांप्रमाणें निरनिराळे असे मतदार-संघ निर्माण करणें जरूर आहे व ते पुढीलप्रमाणें असावेत असें आमचें मत आहे. हे संघ दोन प्रकारचे असावेत ( १ ) सामान्य मतदार संघ व ( २ ) विशेष मतदार संघ. सामान्य मतदारसंघांत दोन पुढील विभाग करण्यांत यावेत (अ) रूरल व ( ब ) अर्बन. या दुसऱ्या संघांत ( ब मध्यें ) रूरल व अर्बन या दोन्ही क्षेत्रांतील मतदारांचा समावेश व्हावा. त्याचप्रमाणें वरील विशेष मतदारसंघांत ज्या विशिष्ट वर्गाच्या हक्काचें संरक्षण करणें इष्ट व अवश्यक आहे त्या वर्गांतील विशिष्ट लोकांचा यांत समावेश होण्याचा आहे. आतां त्या त्या संघामार्फत उमेदवारांची लायकी व निवडणूक करणारांची लायकी त्या त्या मानानें भिन्न भिन्न राहील हें उघड आहे. व त्याचें विवेचन आम्ही पुढें देतच आहों. फक्त सामान्यत्वें नालायकी कोणत्या आहेत याचें विवेचन करणें जरूर आहे. ( १ ) ज्याचें वय २१ वर्षांहून कमी आहे व जो संस्थानवासी प्रजाजन नाहीं अगर संस्थानांत कमींत कमी तीन वर्षांहून कमी वर्षें रहात असलेला अगर योग्य कोर्टामार्फत जो वेडा आहे असें जाहीर केलेला इसम निवडण्यास अगर मतें देण्यास अपात्र आहे असें समजण्यांत यावें. केवळ स्त्रिया म्हणूनच त्या मतें देण्यास अयोग्य व अपात्र आहेत असें नसून त्यांनाही मतें देण्याचा अधिकार असल्याचें तत्त्व आम्हीं अनुषंगानें मान्य केलें आहे. आमच्या संस्थानची प्रगति व्हावी व **राष्ट्रीय** कल्याण व्हावें या एकाच हेतूनें हें तत्त्व आम्हीं मान्य केलें आहे; मग व्यवहारामध्यें अगर प्रत्यक्ष कामाकाजांत कोणत्याही अडचणी आल्या तरी हरकत नाहीं.

विशेष मतदारसंघाची वर्गवारी खालीलप्रमाणें असावी.

(अ) ज्याचें वार्षिक उत्पन्न तीन हजारांपेक्षां जास्त आहे असे जाहगीरदार व हक्कदार. हा वर्ग फार मोठा आहे व तो वतनदारांचा असल्यानें यांचें

आपआपल्या क्षेत्रांत बरेंच वजन आहे. व त्यांना आपल्या वर्गाचे हितसंबंध राखणें अगदीं अवश्य आहे. या वर्गांतून कौन्सिलचे कामकाज करण्यास व संस्थानच्या राज्यकारभारांत भाग घेण्यालायक असे बरेच सुज्ञ लोक पुढें येण्यासारखे आहेत. व म्हणूनच त्यांच्या विशिष्ट हक्कांचें संरक्षण व्हावें म्हणून वरील वर्गांतून चार उमेद्‌वार निवडून यावेत असें आमचें मत आहे.

( **ब** ) युनिव्हर्सिटीतर्फें मतदार.

युनिव्हर्सिटीस आपल्यातर्फें एक उमेद्‌वार निवडून देण्याची परवानगी असावी.

( **क** ) व्यापार व औद्योगिक खातें–या शाखेच्या दोन संस्था आहेत. एक चेंबर ऑफ कॉमर्स व दुसरी अंजुमान सावकारान. तेव्हां या दोन्ही संस्थांमार्फत एक उमेद्‌वार निवडला जावा. बाकी राहिलेले दोन उमेद्‌वार एक को ऑपरेव्हि सोसायट्यांमार्फत व दुसरा मिल व फॅक्टरी या शाखांमार्फत असावा.

( **ड** ) **ख्रिश्चन व पार्शी**:—या दोन वर्गांतून एकएक प्रतिनिधि निवडला जावा.

( **इ** ) **मागासलेला वर्ग**:–या वर्गाकडे सहानुभूतीनें पाहणें अगदीं जरूर आहे. तेव्हां त्यांच्याकरतां कांहीं स्वतंत्र व्यवस्था करणें जरूर आहे. व त्यांत सामान्य मतदारसंघांत यांपैकींच पुष्कळ मत देणारे निघतील; तेव्हां या वर्गाचे हिताकरतां दोन स्वतंत्र जागा असणें जरूर आहे व त्याप्रमाणें ठरविण्यांत यावें.

( **फ** ) **मजूरवर्ग**:– हल्लींच्या औद्योगिक युगांत भांडवलवाले व मजूर यांचा हितानहिताचा प्रश्न फार गुंतागुंतीचा झाल्यानें त्यांचें भांडण उत्तरोत्तर होत आहे, तेव्हां त्यांचीही स्वतंत्र जागा राखून साये करणें अगत्याचें आहे म्हणून त्यांच्याकरतां एक जागा ठेवण्यांत यावी.

( **ग** ) एक लाख अगर त्याहून जास्त वार्षिक उत्पन्न असणारा जाहगीरदारांचा वर्ग. संस्थानांत अशा वर्गाची संख्या १६ आहे. या वर्गाला कौन्सिलमध्यें स्थान मिळाल्यास कौन्सिलच्या इभ्रतीस व कामकाजास गंभीर स्वरूप येईल म्हणून या वर्गातर्फें चार उमेद्‌वार निवडले जावेत असें आमचें मत आहे.

(ह) **संस्थानिक वर्ग.** हाही एक जहागीरदारांपैकींच वर्ग आहे. या वर्गांत तीस हजारांपासून सहा लाखांपर्यंत उत्पन्न असलेले संस्थानिक येतात. असे संस्थानिक संस्थानांत १४ आहेत. व त्यांचेंही महत्त्व वरील जहागीरदारांप्रमाणेंच आहे. तेव्हां या वर्गातर्फे दोन प्रतिनिधी निवडले जावेत.

(आय) **खाणीवाले.** या बाबीचें महत्त्व लक्षांत घेऊन या वर्गांतून एक प्रतिनिधि निवडला जावा.

(जे) **हायकोर्ट वकील.** सन १३१५ फसलीच्या ॲक्ट १ नें या वर्गातर्फे दोन प्रतिनिधी लेजिस्लेटिव्ह कौन्सिलमध्यें असावेत असें ठरविलें व तीच मर्यादा व तीच संख्या आम्हांस मान्य आहे.

(के) **पदवीधर.** या वर्गातर्फे २ दोन प्रतिनिधी असावेत. या वर्गांकरतां स्वतंत्र मतदानपद्धत स्वीकारण्यांत यावी असें आमचें मत आहे.

वर निर्दिष्ट केलेल्या योजनांवरून आपल्या ध्यानीं येईल कीं, व्यापार आणि औद्योगिक शाखा, मजूर वर्ग, आणि मागासलेला वर्ग या तीन वर्गांखेरजि बाकीच्या वर्गातर्फे प्रत्यक्ष मतदानपद्धत सुचविली आहे. या तीन वर्गांस मतदानपद्धत कशी असावी हें अजून निश्चित होणें सध्यां दुर्घट आहे; सबब त्याबद्दल जास्त कांहीं लिहितां येत नाहीं.

## मतदारांची लायकी

(अ) **शहरांची स्थलसीमा:**– १९२१ च्या खानेसुमारीच्या रिपोर्टांत शहराची जशी वर्गवारी केली आहे त्याप्रमाणें येथें सीमा धरल्या आहेत. ज्याचें राहण्याचें ठिकाण मतदार संघाच्या क्षेत्राच्या आंत किंवा सदहु शहराच्या हद्दीपासून दोन मैलांच्या आंत असेल अशा प्रत्येक इसमाचें नांव मतदारांच्या यादींत घातलें जाईल.

(१) **हैद्राबाद शहर:**– (अ) ज्या घराचें वार्षिक भाडें ९६ रुपयांहून कमी नाहीं अशी इमारत मालकी हक्कानें अगर त्यांत भाड्यानें राहतो तो. अथवा,

(ब) ज्याचें महिन्याचें पेन्शन २५ पेक्षां कमी नाहीं असा सरकारी लष्करी, दिवाणी, मुलकीकडील पेन्शनर अथवा

**( क )** देशी अगर विदेशीय वियापीठाचा ( युनिव्हर्सिटीचा ) मॅट्रिक असेल अगर ज्याचें शिक्षण उच्च पदवी अगर डिप्लोमा घेण्याइतकें झाले असेल असा प्रत्येक इसम.

**हैद्राबाद खेरीज इतर शहरें:- ( अ )** ज्या घराचें वार्षिक भाडें ४८ पेक्षां कमी नाहीं असें घर मालकी हक्कानें ठेवितो, अगर त्यांत भाड्यानें राहतो तो.

**( ब )** वर्षास तीन रुपयांपेक्षां कमी नाहीं अशी रक्कम म्युनिसिपालिटीस अगर लोकलबोर्डास स्थानिक कर म्हणून नुज़ूल अगर घरपट्टी भरणार प्रत्येक इसम.

**( क )** जो देशी अगर विदेशी वियापीठाचा मॅट्रिक अगर त्या परिक्षे-इतकें शिक्षण अगर उच्च पदवी अगर डिप्लोमा घेण्याइतकें शिक्षण झालेला प्रत्येक इसम.

**( ड )** ज्याचें महिन्याचें पेन्शन २५ पेक्षां कमी नाहीं असा सरकारी लष्करी मुलकी, अगर दिवाणीकडील प्रत्येक पेन्शनर.

**( ब ) खेडेगांवः-** ज्याचें राहण्याचें ठिकाण या मतदारसंघाच्या क्षेत्रांच्या आंत असलेला प्रत्येक इसम.

( १ ) फ. स. १३१७ च्या हैद्राबाद लँडरेव्हिन्यू ॲक्ट ( VIII ) कलम २ पोट कलम ११।१२ प्रमाणें सरकारांस तीस रुपयांपेक्षां कमी नाहीं इतका सारा देणारा प्रत्येक रजिस्टर्ड पट्टेदार अगर शिकमीदार, अथवा

( २ ) कोणत्याही जहागिरींत, संस्थानांत, मक्ता अगर इनाम यापैकीं कोणत्याही क्षेत्रांत जमीन असून त्या जहागीरदारांस ३० तीस रुपयांपेक्षां कमी नाहीं एवढा सारा देणारा.

( ३ ) ज्या जमिनीच्या भागापासून अगर जमिनीपासून ज्याचें वार्षिक उत्पन्न साठ रुपयांपेक्षां कमी नाहीं अशी जमीन धारण करणारा अगर हितसंबंध असणारा प्रत्येक इसम, अथवा,

४ ) जो व्यापारी असून ज्याच्या मालमत्तेची किंमत दोन हजारांपेक्षां कमी नाहीं व ज्याचें वार्षिक उत्पन्न तीनशेंपेक्षां कमी नाहीं असा इसम, अथवा

( ५ ) जो निदान देशी अगर विदेशी विद्यापीठाचा मॅट्रिक आहे अगर तत्सम उच्च पदवी अगर डिप्लोमा धारण करणारा प्रत्येक इसम, अथवा

( ६ ) ज्याचें महिन्याचें पेन्शन २५ रुपयांपेक्षां कमी नाहीं असा सरकारी, लष्करी, मुलकी, दिवाणी खात्याकडील इसम.

## उमेदवारांची लायकी.

खालील अपवाद सोडून सर्वसाधारण मानानें मतदारांच्या ज्या लायक्या वर सांगितल्या आहेत त्या सर्व उमेदवारांना लागूं पडतात असें समजावें.

**अपवादः—**

( अ ) जो सरकारी नोकर आहे, अगर

( ब ) ज्यास एकाद्या लायक कोर्टानें सहा महिन्यांची शिक्षा सांगितली आहे व पुढें शिक्षा संपल्यापासून १० वर्षेपर्यंत जो उमेदवार म्हणून उभा राहण्यास नालायक असा,

( क ) नादार

( ड ) ज्याचें वय २५ च्या खालीं आहे असा.

वर ( ब ) आणि ( क ) यामध्यें सांगितलेल्या इसमांना सरकारनें कांहीं कारणामुळें योग्य ठरविलें तर असे गृहस्थ.

## एकापेक्षां जास्त मतें.

त्या त्या मतदारसंघातर्फे प्रत्येक इसमास एकच मत आहे असें समजावें, परंतु त्या त्या वर्गांतून एकापेक्षां अधिक उमेदवार पुढें आले तर जितके उमेदवार पुढें आले तितकीं मतें प्रत्येक मतें देणाऱ्या इसमास आहेत असें समजण्यांत यावें. एकाच मतदारसंघातर्फे मत देणाऱ्याला एकदांच मत देण्याचा अधिकार आहे. त्याच्या मत देण्याच्या इतर लायक्या आहेत म्हणून त्याला दुसऱ्यांदा मत देतां येणार नाहीं. ज्याचें शहराच्या मतदारसंघाच्या यादींत नांव असेल एवढ्यावरूनच त्याला खेडेगांवाच्या मतदारसंघाच्या तर्फे मत देतां येणार नाहीं. परंतु खेडेगांवच्या मतदारसंघातर्फे इसमाची जी लायकी असणें जरूर आहे ती असली तरच त्याला मत देतां येईल. मतदार-

संघाच्या याद्या तयार करणें, त्याबाबत नियम वगैरे बनविणें व पोलिंगची व्यवस्था करणें या गोष्टींचा विचार करून त्याबद्दल सविस्तर असें मागाहून प्रसिद्ध करतां येईल. त्याबाबत आतांच खल करणें इष्ट आहे असें आम्हांस वाटत नाहीं.

## कौन्सिलचे अधिकार व कार्यक्षेत्र.

( अ ) **कायदे करणें**:– संस्थानचा राज्यकारभार ज्यास्त कार्यक्षम व चांगला राहण्याकरतां संस्थानोपयोगी कायदे तयार करणें हें लेजस्लेटिव्ह कौन्सिसचें पहिलें कर्तव्य आहे. कांहीं मर्यादित स्वरूपांत हें कौन्सिल आज गेलीं ३३ वर्षें तो अधिकार बजावीत आहे. बिलें बहुधा सरकारमार्फतच कौन्सिलमध्यें आणलीं जातात; परंतु हल्लीं चालू असलेल्या नियमानें कोणत्याही बिन अधिकारी सभासदास कौन्सिलची बैठक चालू असतांना कोणतीही सूचना अगर बिलें आणण्याची परवानगी मागतां येते. व हाच अधिकार कायद्यानें याबाबत कायम करून घेतला पाहिजे म्हणजे योग्य मुदतीची नोटीस देऊन कौन्सिलपुढें कोणतीही सूचना अगर बिल आणतां येईल. कराच्या ( Taxation ) बद्दल ज्या कांहीं सूचना सरकारतर्फे कौन्सिल पुढें येतील त्या प्रथम बिलाच्या स्वरूपांत येऊन नंतर त्याबद्दल वादविवाद होऊन त्याचें कायद्यामध्यें रूपांतर व्हावें. सरकारी व बिनसरकारी बिलांच्यामध्यें भेद असतां कामा नये व कोणतींही बिलें कौन्सिलनें पास केलीं तर त्यांना कायद्याचें स्वरूप मिळावें. परंतु खालील तीन बाबीबद्दल कौन्सिलमध्यें सदर–इ–आझम यांच्या अगाऊ परवानगीवांचून बिल आणणें केव्हांही न्याय्य होणार नाहीं:—

( अ ) राष्ट्रीय कर्ज

( ब ) निजाम सरकरच्या लष्कराबाबत.

( क ) निजाम सरकार व ब्रिटिश सरकार यांच्या हितसंबधाबाबत सदर-इ-आझम यांची परवानगी मिळून एकाद्या सभासदानें कौन्सिलमध्यें वर निर्दिष्ट केल्या बाबींबद्दल एकादें बिल आणलें व त्याच्याबद्दल चर्चा होऊन जरी तें पास झालें तरी निजामसाहेबांची सदर बिलास मंजूरी मिळाल्यावांचून त्याचा अंमल होऊं नये. सभासदांकडून जीं बिलें येतात तीं जरूर वाटल्यास सिलेक्ट-

कमेटीकडे देण्यांत यावीं; त्या सिलेक्ट कमेटीकडून रिपोर्ट येईपर्यंत त्या बिलां-बद्दलची चर्चा तहकूब ठेवण्यांत यावी. बिलें कौन्सिलनें पास केल्यावर निजामसाहेबांकडून त्याबाबत मंजूरी आल्यावर लगेच तीं लोकांना समजण्या-करतां गॅझेट ( जरीदा ) मध्यें लगेच प्रसिद्ध व्हावीत.

**( ब ) प्रश्न विचारण्याबाबतचा अधिकारः**--सार्वजनिक स्वरू-पाच्या राज्यकारभाराबद्दल सभासदांना प्रश्न विचारण्याचा अधिकार आहे किंवा नाहीं हा प्रश्न पुढें येतो. एकाद्या सरकारी नोकरानें आपल्या अधिकाराच्या जोरावर एकादी बेकायदेशीर गोष्ट अगर त्या अधिकारास न शोभणारी गोष्ट केली असल्यास जनहिताच्या दृष्टीनें ती पुढें आणण्याचे कामीं प्रश्न विचारण्याचा अधिकार सभासदांस असणें अगदीं अवश्य आहे. असें झाल्यानें सरकारचें धोरण खरें काय आहे हें प्रजेस कळण्यास मदत होईल व अशा वैयक्तिक अधि-काऱ्यांकडून होणाऱ्या अधिकारांतिक्रमणापासून उत्पन्न झालेला गैरसमज दूर होण्यास बरीच मदत होईल. खरोखर पाहिलें असतां प्रश्न विचारण्याचें क्षेत्र केव्हांही मर्यादित असूं शकत नाहीं. व जेव्हां एकादा सरकारी अधिकारी वैयक्तिक गैरवागणूक करतो तेव्हां त्याच्या वर्तणुकी बद्दल जाब विचारतांना ही मर्यादा उपयोगी नाहीं. अशा तऱ्हेचा जाब विचारतांना त्याचा गैरउपयोग होणें शक्य आहे असें जरी मानलें तरी राजकीयदृष्ट्या तो दुर्गुण न समजतां सद्गुणच समजला जावा. असें झाल्यानें प्रजेची थोडी तरी जाचणूक कमी झाल्याचें श्रेय येईल. तेव्हां एकाद्या सभासदास ज्या ज्या खात्याबद्दल नक्की माहिती अगर आंकडे जनहिताच्या दृष्टीनें विचारणें अगत्याचें आहे असें वाटेल तर त्यानें अगाऊ मिनिस्टर अगर त्या त्या खात्याचे सेक्रेटरी यांना तशी नोटीस देऊन ते प्रश्न विचारावेत असें आम्ही सुचवितों; तसेंच सरकारी धोरणा-बद्दल अगर सार्वजनिक दृष्ट्या एकाद्या गोष्टीबद्दल अगर कांहीं विशिष्ट गोष्टी-बद्दल सरकारचें लक्ष्य जाणें योग्य आहे असें सभासदांस वाटत असेल तर या बाबतींतही त्यांस प्रश्न विचारण्यास मुभा असावी.

**( क ) ठराव अगर सूचनाः**--सार्वजनिक दृष्ट्या महत्त्वाचे असे ठराव सरकारच्या नजरेस आणणें कौन्सिलला योग्य वाटत असेल तर त्या-प्रमाणें कौन्सिलानें ठराव आणावेत. कौन्सिलाला एकाद्या बाबीबद्दल स्पष्ट मत

देण्याचा अधिकार असतो अशा बाबीबद्दल अगर सरकारकडे कांहीं गोष्टीबद्दल शिफारस करण्याची असेल, त्या गोष्टीबद्दल अगर सार्वजनिक अत्यंत महत्त्वाच्या प्रश्नाचा विचार करण्याकरतां ज्या सूचना अगर उपसूचना तहकुब ठेवतां येतात त्या सर्व बाबीनां वरील नियम लागू आहे असें समजावें. म्हणजे त्या बाबतींत ठराव आणण्याचा अधिकार आहे असें समजायाचें आहे. बिलें आणण्याकरतां जी मर्यादा कायद्यानें घातली आहे, तीच मर्यादा अगर निर्बंध याही ठरावांना लागू आहेत. ज्या गोष्टी सदर–ई–आझम यांची अगाऊ परवानगी घेतल्याखेरीज या कौन्सिलाच्या कार्यक्षेत्रांत येत नाहींत त्या गोष्टींची योग्य परवानगी मिळून त्याबद्दल जर ठराव आणले गेले तरी तें निजामसाहेबांची रीतसर मंजुरी मिळाल्याशिवाय शिफारसवजा आहेत असें समजण्यांत यावें. या खेरीज इतर ठराव सरकारानें मान्य केलेच पाहिजेत. त्याप्रमाणें अंमलबजावणी सरकारनें केलीच पाहिजे.

(ड) **बजेटची चर्चा व अनुमती**:—बजेटासारख्या महत्त्वाच्या विषयाचा विचार करतांना प्रश्न विचारण्याचा हक्क अगदीं अवश्य आहे असें सर्वांस वाटेल. नुसतें कौन्सिलपुढें बजेट मांडलें म्हणजे झालें असें नव्हे तर त्यावर संस्थानची आर्थिक परिस्थिति समाधानकारक आहे अगर नाहीं याचें ज्ञान होतें अशा बजेटची चर्चा कौन्सिलमध्यें झाली पाहिजे. म्हणून बजेट पुढें मांडलें गेलें असतां त्यावर शक्य तितका जास्त वादविवाद करण्याचा सभासदांना अधिकार असावा असें आम्ही सुचवितों. बजेटमध्यें दाखल केलेल्या बाबींसंबंधानें कांहीं रकमा जास्त अगर कमी करणें कौन्सिलला योग्य वाटत असेल तर तसें करण्याचा अधिकार कौन्सिलला असावा. फक्त कौन्सिलनें कमी केल्या बाबीसंबंधानें जर रक्कम पुन्हां वाढविण्याची असेल तर संस्थानच्या हिताच्या दृष्टीनें आणि राज्यकारभाराच्या दृष्टीनें वाढविणें योग्य वाटल्यास तसें करण्याचा अधिकार निजामसाहेबांस असावा असें आमचें मत आहे.

**कौन्सिलची मुदत**:—एकदां निवडलेलें कौन्सिल तीन वर्षें अस्तित्वांत राहावें व फिरून तीन वर्षांनीं एकदां कौन्सिलची निवडणूक व्हावी.

**अध्यक्ष व उपाध्यक्ष**:—संस्थानांत असलेल्या कौन्सिलच्या नियमानें सदर–ई–अझम हेच कौन्सिलचे अध्यक्ष आहेत. व सदर–इ–अझम यांनीं

एकाद्या बिलाबद्दल विचार करण्याकरतां ज्या मिनिस्टरकडे त्या बिलाचें काम दिलें असतें तो उपाध्यक्ष म्हणून असतो अगर ज्या बिलाची कौन्सिलमध्यें चर्चा चालूं असते व ज्याकडे एरवीं तें काम असतें असा मिनिस्टरही असूं शकतो. यापुढें असें करणें ज्या सुधारणा म्हणून करण्याचें योजलें आहे त्याकडे नजर देतां योग्य नाहीं असें वाटतें. कौन्सिलचे अध्यक्ष व उपाध्यक्ष निवडण्याचा अधिकार कौन्सिलला देणें अगदीं क्रमप्राप्त आहे व तो तसा द्यावा असें आमचें मत आहे आणि कौन्सिलची मुदत संपेपर्यंत ते त्या पदावर राहतील. पुढें अध्यक्ष व उपाध्यक्ष या जागांकरतां मागें जे उमेदवार उभे राहिले होते व असलेल्या अध्यक्ष अगर उपाध्यक्ष यांच्या मतानुक्रमानें नंबरवारी लागेल त्यांनाच ह्या जागा देण्यांत याव्या.

**स्टँडिंग कमेटीः**—कौन्सिलची उभारणी केल्यावर लगेच स्टँडिंग कमेटीची घटना होणें अगदीं जरूर आहे. व ती घटना मॉंटेग्यूचेल्म्स फोर्ड रिपोर्टानें ब्रिटिश इंडियामध्यें कशी असावी याचें जसें विवरण केलें आहे त्याप्रमाणेंच ही असावी. कौन्सिलनें स्टँडिंग कमेटीची निवड केल्यावर त्यांकडे एक किंवा अनेक खात्यांचें काम सोंपवावें. या कमेटीनें त्यांच्याकडे सोंपविलेल्या खात्यांवर चांगली देखरेख ठेवून त्यांत कांहीं सुधारणा होणें अवश्य वाटल्यास ह्या कमेटीनें त्या सूचनांच्या रूपानें कौन्सिलपुढें मांडाव्यात व त्याचा कौन्सिल विचार करील. यावरून आपल्या ध्यानीं आलेंच असेल कीं या कमेटीचें काम सल्लामसलत देण्याचेंच आहे. अशा तऱ्हेची कमेटी स्थापन करण्याचा मुख्य उद्देश कौन्सिलच्या सभासदांना निरनिराळ्या खात्यांची माहिती व्हावी व सरकारच्या धोरणाबद्दल जर प्रजेमध्यें गैरसमज उत्पन्न झाला तर तो दूर व्हावा एवढाच आहे; यावरून त्याचें महत्त्व कळून येणार आहे.

## कौन्सिलच्या अधिकाराची फेर तपासणी.

कौन्सिल अस्तित्वांत आल्यापासून दर सहा वर्षांनीं कौन्सिलच्या अधिकारांत कोणत्या सुधारणा करणें इष्ट आहे व जनतेच्या हिताच्या दृष्टीनें कौन्सिलला काय काय जादा अधिकार देणें वाजवी होईल, याचा विचार करण्याकरतां एक कमेटी नेमावी व या कमेटीनें त्याबद्दल चौकशी करून रिपोर्ट करावा.

# उपसंहार.

वर आम्हीं जो सुधारणेचा मसुदा म्हणून साधारणतः ज्या सूचना केल्या आहेत त्या सुधारणा निजामसाहेबांनीं ज्या फर्मानानें सुधारणा व्हाव्यात अशी इच्छा प्रदर्शित करून एक कमेटी नेमली आहे, त्यांतील तत्त्वास व धोरणास अनुसरूनच आहेत असें आमचें प्रामाणिक मत आहे. व ज्या सुधारणा व्हाव्यात म्हणून व त्या घडवून आणाव्यात म्हणून निजामसाहेबांनीं खटपट केली आहे, त्याबद्दल आम्ही त्यांचे मनःपूर्वक आभार मानतों. वर या खर्ड्यांत आम्हीं ज्या सुधारणा सुचविल्या आहेत. त्यांची अंमलबजावणी जर निजामसाहेबांनीं मान्यता देऊन केली तर लोकांच्या पुष्कळच इच्छा व आकांक्षा सफल होतील अशी आशा आहे. वर सुचविलेल्या योजनेहून कमी प्रतीच्या अगर त्यांत समाविष्ट केलेल्या तत्त्वाविरुद्ध जर कांहीं सुधारणा करण्याचें सरकारनें ठरविल्यास आला हजरतच्या राजनिष्ठ प्रजेचें मन अत्यंत खट्टू होऊन त्यांच्या आशेचा भंग होईल. हें सरकारला येथें कळविण्याची अगर प्रामुख्यानें मांडण्याची गोष्ट नाहीं. सरकार या गोष्टी जाणतेंच.

| | |
|---|---|
| **काशिनाथराव वैद्य**<br>M. A. L. L. B.<br>**रंगराव**, हायकोर्ट वकील<br>सेक्रेटरीज. | **वामन रामचंद्र नाईक.**<br>अध्यक्ष.<br>हैद्राबाद स्टेट रिफॉर्म<br>असोशिएशन. |

# परिशिष्ट ( अ )

| अ. नं. | जिल्ह्याचें अगर शहराचें नांव | शहरातर्फे | | खेडेगांवां तर्फे | | एकूण जागांची संख्या |
|---|---|---|---|---|---|---|
| | | लोकसंख्या | जागा | लोकसंख्या | जागा | |
| १ | हैद्राबाद शहर | | | ४०४१८७ | ८ | ८ |
| २ | अत्राफ बल्दा | ४९७४९८ | ३ | ० | ० | ३ |
| ३ | वरंगल | ८४३७८० | ४ | ८१२६० | २ | ६ |
| ४ | करीम नगर | १०५२०२ | ५ | ४३१५२ | १ | ६ |
| ५ | आदिलाबाद | ६३३१०३ | ३ | २२४३३ | १ | ४ |
| ६ | मेदक | ६०७१२४ | ३ | :५६७२ | १ | ४ |
| ७ | निजामाबाद | ४६६७३७ | २ | ३३०२८ | १ | ३ |
| ८ | महबूब नगर | ७२३२०९ | ४ | २७५२१ | १ | ५ |
| ९ | नलगोंडा | ९३४६४२ | ५ | १३६५९ | १ | ६ |
| १० | औरंगाबाद | ६४०१६१ | ३ | ७३८४० | २ | ५ |
| ११ | बीड | ४६७६६६ | २ | ३५९६९ | १ | २ |
| १२ | परभणी | ६९९५९५ | ३ | ६६१९२ | २ | ५ |
| १३ | गुलबर्गा | ९८१८५० | ५ | ११३९०३ | २ | ७ |
| १४ | उस्मानाबाद | ५५९२०६ | ३ | ५५९२० | १ | ४ |
| १५ | रायचूर | ८४५३७५ | ४ | ६७९४७ | २ | ६ |
| १६ | नांदेड | ६१५८४७ | ३ | ५५१७२ | १ | ४ |
| १७ | बिदर | ७५८८८२ | ४ | ४१८६९ | १ | ५ |
| | एकूण जागांची संख्या | ० | ५६ | ० | २८ | ८४ |



# परिशिष्ट ( ब )

## कौन्सिलची घटना.



| कौन्सिलमध्यें खालीलप्रमाणें सभासद असावेत. | जागा |
|---|---|
| शहरातर्फे ... ... ... ... | २८ |
| खेडेगांवातर्फे ... ... ... ... | ५६ |
| जहागीदार आणि हक्कदार ज्यांचें वार्षिक उत्पन्न तीन हजारांपासून एक लाखापर्यंत असलेले | ४ |
| जहागीरदार ज्यांचें उत्पन्न एका लाखाहून जास्त असणारे | २ |
| संस्थानें ... ... ... ... | २ |
| हायकोर्ट वकील ... ... ... ... | २ |
| युनिव्हर्सिटी ... ... ... ... | १ |
| रजिस्टर्ड पदवीधर ... ... ... | २ |
| व्यापार व औद्योगिक संस्था | |
| ( अ ) चेंबर ऑफ कॉमर्स व अंजुमने | |
| साहु कारी ... ... ... ... | १ |
| ( ब ) सहकारी पतपेढ्या ... ... ... | १ |
| ( क ) गिरण्या व फॅक्टरी ... ... ... | १ |
| खाणीवाले ... ... ... ... | १ |
| मंजूर वर्ग ... ... ... ... | १ |
| ख्रिश्चन ... ... ... ... | १ |
| पार्शी ... ... ... ... | १ |
| मागासलेला वर्ग ... ... ... ... | २ |
| जादा मेंबर ... ... ... ... | ७ |
| सरकारनीं निवडून दिलेले अधिकारी व बिन अधिकारी वर्गांतील | १२ |
| | १२५ |
| गव्हर्नमेंटला जेव्हां तज्ज्ञांची गरज भासेल तेव्हां | २ |
| एकूण संख्या | १२७ |

# निझाम सरकारची शिक्षणाविरुद्ध मोहीम.

## खासगी शिक्षणप्रसारास मनाई.

### खासगी शाळांसंबंधीं सरकारी पत्रक.

निजाम सरकारला आपल्या राज्यांतील सर्व शैक्षणिक चळवळींची पूर्ण माहिती असावी व विविध प्रकारच्या शिक्षणसंस्थांची आंकडेवार नोंद मिळून सर्व शिक्षणसंस्था आरोग्यदृष्ट्या व इतर रीतींनेंही सर्वमान्य तत्वांवर चालाव्या अशी इच्छा असल्यानें नवीन शिक्षणसंस्था निघण्यास उत्तेजन मिळावें व जुन्या संस्थांना योग्य मार्ग दाखवावा या हेतूनें त्यांनीं खालील नियम तयार केले असून हे नियम तयार होण्यापूर्वींच ज्या खासगी शाळा अस्तित्वांत असतील त्यांसह सर्व शिक्षणसंस्थांना ते लागू करण्यांत आले आहेत.

( १ ) पटावर पंधरांहून अधिक मुलें असलेल्या शिक्षणसंस्था, कोणत्याही रीतीनें सरकारी मदत न घेणाऱ्या शिक्षणसंस्था किंवा कोणत्याही प्रकारें शिक्षणखात्याची मान्यता घेण्यांत न आलेल्या संस्था या सर्व शिक्षणसंस्था खासगी समजल्या जातील.

( २ ) पुढें दिलेल्या अधिकाऱ्यांची परवानगी घेतल्याशिवाय यापुढें कोणाही व्यक्तीस किंवा संघास खासगी शिक्षणसंस्था काढतां येणार नाहींत. ( अ ) मुलांकरितां काढावयाच्या खासगी प्राथमिक शाळेकरितां त्या भागांतील डिव्हिजनल इन्स्पेक्टरची परवानगी घ्यावी; ( ब ) मुलांमुलींकरितां काढावयाच्या खासगी मिडल किंवा हायस्कूलच्या बाबतींत शिक्षणखात्याच्या मुख्याधिकाऱ्याची परवानगी घ्यावी. ( क ) मुलींकरितां खासगी प्राथमिक शाळा काढणें असेल तर मुलींच्या शाळा तपासणाऱ्या स्त्री इन्स्पेक्टरची किंवा त्या भागांतील डिव्हिजनल इन्स्पेक्टरची परवानगी घेतली पाहिजे.

( ३ ) खासगी शिक्षणसंस्था काढूं इच्छिणाऱ्या व्यक्तीनें किंवा संघानें नियम नं. ३ मध्यें दिल्याप्रमाणें अधिकाऱ्यांकडे खालील मुद्यांचा उलगडा करून परवानगी करितां सांगितलेल्या नमुनापत्रकावर अर्ज लिहून पाठवावा. ( अ ) संस्था काढण्याचा उद्देश; ( ब ) तेथें चालावयाचा अभ्यासक्रम; ( क ) शाळा ज्या इमारतींत भरणार त्या इमारतीचें वर्णन व ( सभोंवतालची ) स्थिति आणि ( ड ) शाळेंत ठेवावयाच्या शिक्षकांची संख्या व त्यांची शिक्षण-विषयक योग्यता.

( ४ ) सरकारी किंवा सरकारी मान्यता पावलेल्या कोणत्याही शाळेंतील मुलगा त्यानें सोडलेल्या शाळेच्या अधिकाऱ्यांचें शाळा सोडल्याबद्दल प्रमाण-पत्र हजर करीपर्यंत खासगी शाळांनीं आपल्याकडे दाखल करून घेऊं नये.

( ५ ) सरकारी, मदत घेणाऱ्या किंवा सरकारी मान्यता पावलेल्या शाळेच्या अधिकाऱ्यांचें प्रमाणपत्र दाखल केल्याशिवाय एखादा मुलगा शाळेंत घेतला गेल्यास त्या शाळेच्या अधिकाऱ्यांकडून कळविण्यांत येतांक्षणींच त्या मुलास शाळेंतून घालवून दिलें पाहिजे.

( ६ ) सांसर्गिक रोगांनीं दूषित नाहीं अशा कोणत्याही मुलास, त्याची **जात किंवा धर्म** विचारांत न घेतां खासगी शाळांनीं आपल्या शाळेंत दाखल करून घेतलें पाहिजे. ( यास अपवाद ) अधिकाऱ्यांच्या परवानगीनेंच पण विशिष्ट जातीच्या हितार्थ व विवक्षित कारणानें चालविलेल्या संस्थेस हा नियम लागूं नाहीं.

( ७ ) खासगी शाळांनीं आपल्या अभ्यासक्रमांत खालील गोष्टी ठेवू नयेत. ( अ ) अन्यधर्मीय विद्यार्थ्यांच्या धार्मिक भावना दुखविल्या जातील असें धार्मिक शिक्षण, व ( ब ) निजामसाहेब, निजामसरकार व राजकुटुंबांतील व्यक्ती-विषयीं अश्रद्धा उत्पन्न होण्यासारखें शिक्षण.

( ८ ) महिना अखेर व वर्ष अखेर प्रत्येक खासगी शाळेनें ठरलेल्या तारखेस शाळेचा अहवाल डिव्हिजनल इन्स्पेक्टरकडे किंवा शिक्षणखात्याच्या मुख्याधिकाऱ्याकडे पाठवून द्यावा.

( ९ ) हें पत्रक प्रसिद्ध होण्यापूर्वी अस्तित्वांत असलेल्या सर्व खासगी शाळांच्या उत्पादकांनीं किंवा चालकांनीं हें पत्रक प्रसिद्ध झाल्यापासून तीन महिन्यांच्या आंत ठराविक नमुनापत्रकावर नि. नं. ३ ( अ ) ( ब ) ( क )

( ड ) यांत दर्शविल्याप्रमाणें आपल्या संस्थेसंबंधीं सर्व माहिती संस्था स्थापन झाल्याच्याबरोबर तारखेसह त्या भागांतील डिव्हिजनल इन्स्पेक्टर-कडे कळवावी.

( १० ) या नियमपत्रकाला अनुसरून परवानगी घेतल्याशिवाय हें पत्रक प्रसिद्ध झाल्यानंतर एखादी खाजगी शिक्षणसंस्था उघडली गेली किंवा वरील नियम ८ प्रमाणें मासिक किंवा वार्षिक अहवाल अधिकाऱ्यांकडे सादर करण्यांत किंवा अन्य रीतीनें हे नियम पाळण्यांत चूक झाली तर ती शिक्षण संस्था बंद करण्याकरितां शिक्षणखात्याचे मुख्याधिकारी किंवा डिव्हिजनल इन्स्पेक्टर त्या जिल्ह्याच्या पहिल्या वर्गाच्या तालुकदारामार्फत किंवा हैद्राबाद शहराच्या **पोलिस कमिशनरमार्फत** जरूर ती तजवीज करतील.

( ११ ) शिक्षणखात्यांतील सर्व अधिकाऱ्यांना तपासणीकरितां खासगी शिक्षणसंस्था खुल्या ठेवण्यांत याव्या व संस्थांच्या चालकांनीं व संस्थापकांनीं तपासणीच्या प्रसंगीं जरूर ती मदत व सवलती दिल्या पाहिजेत.

( १२ ) नवीन खासगी शाळा उघडण्यास परवानगी देण्याचा अधिकार असलेल्या अधिकाऱ्यांस परवानगी नाकारण्याचा किंवा जरूर तर असलेली शाळा बंद करण्याकरितां अवश्य त्या गोष्टी करण्याचा अधिकार आहे. परंतु वरील कोणत्याही प्रसंगीं त्यांनीं आपल्या कृत्याचें कारण स्पष्टपणें दाख-विलें पाहिजे.

( १३ ) वरील नियम करण्यांत नवीन खासगी शाळा उघडण्यास कोण-त्याही प्रकारें आडकाठी करण्याचा सरकारचा यत्किंचित्‌हि उद्देश-नसल्यानें अशा खासगी शाळा शैक्षणिक, सामाजिक नैतिक किंवा राजकीय दृष्ट्या विघातक असल्याचें जोंपर्यंत निर्दशनास आलें नाहीं तोंपर्यंत त्यांस डिव्हिजनल इन्स्पेक्टर व शिक्षणाधिकारी सर्व प्रकारें मदतच करतील अशी सरकारची अपेक्षा आहे.



# खासगी संस्थांचा कायदा आणि जनतेचें कर्तव्य.



आणखी एका आठवड्यानें म्हणजे ता. १५ खुर्दाद १३३५ पासून खाजगी शिक्षणसंस्थांच्या इतिहासांत बरीच मोठी क्रांति घडून येणार आहे. सन १३३५ फ. च्या खाजगी शिक्षणसंस्थांच्या संबंधींच्या कायद्याबरहुकूम ज्या शाळा सरकारी शिक्षणखात्याच्या अधिकाऱ्यांची परवानगी घेणार नाहींत त्यांच्या दरवाजाला कुलुपें ठोकण्यांत येतील. अशा शाळांचे चालक किंवा प्रवर्तक जर कायद्याचें अतिक्रमण करण्याचें साहस करतील तर त्यांच्या हालचालीवर पोलिसांची नजर राहील, न जाणो सरकारी अधिकाऱ्यांची आज्ञा उल्लंघन करण्याचा आरोप ठेवून त्यांना न्यायकोर्टांत हजर करण्यांत येईल व आरोपी म्हणून त्यांना वागविण्यांत येऊन आरोप शाबीत झाल्यास बिनभाड्याच्या घराकडेही त्यांची रवानगी करण्यांत येईल. हें सर्व कशा करितां तर मे. नाजम साहेब तालीमात यांनीं आपल्या सहीशिक्यानिशीं सन १३३५ फ. चा खाजगी शिक्षणसंस्थांचा कायदा जो प्रसिद्ध केला आहे त्यांतील नियमांचें उल्लंघन करण्यांत येईल म्हणून ! उपरिनिर्दिष्ट कायदा काय आहे हें विजयाच्या वाचकांना यापूर्वींच माहीत झालें आहे. विशेषतः सदरहू कायदा प्रजाजनांच्या सर्वमान्य व जन्मसिद्ध हक्कांची पायमल्ली करणारा असल्यामुळें तो रद्द करण्यांत यावा अशा प्रकारची सविनय प्रार्थना दयाळू निजामसाहेबांना करण्याचें हैद्राबादच्या नागरिकांनीं ठरविल्याचें जाहीर झाल्यापासून जनतेचें लक्ष्य सदरहू कायद्याकडे विशिष्टरीतीनें ओढलें गेल्यास नवल नाहीं. म्हणूनच प्रस्तुतच्या परिस्थितींत जनतेचें काय कर्तव्य असलें पाहिजे याची त्यांना अंधुक कल्पना आणून देण्याच्या हेतूनें या कायद्यासंबंधीं थोड्या विस्तारानें विवेचन करण्याचें योजिलें आहे.

हा कायदा मौ. नाजम साहेबांच्या सहीशिक्यानिशीं प्रसिद्ध झाल्यानंतर त्याचा पहिला प्रयोग यशस्वी करून दाखविण्याचा विडा सदर मोहतमीम साहेब तालीमात, गुलबर्गा, यांनीं उचलून स्थानिक वृत्तपत्रांतून तशा प्रकारचा आपला

मनोदयही दोन तीन महिन्यांपासून जाहीर केला आहे. अशा रीतीनें खासगी संस्थांचें सर्वांशीं न झालें तरी बहुतांशीं निर्मूलन करण्याचें श्रेयही संपादन करण्याची सात्विक इच्छा असणें स्वाभाविक आहे. किंबहुना अंगीकृत कार्यात यश येण्याकरितां अरेरावीपणाकरितां नांवाजलेल्या पोलिस खात्याचीही मदत घेण्यांत येत आहे. आपल्या हद्दींत असलेल्या शाळांसंबंधीं माहिती मिळवून घेऊन वरील कायद्याप्रमाणें मंजुरी न मिळविलेल्या शाळा बंद करण्याचें सत्कार्यही या खात्याकडूनच घडविण्यांत येईल अशा प्रकारचा उपक्रम सुरू झाला असल्यामुळें खेड्यापाड्यांतून शाळा घातलेल्या तात्या पंतोजींचें विशेषेंकरून व सर्व साधारण शिक्षणप्रेमी जनतेचें सामान्येंकरून धाबें दणाणलें आहे. एक तप किंवा त्याहूनही अधिक कालपर्यंत शिक्षणदानाचें कार्य बजावीत असलेल्या संस्थांच्या चालकांपुढें देखील हा मोठा प्रश्न येऊन पडला आहे.

या कायद्याच्या परिणामाचा विचार करण्यापूर्वीं तो ज्या परिस्थितींत जन्माला आला आहे तिचाही विचार करणें अप्रासंगिक होणार नाहीं. सामान्यत सरकार आलीच्या राज्यांत जें कायदे कौन्सिल प्रस्थापित आहे त्यालाच कायदे करण्याचा हक्क असतो व आलीं हजरत बंदगान आलीची त्याला संमति मिळाल्यानंतर तो कायदा अंमलांत येत असतो. या सामान्य पद्धतीप्रमाणें हा कायदा जन्मास येता तर आलाहजरत किंवा कायदेकौन्सिलचे नामदार सभासदांकडे दाद मागून घेणें रास्त झालें असतें. हैद्राबाद कायदे कौन्सिलांस लोकनियुक्त सभासदांचें प्रमाण नसलें तरी जे सरकारनें निवडलेले असतात ते बहुधा विद्वान, बहुश्रुत, अनुभवी व लोकहिताविषयीं दक्ष असतात. व ते जे कायदे करतात ते फारच विचारपूर्वक व बराचसा ऊहापोह झाल्यावर निर्माण होतात एखादा विशिष्ट कायदा अस्तित्वांत आल्यानें जनमत प्रक्षुब्ध होण्यासारखें असल्यास त्याचा पूर्ण विचार केला जातो व नंतर कोणती तरी निश्चित योजना अंमलांत येत असते. अशा रीतीनें हा कायदा मूर्त स्वरूपांत आला असता तर तक्रार करण्याचें फारसें प्रयोजन राहिलें नसतें. निदान जनतेला आपलें म्हणणें कायदेकौन्सिलच्या नामदार सभासदांना कळविण्याची संधि मिळाली असती व त्यांनींही अवश्य विचार केला असता. पण तसा प्रकार येथें नाहीं. मि. मौ० नाजमसाहेब अशा प्रकारचा कायदा आपल्या अधिकारकक्षेंत करतात व लागलीच त्याचा प्रयोग सुरू करण्याचें जाहीर केलें जातें. हें सारेंच विलक्षण नव्हे

काय ! पण त्यांत विलक्षण तरी काय आहे ! आमच्च्या येथें जें होतें तें नेहमीं अद्भुतच होत असतें, हें घ्यानांत ठेवलें असतां सारी उपपत्ति बरोबर लागण्यासारखी आहे.

या कायद्यांतील कलमांचें सूक्ष्मरीतीनें निरीक्षण करणाऱ्यास कायदा दिसतो तितका साधा व निरुपद्रवी आहे असें मुळींच वाटणार नाहीं. सरकारी शिक्षणखात्यांत नव्या मनूचा प्रवेश झाल्यापासून खेड्यापाड्यांत सुद्धां सरकारी शाळा होऊं लागल्या आहेत. जिल्ह्यांत ठळक गांवीं हायस्कूलें व तालुक्यांतील प्रमुख ठिकाणीं मिडलस्कुलें असावींत व अशा रीतीनें शिक्षणाचा सार्वत्रिक प्रसार व्हावा अशी योजना करण्यांत आली व त्याचा तादृश फायदा न झाला तरी थोडाफार उपयोग होत असल्याचें दिसून येत आहे. उस्मानिया युनिव्हर्सिटीच्या प्रवेशपरीक्षेला बसणाऱ्या मुलांची संख्या वर्षानुवर्षे झपाट्यानें वाढत आहे. कॉलेजचें शिक्षण घेण्याची गोडी उत्पन्न होऊं लागली आहे. युनिव्हर्सिटीचा शिक्कामोर्तब घेतलेले पदवीधर झपाट्यानें बाहेर पडून आपल्या सुयशांच्या दुंदुभीनें सारी रियासत गजबजून सोडीत आहेत. इतर सुधारलेल्या संस्थानांप्रमाणें आमच्या राज्यांतही शिक्षणाप्रीत्यर्थ लाखों रुपयांचा खर्च होऊं लागला आहे. जनतेला ‘ शहाणे ’ करून सोडावें याच सद्धेतूनें सरकारी अधिकारी अविश्रांत परिश्रम घेत असतां जनतेनें विनाकारण आपल्या पदरचे पैसे खर्च करून खाजगी संस्था चालविण्याचें प्रयोजन मुळींच नाहीं, असें वाटून निष्कारण खर्चीं पडत असलेला पैसा वांचावा या परोपकारबुद्धीनेंच हा प्रयत्न होत असावा अशी सकृद्दर्शनीं समजूत होणें साहजिक आहे. पण वास्तविक तशी स्थिति नाहीं. ह्या विचारसरणीचा फोलपणा थोड्या विचारांतीं सुद्धां दिसून येण्यासारखा आहे. सरकारी शिक्षणसंस्थांतून शिक्षणाचें माध्यम उर्दू असल्याकारणानें मुसलमान, मुलांखेरिज इतरांस प्राथमिक दुय्यम व थोड्याफार प्रमाणांत उच्चप्रतीचें शिक्षण घेण्यांत बराच त्रास पडतो. शिक्षकांनीं आपल्यापरीनें समजून देण्याचा प्रयत्न करावा, पण मुलांच्या डोक्यांत कांहींच शिरूं नये असाही अनुभव पुष्कळ वेळां येतो. विशेषतः लहान मुलांना त्यांच्या मातृभाषेंतून शिकविण्यांत येईल तर त्यांच्या अंतःकरणांत तें जितकें लौकर रुजेल तितकें परभाषेंतून रुजणें शक्य नाहीं असा अनुभव येऊं लागल्यामुळेंच शिक्षणतज्ज्ञांनीं उस्मानिय युनिव्हर्सिटीची कल्पना मूर्त

स्वरूपांत आणली. जो अनुभव परकीय आंग्लभाषेसंबंधीं आमच्या शिक्षणाधिकाऱ्यांना आला तोच अनुभव उर्दू मातृभाषा नसणाऱ्या मुलांच्या पालकांना आला असल्यास अस्वाभाविक तें कोणतें ? व असें वाटूं लागल्यामुळें सरकारी शाळांपेक्षां तात्यापंतोजींच्या गांवठी शाळा त्यांना अधिक प्रिय वाटत असल्यास व म्हणून अशा शाळांतून मुलांची गर्दी दिसून येत असल्यास त्याचा विषाद कां मानण्यांत यावा ? थोड्या कालांत नित्य व्यवहाराला पुरेसें शिक्षण, लिहिणें, वाचणें, हिशेब वगैरे मिळत असतांना दीर्घकाल लागून अखेर व्यवहारशून्यतेचा शिक्का मिळवून देणाऱ्या शिक्षणसंस्थांत मुलांना घालून त्यांच्या पालकांचें काय हित साधणार आहे ? रोजच्या रोज वाढत जाणाऱ्या दारिद्र्यामुळें आपल्या मुलांनीं वयाचीं पंचवीस तीस वर्षें म्हणजे सुमारें आयुष्याचा अर्धाभाग शिकण्यांत घालून निःसत्व, पोंचट, व परावलंबी बाहेर पडणें केव्हांही श्रेयःस्कर नाहीं.



# शाळाखात्याच्या परवानगीचा काच.



खासगी शिक्षण संस्थांवर कोणत्याही प्रकारें सरकारी नियन्त्रण नसावें, असें येथील जनतेनें अर्ज, सभा, निषेध इत्यादिकांच्या द्वारें आपलें मत सरकारला वेळोवेळीं स्पष्टपणें कळविलें आहेच; परंतु शिक्षण खात्यांतील अधिकाऱ्यांच्या निढावलेल्या मनावर त्याचा यत्किंचितहि परिणाम झाल्याचें दिसत नसून त्यांच्या लीला दिवसेंदिवस वाढत्या प्रमाणावर चालल्या आहेत. पंधरा दिवसांपूर्वीं परभणीची शाळा परवानगी न घेतल्यामुळें बंद करण्यांत आली व आज औरंगाबाद जिल्ह्यांतील वैजापूर गांवांतील खासगी शाळेच्या मानेभोंवती अधिकाऱ्यांच्या लहरीचा–कायद्याचा नव्हे–फास पडला असून एक महिन्याच्या मुदतींत परवानगीच्या मृत्युंजय मात्रेचे वळसे तिला न मिळाल्यास हें मुदतीचें दुखणें तिलाहि भोंवल्याशिवाय राहील असें दिसत नाहीं. सरकारी दप्तरांत कोणताहि कायदा असला किंवा नवीन पास केला तरी त्याची अंमलबजावणी करतांना खालच्या अधिकाऱ्यांनीं सारासार विचार न करणें म्हणजे मानव्याला आपण पारखे झालों असें दाखविण्यासारखेंच आहे. शस्त्रागारांत असलेलें किंवा नवीन विकत घेतलेलें एखादें शस्त्र घेऊन त्याचा स्वैरेच्छ उपयोग करणारा एक तर आततायी समजला पाहिजे किंवा वेडा तरी समजलें पाहिजे व असें ठरल्यानंतर पहिल्याची जागा म्हणजे तुरुंग व दुसऱ्याची वेड्याचें इस्पितळ! परंतु अशा रीतीनें आपल्या अधिकाराचा अधिकारी लोक दुरुपयोग करीत असलेलें प्रत्यक्ष पहात असूनहि सरकार ज्या अर्थीं स्वस्थ आहे त्या अर्थीं हें भलतेंच शस्त्र अधिकाऱ्यांच्या हातीं देण्यांत सरकारचाच दुष्ट हेतु आहे, असें लोकांनीं म्हटल्यास त्यांत त्यांची चूक काय? खासगी शाळांविषयींची असली सहानुभूति अधिकाऱ्यांकडून आरंभींच दाखविली गेल्यानंतर परवानगी याचा सरळ अर्थ म्हणजे बंदी असा त्यांनीं केल्यास त्यांचा तरी दोष काय?

खासगी शाळेला परवानगी मिळविण्याकरितां जो अर्ज करावयाचा त्यांत कोणकोणत्या गोष्टी नमूद केलेल्या असल्या पाहिजेत, याचा तपशील आम्ही खालीं देत आहों. कायद्याचा दुरुपयोग करण्याची अधिकाऱ्यांची सांप्रतचीच लहर अर्ज मंजूर करतांनाहि कायम राहिली. व ती तशी राहणार हाच नित्याचा अनुभव तर या तपशीलांतील प्रत्येक मुद्दा संस्थेच्या विघाताला कसा कारणीभूत होणार

आहे, हें थोडक्यांत आम्ही खालीं दाखविणार आहोंच, परंतु विचार करणाऱ्या कोणाहि मनुष्यास ही गोष्ट सहज समजून येणार आहे. अर्जांत नमूद करावयाच्या गोष्टी म्हणजे ( अ ) शाळेचें ठिकाण ( ब ) शाळा काढण्याचा हेतु ( ज ) शाळेची इमारत ( फ ) अध्यापक वर्ग व त्यांची योग्यता. हा कायदा पास होण्यापूर्वी शाळा चालू असल्यास ती पूर्वी किती दिवस चालू आहे, त्याचा उल्लेख, या होत. वरील चारी मुख्य कलमाखालीं कांहीं पोटकलमें आहेत. तीं येणेंप्रमाणें:—( १ ) शाळेचें नांव ( २ ) शाळेच्या चालकांचें नांव ( ३ )शाळेच्या सेक्रेटरीचें नांव ( ४ ) शाळा काढण्याचा हेतु व शिक्षणाचे प्रकार ( ५ ) शिक्षणाचें माध्यम ( ६ ) शाळेच्या इमारतीचें वर्णन ( अ ) खोल्यांची संख्या-त्यांची लांबी, रुंदी व उंची ( ब ) खेळण्याच्या मैदानाची सोय व क्षेत्रफळ ( ज ) तेथील हवापाणी ( ७ ) अध्यापक व त्यांची योग्यता ( ८ ) किती मुलें जमूं शकतील व किती वर्ग पडतील ? ( ९ ) प्रत्येक वर्गात मुलाला फी काय असेल ? ( १० ) पुस्तकालयाची व्यवस्था कशी आहे ? ( ११ ) अध्यापक व मुलें यांच्याकरितां खुर्च्याबाकांची व्यवस्था काय आहे ? ( १२ ) परवानगी मिळाल्यास शिक्षणखात्याकडून वेळोवेळीं प्रसिद्ध होणारे नियम पाळले जातील किंवा नाहीं ?

नवीन कायद्याची अंमलबजावणी आज तरी बाहेर अधिक होत आहे. व खासगी शाळा बऱ्याचशा बाहेर असून त्या विशेषतः प्राथमिक शिक्षण देणाऱ्याच आहेत. वर दिलेल्या तपशीलांतील मुद्याची सक्तीनें अंमलबजावणी करण्याचें शिक्षणखात्यांतील अंमलदारांनीं ठरवल्यास अशा शाळांच्या चालकांस सरकारी अधिकाऱ्यांस खूष करून परवानगी मिळवणें शक्य नाहीं. बाहेर गांवीं चालू असलेल्या शाळा भरतात कोठें, चालतात कशा, चालविणारे कोण असतात वगैरे गोष्टी अधिकाऱ्यांस ठाऊक नाहींत असें नाहीं; इतकेंच नव्हे तर खासगी शाळांना परवानगी मिळण्यास अवश्यक म्हणून ज्या गोष्टी सांगण्यांत येतील निदान ज्यांचा वरील यादींत उल्लेख केला आहे, त्यांतील प्रत्येक गोष्ट कायद्याची कडक दृष्टि लावून सरकारी शाळांतून एकदम घडवून आणण्याचें अधिकाऱ्यांनीं मनांत आणलें तरी त्यांसाहि तें शक्य न होतां शाळा बंद करणेंच भाग पडेल. मग सर्व समर्थ सरकारलाहि ज्या गोष्टी एकदम घडवून आणतां येणार नाहींत त्यांची गरीब बिचाऱ्या खासगी शाळांवर घोरपड लादणें म्हणजे अन्याय

नव्हे काय ? परवानगीचा जाच किती जाजक होण्याचा संभव आहे ही गोष्ट बरोबर समजण्यास खेडेगांवांतील खासगी शाळांची खरी परिस्थिति काय आहे हें प्रथम समजलें पाहिजे. पुढील अंकांत त्या परिस्थितीची रूपरेषा वाचकांस देऊन व तेथील परिस्थितीच्या दृष्टीनें अर्जांतील मुद्दे कसे विघातक आहेत याचा ऊहापोह करण्याचें आश्वासन देऊन वाचकांची सध्यां रजा घेतो.

( नि. वि. )

## शिक्षणखात्याच्या परवानगीचा जाच.

परवानगी घेण्याकरितां करावयाच्या अर्जांत कोणत्या गोष्टींचा उल्लेख करणें जरूर आहे हें मागलि अंकांत आपण पाहिलें आहे व त्यावरून खासगी शाळांच्या चालकांनीं आपल्या शाळा कशा रीतीनें चालविल्या पाहिजेत अशी शिक्षणखात्याची अपेक्षा आहे याविषयींहि थोडींबहुत कल्पना आपणांस आलीच आहे. खासगी शाळांची आजची परिस्थिति पहातां सरकारी शिक्षणाधिकाऱ्यांची वरील अपेक्षा शाळांच्या चालकांस पूर्ण करणें कितपत शक्य आहे हें पुढें दिसेलच; परंतु प्रथम विचारांत घ्यावयाचा प्रश्न म्हणजे ‘ खासगी शाळा निघतातच कां ? लोकांनीं खासगी शिक्षण संस्था चालवाव्याच कां ? प्राथमिक शिक्षण प्रजेला मोफत व सक्तीनें देणें प्रत्येक सुधारलेल्या सरकारचें आद्य कर्तव्य आहे. व आपल्या कर्तव्याकडे डोळेझांक करणाऱ्या सरकारला कर्तव्यच्युतीमुळें लोकांच्या ज्या गैरसोई होणार, त्या त्यांनीं आपल्या खासगी प्रयत्नानें दूर करण्याचा प्रयत्न केल्यास सरकारला त्यांत ढवळाढवळ करण्यास अधिकार कसा पोंचतो ? आपल्या अशिक्षित व अडाणी मुलांस सज्ञान व जीवनक्षम करणें हें प्रत्येक सुजाण पालकाचें कर्तव्य त्या पालकानें न ओळखल्यास त्या मुलावरच त्या पालकाचे सर्व अधिकार कायद्यानें नष्ट होतात. अधिकार व जबाबदारी यांचें आत्यंतिक साहचर्य आहे. जबाबदारी न ओळखणाऱ्याच्या अधिकारांनाहि आपोआपच तिलांजलि मिळते. शाळाखात्यानें आतांपर्यंत लोकांच्या शैक्षणिक गरजा पुरवण्याविषयीं स्वतःची नालायकी प्रस्थापित केल्यामुळेंच जनतेस स्वतःची सोय स्वतः होऊन पहावी लागली व ती करतांना त्यांच्या सवडी, जरूरी वगैरे पाहून त्याप्रमाणें ती करण्यांत येणें स्वाभाविक असल्यानें अशा संस्था शिक्षणाधिकाऱ्यांच्या अधिकारकक्षेंतच येत नाहींत. स्वतःची जबाबदारी ओळखून लोकांचे धर्म, भाषा, आचार, विचार इत्यादिकांस अनुरूप अशा

जागोजाग शिक्षणाच्या शाळा स्थापन करणें किंवा लोकांच्या गरजा भागविण्यास आपण असमर्थ असल्याचें आढळल्यास मूग गिळून स्वस्थ बसणें याशिवाय तिसरा मार्ग, कायदा व नीति यांचा खून केल्याशिवाय शिक्षणाधिकाऱ्यांस अनुसरतां येत नाहीं, असें आमचें स्पष्ट मत आहे.

शहर ह्मणतां न येईल अशा कोणत्याहि गांवांत साधारणतः १५ पासून ५०० पर्यंत घरें असतात. अगदीं लहान म्हणजे १५।२० घरें असणाऱ्या गांवांत खासगी शाळाहि काढणें कठीणच जातें. याहून अधिक घरें असणाऱ्या गांवांतून गांवच्या लोकसंख्येच्या कमी अधिक प्रमाणांत येथें पांढरपेशे म्हणून समजल्या जाणाऱ्या लोकांची वस्ती धंद्याच्या निमित्तानें झालेली असते. व ही वस्ती चिरस्थायी झाली म्हणजे स्वतःच्या धंद्याला उपयुक्त असें शिक्षण मुलांना देण्याची त्यांस आवश्यकता भासते व त्याप्रमाणें साधारण लेखनवाचन, हिशेब वगैरे शिकवितां येणारा एखादा मनुष्य ठेवण्यांत येऊन जरूरीपुरतें शिक्षण देण्याचें काम चालू होतें. पुढें या गांवांतील प्रतिष्ठित लोकांच्या मुलांच्या साहचर्यानें येथील कनिष्ठ वर्गांतही जागृति होऊन त्यांचीं मुलेंहि हळूहळू त्या शिक्षकाजवळ येऊं लागतात व अशी ५।५० मुलें शिक्षणार्थ एकत्र जमूं लागलीं कीं झाली शाळा! अधिकाऱ्यांची शाळेची कल्पना खेड्यांतील लोकांस कळत नसते. हीं सर्व मुलें कधीं देवळांत तर कधीं मशिदींत, कांहीं ठिकाणीं केवळ एखाद्या झाडाखालीं बसूनहि आपलें कार्य चालवीत असतात. गांवांतील सधन समजला जाणारा वर्ग वर्गणी करून त्या मास्तराच्या उपजीविकेची व्यवस्था पहात असतो. तेथें एखादें बोर्ड नसतें, सोसायटी नसते, शाळेला ‘ शाळा ’ यापलीकडे नांव नसतें, चालक म्हणून कोणी ठरलेले नसतात, सेक्रेटरीची त्यांस जरूरी लागत नाहीं; किंवा इमारतच नसल्यानें खोल्यांची संख्या किंवा त्यांची लांबी रुंदीही कोणास ठाऊक नसते! तेथें दिल्या जाणाऱ्या शिक्षणांत लेखन, वाचन, जमाखर्च वगैरे अगदीं साध्या गोष्टी शिकविल्या जातात. ज्ञानाचा याहून अधिक मोठा साठा जगांत आहे याची कल्पना खुद्द मास्तरांनाहि क्वचितच असेल; मग मुलांची तर गोष्टच बोलावयाला नको. खेडेगांवांतून मोकळ्या हवेची योजना निसर्गनिर्मितच असल्यानें तेथें मुलांना मोकळ्या हवेवर खेळण्याकरितां निराळी तजवीज करण्याची जरूरी नसते व शाळेंतील पुस्तकाव्यतिरिक्त मास्तरांना शिकविण्यास वेळहि नसतो व मुलांना समजण्याची अक्कलहि नसते. त्यामुळें वाचनालयाची

आवश्यकताच नसते. शिक्षणाच्या माध्यमाची त्यांस कल्पनाही नसते. मुलांस ज्या भाषेंत चांगलें समजेल त्या भाषेंत शिक्षक त्यास समजावून देत असतो. ज्या ठिकाणीं वर दिलेल्या संख्येहून अधिक मुलें जमण्याचा संभव असेल त्या ठिकाणीं मास्तरांची संख्याहि थोडी अधिक असेल व अशा ठिकाणीं त्या शाळेचें स्वरूपहि थोडें अधिक व्यवस्थित असेल इतकेंच.

अशा शाळांच्या चालकांनीं अर्जांतील कलमें भरावयाचीं कशीं ? शिक्षण खात्यांतील अधिकाऱ्यांस वरील शाळांची परिस्थिति ठाऊक असूनहि ज्या अर्थी केवळ शहरांत व तेंसुद्धां मिडल किंवा हायस्कूल सारख्या संस्थांत देखील ज्या अटी पूर्ण करणें शक्य होणार नाहीं, अशा अटी वरीलसारख्या शाळांवर लादण्याचा उद्देश व्यक्त केला आहे, त्या अर्थी वरील शाळा बंद करण्याचा हा घाट आहे असें कां समजूं नये ? सरकारची खरोखरच इच्छा वरील शाळांची परिस्थिती सुधारावी अशी असेल तर त्यांनीं एकहि शाळा बंद न करतां त्यांचें अस्तित्व हीच त्यांच्या उपयुक्ततेची खूण समजून सर्व शाळांना तेथील मास्तरांचा पगार, जागेचें भाडें व इतर जरूर असणाऱ्या खर्चाची तजवीज करण्याकरितां पुढें व्हावें, म्हणजे त्यांत निदान सद्धेतु असल्याचें तरी दिसून येईल; व मग खासगी शाळांच्या कारभारांत ‘ पाहिजे ’ ‘ नको ’ म्हणण्याचा सरकारला अधिकार तरी प्राप्त होईल. परवानगी मिळेल किंवा नाहीं याचीच जेथें वानवा अशा वेळीं एखाद्या शाळेच्या चालकांनीं शाळेकरितां इमारत भाड्यानें अगोदर घ्यावयाची कशी ? किंवा इतर साहित्य गोळा करावयाचें कोणत्या आधारावर ? परवानगी नाकारली गेल्यास ही जुळवाजुळव करतांना झालेल्या खर्चाबद्दलची जबाबदारी सरकार घ्यावयास तयार आहे काय ? परवानगी देणें किंवा न देणें अधिकाऱ्यांच्या लहरीचा प्रश्न असून ती व्यक्त करतांना अस्ति किंवा नास्तिपक्षीं उत्तर देण्यांत त्यांचें स्वतःचें किंवा शिक्षणखात्याचेंहि कांहीं नुकसान होण्यासारखें नसतें. परंतु चालकांना मात्र त्यामुळें जबर नुकसान सोसावें लागणार आहे. याची वाट काय ? जनतेच्या हिताहिताची काळजी वहाण्याचा टेंभा मिरवणारांनीं या गोष्टीचा विचार करूं नये याचें आश्चर्य वाटतें.

परंतु या सर्वांहून आम्हांला भीति वाटते ती त्यांतील शेवटच्या कलमाची ! शाळाखात्याचा प्रत्येक हुकूम शाळेच्या चालकांनीं मानला पाहिजे व तसा

तो मान्य करण्यास ते तयार आहेत, किंवा नाहींत, अशी पृच्छा करण्यांत आली आहे. शिक्षणखात्याचे वाजवी असलेले हुकूम पाळण्यास कोणालाहि कमीपणा वाटण्याचें कारण नाहीं. परंतु एकदां कां वरील अट पाळण्याचें कबूल केलें कीं खासगी शाळांच्या चालकांच्या पाठीमागें इन्स्पेक्टर लोकांची सारखी टुरटुर लागून राहील व अगदीं क्षुल्लक बाबींत देखील शाळेच्या चालकांना ते सळो का पळो करून सोडतील. कोणत्याहि खात्यांतील अधिकाऱ्याला अधिकार गाजविण्याची पूर्ण संधि मिळाल्यास त्याची अरेरावी पोलिसच्या दंडेलीलाही केव्हां केव्हां मागें सारूं शकते याचा अनुभव जनतेस कांहीं नव्यांदां नाहीं; दुसरी गोष्ट अशी कीं येथें संस्थानांतील उर्दू व्यतिरिक्त इतर भाषांच्या जोपासनेंकडे बुद्ध्या दुर्लक्ष करण्याची जी अधिकाऱ्यांची प्रवृत्ति पदोपदीं नजरेस येते ती पहातां शिक्षणाधिकाऱ्याकडून त्या बाबतींत विक्षिप्त-पणाचे हुकूम निघाल्यास ते पाळणें म्हणजे शाळेचा जो मूळ उद्देश मातृभाषेंतून शिक्षण देणें त्यावरच गदा येणार असल्यानें असें हुकूम पाळणें अर्थातच जड जाणार व मूळ कायद्याचा तसा हेतु नसतांनाहि अधिकाऱ्यांकडून तसे हुकूम निघणार नाहींत याला प्रमाण काय ? असे हुकूम दिल्यानंतर आपली चूक नजरेस आल्यावर तो हुकूम माघारा घेणारे कांहीं अधिकारी असतात असाहि अनुभव आहे, नाहीं असें नाहीं. परभणीच्या शाळेला औरंगाबाद शिक्षणखात्यां-तील चीफ इन्स्पेक्टर साहेबांनीं पूर्वीचा हुकूम परत घेऊन पुनः शाळा चालू कर-ण्यास परवानगी दिली आहे याबद्दल सर्व लोक त्यांचे आभार मानतील यांत शंका नाहीं. परंतु अशा मनोधैर्याचीं माणसें सर्वच ठिकाणीं कशीं मिळणार ? व म्हणून आमचें असें म्हणणें आहे कीं, शाळेंत काय काय गोष्टी आहेत त्यांची तपशीलवार यादी अर्जदाराकडून मागविण्यापेक्षांहि शाळेंत असें असें सामान असलें पाहिजे व अशा अशा तऱ्हेनें शाळा चालली पाहिजे, तरच ती चालण्यास पात्र समजली जाईल, असें स्पष्ट जाहीर करणें व विवक्षित तयारी करण्याकरितां त्यांस १।२ वर्षांची मुदत देणें हें अधिक युक्त नव्हे काय ? बाहेरगांवातील खासगी शाळांची परिस्थिति व सरकारी अधिकाऱ्यांचें खासगी शाळासंबंधीं आतांपर्यंत दिसून आलेलें धोरण यांचा कोठेंच मेळ पडत नसल्यानें या परवान-गीच्या काचांतून कोणतीहि खासगी शाळा सुरक्षित बाहेर पडेल असें आम्हांला वाटत नाहीं. आमची ही भीति, निराधार ठरल्यास आम्हांस आनंदच आहे.

( नि. वि. )

---

# गुलबर्गा येथील मुसलमानांचे अत्याचार.

## हिंदूंच्य देवळांचा विध्वंस.

### गोळीबार व प्राणहानि.

( निझाम विजयांतील बातमीपत्र )

हैद्राबाद येथें ता. १२–१३ ऑगस्ट इ. स. १९२४ पासून गुलबर्गा मुक्कामीं हिंदु मुसलमानांच्या तंट्याबद्दल निरनिराळ्या बातम्या ऐकूं येऊं लागल्या व शुक्रवार ता. १५ आगस्ट रोजीं अशी खबर आली कीं तेथें हा तंटा बराच विकोपास गेला असून त्यांत एक सी. आय. डी. खात्याचा मोहतमीम गोळी लागून मेला व आणखीही बरेच लोक गोळ्या लागून मारले गेले. त्यामुळें हैद्राबाद येथें बरीच गडबड उडाली. म्हणून आम्हीं गुलाबर्गा मुकामीं जी चौकशी केली त्यांत खालील प्रमाणें माहिती मिळाली आहे.

या तंट्याचें मूळ बीज पाहूं जातां असें दिसून आलें कीं एकंदर हिंदुस्थानांत हिंदुमुसलमानांमध्यें तेढ उत्पन्न झाली आहे, तशाच प्रकारची तेढ गुलबर्गा मुक्कामीं असावी. चार पांच महिन्यांपूर्वीं गुलबर्ग्यास एका लिंगायत मनुष्यानें मुसलमानी धर्म स्वीकारला व तो आपल्या विरूपाक्षाप्पा नांवाच्या १३–१४ वर्षांच्या मुलास मुसलमानी धर्म स्वीकारण्याबद्दल भाग पाडूं लागला. मुलाला ती गोष्ट न रुचल्यामुळें तो गुलबर्गा सोडून दुसऱ्या गांवीं निघून गेला. म्हणून बापानें आईच्या बापावर व भावावर अज्ञान मुलास पळवून नेण्याचा आरोप ठेवून तेथील फौजदारी कोर्टामध्यें खटला लावला. ह्यामुळें हिंदु मुसलमानांमध्यें ज्यास्तच वैमनस्य उत्पन्न झालें. त्यानंतर श्री शरणबसप्पा नांवाचें जें तेथें प्रसिद्ध देऊळ आहे त्याच्या विस्तीर्ण मैदानाच्या एका बाजूस कांहीं मुसलमान लोकांनीं

त्याडमिंक्टन खेळण्यास देवळाच्या मालकाची परवानगी न घेतां सुरवात केली व थोडेच दिवसांनीं त्या ठिकाणीं शाहाबादी दगडाचे बांक-ओटे बांधले ते देवळाच्या चालकांनीं काढून टाकले. त्यामुळें मुसलमान लोकांचीं मनें कलुषित करण्यास कांहीं लोकांस साधन सापडलें व त्याच ठिकाणीं मुसलमानांनीं जबरदस्तीनें शिरून तसेच ओटे बांधले.

ता. २ मोहरम [ ४ आगस्ट ] रोजीं श्रावणी सोमवार असल्यामुळें श्री शरणबसप्पाची पालखी सालाबादप्रमाणें काढण्यांत आली व ते मोहरमचे दिवस असल्यामुळें आगाऊच धार्मिक खात्याकडून या पालखीच्या मिरवणुकीची परवानगीही घेण्यांत आली होती. व नेहमींप्रमाणें पालखी त्याच देवळाच्या आवारांत असलेल्या श्रीबसवण्णाच्या देवळाकडून बसप्पाच्या चवुतऱ्याकडे जाऊं लागली असतां मुसलमान लोकांनीं त्याबद्दल. हरकत घेतली तेव्हां त्यांस सरकारी हुकूम असल्याचें सांगण्यांत आलें. परंतु त्यांनीं तिकडे बिलकूल लक्ष दिलें नाहीं व दांडगाई करूं लागले. चालकांनीं पालखी तेथेंच ठेवली व माजिस्ट्रेट यांजकडे आपलें गाऱ्हाणें नेलें. तेव्हां माजिस्ट्रेट स्वतः पालखीचे ठिकाणीं आले व त्यांनीं पालखी फिरण्याचीं सर्व ठिकाणें पाहून पालखी शिरस्त्याप्रमाणें जाण्यास हुकूम दिला. त्यानंतर पुढील सोमवारपर्यंत विशेष कांहीं झालें नाहीं. परंतु पालखी नेहमींप्रमाणें दुसऱ्या सोमवारीं निघूं नये असे मुसलमानांचे प्रयत्न चालू असावेत असें दिसतें. ता. ९ मोहरम सोमवार रोजीं पालखी काढण्यांत आली त्या वेळेस मुसलमान लोक लाठ्या घेऊन जवळ असलेल्या मशीदींत जमा होऊं लागले. याच वेळीं डि. माजिस्ट्रेटही त्या ठिकाणीं आले व त्यांच्याही वरील गोष्ट निदर्शनास आली. तेव्हां त्यांनीं आपला मनुष्य मशीदीकडे पाठविला व तो मनुष्य परत आल्यावर ते जाऊं लागले असतां चालकांनीं त्यांना विनंति केली कीं, परिस्थितीकडे लक्ष देतां आपण येथें हजर असणें आवश्यक आहे. डि. माजिस्ट्रेट म्हणाले कीं, मीं आपल्या मनुष्याजवळ हुकूम लिहून दिला आहे. व जरूर पडल्यास मी येईन. चालकांनीं थांबण्याकरितां त्यांस पुनः विनंति केली पण ते म्हणाले कीं, पोलीस अधिकारी नाहींत म्हणून माझें थांबणें अनवश्यक आहे. चालकांनीं सांगितलें पोलीस अधिकाऱ्यांना पूर्वींच बोलावणें पाठविलें आहे व आतां पुनः पाठवितों. ते लवकरच येतील.

त्यांची डि मॅ. नीं कशी तरी समजूत घालून ते निघून गेल्यानंतर थोड्या वेळानें पोलीस अधिकारी आले. परंतु पालखीच्या मिरवणुकीच्या जवळ न राहतां दूर एका झाडाखालीं जाऊन उभे राहिले. चालकांनीं विनंति केली कीं मिरवणुकी-जवळ पोलीस अधिकाऱ्यांनीं असणें अत्यंत अवश्यक आहे. कारण मुसलमानांच्या टोळ्या हळूहळू मिरवणुकीकडे येऊं लागल्या आहेत. तरी पण ते म्हणाले कीं आम्ही तिकडे येत नाहीं. काय वाटेल तें होऊं द्या. विशेष कांहीं झालें तर पाहूं! चालकांनीं त्यांची बरीच विनवणी केल्यावर ते म्हणाले कीं, सांगूं त्याप्रमाणें वागण्यास तुम्ही तयार असल्यास आम्ही तिकडे येतों. त्यावेळपर्यंत मिरवणूक बसवप्पाच्या देवळावरून बसप्पाच्या ओट्याकडे फिरली होती. मुसलमान लोकांचा कटाक्ष मिरवणूक तेथूनच परत जावी असा होता. त्याचें कारण बसवप्पाच्या ओट्याच्या बाजूस कांहीं अंतरावर मशीद आहे हें असावें. मुसलमान आतां जमले होते व दंगा होण्याचा रंग दिसूं लागला. चालकांची अशी इच्छा होती कीं, सालाबादप्रमाणें धार्मिक विधि व्हावेत पण दंगा होऊं नये. म्हणून त्यांनीं पोलीस अधिकाऱ्यांच्या म्हणण्याप्रमाणें वागण्याचें कबूल केलें. तेव्हां अशी अट घालण्यांत आली कीं, हिंदूंनीं पालखीबरोबर असूं नये, फक्त नारळ फोडणें वगैरेकरितां एक मनुष्य पालखीबरोबर असावा. कोणत्याही प्रकारचें वाद्य व भजन सुद्धां असूं नये. वास्तविक ह्या अटी अशक्य अशाच होत्या. परंतु केवळ शांततेचा भंग होऊं नये म्हणून त्यांनीं त्या कबूल केल्या. पोलीस अधिकारी शिपायांसहित पालखीच्या पुढें झाले. सर्व हिंदु जागचेजागीं उभे राहिले व पालखी दहा वीस पावलें पुढें सरकली असेल नसेल तोंच मुसलमान लोकांनीं दांडगाई सुरू केली व पालखीस हरकत घेतली. याच सुमारास डि. माजिस्ट्रेट व एक दुसरे अधिकारी तेथें आले व पालखीपासून कांहीं अंतरावर उभे राहिले. त्याबरोबर चालक व कांहीं मुसलमान त्यांचे जवळ गेले व त्यांच्यामध्यें थोडावेळ भाषण झाल्यानंतर फक्त सरकारी अधिकारी लोक आपसांत विचार करूं लागले. त्याच सुमारास मुसलमान लोक हिंदूंस मागें हटवून मारामारी करूं लागले. थोड्याच वेळांत आणखी शिपायांची कुमक आली व शिपाई लोकांनीं आपल्या बंदुका हिंदूंवर रोंखून धरल्या व त्यांना मागें रेटीत चालले. घोडेस्वारांनींहि आपले घोडे हिंदूंच्या अंगावर घातले व हिंदूंना पळवून लावूं लागले. हिंदूंही आपली असहाय स्थिति पाहून पालखी तेथेंच सोडून निघून गेले व

चालक मंडळी देवळांत गेली. कांहीं वेळानें सरकारी अधिकाऱ्यांनीं पालखी मागें फिरविण्याचा हुकूम दिला व त्याप्रमाणें पालखी सालाबादप्रमाणें पुढें न जातां मागें देवळाकडे परत गेली. या दिवशीं हिंदूंना बराच मार बसला व जखमाही झाल्या. चालकांनीं ठिकठिकाणीं अडवणुकींच्या जागेचे फोटो घेण्यासाठीं व्यवस्था केली. पण त्या फोटोग्राफरांस मार खाऊन परत जावें लागलें. साहजिकच मुसलमान लोकांना आपला विजय झालासें वाटून त्यांची हिम्मत वाढली.

## मंगळवार.

दुसऱ्या दिवशीं मोहरमची १० तारीख होती व दुपारपासूनच मुसलमान हातांत लाठ्या घेऊन गांवांत टोळ्या टोळ्यां करून हिंडूं लागले. चार वाजण्याच्या सुमारास ब्रह्मपुरीच्या एका बोळांतून अलम अजून गेले नव्हते तोंच अशी भुमका उठली कीं एका हिंदूच्या घराच्या दुसऱ्या मजल्याच्या गच्चीवरून कोणी अलमवर मुतलें. असें ऐकलें कीं, ही कंडी एका पोलीस स्वारानें गांवभर पसरवली. याचा साहाजिकच परिणाम असा झाला कीं मुसलमान लोकांच्या टोळ्या खवळून तिकडे वळूं लागल्या व त्या घरांतील लोकांना मारूं लागले. लोकांनीं समजूत घालण्याचा प्रयत्न केला तरी मुसलमान ऐकेनात व अलमची बेइज्जत झाली म्हणून ओरडूं लागले व "दीन" "दीन" करीत जवळ असलेल्या श्रीशरणबसवप्पाच्या देवळाकडे आरोळ्या मारीत गेले व सभामंडपांत घुसून त्यांनीं तेथील हंड्या, झुंबरें, आरसे, तसबीरी वगैरे सामान फोडून टाकलें व तेथें असलेल्या सुंदर व भव्य नंदीस फोडण्याची खटपट केली, परंतु त्यांत त्यांना यश आलें नाहीं. फक्त ते नंदीचा एक कान तोडूं शकले. सभामंडपांतील इतर पुष्कळ नंदी व लिंगें फोडून फेंकून दिलीं व हर तऱ्हेनें शक्य तितकी नासधूस केली. देवळाच्या गाभाऱ्यांतही जाण्याचा प्रयत्न केला, परंतु दरवाजा आंतून बंद केल्यामुळें त्यांचा आंत शिरकाव होईना. दरवाजा मोडण्याचा प्रयत्नही केला. परंतु तो फुटेना तेव्हां ते तेथून निघून गेले व शेजारच्या बागेंत घुसून नासधूस केली व रस्त्यानें बंडाळी करीत जाऊं लागले. या दिवशीं जेथें जेथें हिंदु सांपडला तेथें तेथें मुसलमानांनीं त्यास चोप दिला. आदल्या दिवसापेक्षां या दिवशीं ज्यास्त लोकांस दुखापती झाल्या. कांहीं लोकांचें असें म्हणणें आहे कीं पोलीस लोकांनींही यांत भाग घेतला होता.

बुधवारीं विशेष म्हणण्यासारखें कांहीं झालें नाहीं, परंतु गांवामध्यें अशा कंड्या उठत होत्या कीं मुसलमान लोक लुटालूट करणार आहेत. याच भीतीनें हिंदू लोकांनीं बाजार बंद ठेवला व यामुळें मुसलमानांना त्रास झाला व हेंच त्यांच्या चिडण्यास कारण झालें. मौलवी अजीजुल्लासाहेब मोहतमीम ( सुपरिंटेंडंट ) सी. आय. डी. हेही लोकांची समजूत करीत होते आणि दोन्ही पक्षांतील तेढ काढून टाकण्याचा त्यांचा प्रयत्न जारीनें चालू होता. बाजार उघडण्यासंबंधीं अधिकाऱ्यांनीं फार खटपट केली आणि व्यापारीहि कांहीं अटीं-वर दुकानें उघडण्यास तयार होते. त्यांची अशी एक अट होती कीं अधिका-ऱ्यांनीं नुकसानभरपाई करून देण्याची हमी घ्यावी. पण अधिकारी लोक संरक्षणाची जिम्मेदारी घेण्यास तयार होईनात. एकूण परिस्थितीवरून त्यांना तसें कबूल करण्याचें धाडस होईना. हिंदु लोकांना बरीच धास्ती वाटत होती त्यामुळें ते आपल्या घरांचें संरक्षण करण्यासाठीं घरींच दारें लावून होते. विशेषतः सोमवार व मंगळवारच्या पोलीसांच्या वागणुकीमुळें त्यांना ज्यास्तच भीति वाटत होती.

## गुरुवार.

या दिवशीं मुसलमान कांहीं तरी अत्याचार करणार आहेत अशा बातम्या गांवभर पसरूं लागल्यामुळें हिंदुलोक मुळींच घराचे बाहेर निघेनात. याच दिवशीं नबाब महंमद नवाजजंग बहादुर डायरेक्टर जनरल ऑफ पोलीस हे हैद्राबादेहून व्यवस्थेकरितां मुद्दाम स्वतः येथें आले, व बाजार उघडून नेहमीं-प्रमाणें लोकांचें व्यवहार चालविण्याबद्दल प्रयत्न करूं लागले. त्यांनीं गांवामध्यें हिंडून लोकांच्या भेटी घेतल्या, पण परिस्थिति आशाजनक दिसेना. मुसलमान लोकांच्या टोळ्या हिंडूं लागल्या होत्या व संध्याकाळीं चार वाजतां गांवामध्यें अशी कंडी पिकविली गेली कीं हिंदूंनीं मशीद पाडली. वास्तविक पहातां कोणतीही मशीद पाडली गेली नव्हती. ही कंडी कांहीं गुंड लोकांनीं मुसलमानांना त्वेष येण्याकरितां चोहींकडे पसरवली होती. याचा परिणाम असा झाला कीं मुसलमान लोक हातामध्यें लाठ्या व हत्यारें घेऊन श्रीशरणबसप्पाच्या देवळाकडे धावले व तेथील दुकानें जाळलीं, रथालाही आग लावली. मौलवी अजीजुल्लासाहेब आपल्या प्राणाचीही पर्वा न

करितां लोकांना थोपवून धरण्याचा प्रयत्न करीत होते व त्यांची हरतऱ्हेनें समजूत करीत होते; परंतु त्यांचा हिंदू लोकांचीं देवालयें उध्वस्त करण्याचाच निश्चय दिसूं लागला, तेव्हां अझीझुल्लासाहेब व मि. सदाशिव देवळाच्या पटांगणांत उभे राहून मुसलमानांचे हल्ले परतविण्याचा प्रयत्न करीत होते. व मुसलमान ऐकेनात तेव्हां ते त्यांना निक्षून सांगूं लागले कीं तुम्ही जर परतणार नाहीं तर पोलीसाला गोळी चालवावी लागेल. असें त्यांनीं बजाविलें तरी त्याचा कांहीं परिणाम झाला नाहीं व मुसलमानांचा हल्ला श्रीशरणबसप्पाच्या देवळावर होत आहे तोंच नबाब महंमद नवाजजंग बहादुरही दुसरीकडे लोकांना शांत करण्याच्या खटपटींत होते तेही वरील स्थळीं प्राणांची पर्वा न करितां आले. पण त्यांचेही प्रयत्न निष्फळ ठरल्यावर शेवटीं नाइलाजास्तव त्यांनीं पोलीसला हवेंत गोळीबार करण्याचा हुकूम दिला. हल्लेवाल्यांस वाटलें कीं आपल्या अंगावर गोळीबार होणार नाहीं. म्हणून ते तसेच नेटानें पुढें चालले. इतक्यांत मौलवी अझीझुल्ला साहेब गोळी लागून खालीं पडले व त्यांना दवाखान्यांत पोचविण्याची व्यवस्था करण्यांत आली. आणि साहाजिकच यामुळें हलकल्लोळ माजला व हल्लेवाले देवळांत शिरले व त्यांनीं गाभाऱ्यांत शिरून मोडतोड केली व मूर्ति फोडून व तेथील सर्व बहुमोल सामान लांबविलें. मि. क्रॉफर्ड साहेब ( अ. डा. पो. सी. आय. डी. ) संध्याकाळीं मेलनें दाखल झाले आणि तसेच व्यवस्थेकरितां दुसरीकडे जाऊन फिरत होते, त्यांनीं मौ. अजीजुल्लासाहेबांना गोळी लागल्यामुळें त्यांस पलंगावरून आणीत असल्याचें पाहून मि. प्रधान यांस त्यांना दवाखान्यांत पोंचविण्यास सांगून देवळाकडे तडफीनें निघून गेले. तेथील गर्दी मोडेना तेव्हां नबाब महंमद नवाजजंगबहादर यांनीं हल्लेवाल्यांवर गोळीबार करण्याचा हुकूम दिला. यावेळीं गुंडांच्या पुढाऱ्यांपैकीं एक गोळी लागून मेला व गोळीबार सुरू झाला तेव्हां बऱ्याच लोकांस छरे लागल्यामुळें गुंड लोक पळूं लागल व ह्या देवळाच्या आजूबाजूची गर्दी कमी झाली. जातां जातां गुंड लोकांनीं शक्य तितकी नासधूस केली. या ठिकाणच्या बंदुकीचे आवाजांनीं व गुंडांच्या आरोळ्यांनीं हिंदु लोक अधिकच घाबरून गेले. येथील गडबड आजूबाजूस जवळ जवळ दोन मैल ऐकूं येत होती. गुंड जे येथून निघाले ते गांवांत चोहोंकडे आरोळ्या मारीत जाऊं लागले व जेथें देऊळ सांपडेल तेथें मूर्तींचा भंग करूं लागले, व

हर तऱ्हेनें देवळें उध्वस्त केलीं. कांहीं ठिकाणीं देवळें साफ पाडून टाकलीं; एकदोन ठिकाणीं आगी लावून दिल्या व अशा रीतीनें आपली दुष्ट वासना जितकी पूर्ण करतां आली तितकी नासधूस करून पूर्ण करून घेतली.

याच रात्रीं जाजी लछमय्या व इतर दोन सावकारांचीं घरें फोडण्याचाही प्रयत्न केला. एक दोन दरवाजे फोडले परंतु मालकांच्या सावधगिरीमुळें आंत शिरकाव होऊं शकला नाहीं. एक दोन दुकानांस आगी लावल्या. ह्या रात्रीं २–३ मोहल्ले सोडून बाकी गांवांतील २४ देवालयें मुसलमानांनीं उध्वस्त केलीं. व कांहीं स्त्रियांवरही अत्याचार केले. घरांतून **स्त्रियांस** ओढून रस्त्यावर **नागवें** करण्यांत आलें. थोडक्यांत सांगावयाचें तर या रात्रीं गुंडांनीं शक्य तितके अनाचार व अत्याचार हिंदूंवर केले. ही बातमी शुक्रवार ता. १५ आगस्ट रोजीं हैद्राबाद येथें आली, हजरत निजाम सरकार यांस समजली तेव्हां त्यांना फार वाईट वाटलें आणि त्यांनीं बंदोबस्ताकरितां लगेच मिलीटरी गुलबर्ग्यास पाठविण्याचा हुकूम दिला. त्याप्रमाणें स्पेशल ट्रेननें शुक्रवारीं रात्रीं मिलीटरी रवाना झाली व चौकशीकरितां एका कमिशनची नेमणूक करण्यांत आली. या कमिशनमध्यें मौ. आगा महंमद अलीखां साहेब, न्या. केशवराव साहेब व नबाव महंमद नवाजजंग बहादूर, डा. ज. ऑफ. पोलिस होते. परंतु आजचे फर्मानाप्रमाणें नबाब साहेब मजकुरांचे जागीं मौ. हाषम मोईजुद्दीन साहेब ( से. जज्ज गुलबर्गा ) यांची नेमणूक करण्यांत आली आहे.

पहिला फर्मान तारेनें गुलबर्ग्यास पाठविण्यांत आला व त्यांत असा हुकूम होता कीं शांतता राखण्याकरितां मिलीटरी पाठविण्यांत येत आहे. जरूर पडल्यास गुंडांवर गोळीबार करावा व हा हुकूम सर्व शहरभर जाहीर करावा. यावरून निजाम साहेबांची आपल्या प्रजेबद्दल किती कळकळ आहे याचा सहज अंदाज होऊं शकतो. गुलबर्गा येथें शुक्रवारीं अशी दाट वदंता होती कीं दुपारीं नमाजानंतर गुंड हिंदूंचीं घरें लुटणार व इतर अनेक अत्याचार करणार. परंतु सदरहु फर्मान ऐन वेळेवर पोंचल्यामुळें त्याचा इष्ट परिणाम झाला व ज्यास्त अनन्वित कृत्यें होण्याचा संभव होता तो टळला. या दक्षतेबद्दल निजाम साहेबांचे जितके आभार मानावे तेवढे थोडेच होतील.

हैद्राबाद येथें ही बातमी शुक्रवारीं लागतांच हिंदुमहासभेनें आपले कार्यकारी मंडळाची सभा ताबडतोब बोलावून सभेतर्फे श्रीमान **वामन रामचंद्र**

**नाईक**, बॅ. श्री. कीशन, श्री. काशिनाथराव वैद्य एम्. ए. एलूएल्. बी., व श्री. गणेशराव काळे हायकोर्ट वकील व श्री. रामाचारी हायकोर्ट वकील यांची निवडणूक झाली व असें ठरलें कीं वरील गृहस्थांनीं गुलबर्गा येथें जाऊन परिस्थीतीची चौकशी करावी व तेथील लोकांना धीर देऊन शांतता राखण्याची खटपट करावी. सदरहु गृहस्थ लागलीच रात्रीच्या गाडीनें गुलबुर्ग्यास रवाना झाले व त्यांनीं आपलें काम योग्य हिमतीनें व कळकळीनें केलें असें समजतें. शनिवार संध्याकाळपर्यंत स्थिरता झाली नव्हती व हिंदु लोक भीतीमुळें बाहेर पडले नव्हते. लोक घरें बंद करून देवावर भरंवसा ठेऊन परगांवीं निघून गेले. बहुतेकांनीं आपलीं बायकामुलें अत्याचाराच्या भीतीमुळें रेलवे स्टेशनवर पोंचवलीं व कांहींनीं परगांवीं पाठवून दिलीं. मिलीटरीची परेड सायंकाळीं गांवांत झाल्यानें व हिंदु महासभेच्या मंडळीच्या खटपटीनें लोकांस थोडा धीर आला व आतां परिस्थिति निवळत चालली आहे, घराबाहेर निघतां न आल्यामुळें दोन दोन, तीन तीन उपवासही घडले. लोकांमध्यें स्थानिक पोलिसांसंबंधी अत्यंत गैरविश्वास उत्पन्न झाला आहे तो लवकरच दूर करण्याविषयीं आमची सरकारपाशीं नम्र विनंति आहे.

परिस्थिति लवकर न सुधारण्याचें कारण रविवार ता. १७-८-२४ दुपारपर्यंत गुंड लोकांपैकीं कोणीही पकडण्यांत आला नव्हता. पोलीसनीं रविवारपासून धरपकड सुरू केली आहे. पोलीसची पूर्ण चौकशी होण्यास आणखी आठवडा तरी लागेल व त्यानंतर कमीशनपुढें काम सुरू होईल असें वाटतें.

( नि. वि. )

---

# गुलबर्गा येथील अत्याचारासंबंधी

## सोलापूर येथील प्रचंड जाहीर सभा.

निजामच्या राज्यांत गुलबर्गा या प्रसिद्ध शहरीं सोमवार ता. ११ रोजीं तेथील मुसलमानांनीं तेथील लिंगायतांचें ग्रामदैवत श्री शरण बसवेश्वर याच्या पालखीच्या मिरवणुकीस अडथळा केला व त्यानंतर लागोपाठ २–३ दिवस हिंदूंवर एकसारखे अत्याचार केले. गुरुवार ता. १४ रोजीं तर या अत्याचारांचा कळसच झाला. सोलापूरच्या बऱ्याच व्यापाऱ्यांचीं दुकानें गुलबर्गा येथें असल्याकारणानें घडलेल्या भयंकर स्थितीच्या बातम्या तारेनें व येणाऱ्या जाणाऱ्या लोकांकडून आसपास पसरल्या व सोलापूर येथील जनता तर त्यामुळें फारच चिंतातूर व क्षुब्ध झाली. तथापि प्रत्यक्ष गुलबर्ग्यास जाऊन शांत चित्तानें व निर्विकार मनानें तेथील परिस्थिति पाहून येण्याकरितां सोलापूरच्या मंडळीनीं तेथील कल्पतरु पत्राचे संपादक रा. गोविंदराव काकडे, व रिटायर्ड मामलेदार रा. भाऊसाहेब लोहोकरे, व रा. पंडित या गृहस्थांची रवानगी केली. ते समक्ष स्थिति पाहून सोलापुरास परत येतांच रविवार ता. १७ रोजीं सायंकाळीं सात वाजतां सोलापूरच्या नागरिकांची जाहीर सभा मेकॉनकी थिएटरमध्यें ना. दादासाहेब करंदीकर यांच्या अध्यक्षतेखालीं भरविण्यांत आली. सभेच्या निमंत्रणपत्रिकेवर डॉ. मुळे ( म्यु. अध्यक्ष ), श्री. बनबसप्पा मडकी, शेट हिराचंद गांधी, रा. सामंत वकील, मि. धुम्मा वकील, शेट लक्ष्मी नारायण, फेराजशा नगरवाला, शिवबाळअप्पा देशमुख, वगैरे वीस प्रमुख गृहस्थांच्या सह्या होत्या.

गुलबर्गा येथील अत्याचाराच्या बातम्यांमुळें सोलापूर येथें एवढी मोठी खळबळ उडाली होती कीं, थिएटरचे सर्व मजले अगदीं छपरापर्यंत गच्च भरून गेले होते.

ना. दादासाहेब यांचें नांव अध्यक्षस्थानाकरितां सुचवितांना सोलापूर म्युनिसिपालिटीचे अध्यक्ष डॉ. मुळे यांनीं पुढील आशयाचें भाषण केलें.

## डॉ. मुळे यांचें भाषण.

ते म्हणाले कीं, स्वराज्यप्राप्तीसाठीं सध्यां सर्व हिंदी लोक प्रयत्न करीत असून त्यासाठीं आवश्यक अशी गोष्ट जी हिंदु–मुसलमानांचें ऐक्य तें घडवून आणण्याकरितां देशांतील मोठमोठे पुढारी प्रयत्न करीत आहेत. असें असतां

इकडे मुसलमानांनीं असे अनन्वित अत्याचार करावेत ही अत्यंत उद्वेग वाटणारी गोष्ट होय. पंजाबांत व उत्तर हिंदुस्थानांतील इतर भागांत हिंदूमुसलमानांचीं रणें माजत असल्याच्या बातम्या अलीकडे आपण वरचेवर ऐकतों; पण आपल्या जवळ खुद्द गुलबर्गा येथें असे प्रकार घडून येतील असें आपणांस वाटलें नव्हतें. गुलबर्गा येथें मुसलमानांनीं केलेल्या अत्याचारांचा निषेध करण्याकरितां येथें चार दिवसांपूर्वीच सभा भरविण्याचा मंडळीचा विचार होता. परंतु विश्वसनीय माणसें पाठवून प्रत्यक्ष वस्तुस्थिति पाहून येईपर्यंत ही सभा बोलावण्यांत येऊं नये असें ठरवून त्याप्रमाणें येथील तीन गृहस्थ गुलबुर्ग्यास पाठविण्यांत आले. ते आतांच परत आले असून ते समक्ष पाहिलेली हकीकत येथें सांगतीलच. करितां या प्रसंगीं कौन्सिल ऑफ स्टेटचे सभासद असलेले आपले मित्र ना. दादासाहेब करंदीकर हेच अध्यक्षस्थान स्वीकारण्यास योग्य आहेत. सबब त्यांनीं अध्यक्षस्थान स्वीकारावें अशी माझी विनंति आहे.

श्री. पसारे यांनीं वरील सूचनेस अनुमोदन दिल्यावर ना. दादासाहेब यांनीं अध्यक्षस्थान स्वीकारलें व त्यांनीं पुढील आशयाचें भाषण केलें.

## ना. करंदीकर यांचें भाषण.

ते म्हणाले, निजाम सरकार एकीकडे वऱ्हाड प्रांताची मागणी ब्रिटिश सरकारजवळ करीत असतां दुसरीकडे निजामाच्या राज्यांतील बहुसंख्याक अशा हिंदू प्रजेवर गुलबर्ग्यासारखे अत्याचार केले जावेत ही मोठी खेदाची व विषादाची गोष्ट होय. हिंदूंचीं यामुळें उद्विग्न व साशंक झालेलीं मनें शांत करणें हें या वेळीं निजामसरकारचें कर्तव्य आहे. हिंदूंच्या सहनशीलतेची अगदीं पराकाष्ठेची परीक्षा होत आहे. त्याचप्रमाणें यावेळीं निजामसरकार व सार्वभौम ब्रिटिश सरकार यांच्या कर्तव्यांची परीक्षा होण्यासारखाच हा प्रसंग आहे. गुलबर्गा येथील मुसलमान लोकांच्या अत्याचारासंबंधानें ज्या बातम्या येथें आल्या आहेत व ज्या गोष्टी प्रत्यक्ष वस्तुस्थिति पाहून आलेले आपले रा. काकडे, रा. लोहोकरे व रा. पंडित हे आपणांपुढें आतां जाहिररीत्या सांगतील त्या कोणासही त्वेष आणणाऱ्या आहेत. तथापि आपण शांत मनानें त्या ऐकून घ्याल व आपलें चुकतें कोठें याचा निर्विकार मनानें विचार करून आपल्यांत असलेल्या उणीवा दृढ निश्चयानें घालविण्याचा प्रयत्न कराल अशी मला आशा आहे. हिंदू व

मुसलमान या दोन मोठ्या जातींत ऐक्य तर उत्पन्न झालें पाहिजे याबद्दल वाद नाहीं परंतु हें ऐक्य म्हणजे मुसलमानांनीं वाटेल तसा शिरजोरपणा चालवावा व हिंदूंनीं निमुटपणें तें सहन करावें असें ऐक्य नको. किंबहुना हें ऐक्यच नव्हे. हिंदूंनीं आपलें बळ व संघटना वाढविणें अवश्य आहे. असें ते जर करतील तरच मुसलमानांशीं त्यांचें खरें ऐक्य होऊन व राष्ट्राच्या प्रगतीला मदत होईल. मुसलमानांनीं हस्तांदोलन करण्याकरितां हात पुढें केला असतां हिंदूंनींही तो स्वीकारण्याकरितां आपला तितकाच बळकट हात पुढें केला पाहिजे. मुसलमानांनीं शेकहँड करतांच अगदीं निखळून जाण्यासारखा हिंदूंचा हात लेचापेचा असतां उपयोगी नाहीं. यासाठीं हिंदूंनीं शांतपणानें परंतु दृढ निश्चयानें व शांततेनें आपलें बळ वाढविलें पाहिजे. कौन्सिल ऑफ स्टेटसारख्या बड्या सभेचा मी सभासद आहें, यास्तव मी अधिक कांहीं काम या बाबतींत करूं शकेन अशी कोणाची कल्पना असल्यास ती व्यर्थ आहे. सरकारला ज्या गोष्टी बाधक आहेत त्यांचा तो बाधकपणा दूर करण्यास सोयीचें असें ठिकाण म्हणजे हें कौन्सिल ऑफ स्टेट होय. तेथें जाऊन फसल्यासारखी माझी स्थिति झाली आहे. कारण तेथें आम्ही आपल्या इच्छेप्रमाणें कांहींच उपयुक्त काम घडवून आणूं शकत नाहीं, हें आपण जाणतच आहां. खासगी संभाषणांच्या द्वारें कांहीं थोडें थोडकें काम करतां येईल हें खरें आहे, पण खासगी संभाषणांच्या वेळीं कोणता इंग्रज गृहस्थ असमंजस असतो ? त्याचें सारें तें सौजन्य व सरळवृत्ति तो एकाद्या जिल्ह्याचा कलेक्टर या नात्यानें बोलूं लागतांच पार मावळून जातात. गुल्बर्गा येथील अत्याचारासंधानें स्टेट सेक्रेटरीकडे आम्हीं तारा पाठविणें या प्रसंगीं अवश्यक आहे हें खरें पण त्याबरोबरच त्याचा दुरुपयोगही इंग्रज मुत्सद्यांकडून होण्याचा फार संभव आहे हें आपण ध्यानांत ठेविलें पाहिजे. " ही पहा हिंदूंची मुसलमानांच्या अत्याचाराविरुद्ध तक्रार आली आहे. तस्मात् ब्रिटिशांना हिंदुस्थानविषयक आपली जबाबदारी पार पाडण्याकरितां आपली पक्कड ढिली करतां येत नाहीं " असे उद्गार पार्लमेंटांतही निघण्याचा संभव आहे. ही गोष्ट कशीही असली तरी हिंदूंनीं आपलें न शोभणारें व हानिकारक असें दौबर्ल्य काढून टाकणें व त्याप्रीत्यर्थ जरूर ते सर्व उपाय योजणें प्राप्त आहे यांत शंका नाहीं.

नंतर गुलबुर्गा येथील प्रत्यक्ष परिस्थिति पाहून आलेले रा. काकडे, लोहोकरे व पंडित यांना आपापली हकीकत सांगण्याविषयीं विनंति केली. त्या तिघांनीं सांगितलेली हकीकत एकाच स्वरूपाची असून तिचा आशय पुढें दिला आहे.

## देवालयांचा विध्वंस.

ते म्हणाले कीं, आम्ही गुलबुर्गा येथें जातांच घोडेस्वार व लष्करी शिपाई यांच्या पलटणी शहरभर फिरत असलेल्या दिसल्या. त्याशिवाय सर्वत्र शुकशुकाट होता. दुकानें तीन दिवस बंद होतीं. तीं अधिकाऱ्यांच्या सांगण्यावरून तुरळक कोठें कोठें उघडलेली दिसली. मुसलमानांनीं उध्वस्त केलेलें तेथील मुख्य ठिकाण म्हटलें म्हणजे श्रीशरण बसवेश्वर या साधु पुरुषाचें मोठें व सुंदर देवालय हें होय. त्याच्या भोंवतीं हल्लीं लष्करी पहारा बसविला आहे. आंत जाण्यास परवानगी देण्याचें ते नाकरतात. तालुकदाराकडून परवानगी मिळविल्यावर लष्करी अधिकाऱ्यांनीं परवानगी नाकारली, तथापि वरिष्ठ पोलीस अधिकाऱ्याचे मध्यस्थीनें मोठ्या मिनतवारीनें दोघांस देवालयांत जाऊं दिलें. आंतील प्रकार दृष्टीस पडतांच काळीज चर्र झालें. देवालयांतील कांचेच्या हंड्या, झुंबरें वगैरेंच्या तुकड्यांचा सडा झाला होता त्यामुळें तेथें चालण्याचीही सोय नव्हती. तेथील भव्य व सुंदर नंदी छिन्नविछिन्न झालेला दिसला. गाभाऱ्यांत जाण्याचा दरवाजा अधिकाऱ्यांनीं मोहोरबंद केला: असल्यामुळें आंत जातां आलें नाहीं. पण आंतील चांदीच्या मूर्ति नाहींशा झाल्या असल्याचें कळतें. देवाच्या स्थावर राकेल तेल ओतल्यामुळें जाळून टाकला जाण्याच्या स्थितींत दिसला. या देवालयाशिवाय हिंदूंचीं देवी, मारुती, माहादेव वगैरे निरनिराळ्या भागांतील १५।१६ देवालयें जाऊन पाहिलीं. त्यांतील सर्व मूर्ति फोडून टाकण्यांत आलेल्या असून देवळांची नासधूस केलेली आढळली. ब्रम्हपुरा व मक्तुमपुरा यांतील सर्व म्हणजे सुमारें ४०।४५ देवालयांचा असाच विध्वंस झाला असल्याचें समजतें. श्रीरेवणसिद्धाचें देवालय व एक मठ यांचा नाश केलेला असून वृंदावन व दिपमाळ यांचे सुद्धां तुकडे तुकडे केले आहेत.

मुसलमानांच्या कांहीं मशिदींचीही हिंदूंकडून नासधूस झाल्याचें ऐकून तेथील परिस्थिति आम्ही जाऊन पाहिली. एका मशिदीच्या दरवाजावरील एक

ल्हानसा मनोरा खालीं अखंड पडलेला असून दुसऱ्या एका मशिदींत काजीच्या नमाज पढण्याच्या जागेच्या पायरीचा एक दगड पडलेला आहे. व एक हंडी फुटलेली आहे. एवढेंच या संबंधांत आढळून आलें. तेथें रजपुतांचीं असलेलीं चार देवालयें रजपुतांनीं शाबूत राखलेलीं आहेत. सुमारें सात आठशें हत्यारबंद मुसलमानांनीं आपला मोर्चा याही देवळांवर वळविला होता असें कळतें. पण तेथें सज्ज असलेल्या शेंदीडशें रजपुतांच्या टोळीपुढें त्यांची मात्रा न चालल्यामुळें मुसलमान त्यांच्या वाटेस गेले नाहींत. हिंदूंच्या देवळाचेंही आम्ही रक्षण करूं, परंतु आमच्या मागें आमच्या मुलाबाळांची व्यवस्था लावण्याची तजवीज हिंदूंनीं करावी असें रजपूत म्हणत होते, पण हिंदूंपैकीं कोणी तसें आश्वासन दिलें नाहीं व त्यामुळें ते इतर देवळांचे संरक्षणास गेले नाहींत असें कळतें.

## अत्याचाराचीं कारणें.

हे अत्याचार कां घडून आले यासंबंधीं या तिन्ही गृहस्थांनीं आपल्या समजुती-प्रमाणें कारणें निवेदन केलीं. ते म्हणाले कीं, थोड्या दिवसांपूर्वीं, एका लिंगायत मुलाला त्याच्या नुकत्याच मुसलमान झालेल्या आईबापांच्या ताब्यांत देवविण्याचा मुसलमानांनीं कोर्टाच्या द्वारें प्रयत्न केला, पण हायकोर्टांत विरुद्ध निकाल लागून मुलगा हिंदु असलेल्या त्याच्या आजाच्या ताब्यांत देण्यांत आला. या पराभवामुळें मुसलमानांच्या मनांत अढी लागून राहिली होती. सालाबादप्रमाणें श्रीशरण बसवेश्वराच्या पालखीची मिरवणूक निघाली. ही मिरवणूक जवळच असलेलें देऊळ बसवेश्वर व कट्टा बसवेश्वर या स्थानापर्यंत जाऊन यावयाची असते. यंदाही मोहरम श्रावणाबरोबरच असल्यानें मिरवणुकीस मुसलमानां-कडून अडथळा होणार या भीतीनें लिंगायतांनीं निजामसाहेबांच्या धर्मादाय खात्याकडून परवानगी आणवली होती. व मोहरमचा सण याचवेळीं असल्यामुळें सरकारांनीं, वाद्यें न वाजवितां मिरवणुक काढण्याची परवानगी दिली होती. सोमवार ता. ११ रोजीं मिरवणूक निघाली असतां सुमारें सातआठशें हत्यारबंद मुसलमानांच्या टोळीनें मिरवणुकीस मध्यंतरीं अडथळा केला, तेथें हजर असलेले मुसलमान मॅजिस्ट्रेट व निजाम सरकाचे पोलिस यांनीं दंगा होऊन परिस्थिति अनावर होईल अशीं कारणें सांगून मिरवणूक मागें फिरविली व ते तेथून निघून गेले. नंतर मुसलमानांनीं कांहीं अत्याचार केले. तेथील

पोलिस कोणत्याही परिस्थितीमुळें शांतता राखण्यास असमर्थ आहेत अशाबद्दल हिंदूंकडून निजाम साहेबांकडे तारा गेल्या; तेव्हां गुप्त पोलिस अधिकारी व लष्करी शिपाई निजामसाहेबांकडून पाठविण्यांत आले. मध्यंतरीं २।३ दिवस बेबंदशाही माजून अत्याचार होतच होते; परंतु गुरुवार ता. १४ रोजीं अत्याचारासंबंधीं कडेलोट झाला. शरण बसवेश्वर देवालयाच्या मालकीची जी जमीन आहे त्याच्या शेजारींच मुसलमानांची एक लहानशी मशीद असून येथें मुसलमानांचा मोठा जमाव जमत होता. देवालयाच्या मालकीच्या जागेंत मध्यंतरीं ७।८ दिवसांत मुसलमानांनीं एक टेनिस कोर्ट तयार केलें व प्रेक्षकांना बसण्याकरितां एक कट्टाही बांधला होता. तो देवळाच्या अधिकाऱ्यांकडून काढून टाकण्यांत अल्यामुळें तो मुसलमानांनीं पुन्हां बांधला व हिंदूंच्या पालखीच्या मिरवणुकीच्या वाटेंत हें एक अडथळ्याचें ठिकाण निर्माण करण्यांत आलें. गुरुवारीं मुसलमान पंजे मिरवीत नेत असतां मंगळवारीं हिंदूंच्या एका घरामधून त्यावर पाणी टाकण्यांत आलें अशी हूल उठली. हिंदू पंज्यावर मुतले असें स्वरूप पुढें यास दिलें जाऊन मशिदी पाडल्याचीही भूमका याच वेळीं पसरली. तेव्हां हजारों मुसलमान एकत्र जमून हिंदूंच्या देवळांवर चाल करून गेले. पंजावर पाणी पडलें तें एका ब्राह्मणाच्या घरांतून पडलें असें म्हणत मुसलमानांनीं त्या घरांत शिरून बायका मुलांना बरीच मारहाण केल्याचें समजतें.

गुरुवारीं लष्करी अधिकाऱ्यांनीं दंगेखोरांना गर्दी मोडण्याचा हुकूम केला. पण मुसलमानांनीं दंडेली सुरू केल्याकारणानें लष्करी शिपायांनीं बंदुकीच्या गोळ्या सोडल्या. दंगेखोरांचा पुढारी असलेला एक खाटिक ठार झाला असल्याचें कळतें. निजामचे पोलिस सु० मि. अझीजुल्ला यांनीं हिंदूंच्या देवळांच्या रक्षणाचा व शांतता प्रस्थापित होण्यासाठीं दंगा मोडण्याचा प्रयत्न केला, पण दंगेखोरांनीं झाडलेल्या बंदुकीची गोळी त्यांस लागून यांचा तेथेंच अंत झाला! त्यांचें प्रेत हैद्राबादेला पाठविण्यांत आलें आहे. दंगेखोर मुसलमान व लष्करी अधिकारी यांतील बरेच जखमी झाले असून मागील दिवशीं कांहीं हिंदुही जखमी झाले आहेत. एक मुसलमान दंगेखोर इस्पितळांत नेल्यावर मेला असें कळतें. हिंदूंपैकीं कोणी ठार झालें नाहीं. कारण ते सर्व सांपडेल त्या घरांत शिरून आंतून कड्या कुलुपें लावून व दारांना दगड लावून दडून बसले होते.

यानंतर घोडेस्वारांच्या व पायदळ लष्करी शिपायांच्या जास्त पलटणी हैद्राबादेहून येऊन आतां सवत्र शांतता झाली आहे.

## चौकशीचें कमिशन

निजाम साहेबांनीं तीन अधिकाऱ्यांचें एक चौकशी कमिशन पाठविलें असून न्या. मू. केशवराव हे एक त्यांत हिंदु अधिकारी असून बाकीचे दोन मुसलमान आहेत व ते गुलबर्गा येथें दाखल झाले आहेत. हैद्राबादेहून रा. वामन नाईक, रा. वैद्य वगैरे हिंदूंचे पुढारी येथें आले असून ते हिंदूलोकांना धीर देत आहेत.

गुप्त पोलिसांकडून तपासणी चालू आहे, अद्याप कोणासही पकडण्यांत आलेलें नाहीं.

वरील आशयाची हकीकत सभेंत सांगितल्यानंतर कित्येक वक्त्यांचीं भाषणें झालीं व हिंदूंची दुर्बलता, फाटाफूट, मुसलमानांशीं एकीविषयीं फाजील सौजन्य, क्षमाशीलता वगैरे दुर्गुण हिंदूंना भोंवत आहेत असें कित्येक वक्त्यांनीं प्रतिपादन केलें. यानंतर सभेनें पुढील आशयाचे ठराव पास झाले.

## पास झालेले ठराव.

**ठराव १ लाः**— गुलबर्गा येथें कांहीं मुसलमान लोकांनीं श्रावण शु० ११ सोमवारपासून जे नाहक अत्याचार करून तेथील ग्रामदेवता **श्रीशरण बसवेश्वर** व इतर देवालयांचा विध्वंस केला व हिंदू लोकांवरही अत्याचार केले, याबद्दल या शहराच्या लोकांस अत्यंत दुःख, उद्वेग व त्वेष वाटत आहे व या अत्याचाराचा ही सभा तीव्र निषेध करीत आहे.

मांडणारः— श्री गुलाबचंद.

अनुमोदनः— डॉ. जगदेवराव देशमुख.

**ठराव २ राः**— सदर अत्याचाराचीं कारणें काय व पुढें असे प्रसंग कसे न येतील त्याची योग्य ती चौकशी करण्याकरितां हिज. ए. हायनेस निझामसाहेब यांनीं एक कमिशन पाठविलें आहे असें कळतें, परंतु सदर कमिशन मध्यें डायरेक्टर ऑफ पोलिस यांचा समावेश केला आहे. या कमिशनवर लोकांच्या विश्वासाचे सभासद नेमण्याबद्दल हिज. ए. हायनेस यांस सल्ला

देण्याबद्दल नेक—नामदार व्हाईसरॉय यास विनंति करण्याचा अधिकार अध्यक्ष यांस ही सभा देत आहे, व या कमिशनमार्फत होणारी चौकशी उघड व्हावी व त्या कमिशनपुढें बाहेरचे वकिलांना चौकशीस मदत करण्यास येण्याची परवानगी असावी.

मांडणारः— रा. दिनकरराव.

अनुमोदनः—- रा. शिंदोरे.

**ठराव ३ राः**—- गुलबुर्गा येथील दंग्याची चौकशी कमिशनमार्फत झाल्यावर यांतील अपराधी लोकांची चौकशी फौजदारी कायद्याप्रमाणें कोर्टामार्फत व्हावी.

**ठराव ४ थाः**—- गुलबुर्गा येथील पोलीस व मॅजिस्ट्रेट इ. अधिकारी तावडतोब बदलण्यांत यावेत.

**ठराव ५ वाः**—- निझाम संस्थानांत हिंदूंची लोकसंख्या शेंकडा ८७ असूनही सदर संस्थानांत मुसलमानांकडून अनेक ठिकाणीं हिंदूंवर अत्याचार होत आहेत याच्या बातम्या प्रसिद्ध होत आहेत. यावरून हिंदु लोकांच्या जीविताचें व वित्ताचें संरक्षण होण्याच्या बाबतींत शंका उत्पन्न झाली आहे. त्यामुळें त्यांचीं मनें अस्वस्थ झालीं आहेत. शिवाय तेथें हिंदूंस बाटवून मुसलमान करण्याची सक्त खटपट चालू आहे. त्याबद्दलही हिंदु प्रजेस फार चिंता वाटत आहे. तेव्हां या बाबतींत हिंदू लोकांची चिंता दूर करण्याची नेक नामदार व्हाइसरॉयसाहेब व हिज. ए. हायनेस निझामसाहेब, सेक्रेटरी ऑफ स्टेट व बादशहा पंचमजॉर्ज यांनीं तावडतोब तजवीज करावी अशी या सभेची आग्रहाची विनंति सदर अधिकाऱ्यांस करण्याचा अधिकार या सभेच्या अध्यक्षांस ही सभा देत आहे.

हा ठराव अध्यक्षांनीं मांडला व तो पास झाला.

या ठरावानुसार अध्यक्षांकडून ना. व्हाइसरॉय, निजाम साहेब, स्टेट सेक्रेटरी व बादशहा यांचेकडे तावडतोब ताराही रवाना झाल्या आहेत असें कळतें.

---

# गुलबर्गा येथील मुसलमानांचे अत्याचार.

## अत्याचारास उठावणी कोणीं दिली ?

### अधिकारी व पोलीस यांचेवर आरोप.

निजामच्या राज्यांत गुलबर्गा येथें मुसलमान गुंडांनीं जे अत्याचार केले त्याबद्दलची विस्तृत हकीकत यापूर्वीं ज्ञानप्रकाशमध्यें प्रसिद्ध केलीच आहे. आतां टाइम्स ऑफ इंडियानें गुलबर्गा येथें पाठविलेल्या आपल्या खास बातमीदाराकडून जी माहिती आणविली आहे ती पुढें देण्यांत येत आहे.

सदरहु प्रतिनिधी एक पार्शी गृहस्थ असून ते आपल्या ता. १८ च्या तारेंत म्हणतात कीं, गुलबर्गा येथें येऊन पोहोंचण्यापूर्वीं तेथील अत्याचाराच्या ज्या बातम्या मीं ऐकल्या होत्या त्या सर्व येथील प्रत्यक्ष परिस्थिति पाहिल्यावर खऱ्या आहेत असें मला दिसून आलें. आतां लष्करी लोकांनीं गांवांत स्थिरस्थावर केलें आहे. परंतु मुसलमानांनीं भयंकर नुकसान केल्याचें दिसून येतें. ओसाड पडलेल्या रस्त्यावरून व गल्ल्यांतून जातांना हिंदूंच्या देवळांचा केलेला विध्वंस जागोजाग दिसतो. येथें असलेल्या लहान मोठ्या सुमारें ४०।५० हिंदु देवळांपैकीं दंगेखोरांच्या तडाक्यांतून सुटलेलीं देवळें क्वचितच असतील. कित्येक देवळांचें दगडी बांधकाम उध्वस्त केलें असून कांहीं देवळें आगी लावून जाळलीं आहेत.

### अत्याचारावर पांघरूण घालण्याचा मुसलमानांचा लंगडा प्रयत्न.

मुसलमान लोक आपल्या अत्याचाराच्या कृत्यावर पांघरूण घालण्याचा प्रयत्न करीत आहेत. पण त्यांची बाजू अगदींच लंगडी आहे. हिंदूंनीं आमच्या

मशिदी भ्रष्ट करून आम्हांस असह्य दुःख दिलें असें ते म्हणत आहेत, परंतु या त्यांच्या म्हणण्यावर अधिकारी वर्ग किंवा सुबुद्ध जनता यांपैकीं कोणाचाही विश्वास नाहीं. मुसलमानांनीं हिंदूंतील कित्येकांना मुसलमान करण्याचा जो उपयोग चालविला आहे त्याबद्दल हिंदूंनीं निजाम साहेबांकडे तक्रार केल्यामुळें चिडलेल्या गुलबर्गा येथील कांहीं लहानसान अधिकाऱ्यांनीं व पोलिसांनीं दंगा घडवून आणला असें हिंदुलोक उघडपणें म्हणत आहेत. वरिष्ठ अधिकारी हें म्हणणें ग्राह्य धरीत नाहींत. गुलबर्गा येथील बडे अधिकारी मोहरमची व त्याला जोडूनच नारळी पौर्णिमेची सुटी असल्यामुळें हैद्राबाद या राजधानीच्या ठिकाणीं गेले होते. त्यामुळें त्यांच्या हाताखालील अधिकाऱ्यांकड सर्व व्यवस्था आली व त्यांनी मोहरमची संधि साधून हे दंगे घडवून आणले.

## पोलिसांचें कळलावीचें वर्तन.

पोलिसांचें वर्तन कसें चिथावणी देणारें होतें यासंबंधीं माहिती सांगतांना येथील हिंदूंचे पुढारी म्हणतात कीं, श्रीशरणबसवेश्वराच्या पालखीच्या सालाबादच्या मिरवणुकीसाठीं डिस्ट्रिक्ट मॉजिस्ट्रेटकडे परवानगी मागविण्यांत आली व त्यांनीं तेथील मुसलमान रहिवाशांचा सल्ला घेतला तेव्हां त्यांनीं परवानगी देण्यास अनुकूलता दिली. पण डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटनीं जेव्हां बैठकींत पोलिस अधिकाऱ्यांचा सल्ला विचारला तेव्हां त्यानीं परवानगी देण्यास हरकत घेतली व पोलिस खात्यांतील दुय्यम दर्जाच्या अधिकाऱ्यांनीं देवालयाच्या मालकीच्या जागेंत सुमारें पंधरा दिवसांपूर्वीं एक टेनिस कोर्ट तयार करून तेथें प्रेक्षकांना बसण्याकरितां दगडी कट्टे तयार केले व अशा रीतीनें त्यांनीं कुरापतीची तयारी केली. देवळाच्या व्यवस्थापकांनीं ता. ४ रोजीं आपल्या मालकीच्या जागेवरील हे कट्टे काढवून टाकिले. त्यानंतर पोलिसांनीं तेथें मुसलमान गुंड जमा करून दुसऱ्या श्रावण सोमवारीं निघालेल्या पालखीस हरकत करविली व खुद्द आपणही हरकतीस पाठिंबा दिला. दंगेखोरांत मिसळून दंगा करणाऱ्या हत्यारबंद व ड्रेस असलेल्या एका पोलिसास गोळी लागली असून तो जखमी झाला आहे.

## सरकारी पत्रक.

घडलेल्या अत्याचारासंबंधानें एक सरकारी पत्रक नुकतेंच प्रसिद्ध झालें आहे पण त्यांतील खुलासा फारच त्रोटक आहे. पत्रकांत पुढील मजकूर आहे.

" गुलबर्गा येथें हिंदु व मुसलमान या जातींत अलिकडे उत्पन्न झालेल्या वितुष्टाचें पर्यवसान ता. ११ रोजीं ब्राह्मणपुऱ्यांत श्रीशरणबसवेश्वराच्या पालखीची मिरवणूक निघाली त्यावेळीं दंगा होण्यांत झालें. त्याच्या दुसऱ्या दिवशीं मुसलमानांच्या पंजाच्या मिरवणुकीच्या वेळीं हा तंटा अधिक वाढला व मुसलमानांनीं लिंगायतांच्या देवळावर हल्ला करून तेथील खिडक्या, व हंड्या फोडल्या व नंदीचे कान फोडले. ता. १६ रोजीं एक मशीद भ्रष्ट केल्याची वार्ता पसरल्यावरून मुसलमानांच्या टोळ्या जमा झाल्या व त्यांनीं लिंगायतांच्या देवळांवर मोठा हल्ला करून त्याचा विध्वंस व लुटालूट केली. त्यावेळीं तेथें थोड्याशा पोलिसांनिशीं हजर असलेले सी. आय. डी. चे सुपरिंटेंडट मि. अझीजुल्ला यांनीं दंगेखोरांला पैस करून गर्दी मोडण्याचा व शांतता करण्याचा प्रयत्न केला. पण दंगेखोरांपैकीं कोणी त्यांचेवर गोळी झाडल्यामुळें ते ठार झाले. लष्करी पलटणी पाठविण्याकरितां हैद्राबादला तारा करण्यांत आल्यावर घोडेस्वार व पायदळ पलटणी मशीनगन्ससह गुलबर्ग्यास आल्या असून आतां परिस्थिति आटोक्यांत आली अहे. ता.१६रोजीं रात्रीं त्या शहारांतील बहुतेक सर्व हिंदू देवळें उध्वस्त करण्यांत आलीं. आपली मशीद भ्रष्ट करण्यांत आली असल्याचा मुसलमान लोक हिंदूंवर आरोप करीत आहेत. दंग्यांत पोलिस सुपरिंटेंडंट, दंगेखोरांचा एक पुढारी व एक गिरणीकामगार याप्रमाणें एकंदर तीन माणसें ठार झालीं. आणखी आठ जखमी झाली. गेले दोन दिवस पोलिस लोक गुन्हेगारांना पकडीत असून बऱ्याच लोकांना पकडलें आहे. लुटींत गेलेली कांहीं मालमत्ताही सांपडली आहे. देवाची एक चांदीची मूर्ति लुटली गेली होती तीही झडतींत सांपडली आहे."

---

# पुण्याची जाहीर सभा.



## गुलबर्गा येथील मुसलमानांच्या अत्याचारांचा निषेध.

( पुणें ता. २३ ऑगष्ट स. १९२४ ) निजामसरकारचे राज्यांत गुलबर्गा येथें मुसलमानांनीं हिंदूंवर जे अनन्वित अत्याचार केले त्याच्या निषेधार्थ **दे. न. चिं. केळकर.** यांचे अध्यक्षतेखाली येथील हिंदुसभेतर्फे काल रोजीं जाहिरसभा भरली होती. सभेंत श्री. ल. ब. भोपटकर, नारायणराव गुंजाळ, रॉ. ब. हणमंतराम रामनाथ, मानूरकर व राघवेंद्र शर्मा यांचीं भाषणें झालीं. भाषणांचा सारांश असा कीं, माजी निजामसाहेबांच्या निधनापासून निजामचे राज्यांत हिंदूंचा जो छळ चालला आहे, त्याचेंच पर्यवसान गुलबर्ग्याच्या अत्याचारांत दृष्टीस पडत आहे. गुलबर्गा येथील आधिकारी व पोलीस बहुतेक सारे मुसलमान आहेत व त्यांच्या प्रत्यक्ष चिथावणीनें नसले तरी मूक संमतीनेंच हे अत्याचार झाले, असें तेथील रहिवाशांना वाटत आहे. अशा स्थितींत एका परमेश्वराखेरीज आपल्यास कोणी वाली नाहीं अशी त्यांची भावना होणें साहजिक आहे. मंदिरें पाडणें व मूर्ति फोडणें हें मुसलमानांच्या दृष्टीनें मोठें सत्कृत्य असेल, पण प्रश्न असा कीं, हिंदूंच्या जीविताचें, मालमत्तेचें व बायकामुलांचें रक्षण करण्याची जबाबदारी जो पाळूं शकत नाहीं त्याचें **अधिराज्य** हिंदूंनीं तरी कां म्हणून मान्य करावें ? नजराण्यांच्या मिषानें बिचाऱ्या हिंदूंची नुसती लूट चालली आहे. लांचलुचपतीला तर सुमार नाहीं. न्यायदानाचे कामावर वाईट व नालायक लोकांची अधिष्ठापना झाल्याच्या त्यांच्या मूर्तिमंत प्रतिमा आज हैद्राबादेस कोणासहि पाहावयास मिळतील. हिंदूंना जबरदस्तीनें बाटविलें किंवा फुसलावून नेलें तर त्याची दाद लागूं शकत नाहीं. आपण राज्यकर्ते आहों; मनास वाटेल तें करूं अशी तेथल्या मुसलमानांची भावना असल्यास नवल नाहीं. प्रत्यक्ष परमेश्वरालाहि विसरून जाऊन निजामसाहेब स्वतःस जणूंकाय सर्वशक्तिमान समजतात असें दिसतें. मुसलमानांना आपल्या

संस्कृतीचा मोठा अभिमान वाटतो, पण आजच्या विसाव्या शतकांत या मुसलमानी राज्यांत वक्त्याची मुस्कटदाबी, सभांना व वर्तमानपत्रांना बंदी, धरपकड, हद्दपारी असले प्रकार सर्हास चालूं आहेत, महंमद, गझनी व अवरंगझेब यांचा इतिहास आपण वाचतों, पण निजामच्या राज्यांत शेंकडा ८७ लोक हिंदु आहेत. पण अधिकाराच्या जागा शेंकडा ९९ मुसलमानांच्या हातीं ! निजामशाहींतील लोकांना स्वराज्याचे हक्क मिळेपर्यंत असले अत्याचार थांबणें शक्य नाहीं. हिंदूंना सरसकट बाटवून

## हिंदुत्वाचें निर्मूलन करण्याचा

मोंगलाईतील अधिकाऱ्यांनीं चंग बांधलेला दिसतो. या पवित्र कृत्यांत त्यांना वरून फूस मिळत असावी. कारण त्याशिवाय ख्वाजा हसन ( निझामी ) यास जी २०० रु. ची दरमहा तैनात चालू आहे त्याची उपपत्ति लागत नाहीं. गुलबुर्ग्याच्या मुसलमानांच्या अत्याचारांनीं महाराष्ट्रांतच नव्हे तर सर्व हिंदुस्थानांत खळबळ उडवून दिली आहे. निजामसाहेबांस आमचें एवढेंच सांगणें आहे कीं, त्यांच्या राज्यांतील व बाहेरील हिंदूंच्या भावनांविषयी त्यांनीं बेपर्वा राहून आतां चालावयाचें नाहीं, सर्व वक्त्यांचीं वरील आशयांचीं भाषणें झालीं.

## अध्यक्ष श्री. तात्यासाहेब केळकर

आपल्या भाषणांत म्हणाले, " खरें पाहतां मुसलमानांनींच ठिकठिकाणीं सभा भरवून गुलबर्ग्यास त्यांच्या धर्मबांधवांनीं केलेल्या अत्याचाराबद्दल निषेध करावयास पाहिजे होता. परंतु अलीबंधु स्वस्थ झोपा घेत आहेत. व खिलाफत कमिट्या मूग गिळून बसल्या आहेत. हिंदु मुसलमानांची एकी करण्याचे महात्माजींचे प्रयत्न नुसत्या लांब लांब गप्पा मारून यशस्वी होणार नाहींत. मलाहि एकी पाहिजे आहे व महात्माजींच्या प्रयत्नाला पूर्ण यश यावें अशी माझीहि इच्छा आहे. परंतु हिंदु समाज सुसंघटित होऊन असल्या अत्याचारांना प्रतिबंध करण्यास समर्थ झाल्याशिवाय ही एकी होणार नाहीं. संघटणा याचकरितां पाहिजे. खिलाफत कमिट्या एक स्वस्थ बसल्या असतील पण कॉंग्रेस कमिट्यांनीं त्यांचेंच अनुकरण करावें हें आश्चर्य होय. खिलाफतीच्या चळवळीस सहाय्य करून हिंदूंनीं स्वतःला कमकुवत करून घेतलें. मुसलमान बलिष्ट होऊन

करीत आहेत. खिलाफतीची चळवळ ही एका दृष्टीनें हिंदूंना नादान बनविण्याचीच चळवळ होय. महात्माजींच्या प्रयत्नाला यश येण्यास अगोदर मुसलमानांना एकीची अवश्यकता पटलीच पाहिजे. मुसलमान पुढारी या दृष्टीनें आपलें वजन खर्च करतील अशी मी आशा करतों. गुलबर्ग्याच्या अत्याचाराबद्दल म.गांधींनीं स्वतः तीव्र निषेध व्यक्त करून कॉंग्रेस व खिलाफत कमिट्यांना तसेंच करण्याविषयीं सांगावें अशी त्यांना माझी विनंति आहे. खिलाफतीच्या कार्याला म. गांधींनीं उचलून धरलें, आज लाखों हिंदूंच्या गाऱ्हाण्यांकडे ते दुर्लक्ष करतील हें संभवत नाहीं. मोगलाईतल्या जुलमी कारभारबद्दल गांवोगांव सभा भरवून निषेध व्यक्त करण्याविषयीं हिंदु सभेच्या अध्यक्षांनीं सर्वांस जाहीर विनंति करावी. पं. मालवीयांनीं या कामीं पुढाकार घेऊन गुलबर्ग्यास चौकशी कमिशन पाठवून सविस्तर हकीकत चवाठ्यावर आणावी अशी माझी त्यांना विनंति आहे"

सभेंत खालील ठराव पास झालेः–( १ ) गुलबर्गा येथें मूर्ति फोडणें, देवळें पाडणें, लुटालूट व हिंदू स्त्रियांची बेअब्रू करणें इत्यादि जे भयंकर अत्याचार मुसलमान गुंडांनीं केले, त्याबद्दल या सभेस दुःख व संताप वाटत आहे. ( २ ) निजामाच्या राज्यांत हिंदु शें. ८७ असून सुद्धां मूठभर मुसलमान त्यांचा छळ करूं शकतात. हिंदूंना सरास बाटविण्याचा व्यवस्थित प्रयत्न चालू आहे. हिंदूंचें पूजास्वातंत्र्य नष्ट झालें आहे इतकेंच नव्हे, त्यांचीं घरेंदारेंहि सुरक्षित नाहींत. ही सर्व स्थिति सुधारावयाची असल्यास हिंदूंनीं आपली संघटना केल्याशिवाय गत्यंतर नाहीं, असें या सभेचें मत आहे. ( ३ ) म. गांधींच्या एकीच्या प्रयत्नाला यश येणें हें बहुतांशीं मुसलमानांच्या मनोवृत्तिवर अवलंबून असल्यानें मुसलमान पुढारी त्या दृष्टीनें आपली शिकस्त करतील अशी या सभेस आशा आहे.

# गुलबर्ग्याच्या दंग्याची चौकशी.



## फोटो घेण्याची परवानगी नाकारली

गुलबर्गा ता. ६–वॅ. नाईक यांनीं मागितलेले दंग्याचे ठिकाणांचे फोटो घेण्याची परवानगी, अध्यक्षांनीं नाकारल्याचें आजच्या चौकशीच्या प्रारंभीं जाहीर केलें. फिर्यादी पक्षानें शरण बसाप्पाच्या देवळाच्या अंतर्भागाचा फोटो पुराव्यांत दाखल केला असतां आरोपींना तसलाच फोटो घेण्याची मनाई होणें वाजवी नाहीं असें नाईक यांनीं सांगितलें. पण त्याचा उपयोग झाला नाहीं. नंतर खटल्याचें काम दंग्याच्या ठिकाणीं चालवावें अशी त्यांनीं पुनः एकदां विनंति केली, पण ती नाकारण्यांत आली. नंतर थोडा पुरावा घेण्याचें काम झालें.

## कमिशनांविरुद्ध तक्रार

व्हाइसरॉय, मुंबईचे गव्हर्नर, हैद्राबादचे रेसिडेंट व खुद्द निजामसाहेब यांच्याकडे सोलापूरच्या लिंगायत संस्थांनीं लांबलचक तारा पाठवून, मि. क्रॉफर्ड यांच्यामार्फत स्वतंत्रपणें सदर चौकशी चालावी व नबाब झुलकदर जंग आणि महमद नबाज जंग यांना कमिशनवरून दूर करावें अशी विनंति केल्याचें समजतें.

## गुलबर्ग्याचा दंगा व यवतमाळ ( वऱ्हाड ).

ता. १ रोजीं यवतमाळला स्वराज्य पक्ष, कॉंग्रेस कमिटी व जिल्हा असोसिएशन यांच्या विद्यमानें जाहीर सभा होऊन गुलबर्गा प्रकरणांत कित्येक महत्त्वाचे ठराव करण्यांत आले. गुलबर्ग्याच्या दंग्यासंबंधीं चौकशी करण्याक-रितां निजामसरकारनें नेमलेल्या कमिशनावर यवतमाळकरांचा मुळींच विश्वास नसून सदर प्रकरणाची चौकशी हिंदुस्थानसरकारनें स्वतंत्र कमिशन नेमून करावी व त्या कमिशनला गेल्या बारा वर्षांत निजामच्या राज्यांत हिंदूंवर कसे जुलूम होत आहेत व त्यांना कसें बाटविण्यांत येत आहे, याबद्दलची चौकशी करण्याचा

अधिकार द्यावा, अशी त्यांची मागणी आहे. गुलबर्ग्याचा दंगा हा निजामच्या राज्यांत हिंदूविरुद्ध अंमलांत असलेल्या पद्धतशीर धोरणाचा स्वाभाविक परिणाम होय, असें यवतमाळचें मत आहे. यवतमाळकरांची हिंदुस्थानसरकारच्या स्वतंत्र कमिशनची मागणी अत्यंत रास्त असून, तिला सर्व देशाकडून पाठिंबा देण्यांत यावा अशी आम्ही शिफारस करतों.

## गुलबर्गा व मुसलमान पुढारी.

गुलबर्ग्याच्या दंग्यांत मुसलमानांनीं जे अत्याचार केले, त्याचा जाहीर निषेध करण्याकरितां अद्यापि एकहि मुसलमान पुढारी किंवा खिलाफतवाला पुढें आला नाहीं, ही आश्चर्याची गोष्ट होय. अलीबंधू व हकीमजी मूग गिळून कां बसले आहेत ते एका अल्लासच माहीत ! यवतमाळच्या सभेंत मुसलमान पुढाऱ्यांच्या या मुकेपणाचा तीव्र निषेध करण्यांत आला असून, वऱ्हाड प्रांत निझामला देण्याबद्दल मुसलमान पुढाऱ्यांनीं केलेली चळवळ देशभक्ति-प्रेरित नसून ज्ञातिहितप्रेरित होती. असें त्यावरून सिद्ध होतें, असे सभेनें जाहीर केलें आहे. अजून तरी अलीबंधू, हकीमजी प्रभृति पुढारी आपलें मौन सोडतील काय ! ( लोकमान्य. )

---

# गुलबर्ग्याच्या दंग्याची चौकशी.

## हिंदूंच्या पक्षाचें समर्थन.

### गुलबर्ग्यांत राजकीय चळवळी करणाऱ्या संस्था आहेत हें विधान सपशेल खोटें आहे.

**गुलबर्ग्याच्या** दंग्याचें चौकशी कमिशन पुढें ता. १२ मोहरमचे श्री शरण बसवेश्वराच्या देवालयासंबंधी १७ मुसलमानांवर पवित्रस्थान भ्रष्ट करणें, नुकसान पोंचविणें आणि बेकायदेशीर शिरकाव करणें या आरोपांवर जो खटला चालला त्यांत आरोपींतर्फे मौ. **महमद असगर** बी. ए. बॅरिस्टर एट. लॉ यांनीं भाषण केलें. यांचे उत्तरांत श्रीयुत **नारायणराव** बळूरगी वकील हायकोर्ट गुलबर्गा यांनीं जें भाषण केलें तें पुढील आशयाचें होतें:—

मि. असगर यांनीं आपल्या भाषणांत इतर कांहीं गोष्टींचा उल्लेख केला नसता तर ना. कमिशनला तसदी देण्याची मुळींच गरज नव्हती. पण मि. असगर यांनीं अशीं कांहीं विधानें केलीं आहेत कीं त्यांचें उत्तरांत भाषण करणें अपरिहार्य होऊन बसलें आहे.

## राजकीय चळवळी.

सरकारविरुद्ध चळवळ करणाऱ्या अशा बऱ्याच संस्था गुलबर्ग्यांत आहेत, हें सिद्ध करण्याकडे मि. असगर यानीं आपला बराच अमूल्य वेळ खर्ची घातला आहे. मी प्रांजलपणें ही गोष्ट ना. कमिशनच्या नजरेस आणूं इच्छितों कीं, या गोष्टीला महत्त्व देण्याची मुळींच अवश्यकता नाहीं. कारण या खटल्यांत जो पुरावा पुढें आला आहे त्याचे विरुद्धच नव्हे तर प्रत्यक्ष वस्तुस्थितीशीं देखील हें विधान विसंगत आहे.

राजकीय बाबींशीं संबंध असलेली एकही संस्था येथें नाहीं किंवा सरकार-विरुद्ध गुप्त रीतीनें किंवा कटाचे स्वरूपानें काम करणारी या ठिकाणीं एकही कमिटी नाहीं. परमेश्वराचे धन्यवाद गायले पाहिजेत कीं, हा रोग या इलाख्यांत मुळींच उद्भूत झाला नाहीं. असें असतां त्या रोगानें ग्रस्त असा गुलबर्ग्यांत तरी कोण सांपडूं शकेल ! आपल्या पक्षकारांचा बचाव करण्याकरितां ही गोष्ट पुढें मांडण्याची मि. असगर यांस गरज भासली असावी. पण ते ही गोष्ट अगदीं विसरून गेले असावेत कीं, ज्यांच्याकडून यासंबंधींची त्यांना माहिती मिळाली ते लोक एका अडाणी आणि बेजबाबदार अशा वर्गापैकीं असून राजकारणासारख्या नाजुक आणि महत्त्वाचे विषयासंबंधीं त्यांचें पूर्ण अज्ञान आहे. माझे सन्माननीय मित्रांनीं असेंही विधान केलें आहे कीं मौ. अझीझुल्ला-साहेब मरहूम सी. आय. डी. सुपरिंटेंडेंट यांचा मृत्यु देखील अशाच गुप्त चळवळ्यांचा परिणाम आहे. वास्तविक पाहतां ज्या गोष्टीसंबंधानें पुरेसा आणि खात्री-लायक पुरावा नाहीं अशा गोष्टी सिद्ध करण्याकडे मि. असगर यांनीं अमूल्य वेळ व्यर्थ खर्च केला याचें मला वाईट वाटतें. वस्तुतः त्या गोष्टी सिद्ध करण्याची अवश्यकता देखील नव्हती. जरी नबाब महंमद नवाजजंग डायरेक्टर जनरल ऑफ पोलिस आणि मि. हाषमअल्ली डिस्ट्रिक्ट म्याजिस्ट्रेट गुलबर्गा यांनीं आपल्या जबान्यांत गुलबर्ग्यास राजद्रोही संस्था असाव्यात असा उल्लेख केला, तरी पण त्यांचें सांगणें देखलि ऐकींव वार्तेपैकीं असल्याकारणानें त्याला महत्त्व देण्यांत अर्थ नाहीं. उलटपक्षीं मि. क्रॉफर्ड सी. आय. डी. चे. डेप्युटी डायरेक्टर जनरल यांच्या साक्षीनें तर हें विधान खोडून निघतें. अशी वस्तु-स्थिति असतांना इतक्या निश्चयात्मक रीतीनें मि. असगर यांना अशाप्रकारचें विधान करतां येतें हें आश्चर्य नव्हे काय !

## श्री. वामन नाईक.

श्री. वामन नाईकासंबंधीं बॅ. असगर यांनीं ज्या गोष्टींचा उल्लेख केला आहे त्यासंबंधीं मला एवढेंच म्हणावेंसें वाटतें कीं, श्री. नाईक हे संस्थानाधिपतीचे खरे हितचिंतक आहेत. वेगवेगळ्या समाजांत सलोखा आणि ऐक्य घडवून आणण्याची त्यांची इच्छा नेहमीं जागृत असते, एवढेंच नव्हे, तर त्या दिशेनें त्यांचे प्रयत्न नेहमीं चालूं असतात. गुलबर्ग्यास त्यांचें येणें देखील याच उद्देशाकारितां होतें.

ही गोष्ट नबाब महमद नवाजजंग यांनीं कबूल केली आहे. श्री. नाईकांनीं येथें येऊन जें जें कांहीं केलें तें अत्यंत प्रशंसनीय होतें, असें असतां त्यांच्या विरुद्ध बऱ्याच गोष्टी मि. असगर यांच्या भाषणांत याव्यात याचें मला वाईट वाटतें. ना. कमिशननें या गोष्टीकडे विशेष लक्ष्य पुरवावें अशी माझी नम्र विनंति आहे.

दुसऱ्या एका गोष्टीचा उल्लेख मि. असगर यांचें भाषणांत आला. ती म्हणजे मौलवी अबदुलअलीम यांच्या धार्मिक प्रवचनांमुळें फक्त थोड्या हिंदु वकिलांचीं मनें दुखवलीं गेलीं आणि या गोष्टीचा उल्लेख करतांना त्यांनीं आपल्या समान उद्योगाच्या बंधूंविषयीं बऱ्याच गोष्टींचा निर्देश केला. वकिलांच्या वर्गाकडून जी येथें किंवा इतरत्र कामगिरी होत असते ती या कमिशनला पूर्णपणें विदित आहे. श्रीयुत जनार्दनराव व रामरावांसारख्या योग्यतेच्या वकिलांचीं मनें दुखावलीं जावींत आणि मि. हाषम मोयजुद्दीनसाहेब सेशन्स जज्ज यासारख्या सत्यप्रिय आणि सुशील स्वभावाच्या अधिकाऱ्याला सलोखा घडवून आणून वकिलद्वयाचें मनःसमाधान करणें अवश्य वाटावें या गोष्टीवरूनच यांत कांहीं तथ्य नसावें असें अनुमान काढणें योग्य होणार नाहीं.

## सामाजिक परिषद्.

सामाजिक परिषद् ही एक राजकीय संस्था आहे, असें सिद्ध करण्याचा मि. असगर यांनीं प्रयत्न केला आहे. सामाजिक स्थितीसंबंधानें चर्चा अशा परिषदांतून होत असते. खेरीज याठिकाणीं १३३२ फसलींत त्या परिषदेचें एक अधिवेशन **बॅ. एम. आर. जयकर** यांच्या अध्यक्षतेखालीं पार पडलें, याशिवाय त्यापरिषदेचा गुलचर्य्याशीं तादृश संबंध नव्हता. पतितपरावर्तनाच्या ठरावाचा शुद्धिचळवळीशीं कांहींएक संबंध नाहीं व तो ठराव देखील **डि. मॅ. च्या सूचनेवरून** बिनतक्रार कमी करण्यांत आला. सर्व स्थानिक अधिकारी आणि पोलिसचे अंमलदार त्याप्रसंगीं हजर होते. सरकाराविरूद्ध किंवा इतर समाजांचीं मनें दुखावलीं जातील अशा प्रकारचें त्याठिकाणीं कांहींही त्यांच्या भाषणांत आलें नव्हतें. अशा प्रकारच्या परिषदांवर आरोप ठेवणें ही गोष्ट विशेष लक्ष्यांत घेण्यासारखी आहे. याच बाबतींत बोलतांना माझ्या सन्मान्य मित्रांनीं सामाजिक परिषदेचे स्वागताध्यक्ष श्रीयुत **गोपाळराव** वकील यांचे भाषणासंबंधीं आक्षेप घेतले. पण श्री. गोपाळरावजींचें भाषण वेगवेगळ्या समाजांतील हजारों माणसांच्या

समुदायापुढें झालें असून त्यानंतर त्याबद्दल आजपर्यंत एकानेंही आक्षेप घेतला नाहीं. आणि आज मि. असगर यांना आपल्या आरोपांचा बचाव करण्याकरितां श्री. गोपाळरावांच्या भाषणाचा संबंध मुळींच अस्तित्वांत नसलेल्या राजकीय चळवळीशीं जोडून द्यावा वाटला. पण ही गोष्ट सर्वस्वी निराधार आणि वस्तुस्थितिविरोधक आहे. **हिंदूमहासभे**संबंधीं मला एवढेंच म्हणावेंसे वाटतें कीं त्यांत जर कांहीं आक्षेप घेण्यासारखे असते तर हैद्राबादसारख्या ठिकाणीं त्या सभेला कांहीं कार्य करतां येणें शक्य झालें नसतें.

## श्रीयुत प्रधान.

माझ्या विद्वान मित्रांनीं असेंही म्हटलें आहे कीं, श्रीयुन प्रधान सी. आय. डी. खात्यांतील एक अंमलदार हे श्रीयुन रामराव व जनार्दनराव वकील यांना भेटण्यास वारंवार जात येत असत. एकाद्याच्या घरीं जाणें जोंपर्यंत आक्षेपार्ह किंवा अपायकारक ठरत नाहीं तोंपर्यंत एखाद्याच्या जाण्यासंबंधीं आक्षेप घ्यावा याचें मला आश्चर्य वाटतें. उलटपक्षीं सी. आय. डी. चे मुख्य अधिकारी मि. क्रॉफर्ड यांनीं प्रधानांच्या निर्भीड आणि उत्कृष्ट कामाबद्दल प्रशंसापर उद्गार काढले आहेत. शपथेवर जी साक्ष मि. क्रॉफर्ड यांनीं दिली त्यांत त्यांनी हें देखील कबूल केलें आहे कीं, त्यांच्या या ओळखीच्या योगानेंच श्रीयुन प्रधान यांना इतक्या उत्तम रीतिनें कामांत मदत करतां आली. श्रीयुन **जनार्दनराव** आणि **रामराव** उभयतां समाजांतील सन्मान्य व्यक्ति असून श्रीयुत प्रधान हे एक सुशिक्षित आणि मान्यतेस पोंचलेले अधिकारी आहेत. अशांच्या स्नेहसंबंधाबद्दल आक्षेप घेण्यापासून काय निष्पन्न होणार होतें ! ( या वेळीं ना० कमिशनच्या सभासदांनीं आपणांस मि. प्रधानासंबंधींच्या या उल्लेखाकडे मुळींच लक्ष्य पुरविण्याची जरूर वाटली नाहीं, असें सांगितल्यावरून श्रीयुत नारायणराव पीरशेटीच्या अर्जाकडे वळले )

## बॅरिस्टर रामचंद्र नाईक.

पीरशेटीच्या अर्जावर बॅ. नाईकांनीं सही केल्यासंबंधीं श्रीयुन नारायणराव म्हणाले कीं, मीं या गोष्टींचा मुळींच निर्देश केला नसता. पण नाईक गैरहजर असतांना मौ. असगर यांनीं आपल्या समानधर्मी तरुण मित्रावर जो वैयाक्तिक हल्ला

केला आहे त्यामुळें बोलावें लागतें. मि. असगर म्हणाले कीं, ज्या अर्जावर मि. नाइकांनीं सही केली, त्यावर सही करण्यास आपण अनमान केलें असतें पण ज्या अर्जावर वकील म्हणून सही करण्यांत येते त्यांतलि मजकुराच्या सत्यतेबद्दल वकिलास कसें जबाबदार धरतां येईल याचें मला आश्चर्य वाटतें. ज्या वेळीं तो अर्ज देण्यांत आला त्या वेळीं जी सर्वसाधारण परिस्थिति होती तिचा उल्लेख त्यांत आला आहे. कोणत्याही एकद्या विवक्षित गोष्टीचा विशेष उल्लेख त्यांत नव्हता.

मि. असगर यांना वाटतें कीं,बॅ. नाईकांनीं अर्जातील गोष्टी सर्वस्वी निराधार आणि खोट्या असल्यामुळें त्यावर सही करण्यास नको होतें असें जर आहे तर मि. असगर यांनीं देखील ना. कमिशनपुढें अडाणी आणि राजकारणासंबंधी ज्यांना कल्पना देखील असणें शक्य नाहीं. अशा आपल्या पक्षकारांमार्फत राजकीय चळवळीच्या अस्तित्वाचा उल्लेख करण्यास अनमान करूं नये हें चमत्कारिक नव्हे कां ?

मि. असगर यांनीं सध्या गादीवर असलेल्या अप्पासंबंधी ना. कमिशनचे मन कलुषित करण्याचा प्रयत्न केला आहे आणि सरकारविरुद्ध ज्या चळवळी या ठिकाणीं होतात त्यांचें केंद्रस्थान श्रीशरण बसवेश्वराचा वाडा आहे. असें धाडसाचें विधान ठोकून देण्यासही त्यांनीं कमी केलें नाहीं. ना. कमिशननें शरणबसप्पाचें देवालय आणि त्यांतील पवित्र वस्तूची झालेली नासधूस नजरेखालीं घातली आहे. असे प्रकार घडल्यानंतर जनांची मनःस्थिति काय झाली असेल याची सहज कल्पना होईल. अशावेळीं अप्पाचें मनःसमाधान करण्यासारखे कांहीं शब्द भाषणांत आले असते तर फार बरें होतें. उलट दुःखावर डागण्या देण्याचा यत्न करण्यांत आला आहे. ना. कमिशननें अप्पांना जर एक वेळ पाहिले तर ते किती सात्विक वृत्तीचे आहेत हे सहज समजून येईल.

## अडाणी पक्षकारांकडून मिळविलेली माहिती.

सरकार विरुद्ध चळवळ करणाऱ्या संस्था गुलबर्ग्यांत आहेत. या संबंधीं मि. असगर यांना व्यक्तिशः मुळींच माहिती नाहीं. खेरीज त्यांचे समर्थनार्थ

कांहींही पुरावा पुढें आला नाहीं. तेव्हां उघडपणें ही गोष्ट सिद्ध होते कीं, मि. असगर यांना ही माहिती आपल्या पक्षकारांकडून मिळाली असली पाहिजे. मि. असगर हे संस्थानचे संस्थानाधिपतीचे हितचिंतक आहेत. असें असतां एखाद्या समाजाचीं मनें कलुषित होतील अशा गोष्टींना कितपत महत्त्व द्यावें याचा त्यांनीं विचार करावयास पाहिजे होता. आपल्या पक्षकारांवर जे आरोप सिद्ध झाले तेवढ्यांपुरतेंच त्यांनीं आपले भाषण मर्यादित ठेवलें असतें आणि जे मुद्दे फिर्यादीतर्फे मांडण्यांत आले ते खोडून काढण्याचा यत्न केला असता तर त्यांच्या पक्षकारांचें मुळींच नुकसान झालें नसतें. मि. असगरसारख्या समंजस, विद्वान आणि जबाबदार माणसाचें मन गुलबर्ग्यांतील हिंदू बांधवांसंबंधीं इतकें कलुषित कां व्हावें याचें मला आश्चर्य वाटतें. आपण सर्व एकाच इलाख्याचे रहिवाशी आणि एकाच हिंदमातेचीं लेंकरें असून एकाच नावेंतून आपला प्रवास व्हावयाचा आहे, हे विसरून जाण्याइतकी मि. असगर यांनीं आपली वृत्ती कशी ढळूं दिली याबद्दल मला सखेदाश्चर्य वाटतें.

शेवटीं शांतपणें भाषण ऐकून घेतल्याबद्दल ना. कमिशनरचे मी मनःपूर्वक अत्यंत अभार मानतों.

# गुलबर्ग्याच्या अत्याचारांचा निषेध.

## ठिकठिकाणच्या जाहीर सभा.

**विजापूर**--गुलबर्ग्याच्या अत्याचारांच्या बातमीनें येथील जनतेंत मोठी खळबळ उडून सभा भरविण्याविषयीं पुढाऱ्यांना आग्रह करण्यांत आला; आणि अखेर ता. १ सप्टेंबर इ. स. १९२४ रोजीं एक जंगी जाहीर सभा भरविण्यांत आली. अध्यक्षस्थानीं श्री. पांडुरंगराव देसाई होते. सभेंत तीन ठराव पास करण्यांत आले. (१) पहिला ठराव दंग्यांत इजा झालेल्यांच्या विषयीं सहानुभूतीचा व दुःख प्रदर्शनाचा होता; तो रा. ब. राघवेंद्रराव यांनीं पुढें मांडला व त्याला रा. सा. हलकट्टी यांनीं दुजोरा दिला. हिंदू-मुसलमानांमध्यें अशा प्रकारचे दंगे झाल्यास हिंदुस्थानाची सर्वांगीण प्रगति होणें अशक्य असल्यामुळें यापुढें असे प्रकार न होतील अशी खबरदारी पुढाऱ्यांनीं घेण्याची सूचना वरील ठरावांत करण्यांत आली होती. ( २ ) दुसरा ठराव दे. श्रीनिवासराव कौजलगी यांनीं पुढें मांडला. "हिंदु समाजांतील निरनिराळ्या जातींत ऐक्य नसल्यामुळें हिंदुसमाजाला असल्या अत्याचारांना बळी पडावें लागतें, तेव्हां निरनिराळया जातींतील हिंदु पुढाऱ्यांनीं आपापसांत एकी घडवून आणावी म्हणजे पुढें असल्या अत्याचारांना आळा बसेल " असें या ठरावांत म्हटलें होतें. ( ३ ) हिंदु देवालयांत शिरून मूर्ती छिन्नभिन्न करणाऱ्या गुलबर्ग्यांतील अत्याचारी मुसलमानांचा निषेध तिसऱ्या ठरावानें करण्यांत आला. हा ठराव अप्पा धनशेटी यांनीं पुढें मांडला व त्याला जावडी यांनीं दुजोरा दिला.

## यवतमाळची (वऱ्हाड) जाहीर सभा.

ता. १-९-१९२४ रोजीं रात्रीं श्री. वी. आर. जठार यांचे अध्यक्षतेखालीं एक जाहीर सभा भरून गुलबर्ग्याच्या अत्याचाराविषयीं तीव्र निषेध व्यक्त करण्यांत आला. सदर दंग्याची स्वतंत्र चौकशी कमिशन

नेमून हिंदुस्थानसरकारानें चौकशी करावी आणि या कमिशनपुढील खरी बातमी सांगणाऱ्या निस्पृह साक्षीदारांना संस्थानकडून कोणत्याहि तऱ्हेचा त्रास न होईल अशी ब्रिटिशसरकारनें हमी द्यावी; कारण सध्यांच्या कमिशनवर लोकांचा बिलकूल विश्वास नाहीं अशा आशयाचे ठराव वरील सभेंत पास करण्यांत आले. गुलबुर्ग्याच्या दंग्याखेरीज गेल्या १२ वर्षांत हिंदू रहिवाशांना संस्थानाच्या हद्दींत कशा प्रकारें वागविण्यांत आलें याविषयींचीहि चौकशी वरील कमिशननें करावी असें ठरावांत सुचविण्यांत आलें आहे.

## निझाम सरकारांनीं केलेला न्याय.

गुलबर्ग्यांत मुसलमानांनीं केलेल्या भयंकर अत्याचारासंबंधीं निझामांनीं कमिशन नेमून जो चौकशीचा फार्स केला त्यावरून हिंदूंना त्या राज्यांत कितपत न्याय मिळतो त्याची साधारण कल्पना येण्यासारखी आहे.

एकंदर दंगेखोरांचा जमाव हजार दोन हजारांचा होता. त्यांपैकीं फक्त १२३ लोकांना गुन्हेगार म्हणून पकडण्यांत आलें व चौकशीअंतीं ८८ लोकांवर चार्ज ठेवण्यांत आला व ३५ ना सोडून देण्यांत आलें. कमिशननें ८८ लोकांना गुन्हेगार व शिक्षेस पात्र असें ठरविलें असून ही निझामसाहेबांनी एक फर्मान काढून त्या सर्वांना बिनशर्त सोडून दिलें व अशा रीतीनें ह्या नाटकावर अन्यायाचा पडदा टाकण्यांत आला.

खरें पाहतां संस्थानांत प्रचालित असलेल्या कायद्याप्रमाणें सर्वसाधारण कोर्टाकडून खटल्याची चौकशी करण्यांत आली असती तर त्याच्या निकालावर हायकोर्टांत व ज्यूडिशल कमेटींत अपील करण्यास मार्ग मोकळा होता. पण निझामसरकारांनीं तसें न करितां कमिशन नेमून व त्यावर आपल्या पसंतीचीं माणसें नेमून बाह्यतः ज्यूडिशिअल चौकशी केल्याचें दाखवून अखेर फर्मान काढूनच आरोपींना सोडून दिलें, त्यामुळें व कमीशनचा रिपोर्ट व निकालही प्रसिद्ध केला नाहीं त्यावरूनच सर्व गोष्टींची कल्पना होण्यासारखी आहे.

निझामांच्या निकालाविरुद्ध व दंग्यासंबंधीं हिंदुस्थानांत सर्वत्र मोठमोठ्या शहरीं निषेधपर सभा भरविण्यांत आल्या व वर्तमानपत्रांनींही त्याचा निषेध केला आणि **महात्मा गांधी** यांच्या अध्यक्षतेखालीं भरलेल्या बेळगांव येथील राष्ट्रीय सभेनेंही त्यासंबंधी निषेधाचा ठराव पास केला. पण निझामसरकारला कोणाचीही व कसलीही पर्वा नाहीं हें देशाचें दुर्दैव होय.

---

# गुलबर्ग्यांतील वेडे चाळे.

## ( महात्मा गांधी, ' यंग-इंडिया ' )

### एक गुप्त संस्था.

हिंदू लोकांचीं पवित्र देवालयें भ्रष्ट करण्यास मुसलमान समाजाला उद्युक्त करून एक प्रकारचा उन्माद चढविणारी एखादी गुप्त संस्था या पापी कृत्याच्या आड दडून बसली आहे, अशी मी गेल्या आठवड्यांत एक सूचना केली होती, तिला गुलबर्ग्याच्या अगदीं ताज्या उदाहरणानें जरा जास्तच पुष्टी मिळाल्याशिवाय राहूं शकत नाहीं. देवालयें अपवित्र करतांना झालेल्या दंग्याचें गुलबर्ग्याचें आज आपल्या समोर अगदीं नवीन उदाहरण आहे. मुसलमान लोकांनीं दंगा करणें हीच अनिष्ट सूचना समजून हिंदू लोकांची एक प्रकारें चिथवणूक होत असते. आणि तशीच मुसलमानांनीं देवालयें भ्रष्ट करणें केव्हांहि न्यायाला धरून होत नसल्यामुळें अर्थातच हिंदूचीं जास्त चिथवणूक होऊं लागते. ज्या वेळीं शामबहार व अमेठी येथें हिंदू देवालयें अपवित्र केल्याचें ऐकिलें, तेव्हां रागाच्या भरांत 'आज मुसलमानांनीं हिंदूंचीं देवालयें भ्रष्ट करण्याचें जरी आरंभिलें तरी पुढें मागें या मुसलमानांच्या कृत्याची फेड करून मुसलमानांच्या मशिदी पाडून टाकण्याची कृति जर हिंदू समाजाच्या हातून होऊं लागली, तर मात्र त्यावेळीं मुसलमान समाजानें आश्चर्य वाटून बुचकळ्यांत पडतां कामा नये.' असें शब्द मौ. शौकत अल्ली यांनीं उच्चारिले होते. मौलानांच्या शब्दानें कदाचित् हिंदू समाजाला आपली स्तुतीच केली असें वाटून समाधानहि होईल. परंतु मला मात्र त्यापासून बिलकूल समाधान वाटणार नाहीं, व हिंदूंनींहि त्यापासून समाधान मानून स्वस्थ बसण्याचा उपदेशहि त्यांना मी करणार नाहीं. मुसलमानांच्या धर्मवेडामुळें जे अत्याचाराचे दंगे त्यांच्याकडून आजपर्यंत करण्यांत आले त्याबद्दल त्यांच्यातील पुढाऱ्यांना जितकें वाईट वाटतें त्यापेक्षांही मला जास्त वाईट वाटतें हें त्यांना समजून येणें आवश्यक आहे. या गोष्टींत माझ्यावर असणाऱ्या

# जबाबदारीची जाणीव

मला आहे. या सर्व होणाऱ्या दंग्याविषयींचा दोष सर्वस्वी माझ्याच माथ्यावर मारावयास बहुतेक हिंदू समाज तयार असलेला मला दिसत आहे. आणि या दोषाचा स्वीकार करण्यास माझी नेहमीच तयारी आहे. कारण मुसलमान समाजाचा उद्धार करण्यांतच मी आपलें सर्वस्व खर्ची घातलें असें हिंदू समाज म्हणत आहे. खरोखरच मी सर्वस्व खर्ची घातले व मुसलमान समाजाची उन्नति करण्याचा प्रयत्न केला याबद्दल मला पश्चात्ताप जरी होत नसला, तर हिंदूंनीं आपल्या म्हणण्यांत जी एक प्रकारची खाच दाखविली आहे त्यामुळें मात्र माझ्या मनाला धक्का बसल्याशिवाय रहात नाहीं म्हणून दुसरी जरी कांहीं कारणाकरितां नव्हे तरी या कारणाकरितां आपल्या पवित्र देवालयांना भ्रष्ट केल्याबद्दल दुसऱ्या हिंदूंना जितकें वाईट वाटतें त्यापेक्षांहि माझ्या अंतःकरणांत जास्त वेदना होत आहेत हें मला उघडपणें सांगितलें पाहिजे. या जबाबदारीमुळें ज्याप्रमाणें मी मूर्तिपूजक आहे त्याप्रमाणेंच मूर्तिभंजकहि ठरत आहे असें मला या टीकेवरून समजण्यास हरकत नाहीं. मूर्तिपूजनाच्या योगानें प्राप्त होणारी तेजस्विता बहुमोल असून मानवी उन्नतीकरितां तीच तेजस्विता प्रामुख्यानें कारणीभूत ठरत असते. आणि म्हणून ज्यांच्या वास्तव्यानें आमच्या पवित्र मातृभूमीच्या पावित्र्याची जाणीव आम्हाला पटत आहे ती आमची हजारों पवित्र देवालयें रक्षण करण्याकरितां लागणारें सामर्थ्य प्राणाचीहि पर्वा न करितां संपादन करून आयुष्यभर सतत झटेन. माझी आणि मुसलमान समाजाची एकी पाहिली म्हणजे आमच्या मूर्तीविषयीं व देवळयांविषयीं मान्यता मुसलमानांना वाटत आहे असेंच केव्हांहि सिद्ध होऊं शकतें. आपल्यांत परमेश्वराचें वास्तव्य आहे. तेव्हां आपलें संरक्षण केलें म्हणजे परमेश्वराचेंच संरक्षण झालें असें समजून पूर्वापार चालत आलेली धर्मवेडेपणानें मूर्ति पूजनाची पद्धत नाहींशीं करून मी मात्र स्वतःच मूर्तिभंजक होण्याच्या पापास पात्र झालों आहे. पाषाणाच्या अथवा सोन्याच्या मूर्ति तयार करून त्यांची पूजा करण्याच्या कष्टकारक मार्गापेक्षां वरील भक्तिमाग एक प्रकारचा सोपा आहे. हिंदु–मुसलमानांचें खरें ऐक्य होण्यास जर कशाची

जास्त आवश्यकता असेल तर सद्गुण अथवा धोरण म्हणून मुसलमानांनीं सहनशील व्हावें याची नसून जोपर्यंत धर्म म्हणून कांहीं तरी सत्य आहे अशी त्यांची खात्री आहे, तोंपर्यंत धर्माचेंच सहनशीलत्व हें एक अंग आहे असें समजून त्यांच्याकडून तें दाखविलें जाणें याचीच! त्याचप्रमाणें हिंदू धर्मातील पद्धतीला सोडून जरी एखादे वेळीं न पटण्यासारखें दुसऱ्या धर्मीयाकडून सदाचरण घडलें तरी त्याविषयींहि हिंदूंनीं विश्वास व धर्म यांच्या पूज्यभावनेमुळेंच सहनशीलत्वाच्या नात्यानें वर्तन ठेविलें पाहिजे. म्हणून मुसलमानांनीं देवालयें भ्रष्ट केलीं म्हणून आपण त्यांच्या मशिदीवर हल्ला करावयाचा अशा प्रकारची प्रतिकृति करण्याची कल्पना हिंदूंनीं आपल्या अंतःकरणांतून धुवून काढिली पाहिजे.

---

निजामशाहींतील

# हिंदूधर्माची अवहेलना.

---

## पुण्याच्या नागरिकांची जाहिरसभा.



गुलबर्गा येथील मुसलमानांच्या अत्याचारांत हिंदूंचीं जीं कित्येक देवालयें उध्वस्त झालीं त्या बाबतींत नुकसानभरपाई देण्यासंबंधानें म्हणून निजामसाहेबांकडून जीं दोन फर्मानें नुकतींच प्रसिद्ध झालीं आहेत त्यांनीं हिंदूंचें समाधान होण्याऐवजीं त्यांच्या दुःखावर डागण्या देण्यासारखेंच धोरण या फर्मानांचें असल्यामुळें त्यांचा तीव्र निषेध करण्याकरितां पुणें येथील नागरिकांची जाहीर सभा बुधवार ता. २१ रोजीं सायंकाळीं सार्वजनिक सभेच्या दिवाणखान्यांत भरली होती. **रा. ल. ब. भोपटकर** यांनीं या सभेचें अध्यक्षस्थान स्वीकारावें अशी सूचना **वे. शा. सं. चित्रावशास्त्री** यानीं पुढें मांडली व तिला अनुमोदन मिळाल्यावर रा. भोपटकर टाळ्यांच्या गजरांत अध्यक्षस्थानीं बसले. नंतर त्यांनीं सांगलीचे सुप्रसिद्ध वकील **रा. गणपतराव अभ्यंकर** यांना पहिला ठराव सभेपुढें मांडण्याची सूचना केली.

## रा. अभ्यंकर यांचें भाषण.

नंतर रा. अभ्यंकर यांनीं पहिला ठराव पुढें मांडला, तो येणेंप्रमाणेंः—

**ठराव १ ला.** " पुणें शहरवासियांची ही जाहीर सभा गुलबर्गा येथील श्रीशरणबसवेश्वराच्या देवालयांत कळस चढविण्याच्या मनाईविषयीं निझामसरकारांनीं ता. ४।१।२५ रोजीं जो फर्मान काढला व मनाईचीं त्यांत जीं कारणें दाखविण्यांत आलीं तीं हिंदूधर्मस्वातंत्र्य आणि राजनीति व न्यायाच्या विरुद्ध असून त्यामुळें संस्थानांतील हिंदू प्रजाजनांच्या कायदेशीर हक्कास बाध येत असून इस्लामचा पक्षपात व हिंदूंच्या धार्मिक हक्कांचा निर्णय इस्लामी दृष्टीनें केला जात आहे. म्हणून ही सभा सदहू फर्मानाचा तीव्र निषेध करीत

आहे आणि ही सभा निझामसरकारांस अशी विनंति करिते कीं, कळस चढविण्याची परवानगी द्यावी व निझामसरकारचे मुलखांत विशेष धर्मास विशेष महत्त्व देण्याचें धोरण चालू आहे असें प्रजेस व इतरांस वाटणें अनिष्ट आहे."

या ठरावावर रा. अभ्यंकर यांनीं फारच मुद्देसूद व परिणामकारक भाषण केलें. ते म्हणाले कीं, "पावसानें झोडलें व राजानें मारलें तर सांगावयाचें कोणास?" अशी आपल्यांत एक जुनी म्हण आहे. ती या विसाव्या शतकांत सर्व सुधारलेल्या राष्ट्रांत जरी खोटी ठरली आहे तरी आपल्या संस्थानांतून ती हमेषा प्रत्ययास येत आहे. निजामसाहेबांनीं नुकतीच जीं दोन फर्मानें काढलीं आहेत तीं इतकीं गैरमुत्सद्देगिरीचीं व दुराग्रहाचीं आहेत कीं, निजामसाहेब आपल्या प्रजेला मनुष्यप्राणी समजतात कीं नाहीं याचीच शंका त्यावरून येते! सामान्यतः मनुष्यमात्राचे जे नैसर्गिक हक्क म्हणून सर्व राष्ट्रांनीं व सार्वभौम ब्रिटिश सरकारनेंही मान्य केलेले आहेत त्यांतच धार्मिक स्वातंत्र्याचाही समावेश होतो. अशा स्थितींत या नैसर्गिक हक्कांवर घाला घालण्याचा निजामसाहेबांस अधिकार कसा पोहोचतो हेंच समजत नाहीं. सार्वभौम ब्रिटिश सरकारकडून संस्थानिकांना जें स्वातंत्र्य देण्यांत आलें आहे त्याचा उघड उघड दुरुपयोग होत असल्याचें हें एक ताजें उदाहरण आहे. सतीची चाल व गुलामगिरी सरकारनें बंद केली हें प्रजेच्या नैसर्गिक हक्कांची जपणूक व्हावी याकरितांच होय. निजामाच्या राज्यांतील बहुसंख्याक प्रजा हिंदू आहे. असें असतां त्यांना अगदीं न्याय्य असें धार्मिक स्वातंत्र्य बिलकूल राहिलें नाहीं असाच या फर्मानाचा उघड अर्थ आहे. श्रीशरणबसवेश्वराच्या देवालयास पूर्वीं कळस नव्हता व याच गांवीं असलेल्या दर्ग्यास कळस आहे. सबब देवळास कळस उभारण्याची परवानगी देतां येत नाहीं हें निजाम साहेबांचें तर्कशास्त्र कोणाही विचारी माणसाच्या बुद्धीस पटणें शक्य नाहीं. कोणच्याही देवळाला कळस बांधणें किंवा न बांधणें किंवा तो अमूक इतका उंच अगर ठेंगणा बांधणें या गोष्टी सर्वस्वीं धार्मिक हक्काच्या असून ज्यांच्या त्यांच्या खुषीच्या आहेत. एखाद्या ख्रिश्चन चर्चचें शिखर नवीन बांधावयाचें असलें किंवा मशिदीच्यापेक्षां तें उंच होत असलें तर त्याला जसा निजामसाहेबांस प्रतिबंध करवत नाहीं तद्वत् तो हिंदूंच्या बाबतींतही करणें रास्त नाहीं. निजामसाहेबांना हीं फर्मानें काढण्यांत बदसल्ला देण्यांत आला आहे ही

गोष्ट निर्विवाद आहे. निजामाचें हेंच उदाहरण डोळ्यापुढें ठेवून उद्यां जर एकाद्या लिंगायत, जैन अगर मराठा संस्थानिकानें आपल्या राज्यांतील मुसलमान लोकांच्या स्वातंत्र्यावर असाच घाला घातला व मशिदही देवळापेक्षां मोठी अगर उंच अथवा सुंदर व शोभिवंत बांधतां कामा नये व तिच्यावर कळसही असूं नये असा कायदा केला तर त्यांना काय उत्तर देतां येईल ? हिंदूंनीं आपल्या राज्यांतून निघून जावें, येथें त्यांना व त्यांच्या धर्माला वाव नाहीं असाच निजाम-साहेबांच्या या धोरणाचा अर्थ आहे व त्याचा वेळींच सर्वांनीं निषेध करून या बाबतींतील निजामशाहींतील हिंदू प्रजेवरील जुलूम दूर करण्याची खटपट केली पाहिजे.

रा. **के. के. सकट** ( मातंग ) यांनीं या ठरावास अनुमोदन दिलें. ते म्हणाले कीं, केवळ संघशक्तीच्या जोरावर व निजामशाहींत तर राजकीय सत्तेच्या बळावर हिंदुधर्माचा पाडाव करण्याचा जो प्रयत्न मुसलमान लोकां-कडून होत आहे त्याचा प्रतिकार सर्व हिंदूंनीं केला पाहिजे. या वेळीं अनास्था अगर हयगय उपयोगाची नाहीं. बहुसंख्याक अशा हिंदु प्रजेवर निजाम-साहेबांनीं जी दडपशाही चालविली आहे, तिचा प्रतिकार केला पाहिजे. हिंदूंनीं मुसलमान लोकांच्या वाटेल त्या चढेलपणाच्या शर्ती कबूल केल्या तरी ते हिंदूंवर अन्याय करण्यास चुकत नाहींत. सहा कोटि अस्पृश्य हिंदुजनतेचें प्रेम संपादन केल्यानें हिंदू संघटनेस जोर येणार असून मुसलमानांच्या अरेरावी वर्तनास आळा बसणार आहे. अशा प्रसंगीं हिंदू लोकांनीं बेपर्वाई न दाख-वितां नेटानें प्रयत्न केला पाहिजे.

रा. **हरीभाऊ जोशी** यांनीं या ठरावास पाठिंबा दिला. निजामसाहेबांचीं फर्मानें वाचून दाखवून ते म्हणाले कीं, यांतील विचारसरणी वाचून कोणाही हिंदूस चीड आल्यावांचून रहाणार नाहीं. ‘ कांहीं देवळें इतकीं लहान आहेत कीं, त्यांना देवळें म्हणतां येईल कीं नाहीं याची शंकाच आहे. ’ असें निजामसाहेब या फर्मानांत म्हणतात. पण देऊळ अगर त्यांतील मूर्ति यांचें पावित्र्य त्यांच्या आकारावरून व लहानमोठेपणावरून ठरवावयाचें नसतें, ही अगदीं साधी व सरळ गोष्टही निजामसाहेबांस कळत नाहीं. वस्तुतः राजाचा

धर्म तो संस्थानचा धर्म नव्हे. राजाचा धर्म 'राजधर्म' असून आपल्या प्रजेला त्यानें ज्याच्या त्याच्या धर्माप्रमाणेंच वागूं दिलें पाहिजे. हिंदुस्थानचे राजे ख्रिस्तीधर्मीय आहेत म्हणून हिंदुस्थान सरकार कांहीं ख्रिस्तीधर्मीय नाहीं. परंतु निजामसाहेबांनीं आपल्या सत्तेच्या बळावर अत्यंत घातुक असें धोरण स्वीकारून गरीब व बहुसंख्याक अशा हिंदु प्रजेचीं व परप्रांतांतीलही हिंदु जनतेचीं मनें दुखविलीं आहेत.

वरील आशयांचीं भाषणें झाल्यावर ठराव सर्वानुमतें पास झाला.

**ठराव २ रा.** यानंतर रा. **चित्रावशास्त्री** यांनीं दुसरा ठराव सभेपुढ मांडला. तो असा: —

"गुलबर्गा येथें घडलेल्या अत्याचारानंतर कर्नाटकांतील सन्मान्य हिंदू पुढाऱ्यांनीं हिंदूंच्या धार्मिक हक्काबद्दल यापुढें निझाम सरकारांनीं आपलें धोरण कसें ठेवावें व त्यांच्या धार्मिक तक्रारी काय आहेत हें एकून घेण्याकरितां एका शिष्टमंडळाला परवानगी मिळण्याबद्दल निझाम साहेबांना अर्ज केला होता; तो त्यांनीं नामंजूर केल्याबद्दल ही सभा दिलगिरी प्रदर्शित करून अशी सूचना करिते कीं, सदहू तक्रारी ने. ना. व्हाइसरॉयसाहेबांकडे मांडण्याकरितां कर्नाटक, महाराष्ट्र आणि आंध्र प्रांतांतील पुढाऱ्यांचें एक शिष्टमंडळ पाठविण्यांत यावें. आणि त्याची व्यवस्था पुणें हिंदू सभेनें करावी व ह्यासंबंधीं व्हाईसरायसाहेबांशीं पत्रव्यवहार करण्याचा अधिकार आजच्या अध्यक्षांना देण्यांत यावा."

या ठरावावर भाषण करतांना **चित्रावशास्त्री** म्हणाले कीं, निजामच्या राज्यांतील हिंदू धर्मीय प्रजेवर व पर्यायानें सबंध हिंदू धर्मावर किती भयंकर हल्ले होत आहेत, याची कल्पना आतां सर्वांना झालेलीच आहे. आपलीं गाऱ्हाणीं निजामसाहेबांपुढें सामोपचारानें मांडण्याचेही प्रयत्न करून पाहिले पण त्यांत यश येत नाहीं. रा. पंडिताप्पा चिकोडीप्रभृति कांहीं लिंगायत गृहस्थांनीं एक डेप्युटेशन निजमासरकारकडे नेऊन आपलें गाऱ्हाणें त्यांच्या पुढें मांडण्याचा प्रयत्न केला. पण आम्हांस आमची जबाबदारी कळते, तुम्ही सांगण्याचें कारण नाहीं असें उत्तर देऊन या डेप्युटेशनची गांठ घेण्याचेंही निजामसाहेबांनीं अजिबात टाळलें. गुलबर्गा येथील देवळांचा प्रश्न हा फक्त येथील लोकांचा अगर निजामशाही किंवा लिंगायत लोकांपुरताच नसून तो सबंध हिंदुधर्माचा

आहे. यास्तव समाधानकारक निकाल लागेपर्यंत हिंदूंच्या मनाला स्वस्थता मिळणें शक्य नाहीं.

**रा. बाबूराव फुले** यांनीं या ठरावास अनुमोदन दिलें. ते म्हणाले कीं, निजामशाहींतील शेंकडा ९० प्रजा हिंदू असून निजामसरकारचे अन्नदाते हिंदू लोकच आहेत; परंतु ही जाणीव राज्यकर्ते या नात्यानें आपणावर येणारी जबाबदारी सर्व विसरून निजामसाहेब आपल्या अन्नदात्या हिंदू प्रजेवरच उलटले आहेत. प्रजेच्या हिताकरितां राजा असतो हें प्राचीन व अर्वाचीन राजनीतीचें मुख्य तत्त्व हे संस्थानिक लोक राजेपणाच्या घमेंडींत विसरले असून निजामसाहेबांनीं तर सर्व संस्थानिकांवर या बबातींत कडी केली आहे. सामोपचाराच्या प्रयत्नाकडेही ते ढुंकून पहात नाहींत. अशा स्थितींत या संस्थानिकांचे कान ज्यांच्या हातीं आहेत त्या व्हाइसरॉयप्रभृति ब्रिटिश अधिकाऱ्यांकडेच आपण दाद मागणें हाच मार्ग आपणां गरीब प्रजेस आतां उरला आहे.

यानंतर रा. **लळित** यांनीं या ठरावास पाठिंबा दिला. ते म्हणाले कीं, निजाम साहेबांनीं आपल्या प्रजेच्या नैसर्गिक हक्कांवरच घाला घातला असून त्यामुळें तेथील आपल्या हिंदुधर्मबांधवांची किती शोचनीय स्थिति झाली आहे हें आपणास दिसून येत आहे. परंतु एवढें म्हणून गप्प बसण्यानें हा प्रश्न सुटणार नाहीं. निजाम साहेबांच्या जुलमी वर्तनास आळा घालणें हें हिंदुस्थानांतील अखिल हिंदु जनतेचें कर्तव्यकर्म आहे. विशेषतः पुणेंकरांनीं पुढाकार घेऊन हें करणें उचित होय. कारण पुण्याचा शह हैद्राबादेवर बसतो ही इतिहासपरंपरा आहे. निजामसाहेब हे संस्थानिक या नात्यानें ब्रिटिश सरकाराचे " दोस्त " आहेत, परंतु त्यांचे मांडलिक आहेत. त्यांना " हिज एक्झॉल्टेड हायनेस" अशी विशेष बहुमानाची पदवी ब्रिटिश सरकरनें दिलेली आहे. ब्रिटिश सरकारजवळ त्यांचें वजन आहे. परंतु त्यांच्या असलेल्या या वजनाचा दुरुपयोग निजामसरकारकडून होणें योग्य नाहीं. परंतु तो होत आहे, असें दिसून येतें. सबब ब्रिटिश सरकारनें दोस्त या नात्यानें निजामसाहेबांची ही चूक त्यांच्या नजरेस आणून दिली पाहिजे. संस्थानिकांनीं अपल्या सत्तेचा जर ढोबळ दुरुपयोग ( ग्रॉस मिसकॉंडक्ट ) केला तर त्यांच्या कारभारांत हात घालणें हा सार्वभौम ब्रिटिश सरकारचा हक्क असून तो त्यांनीं वेळीं बजावलाही पाहिजे.

**रा.** ललीत यांचें अशा आशयाचें भाषण झाल्यावर ठराव सर्वानुमतें पास झाला.

**ठराव ३ रा.** यानंतर तिसरा ठराव दक्षिणी संस्थान हितवर्धक सभेचे सेक्रेटरी रा. **वामनराव पटवर्धन** यांनीं पुढें मांडला. तो येणेंप्रमाणें:—

" पांच वर्षांपूर्वीं निजाम सरकारनीं सभाबंदीचें फर्मान काढल्यामुळें हैद्राबाद राजकीय परिषद् भरविण्याची परवानगी देण्याबद्दल तेथील प्रजापरिषदेनें केलेला अर्ज निजामसरकारनीं आतां नामंजूर करून परिषद् भरविण्यास मनाई केली ह्याबद्दल ही सभा तीव्र निषेध करून असें जाहीर करते कीं, हा हुकूम प्रजेच्या सनदशीर जन्मसिद्ध हक्कांची पायमल्ली करणारा असा आहे. अशा स्थितींत या सभेची अशी सूचना आहे कीं, संस्थानांतील व ब्रिटिश हद्दींतील संस्थानी प्रजेनें येत्या मे महिन्यांत ब्रिटिश हद्दींत आपली परिषद् भरवावी आणि त्याकरितां पुणें येथें एक हैद्राबाद संस्थान प्रजामंडळ स्थापन करावें. "

## रा. वामनराव पटवर्धन यांचें भाषण.

वरील ठराव मांडतांना **रा. वामनराव पटवर्धन** म्हणाले कीं संस्थानांतील प्रजेला संस्थानिकांच्या अनियंत्रित कारभारामुळें किती दुःखें सहन करावीं लागत आहेत याची आपणास नव्यानें माहिती सांगावयास पाहिजे असें नाहीं. दक्षिणी संस्थान हितवर्धक सभेमार्फत आजपर्यंत ठिकठिकाणीं ज्या सभा—परिषदा भरविण्यांत आल्या आहेत त्यांवरून ही दुःस्थिति घालविण्याकरितां केवढें मोठें प्रचंड व दीर्घ प्रयत्नाचें कार्य आपणापुढें पडलें आहे याची कल्पना येईल. पण हें कार्य मोठें व कष्टाचें आहे म्हणून हातपाय गाळून आपणास स्वस्थ मात्र बसतां येणार नाहीं. संस्थानच्याच प्रजाजनांपैकीं जे कांहीं लोक खालसा हद्दींत रहात आहेत त्यांना आपल्या बंधूंचीं गाऱ्हाणीं चव्हाट्यावर मांडण्याची बरीच सवलत आहे; परंतु खुद्द संस्थानांतील प्रजेला तोही मार्ग मोकळा नाहीं. वस्तुतः प्रजेनें आपल्या तक्रारी मोकळ्या मनानें आपल्या राज्यकर्त्याजवळ सांगणें योग्य आहे व राज्यकर्त्यांनींही त्या अगत्यपूर्वक ऐकून त्या दूर करण्याचा प्रयत्न केला पाहिजे. परंतु संस्थानांत प्रजापरिषद् भरवून आपलीं दुःखें व अडचणी संस्थानिकांपुढें मांडणें हा प्रकार आपल्या

इकडे संस्थानांतून इतका कठिण होऊन बसला आहे कीं, कांहीं ठिकाणीं या साध्या व न्याय्य हक्काकरितां सत्याग्रहासारखा अनवश्यक व बिकट मार्ग स्वीकारावा लागतो, तर कांहीं संस्थानिक जबरदस्तीचा विशेषच अवलंब करून आपल्या प्रजेची सर्वच बाजूंनीं मुस्कटदाबी करूं पहातात. अशा प्रकारें वागण्याची अखत्यारी ज्यांना आहे असें वाटतें व जे कमी अधिक प्रमाणांत आपल्या सत्तेचा दुरुपयोग करीत असतात असे ७०० बादशहा हिंदुस्थानांत असून त्यांच्या ताब्यांत $\frac{१}{३}$ हिंदुस्थान आहे. हा एकतृतीयांश हिंदुस्थान जर आहे याच शोचनीय स्थितींत राहूं दिला तर तेथील प्रजेची दुर्दशा चालूं रहाणार ही गोष्ट तर खरीच; परंतु ब्रिटिश हद्दींतील प्रजेच्याही राजकीय प्रगतीला जबरदस्त पायबंद या परिस्थितीनें खास बसणार आहे. करितां खालसांतील राजकीय सुधारणेचा उपक्रम संस्थानांतही होऊन तेथील प्रजेलाही माणुसकीचे हक्क मिळावेत असा प्रयत्न खालसा हद्दींतील पुढाऱ्यांनीं व लोकांनीं आपल्या स्वतःच्या हिताच्या आकुंचित दृष्टीनेंही करणें अगत्याचें आहे. दाक्षिणी संस्थान हितवर्धक सभेची घटना झाली त्यावेळीं हैद्राबाद संस्थान तिच्यांतून वगळण्यांत आलें तें केवळ हैद्राबाद येथीलच कांहीं गृहस्थांच्या सूचनेवरून होय. वस्तुतः असा भेदाभेद करण्याचें कांहीं कारण नाहीं. संस्थानी प्रजेचीं गाऱ्हाणीं व परिस्थिति सामान्यतः एकाच स्वरूपाचीं आहेत. अर्थात् हैद्राबाद संस्थानांतील प्रजेनेंही यापुढें स्वस्थ न बसतां आपल्या संस्थानच्या हद्दींत व तें अशक्य असल्यास तूर्त परहद्दींत तरी आपल्या प्रजापरिषदा भरवून आपलीं गाऱ्हाणीं आपल्या राज्यकर्त्यांच्या व त्यांच्या वरिष्ठांच्या कानावर घालणें जरूर आहे. खालसा हद्दींतील पुढाऱ्यांनीं व प्रजेनेंही या कामीं सहकारितेनें व जरूर तर पुढाकार घेऊनही त्यांना या कामीं मदत केली पाहिजे. अर्ज, विनंत्या, वगैरे सामोपचाराचे मार्ग कोणास कितीही "मवाळपणाचे" वाटोत; परंतु हेच मार्ग प्रथमतः तरी योजणें व बिकट परिस्थिति उत्पन्न होण्याची शक्यता होतां होईल तों टाळणें हेंच राजा व प्रजा यांच्या अंतिम हिताच्या दृष्टीनें श्रेयस्कर असतें. ही गोष्ट लक्ष्यांत ठेवून सर्वांनीं चिकाटीनें प्रयत्न केले पाहिजेत. दक्षिणी संस्थानहितवर्धक सभेचे व हैद्राबाद प्रजा सभेचे सभासद होऊन संघटितपणें हें कार्य लोकांनीं आपलें म्हणून अधिक जोरानें चालविलें पाहिजे.

रा. वामनराव पटवर्धन यांनीं मांडलेल्या या ठरावास मराठा पत्राचे संपादक **रा. दा. वि. गोखले** यांनीं अनुमोदन दिलें.

रा. गोखले म्हणाले कीं, आपलें दुखणें वेशीवर टांगावें म्हणजे तें बरें करणारा कोणी तरी धन्वंतरी भेटण्याचा संभव असतो अशी आपल्यांत एक जुनी म्हण आहे. तीच आपण संस्थानांतील अन्याय चव्हाट्यावर मांडून पाळली पाहिजे. 'मोंगलाई' या शब्दाचा जो रूढ अर्थ आहे तो निजामच्या राज्यांतील प्रकारास अगदीं योग्यपणें लागू आहे. वर्तमानपत्रांना मज्जाव, हिंदूंची लोकसंख्या शेंकडा ९० असतां सरकारी नोकरींतील शें. ९० जागा मुसलमान लोकांना देणें, हिंदूंवर धार्मिक जुलूम होणें वगैरे गोष्टी उद्वेग आणणाऱ्या आहेत. प्रजापरिषद् भरवूं असें म्हणून नुसतीं हस्तपत्रकें वांटलीं तर तीं वांटणारांना हद्दपार करून त्यांच्या मालतत्तेचा अपहार करण्यांत येतो. असे अनुभव संस्थानांतून येतात हें मला माझ्या (कोल्हापूर) संस्थानांतील प्रकारावरून माहीत आहे. अशा स्थितींत संस्थानांच्या हद्दीबाहेर तरी ब्रिटिश हद्दींतील जनतेच्या साह्यानें हें संस्थानी प्रजेवरील अन्यायाचें दुःख वेशीस टांगलें पाहिजे. देशी **राज्यपद्धतीचा** वाईट नमुना म्हणूनच ब्रिटिश सरकारनें हीं संस्थानें जतन करून ठेविलीं आहेत कीं काय अशी शंका येते. निजामसरकारनीं आपल्या राज्यांत राजकीय प्रजापरिषद् भरविण्यास मागणी आली असतां ती परवानगी देण्यास त्यांच्या शहाण्या अधिकाऱ्यांनीं पांच वर्षे टोलवाटोलवी करून शेवटीं "ही राजकीय परिषद् होणार" असें म्हणून परवानगी देण्याचें साफ नाकारलें! या प्रकारास काय म्हणावें हेंच समजत नाहीं.

रा. गोखले यांचें या आशयाचें भाषण झाल्यावर तिसरा ठराव सर्वानुमतें पास झाला.

**ठराव ४ था.** यानंतर चवथा ठराव रा. **राघवेंद्र शर्मा** यांनीं सभेपुढें मांडला. तो पुढीलप्रमाणें आहे:—

"निजामसाहेबांनीं पांच वर्षांपूर्वीं फर्मान काढून आपल्या प्रजेस कौन्सिलद्वारें जबाबदार राज्यपद्धतीचे प्रातिनिधिक स्वरूपाचे हक्क देण्याचा मानस जाहीर केला व गेल्या फेब्रुआरी महिन्यांत त्याबद्दल एक कमिटीही नेमून

एका महिन्यांत रिपोर्ट सादर करण्याचें फर्माविलें; पण त्याचा अद्याप कांहींच पत्ता नाहीं. म्हणून ही सभा एच्-ई-एच. निझामसरकारांना अशी विनंति करिते कीं, त्यानीं उदार मनानें बेळगांव येथील अखिल भारतीय संस्थान प्रजा परिषदेचा ठराव व लोकमताकडे लक्ष देऊन आपल्या हिंदू व मुसलमान प्रजेच्या, उन्नतीकरितां आपल्या येत्या जन्म दिवसाचे शुभ प्रसंगीं निदान हैद्राबाद रिफॉर्म असोसिएशननें मागणी केल्याप्रमाणें सुधारणेचा पहिला हप्ता म्हणून त्यांना जबाबदार राज्यपद्धतीचे हक्क दिल्याचें जाहीर करावें ह्यामुळें आपल्या संस्थानांतील व वऱ्हाडच्या आणि हिंदुस्थानांतील सर्व हिंदुमुसलमानांना आनंद होईल. ''

हा ठराव सभेपुढें मांडतांना श्री. राघवेंद्रराव शर्मा म्हणाले " दक्षिणी-संस्थान प्रजापरिषद " स्थापण्याचे वेळीं हैद्राबाद संस्थानचा अंतर्भाव दक्षिणी संस्थान प्रजापरिषदेच्या कार्यक्षेत्रांत हैद्राबाद संस्थान सामिल केलें नव्हतें. कारण तेथें तेथील लोकांनीं राजकीय सुधारणा करण्याकरितां एक संस्था स्थापन केली होती व तिच्यामार्फत प्रजेची परिषद भरविण्याची परवानगी मागितली होती; परंतु आतां ती परवानगी नाकारण्यांत आली आहे व त्याचीं कारणें अत्यंत चमत्कारिक दिलीं आहेत. " संस्था राजकीय सुधारणा करण्याकरितां आहे, प्रजापरिषद राजकीय सुधारणा घडवून आणण्यासंबंधीं मागणी करण्याकरितां भरविण्यांत येणार आहे व ठराव राजकीय स्वरूपाचे आहेत, सबब परिषदेस परवानगी देतां येत नाहीं" असें कौन्सिलनें ठरवून निकाल दिला आहे. परंतु ही सर्व माहिती आज ४ वर्षें कौन्सिलपुढें होती. मध्यंतरीं सभाबंदीचा फर्मान निघाला त्यावेळेला वरील सर्व माहिती मागविण्यांत आली होती. वऱ्हाडबद्दल खटपट तेव्हां चालू होती, सबब परवानगी देण्याचें आमिष लावलें होतें असें दिसतें. आतां वऱ्हाडबद्दल निराशा वाटल्यावरून असें उत्तर देण्यांत येतें कीं काय कोण जाणें ! निजामसाहेबांनीं राजकीय सुधारणांची योजना करण्याकरितां एक कमिटी नेमली होती व तिचा रिपोर्ट एक महिन्यांत मागविण्यांत आला होता. हा रिपोर्ट निजामसाहेबांपुढें जाऊन अजमासें एक वर्ष झालें असेल; परंतु अखेर हुकूम अद्याप होतच आहे. गुलबर्ग्याच्या कमिशनच्या चौकशीची घाई होती; परंतु

कमिशनचा रिपोर्ट जाऊन इतका काळ गेला तरी अद्याप निकाल होत नाहीं. चौकशीची घाई करण्याचा हेतुच असा होता असें दिसतें कीं, चौकशी विस्तृत स्वरूपाची होऊं नये. हैद्राबाद् रिफार्म असोसिएशननें राज्यकारभाराच्या सुधारणांबद्दल एक योजना कमेटीस सादर केली आहे; तेव्हां निजामसाहेबांनीं सर्व गोष्टींचा विचार करून त्यांच्या वाढदिवसाच्या सुमंगल प्रसंगीं प्रजेस ठरावांत मागितल्याप्रमाणें देणगी द्यावी हें उचित नाहीं काय ? वाढदिवसानिमित्त नजराणा निजामसाहेबांस घेतां येतो तर प्रजेस उलट देणगी त्यांनीं कां देऊं नये ? अद्याप वऱ्हाडचा प्रश्न गाडला गेलेला दिसत नाहीं. वऱ्हाड व सी. पी. च्या गव्हर्नरसाहेबांनीं एका दरबारप्रसंगीं वऱ्हाडच्या लोकांची संमति घेऊन वऱ्हाडचा निकाल लावण्यांत येईल असें सांगितलें आहे. जमियत्-उल-उलमाचा ठराव मुरादाबादेच्या बैठकींत वऱ्हाडाबद्दल झालेला प्रसिद्धच आहे. तेव्हां वऱ्हाड परत मिळावा अशी जर निजामसाहेबांची खरी इच्छा असेल तर त्यांनीं प्रस्तुतच्या ठरावांत मागणी केल्याप्रमाणें कांहीं तरी केलें पाहिजे.

सदर ठरावाला अनुमोदन देतांना रा. **भावे** म्हणाले, पूर्वीं पास केलेले ठराव व आतां आपल्यापुढें असलेला ठराव हे फारच भिन्न स्वभावाचे आहेत. हिंदूंच्या देवळावर कळस न बसवूं देणारे निजामसाहेब संस्थानांत जबाबदार राज्यपद्धति सुरू करतील ही कल्पनाच केवळ मनोराज्यांतील दिसते. निजाम साहेबांच्या कारस्थानाचें स्वरूप कसें आहे, ते वऱ्हाडास स्वराज्य देतों म्हणतात. त्याची किंमत काय आहे हें हा ठराव पास केल्यानें लोकांस दिसणार आहे. उंदरांच्या सभेंत मांजराच्या गळ्यांत घाट बांधण्याचा ठराव पास करण्याप्रमाणें ही सभा लोकांस वाटणार आहे. पाहुण्यांची खटपट घरांतील भानगडी मिटविण्यास जशी उपयोगी पडत नाहीं तसेंच श्रेय आजच्या सभेस येणार आहे असें कोणी म्हणेल; परंतु या सभेसारख्या सभांवरून बाहेरचे लोक निजामशाही प्रजेस मदत करण्यास तयार आहेत असें दिसतांच निजामसाहेबांचे डोळे उघडणार आहेत. संस्थानच्या प्रजेची स्थिति कारुण्यास्पद आहे." या ठरावास सर्व्हंट ऑफ इंडियाचे संपादक रा. वझे यांनीं पुष्टि दिली.

नंतर तो ठराव सर्वानुमतें पास झाला. अखेरीस अध्यक्ष दे. भ. **लक्ष्मण बळवंत भोपटकर** हे आपल्या समारोपाच्या भाषणांत म्हणालेः—

" आजच्या ठरावांत दोन धार्मिक व दोन राजकीय ठराव पास झाले आहेत. माझे संस्थानविषयक प्रश्नाबद्दल विचार सर्वांच्या परिचयाचे आहेत. संस्थानिक म्हणजे त्यांस ना विचार, ना आचार असा प्राणी असतो. त्यानें खावें, प्यावें व ऐषआराम भोगावेत इतकेंच त्यांचे आयुष्याचें उद्दिष्ट असतें. अशी सर्वसाधारण समजूत झालेली आहे. तेव्हां निजामसारखे संस्थानिक आपण नुसते संस्थानिक नसून मुसलमान अहों असें मानावयास लागले याबद्दल त्यांचें अभिनंदन केलें पाहिजे. निझाम सरकारचा मुसलमानी धर्म, हिंदू संस्कृति किंवा हिंदी भाषा यांचा पुरस्कार करणार नाहीं. गुलबर्ग्याचें श्रीशरण बसाप्पाचें देऊळ निजामशाहींतील लिंगायतांचें नसोन, सर्व लिंगायत धर्मीयांचें आहे. सदर देवळाची दुस्थिति होणें हें सर्व लिंगायत समाजास लाजिरवाणें आहे. परंतु याबद्दल लिंगायतांस किंवा हिंदुधर्मीयांस कितपत तळमळ वाटत आहे. याचें मूर्त चिन्ह आजच्या सभेंतील लोकांचा समुदाय दाखवीत आहे. निजामसाहेब, हिंदूंच्या देवळास कळस नको म्हणतात, परंतु जुन्या मशिदींनंतर नवीन होणारीं ख्रिस्ती प्रार्थनामंदिरें यांचे कळस काढून टाकतांना निजामसाहेब कोठें दिसत नाहींत. मोपल्यांनीं मलबारांत हिंदू देवळें फोडलीं, हिंदू लोकांस त्रास दिला, परंतु ख्रिस्ती लोक व त्यांचीं मंदिरें यांच्या वाटेस ते गेल्याचें दिसत नाहीं. हिंदू समाजाप्रमाणेंच हिंदू संस्थानिक हिंदू धर्माबद्दल बेफिकीर आहेत. उद्यां बिकानेर, अलवार, शिंदे, होळकर, गायकवाड यांनीं जर व्हाइसरॉय साहेबांस थैल्या लिहिल्या कीं, निजामशाहींत हिंदु धर्मीयांस व हिंदु धर्मास अयोग्य रीतीनें वागविण्यांत येतें तें आम्हांस पसंत नाहीं, तर व्हाईसरॉयसाहेब यांचा कांहींच विचार करणार नाहींत असें मला वाटत नाहीं. हिंदु लोक राजकारणाकरितां तुरुंगांत जावयास व मरावयासही तयार झालेले दृष्टीस पडतात. परंतु धर्माच्या बाबतींत ते पूर्णपणें अधार्मिक झालेले दिसतात. तुर्कांनीं खलीफा काढून टाकिला तरी खिलाफतीबद्दल मुसलमानांची खटपट आहेच; निजामसाहेब माजी खलीफांस पेन्शन देत आहेत. इकडे आमचे हिंदू संस्थानिक श्री. शंकराचार्यांच्या गादीची होणारी अवहेलना खुशाल मजेंने पहात आहेत व संस्थानांत निष्प्रतिबंध गोवध होऊं देत आहेत. मुसलमान

समाज व मुसलमान संस्थानिक अन्यधर्मीय लोक बाटवून, मुसलमान धर्म वाढविण्याची खटपट करीत आहेत; हिंदू संस्थानिक आपली प्रजा बाटत असलेली स्वस्थ पहात आहेत. या सर्व गोष्टींचा विचार करतां पुणें हिंदू धर्मसभेनें हिंदू धर्माबद्दल जागृति उत्पन्न करण्याचें, हिंदु जातींतील वाद बंद करण्याचें व आपलेपणाचा भाव वाढविण्याचें कार्य केलें तर त्यांनीं हिंदु समाजावर मोठा उपकार केला असें मी मानीन. नंतर अध्यक्षांचे आभार मानण्यांत आल्यावर सभेचें काम खलास झालें.

---

# वऱ्हाड व निजामसरकार

## पुणें येथील जाहीर सभा.

पुणें येथें सार्वजनिक सभेच्या दिवाणखान्यांत पुण्याच्या नागरिकांची व वऱ्हाडांतील रहिवासी यांची वऱ्हाड प्रांताच्या निजाम सरकारच्या मागणी-बद्दल विचार करून मतें प्रदर्शित करण्याकरितां जाहीर सभा भरली होती. सभेला सर्व पक्षांचे व मतांचे पुढारी आलेले होते व नागरिकांची प्रचंड गर्दी जमली होती. अध्यक्षस्थानीं रीतसर श्री. अण्णासाहेब भोपटकर यांची योजना झाल्यावर 'सर्वंट ऑफ इंडिया' चे संपादक श्री. वझे यांनीं

**ठराव १ ला.** वाचून दाखविला तो येणेंप्रमाणें:—'हल्लीं प्रचलित असलेल्या स्वयंनिर्णयाच्या तत्त्वाप्रमाणें स्वतःची राज्यपद्धति कशी असावी व अधिराज्य कोणाचें पत्करावें हें ठरविण्याचा हक्क लोकांचा असल्यामुळें आणि प्रजाजनांचा एखादा समुदाय विकणें, खरेदी करणें, किंवा भाडेपट्यानें देणें हें आक्षेपार्ह कृत्य असून तें ब्रिटिश सरकार व निजामसरकार या दोघांनाहि भूषणावह नसल्यामुळें, वऱ्हाड प्रांत तेथील लोकांचें स्वतंत्रपणें अनुकूल मत पडल्याशिवाय हिज़ एक्झॉल्टेड हायनेस निजामसाहेब यांस देऊं नये असें आपलें मत ही सभा जाहीर करीत आहे, तसेंच वऱ्हाडच्या लोकांनीं हा प्रश्न मनःपूर्वक विचारांत घ्यावा. आणि त्या बाबत जो निर्णय ठरावावयाचा तो योग्य विचाराअंतीं व कोणतीहि गैरवाजवी घाई न करतां ठरवावा अशी या सभेची वऱ्हाडकरांना विनंति आहे.' हा ठराव मांडल्यावर

## श्री. वझे म्हणाले,

वऱ्हाड प्रांत निजामसरकारच्या ताब्यांत रहावा कीं इंग्रजांच्या ताब्यांत रहावा हें या ठरावांत कांहींच दर्शविलेलें नसून वऱ्हाडकरांच्या इच्छेप्रमाणें व त्यांच्या मागणीप्रमाणेंच त्याचा निर्णय व्हावा असें या सभेनें स्पष्ट मत प्रदर्शित केलें आहे. जे कांहीं पूर्वी करारमदार झाले असतील त्यांवर या प्रश्नांचा निकाल होऊं नये. त्या करारावरून कदाचित् गैरवाजवी रीतीनें इंग्रजांनीं वऱ्हाड मिळविला असेल,

कदाचित् मिळविला नाहीं असेंहि सिद्ध होईल. पण या कराराच्या विचारांत न पडतां वऱ्हाडकर नागरिकांच्या म्हणण्याचा विचार करणें अत्यंत आवश्यक आहे. वऱ्हाड प्रांत इंग्रजांनीं पूर्वी न्यायानें मिळविला कीं अन्यायानें मिळविला या भानगडींत पडूं नये! मागेंच जावयाचें असेल तर भोसले घराण्यापर्यंत जावें लागेल. तलवारीच्या जोरावर मिळविलेल्या प्रांतांच्या वेळीं न्यायान्यायाच्या विचाराकडे कोणी पहात नाहीं. पण नीतीच्या दृष्टीनें विचार करतांना स्वयंनिर्णयाचे तत्त्वाकडे पहावें लागतें. मी जर वऱ्हाडांत असतों तर मी निजामांकडे जाण्यास तयार झालों नसतों. इंग्रजांच्याच ताब्यांत निजामां-पेक्षां राहिलेलें बरें असें मीं आपलें मत दिलें असतें. जर खरोखरीच वऱ्हाडकरांना जाण्याची इच्छा असेल तर त्यांनीं पूर्ण विचारांतीं आणि गैरवाजवी घाई न करतां फाजील सावकाशीहि करूं नये. हा प्रश्न दिरंगाईवर टाकण्यासारखा नाहीं. वऱ्हाडकरांनीं पूर्ण विचारांतीं शक्य तितक्या लवकर निर्णय लाऊन घेणें अत्यंत जरूर आहे. नंतर रा. रा. दा. वि. गोखले यांनीं ठरावाला अनुमोदन दिल्यावर दुजोरा देतांना श्री. बाबासाहेब पटवर्धन म्हणालेः– जोंपर्यंत आपल्या हद्दींच्या प्रजेला निजाम सरकारनीं स्वराज्य दिलेलें नाहीं, तोंपर्यंत वऱ्हाडकरांना आम्हीं स्वराज्य देऊं या म्हणण्यांत काय अर्थ आहे! वऱ्हाड हा पूर्वींचा महाराष्ट्र आहे, व तो आपल्या महाराष्ट्राशीं संलग्न होत आहे. नंतर मतें घेतां वरील ठराव एकमतानें पास झाला. नंतर

**ठराव २ रा.** श्री. राघवेंद्रराव यांनीं मांडला. तो येणेंप्रमाणेंः– निजाम-सरकारचें अधिराज्य पत्करण्याच्या बाबतींत वऱ्हाडच्या लोकांना आपलें मत बनवितां यावें म्हणून ब्रिटिश सरकारानें या बाबतींत कोणतेंहि धोरण जाहीर करण्यापूर्वीं एक लोकमतानुवर्ती चौकशी कमिटी नेमावी व या कमिटीनें निजाम सरकारच्या सर्वसाधारण राज्यकारभारासंबंधीं व विशेषतः पुढील मुद्यासंबंधीं रिपोर्ट करावाः– (अ) कायद्यानुसार कारभार चाल-विण्याच्या सर्वसाधारण व्यवस्थेंत ढवळाढवळ केली जाते काय? (आ) परधर्माचे लोक मुसलमान धर्मांत घेण्याच्या कार्यांत निजामसरकार लक्ष घालतें काय? भाषण, मुद्रण व संघ या बाबतींत लोकांना स्वातंत्र्य आहे काय? (इ) पूर्वापार चालत आलेल्या इनामें, जहागिऱ्या वगैरे देणग्या खालसा

झाल्या आहेत काय ? तसेंच पूर्वींच्या राज्यकर्त्यांचीं वचनें मोडलीं गेलीं आहेत काय ? ( उ ) मराठी, तेलगू, कानडी या भाषांच्या शिक्षणाकडे दुर्लक्ष होत आहे काय ? या भाषांच्या व लिपींच्या ऐवजीं उर्दू भाषा व लिपी लादण्याचा प्रयत्न चालू आहे काय ? ( ऊ ) सरकारी नोकऱ्या वगैरे बाबतींत मुसलमानांना इतरांपेक्षां अधिक मेहेरबानी दाखविली जाते काय ? ( ए ) निजामसाहेबांच्या खाजगी खर्चाकरितां संस्थानच्या उत्पन्नापैकीं किती रक्कम खर्च होते ? ( ऐ ) लोकांपासून सक्तीनें देणग्या घेण्याची कोणत्याहि प्रकारची पद्धत आहे कीं काय ? या कमिटीनें आपल्या मर्जीनुरूप वाटतील ते साक्षीदार बोलावून पद्धतशीर चौकशी करावी. ज्या अर्थीं निजामसाहेबांनीं वऱ्हाडच्या लोकांना मनापासून वचनें दिलीं आहेत, त्या अर्थीं त्यांनीं सदरहू कमिटीला चौकशीच्या कामांत सर्व प्रकारची मदत द्यावी. " ठराव मांडल्यावर

## श्री. राघवेंद्रराव म्हणाले,

निजाम आणि मोंगलाई या शब्दावरूनच राज्यांतील अंदाधुंदी आणि बेबंदशाही या डोळ्यांसमोर उभ्या राहतात. निजामची राज्यव्यवस्था आणि धोरण हें समजणें जरूर आहे. तेथें एक नांवाचें कायदेकौन्सिल आहे, पण त्यांत लोकनियुक्त सभासद नसून, सरकारनियुक्त सभासद आहेत. त्यांनीं इंग्रज सरकारच्या जरूर त्या कायद्यांचीं उर्दूत भाषांतरें करावयाचीं असतात. सध्यांचें निजामसरकार नजराणे घेऊन वाटेल तीं कामें करतात. २०-२५ वर्षांपूर्वीं झालेल्या एका दिवाणी दाव्याचा निकाल त्यांनीं पुनः उकरून काढला आहे. निजामसाहेब कारण न दाखवितां कोणालाहि राज्याबाहेर घालवितात व कोणालाहि अटक करतात ! मि. जिना यांना त्यांनीं "शिक्षण" या विषयावर व्याख्यान दिल्यामुळें अजूनपर्यंत हद्दींत न येण्याचा हुकूम आहे. खिलाफतीच्या स्वयंसेवकांनाहि जवळ जवळ आठ महिने मनानूर या ठिकाणीं-कीं ज्याला निजामशाहींतील अंदमान म्हणण्यास हरकत नाहीं-तेथें ठेवण्यांत आलें होतें. हिंदु लोकांना तेथें नौकऱ्या मिळत नाहींत. ३-४ जागा हिंदूंना देण्यांत आल्या होत्या, पण त्याहि आतां रिकाम्याच पडल्या आहेत. शेंकडा ९० हिंदुप्रजा निजामच्या राज्यांत आहे. आणि या हिंदुप्रजेच्या पैशांतून मुसलमानी धर्माच्या प्रसारार्थ खर्च होत असतो. राजाकरितां प्रजा नाहीं, प्रजेकरितां राजा आहे तर

हें निजामसरकारनीं पक्कें लक्षांत ठेवावें ! तेथें सर अल्ली इमाम असतांना आम्हीं हैद्राबाद राजकीय परिषद् भरविण्याची तारीख मुक्रर केली होती, वर्गणी वसूल झाली होती, प्रतिनिधींचीं नांवे नोंदवलीं जात होतीं, परिषदेची सर्व बाजूंनीं तयारी झाली होती. इतक्यांत 'कोणतीहि सभा निजामसरकारच्या परवानगीशिवाय भरवूं नये,' असा सभाबंदीचा फर्मान निघाला; कसलेही अधिकार प्रजेला निजामसरकारनीं अजून दिलेले नाहींत. वर्तमानपत्राचे परवानगीस एका गृहस्थास चार वर्षें लागलीं, व ती सुद्धां मिळून न मिळून सारखीच ! कारण वर्तमानपत्रांनीं राजकारणावर लिहावयाचें नाहीं. तेथें कीर्तन, प्रवचन करतां येत नाहीं. वर्तमानपत्राच्या संपादकांना पोलीसचा त्रास फार होतो. ब्रिटिश राज्यांतील ५० वर्तमानपत्रांना राज्यांत येण्याची बंदी केली आहे. तैलगू, मराठी, कानडी या भाषांस उत्तेजन न देतां उर्दू भाषेचेंच प्रस्थ माजविण्यांत येतें. १३ लाख मुसलमान लोकांच्याकरितां उर्दू युनिव्हर्सिटी स्थापन करण्यांत आलेली आहे. त्यामुळें हिंदूंच्या भाषा नामशेष करण्याचा प्रयत्न करून हिंदूंची संस्कृति नष्ट करण्याचा उद्देश स्पष्टपणें दिसत आहे. प्रत्येक तालुक्यांतून निदान एक लाख रुपये तरी नजराणा म्हणून वसूल करण्याचा सपाटा सरकारी अधिकाऱ्यांमार्फत चालूं आहे. सारा वसूल करतांनासुद्धां

## १ रुपयास १ आणा नजराणा

वसूल करण्यांत येतो. अशा रीतीनें अनेक गोष्टी सांगतां येतील. कोळसा कितीहि उगळला तरी तो काळाच असणार, त्याला पांढरा रंग कोठून येणार ! नंतर ठरावाला अनुमोदन डॉ. श्री. व्यं. केतकर यांनीं दिल्यावर वरील ठराव एकमतानें पास झाल्याचें अध्यक्षांनीं जाहीर केलें.

**तिसरा ठराव** श्री. वामनराव पटवर्धन यांनीं मांडला तो येणेंप्रमाणें:— निजामसाहेबांनीं प्रथम आपल्या संस्थानांतील प्रजेस त्यांनीं वऱ्हाडांतील प्रजेस देऊं केलेले हक्क—ब्रिटिश सरकारशीं संबंध सोडून अंतर्गत कारभारांत पूर्ण स्वायत्तता व लोकमताचा दाब असलेली पूर्णपणें जबाबदार राज्यपद्धति—प्रथम द्यावेत. व हे हक्क आपल्या संस्थानांतील प्रजेस दिल्यानंतरच निजामसरकारास हे हक्क वऱ्हाड प्रांता—

तील प्रजेस देणें किंवा वऱ्हाड प्रांताची मागणी करणें रास्त होईल. ठराव मांडल्यावर

## श्री. वामनराव म्हणाले,

आज वऱ्हाडचे लोक निजामांचे प्रजाजन नसून इंग्रजांचे प्रजाजन आहेत. उद्यां वऱ्हाडकरांना निजाम साहेब स्वराज्य देणार म्हणजे काय करणार ? खरें स्वराज्य कोणतें ? संस्थानिकांचें स्वराज्य तकलुबी असतें, तें नांवाचें स्वराज्य असतें. प्रजाप्रतिनिधिनियंत्रित सत्ता निजामसरकार वऱ्हाडकरांना देणार आहे काय ? ब्रिटिश हद्दींतील वर्तमानपत्रांनीं संस्थानांबद्दल कांहीं मजकूर छापल्याबरोबर तीं वर्तमानपत्रें निजामसाहेब राज्यांत येण्यास बंद करतात, इतकी त्यांच्या मनाची स्थिति आहे. तें सरकार लोकप्रतिनिधिसत्ता प्रस्थापित करणार ! सध्यां निजामसरकारनीं आपल्या राज्यांतील लोकांना तर प्रथम स्वराज्य द्यावें ! निजाम राज्यांत मोंगलाई खरीखुरी चालू आहे, कांहीं सच्चेपणा, खरेपणा असेल तर निजामसरकारनीं प्रथम हैद्राबाद येथील लोकांना स्वराज्याचे हक्क प्रथम देऊन टाकावे. जो संस्थानांतील त्याला सुद्धां संस्थानांत रहाण्याचा कंटाळा आलेला आहे. निजामांची परीक्षा करण्याकरितांच हा ठराव आहे. नंतर अनुमोदन देतांना

## श्री. वामणगांवकर म्हणाले,

निजामसाहेब प्रजेच्या हक्काला जागतात कीं नाहीं, हें या तिसऱ्या ठरावानें समजणार आहे. निजाम व इंग्रज दोघेहि राज्यकर्ते आहेत, दोघेहि समजत आहेत कीं मला वऱ्हाडकर सच्चा म्हणत आहेत. दोघांना मतलबापुरती तळमळ लागून राहिली आहे, पण अंतःकरणापासून कोणालाहि तळमळ लागलेली दिसत नाहीं. निजामची राज्यसत्ता एकतंत्री आहे. निजामापेक्षां इतर संस्थानें बरीं आहेत. निजाम हें मुसलमानांचें राज्य आहे म्हणून वऱ्हाडकरांना नको, असें नसून निजामांत एकतंत्री राज्यकारभार आहे, तो नको आहे. निजाम सरकाच्या जागीं हल्लींच्या परिस्थितींत जर एकादा हिंदु राजा असता तरी सुद्धां वऱ्हाडकर जाण्यास तयार होते ना ! वऱ्हाडचे लोक निजामचे प्रजाजन आहेत, पण सत्ता चालते इंग्रजांची व वसूल ६५ लाख रुपये खर्च होतो मध्यप्रांताकरितां ! वऱ्हाडांतील प्रतिष्ठित मुसलमान जहागिरदार

सध्यां असेंच म्हणतील कीं इंग्रज बरा, पण हल्लींचा निजाम नको! इंग्रजांनीं जर वऱ्हाड परत दिला तर पूर्वीं तो फसवून घेतला असेंच सिद्ध होणार नाहीं काय ! नंतर मतें घेतां ठराव एकमतानें पास झाला.

**चौथा ठराव** श्री. **आबासाहेब आंबेकर** यांनीं मांडला तो येणेंप्रमाणेः— निजामसरकारचें ब्रिटिश हद्दींतील जबाबदार मराठी व इंग्रजी वर्तमानपत्रांस संस्थानांत येऊं देण्याची बंदी करण्याचें धोरण लेखनस्वातंत्र्याच्या विरुद्ध असून, त्यामुळें तेथील प्रजेचीं वास्तविक गाऱ्हाणीं व न्याय्य मागण्या व अधिकाऱ्यांकडून होणारे अन्याय व बेकायदेशीर कृत्यें जनतेपुढें ठेवण्याचा कायदेशीर मार्ग बंद केला जातो. म्हणून ही सभा या धोरणाचा तीव्र निषेध करीत आहे, व ही बंदी तावडतोब उठविण्यांत यावी व सर्व वर्तमानपत्रांस स्वातंत्र्य द्यावें अशी निजामसरकारास विनंति करीत आहे. या ठरावाला श्री. सितारामपंत लळीत यांनीं अनुमोदन दिल्यावर एकमतानें ठराव पास झाला. नंतर

**पांचवा ठराव** श्री. **यशवंत रामकृष्ण दाते** यांनीं मांडला कीं, वरील सर्व ठराव योग्य अधिकाऱ्यांकडे पाठविण्यास ही सभा अध्यक्षांना अधिकार देत आहे. हाहि ठराव अनुमोदनानंतर सर्वानुमतें पास झाल्यावर अध्यक्ष

## आण्णासाहेब भोपटकर म्हणाले,

ठरावावरील भाषणें आपण ऐकलेलींच आहेत. निजामसरकारनें केलेल्या मागणीचा विचार करतांना अनुकूल आणि प्रतिकूल बाबींचा पूर्णपणें विचार केला पाहिजे. १९२४ सालीं निजामसरकार जागें होतात काय ! आणि वऱ्हाडची मागणी करतात काय ! हा अत्यंत मोठा विचाराचा प्रश्न आहे. दिल्लीपासून मद्रासपर्यंत असा एक गोतावळा दिसतो कीं, दिल्लीचे निजामी व हैद्राबादचे निजाम हिंदूंना बाटवण्याच्या मागें लागलेले आहेत. निजामच्या राज्यांत मुसलमान प्रजा किती व हिंदू प्रजा किती यांचा विचार जरूर केला पाहिजे. निजामला खास असें सांगितलें पाहिजे कीं, वऱ्हाड तर तुम्हांला आम्ही देणार नाहींच, पण तुमच्याकडे जो हिंदूंचा प्रांत आहे तो इंग्रजाच्या राज्याला मिळवण्याचा प्रयत्न करूं! हिंदूंच्या संस्कृतीला नख लावतां, कोणत्या तोंडानें तुम्हीं वऱ्हाडची मागणी करतां व वऱ्हाडकरांनीं तरी तुमच्याकडे कां यावें ?

वऱ्हाड निजामसरकार मागत आहे, इंग्रजसरकार कदाचित् देईल, वऱ्हाडकर जातील पण वऱ्हाडकर बंधूंनीं जावें कीं न जावें हा प्रश्न साऱ्या हिंदुस्थानचा आहे, व महाराष्ट्राचा तो जिव्हाळ्याचा प्रश्न आहे आणि म्हणूनच आपण आज येथें जमलों आहोंत. निजामच्या १ कोटी २४ लक्षांपैकीं १ कोटी ७-८ लक्ष प्रजा हिंदू असतांना

## निजामचें राज्य कोणाचें ?

हिंदूंचें कीं मुसलमानांचें ! निजामच्या राज्यांतील हिंदु लोकांनीं ठरवावें कीं आम्ही मराठी भाषा बोलणारे महाराष्ट्राला मिळतों, व कानडी बोलणाऱ्यांनीं म्हणावें कीं, आम्ही कर्नाटकाला मिळतो. मला जर विचारलें तर मी स्वराज्यापेक्षां धर्मालाच जास्त महत्त्व देईन. १०० वर्षें स्वराज्य मिळालें नाहीं तरी चालेल, पण मला माझी संस्कृति जिवंत रहाण्यास पाहिजे आहे. संस्थानें हीं रान जळल्यानंतर जसे झाडाचे सोट दिसतात तशीं आहेत. यावर लोकसत्तेचे नांगर फिरविले पाहिजेत, तरच मिळालेलें स्वराज्य टिकणार आहे. लोकसत्ता ही चिरस्थाई होण्याकरितां संस्थानी बालेकिल्ले नामशेष केले पाहिजेत. संस्कृति कायम राखण्याचा प्रथम प्रयत्न केला पाहिजे. वऱ्हाड जर निजामकडे जाण्यास तयार होईल तर महाराष्ट्राची अब्रू जाईल, व हिंदु संस्कृतीबद्दल काळजी वाटूं लागेल. वऱ्हाडकरांनीं न जातां उलट निजामसरकारच्या हद्दींतील हिंदु लोकांनीं सांगितलें पाहिजे कीं आमचा भाग इंग्रजांना द्या व त्यापासून काय तें भाडें घ्यावें व आमचा जुलूम थांबवावा. अशा प्रकारचा अध्यक्षांचा समारोप झाल्यावर श्री. राघवेंद्रराव शर्मा यांनीं अध्यक्षांचे व इतर श्रोतृवर्गाचे आभार मानल्यावर सभा रात्रीं ९ चे सुमारास समाप्त झाली.

---

# महाराजा बहादुर सर कृष्णप्रसाद यांस दिलेलीं मानपत्रें.

हैद्राबाद संस्थाने मुख्य प्रधान एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलचे प्रेसिडेंट महाराजा सर कृष्णप्रसाद बहादुर हे संस्थानांतून फिरतीवर निघाल्यावेळीं जि. उस्मानाबाद (धाराशिव) सोलापूर व गुलबर्गा येथील लोकांनीं दिलेल्या मानपत्रांची हकीकत यापुढें दिली आहे.

### उस्मानाबाद जिल्ह्यांतील रहिवाश्यांकडून
## श्रीमान् राजायान महाराजा सर किशन प्रसाद बहादूर यमीनु सलतनत जी. सी. आय. ई. सद्र आजम-बाबे-हुकूमत सरकार आली यांचे सेवेशीं.

महाराज,

आपण आमच्या जिल्ह्यांत आलां आहां म्हणून आम्ही सर्व उस्मानाबाद जिल्ह्याचे रहिवाशी आपलें अंतःकरणपूर्वक स्वागत करीत आहों. आपलें श्रेष्ठ कुल हिंदुस्थानच्या इतिहासांत आणि विशेषतः या संस्थानच्या इतिहासांत अत्यंत महत्त्व पावलें आहे. राजा तोडरमल यांनीं अकबर बादशहाच्या दरबारांत जी कामगिरी केली आहे ती हिंदुस्थानांतील प्रत्येक व्यक्तीस परिचित आहे, निजाम सरकारच्या राज्यांतच केवळ नव्हे तर अखिल भारतवर्षांत स्वर्गवासी महाराज चंदुलाल यांचें नांव धर्मात्मा म्हणून सर्वश्रुत आहे. स्वतः महाराजांनीं मरहूम आला हजरत यांच्या कारकीर्दींत मुख्य प्रधानकीचीं जीं कामें केलीं आहेत आणि विद्यमान आला हजरत यांच्या वरिष्ठ कार्यकारी मंडळाचे अध्यक्ष या नात्यानें जें कार्य बजावीत आहेत त्या कामाचें महत्त्व निजाम सरकारची प्रजा पूर्णपणें जाणांत आहे. हें अध्यक्षपद स्वीकारल्यापासून आम्हां प्रजेंत जो विश्वास व ज्या आकांक्षा उत्पन्न झाल्या आहेत त्या संस्थानच्या भावी उत्कर्षाचें पूर्वसूचक आहेत. आणि आम्हांस असा भरंवसा आहे कीं आपल्या कारकीर्दींत प्रजा अधिक समर्थ होत आहे व होईल, आणि त्यायोगें राजा आणि प्रजा या दोघांचेंही परिणामीं कल्याणच होईल.



एच. ई. महाराजा सर कृष्णप्रसाद ( पूर्वीचे दिवाण ) यांची हैद्राबादचे कार्यकारी कौन्सिलच्या अध्यक्षाचे जागीं नेमणूक झाल्यावेळीं त्यांच्या अभिनंदनार्थ सावकार मंडळीकडून ॲट होम व मानपत्र दिलें गेलें.
**सर विल्यम बार्टन** (ब्रि. रेसिडेंट), व **महाराजा बहादुर** (ज्यांचे गळ्यांत हार आहेत)

( १ ) निझाम इलाख्यांत पूर्वी या कसब्याला **धाराशिव** असें म्हणत असत, परंतु सन १३०९ फसलीपासून सर्व्यांचे आला हजरत यानीं या स्थानाला आपल्या नांवानें अलंकृत करण्याचा मान दिल्यामुळें, आणि आज आपल्या चरणस्पर्शानें तें पुनीत झाल्यामुळें या स्थानाला सांप्रत एक प्रकारचें वैशिष्ट्य प्राप्त झालें आहे. ( २ ) येथें एक जिल्हा लोकल फंड कमेटी आहे. परंतु अद्यापि प्रजेला सभासद् निवडून देण्याचा हक्क मिळाला नाहीं. या संस्थानांत लोकल फंड कमेट्या स्थापन होऊन चाळीस ४० वर्षांपेक्षां अधिक काल लोटला आहे. लोकल फंड ॲक्ट अस्तित्वांत आणते वेळीं लोकनियुक्त सभासदत्वाची हमी दिली गेली होती. गेल्या चाळीस ४० वर्षांच्या अवधींत—विशेषतः उस्मान शाहांच्या अमदानींत—सार्वत्रिक प्रगति होत आहे. व त्यांत लोकल फंड कमेटीच्या निवडणुकीच्या हक्काची, प्रजा अत्यंत उत्सुकतेनें वाट पाहत आहे ( ३ ) उस्मानाबादची लोकसंख्या दहा हजार पेक्षां जास्त आहे. म्हणून येथें शहर सफाई ( म्युनिसिपालिटी ) स्थापन व्हावी आणि त्याचे सभासद रयतेकडून निवडलेले असावे ( ४ ) त्याचप्रमाणें महाराज कार्यकारी सभेच्या अधिपत्याच्या अधिकारावर आरूढ होण्याच्या शुभप्रसंगीं पहिल्या कायदेमंडळाच्या सभेंत, कायदे मंडळाच्या सुधारणेसंबंधीं आणि त्याच्या वाढीसंबंधीं जें आशापूर्ण अभिवचन दिलें गेलें आहे, तिकडेही महाराजांचें लक्ष आम्ही वेधितों ( ५ ) जिल्ह्याच्या मुख्य ठिकाणाहून तालुक्याच्या ठिकाणांकडे जाणाऱ्या पक्क्या सडका करण्याची अत्यंत आवश्यकता आहे. यायोगानें रयतेला सुख व व्यापाराला उत्तेजन मिळणार आहे. तरी या गोष्टीकडेही महाराजांनीं लक्ष पुरवावें अशी प्रार्थना आहे. ( ६ ) या जिल्ह्यांत तुळजापूर हें एक प्रसिद्ध यात्रेचें ठिकाण आहे; आणि लातूर ही एक मोठी व्यापारी पेठ आहे. या दोन्ही ठिकाणीं पिण्याच्या पाण्याचा फार तुटवडा आहे. यासाठीं तेथें पाणीपुरवठा झाल्यास प्रजेला सुख चांगलें होईल ( ७ ) या जिल्ह्यांत परंडा तालुका दुष्काळग्रस्त तालुका आहे. यापूर्वी साकतच्या तलावाची मोजणी झाली आहे. जर तो तलाव तयार झाला तर रयत दुष्काळाच्या मिठींतून सुटून सरकारच्या उत्पन्नांतही त्यामुळें उत्तम वाढ होईल ( ८ ) येडसी स्टेशनपासून सोलापूर स्टेशनपर्यंत एक रेल्वे लाईन उस्मानाबाद, तुळजापूर या ठिकाणाहून जाणारी तयार करून देण्यांत आल्यास यात्रे-

करूंस व इतर लोकांसही प्रवास सुखाचा होईल व आर्थिक बचत होऊन सरकारी उत्पन्न वाढेल.

आम्हांस खात्री आहे कीं, सरकार वरील सर्व मागण्या पूर्ण करून त्यांनीं आतांपर्यंत जसें प्रजापालन केलें तसेंच यापुढेंही करतील, म्हणून या मागण्या आम्ही सध्यां येथेंच संपवीत आहोंत. आणि ईश्वरा जवळ आमची अशी प्रार्थना आहे कीं आमचे बादशहा आला हजरत यांस त्यानें चिरायुष्य द्यावें आणि महाराजांना सध्यांच्या अधिकारपदावर दीर्घकाल ठेवून त्यायोगें आम्हां प्रजेला सर्व सौख्य व्हावें व देशाचें सर्वतोपरी कल्याण घडून यावें.

## मानपत्र देणाऱ्यांचीं नांवें

**नारायणराव अयाचित वकील,**
**रामचंद्र केशवराव, व नेमचंद वकील,**
**दिगंबरराव वकील, केशवराव वकील,**
**रंगराव वकील, नारायण माधवराव वकील.**

---

## महाराजा बहादुर यांचेकडून मानपत्रास मिळालेलें उत्तर.

आपण ज्या लेखाच्या द्वारें मागण्या मागितलेलें मानपत्र एका समाजांकडून दिलें आहे, तें मी आनंदपूर्वक स्वीकारीत आहें. आपण माझ्या पूर्वजांचा आणि माझ्या घराण्यानें केलेल्या निझाम सरकारच्या सेवेचा ज्या शब्दांनीं गौरव केला आहे त्याबद्दल मला अत्यंत संतोष वाटत आहे. राजा तोडरमल यांना अकबराच्या दरबारमध्यें जो मान होता त्याच परंपरेनें दरबार आसफजाही मध्येंही माझ्या घराण्याला चौपट मान मिळाला आहे. धर्म आणि जातिवैशिष्ट्याचा विचार न करितां राजाची आणि प्रजेची सेवा करावी, हें इतर कर्तव्यांप्रमाणेंच मी आपलें एक अत्यंत महत्त्वाचें कर्तव्य मानितों. माझ्या अशा मोकळ्या अंतःकरणाच्या प्रवृत्तीला प्रत्येक वेळीं यश आलें आहे, याबद्दल परमेश्वराचे आभार मानिले पाहिजेत. हें खरें आहे कीं, माझें घराणें नेहमीं विश्वासू, एकनिष्ठ राहिलें, आणि प्रजेचें कल्याण व सेवा हेंच ध्येय त्यांनीं आपले पुढें ठेविलें आणि माझ्या जीवितांचें हेंच सारसर्वस्व ईश्वराच्या इच्छेनें राहावें अशी माझी निरंतरची इच्छा आहे.

माझ्या दृष्टीनें नेहमीं या रियासतीचा हाच प्रघात आहे कीं, अखिल प्रजेला पुत्रवत् मानून, त्यांच्या सर्व गरजा योग्य मार्गानें पूर्ण केल्या जातात. ज्यावेळीं मागितलेलें मिळणें दुष्कर असतें त्यावेळींच मागण्यांचा प्रश्न उत्पन्न होतो. साधारणतः जेव्हां असा विश्वास उत्पन्न होतो कीं जीवित्वास अवश्यक वस्तु किंवा ज्या हक्कांच्या मागण्या केल्या असतात, त्या वेळेवर मिळतीलच, तेव्हां मागणीचा प्रश्नच शिल्लक रहात नाहीं; तथापि तुम्हीं ज्या मागण्या पुढें मांडिल्या आहेत, त्यांचा मीही मुलांच्या किंवा आप्त–इष्टांच्या मागण्यांचा एखादा सत्कार करील तितक्यांच प्रेमानें सत्कार करीत आहे.

उस्मानाबादला शहरसफाई खातें ( म्यु. ) देण्याचा प्रश्न खरोखर विचार करण्यायोग्य आहे. शहरसफाई खातें ( म्यु. ) देण्याची आवश्यकता केवळ उस्मानाबादेलाच आहे असें नव्हे, किंबहुना सार्वजनिक पद्धतीनें शहराची सेवा करण्याची पात्रता असलेल्या प्रत्येक शहराला ( म्यु. ) देणें योग्य होईल. सरकारनें वेळोवेळीं या हेतूच्या पूर्ततेकरितां सक्रिय लक्ष पुरविलें आहे. मीही हा प्रश्न विशेषतः आपल्यापुढें ठेवून अवश्यक प्रयत्न चालविले आहेत.

कायदे मंडळांची सुधारणा व वाढीचा प्रश्नही सरकारपुढें आहे. या मंडळाची वाढ होईल, ज्याची आवश्यकता सरकारला वाटत नाहीं असा हा प्रश्न नव्हे. लोकल फंडमध्यें लोकनियुक्त सभासद असण्याच्या प्रश्नाकडे आपण माझें लक्ष वेधण्याचा जो उपक्रम केला आहे, त्यासंबंधीं सरकारनें लोकलफंड सभा स्थापन होते वेळीं असें ठरविलें आहे कीं, जेथें लोकांमध्यें निवडण्याची व काम करण्याची पात्रता उत्पन्न होईल तेथें लोकनियुक्त सभासद निवडण्याचा त्यांना हक्क देतां येईल. अशा स्थितींत तुमची मागणी मान्य करण्यायोग्य आहे. विशेषतः माझें लक्ष लोकलफंड आणि कानून महसूलांत मुकामींच्या ( स्थानिककर ) हुकुमाकडे आहे.

सडका तयार करणें, रेलवे लाईन वाढविणें, लातूर व तुळजापूर येथें पाणी पुरवठा करणें या मागण्यांकडेही मी जरूर लक्ष पुरवीन. लातूर संबंधीं तर असें ठरलें आहे कीं, शक्य तों लवकर तेथें पाणी पुरवठा केला जावा. जिल्हा उस्मानाबादेपासून हैद्राबाद शहरापावेतों रेल्वे बिदर रस्त्यानें करणेसंबंधीं विचार चालू आहे.

परंड्याकरितां तलाव करण्यासाठीं योग्य ती तजवीज त्या खात्याकडून केली जाईल. आपल्या मानपत्रांत ज्या मागण्या आहेत त्याखेरीजही बऱ्याच

गोष्टी रयतेच्या फायद्याच्या माझ्या दृष्टीसमोर आहेत, आणि त्या पूर्ण करण्याकरितां निझामसरकारचें लक्ष वेधिलें जाणें शक्य आहे.

शेवटीं मीही तुमच्याच प्रमाणें ईश्वराजवळ आमचे दक्षिणचे बादशहा आला हजरत यांना चिर आयुरारोग्य आणि वैभव इच्छितो; आणि त्यांच्यासंबंधीं आपणा सर्वांच्या अंतःकरणांत एकनिष्ठा व आत्मार्पणाची इच्छा कायम रहावी व त्यांसही प्रजेचे पालन पोषण करण्याची सदिच्छा सदोदित राहो.

यद्यपि माझें स्वागत मोठ्या थाटानें, अंतःकरण पूर्वक केलें आहे व त्याबद्दल मला आनंद वाटतो, तथापि आपण हें लक्षांत असूं द्या कीं, अधिकारीवर्गानें (वरिष्ठ व कनिष्ठ) आपल्या दफ्तरचीं कामें, व इतर कर्तव्यकर्में, प्रजेसंबंधीं कोणतेंही कृत्य करण्यांत अंतर करूं नये; व यांतच मला खरा आनंद वाटेल. यामध्यें कोठेंही मला कमीपणा दिसून आला तर मात्र माझ्या खऱ्या आनंदांत कमीपणा येईल.

मला पूर्ण आशा वाटते कीं, आपण म्हणजे प्रत्येक समाजांतील व्यक्तीनें आपल्या भावनेच्या कृत्यांना धार्मिक स्वरूप देऊन दोषास्पद करण्याकडे प्रवृत्त होऊं नये. पुष्कळ अशीं कृत्यें आहेत कीं, प्रत्येक समाजाचीं कांहीं कृत्यें त्यांच्या भावनेप्रमाणें रूढींत दाखल होतात, त्यांना धार्मिक स्वरूप देऊन दोषास्पद करण्यानें ऐक्यभावांत अंतर पडून संकट उत्पन्न होतें. असें करणें उघडपणें वाईट आणि समाजामध्यें असंतोषाला कारण होतें.

मला खात्री वाटते कीं, या बदललेल्या काळांत या राज्याच्या बाहेर प्रत्यहीं नवे प्रसंग घडून येत आहेत; त्यांचा तुम्हांवर किंचित्‌ही परिणाम होणार नाहीं. या राज्यांत धडा घेण्यायोग्य अशी जी वागणूक आतांपावेतों दिसून आली आहे, ती कायम ठेवण्याचा आपण अंतःकरणपूर्वक प्रयत्न कराल. मी ज्या वागणुकीसंबंधीं उल्लेख केला आहे त्या वागणुकीचा अर्थ आपण जाणतच असाल, तो म्हणजे या राज्याचा विशिष्ट गुण धर्मद्वेषापासून शुद्ध असणें हा होय. धर्म किंवा जातीचा विचार न करितां सार्वत्रिक बंधुभावानें वागणें, राजाशीं एकनिष्ठ असणें, आणि आपल्या चरितार्थाच्या व्यवसायांत शहाणपणानें प्रयत्न करणें हें सर्वांत उत्तम होय. या नियमाचें आपण मागीलप्रमाणें पुढेंही पालन करणें आवश्यक आहे. आणि याच्या योगानेंच देशाची सर्वांगीण उन्नती होईल.

---

## गुलबुर्ग्याच्या हिंदू जनतेतर्फे महाराजा बहादूर यांच्या भेटीस गेलेल्या शिष्टमंडळाची विनंति.

## हिज एक्सेलन्सी राजा राजायान् महाराजा सर किशन प्रसाद् बहादुर

### जी. सी. आय. ई. यमीनुस्सलतनतं पेष्कार व सद्रे आझम बाबे हुकूमत यांचे हुजूरासः--

सरकारांच्या सेवेसीः--

हा विनंति अर्ज सादर करण्यापूर्वी आम्हां गुलबर्ग्याच्या हिंदू प्रजाजनांस दर्शनाचा अलभ्य लाभ दिल्याबद्दल सरकारांचे अत्यंत कृतज्ञता व श्रद्धायुक्त अंतःकरणानें आभार प्रदर्शित करणें आम्ही आपलें कर्तव्य समजतों.

आम्ही गुलबर्ग्याचे हिंदू प्रजाजन या विनंति अर्जाच्या द्वारें आपल्या गरजा व आकांक्षा पुढीलप्रमाणें सरकारांच्या सेवेंत सादर करण्याची अत्यंत नम्रतेनें परवानगी घेत आहों.

निजाम रियासतीच्या आम्हां राजनिष्ठ प्रजेच्या सुदैवानें आम्हांस अशा बादशहांच्या राज्यछत्राखालीं असण्याचें सुदैव लाभलें आहे कीं, ज्यांना आपल्या प्रजेच्या पालनासंबंधीं आणि त्यांच्या हक्कसंरक्षणासंबंधी अत्यंत दक्षता वाटत आहे. आमचे परमपूज्य बादशाह आपल्या प्रजेच्या कल्याणार्थ अहर्निश झटत आहेत; आणि या गोष्टींचा आम्हास अंतःकरणपूर्वक अनुवाद करावासा वाटतो. याच कारणामुळें हा विनंति अर्ज सादर करण्याचें धाडस आम्ही करीत आहों.

सरकारांच्या दौऱ्याचा उद्दिष्ट हेतुही आपल्या प्रजाजनाकडून हिताहिताच्या गोष्टी समजून घेण्याचा आहे अशी आमची नम्र समजूत आहे. आणि जनतेस आपलें तोंड उघडण्यास अशा प्रकारची अपूर्व संधि दुसरी केव्हांही मिळण्यासारखी नाहीं.

( १ ) आमच्या परम पूज्य बादशाहांना कायदेकौन्सिलच्या वाढीची कल्पना स्वतः होऊन सुचली आणि सर अली इमाम ( नबाब मोयदुलमुल्क ),

हे बाबे हुकूमतचे सद्रे आझम असतांना रियासतच्या प्रत्येक भागांत दौरा करून माहिती गोळा केल्यानंतर रिपोर्ट करण्याकरितां कै. राय बालमुकुंद-साहेब यांची नेमणूक एका फर्मानद्वारें करण्यांत आली होती. त्याप्रमाणें त्यांनीं आपला रिपोर्टही सादर केला. त्याच्या मूर्तस्वरूपाची आम्ही मार्गप्रतीक्षा करीत आहों. आपण सद्र आजमच्या उच्च पदावर आरूढ झाल्यानंतर प्रथमतः जेव्हां कायदे कौन्सिलांत विराजमान झाला तेव्हांही सरकारांनीं या योजनेच्या पूर्ततेचें अभिवचन दिलें होतें. याची आठवण देण्यास नको. यानंतरहि यासंबंधी आणखी एक फर्मान सादर झाल्याचें आम्हांस आठवतें. आमच्या शेजारच्या प्रांतांतील प्रजाजनांस कौन्सिलच्या हक्कांचा उपभोग घेत असलेलें पाहिल्यानंतर अशा प्रकारच्या उपभोगाची आम्हांस इच्छा होणें अगदींच साहजिक आहे. ब्रिटिश अमदानींतील इलाख्यांतच फक्त अशा प्रकारची व्यवस्था आहे असें नसून एतद्देशीय छोट्या छोट्या संस्थानांतूनही तेथील प्रजाजनांस अशा प्रकारचे हक्क प्राप्त झाले आहेत. शिक्षणप्रसाराच्या दृष्टीनें आणि इतर कारणामुळेंही आपले लोकनियुक्त प्रतिनिधि कायदे कौन्सिलांत पाठवून तद्द्वारा आपल्या गरजा कौन्सिलांत मांडून त्यांची पूर्तता करून घेण्याइतकी आमच्या येथील प्रजेंत पात्रता आली आहे, म्हणून या महत्त्वाच्या सुधारणेकडे सरकारांचें लक्ष्य अत्यंत नम्रतेनें वेधीत आहों.

( २ ) आमच्या गुलबर्गा शहराकरितां दुसरी आवश्यकता म्युनिसिपालिटीची आहे. म्युनिसिपालिटीची व्यवस्था होणार नाहीं तोंपर्यंत रहिवाशांच्या स्थानिक गरजा व त्यांच्या सुखसोयींची व्यवस्था होणें अशक्य आहे. म्युनिसिपालिटीचा हक्क प्राप्त करून घेण्याची योग्यता गुलबर्गा शहरानें आपल्या वैशिष्ट्यामुळें संपादिली आहे. येथें प्रतिवर्षीं उरुस व यात्रा मोठ्या प्रमाणावर होत असतात. आणि व्यापाराचें हें मोठें ठिकाण आहे.

ब्रिटिश अंमलाखालील हिंदुस्थानांत आणि छोट्याशा देशी संस्थानांतील लहान मोठ्या गांवांतून म्युनिसिपालिटीची व्यवस्था तेथील लोकनियुक्त प्रतिनिधींच्या हातांत असते. त्याचप्रमाणें सध्यांच्या लोकलबोर्डाच्या व्यवस्थेंत आवश्यक सुधारणा करण्याकडे सरकारांचें लक्ष्य पोंचणें जरूरीचें आहे. सद्यःकाली लोकल बोर्डांत कांहीं बिन सरकारी सभासद असतात; पण ते आम्ही निवडून दिलेले प्रतिनिधि नसून त्यांची नेमणूक सरकारतर्फे होत असल्यामुळें

त्यांच्याकडून आमच्या गरजा व्यवस्थित व योग्य रीतीनें पूर्ण होत नाहींत. लोकल बोर्डांत आमचे निवडलेले प्रतिनिधि जाणार नाहींत तोंपर्यंत आमच्या गरजांची पूर्तता होणें जवळ जवळ अशक्यच होय. याकरितां या दोन्ही महत्त्वाच्या गोष्टींकडे सरकारांचें लक्ष्य जावें अशी नम्र प्रार्थना आहे.

( ३ ) सरकारांच्या कानावर घालण्याची तिसरी महत्त्वाची गोष्ट ही आहे कीं, सद्यःकालीं आम्हां हिंदुलोकांकरितां सरकारी नोकऱ्यांचें क्षेत्र फारच आकुंचित झालें आहे. पूर्वकालीन स्थितीकडे पाहिल्यास असा प्रकार नव्हता हें साहाजिक ध्यानांत येण्यासारखें आहे. लोकसंख्येच्या मानानें हिंदूंचें प्रमाण शेंकडा ८३ पेक्षां कमी नसतांना सुद्धां मागील परिस्थितीच्या उलट सद्यःकालीं सरकारी नोकरींतील हिंदूंची संख्या कमी होत असल्याचें ठळकपणें दिसून येण्यासारखें आहे हें अत्यंत कष्टानें सरकारांजवळ निवेदन करावें लागत आहे. परमपूज्य बादशाहांचा किंवा गव्हर्नमेंटचा अशा प्रकारची परिस्थिति उत्पन्न करण्याचा कधींही उद्देश नसला पाहिजे याची आम्हांस पूर्ण खात्री आहे. देशांत सुशिक्षितांच्या उदरनिर्वाहासाठीं पुरेशीं इतर साधनें उपलब्ध नाहींत. आम्हांस गुंतून राहण्याइतकी धंदेशिक्षण किंवा व्यापाराची वाढ झालेली नाहीं. आम्हीं हिंदुलोक सुशिक्षित आणि उच्च व मध्यम प्रतीच्या सरकारी नोकऱ्या उत्कृष्ट रीतीनें बजावण्यास हरतऱ्हेनें पात्र असतांनाही आम्हां राजनिष्ठ प्रजाजनांचा शिरकाव सरकारी नोकऱ्यांतून होऊं शकत नाहीं. याकरितां आमची अत्यंत नम्र प्रार्थना आहे कीं, सरकारनीं याचीं कारणें शोधून काढून हिंदु लोकांना योग्य प्रमाणांत नोकऱ्या देण्यांत याव्या असा निर्बंध करावा.

( ४ ) आमची चौथी विनंति सक्तीच्या मोफत शिक्षणासंबंधीं आहे. प्रत्येक शाळेंत प्राथमिक व मध्यमप्रतीचें शिक्षण मुलांच्या मातृभाषेंतून त्यांना देण्यांत यावें असा निर्बंध होणें अत्यंत अवश्य आहे. इकडे सरकारांचें लक्ष्य पोंचण्याविषयीं आमची नम्र विनंति आहे.

( ५ ) आमच्या परमपूज्य बादशाहांना आपल्या देशांत प्रत्येक बाबतींत सुधारणा घडून यावी अशी उत्कट अपेक्षा असल्याची आम्हांस पूर्ण जाणीव आहे. आणि विशेषतः शिक्षणाच्या प्रगतीसंबंधीं त्यांना वाटत असलेली आस्था व मनःपूर्वक करीत असलेले परिश्रम अवर्णनीय आहेत. म्हणूनच त्यांच्या कारकिर्दींत उस्मानिया विद्यापीठाची स्थापना झाली. आणि शिक्षणाप्रीत्यर्थ वार्षिक

साठ लाख रुपये खर्च होत आहे. पण सध्यां प्रचलित असलेल्या सरकारी शिक्षणखात्याच्या चुकीमुळें खासगी शिक्षण व शिक्षणसंस्था मोठ्या संकटांत सांपडल्या आहेत. शिक्षणाचे बाबतींत देशांत जितकें अधिक स्वातंत्र्य असावें आणि त्याच्या प्रसाराचें क्षेत्र जितकें विस्तृत व प्रशस्त असावें तितकी शिक्षणाची वाढ होते. पण सध्यां अशी परिस्थिति उत्पन्न झाली आहे कीं १५ किंवा त्याहून अधिक मुलांच्या शाळेस सरकारी परवानगीची आडकाठी घालण्यांत आली आहे. आणि अशा प्रकारच्या अटी घालण्यांत आल्या आहेत कीं, ज्या पूर्ण करणें बहुतेक अशक्य होऊन बसलें आहे. शिक्षणाप्रीत्यर्थ एकीकडून सरकारानीं अत्यंत सढळपणानें इतका खर्च व प्रयत्न करीत राहावें आणि दुसरीकडून खासगी शिक्षणाचें क्षेत्र तितकेंच मर्यादित करण्यांत यावें ही विचार करण्यासारखी गोष्ट आहे! विशेषेंकरून वेदपाठाशाळांसारख्या धार्मिक शिक्षणसंस्थांच्या स्थापनेंतही अडचणी उपस्थित होणें धार्मिक दृष्ट्या बरेंच विचारणीय आहे आणि यापेक्षां देशाचें दुसरें दुर्दैव तरी कोणतें! म्हणून खासगी शिक्षण संस्थांसंबंधीचा हुकूम रद्द करण्यांत यावा अशी नम्र प्रार्थना आहे. नेहमीं सार्वत्रिक शिक्षण जनतेच्या हातीं असणें फायदेशीर सिद्ध होत आलें आहे, हें या प्रसंगीं नमूद करणें अयोग्य होणार नाहीं, आणि शक्य तोंपर्यंत सरकारी मदत देऊन अशा खासगी शिक्षणसंस्थांकडून शिक्षणाचें कार्य करून घेणेंही अवश्य आहे. या योजनेकडे सरकारांचें लक्ष्य पोंचणें इष्ट आहे.

( ६ ) गुलबर्गा शहरांत नळांची व्यवस्था करून सरकारानीं पाण्याची सोय करून दिली आहे. त्याच बरोबर वापरलेलें पाणी घालवून देण्यासाठीं ड्रेनेजची व्यवस्था करणें अत्यंत आवश्यक झालें आहे. नाहीं तर गुलबर्गा अनेक रोगांचें माहेरघर बनून राहील अशी धास्ती वाटते. यासाठीं येथील रहिवाश्यांच्या आरोग्यहितसंवर्धनार्थ या योजनेकडे सरकारांचें लक्ष्य जाणें अवश्य आहे.

आतांपर्यंत ज्या विनंत्या करण्यांत आल्या त्यांचा संबंध राज्यव्यवस्था आणि ऐहिक अभ्युदयाशीं होता. आतां आम्ही धर्माशीं संबंध असलेल्या कांहीं महत्त्वाच्या गोष्टींकडे सरकारांचें लक्ष्य वेधण्याची मोठ्या नम्रतेनें परवानगी घेत आहों. सध्यांच्या व्यवस्थेमुळें आमच्या धार्मिक भावनांस व स्वातंत्र्यास जो धक्का पोंचूं लागला आहे तो विशेषेंकरून सरकारानीं लक्ष देण्याजोगा आहे. आमचे परमपूज्य बादशहा किंवा वरिष्ठ सत्ताधाऱ्यांचा हा मुळींच उद्देश नसावा कीं

राज्याच्या सुव्यवस्थेच्या दृष्टीनें कांहीं विशिष्ट स्वरूपांत दिलेल्या हुकूमांचें क्षेत्र इतकें विस्तृत पावावें कीं त्यायोगें एखाद्या जातीच्या धर्मविधींना अडचणी उत्पन्न व्हाव्यात. किंबहुना प्रत्येक सुधारलेलें सरकार सदोदीत धार्मिक बाबतींत हात घालण्यास अनमान करीत असतें. याच तत्वावर आमच्या परमपूज्य मरहूम बादशहांनीं ता. २४ जमादिलाखर १३२० च्या फर्मानामध्यें ज्या गोष्टींचा उल्लेख केला आहे, त्यांतील कांहींसा महत्वाचा भाग खालीं उद्धृत करण्याची आम्हीं परवानगी घेतों.

" ज्या देशांत भिन्न भिन्न धर्माचे व जातीचे लोक असतात तेथील सरकार एखादें धार्मिक कृत्य उघडपणें झाल्यानें इतर धर्मीयांना वास्तविक चीड येऊन त्यामुळें सार्वजनिक शांततेचा भंग होण्याचा संभव नसेल तोपर्यंत तें बंद करण्याचें मी पसंत करीत नाहीं. इ. "

ज्या देशांत सरकार किंवा बादशहाचे धर्मसंबंधीं अशा प्रकारचें विचार असतात, तेथील प्रत्येक समाजानें धर्मसंबंधीं पूर्ण स्वातंत्र्य असण्याची अपेक्षा करणें अनुचित होणार नाहीं. म्हणूनच कोणत्याही समाजाच्या धार्मिक कृत्यांत हात घालण्यास शक्य तितक्या रीतीनें बराच अनमान झाला पाहिजे. परंतु प्रत्येक लहान सहान धार्मिक विधींत संकटें प्राप्त होतात हें देशाचें दुर्दैवच म्हटलें पाहिजे. एखादें लहानसें धार्मिक कृत्य करावयाचें म्हटल्यास किंवा सार्वजनिक रस्त्यावरून भजन पूजन करीत एखाद्या देवतेची किंवा मूर्तीची मिरवणूक काढणें असल्यास सरकारी अधिकाऱ्यांची परवानगी अगोदर घ्यावी लागते. आणि धर्मखात्याच्या अस्तित्वामुळें याची मर्यादा बरीच वाढली आहे. याकरितां सरकारांपाशीं आमची अत्यंत नम्र प्रार्थना आहे कीं, धार्मिक खात्याच्या प्रचलित व्यवस्थेंत फेरबदल होणें अत्यंत अवश्य असून त्यांत योग्य त्या सुधारणा करण्यांत याव्यात. आणि प्रत्येक समाजास आपआपले धार्मिक विधी सार्वजनिक रस्त्यावरूनही पार पाडण्यास पूर्ण मुभा ठेवण्यांत यावी. राज्यव्यवस्थेच्या दृष्टीनें धर्मखात्याचें अस्तित्व अपरिहार्यच असेल तर सदरहू खात्याच्या वरिष्ट कचेरींत एकातरीं हिंदु शास्त्री किंवा पंडिताची नेमणूक आम्हां हिंदू लोकांच्या धर्मविधी व सांप्रदायासंबंधीं पूर्ण विचार करून त्याच्या कामांत सुलभता प्राप्त करून देण्याकरितां झाली पाहिजे.



## इंग्रज सरकाचा सिमल्याहून

# निझामांना निर्वाणीचा खलीता



### राज्यकारभारांत लांच लुचपत, अंदाधुंदी व बेबंदशाहीचे भयंकर आरोप.

मुंबईच्या इंडियन डेली मेलच्या ता. ४ आगस्ट इ. स. १९२६ च्या अंकांत खालील प्रमाणें बातमी प्रसिद्ध झाली असून खालीं त्याचें मराठी भाषांतर दिलें आहे.

ता. २३ जुलई रोजीं येथील रेसिडेंटसाहेब ऑ. मि. पी. ए. बार्टन यांची निझामसाहेबांशीं जवळ जवळ दोन तास मुलाखत झाली. अशीहि बोलवा आहे कीं, नंतर कांहीं दिवस एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलचे अध्यक्ष, जमाबंदी खात्याचे प्रतिनिधि व इतर बडे सरकारी अधिकारी यांस निझामसाहेबांकडून भेटीस बोलावण्यांत येत असे. शहरांत अनेक बातम्यांचा सुळसुळाट झाला असून याविषयीं अधिक माहिती मिळवण्याची इच्छा असलेले लोक हिंदुस्थान सरकार व निजाम सरकार यांच्यांतील संबंधावर चर्चा करतांना दिसतात.

सिमल्याहून येथील राजवाड्यांत एक खलिता आला असून निजाम सरकार व त्यांचे अधिकारी यांच्यावर कांहीं निश्चित आरोप त्यांत केले आहेत अशी दाट वदंता आहे. केलेल्या आरोपांत नोकऱ्यांची विक्री, लाचलुचपत, न्यायाची विटंबना; स्वतःचे मुलगे, भाऊ, बहिणी, व निजाम सरकारच्या प्रत्यक्ष देखरेखीखालीं असलेल्या लहान लहान संस्थानिकांशीं व जहागिरदारांशीं अन्याय्य वर्तणूक, हिंदुस्थानाबाहेर मुसलमानांच्या बाजूनें चळवळ करण्याकरितां तिजोरींतील लाखो रुपये खर्चणें व युरोपियन अधिकाऱ्यांस मुद्दाम काढून टाकून राज्यकारभाराचा दर्जा निष्कारण उतरविणें अशा प्रकारचे आरोप आहेत.

नंतर खलित्यांत ब्रि. सरकारच्या कांहीं निश्चित स्वरूपाच्या सूचना मांडल्या असून त्या पुढीलप्रमाणें आहेत ( १ ) निजाम सरकारनें नजरनजराणा घेण्याचें कायमचें पूर्णपणें सोडून द्यावें ( २ ) निजाम सरकारच्या नांवानें तालुकदार कित्येक ठिकाणीं प्रजेवर जुलूम करतात त्याबद्दल त्यांस योग्य शासन करावें ( ३ ) खालील जागांवर ताबडतोब ब्रिटिश अधिकाऱ्यांची नेमणूक करावी. कौन्सिलचे अध्यक्ष, जमाबंदी खात्याचे दिवाण, करवसुली खात्याचे दिवाण व पोलिस खात्याचे मुख्याधिकारी ( ४ ) लहान जहागिरदार व त्यांची मालमत्ता

त्यांविषयीं न्याय्य निकाल करणें ( ५ ) इलाख्याच्या एकंदर राज्यकारभाराची योग्य सुधारणा करण्याची व्यवस्था करणें.

वरील खलित्यास ता. २० आगष्टपर्यंत उत्तर मागण्यांत आलें असून हिंदुस्थान सरकारच्या वरील अटींस निजाम सरकारकडून समाधानकारक संमति न मिळाल्यास संस्थानच्या अंतर्गत कारभाराची बारकाईनें चौकशी करण्याकरितां एक कमिशन नेमण्यांत येणार असल्याचें त्याच खलित्यांत नमूद केलें आहे असें म्हणतात.

या चमत्कारिक बातम्यांत सत्यांश किती आहे हें ठरविणें कठीण आहे, परंतु अलीकडे शहरांत ज्या तक्रारी व बातम्या रोज येऊन धडकत आहेत त्या पाहतां त्यावर गैरविश्वास करणेंहि तितकेंच कठीण आहे. गेल्या उन्हाळ्यांत रेसिडेंट साहेब उटीहून एकाएकीं येथें येऊन निजाम सरकारची गांठ घेऊन पुनः सिमल्याला गेल्याचें सर्वांच्या स्मरणांत असेल. सिमल्याला बरेच दिवस काढल्यानंतर ते पुनः उटीला गेले. वरिष्ठ सरकार व संस्थान यांच्यांत तेव्हां पत्रव्यवहार चालू असून वर दिलेला खलिता हें वरिष्ठ सरकारच्या पुढील निश्चित धोरणाचें स्वरूप होय असें म्हणतात.

दि. ब. अरवामुदु अयंगार हे गद्वाल येथें गद्वालच्या राणीसाहेबांची भेट घेऊन हैद्राबादला नुकतेच परत आले. मद्रास इलाख्यांतील रेडडी समाजांत त्या पुरातन संस्थानाच्या हितार्थ जोरांत चळवळ चालू आहे अशी बातमी आहे.

निजाम सरकारच्या खासगी मालमत्तेसंबंधीं कारभारांत तर विलक्षण घोटाळा असून खात्यांतील अधिकाऱ्यांस कैक महिने पगार न मिळाल्यानें लाच खाण्याची संवय तेथें जोरावत आहे. अत्यंत महत्त्वाच्या खात्यांतील एक दिवाण काढण्याबद्दल ब्रि. सरकारचा आग्रह आहे असेंही म्हणतात. हैद्राबादचे पोस्टमास्तर जनरल ( सरदार अलीखान ) हे स्वतःच्या नांवानें ' लंडन टाईम्स-मध्यें मुसलमानांच्या बाजूनें आक्षेपार्ह असे लेख लिहून मुसलमानांशिवाय इतर समाजांची व त्यातील व्यक्तींची निंदा करतात. श्री. राघवेंद्रराव शर्मासारख्या माणसांना किरकोळ गोष्टींवरून हद्दपार करणाऱ्या निजाम सरकारला असला इसम इतक्या बड्या अधिकाराच्या जागेवर ठेववला कसा, अशीही हिंदुस्थान सरकारकडून पृच्छा करण्यांत आली आहे अशी वार्ता आहे.

कांहीं असलें तरी अधिक माहिती एक आठवड्यांत नक्की बाहेर येईल. आज मात्र सर्व शहर संशयास्पद स्थितींत आहे.

---

# निजामांना निर्वाणीचा दुसरा खलिता.

## हिंदुस्थान सरकारचें दुसरें पत्र.

### हैद्राबादेंतील बातम्या.

निजामांच्या राज्यांतील अव्यवस्थेसंबंधानें हिंदुस्थान सरकारनें त्यांना पाठविलेल्या निर्वाणीच्या खलित्याची मुदत २० ऑगस्टपर्यंत होती. ही तारीख निघून गेली तरी हैद्राबाद संस्थानांत कांहींच सुधारणा झालेल्या दिसून येत नाहींत. यावरून पुष्कळ लोक असें अनुमान काढूं लागले होते कीं, निजाम सरकारनें हिंदुस्थान सरकारची कशी तरी समजूत केली असावी. पण आतां अलीगड येथील मेल नांवच्या पत्राच्या बातमीदारानें प्रसिद्ध केलेल्या अगदीं ताज्या बातमीवरून असें समजतें कीं, हिंदुस्थान सरकारनें निजामांना खलिता पाठविला होता. त्याला निजाम सरकारकडून उत्तर लिहून गेलें होतें, हें उत्तर हिंदुस्थान सरकारला अर्थात्‌च समाधानकारक वाटलें नाहीं, व म्हणून आतां

### निजामाकडे दुसरा निर्वाणीचा खलिता

सिमल्याहून येऊन थडकला आहे, अशी हैद्राबाद येथें दाट वदंता आहे. हीं सरकारी गुह्यें अर्थात्‌च कांहीं काळ गुप्त ठेवण्यांत येतील. परंतु आतांपर्यंत मिळालेल्या बातमीवरून असें समजतें कीं, हिंदुस्थान सरकारनें सुचविलेल्या सुधारणा निजामांनीं अमलांत आणिल्याच पाहिजेत, असा पोलिटिकल खात्याचा आग्रह आहे. नुसती कार्यकारी मंडळाची सुधारणा करण्यानें संतुष्ट होण्यास हिंदुस्थान सरकार तयार नसून निजामांनीं वरिष्ठ अधिकाराच्या जागांवर गोऱ्या ब्रिटिश अधिकाऱ्यांच्याच नेमणुका करावयाला मुकाट्यानें तयार झालें पाहिजे असें दिसतें. "सद्र–इ–आझम" ची सुधारणा करणें किंवा न करणें ही गोष्ट निजामांच्या मर्जीवर सोंपविण्यांत आली आहे. परंतु मुख्य जागा ब्रिटिश अधिकाऱ्यांना देण्यांत आल्या पाहिजेत.

### महाराजा सर किसनप्रसाद.

महाराजा सर किसन प्रसाद व निजाम सरकार यांच्या भेटी प्रतिभेटी सारख्या सरू आहेत. त्यावरून सर किसनप्रसाद यांना कार्यकारी मंडळाचे अध्यक्ष किंवा

मुख्य प्रधान म्हणून नेमिले जाईल असा रंग दिसतो. संस्थानाबाहेरच्या पुढाऱ्यां- वर निजाम सरकारची श्रद्धा बसणें शक्य दिसत नाहीं.

## व्हॉइसरॉयांचा हुकूम.

अलीगड मेलचा बातमीदार असेंही प्रसिद्ध करतो, कीं, पूर्वीच्या खलित्यांत हिंदुस्थान सरकारनें निजामांना पुष्कळ सूचना केल्या होत्या. त्यांना कदाचित् मित्रत्त्वाच्या सूचना असें नांव देतां येईल. पण आतां आलेलें दुसरें पत्र, हें निराळ्या स्वरूपाचें आहे. या दुसऱ्या खलित्यांत नवीन व्हाइसरॉयांनीं अमुक अमुक सुधारणा निजामांनीं केल्याच पाहिजेत, असें अधिकारयुक्त रीतीनें बजा- विलें आहे असें म्हणतात. खरा प्रकार जेवढा लौकर उजेडांत येईल, तेवढा इष्टच आहे. अलीगड मेल हें पत्र एका मुसलमान संपादकांनीं चालविलेलें आहे, हें लक्ष्यांत घेतलें, म्हणजे त्या पत्रांतील बातमीच्या खरेपणाबद्दल संशय घेण्याचें तूर्त तरी कारण दिसत नाहीं.

८ हैद्राबाद संस्थानांत अधिकाराच्या जागांची विक्री, लांचलुचपत, न्यायाचे कामीं पक्षपात, संस्थानांतील जहागिरदारांशीं अन्याय्य वर्तन व युरोपियन अधिकाऱ्यांना काढून टाकणें इत्यादि गोष्टींबद्दल समाधानकारक उत्तर न आल्यास सरकार चौकशी कमिशन नेमील, असा खलिता सिमल्याहून निजाम- सरकारकडे गेल्याची बातमी प्रथम 'डेली मेल'च्या बातमीदारानें फोडली. निजामसरकारनें या बातम्यांसंबंधीं जो मोघम खुलासा केला आहे, त्यानें या बातम्यांवरील विश्वास उडण्याऐवजीं दृढच होत आहे. कारण या खुलासेवजा प्रेसनोटमध्यें निजामसरकार म्हणतें कीं, "निजामसरकारच्या कांहीं खात्यांत सुधारणा होणें जरूर आहे या गोष्टीकडे हिं. सरकारनें निजामसरकारचें लक्ष वेधलें आणि त्यासंबंधीं मित्रत्वाचा सल्ला दिला." या खुलाशानें डेली मेलच्या बातमीदाराचें कोणतें विधान खोटें ठरतें ? अव्यवस्थेची त्यानें जी यादी दिली आहे त्यांतली अमुक एक गोष्ट खोटी असें निजामसरकार म्हणत नाहीं. निजाम- साहेब हिं. सरकारच्या खलित्याला मित्रत्वाचा सल्ला म्हणतात. पण या खलि- त्यांत २० तारखेचे आंत खुलासा करा, नाहींतर कमिशन नेमावें लागेल, अशा आशयाचा मजकूर असल्याबद्दल डेली मेलचा बातमीदार म्हणतो. त्याचा स्पष्ट इनकार निजामाची प्रेस नोट करीत नाहीं. निजाम व रेडिंग यांच्या पूर्वीच्या प्रसिद्ध पत्रव्यवहारांत रेडिंग हे हुकमाची भाषा बोलत असतां निजामसाहेब

बरोबरीचें नातें लोचट आगंतुकपणें कसे चिकटवीत होते, हें लक्षांत येतें. कमिशनच्या धमकीलाच निजामांनीं "मित्रत्वाचा सल्ला" हें पदरचें दरबारी नांव दिलें असावें, अशी साहजिक कल्पना धावते. हा 'मित्रत्वाचा सल्ला असो' अगर निर्वाणीचा खलिता असो. निजामच्या कारभारांत कितपत सुधारणा होते व ती समाधानकारक न ठरल्यास व्हॉइसरॉय कोणता उपाय योजतात पाहावें.

---

# निझाम सरकारनीं

## चौकशी वांचून हद्दपार आणि कैद केलेल्यांची यादी

| | | |
|---|---|---|
| १ सोनाजी पंडित इलाखे राजे रायरायान | इ. स. १८७५ | हद्दपार |
| २ हकीम इब्राहीम साहेब<br>३ बाजखांजमादार | १८५९ | ,, |
| ४ महम्मद चांद ( चोपदारांचा मुख्य ) बायका मुलांसह | ,, | ,, |
| ५ नवाब अजमत जंग बहादुर | ,, | ,, |
| ६ कॅप्टन जेंकिन्स इंग्रज सरकारचे पेनशनर | ,, | ,, |
| ७ नवाब अकबरजंग पोलीस कमिशनर | १८७२ | ,, |
| ८ बाजखां जुनदेखां दोघे | १८७६ | ,, |
| ९ दस्तूर आसाजी होशंग चांदा रेल्वेच्या विरुद्ध होते म्हणून हद्दपार करण्यांत आले | १८८३ | ,, |
| १० डॉक्टर अघोरनाथ ( मिसेस नायडूंचे वडील ) | १८८३ | ,, |
| ११ नवाब विकारुल मुल्क मुषताक हुसेन ( दोनवेळ ) | १८९२ | ,, |
| १२ मौ. मसीहुझमां | १८८३ | ,, |
| १३ नवाब सुलतान नवाझ जंगबहादुर | १८८४ | ,, |
| १४ नवाब मोहासिनुल मुल्क मेहदी अलीखां | १८९२ | ,, |
| १५ मौ. जव्वाद हुसेन | १८९४ | ,, |
| १६ नवाब सरवरुल मुल्क बहादुर | १८९७ | ,, |
| १७ हुरमसजी ज्यूडिशल सेक्रेटरी | १८९७ | ,, |
| १८ मौ. अझीमोद्दीन एडीटर "मझलूमदक्कन" | १८९८ | ,, |
| १९ सिकंदरनवाझ जंग अहमद रझाखां | १८९८ | ,, |
| २० मौ. सय्यदअली हसन सेटलमेंट कमिशनर | १९०१ | ,, |
| २१ मौ. हसनाबिन अबदुल्ला इमाद नवाझजंग कस्टम कमिशनर | १९०१ | ,, |
| २२ राजा श्रीनिवास राव ( ट्रेझरर ) जाहगिरदार | १९०१ | ,, |
| २३ मि. टेंपलटन, एडीटर "हैद्राबाद क्रॉनिकल"<br>२४ मि. न्यूटन, ब्यारिस्टर | १९०४ | ,, |

२५ जनरल मॅक्सी व त्यांची मुलगी जिने मुसलमान होऊन आपले नांव जमीला बेगम ठेविलें व हसन-बिन अबदुल्ला रुस्टम कमिशनराशी लग्न केलें. आणि त्याच्या मृत्यूनंतर पुनः एका इंग्रजाशीं विवाह केला १९०५ ,,

२६ रा. नारायणराव सेक्रेटरी नवाब जफरजंग बहादुर १९०५ ,,

२७ नवाब जबदुल रषीदखां सय्यदुद्दोला बहादुर १९०७ ,,

२८ मौ. हैदरुल्लाखां शिरस्तेदार निझाम सेक्रेटरी १९०८ ,,

२९ सिद्दी स्वारांतील आठ स्वारांना हद्दपार केले

३० स्वामी नित्यानंद.

३१ श्री. पंडित तारानाथराव

३२ जी. के. राघवेंद्रराव

१ औलाद हुसेन २ अझीझ मिरजा ३ सफीउद्दीन ४ अबदुल हलीम "ष्परर" ५ बालकृष्ण हरी ६ हरी नारायण ७ लक्ष्मण बाबाजी ८ अबदुल्लाखान कसमंडी, एडीटर "महामेडन" ९ सय्यद महम्मद रझवी हा. वकील १० सय्यद अहमद हा. वकील ११ खाजा मोहनोद्दीन हा. वकील १२ अबुल हसन कैसर १३ षेर अलीखां १४ महम्मद अली १५ महम्मद इस्माईल १६ गुलाम महम्मद १७ अबदुल हय १८ हूरमुसजी १९ हसनोद्दीन वकील २० अबदुल करीमखा बहादुर उर्फ **लालखां** २१ अहमद खां २२ महबूब खां २३ सय्यद हसन जषन बिलग्रामी २४ गुलाम गौस २५ नझीरुल हसन बिलग्रामी २६ अबदुल मजीद २७ मसऊद अली २८ राय हरीलाल २९ अबदुल रहमान रईस ३० महम्मद उमर ३१ मिरझा आहमद सुलतान ३२ हकीम नुरुल हुसेन ३३ डॉ. लतीफ सईद ३४ सय्यद इब्राहीम ३५ अबदुः सुबहान ३६ अता हुसेन ३७ महम्मद इस्माईल खां ३८ नबाब आहमद ३९ महम्मद अलीमुद्दीन ४० महमूदुल हक ४१ अबदुल अझीझ ४२ जमील अहमद ४३ राय देवीदास हा. वकील ४४ कमरुःझमां हा. वकील ४५ मौ. जफर अलीखां एडीटर "जमीनदार" ४६ बॅ. जिना ४७ पंडित मदन मोहन मालवीय ( येण्यास मनाई )

# इंडियन आर्म्स अॅक्ट

## हिंदुस्थान सरकारचा हत्यारासंबंधीं कायदा

ब्रिटिश इंडियांत देखील हैद्राबाद संस्थानांतील ज्या व्यक्तीस लागू नाहीं अशांची यादी येथील सरकारी गॅझेटमध्यें प्रसिद्ध झाली आहे. ती खालीलप्रमाणेः– आला हजरत बंदगाने आली (एच्. इ. एच्. निजाम साहेब) (१) मीर हियामत अलीखां (२) मीर सजात अली खां (आला हजरतचे चिरंजीव) (३) मीर अहमद मोहियोद्दीन अली खां (४) मीर महमद मोहियोद्दीन अली खां (आला हजरतांचे बंधु) (५) नवाब सालरजंग बहादूर (६) महाराजा पेष्कार सर किसनप्रसाद बहादूर जी. सी. आय्. ई, (७) नवाब फकुल मुलूक बहादूर (८) नवाब खाना बहादूर (९) नवाब वलीउद्दौला बहादूर (१०) नवाब तिलावत जंग बहादूर (११) नवाब मोहिनुद्दौला बहादूर बहादूर (१२) नवाब लताफ उद्दौला बहादूर (१३) नवाब बाहिरामुद्दौला बहादूर (वरील सर्व अमीर उमराव) (१४) कौन्सिलचे अध्यक्ष सद्र अजम (१५) लष्कर खात्याचे मुख्य–सद्र उलपहाम (१६) पब्लिक वर्क्स खात्याचे मुख्य (१७) पोलिटिकल खात्याचे मुख्य (१८) रेव्हिन्यूखात्याचे मुख्य (१९) कलाकौशल्य-खात्याचे मुख्य (२०) न्यायखात्याचे मुख्य (२१) सरकारचे चीफ सेक्रेटरी (२२) निजामसाहेबांचे प्रायव्हेट सेक्रेटरी–सर्फेखास.

## हैद्राबाद संस्थानचें बजेट.

हैद्राबाद संस्थानचें बजेट फसली सन १३३७ म्हणजे सात आक्टोबर १९२७ ते ५ आक्टोबर १९२८ पर्यंतचें तयार होऊन त्यास निजाम साहेबांची मंजुरी मिळाली आहे. या बजेटाप्रमाणें संस्थानचें उत्पन्न ७६८ लाख व खर्च ७२४ लाख असे धरले आहेत. खर्चांत २५ लाख रुपये दुष्काळ व कर्जफेड या खात्यांकरितां दाखल केले आहेत. खर्चांत २१ लाख रुपये विशेष खर्चा-करिता धरिले आहेत. निरनिराळ्या खात्यांच्या नांवांवर ज्या शिलका ओढल्या आहेत, त्यांतून जादा रकमा निरनिराळ्या कामांकरितां देण्यांत यावयाच्या आहेत. ड्रेनेज व पाणीपुरवठा १०४ लाख, दिल्ली येथील राजवाडा ७ लाख, दुष्काळ कामगिऱ्या १॥ लाख, व अदिलाबाद जिल्ह्यांतील सुधारणेकरितां तीन

लाख, भांडवलाच्या स्वरूपाचा खर्च रेल्वे व कालवे यांच्यावर १३६ लाख व्हावयाचा आहे; यांत ६३॥ लाख निजामसागर व इतर तलाव व कालव्यांवर व ६७ लाख काजीपेठ ते बलेरशा, परभणी ते बुर्ली, व विसाराबाद ते बेदर या रेल्वे लाईनवर खर्च व्हावयाचा आहे. बजेटाच्या सालांत कापसाच्या व्यवहाराकरितां सुमारें एक कोटी रुपये नवीन पाडून चालन वाढवावें लागेल असा अजमास आहे. बजेटाच्या आरंभींची शिल्लक चार कोटि ९५ लक्ष रुपये आहे. गेल्या सालीं मुलकी जमाबंदी जास्त वाढल्यामुळें व कर्जफेडीची रक्कम जास्त आल्यामुळें व नोकरखात्याचा खर्च कमी झाल्यामुळें साल-अखेर शिल्लक वाढणार आहे. निरनिराळ्या खात्यांच्या नांवांवर असलेल्या शिलका सुमारें १५९० लाखांच्या असून त्यांपैकीं ७ कोटि ७४ लक्ष रेल्वे खरेदीचे ७१ लक्ष नोटांबद्दल शिल्लक, ३ कोटी चलनाचा कायदा व ३ कोटि ६० लक्ष दुष्काळ, कर्जफेड व ठेवींची शिल्लक या खात्याला आहे. निजामसाहेबांच्या नोटा व शेअरचा भाव वाढत आहे, असें मि. हैदरी यांचें म्हणणें आहे. संस्थानची सांपत्तिक स्थिति उत्तम असून प्रश्न काय तो या पैशाचा उपयोग शहाणपणानें व सचोटीनें काम करणाऱ्या माणसांचा आहे. म्हैसूरसारख्या संस्थानांत अनेक तऱ्हेचीं कामें करण्यास देशी गृहस्थ मिळालेले असून त्यांचे हातून नांवाजण्यासारखीं कामें तयार झालेलीं आहेत. निजामसाहेबांना आजच्या काळीं माणसें मिळत नाहींत, असें म्हणणें म्हणजे मोठ्या शरमेची गोष्ट आहे. आजच्या या परिस्थितीचें कारण दरबारनें नोकरशाहींत भरती करण्याच्या बाबतींत स्वीकारलेलें अयोग्य धोरण हें होय. मुसलमान असेल तरच त्याला हैद्राबाद संस्थानांत जागा मिळतात असें जाहीर असल्यामुळें प्रस्तुतची परिस्थिति प्राप्त झाली आहे. कोणत्याही जागेवर इतर जातींतील लायक लोक बाजूस ठेवून नालायक अगर कमी लायकीचे मुसलमानांस नेमण्याच्या पद्धतीचा परिणाम दुसरा काय होणार आहे ? परदेशी अगर ब्रिटिश इंडियांत शिष्यवृत्त्या देऊन सिव्हिल सर्व्हिसच्या क्लासांत अगर उस्मानिया युनिव्हर्सिटींत उमेदवार घेण्याचे बाबतींत जोंपर्यंत हल्लींची दोषिक पद्धति चालू राहील तोंपर्यंत निजामशाहींतील नोकरशाही सुधारणें शक्य नाहीं. मि. हैदरी यांनीं या बाबतीकडे दरबारचें लक्ष याहून जास्त स्पष्ट शब्दांत आपलें म्हणणें मांडून वेधावयास पाहिजे होतें. आतां तरी दरबारी अधिकाऱ्यांचें लक्ष या महत्त्वाच्या प्रश्नाकडे वेधल्यास बरें होईल.

# हैद्राबाद राजकीय परिषद.

## अधिवेशन तिसरें.

( शनिवार, ता. ५ मे १९२८ ).

### जागा—टिळक स्मारक मंदिर, पुणें.

हैद्राबाद संस्थानांतील लोकांनीं राजकीय परिषद् भरविण्याचें ठरवून त्याप्रमाणें आज रोजीं सकाळीं पुणें येथें स्मारकमंदिरापुढील भव्य मंडपांत देशभक्त **नरसिंह चिंतामण केळकर** यांचे अध्यक्षतेखालीं परिषद् भरविण्यांत आली. आदल्या दिवशीं या मंडपांतच महाराष्ट्र प्रांतिक परिषदेची बैठक भरली होती, त्यानिमित्त तो शृंगारला होता.

मंडपांत श्रीशिवाजीमहाराज, देशभक्त दास, लाला लजपतराय, सार्वजनिक काका, महर्षी अण्णासाहेब पटवर्धन, लोकमान्य टिळक, महात्मा गांधी वगैरेंच्या तसबिरा लटकत होत्या. या परिषदेस पुण्यांतील हैद्राबादी प्रजाजनही आले होते. तसेंच कँपमध्यें राहणारे प्रमुख हैद्राबादी गृहस्थही हजर होतेच. श्रोतृसमाज सुमारें ५०० ।६०० वर होता. कांहीं स्त्रियाही या परिषदेस हजर होत्या. खालील गृहस्थ प्रमुखपणें प्लॅटफॉर्मवर दिसत होते. (१) देशबंधु सुभाषचंद्र बोस, (२) डॉ. मुळे, सोलापूर, (३) रावबहादूर चिन्मुळगुंद, (४) रा. रा. काकासाहेब लिमये, संपादक " ज्ञानप्रकाश ", (५) रा. रा. श्री. ग. वझे संपादक " सर्व्हंट " (६) श्रीमंत संपतराव गायकवाड (७) रा. ब. चिं. वि. वैद्य, (८) रावसाहेब व्हीं. ए. पटवर्धन, (९) रा. रा. ज. स. करंदीकर, (१०) रा. रा. अ. वि. पटवर्धन, (११) रा. ब. हणमंतराम रामनाथ, (१२) रा. रा. बापुलाल शेट, (१३) रा. रा.

यादव माधव काळे, (१४) रा. रा. विठ्ठलराव जोशी, सांगली, (१५) रा. रा. विष्णुपंत राजवाडे, (१६) रा. रा. सराफ सांगली, (१७) रा. रा. पेंडसे वकील, जमखडी, (१८) रा. रा. भाऊराव आपटे, नगराध्यक्ष जमखंडी (१९) रा. रा नारायण रामचंद्र गुंजाळ, (२०) रा. रा. चित्रावशास्त्री, (२१) रा. रा. बाळुकाक कानिटकर, (२२) प्रो. अण्णुभाऊ दिक्षित, (२३) डॉ. सातपुते, (२४) डॉ चिंचणीकर, (२५) हैद्राबादचे बॅरिस्टर एस. बी. शर्मा, (२६) रा. रा. चौकर, (२७) डॉ. वि. म. भट, (२८) रा. रा. गोपिनाथपंत पोतनीस, उरवडे-भोर, (२९) रा. रा. दत्तोपंत आंबेकर, (३०) रा. रा. सदाशिवराव अळतेकर, वकील, कऱ्हाड, (३१) प्रो. गो. म. चिपळूणकर, (३२) श्रीमती काशीबाई देवधर, (३३) रा. सत्तूर, (३४) रा. रा. शंकरराव परशा, (३५) श्रीयुत सिलम, (३६) श्रीयुत पुप्पाला, (३७) डॉ. भुसरत, (३८) डॉ. कोऊर, (३९) रा. रा. पी. व्ही. जोशी वकील, हैद्राबाद, (४०) श्री. तुळजापूरकर, पैठण. (४१) रा. रा. फाटक, संपादक निजामविजय, (४२) रा. रा. भीमाचार्य गुलबुर्गा, (४३) रा. रा. सप्तर्षी नगर, (४४) आचार्य वि. प्र. लिमये, (४५) डॉ. यार्दी कोल्हापूर, (४६) रा. रा. दत्तोपंत गुप्ते, वकील, पुणें असे प्रमुख होते. अध्यक्षांची स्वारी स्वागताध्यक्ष व दे. **सुभासचंद्र बोस** यांसह सभास्थानीं आल्यावर सर्वांनीं त्यांना उत्थापन देऊन त्यांचें स्वागत केलें. नंतर स्वागताध्यक्ष रा. रा. **अण्णासाहेब भोपटकर** यांनीं सर्वांचें मोठ्या प्रेमानें स्वागत केलें. तें करतांना ते म्हणाले—

## स्वागताध्यक्षांचें भाषण.

" प्रतिनिधि बांधवहो व बंधूनों, आपण मी हैद्राबाद संस्थानचा रहिवाशी नसतांना मला जो मान दिला त्याबद्दल मी फार आभारी आहे. खरें पाहिलें असतां ही परिषद हैद्राबाद संस्थानांतील कोणत्याही एका गांवांत अगर भागांत भरविणें इष्ट झालें असतें असें आपणांस वाटणें साहजिक आहे. पण तेथें या मार्गांत अनेक अडचणी आल्यामुळें चालकांना ही परिषद येथें भरविणें भाग पडत आहे, त्यास नाइलाज आहे. आपणांप्रमाणेंच चालकांना वाईट वाटत आहे. ही परिषद पुणें येथें भरविण्यांत आल्यामुळें आपल्यास संस्थानांत व खालसा मुलखांत काय भेद व फरक आहे, हें चटकन् ध्यानांत येईल. आम्ही ब्रिटिश इंडियांतील प्रजाजन एकत्र जमून आपल्या सुखदुःखाचा विचार करतों, आपल्या गाऱ्हाण्यांची दाद लागावी म्हणून सभा भरवितों व संकलित रीतीनें ती

सरकारपुढें मांडणें. या गोष्टी आम्हांस आपल्या परकीय सरकारचे राजवटींत करतां येतात, पण आपल्याच हाडामांसाच्या संस्थानिकांच्या राजवटींत याच गोष्टी करण्यास हरकत येते. संस्थानांत होत असलेला जाच कोणापुढें सांगावयाचा व जुलूमजबरदस्तीपासून कसें निवारण करून घ्यावयाचें, या सर्व गोष्टींचा विचार आपल्यास करणें अवश्य आहे; तेव्हां अशा परिषदेची अवश्यकता असतेच. तेव्हां संस्थानी राजवटींत अशा सभा भरवूं न दिल्यास पुण्यासारख्या अन्य गांवीं या भरविण्याची अवश्यकता आहे हें विसरतां कामा नये. आपल्यास संस्थानांचा प्रश्न अंगाबाहेर टाकतां येणार नाहीं. देशी संस्थानांतील प्रजाजनांची संख्या सुमारें सात कोटी आहे. तेव्हां एवढ्या मोठ्या भागाची आपण उपेक्षा करतां कामा नये. त्यांचे व ब्रिटिश नागरिकांचे संबंध परस्पर निगडित झालेले आहेत. कित्येक संस्थानांतील लोकांचे ब्रिटिश हद्दींतील नागरिकांशीं शरीरसंबंध झालेले आहेत, तेव्हां त्यांच्याही सुख-दुःखाची थोडी काळजी घेतली पाहिजे.

## राजवटींत फरक.

असें जरी आहे, तरी संस्थानी प्रजाजननांस एकमेकांशीं हितगुज करतां येत नाहीं. आमची स्थिति याच्या उलट आहे, असें मीं आतांच सांगितलें आहे. तेव्हां या दोन राजवटींत हा विलक्षण फरक दिसून येत आहे, त्याचें कारण सांगण्याची जरूरी नाहीं. संस्थानांतील प्रजाजनांस धर्मचक्षू असले तरी त्यांस दिसेनासें होतें. संस्थानचे हद्दींत तो इसम आल्याबरोबर मुका बनतो. आपल्या अडचणी काय आहेत हें सांगतां येत नाहीं. म्हणूनच इष्ट तो फरक आपल्या राजवटींत घडवून आणण्याकरितां ही चळवळ केली पाहिजे.

## पक्षपाताचा एक नमुना.

हिंदुस्थानांत बरींच लहान मोठीं संस्थानें आहेत. त्यांत क्षेत्राच्या व लोक-संख्येच्या मानानें हैद्राबाद संस्थान लोकांचे नजरेस प्रामुख्यानें येत आहे व आतांपर्यंत तें अनेक कारणांनीं नजरेस येत चाललें आहे, त्या संस्थानची कांहीं माहिती आपल्यास सांगूं इच्छितों.संस्थानची लोकसंख्या सुमारें एक कोटी चोवीस लक्ष आहे. हैद्राबाद संस्थान स्वातंत्र्य उपभोगणाऱ्या कानडा देशाच्या दुप्पट आहे व ऑस्ट्रेलियाचे चौपट आहे. त्यांत मुसलमानांची लोकसंख्या सुमारें

तेरा लक्ष, हिंदूंची १ कोटी ६ लक्ष आहे. या लोकसंख्येच्या मानानें साक्षरतेचें प्रमाण किती कमी आहे हें पुढील आंकड्यांवरून दिसून येत आहे साक्षरतेचें प्रमाण दरहजारीं ३३ आहे. त्रावणकोर संस्थानांत हेंच साक्षरतेचें प्रमाण दरहजारीं ९७६ आहे. तेलगू व आंध्र भाषा बोलणारे लोक संस्थानांत सुमारें ६४ लक्ष आहेत. मराठी भाषा बोलणारे ३४ लक्ष आहेत. कानडी १६ लक्ष व उर्दू बोलणारे १२ लक्ष ९० हजार आहेत. आतां या लोकसंख्येच्या मानानें हिंदूंची लोकसंख्या जास्त असल्याचें स्पष्टच होणार आहे. तेव्हां योग्य प्रमाणांत हिंदी प्रजेस सरकारी नोकरींत घेणें जरूर आहे. पण वस्तुस्थिति निराळी आहे. संस्थानांत एकंदर अधिकाराच्या जागा १०२१ आहेत. त्यांपैकीं हिंदूंना १७५ जागा देण्यांत आल्या आहेत. ७५२ मुसलमानांस मिळाल्या आहेत. इतर अलबते गलबते यांना ९४ जागांची खैरात झाली आहे. यावरून तेथें निःपक्षपातानें कारभार चालविला जातो असें कोण बरें समजेल? असा हा मोठा पक्षपात होत आहे. बहुजनसमाजाची जी भाषा आहे त्या भाषेंतून मुलींच शिक्षण दिलें जात नाहीं. मातृभाषेंतून शिक्षण दिलें गेलें तर लोकांमध्यें कदाचित् स्वाभिमान उत्पन्न होईल व त्यांच्यामध्यें एकी होईल ती न व्हावी एवढी खबरदारी घेण्यांत येऊन शिक्षणाचें माध्यम उर्दू हें ठरविलें आहे. राजाला आपल्या संस्थानांतील कोणतीही प्रजा सारख्याच प्रेमाची आहे मग असें कां होत आहे? याचा विचार करणें अगदीं जरूर आहे. संस्थानचें उत्पन्न ८ कोटी आहे, हेंही येथें सांगणें जरूर आहे.

## वृत्तपत्रांना बंदी.

एकमेकांचीं सुखदुःखें एकमेकांना हल्लींच्या काळीं कळविण्याचें उत्तम साधन असेल तर तीं वर्तमानपत्रें होत. ब्रिटिश इंडियांतील भागांत जीं पांच पन्नास प्रमुख पत्रें आहेत त्या सर्वांना या संस्थानांत येण्यास बंदी आहे. त्यामुळें येथील खरी परिस्थिति कळण्यास मार्गच नाहीं.

## उत्सवावर बंदी.

हिंदूंचे उत्सव मग ते धार्मिक असोत अगर गृहकृत्यांपैकीं कांहीं भाग असो, त्यांना मुद्दाम बंदी करण्यांत येते. तसे बंद पाडण्याची प्रवृत्तिच सर्व अधिकारी वर्गांत रूढ आहे. ज्याप्रमाणें उत्सवावर बंदी आहे त्याप्रमाणें मानवी प्राण्यावर तो जरा चळवळ करूं.

लागला तर त्याचेवरही बंदी ठेवण्यांत येते. याचें प्रत्यक्ष उदाहरण म्हणजे आमचे स्नेही रा. **राघवेंद्रराव शर्मा** हे होत. हे गृहस्थ जरा कोठें सामाजिक, धार्मिक, शैक्षणिक अशी चळवळ करूं लागले न लागले तोंच त्यांना २४ तासांत गांव सोडून हद्दीपलीकडे जाण्याबद्दल फर्मान सुटलें व त्याप्रमाणें ते नागरिकत्वाच्या साध्या हक्कास मात्र मुकले. दुसरे गृहस्थ म्हणजे मुंबईस हल्लीं राहणारे रा. रा. **दत्तोपंत तुळजापूरकर** वकील हे होत. त्यांनाही असेंच हद्दपार व्हावें लागलें. तेव्हां ना निर्बंध ना धर्म, ना व्यवस्था, अशा कारभाराविषयीं जीं कांहीं संस्थानें नांवलौकिकास अशा रीतीनें आलीं आहेत त्यांत हैद्राबाद संस्थानची प्रामुख्यानें गणना करणें भाग आहे. साध्या मानवी हक्कावरसुद्धां ज्या ठिकाणीं बंदी, मग तेथील परिस्थिति कशा प्रकारची असावी याची कल्पनाच करणें बरें होईल. अशी स्थिति चालूं असल्यामुळेंच त्या संस्थानच्या राज्यकारभारावर कांहीं नियंत्रण पाहिजे असें सर्वांस वाटणें साहजिक आहे. व आतां सुदैवानें म्हणा अगर दुर्दैवानें म्हणा, तशा प्रकारचें नियंत्रण साम्राज्यसरकारकडून घालण्यांत येत आहे.

## नजराणा.

प्रजेला इतर बाबतींत सतावल्याप्रमाणें केल्यावर दुसऱ्या खासगी बाबतींत म्हणजे जुलमानें त्यांचेकडून पैसे उकळण्याचे बाबतींत ती प्रजा अगदीं रंजीस आली होती. नजराण्याची पद्धत आज कैक वर्षें तेथें नांदत होती. त्यायोगानें प्रजा अगदीं गांगरून गेली होती. असा खाक्या फार झाल्यानंतर साम्राज्यसरकारचें लक्ष याकडे गेलें व सरकारचे प्रतिनिधि तिकडे गेल्यामुळें आतां थोडासा त्यावर आळा पडला आहे, ही समाधानाची गोष्ट आहे. एवढ्या ८आठ कोटींचा मालक आणि तो दुकानटीप करून नजराणा उकळीत गांवगन्ना फिरतो ही मौज इतरत्र पहावयास मिळणार नाहीं. हा मोंगलाई प्रकार आतां बंद झाला आहे.

## तहनामे.

साम्राज्यसरकारच आतां या प्रजेच्या सहाय्यार्थ कां धांवून आलें याचा विचार करण्यासारखें आहे. सरकारशीं निजामसाहेबांचे जे करार झालेले आहेत त्यांवरून त्यांचें उभयतांमध्यें कसें नातें आहे हें सांगण्याची जरूरी नाहीं. तें न सांगतांच कळण्यासारखें आहे.

## एक ऐतिहासिक प्रसंग.

१८ व्या शतकांतील गोष्ट आहे. आज ज्या ठिकाणीं परिषदेचा मंडप उभारला गेला आहे त्या ठिकाणींच एका भागांत निजामसाहेबांच्या अव्यवस्थित कारभाराबद्दल पेशवे सरकार व निजामसाहेब यांचेमध्यें तेढ आली; त्यावेळीं खर्ड्यांच्या लढाईचा जो प्रसंग आला त्यानंतर निजामसाहेबांच्या दिवाणांना या ठिकाणीं नजरकैदेमध्यें राहण्याचा प्रसंग आला होता. आणि या विसाव्या शतकांत त्याच ठिकाणीं हैद्राबादच्या प्रजाजनांचीं सुखदुःखें निवारण करण्याचे उपाय शोधून निजामास दाबांत आणण्याचा सुयोग येत आहे ही मोठी समाधानाची गोष्ट आहे. पुढेंमागें महाराष्ट्रासच ही गोष्ट करावी लागेल. तेथील जुलूमजबरदस्तीस आळा घालण्याचा व त्यास पाठीमागें सारीत जाण्याचा विचार करण्याकरतां आम्ही येथें जमलों हें अगदीं औचित्यास धरूनच आहे.

## बटलर कमिटी.

आपल्यास माहीतच आहे कीं, सरकारनें ब्रिटिश हिंदुस्थानचें व संस्थानिकांचें परस्परांशीं काय नातें आहे हें कायमचें ठरविण्याचे उद्देशानें बटलर कमिटीची स्थापना केली आहे. या कमिटीपुढें साम्राज्यसरकार व संस्थानिक यांच्या संबंधाचाच तेवढा विचार व्हावयाचा आहे. प्रजेचा यांत बिलकूल संबंध ठेवला गेला नाहीं. आतांपर्यंत प्रत्येक संस्थानिक जास्त अनियंत्रित अधिकार उपभोगीत आहेच; पण ते कायमचे उपभोगावयास मिळावेत म्हणून त्यांची खटपट चालूं आहे, व आपलें म्हणणें या कमिटीपुढें मांडण्याची त्यांची सक्त खटपट चालली आहे. आपले अधिकार जास्त अनियंत्रित कसे होतील याचीच जोरानें मागणी ते करीत आहेत. त्या मागणीचें स्वरूप स्थूल मानानें पाहतां पुढीलप्रमाणें आहे. संस्थानचे उत्पन्नाचा $\frac{3}{4}$ भाग खर्चून टाकूं अगर एकादी युरोपियन बाई आणूं, अगर दुसरें कांहीं लोकविलक्षण करूं व तें करतांना कोणत्याही प्रकारचे निर्बंध असूं नयेत वगैरे मनोरथ असणारच यांत शंका नाहीं. खटपट चालवितांना ते साम्राज्य सरकारचे पायांत साप सोडण्याचा प्रयत्न करीत आहेत. पहा, आपल्या मुलखांत तुमचे नागरिक वाटेल तसा धुडगूस घालीत आहेत. जास्त हक्क मिळविण्यासाठीं भांडणें भांडत आहेत; मग अशा वेळीं आम्हांला आमच्या मागणीप्रमाणें जास्त अधिकार दिले नाहींत तर पहा-

आम्ही त्यांना मिळूं; मग स्थिति फार वाईट होईल अशी अगर अशा प्रकारची धमकीवजा मागणी करून आपली अनियंत्रित सत्ता अबाधित राखण्याचा विचार करीत आहेत. आणि हें आपलें म्हणणें या बटलर कमिटीपुढें मांडण्याकरतां एका इंग्लंडमधील कायदेपंडिताची योजना केली आहे. या कायदेपंडिताचें नांव सर लेस्ली स्कॉट. यांना मेहनतान्याबद्दल २० लक्ष रुपये ठरले आहेत. मजा ही आहे कीं, प्रजेच्या पैशानें ही सर्व कारवाई चालविली आहे आणि ती कारवाई त्यांच्या पैशानें त्यांचच अधिकार कमी करण्याची आहे हें विसरतां कामा नये. या कमिटीपुढें ते प्रजेची बाजू मांडण्यास बिलकूल तयार नाहींत. प्रजेचा पैसा उधळण्यास ते तयार आहेत. तहनामे जे झाले आहेत ते नुसत्या गादीनशीन व्यक्तीबरोबर झाले नाहींत. निजामसाहेब अगर शिंदे सरकार एकटे तह करूं शकले नाहींत. आपल्या प्रजेचा पुढारी या नात्यानें त्यांचे तह झालेले आहेत हें त्यांनीं विसरून चालावयाचें नाहीं. आतांही प्रजेचें म्हणणें काय आहे हें ध्यानांत घेतलेंच पाहिजे. सरकारनेंही या कमिटीस प्रजाजनांचे हक्क काय आहेत याचा विचार करण्याकरितां सुचविलें नाहीं. व संस्थानिकही नांव काढीत नाहींत; अशा परिस्थितींत आपल्यासच पुढें आलें पाहिजे व आपल्या हक्कांचें संरक्षण केलें पाहिजे. संस्थानांत कशाच गोष्टीला सुरक्षितता नाहीं, वित्ताची नाहीं, व माणसांची नाहीं. एकादी सुंदर मुलगी एकाद्यास असेल तर ती सुरक्षित आहे असेंही म्हणतां येत नाहीं. चांगली संपत्ती अगर चांगलें घरदार असणें सुद्धां पाप होय. तें केव्हां नाहींसें होईल याची कल्पना होत नाहीं. संस्थानिक आपल्या प्रजेस गोठ्यांतलि गुरांप्रमाणें वागवीत आहेत. त्यांना कोणत्याच प्रकारचे मानवी अगर नैसर्गिक हक्क देण्यास ते तयार नाहींत. तेव्हां संस्थानिकांनीं या कमिटीशीं हितगुज करून आपले संबंध कायमचे दृढ करून घेतले तर संस्थानी प्रजा खात्रीनें मरून जाईल. तेव्हां वेळींच चळवळ सुरू करून हक्कांचें संरक्षण केलें. पाहिजे.

## प्रजेच्या पैशाची उधळपट्टी.

संस्थानिकांना प्रजेच्या पैशाची उधळपट्टी करतांना कांहींच वाटत नाहीं. कोणी संस्थानिक रेसिसमध्यें पैशाचा चक्काचूर करतो तर कोणी विलायतेच्या १८ सफरी करतो. कोणी भला मोठा झनाना ठेवण्याची तरतूद करतो तर कोणी १७ वर्षांचा संस्थानिक विलायतेस इस्टेटी खरेदी करण्याचा प्रयत्न करतो व कोणी

इतर तऱ्हेचे चमत्कृतिजनक प्रकार करण्यांत गुंग असतो. एवंच प्रजेच्या पैशाची कशी नासाडी होते हें ध्यानांत आणा. प्रत्येक मनुष्यास वित्तापेक्षां अब्रु प्रिय आहे; पण ती सुद्धां संस्थानी मुलुखांत अबाधित रहात नाहीं ही मोठ्या शरमेची गोष्ट आहे. एकाद्यानें जर मला विचारलें 'कांहा आपल्या हद्दीजवळ असलेल्या एका संस्थानिकांच्या हद्दींत तुम्हीं राहण्यास तयार आहां का!' त्यावर 'मी तसें करण्यास कबूल नाहीं' असें लाजेनें उत्तर देण्याची पाळी येते. कारण तेथें चांगल्या चांगल्या माणसांची अब्रू घेण्यांत येते. व एकदां अब्रू गेली म्हणजे जगांत अन्य प्रिय वस्तु कोणती राहिली ? आमचे युरोपियन स्नेही आम्हांस म्हणतात, पहा स्वराज्य पाहिजे असेल तर या संस्थानांत जा. ते तुमच्या हाडामांसाचे आहेत, मग कां तयार नाहीं ? याचें उत्तर आम्ही देऊं शकत नाहीं. वरील कारणाकरतां आम्हांला तें देतां येत नाहीं. तेव्हां याचा प्रतिकार करण्याची वेळ आली आहे. व स्पष्टपणें त्यांना आपण विचारलें पाहिजे कीं, महाराज, आपल्या उत्पन्नांतून खासगीकडे किती खर्च करणार ! अवघ्या दोन मुक्कामाकरतां बायका तरी किती नेणार, क्रिकेटच्या सामन्यास गेलें असतांना ताजमहाल हाटेलमधील खोल्या आपण किती अडविणार ? रेसिसकरतां किती घोडे ठेवणार, कां उत्पन्नाचे सर्व घोडेच घेणार, ढुंगण टेकतें न टेकतें तोंच विलायतेच्या सफरी, आणखी किती करणार ? वगैरेसारखे प्रश्न विचारण्याची परिस्थिति त्यांनीं निर्माण केली आहे. महाराज, याला कांहीं तरी निर्बंध घाला असें स्पष्ट सांगण्याची आतां प्रजेला पाळी आली आहे. हा प्रजेचा जो तुम्ही अनाठायीं पैसा खर्च करतां तो काय म्हणून ? मला एक असें संस्थान माहीत आहे कीं त्याचें उत्पन्न एक कोटीचें आहे. खासगीकडे ते ५०।६० लाख रुपये खर्च करतात. पण शिक्षणाकडेमात्र अवघे २० हजार खर्चले जातात. काय हें शिक्षणप्रेम ! अशा संस्थानचे एक डायरेक्टर ऑफ पब्लिक इन्स्ट्रक्शन्स् होते ते नुकतेच पेन्शनींत निघाले, त्यावेळीं त्यांना अवघा ३७ रुपये पगार होता. तेव्हां प्रजेचा पैसा किती खर्च करावयाचा त्यास मर्यादा आहे किंवा नाहीं ? कांहीं तरी टक्के एकदां ठरवा व बाकीचा पैसा प्रजेच्या हिताच्या कामाकडे खर्च करा. त्यावर मात्र तुमची हुकमत ठेवूं नका. आमच्या एवढ्या प्रांताचा गव्हर्नर त्याला सुद्धां मर्यादित खर्च आहे. त्यांस सुद्धां दरमहा अवघा १०००० पगार आहे. त्याचे अधिकार तुमच्यापेक्षां जास्त आहेत; मग त्य

नानानें तुम्हांस आळा घालावयास नको काय ? तसे साधे माणुसकीचे हक्क वापरण्यास देणें नको काय ! एका संस्थानांत एक चमत्कारिक परिस्थिति नजरेस आल्याचें प्रसिद्ध झालें आहे. संस्थानांतून राजेसाहेबांची जरी रिकामी गाडी गेली तरी त्या गाडीस लवून मुजरा करावयाचा. हें आहे तरी काय ? बाबांनों ! ते दिवस आतां गेले या शतकांत एका व्यक्तीचे सर्व अनियंत्रित अधिकार संपुष्टांत आले आहेत. यापुढें राजा म्हणजे सर्व प्रजाजनांचा प्रतिनिधी म्हणून तो राहिला पाहिजे. असें असेल तर तो फार दिवस टिकूं शकेल एरवीं नाहीं. ही गोष्ट हैद्राबाद संस्थानास उद्देशून बोलतों असें नाहीं तर सर्व संस्थानांना उद्देशून बोलत आहें. तेव्हां संस्थानांच्या अधिपतींनीं, अगोदर **डेक्लरेशन ऑफ राईटस** केलें पाहिजे म्हणजे पुष्कळसे गैरसमज दूर होतील. प्रजा माणसें आहेत, मग तीं सचेतन आहेत हें सांगण्याची जरूरी नाहीं. हा अनुभव अगदीं मोठ्या संस्थानांतून येत असेल पण लहान संस्थानांतसुद्धां येत आहे. जुनी राज्यपद्धति विलयास जाऊन प्रजामततंत्री राज्यव्यवस्थेची वेळ आतां आली आहे. हीं संस्थानें आतांपर्यंत जीं राहिलीं आहेत तीं केवळ आपल्या हुषारीवर अगर अन्य कारणांवरून राहिलीं नाहींत तीं इंग्रज सरकारनें शेवटचे आधार म्हणून राखून ठेविलीं आहेत. एकाद्या मोठ्या जंगलास वणवा लागावा व त्यांतील वृक्ष जळून गेल्यानंतर कांहीं सोट शिल्लक रहावेत तसे हे संस्थानिक निवळ सोट म्हणून राहिले गेले आहेत.

## लोकप्रातिनिधि सभा.

महाराज ! प्रजाजनांविरुद्ध कारवाई न करतां अगर भेकडपणा न दाखवितां आपल्यांत जास्त हुषारी अगर पराक्रम असेल असें जर वाटत असेल तर प्रजाजनांच्या मागण्या पुरविण्यांत येऊन त्यांचें कल्याण करण्यास पुढें या. प्रजाप्रतिनिधिमंडळ म्हणून स्थापा व स्वतां त्याचे अध्यक्ष झालां तरी हरकत नाहीं. बादशहा जसें पार्लमेंटची बैठक उघडतांना एक छोटेसें भाषण करतात, तसें आपण आपल्या या प्रतिनिधिसभेचे अध्यक्ष या नात्यानें भाषण एकदां करा. नंतर बादशहा जसे पुढें कारभारांत हात घालीत नाहींत तसे आपण सर्व कारभार लोकनियुक्त सभासदांचे हातीं सोंपवा. एकदां कांहीं टक्के नक्त नेमणूक आपली कायम करून घ्या व बाकीचा भाग संस्थानाच्या हिताकरतां

प्रजेच्या स्वाधीन करा. असें झाल्यानें आपली इभ्रत अगर दर्जा कमी होणार नाहीं. उलट आपल्या वैभवांत भर पडेल !

## एक गमतीची गोष्ट.

संस्थानांत कारभार कसा चालतो तें ऐकण्यासारखें आहे. मनुष्य नोकरीवर नेमला म्हणजे त्यास कोणचें काम द्यावें अगर न द्यावें याचा विचार नसतो. माझे एक स्नेही फिलॉसफी घेऊन एम. ए. झालेले आहेत. त्यांना एका संस्थानांत नोकरी मिळाली. प्रथम ते राजपुत्रांचे शिक्षक म्हणून झाले; पुढें बढतीची वेळ आली तेव्हां त्यांना मामलेदार करण्यांत आलें; पुढें पुन्हां बढती मिळाली तेव्हां मुनसफ झाले. आणखी पुढें बढती मिळाली तेव्हां त्यांना व्हेटरनरी सर्जन केलें. ही गोष्ट आमच्याकडे होईल काय ? ज्या विषयांत जो निष्णात त्यालाच त्या गोष्टींत कांहीं तरी विचारतील. पण इकडे सर्व कांहीं उलट ! संस्थानांत जे अधिकारी नेमले जातात ते इकडे निर्माल्यवत झालेले अधिकारी असतात. ते तेथें मोठ्या हुद्यावर चढले जातात. इकडील रिटायर्ड डि. डेप्युटी कलेक्टरकडे मोठमोठे न्यायनिवाडे तोडण्याचीं कामें दिलीं जातात. ट्रॅन्स्फर ऑफ प्रॉपर्टीसारख्या विषयांवर ज्या प्रिव्ही कौन्सिलमध्यें सुद्धां एकमत होऊं शकत नाहीं त्यासंबंधीं हे लोक न्यायनिवाडा करून निकाल देतात. तेव्हां प्रजेचें हित कसें काय साधत असेल तें आपणच पहा. अशा माणसापुढें जेव्हां एकाद्या केसकरतां जाणें असेल तेव्हां हसूंच येतें. तसेंच ज्याचे तोंडावर मिसूसुद्धां फुटली नसेल असे संस्थानिक हायकोर्टाचे अधिकार वापरतात. तेव्हां ही एक मजा दिसते. असो; त्याशिवाय संस्थानांत नोकरी करणारांना इतर झेंगटेंही सांभाळावीं लागतात. श्रीमंतांचे नात्यागोत्याचे लोकही बरेच असतात. त्यांची मिजासही संभाळली पाहिजे. सांभाळा; नाहीं असें नाहीं; पण त्याला कांहीं मर्यादा आहे. असे व इतर न सांगण्याजोगे किळसवाणे प्रकार संस्थानांत दिसून येतात, तेव्हां त्याला आपण आळा घालण्यास पुढें येणें जरूर आहे.

## मागण्यांचे स्वरूप.

आपल्यास या सर्व गोष्टींवर ताबा ठेवणें जरूर असल्यास व भाषणस्वातंत्र्य, मुद्रणस्वातंत्र्य अगर व्यक्तिस्वातंत्र्य यांसारखे हक्क मिळविणें झाल्यास आपण धैर्यानें व चिकाटीनें हे हक्क मिळविले पाहिजेत. याकरतां त्रास सोसावे लागतील,

तुरुंगांत जावें लागेल व इतर हालअपेष्टा सोसाव्या लागतील; त्यांस मात्र आपण तयार झालें पाहिजे. आपण एकजुटीनें राजाबरोबर कायदेशीर हक्कासाठीं शांततेच्या मार्गानें भांडूं लागलां तर आपल्या हक्कासाठीं कदाचित् पुढेंमागें सरकार शांतता प्रस्थापित करण्याचे इराद्यानें कारभारांत हात घालील. आम्ही जसा हक्कासाठीं हल्लीं जो झगडा सुरू केला आहे त्याबद्दल काय काय संकटें भोगलीं याची तुम्ही जाणीव ठेवा. संस्थानिकही स्वातंत्र्याचे भोक्ते आहेत. या बदललेल्या काळाकडे नजर देऊन ते वेडेचार करणार नाहींत असें वाटतें. तुमच्यापेक्षां जास्त सामर्थ्यवान् अशा ब्रिटिश सरकारला प्रजेचा दाब सहन होतो मग तुमच्यावर तो कां नको ? बदललेल्या काळाकडे नजर द्या एवढेंच सांगणें आहे. असो. हैद्राबाद संस्थानच्या प्रजाजनांनीं आपल्या गाऱ्हाण्यांची दाद लागावी म्हणून ही परिषद आज बोलावली आहे व ते त्यासाठीं धैर्यानें पुढें आले आहेत, याबद्दल समाधान वाटतें. अध्यक्ष हा सभेला पाहिजेच त्याप्रमाणें

## अध्यक्षाची निवड

झाली, पण औपचारिक रीत्या त्यांना निवडण्याचें एवढेंच कार्य राहिलें आहे, तें आतां होईलच. आपण आपल्या मानवी हक्कांकरतां झगडण्यास एकत्र जमला आहांत, त्यांत तुम्हांस सदैव यश येवो असे चिंतून आपण सर्व या कार्याकरतां लांबून येथें आलांत त्याबद्दल आभार मानून आपली रजा घेतों."

स्वागताध्यक्षांचें अशा प्रकारचें विचारास चलन देणारें भाषण झाल्यानंतर अध्यक्षांच्या सूचनेचा ठराव पुढें आला. तो बुलाढाण्याचे रा. रा. **यादवराव काळे,** यांनीं सभेपुढें मांडला. त्यांनीं योग्य शब्दांत अध्यक्ष या पदास किती योग्य आहेत याचें विवेचन केलें. ते निरनिराळ्या संस्थांचे चालक आहेत, शिवाय त्यांना संस्थानविषयक चळवळीबद्दल माहिती आहे. त्यांच्या ज्ञानाचा व अनुभवाचा योग्य फायदा आपल्याला मिळेल. तेव्हां ही सूचना आपण पास करावी अशी विनंति आहे. या सूचनेस रा. रा. **चिंतामणराव ऊर्फ नानासाहेब वैद्य** यांनीं अनुमोदन दिलें. अनुमोदन देतांना ते म्हणाले "मी या ठरावास हैद्राबाद संस्थानचा प्रजाजन म्हणून अनुमोदन देण्यास उभा राहिलों नाहीं. मी एक महाराष्ट्राचा रहिवासी आहें. हैद्राबाद संस्थानांत हिंदूंचीं बरींच पुण्यक्षेत्रें आहेत. पैठण, जोगाईची अंबा व तुळजापूरसारखीं महत्त्वाचीं

क्षेत्रें आहेत, त्यासच मी महाराष्ट्र अशी संज्ञा देतों. तेव्हां महाराष्ट्राचा रहिवाशी म्हणून मी अनुमोदन देण्यास उभा आहें. कदाचित् मी एका संस्थानांत नोकरी केली आहे म्हणून तेथील अनुभवाचा फायदा अगर रीतीभाती कळतील म्हणूनच मला सूचनेस दुजोरा देण्याकरतां उभें केलें असेल, पण कांहीं म्हटलें तरी मी या ठिकाणीं अनुमोदन देण्यास उभा आहें. आजचे आपले अध्यक्ष जे निवडले गेले आहेत त्यांच्याबद्दल जास्त सांगण्याची जरूरी नाहीं. कारण रा. रा. तात्यासाहेबांचे ठिकाणीं अनेक गुण आहेत. एक मोठा गुण म्हटला म्हणजे त्यांच्या वाणीच्या ठिकाणीं अत्यंत गोडी व माधुर्य आहे. ब्रिटिश सापाला असेंब्लीमध्यें आपल्या गोडवाणीरूपी पुंगीनें डोलावयास लावावयाचें व आपला मुद्दा तर सोडावयाचा नाहीं, अशी यांच्या स्वभावाची ठेवण आहे. व त्यांचे ठिकाणीं एक **दुर्लभत्व** आहे. तें एका कवीचें उक्तींत सांगणें बरें. तो श्लोक असा—

॥ " नरपतिहितकर्ता द्वेष्यतां याति लोके ।
॥ जनपदहितकर्ता त्यज्यते पार्थिवेन ॥
॥ इति महति विरोधे विद्यमाने ( भासमाने ) समाने ।
॥ नृपतिजनपदानां **दुर्लभः** कार्यकर्ता ॥ १ ॥

तें **दुर्लभत्व** कसें हें या श्लोकांत उत्तम ग्रथित केलें आहे. राजे व प्रजा यांच्यामध्यें जो विरोध आहे, तो केवळ भासरूप आहे, खरा नव्हे हें या राजेलोकांना कळत नाहीं. कांहीं जरी असलें तरी आपले अध्यक्ष राजांची व प्रजेची समजूत कोणाचेंही मन न दुखवितां घालतील अशी खात्री आहे. सबब अशा अध्यक्षांचे आधिपत्याखालीं सभा खात्रीनें यशस्वी होईल व प्रजेस योग्य तो मार्ग मिळेल असें वाटतें; सबब आपण या सूचनेस पाठिंबा द्याल अशी खात्री आहे."

या सूचनेस **रा. ब. चिनमुळगुंद**, सोलापूरचे **डॉ. मुळे, रा. ब. हणमंतराम रामनाथ, रा. रा. बाबुलालशेट,** सांगली संस्थानचे रहिवाशी **रा. रा. विठ्ठलराव** जोशी वगैरे यांची समयोचित व अध्यक्षाची योग्य निवड करण्यांत जी कुशलता दाखविली गेली त्यांचे अभिनंदनपर अशीं भाषणें झालीं. नंतर अध्यक्ष टाळ्यांचे गजरांत अध्यक्षस्थानीं विराजमान झाले. नंतर अध्यक्षांनीं **देशभक्त सुभाषबाबु** हे आज येथें आले आहेत, ते परवां येथें भरलेल्या प्रांतिक परिषदेचे सभापति होते व काँग्रेसचे ते एक सेक्रेटरी आहेत, अशा गृहस्थांचें संस्थानविषयक काय म्हणणें आहे हें समजून घेण्याची आपली उत्कंठा

आहे हें जाणून मी अगोदर त्यांना विनंति करतों, मग सभेचें काम चालावें अशी सूचना करतों त्यास कारणही आहे. त्यांना शहरांतील संस्थाही पहावयाच्या आहेत म्हणून त्यांचें भाषण अगोदर होणार आहे. याप्रमाणें प्रास्ताविक भाषण करून त्यांनीं **सुभाषबाबूंना** परिषदेतर्फें हार घालून आपलें भाषण करण्यास सांगितलें.

## दे. सुभाषबाबूंचें भाषण

( त्यांचें भाषण इंग्रजीमधून झालें. )

"देशी संस्थानच्या राज्यकारभाराचे अंतर्गत बाबतींत मला कांहीं ज्ञान नाहीं. मीं जें कांहीं वाचलें आहे त्यावरून एवढें सांगूं शकतों कीं, त्यांचीं व आमचीं पण सुखदुःखें सारखीं आहेत. आमच्या प्रांतांत फारशीं संस्थानें नाहींत. तरी पण जीं आहेत तीं साधारण लहान आहेत; पण त्यांचा कारभार कसा काय चालतो हें मला माहीत आहे, त्यावरून आपल्या दुःखाची मला जाणीव आहे. लोकशाही प्रस्थापित करण्याची खटपट काँग्रेस करीत आहे. संस्थानी प्रजाजनही लोकमताचा दाब राज्यकारभारावर असणें जरूर आहे म्हणून त्याच प्रकारची घटना आपले संस्थानांत स्थापूं इच्छित आहे. तेव्हां खालसातींतील प्रजाजनांचें व संस्थानी प्रजाजनांचें ध्येय एकच आहे. आतांपर्यंत या चळवळीस काँग्रेसनें अन्य कांहीं कारणांमुळें म्हणा पाठपुरावा केला नाहीं, ही गोष्ट खरी आहे. तथापि यापुढें ही उदासीनता राहणार नाहीं असें मी काँग्रेसतर्फें आश्वासन देतों. संस्थानी प्रजा व खालसातींतील प्रजा यांचेमध्यें खरोखरीच कांहीं अंतर नाहीं. जर असेल असें वाटत असेल तर तें कृत्रिम आहे. तो पापुद्रा खरवडून काढला तर भावना व ध्येय एकच आहे यांत शंका नाहीं. तुम्हीं खालसा इलाख्यांत जी चळवळ आजपर्यंत चालविली आहे तिचें अवलोकन करून त्याप्रमाणें संस्थनांत पद्धतशीर चळवळ सुरू करा व कोणतींही संकटें आल्यास न भेदरतां चिकाटीनें व उत्साहानें काम करण्यास पुढें व्हा, म्हणजे आपोआपच मार्ग सुचेल व परमेश्वरहि आपल्यास मार्ग दाखवील अशी मला आशा आहे."

## अभिनंदनपर संदेश.

वरील प्रमाणें **सुभाष बाबूंचें** भाषण झाल्यावर परिषदेचे सेक्रेटरी रा. रा. **राघवेंद्रराव शर्मा** यांनीं ठिकठिकाणांहून परिषदेस आलेले संदेश व तारा वाचून दाखविल्या. मुख्य मुख्य पुढीलप्रमाणें आहेत.

( १ ) श्री. दादासाहेब खापर्डे ( उमरावती ), ( २ ) श्री.सत्यमूर्ती(मद्रास ), ( ३ ) पंडित जवाहिरलाल नेहरू ( अलाहाबाद ) ( ४ ) सरदार शार्दुलसिंग, ( लाहोर ), ( ५ ) श्री. बी. एस. कामत ( पुणें ), ( ६ ) श्री. रामनारायण चौधरी, अजमेर सेवासंघ( अजमीर ) ( ७ ) चिदानंद्र संन्यासी ( दिल्ली ) (८ ) श्री. सरदार व मिसेस कमलाबाईसाहेब किबे (इंदूर) (९) श्रीमती सौ. अवंतिकाबाई गोखले ( मुंबई ) ( १०) मि. के. टी. मॅथ्यू, सेक्रेटरी ऑल इंडिया स्टेटस् कॉन्फरन्स–मद्रास ( कोचीन ) ( ११) डॉ. सुमंत मेथा— ( बडोदे) ( १२ ) मि. चुनीलाल एम डॉक्टर,एडिटर नवगुजराथ, (बडोदे ). ( १३ ) मि. जी. आर. जोशीयार ( म्हैसूर ) ( १४ ) रावबहादुर ब्रह्म– ( उमरावती ) ( १५ ) श्री. एस. व्ही. कौजलगी ( विजापूर ) ( १६ ) श्री. कृष्णराव मुद्वेडकर, ( बेळगांव ) ( १७ ) एडिटर देशीराज्य ( नडियाद ) ( १८ ) श्री. मेघश्याम दत्तात्रय शिरोडकर संपादक वैनतेय ( सावंतवाडी ) ( १९ ) श्री. एन. आर. फाटक नवाकाळ, (मुंबई)( २० ) प्रोफेसर चिंतामण गंगाधर भानू ( पुणें ) (२१) प्रो. शेषाद्री, बनारस हिंदु युनिव्हर्सिटी ( २२ )डॉ. काणे, ( यवतमाळ ) (२३) बॅरिस्टर गाडगीळ ( पुणें ) ( २४ ) श्री. मल्लकार्जुना पाटील ( सोलापूर ) ( २५ ) श्री. गोविंदराव बिनिवाले ( सांगली ) ( २६ ) श्री. बा. वि. शिखरे, ( मिरज ) ( २७ ) डॉ. अंत्रोळीकर ( सोलापूर ) ( २८ ) डॉ. द. रा. हुल्याळकर, ( जमखंडी. ) ( २९ )श्री. जी. के. देवधर, प्रेसिडेंट सर्व्हंटस ऑफ-इंडिया सोसायटी. ( पुणें ) ( ३० ) श्री. बळवंत गणेश खापर्डे, ( उमरावती ) ( ३१ ) डॉ. आर के. नायडू, प्रेसिडेंट सिटी म्युनिसिपालिटी ( पुणें ) ( ३२ ) श्री. आयाचित वकील ( उस्मानाबाद ) ३३ श्री. वामनराव नाईक ( हैद्राबाद. ) ( ३४ ) दांडेकर, संपादक गोरक्षण (मुंबई) (३५) एडिटर " हैद्राबाद बुलेटिन ( हैद्राबाद ) (३६) श्री. गोकुळचंद नारंग ( लाहोर ) ( ३६ ) श्री. पाथिकजी ( अजमेर ) ( ३८ ) डॉ. ॲनि बेझंट (३९) श्री. एस. एच. तिरामिजी, हायकोर्ट वकील ( हैद्राबाद ) ( ४० ) मि. त्रिकमदास डी. मुरारजी ( मुंबई ) (४१) दि. ब. एम. रामचंद्रराव विजगापट्टम्. इ० नंतर अध्यक्षांनीं बडोद्याचे **श्रीमंत संपतराव गायकवाड** यांचा योग्य शब्दांत गौरव करून परिषदे-मार्फत हारतुरे देऊन सन्मान केला व आपल्या भाषणास सुरवात केली.

# अध्यक्षांचें भाषण.

---

" मला अध्यक्षस्थान दिल्याबद्दल एका वाक्यांतच मी आपले आभार मानतों. कारण औपचारिक भाषण करून वेळ घालविण्यास सवड नाहीं. अध्यक्षांची निवड सुद्धां अगदीं एकदोन वाक्यें बोलूनच करण्याचा प्रघात पडला तर बरें होईल असें माझें मत आहे. असो, मी हैद्राबाद संस्थानचा प्रजाजन नाहीं अगर त्या संस्थानशीं माझें सुखदुःख निगडित झालें आहे असें नाहीं. आज आपण जी परिषद् भरविली आहे त्या सभेस हैद्राबाद संस्थानचे पुष्कळ प्रजाजन आले आहेत. केवळ पुणेकरांचीच ही सभा आहे असें नांव ठेवण्यांत येतें तें निरर्थक आहे, हें आपल्या ध्यानांत येईल. तेव्हां आपण आपल्या कृतीनें तिला हैद्राबाद प्रजा परिषद् असें सार्थ नामाभिधान प्राप्त करून दिलें ही समाधानाची गोष्ट आहे. ही परिषद् हैद्राबाद संस्थानांत न भरवितां पुण्यास भरवावी लागत आहे, ही खरोखर लज्जास्पद व दुःखाची गोष्ट आहे. ज्या संस्थानांत १। कोटी लोक रहातात व ज्या संस्थानाचें क्षेत्रफळ हजारों चौरस मैलांचें आहे, त्या संस्थानांत कोणत्याही एका ठिकाणीं परिषद् भरविण्याला परवानगी मिळूं नये व तेथील प्रजेला मधुकन्याप्रमाणें परिषद् भरविण्याकरतां पुण्याकडे पहावें लागावें ही फार शरमेची गोष्ट आहे.

## शरमेची भागीदारी.

या लज्जेंत तीन भागीदार आहेतः-( १ ) खुद्द निजाम साहेब, यांनीं थोडीशी अंतर्दृष्टि केली तर त्यांना असें आढळून येईल कीं, प्रजेला आपलीं गाऱ्हाणीं व सुखदुःखें यांचा एकत्र जमून विचार करण्याची बंदी करणें ही अन्यायाची गोष्ट आहे, परंतु असा विचार करतो कोण ! हैद्राबाद सरकारनें या प्रजेच्या आरशांत आपलें तोंड पाहिलें तर त्यांना आपल्या खऱ्या स्वरूपाची जाणीव होईल. दुसरीकडे कोठें सभा भरवून आपलीं सुखदुःखें व गाऱ्हाणीं निजाम साहेबांकडे पाठवावीं म्हटलीं तर पोहचूं शकत नाहींत अगर पोंचलीं तर सल्लागार मंडळी त्यांचेपुढें नेत नाहींत व निजाम साहेबांचे डोक्यांत कोंबणारे

प्रतिनिधिही नाहींत. निजाम साहेबांस उपजत बुद्धिही नाहीं व समजून सांगण्यास चांगले सल्लागारही नाहींत, तेव्हां सल्लागारही यांत भागीदार आहेत असेंच म्हणावें लागेल. त्यास इलाज नाहीं. ( २ ) दुसरें भागीदार आपलें ब्रिटिश सरकार. आपले सरकार आपल्यास अधिराजे म्हणवितात आणि जरूर पडल्यास आपला स्वार्थ साधण्याकरतां संस्थानिकांच्या कारभारांत ढवळाढवळ करतात. लॉर्ड रेडिंग साहेबांनीं एका चिटोऱ्याच्या साहाय्यानें निजाम साहेबांस धाब्यावर बसविलें कीं नाहीं ? मला माहित आहे कीं निजाम साहेबांविरुद्ध चार गाढवांच्या ओझ्याइतका भरपूर कागदपत्रीं पुरावा सरकारजवळ आहे. तो जरी मीं पाहिला नाहीं तरी मला कल्पनाशक्ति आहे त्यायोगानें मी जाणूं शकतों; आणि सरकार आपल्या स्वार्थाकरतां त्याचा उपयोग करतात व पुढें वेळ पडल्यास आणखी खात्रीपूर्वक करतीलच. हे पुरावे किती गाढवांनीं लिहिले आहेत हें मात्र कळण्यास मार्ग नाहीं. सरकारचे मनांत येईल तेव्हां रेसिडेन्सीच्या ऑफिसांतून एकादें प्रकर्ण हळूंच बाहेर येतें व काम करतें. अशा साम्राज्य सरकारला निजामसाहेबआपल्या राज्यांत प्रजेची परिषद भरवूं देत नाहींत हें कां कळत नाहीं ? तेव्हां आपले हे अधिराजे निजामसाहेबांना असा प्रश्न करीत नाहींत कीं, आम्ही ज्याप्रमाणें प्रजेला सभा भरवून आपल्या गाऱ्हाण्यांची चर्चा करण्याची संधि देतों त्याप्रमाणें तुम्ही कां करीत नाहीं ? आम्ही आमच्या प्रजाजनांच्या शिव्याही घेतों. जर अधिकार पाहिजे तर शिव्याही घेतल्याच पाहिजेत. अधिकाराबरोबर शिव्याही येतातच. तेव्हां तुम्ही आपल्या प्रजाजनांना आपल्या राज्यांत परिषद भरविण्याची परवानगी दिलीच पाहिजे असें जर यांना सांगितलें तर त्यांची नाहीं म्हणण्याची काय छाती आहे ? ब्रिटिश सरकार मोठें व तुम्हीं लहान असा कांहीं भेद नाहीं अधिकाराचे दृष्टीनें उभयतां आपापल्या परीनें सारखे आहां. बादशहांचें राज्य समुद्रवलयांकित आहे. तें तुमच्या दहापट मोठें आहे. असें असून ते आपल्या राज्यांत सभा भरूं देतात. मग तुम्ही तसें कां करूं नये? हे प्राथमिक हक्क (Primary rights) कां दिले जाऊं नयेत हेंच कळत नाहीं. सरकार मुद्दामच त्यांना सांगत नसावें असें दिसतें. एकानें ही भावना जरा ग्राम्य शब्दांत प्रगट केली आहे, ती सांगणें प्राप्त आहे, संस्थानें ही परसू अगर परडीप्रमाणें आहेत. घर म्हटलें म्हणजे घरास परसू अगर परडीही असावयाचीं, परडीमध्यें अगर परसामध्यें फळेंही सर्कीनें तोडतां येतात,

भाजीही खुडून घेतां येते, पैसाही उकळतां येतो. त्या ठिकाणीं अब्रूस धक्का लावण्याचीं कृत्येंही करण्यास हरकत नसते. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे गृहस्थास ज्या गोष्टी सदरेवर करतां येत नाहींत त्या गोष्टी तो परसांत करतो. तेव्हां सरकारला त्यांचें मन त्यांचेवर सक्ती करून दुखवितां येत नाहीं. कारण तीं राखीव जंगलें अगर कुरणें आहेत. तेव्हां ते सडेतोड सल्ला देऊं शकत नाहींत. याचें उदाहरण म्हणजे मांटेग्यू चेल्म्सफोर्ड रिपोर्ट ! त्या रिपोर्टमध्यें हिंदुस्थानच्या दृष्टीनें चर्चा केली आहे पण त्या चर्चेंत संस्थानाचा भाग आल्याशिवाय तो पूर्ण होऊं शकत नाहीं म्हणून त्यांत चर्चेस एक भाग खर्ची घातला आहे. यांतही नोंद झाली नसती तर सर्व काम अपुरें झालें असतें. या भागांत सरकारचें मनोगत काय आहे हें प्रगट झालें आहे. अर्थात् तें नकळत झालें आहे. रिपोर्ट मात्र अगदीं मोहक व गोड भाषेंत लिहिला आहे. तरी आतां वर मीं जें मनोगत नकळत प्रगट केलें म्हणून सांगितलें त्याचें कारण या रिपोर्टांत संस्थानांत सुधारणा होणें जरूर आहे अशाबद्दल जी उपमा दिली गेली आहे ती निराळ्या शब्दांत त्यांना देतां आली असती. त्यांनीं रस्त्याच्या एका बाजूस आग लागली असतांना त्याच्या ठिणग्या दुसऱ्या बाजूवर पडण्याचा संभव आहे अशा अर्थाची वाक्ययोजना केली आहे; यापेक्षां त्यांना निराळ्या रीतीनें सांगतां आलें असतें. उदाहरणार्थ वसंत ऋतूचा समय प्राप्त झाल्यानें झाडांझुडांना नैसर्गिक रीतीनें पालवी फुटली आहे. व वनस्पतींनाही बहार आला आहे वगैरे रम्य शब्दांत त्यांना सांगतां आलें असतें. परंतु अंतरंगांत खालसा प्रजेच्या मागणीबद्दल वैषम्य वाटून ही योजना केली आहे. रस्त्यावरील एका बाजूचे घरास आग लागली आहे त्याची झळ व ज्वाळा दुसऱ्या बाजूस लागेल, असें जें म्हटलें तेव्हां दोन्ही घरांस आग लागली म्हणजे दोन्ही घरें नवीन होतील व रस्ताही नवीन बनवितां येईल. आम्हांस कांहीं विधिनिषेध वाटत नाहीं. असो, सांगण्याचा मुद्दा म्हणजे शेजारच्या प्रदेशांत जी नवीन तत्त्वांची लाट आली आहे त्याकडे लक्ष देऊन आपल्या प्रजाजनांना एकत्र जमण्यास परवानगी दिलीच पाहिजे असें निजामसाहेबांस सांगणें सरकारला प्राप्त आहे व त्यांनीं तें कर्तव्य. केलेंच पाहिजे, असें माझें मत आहे.

आतां तिसरे भागीदार म्हणजे स्वतः संस्थानी प्रजा हें बोलणें जरा वाईट आहे, पण सत्य आहे व भाग आहे. संस्थानी प्रजेनें तरी संस्थानांत अशी काय

चळवळ केली आहे ! कोणत्या राज्यांत त्रासाशिवाय हक्क मिळाले आहेत ? आम्हीं खालसांतील लोकांनीं अनंत हाल व कष्ट सोसलेच कीं नाहीं ? किती तुरुंगांत गेले, किती फांसावर लटकले, कितींना जन्मठेपी झाल्या याचा विचार करा. इतके छळ सोसले म्हणूनच थोडीफार सुधारणा झाली. तशा प्रकारची चळवळ संस्थानी प्रजेनें कां करूं नये? माझें असें म्हणणें नाहीं कीं, आम्हीं जशी चळवळ करीत आहों तशी चळवळ आपण संस्थानांत आजच करावी. आम्हीं ज्या पद्धतीनें आतांपर्यंत चळवळ केली त्या पद्धतीनेंच चळवळ करण्यास हरकत नाहीं. इकडे जो छळ होतो तो कायद्याचे नांवाखालीं होतो व व्यक्तिगत होतो हें ध्यानांत ठेवावें. बॅ. सावरकर ह्यांनीं स्वराज्याकरतां अंदमान पाहिलें कीं नाहीं ? व तेथूनही परत आलेच. संस्थानी प्रजेनें चळवळ सुरू केल्यावर लहान मोठीं संस्थानें असा कांहीं त्यांत भेद नाहीं. प्रजा चळवळ करूं लागेल तर त्यांच्यावरही अनिष्ट प्रसंग येतील अशी खात्री बाळगा. लायख लोक हजारों गडप होतील; पण त्यांस इलाज नाहीं. आम्ही बाहेरचे आपल्यास मदत करूं शकूं आम्ही वर्तमानपत्रद्वारें जीव तोडून अगदीं सुंदर असें तुमचें म्हणणें पुढें मांडूं; पण आमच्या पत्रांना जर एका फटकाऱ्याबरोबर जेथें बंदी होणार तेथें त्याचा उपयोग तुम्हांला नाहीं व आम्हांलाही नाहीं.

**इंद्राय तक्षकाय स्वाहाः** या न्यायानें आमचें नुकसान. स्वतांचे पायावर उभें राहूनच आपल्यास चळवळ सुरू केली पाहिजे. पण ती करतांना कठोरपणा धरूं नका.

## तीन गोष्टी.

पहिल्या प्रथम आपण आपल्या सभेंत राजनिष्ठेचा ठराव जरूर पास करा. व्यक्तीला खुष करून आपला मतलब न सोडतां सनदशीर मार्गानें आपली चळवळ सुरू करा. भोरमध्यें आम्हीं सत्याग्रह केला त्याचेपूर्वी आम्ही अन्यायाचें माप त्यांचे पदरांत घातलें. ( We put them in the wrong ) त्यावेळीं भोरच्या लोकांना कायदा मोडावा असें सांगितलें; त्याबरोबरच लोकांनीं कोणत्या गोष्टी करूं नयेत त्याही सांगितल्या. त्या अशा--(१) आपण कधींही राजाची व्यक्तिशः निंदा करूं नये अगर त्याचे कुळासंबंधानें वाईट बोलूं नये. कारण सार्वजनिक स्वरूपाच्या मागण्या करतांना एका व्यक्तीची निंदा करूं नका. कारण तो एकटाच जबाबदार नाहीं. व्यक्तींचे गुणदोष त्याचेबरोबर तशीच

कुळासंबंधानेंही निंदा उपयोगाची नाहीं. ( २ ) दुसरी गोष्ट जातीजातींत वैरभाव उत्पन्न होईल अशी चळवळ सुरू करूं नये. राजकीय स्वरूपाची मागणी सर्व जातींकरतां करतांना उगीच एका जातीची निंदा करणें गैर आहे. मुद्दा सोडूं नका पण भरमसाट निंदा करूं नका. असें झाल्यानें Public sympathy म्हणून ज्याला म्हणतात ती तुमच्या बाजूस मिळेल. तसेंच वडाराचे बिऱ्हाडाप्रमाणें रानोमाळ आपलें बिऱ्हाड घेऊन भटकत पळूं नका. तेथेंच संस्थानांत भरभक्कम पाय रोंवा. पाया ठेचून ठेचून भरून मजबूत करा. उतावीळ होऊं नका हल्लीं बराच काळ पालटला आहे, बऱ्याच संस्थानहद्दींत सभा होत आहेत. औंध वगैरे संस्थानांचें उदाहरण आपल्यास घेण्यासारखें आहे. आम्ही या चळवळींत पडलों ते हें संस्थान मुसलमान म्हणून पडलों असा एक आक्षेप आहे, पण तो बरोबर नाहीं. तो साफ खोटा आहे. एकंदर हिंदु राजांचीं संस्थानें ५२६ तर मुसलमानी अवघीं ३७ आहेत. व ही प्रजापरिषदेची चळवळ हिंदू व मुसलमान या दोन्ही संस्थानांत चालूं आहे. त्याअर्थी केवळ ३७ मुसलमानी संस्थानांना त्रास देण्याकरतां ५२६ हिंदु संस्थानांना त्रास आम्ही देऊं हें संभवतें तरी कसें ? मी हिंदु महासभेचा अध्यक्ष झाल्यानंतर थोडक्याच दिवसांत या परिषदेचा अध्यक्ष झालों, हा केवळ काकतालीय न्याय होय. बरें, ही कारवाई असें म्हणाल तर मुसलमानी संस्थानांत प्रजाजन सुखी आहेत असें जर कोणी दाखविलें तर एक वेळ हा आरोप मान्य करूं; पण तशी गोष्ट नाहीं ! निजामचें संस्थान सर्वांत मोठें. आकाशांत बघतांना चंद्र सूर्याकडे बघावयाचें नाहीं तर कां लिकलिकणाऱ्या चांदण्यांकडे बघावयाचें ? संस्थानचें क्षेत्रफळ मोठें, उत्पन्न मोठें, लोकसंख्या १। कोटी, मुंबई इलाख्याइतकें जवळ जवळ मोठें संस्थान आहे. १५।२० जिल्हे एकदम गडप होतील तेव्हां अशा संस्थानाकडे पहावयाचें नाहीं तर कसें चालावें ? म्हणूनच या संस्थानाकडे दृष्टी वळविली आहे. संस्थान मोठें आहे म्हणूनच आम्ही हें संस्थान प्रजेच्या हिताकडे व संतोषाकडे लक्ष पुरवील तर तें इतर संस्थानांस आदर्शभूत होईल असें म्हणतों. आपली चळवळ हल्लींप्रमाणेंच सुरू करा व गेलीं दोनचार वर्षें जी चळवळ रा. **राघवेंद्रराव** यांनीं धैर्यानें व नेटानें चालविली आहे त्याबद्दल त्यांचे आभार माना व त्यांना मनःपूर्वक सहाय्य करा. त्यांनीं फार स्वार्थत्याग करून ही चळवळ चालविली आहे, त्याबद्दल मी त्यांचें अभिनंदन करतों. आपण तर करालच. याचें श्रेय त्यांचेकडे. एका गृहस्थानें त्यांना असें

आश्वासन दिलें आहे कीं जसे ते तेथून निघाले तसेच ते परत येण्याची खटपट होईल व त्यांच्या कामांत यश येऊन छातीवर जयचिन्ह लावून ते परत हैद्राबाद संस्थानांत जातील अशी मला खात्री आहे. तेव्हां हैद्राबाद संस्थानच्या प्रजाजनांनीं समुत्थान केलें पाहिजे. पक्षी आणि जाळें यांची गोष्ट प्रसिद्ध आहेच. प्रजेनें पाठपुरावा केल्यास ही गोष्ट साध्य होईल.

हैद्राबाद संस्थानांतील सुखःदुखाची कहाणी मला प्रत्यक्ष माहीत नाहीं, पण माहीत झाली आहे; व तेथील कारभाराची प्रत्यक्ष माहिती ज्यांना आहे त्यांचीं भाषणें आज दुपारीं होतील त्यावरून मला कल्पना येईल व नंतर या संस्थानासंबंधानें काय सांगावयाचें तें सांगेन. मी आतां तात्विक दृष्ट्या याबद्दल ऊहापोह करणार आहें. खालसा इलाख्यांत लोकशाही स्थापन करण्याची चळवळ सुरू केली आहे त्याप्रमाणें संस्थानी मुलखांतही चळवळ असावी म्हणून उपक्रम केला आहे. कांहीं कृत्रिम फरक सोडले तर त्यांचीं व खालसांतील लोकांचीं सुखदुःखें व ध्येय सारखेंच आहे. भारतवर्ष एकच आहे. देशी संस्थानांचा मुलूख व खालसातींतील मुलूख या मर्यादा कृत्रिम आहेत. आम्हीं ही चळवळ सुरू केली आहे त्यांतील खरें इंगित हें आहे कीं, हीं संस्थानें पुढेंमागें आदर्शभूत झालीं तर आपण इंग्रज सरकारला उदाहरण घालून दिल्यासारखें होईल व त्यांना लाजविल्यासारखें होईल. तेव्हां याचीच वाट पहात बसलों आहों. संस्थानिकांचा दुस्वास म्हणून ही चळवळ नाहीं हें पक्कें लक्षांत ठेवावें. आपल्या स्वागताध्यक्षांनीं संस्थानी कारभाराची स्थिति आतांच कशी असते त्याचें वर्णन केलें आहे, त्याला उत्तर म्हणून एकादा उत्तम संस्थानिक मिळेल ही आशा आहे. आतां तिसऱ्या गोष्टिसंबधानें विचार करूं. ( ३ ) तो म्हटला म्हणजे संस्थानें खालसा करण्याची भाषा बोलूं नका. या आतां ज्या तीन गोष्टी सांगितल्या त्या वगळून मग वाटेल तें करा. हल्लीं असा एक पक्ष निघाला आहे कीं तो देशी संस्थानें बुडवावीं असें म्हणतो; पण तें मत मला मान्य नाहीं. संस्थानें टिकलीं पाहिजेत असें मला अनेक कारणांनीं वाटतें. एकतर हीं संस्थानें आपल्या पूर्वजांच्या पराक्रमाच्या खुणा आहेत. त्या खुणा शिल्लक ठेवल्या पाहिजेत. मूळ संपादकानें—मग तें राज्य कशांही प्रकारें मिळो—पराक्रमानें हीं संस्थानें मिळविलीं आहेत. त्यांच्या या जिवंत खुणा आहेत. इंग्रज सरकारनें तरी काय केलें ? कसें राज्य मिळविलें ? ते आहेतच ना ! मग हीं संस्थानें बुडवावींत काय

म्हणून ! पुराण वस्तुसंशोधन खात्यामार्फत जुनीं थडगीं उकरून राष्ट्राचा मागचा इतिहास शोधतात आणि ही हक्काची राजवटी मोडून तिचें नंतर संशोधन करावें हें कोणी सांगितलें आहे ? होळकर व शिंदे यांनीं राज्य कसें मिळविलें हें समजलें म्हणजे **पुरुषस्य भाग्यं** कसें असतें याची कल्पना येईल. तशीच स्वराज्याचीं हा जुनीं चिन्हें आहेत तीं स्मृतिशेष तरी कां करावीं ? दुसरें एक कारण आपण ब्रिटिश हिंदुस्थानांत नोकरीमध्यें हिंदी लोकांचें प्रमाण फार असावें, त्यांत Indianisation व्हावें असें म्हणतों तें संस्थानांत आयतेंच पहावयास मिळतें. मुसलमानांना जास्त नोकऱ्या तुमच्या संस्थानांत मिळाल्या तरी मुसलमान हे हिंदवासी आहेतच, तेव्हां हा फायदा तरी कां घालवावा ? आणि तिसरें कारण कम्युनलिस्टिक धोरण नको. नैसर्गिक विषमता नाहींशी होणार नाहीं. आपल्या हिंदु संस्कृतीवरून पाहिलें असतां राजा म्हणजे हा एक भ्रष्टयोगीच जन्मास येतो आपला पराक्रम एक भाग व नशीब दुसरा भाग संस्थानिकाच्या घराण्यांत आला म्हणून राजपद मिळावें हें साहाजिक आहे, कारण अशा वरून तीं रहावींत असें वाटतें. त्याचेपेक्षां माझ्या मतें आणखी एक बलवत्तर कारण आहे. इटली व आस्ट्रिया यांच्या लढ्यांत पिडमाँटसारख्या संस्थानानें केवढी कामगिरी केली हें प्रसिद्धच आहे.काळाच्या पोटांत काय आहे हें कोणीं सांगावें? पुढेंमागें हींच संस्थानें आमच्या उपयोगी पडणार नाहींत कशावरून ? काळाच्या पोटांत जसें स्वातंत्र्य नाहींसें झालें तसें याच्या पोटांतून स्वातंत्र्य येईल. पुण्यास मात्र तसें झालें. **काळाच्या** पोटांतूनच **स्वातंत्र्य** बाहेर पडलें. तेव्हां हीं संस्थानें जगविलीं पाहिजेत अशा मताचा मी आहें. पण संस्थानिकांनीं प्रजेला सुराज्याचे तरी कमीतकमी अधिकार व हक्क दिले पाहिजेत. पण हल्लींची संस्थानांतील परिस्थिति पाहिली कीं विषाद वाटतो. वास्तविक पहातां या संस्थानिकांना कितीतरी अधिकार आहेत. दिवाणी, फौजदारी सर्व अधिकार आहेत. यावर ब्रिटिश सरकारकडे अपील नाहीं. हे सर्व अधिकार चालवून देसीलप्रजेला सुख देण्याचें त्यांनीं मनांत आणलें तर त्यांना देतां येईल व प्रजा संतुष्ट राखतां येईल. संस्थानिक १०।२० तोफांच्या सलामींचा अभिलाष धरतात, त्यापेक्षां थोडक्यांत संतुष्ट होणाऱ्या प्रजेची सलामी घेण्याची हाव अगर महत्त्वाकांक्षा कां बाळगीत नाहींत हेंच कळत नाहीं. पण एवढी साधी गोष्ट त्यांचे हातून होत नाहीं, यांस काय म्हणावें हेंच कळत नाहीं. त्यांचें कल्याण व्हावें म्हणूनच त्यांचेवर आम्ही कठोर टीका करतों. ही टीका

अंतःकरणांत प्रेम आहे म्हणूनच होत असते. योगभ्रष्ट जन्माला येतो तो राजाचे पोटीं येतो असें सांगितलें. पण हल्लींचे संस्थानिक योगी तर नाहींतच पण भ्रष्ट मात्र आहेत व प्रजाहितीविन्मुख आहेत म्हणूनच टीका करण्याचा प्रसंग येतो. संस्थानांत नैसर्गिक मानवी हक्कांची वाढ व जोपासना झाली, लोकशाहीची स्थापना झाली तर त्याबद्दल उलट अभिमानच वाटेल व त्याबद्दल आम्ही गौरवच करूं; पण तशी स्थिति अजून येत नाहीं. उलट संस्थानिक निराळीच कारवाई करीत आहेत.

## संस्थानिकांची चळवळ.

संस्थानिक करतील ते कायदे व बोलतील तो न्याय हें पटवून घेऊन संस्थानी प्रजाजन राहण्यास तयार आहेत. जरी एकाद्या संस्थानिकानें फेंफऱ्याच्या लहरींत कायदा अगर फर्मान काढलें तरी पुरवलें अगर प्लँचेट चालवितांना कागदावर कांहीं रेघोट्या दिसल्या तरी कायदा असें सुद्धां एक वेळ मानून राहूं; किंवा क्रिया पुढें व कायदे मागून प्रसिद्ध करूं असें म्हटलें तरी कबूल ! अंगावर केस, नखें वगैरे जशीं निर्माण होतात, तसे जरी कायदे निर्माण झाले तरी चालतील. पण कांहींतरी एकदां नक्की करून प्रजाजनांचे हिताकडे बघा. त्यांचेवर जुलूम अतिशय होऊं लागल्यामुळें त्यांनीं याबद्दल सरकारकडे तक्रार केली आणि कपिलाषष्ठीच्या पर्वणीप्रमाणें ब्रिटिश सरकारनें हात घातला तर हे केवढी चळवळ करतात व तीही प्रजेच्या पैशावरच करतात व प्रजेवरील आपल्या जुलमाचें अधिराज्य वाढविण्याकरतांच त्यांनीं हल्लीं जी बटलर कमिटी म्हणून नेमलीं गेली आहे तिच्यापुढें २० लक्ष रुपये देऊन आपलें म्हणणें मांडण्याची चळवळ केली आहे. तो पैसा ते आपल्या खासगींतून मुळींच खर्च करीत नाहींत. याला उपमा द्यावयाची म्हणजे चोरांनीं व दरवडेखोरांनीं एक सभा भरवून एक ठराव पास केला कीं, रेल्वे अधिकाऱ्यांनीं बोगद्यांत व आगगाडींत दिवे लावूं नयेत किंवा वाघ व दुसऱ्या हिंस्र पशूंनीं आपली सभा भरवून शेतकरी, गुराखी व मेंढपाळ आपापलीं जनावरें बाहेर न सोडतां त्यावर कुत्रे राखणीस ठेऊन कोंडून ठेवतात त्याबद्दल त्यांनीं जोरानें निषेधाचा ठराव पास केल्याप्रमाणेंच आहे. किंवा दुसरी एक उपमा द्यावयाची म्हणजे एकाद्या इसमास ठार मारण्याचें ठरविण्यांत आलें. तेव्हां त्याबद्दल बिलकूल खर्च होतां कामा नये. तेव्हां त्याच मनुष्याचे हातून एक खड्डा खणवावयाचा व त्यास कांठावर उभें

करून नंतर गोळी झाडावयाची व गोळी लागली म्हणजे तो त्यांत आपोआपच पडणार, हें साहजिक आहे. त्याप्रमाणें ही त्यांची चळवळ पाहिली असतां वरीलप्रमाणें उद्गार आपोआपच सुचतात. तेव्हां ही त्यांची चळवळ म्हणजे वंशपरंपरेनें जुलूम करण्याची हांव आपण दाबांत राखिली पाहिजे. त्याकरतां आपल्यास राजे लोकांचे इतकें पैशाचें पाठबळ नसेल, पण थोडाबहुत पैसा जमवून आपल्या नैसर्गिक मागण्यांची चळवळ नेटानें चालविली पाहिजे. आपल्या मागण्या खरोखरच अगदीं साध्या या देऊन स्वराज्याची स्थापना करण्याचें आपल्या संस्थानिकांचे मनांत आलें तर त्यांना ते सहज करतां येईल. पण तसें ते करीत नाहींत म्हणून ही आमची चळवळ आहे. संस्थानांत स्वागताध्यक्षांनीं सांगितल्याप्रमाणें अब्रू, जीवित व संपत्ति सुरक्षित राहिल्यास हीच चळवळ करण्याचें कांहीं कारण नाहीं, पण हीं तेथें सुरक्षित राखिलीं जात नाहींत म्हणून आपल्यास झगडा करावा लागत आहे. सबबआपण एकदिलानें व सहकार्यानें संकटांस तोंड देऊन ही चळवळ चालवा. परमेश्वर आपल्यास यश देईल. चळवळ करतांना राजाला खूष ठेवण्यासविसरूं नका व आपला मुद्दाही सोडूं नका. असो; आपल्या संस्थानांत काय काय चालतें याची कल्पना मला नाहीं. माहितगार माणसें ठरावाची चर्चा होत असतांना सत्कृत्यांचा अगर दुष्कृत्यांचा पाढा वाचतील त्यावरून मग मला काय वाटतें तें बोलेन. आणखी एका गोष्टीचा उल्लेख करून मी आपलें भाषण संपवितों. १९१७ सालीं बादशहांचे तोंडून **स्वराज्य** हा शब्द वदविला गेला, पण आमच्या संस्थानिकांचीं तोंडें संस्कृत असून हा शब्द त्यांना वदण्यास कां जड जावें असें मी त्यांना विचारतों. प्रजेच्या न्याय्य मागणीकडे लक्ष द्या व काळाचीं बदललेली परिस्थिती नजरेपुढें आणा, मग काय तें करा, असें मी त्यांना सुचवितों. बदललेल्या परिस्थितीस अनुकूल असें कांहीं केल्यास आपलें व आपल्या प्रजाजनांचें हित आहे, नाहीं तर परिणाम जाचक होईल, एवढें लक्षांत ठेवावें. व तें ठेवतील अशी आशा आहे. राजा स्वयंभू आहे, त्याचेपुढें काय वाटेल तें मागा. तो रयतेची मागणी पुरी करण्यास स्वतः समर्थ आहे. त्याला दुसऱ्याचे तोंडाकडे पाहण्याची गरज नाहीं. तेव्हां धैर्यानें तुमचें कार्य करण्यास परमेश्वर तुम्हांस बुद्धि व बल देवो एवढेंच मी चिंततों."

याप्रमाणें अध्यक्षांचें सुविचारपरिप्लुत व थोडेंसें विनोदी असें भाषण झाल्यानंतर विषयनियामक कमिटीची बैठक होणार नसल्यानें सर्वांनीं पांच वाजतां येथें ठरावाची चर्चा करण्यास जमावें असें सांगून आतां ही बैठक खलास झाली असें अध्यक्षांनीं सांगितलें व सकाळचें परिषदेचें काम आटोपलें.

## समारोपाचें भाषण.

" लोकांच्या मागण्या न्याय्य आहेत. त्या मागण्या करतां लोकांनीं नेटानें प्रयत्न करणें जरूर आहे व ही चळवळ करून प्रजेमध्यें आज दोन तीन वर्षें जागृति करण्याचें काम रा. रा. **राघवेंद्रराव शर्मा** यांनीं केलें आहे तेव्हां त्यांचे मनःपूर्वक आभार मानणें आपलें कर्तव्य आहे, व मी स्वतः त्यांचे आभार मानतों. परमेश्वर आपल्या अधिकृत कार्यांत यश देवो. आम्ही खालसातींतील प्रजाजन योग्य ती मदत करूं व आपलें कार्य नेटास लागो असें चिंतून मी आपली रजा घेतों."

समारोपाचें भाषण झाल्यावर अध्यक्षांचे, तसेच इतर मंडळीचे व कॉंग्रेस कमिटीनें हा मंडप दिल्याबद्दल त्यांचे, आभार मानणें जरूर आहे व तसे मी सर्वांचे आभार मानतों असें रा. रा. राघवेंद्रराव शर्मा यांनीं सांगितलें. जमलेल्या हैद्राबादी प्रजाजनांचे आभार मानल्यावर श्रीयुत रंगराव देशपांडे बी. ए. यांच्या मधुर गायनानंतर परिषदेचें काम खलास झालें.

# पुण्याच्या अधिवेशनांत पास झालेले ठराव.

## शनिवार ता. ५ मे १९२८.

शनिवार ता. ५ मे १९२८ रोजीं टिळक-स्मारक-मंदिर, पुणें येथें श्रीयुत नरसिंह चिंतामण केळकर, एम. एल. ए., यांच्या अध्यक्षतेखालीं हैद्राबाद राजकीय परिषदेचें तृतीय अधिवेशन होऊन या अधिवेशनांत पुढील ठराव एकमतानें मंजूर झाले:—

## पास झालेले ठराव.

( १ ) एकाद्या संस्थानांत बऱ्याच दिवसांपासून अव्यवस्था नांदत असल्यामुळें जेव्हां सांवळागोंधळ होतो त्यावेळीं त्या संस्थानच्या अंतर्गत राज्यकारभारांत हात घालण्यास साम्राज्य सरकारास अधिकार आहे; व या अधिकारान्वयें निजामसाहेबांच्या राज्यकारभारासंबंधीं जे आरोप सार्वजनिक रीतीनें केले गेले होते त्याबद्दल सर्व बाजूंनीं चौकशी करण्यांत यावी अशा अर्थाचा एक ठराव ( ठराव पहिला ) या परिषदेच्या दुसऱ्या अधिवेशनांत पास झाला आहे त्यास पुन्हां ही परिषद मान्यता देते.

( २ ) निजामसाहेबांस ता. २६ माहे मार्च १९२६ मध्यें जो खलिना नेक नामदार लॉर्ड रेडिंग यांनीं पाठविला त्यांत जें तत्त्व ग्रथित केलें आहे त्या तत्त्वाविरुद्ध निजाम साहेबांनीं बटलर कमिटीकडे संस्थानांतर्फें मागणें केलें आहे असें समजतें. आपण स्वतंत्र आहों, साम्राज्यसरकारशीं आमचें नातें समान दर्जाचें आहे अशा प्रकारचें हें मागणें आहे, याकडे हैद्राबादी जनतेचें व ब्रिटिश सरकारचें लक्ष जाणें जरूर आहे असें ही परिषद सुचवीत आहे.

( ३ ) या परिषदेचा असा स्पष्ट अभिप्राय आहे कीं, जोंपर्यंत हिंदी संस्थानांतून लोकमतास अनुसरून राज्यव्यवस्था चालत नाहीं तोंपर्यंत सार्वभौम सरकारची संस्थानांवरील सत्ता अबाधित राहिली पाहिजे व ही सत्ता संस्थानांतील प्रजेच्या हिताच्या दृष्टीनें सक्तीनें अमलांत आली पाहिजे. सार्वभौम सरकारच्या त्या दरम्यानच्या काळांत आपल्या सत्तेचा उपयोग न्यायास अनुसरून व्हावा एतदर्थ या परिषदेचें असें म्हणणें आहे कीं, ज्या ज्या वेळीं कोणत्याही संस्थानांतील राज्यव्यवस्था बिघडल्याबद्दल सरकार तक्रार करील त्या त्या वेळीं त्रयस्थ अधिकाऱ्यांमार्फत करून चौकशी व्हावी व अशा चौकशीला जरूर असणारी सर्व माहिती सरकारनें संस्थानिकांना व प्रजेला पुरवावी. चौकशी केल्यानंतर राज्याची व्यवस्था नीट नाहीं असा निर्णय होईल तेव्हांच सरकारनें अंतर्गत राज्यकारभारांत हात घालणें योग्य होईल.

( ४ ) ब्रिटिश सरकार व संस्थानें या दोहोंस लागू असणाऱ्या गोष्टींबद्दल उभयतांच्या दृष्टीनें जी भावी राज्यव्यवस्था सुचविली जाईल अगर स्थापन केली जाईल त्या राजयंत्रांत संस्थानातर्फे संस्थानिकांना जें स्थान देण्यांत येईल त्या व्यतिरिक्त संस्थानी प्रजाजनांना एक विशिष्ट स्थान असावें व तें त्याप्रमाणें दिलें जावें या तत्त्वाचा ही परिषद् पुरस्कार करते.

( ५ ) संस्थानांत स्वतंत्र न्यायाधिशाकडून न्याय निवडण्याची पद्धति अंमलांत यावी व संस्थानिकांनीं आपला खाजगी खर्च ( Civil List ) कायमचा तोडून घ्यावा अशा अर्थाचा जो ठराव नरेंद्र मंडळांत पास झाला आहे त्याचा अंमल हैद्राबाद संस्थानांत व्हावा असें या परिषदेचें मत आहे. एकदां खासगीकडे नक्त नेमणूक ठरल्यावर बाकीचें उत्पन्न प्रजाजनांचे हिताकरतां खर्चलें जावें व त्याबरोबरच निजामसाहेबांच्या सर्फ-ई-खासकडील येणारें उत्पन्नही सामील करावें असें या परिषदेचें मागणें आहे. कारण सर्फ-ई खासचें उत्पन्न आपल्या खासगी उत्पन्नांत जमा करून घेण्याचा निजामसाहेबांस अधिकार नाहीं असें प्रजाजनांचें म्हणणें आहे.

( ६ ) निजामसाहेबांचा राज्यकारभार कसा काय चालला आहे व त्यासंबंधीं खरें लोकमत काय आहे हें प्रथम अजमावण्याकरतां संस्थानमजकुरीं निरनिराळ्या खात्यांमार्फत जे रिपोर्ट, बजेटाचे मसुदे अगर अहवाल व इतर प्रसिद्ध

होणारे कागदपत्र किंमत घेऊन विकत मिळावेत अशी या परिषदेची मागणी आहे.

( ७ ) संस्थानमजकुरीं नागरिकांच्या नैसर्गिक हक्कांवर गदा आणणारे निर्बंध म्हणजे भाषणस्वातंत्र्य, मुद्रणस्वातंत्र्य, व्यक्तिस्वातंत्र्य व सभास्वातंत्र्य यांचेवर जें नियंत्रण आहे तें ताबडतोब उठवून लावलें पाहिजे असें या परिषदेचें स्पष्ट मत आहे.

( ८ ) (अ) संस्थानच्या राज्यकारभारांत स्थानिक स्वराज्यास खरेंखुरें स्थान मिळण्याकरतां त्याचा उपक्रम जास्त प्रमाणावरस स्थानमजकुरीं करावा. तो करतांना पुढील २ गोष्टींकडे लक्ष्य जावें असें या परिषदेचें मत आहे.

( १ ) बिन अधिकारी लोकांनीं आपलें स्पष्ट मत जाहीर करतांना त्यांचेवर कोठल्याही प्रकारचे अनिष्ट निर्बंध नसावेत.

( २ ) निजामसाहेबांच्या अनुमतीनें बिनाधिकारी वर्गाचा अशा स्थानिक स्वराज्याच्या संस्थांवर ताबा अगर हुकमत असावी.

( ब ) लोकल फंड खात्यामध्यें सरकार सध्यां सभासदांची नेमणूक करीत असतें त्यांत हिंदुमुसलमान सभासद समसमान असावेत अशी व्यवस्था निजाम सरकारनें अमलांत आणावी.

( ९ ) संस्थानमजकुरीं हिंदूंचें प्रमाण शेंकडा ८५ जरी आहे तरी त्यांना योग्य प्रमाणांत संस्थानजमकुरीं लहानमोठ्या जागा दिल्या जात नाहींत या अन्यायाचा ही परिषद जोरानें निषेध करते, तसेंच शिक्षणाच्या बाबीसंबंधानेंही साध्या गोष्टींची सवलत न देतां शिक्षणाचें माध्यम उर्दू ठरवून जी शिक्षणाची हेळसांड केली जाते त्याबद्दल ही परिषद स्पष्ट शब्दांत जाहीर निषेध करते.

( १० ) (अ) संस्थानांत प्राथमिक शिक्षण सक्तीचें व मोफत करावें व ज्या जिल्ह्याची जी बहुजनसमाजाची भाषा असेल त्याच भाषेंतून हें शिक्षण मिळावें अशी या परिषदेची मागणी आहे. अल्पसंख्याकांचीं मुलें योग्य प्रमाणांत पुढें शाळेंत जमल्यास त्यांच्या मातृभाषेंत त्यांनाही शिक्षण मिळावें अशीही या परिषदेची मागणी आहे.

( ब ) खासगी शिक्षणसंस्थांचा कायदा या संज्ञेनें सरकारी शिक्षणखात्याकडून जो कायदा अंमलांत आणला जात आहे त्यायोगें देशाची शैक्षणिक

अवनति होण्यासारखी असल्यामुळें तो कायदा तावडतोब रद्द करण्यांत यावा अशी या परिषदेची निजाम सरकारास विनंति आहे. तसेंच शिक्षणखात्यानें मातृभाषेची म्हणजे तेलगू, मराठी व कानडी या भाषांच्या शिक्षणाची सोय स्वतंत्र शाळा उघडून व त्यांत मातृभाषेचेच शिक्षक नेमून करण्यांत यावी असेंहि या परिषदेचें मत आहे.

( ११ ) संस्थानांत सर्व जातींना योग्य प्रमाणांत उच्चशिक्षणाच्या बाबतींत सवलती देण्यांत याव्या व जातीगोतींचा विचार न करतां योग्य प्रमाणांत व जाहीर चढाओढी ठेवून त्यांना नोकऱ्याही मिळाव्यात व तसें करतांना अल्पसंख्याक जातीचे हक्क व अधिकार राखले जावेत अशी या परिषदेची मागणी आहे.

( १२ ) कांग्रेसच्या कामकाजाकरितां हैद्राबाद संस्थानचा एक निराळा प्रांत म्हणून समजला जावा अशी या परिषदेची इंडियन नॅशनल कांग्रेसला विनंति आहे. कारण हैद्राबाद संस्थानांतील प्रजाजनांच्या सार्वजनिक कळकळीच्या मानानें, लोकसंख्येच्या मानानें व क्षेत्रफळाच्या मानानें तसें होणें अगत्याचें आहे असें या परिषदेचें मत आहे.

( १३ ) शत्रुंजय टेकडीसंबधानें पालिठणा दरबार व जैन समाज यांचेमध्यें जो लढा पडला आहे त्याबद्दल हैद्राबाद संस्थानांतील जैन समाजाची सहानुभूति आहे. व जैन समाजानें जो सत्याग्रह केला आहे त्याबद्दल ही परिषद त्यांचें अभिनंदन करीत आहे.

(१४) निजाम सरकारनें धर्मखातें नेमून मुसलमानाच्या हितसंबंधांत जें धोरण ठेवलें आहे त्याप्रमाणें हिंदूंच्या हितसंबंधाकरितां स्वतंत्र धर्माधिकारी नेमून हिंदूंच्या धार्मिक संस्थांची व्यवस्था करावी.

(१५) कमींत कमी २००० लोकवस्तीच्या संस्थानांतील गांवांत म्युनिसिपालिटी स्थापन करण्याची शक्य तितकी लवकर व्यवस्था करावी अशी या परिषदेची निजाम सरकारास विनंति आहे.

( १६ ) निजामसाहेबांकडे व हिंदुस्थानसरकारकडे आपल्या तक्रारींची दाद मागावी व राजकीय आकांक्षाची परिपूर्तता होण्यासाठीं म्हणून लोकमत



ता. १२ जुलै इ. स. १९२८ रोजीं हैद्राबाद पोलिटिकल असोसिएशनकडून
दे. भ. **लाला लजपतराय** यांच्या सन्मानार्थ ' एट होम, दिला गेला.

जागृत करावें यासाठीं **हैद्राबाद राजकीय संस्था** नांवाची एक कायमची संस्था स्थापावी असें या परिषदेचें मत आहे.

निजामसाहेबांच्या आधिपत्याखालीं संस्थानमजकुरीं जबाबदार राज्यपद्धतीची स्थापना व्हावी हें या संस्थेचें अंतिम ध्येय होय. आणि हें ध्येय साध्य करण्यासाठीं शक्य त्या योग्य सनदशीर व शांततेच्या मार्गाचा अवलंब केला जाईल असें ही संस्था जाहीर करीत आहे. त्यासंबंधीं जे नियम वगैरे ही संस्था तयार करील ते या परिषदेच्या कमिटीपुढें पसंतीकरतां मांडण्यांत येतील.

पुढील कॉन्फरन्ससाठीं व एक वर्षभर काम करण्यासाठीं नियम वगैरे करण्याचा अधिकार पुढें सुचविण्यांत आलेल्या प्रोव्हिजनल एक्झिक्युटिव्ह कमिटीकडे ही परिषद या ठरावान्वयें देत आहे.

## एक्झिक्यूटिव्ह कमिटी.

श्री. न. चिं. केळकर. — अध्यक्ष.

उपाध्यक्ष:
( १ ) या. मा. काळे.
( २ ) डी. ए. तुळजापूरकर.
( ३ ) श्री. शंकर सायण्णा परशा.
( ४ ) ल. ब. भोपटकर

सभासद:
( १ ) ग. र. अभ्यंकर.
( २ ) अ. वि. पटवर्धन.
( ३ ) दा. वि. गोखले.
( ४ ) श्री. ग. वझे.
( ५ ) एस. एल. सिलम.
( ६ ) एस. बी. आवार.
( ७ ) ना. रा. गुंजाळ.

सेक्रेटरी:
( १ ) मि. राघवेंद्रराव शर्मा.
( २ ) डॉ. एस. एल. चिंचणकर.

# संस्थानांत परिषद् भरविण्यास मनाई.

—:०:—

## हैद्राबाद् राजकीय परिषदेच्या अर्जास उत्तर.

—:०:—

H. E. H. निझाम सरकारचे सेक्रेटरी, ज्युडिशिअल मिसलेनियस डिपार्टमेंट यांजकडून

—निशान. ५१ ता. २१ बहिमन सन १३३४ फसली

नवाब सदर आझम साहेब बहादुर बाँबे हुकूमत प्रेसिडेंट एक्झिक्युटिव्ह कौन्सिल हैद्राबाद् यांच्या आज्ञेवरून,

सेक्रेटरी हैद्राबाद् रिफार्म असोसिएशन व हैद्राबाद् स्टेट पोलिटिकल कॉन्फरन्स हैद्राबाद् यांस

आपल्याकडून आलेल्या मुरासिला नं. १२१ ता. ८ आबान १३३३ फसलीच्या उत्तरांत कळविण्यांत येतें कीं, आपल्याकडून हैद्राबाद् येथें राजकीय परिषद् ( संस्थान प्रजापरिषद् ) भरविणेबद्दलची जी परवानगी मागण्यांत आली होती तें प्रकरण, एक्झिक्युटिव्ह कौन्सिलच्या बैठकींत सादर करण्यांत आलें होतें; परंतु राजकीय परिषद् भरविणेसंबंधींचा परवानगीचा अर्ज ह्या कारणाकरितां नामंजूर करण्यांत आला आहे कीं, परिषदेचें ध्येय व उद्देश निवळ ( नैतिक, शिक्षणविषयक व संस्कृतीसंबंधींचे नाहींत. ) राजकीय आहेत करितां परिषद् भरविण्याची परवानगीहि देतां येत नाहीं.

सेक्रेटरी.

**ज्युडीशिअल डिपार्टमेंट.**

———

# हैद्राबाद संस्थानांतील संस्थानिकांची यादी

| नांव | तालुके | खेडीं | क्षेत्रफळ | उत्पन्न | पेषकष | लोक सं. |
|---|---|---|---|---|---|---|
| पायगा सर खुरशीजाद् | ८ | ३७९ | ० | १२७९९८९ | ० | २४७०६० |
| पायगा सर आसमांजाह | ९ | ३७० | १०५४ | १२५८१९८ | ,, | २४०७७४ |
| पायगा सर पिकारुलउमरा | ६ | ३९१ | ११९८ | १३००६३१ | ,, | १९६६४१ |
| नवाब सालारजंग | ७ | ३२५ | ० | ७६१९७१ | ,, | २१४८३६ |
| महाराजा सरकृष्ण प्रसाद् | ८ | १९५ | १८०० | ४६६१६० | ,, | ११०७०४ |
| राजाशिवराज धर्मवंत | ६ | २२२ | ० | ७१३६२७ | ,, | ० |
| नवाब फखरुल मुल्क | ५ | ११५ | २६९ | ४२९५२३ | ,, | ५९४१२ |
| नवाबखान खाना | ५ | ९२ | ० | ३३४९२७ | ,, | ७०८५७ |
| नवाब शाहयार जंग | १ | ७६ | २०८ | ३०४५३३ | ,, | ३५२३८ |
| राजा रायरामान | ७ | १२० | २४९२ | २४७३४२ | ,, | ४४७१२ |
| राजाराव रंभा | १ | ४४ | १६० | ७२४३० | ,, | १९६९१ |
| नवाब शहाबजंग | २ | ११ | ११० | २९१९१ | ,, | ३४४१ |
| संस्थान वनपर्ती | २ | १८९ | ४५३ | ५३४११९ | ७७३४५ | ७५१२६ |
| सं. अमराचिंता | ० | ६९ | १९० | ३०३३०१ | ६६३६३ | ४३७७३ |
| सं. गद्वाल | ० | १२०/९४ मजरे | ८५० | ३७९२४७ | ८६५४० | १०९८०४ |
| सं. जटपोल | १ | ८६/२६ मजरे | ६५९ | १४५२२५ | ७०००० | ३८३०१ |
| सं. पालोंचा | ४ पट्या | ७१ | ८०० | ९३३९८ | ४५८७५ | ३८७४२ |
| सं. दोमकुंडा | २ पट्या | १६/२३ मजरे | ० | ७७६३० | २८१४८ | १६८७३ |
| सं. गोपाळ पेठ | १ | २५/११ मजरे | १६९ | ७३४७८ | १७८३५ | १७३११ |
| सं. गुरगुंटा | १ | ४३ | २०० | ७१७८९ | ८०७५ | १९९३७ |
| सं. पापण्णा पेठ | ५ | ७ | ० | ५३०७५ | १२३५७ | ९५४० |
| सं. शरणापल्ली | ० | २२ | ० | ४१००५ | १३५०१ | ११३९६ |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | | | मजन्यांसह | | | |
| सं. नारायणपूर | १ | ८ | २१०७३ | २९७२१ | १५० | ० |
| | | | एकर | | पन मक्ता | |
| सं. राजापेठ | ० | ९ | ० | २८५८२ | ६९८ | ० |
| | | | | | हक्क मालकाना | |
| सं. दुब्बाक | ० | ४ | २५९० | २६६३९ | ७४० | २५०४ |
| | | | बिघे | | | |
| सं. आनागुंदी. | ० | २१ | ० | २५१०५ | ५००० | ३२६८ |

---

# कांहीं महत्त्वाचे आंकडे

## हैद्राबाद संस्थानच्या मुलकी खात्यांतील नोकरांची संख्या

| वार्षिक वेतन | हिंदू | मुसलमान | इतर | एकूण |
|---|---|---|---|---|
| ३०० | २७३९ | ५६५१ | २८४ | ८६७४ |
| ६०० | ८५५ | २२७१ | २१३ | ३३३९ |
| ७०० | ५५३ | १५५३ | १७९ | २२८५ |
| १२०० | ३३६ | १०७९ | १४९ | १५६४ |
| १५०० | २५५ | ९३१ | १३४ | १३२० |
| १८०० | १७० | ७२७ | १०८ | १००५ |
| २४०० | १२६ | ५५५ | ८९ | ७७० |
| ३००० | ९९ | ४४५ | ८० | ६२४ |
| ३६०० | ६६ | ३०८ | ५८ | ४३२ |
| ४२०० | ६० | २६४ | ५० | ३७४ |
| ५००० | ५१ | २०५ | ३९ | २९५ |

## *खालसांतील सरकारी नोकरांची संख्या (मुलकी खातें)

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ३०० ते ६०० | १६३९ | ३१०५ | ७० | ४८१४ |
| ३०० ते ७०० | २६५ | ६६१ | ३१ | ९४८ |
| ९०० ते १२०० | १९५ | ४२९ | ३० | ६५४ |
| १२०० ते १५०० | ७४ | १३८ | १५ | २२७ |
| १५०० ने १८०० | ७० | १७० | २५ | २६५ |
| १८०० ते २४०० | ३८ | १५८ | १८ | २१४ |
| २४०० ते ३००० | २६ | १०१ | ९ | १३६ |
| ३००० ते ३६०० | ३२ | १२४ | २२ | १७८ |
| ३६०० ते ४२०० | ६ | ४४ | ८ | ५८ |
| ४२०० ते ५००० | ९ | ४७ | ११ | ६७ |
| ५००० वरील | ४८ | १९७ | ३८ | २८३ |
| एकूण | २३९३ | ५१७४ | २७७ | ७८४४ |

## फौजी नोकरांची एकंदर संख्या

| वार्षिक पगार | | हिंदू | मुसलमान | इतर | एकूण |
|---|---|---|---|---|---|
| ३०० पेक्षां जास्त मिळविणारे | | ७१९ | २५५५ | ५३ | ३३२७ |
| ६०० | ,, | १७९ | ८७९ | ४१ | १०९९ |
| ७०० | ,, | १०७ | ५३४ | ३५ | ६७६ |
| १२०० | ,, | ६९ | ३६४ | ३५ | ४६८ |
| १५०० | ,, | ४४ | २६९ | २९ | ३४२ |
| १८०० | ,, | ३३ | २१८ | २६ | २७७ |
| २४०० | ,, | २२ | १३४ | १७ | १७३ |
| ३००० | ,, | १९ | १०६ | १५ | १४० |
| ३६०० | ,, | १५ | ९४ | १३ | १२२ |
| ४२०० | ,, | १४ | ७७ | १२ | १०३ |
| ५००० | ,, | ८ | ६२ | ११ | ८१ |

## राज्यांतील एकंदर सर्व प्रकारच्या पेनशनरांची संख्या ( मुलकी )

| | | | | |
|---|---|---|---|---|
| २०० रु. वरील | ७७१ | १९३४ | १४४ | २८४९ |
| ३०० | २८२ | ८१२ | १२६ | १२२० |
| ६०० | १११ | ४४२ | १०५ | ६५८ |
| ७०० | ५५ | ३१२ | ९० | ४५७ |
| १२०० | ३० | १९५ | ८१ | ३०६ |
| १५०० | २२ | १५३ | ७३ | २४८ |
| १८०० | १९ | १२७ | ६६ | २१२ |
| २४०० | १२ | ९६ | ५४ | १६२ |
| ३००० | ७ | ७१ | ३७ | ११५ |
| ३६०० | ७ | ५५ | २८ | ९० |
| ४२०० | ६ | ४२ | १९ | ६७ |
| ५००० | ५ | २७ | १६ | ४८ |

## एकंदर राज्यांतील फौजी पेनशनरांची संख्या

| वार्षिक वेतन | हिंदू | मुसलमान | इतर | एकूण |
|---|---|---|---|---|
| २५ पेक्षां जास्त | ७०८ | १५१० | ४९ | २२६७ |
| ५० | ४९६ | १२१४ | ४२ | १७५३ |
| १०० | ९९ | ३५६ | २० | ४७५ |
| १५० | ५६ | २१४ | १३ | २८३ |
| २०० | ३७ | १४९ | १२ | १९८ |
| ३०० | ११ | ८५ | ९ | १०५ |
| ४०० | ६ | ६९ | ९ | ८४ |
| ५०० | ४ | ५५ | ९ | ६५ |
| ६०० | ४ | ४२ | ९ | ५६ |

## सरकारी पेनशनरांची संख्या ( खालसांतील )

| वार्षिक वेतन | हिंदू | मुसलमान | इतर | एकूण |
|---|---|---|---|---|
| २०० ते ३०० | १६२ | १६७ | ५ | २३४ |
| ३०० ते ६०० | १३९ | २६५ | १३ | ४१७ |
| ६०० ते ७०० | ४४ | ९२ | १२ | १४८ |
| ७०० ते १२०० | २३ | ८० | ८ | १११ |
| १२०० ते १५०० | ५ | २६ | ५ | ३६ |
| १५०० ते १८०० | ३ | १९ | ५ | २७ |
| १८०० ते २४०० | ६ | २४ | १० | ४० |
| २४०० ते ३००० | ४ | २० | १६ | ४० |
| ३००० ते ३६०० | ० | १३ | ९ | २२ |
| ३६०० ते ४२०० | ० | ८ | ९ | १७ |
| ४२०० ते ५००० | १ | १४ | ३ | १८ |
| ५००० च्या वरचे | ४ | २२ | १२ | ३८ |
| एकूण | ३९१ | ७५० | १०७ | १२४८ |

### जाहगीरी ऐवजी पेनशन, मेहेरबानी पेनशन, इंग्रजी राज्यांतील पेनशन निझाम सरकारच्या खजीन्यामार्फत घेणारे.

| वेतन वार्षिक | हिंदू | मुसलमान | इतर | एकूण |
|---|---|---|---|---|
| २०० ते ३०० | ३ | २३ | ० | २६ |
| ३०० ते ६०० | ५ | ५७ | १ | ६३ |
| ६०० ते ७०० | ८ | २७ | २ | ३७ |
| ७०० ते १२०० | १ | १३ | ० | १४ |
| १२०० ते १५०० | ३ | १४ | २ | १९ |
| १५०० ते १८०० | ० | ३ | ० | ३ |
| १८०० ते २४०० | १ | ५ | १ | ७ |
| २४०० ते ३००० | १ | २ | १ | ४ |
| ३००० ते ३६०० | ० | २ | ० | २ |
| ३६०० ते ४२०० | १ | ३ | ० | ४ |
| ४२०० ते ५००० | ० | ० | ० | ० |
| ५००० वरचे | ० | ४ | २ | ६ |
| एकूण | २३ | १५३ | ९ | १८५ |

### एकंदर राज्यांतील मनसबदारांची संख्या

| वेतन वार्षिक | हिंदू | मुसलमान | इतर | एकूण |
|---|---|---|---|---|
| २०० ते २५० | २६६ | १६४३ | २९ | १९३८ |
| २५० च्या वरचे | २३४ | १४०८ | २९ | १६७१ |
| ३०० | २०४ | १२२९ | २९ | १४६२ |
| ४०० | १५८ | ९१७ | २७ | ११०२ |
| ५०० | १२० | ७१५ | २७ | ८६२ |
| ६०० | ९६ | ५६१ | २१ | ६७८ |
| ७०० | ५४ | ३२४ | १४ | ३९२ |
| १२०० | २९ | १७८ | १२ | २१९ |

## मनसबदारांची संख्या ( खालसांतील )

| वार्षिक | हिंदू | मुसलमान | इतर | एकूण |
|---|---|---|---|---|
| २०० ते २५० पर्यंत | २७ | १८८ | ० | २१५ |
| २५० ते ३०० | २४ | १३५ | ० | १५९ |
| ३०० ते ४०० | ३८ | २६५ | २ | ३०५ |
| ४०० ते ५०० | २७ | १५९ | ० | १८६ |
| ५०० ते ६०० | १८ | १११ | ६ | १३५ |
| ६०० ते ७०० | ३६ | १८९ | ७ | २३२ |
| ७०० ते १७०० | २० | १११ | २ | १३३ |
| १२०० च्या वरचे | २५ | १५७ | १२ | १९४ |
| एकूण | २१५ | १३१५ | २९ | १५५९ |

## सर्फखास इलाख्यांतील मनसबदार

| | | | | |
|---|---|---|---|---|
| २०० ते २५० | ५ | ४७ | ० | ५२ |
| २५० ते ३०० | ६ | ४४ | ० | ५० |
| ३०० ते ४०० | ८ | ४७ | ० | ५५ |
| ४०० ते ५०० | ११ | ४३ | ० | ५४ |
| ५०० ते ६०० | ६ | ४३ | ० | ४९ |
| ६०० ते ७०० | ६ | ४८ | ० | ५४ |
| ७०० ते १२०० | ५ | ३५ | ० | ४० |
| १२०० च्या वरचे | ४ | २१ | ० | २५ |
| एकूण | ५१ | ३२८ | ० | ३७९ |

## राज्यांतील योमियादार व खास माहावारदारांची संख्या
## जाहगिरी सर्फखास व खालसा मिळून एकंदर

| वार्षिक | हिंदू | मुसलमान | इतर | एकूण |
|---|---|---|---|---|
| २०० | १६० | ५३८ | ८ | ७०६ |
| २५० | १३९ | ४५७ | ८ | ६०४ |
| ३०० | १२७ | ४३३ | ८ | ५६८ |
| ४०० | ६५ | २२८ | ५ | २९८ |
| ५०० | ४५ | १७९ | ५ | २०१ |
| ६०० | ३५ | १६१ | ५ | २२९ |
| ७०० | ९ | ४८ | ३ | ६० |
| १२०० | २ | ४० | २ | ४४ |

## योमियादार व खास माहवारदारांची संख्या खालसांतील

| वार्षिक | हिंदू | मुसलमान | इतर | एकूण |
|---|---|---|---|---|
| २०० पेक्षां जास्त मिळालेले | ११८ | ४६६ | ८ | ५९२ |
| २५० | १०६ | ३९६ | ८ | ५१० |
| ३०० | ९९ | ३८१ | ८ | ४८८ |
| ४०० | ५१ | २०७ | ५ | २६३ |
| ५०० | ३७ | १६७ | ५ | २०९ |
| ६०० | २९ | १५१ | ५ | १८५ |
| ७०० | ७ | ४८ | ३ | ५८ |
| १२०० | १ | ४० | २ | ४३ |

---

*खालसा व जहागीर—संस्थानांतील राज्याचे दोन भाग असून जाहगिरी व सर्फखासचा एक व बाकीच्या सरकारी मुलखास खालसा असें म्हणण्यांत येतें.

## हैद्राबाद स्टेट पोलिटिकल रिफॉर्म असोसिएशननें

# बटलर कमेटीकडे पाठविलेला अर्ज

सन्मान्य सेक्रेटरी साहेब,

इंडियन स्टेट्स इन्क्वायरी कमेटी क्यांप ( हैद्राबाद दक्षिण ) हैद्राबाद राजकीय सुधारणा संघाच्या अध्यक्षांच्या ( श्री. वामन रामचंद्र नाईक ) परवानगीनें मी पुढील अर्ज आपल्या कमेटीचे अध्यक्ष व सभासदांकडे सादर करीत आहें.

१ ब्रिटिश हिंदुस्थानांतील लोकांना परदेशांतून येणाऱ्या जिनसांवर व मिठासारख्या स्वदेशी पदार्थांवर देखील कर द्यावा लागतो. या करांचें उत्पन्न ब्रि. हिंदुस्थानांतील जनतेच्या हिताकरितां खर्च केलें जातें म्हणून ब्रि. हिंदुस्थानांतील लोकांकडून हा कर वसूल करणें न्याय्य आहे असें म्हणतां येईल; परंतु हैद्राबाद संस्थानांतील लोकांनाही हे कर भरावे लागतात; इतकेंच नव्हे तर त्यांना वरील कराखेरीज संस्थानानें बसविलेला कस्टम टॅरिफही भरावा लागतो. या दुहेरी करामुळें ब्रि. हिंदुस्थानांतील लोकांच्या मानानें हैद्राबाद संस्थानांतील लोकांचें अत्यंत नुकसान होत आहे. या अन्यायामुळें संस्थानांतील प्रजेच्या प्रगतीचे मार्गांत अत्यंत अडचणी येत आहेत. सबब हा अन्याय ताबडतोब दूर करण्याची शिफारस बटलर कमेटीनें करावी अशी या सभेची विनंती आहे.

ब्रि. हिंदुस्थानांत दिल्या जाणाऱ्या कराचा मोबदला आम्हांला मिळत नाहीं. ही स्थिति ताबडतोब सुधारली पाहिजे. पूर्वी मच्छलीपटमसारखें बंदर हैद्राबादच्या ताब्यांत होतें आणि त्यामुळें ब्रि. हिंदुस्थानांतील आयात जकात भरावी न लागतां हैद्राबादला परदेशी जिन्नस आणितां येत असत. परंतु ही सवलत काढून घेण्यांत आल्यापासून आम्हांला ब्रिटिश व निझाम या दोघांच्या कस्टम आणि एक्साईज ड्यूटीज भराव्या लागतात.

काठेवाडांतील कांहीं संस्थानांना ब्रिटिश सरकारची आयात जकात भरावी न लागतां आपल्या बंदरांतून परदेशी मालाची नेआण करितां येते. अशी

जर स्थिति आहे तर हैद्राबादसारख्या संस्थानाला मच्छलीपट्टणसारख्या बंदराचा पूर्वीप्रमाणें मोफत उपयोग कां करूं देऊं नये हें समजत नाहीं.

हैद्राबाद संस्थानांत येणाऱ्या ज्या मालावर ब्रि. इंडियांतील बंदरांत सी-कस्टम्स ( जकात ) घेतली जाते ती वस्तुतः ट्रँझेट ड्यूटीच्या ( वहातुकीवरील ) कराच्या रूपाची असल्यामुळें इ. स. १८०२ च्या तहाअन्वयें बेकायदे-शीरच ठरते.

काश्मीर आणि त्रावणकोर यांना या बाबतींत ज्या तऱ्हेनें सवलती देण्यांत आल्या आहेत त्याच हैद्राबादेलाही लागू केल्या पाहिजेत. परदेशाहून आलेले जे पदार्थ काश्मीर व इतर संस्थानांत ब्रि. सरकारची आयात जकात भरून नेले जातात त्या जकातीची रक्कम त्यांना परत ( रिफंड ) मिळते. हीच पद्धती हैद्राबादच्या बाबतींतही सुरू करावी.

२ दुसरा महत्त्वाचा प्रश्न म्हणजे ब्रि. हिंदुस्थानांतील कायदे मंडळाच्या दोन्ही सभांत हैद्राबाद संस्थानचे पुरेसे प्रतिनिधी घेणें हा होय.

संस्थानी प्रजाजनांना ब्रि. प्रजाजनांप्रमाणें लेखून सरकारी नोकऱ्या व कायदे मंडळें वगैरेमध्यें त्यांना समानतेचा दर्जा देणें हें धोरण हिंदुस्थान सरकारनें या पूर्वींच अंमलांत आणण्यास सुरुवात केली आहे. तसेंच जर " प्रतिनिधित्व नाहीं तर करही नाहीं, हें तत्त्व सर्वमान्य झालेलें आहे. अशा स्थितींत ब्रि. हिंदुस्थानाकरितां जर हैद्राबाद संस्थानांतील प्रजेकडून निरनिराळ्या मार्गानें कर वसूल केले जातात तर ब्रि. हिंदुस्थानच्या मध्यवर्ती कायदे मंडळांत त्यांचे प्रतिनिधी घेणें हेंही न्याय्य होय. असें केल्यास ब्रि. प्रजाजन व संस्थानी प्रजाजन यांचा सलोखा होऊन दोघांचाही फायदा होईल.

सध्यां संस्थानांतील राज्यव्यवस्था ब्रि. हिंदुस्थानच्या पद्धतीची करण्याचे प्रयत्न चालले आहेत. आणि म्हणून आम्हीं सुचविलेली सुधारणा केल्यास हें ध्येय साध्य होण्यास मदत होईल. या सुधारणेचें महत्त्व व तिची जरूरी लक्षांत घेऊन कमेटीकडून ही शिफारस केली जाईल असा असोसिएशनला भरंवसा वाटतो.

३ मांटेग्यु-चेम्सफर्ड रिपोर्टाच्या दहाव्या भागांत ज्या सूचना करण्यांत आल्या आहेत त्यांकडे बटलर कमेटीचें लक्ष वेधणें जरूर आहे.

ब्रि. सरकारनें ब्रि. हिंदुस्थानांत ज्या तऱ्हेच्या सुधारणा केल्या आहेत त्तशा तऱ्हेच्या सुधारणा संस्थानिकांनीं आपल्या हद्दींत सुरू कराव्या आणि ब्रि. इंडियाबरोबर पुढें पाऊल टाकावें अशी ब्रिटिश सरकारची इच्छा आहे असें जाहीर करण्यांत आलें आहे; अर्थात या धोरणाप्रमाणें संस्थानिकांनीं आपली राज्यव्यवस्था लोकमतानुवर्ती केली पाहिजे.

हैद्राबाद संस्थान सर्व बाजूंनीं ब्रि. हद्दींनीं व्यापलेलें आहे व त्यामुळें ब्रि. हिंदुस्थानांतील विचारक्रांतिचे परिणाम संस्थानांतही झाल्याखेरिज रहात नाहींत. लोकांच्या ह्या आकांक्षा लक्षांत घेऊनच आठ वर्षांपूर्वीं निजाम सरकारांनीं एक फर्मान काढून असें जाहीर केलें कीं लोकांना राज्यकारभारांत भाग घेतां यावा म्हणून लोकमताला जबाबदार अशी राज्यपद्धती सुरू करण्याची सरकारची इच्छा आहे. या फर्मानांतील अभिवचनाची अमलबजावणी व्हावी व तें निर्माल्यवत् होऊं नये अशी व्यवस्था करणें हें सर्वांचें कर्तव्य होय.

या प्रश्नासंबंधानें हैद्राबाद सरकारकडे या संस्थेनें पाठविलेल्या योजनेची एक प्रत आम्हीं सोबत जोडिली आहे. तिचा बटलर कमेटीकडून योग्य विचार होईल आणि संस्थानांतील कायदेमंडळ लोकमताला जबाबदार करण्याची शिफारस कमेटी करील अशी आम्हांस आशा आहे.

हैद्राबाद (दक्षिण)
ता. १२ मार्च इ. स. १९२८

आपला आज्ञाधारक सेवक
**के. एस. वैद्य.** एम्. ए. एल्एल्. बी.,
ऑनररी सेक्रेटरी हैद्राबाद पोलिटिकल
रिफॉर्म असोसिएशन.

# निजाम साहेबांना

## रा. राघवेंद्रराव शर्मा यांची तार.

हैद्राबाद हायकोर्टाचे माजी वकील रा. राघवेंद्रराव शर्मा यांनीं पुण्याहून ( ता. ५-४-२४ रोजीं ) खालील आशयाची तार निजामसाहेबांना पाठविली आहेः-

**निजाम सरकार,** आपण एक कोटि सहा लक्ष हिंदु प्रजाजनांवर राज्य करीत आहांत. त्यांच्या व मी स्वतःच्यातर्फे हिंदूंच्या वर्षप्रतिपदेच्या दिवशीं मी आपलें अभिनंदन करतों व नवें वर्ष आपणांस सुखाचें जावें असें इच्छितों.

या विसाव्या शतकांत ईश्वरी सामर्थ्यानुसार रशिया, चीन, तुर्कस्थान, इराण, ग्रीस वगैरे बलाढ्य राष्ट्रांवर जे प्रसंग आले व त्यामुळें जी जागृति झाली तीस अनुसरून आपण जपानच्या धोरणी व दूरदर्शी राजांचें अनुकरण करून आपल्या प्रजेला जबाबदार राज्यपद्धति देण्याचें धोरण जाहीर केलें. पण तें अद्यापि अमलांत आणलेलें नाहीं, तें आपण केव्हां अमलांत आणतां याची अखिल हिंदुस्थान उत्कंठेनें वाट पहात आहे.

वऱ्हाड प्रांतांतील लोक आपल्या सार्वभौमत्वाखालीं नाहींत व त्यांना तुमच्या सत्तेखालीं येण्याचीही इच्छा नाहीं, असें असतां त्यांना आपण स्वायत्त राज्यपद्धति देण्याचें आश्वसन देतां, पण खुद्द आपल्या ताब्यांतील हैद्राबाद संस्थानच्या प्रजेला गुलामापेक्षां अधिक चांगल्या रीतीनें वागवीत नाहीं, ही आश्चर्याची गोष्ट आहे. या आपल्या धोरणामुळें सर्व जग आश्चर्यचकित झालें असून वऱ्हाडांतील जनतेचा तुमच्या वचनावर विश्वास बसत नाहीं व म्हणून त्यांचेकडून आपल्या मागणीला विरोध होतो.

आपलें कौन्सिल वाढविण्याच्या प्रश्नाचा विचार करण्याकरितां आपण एक कमिटी नेमली आहे, ही मोठ्या आनंदाची गोष्ट आहे. पण आपल्या राज्यांतील जनतेला सुधारणांचे भरीव हक्क दिल्याचें आपण जाहीर कराल, तर लोकांना अतिशय आनंद होईल.

आपण वऱ्हाड प्रांताला जें स्वराज्य देऊं करीत आहांत तेंच हैद्राबादच्या रयतेला देण्याचा इरादा आपण या शुभ दिवशीं जाहीर करावा, अशी माझी नम्र विनंति आहे. आपल्यासारख्या मोठ्या संस्थानिकांनीं हें शहाणपणाचें व धडाडीचें कृत्य केल्यास आपली कीर्ति अजरामर होईल, व इतर संस्थानिकांस व ग्रेट-ब्रिटनलाही उदाहरण घालून दिल्यासारखें होईल.

# निजामांचा राज्यकारभार

## राघवेंद्रराव शर्मांचें व्हाइसरॉय लॉर्ड रेडिंग यांना पत्र

हिंदुस्थानच्या शहानशहांचे प्रतिनिधि या नात्यानें आपण खालसा मुलखां-तील प्रजाजनांच्या हिताविषयीं जितके जबाबदार आहां तितके संस्थानी प्रजेच्या हिताविषयींहि आहां. निजामसाहेबांच्या दक्षिण हैद्राबाद संस्थानामध्यें चाललेल्या जुलमी व एकतंत्री राज्यकारभाराची हकीगत आपल्या कानांवर पूर्वींच आलेली आहे. कोट्यावधि हिंदु लोकांना त्या कारभाराचा जाच सहन करावा लागत आहे. गेल्या नवंबर महिन्यांत आपली स्वारी हैद्राबाद संस्थानामध्यें आली, त्या वेळीं राज्यकारभारामध्यें सुधारणा करण्याची आवश्यकता निजामसाहेबांच्या नजरेला आपण आणून द्याल, अशी प्रजेची अटकळ होती; पण आपण ही गोष्ट केली असल्याचें कोणतेंच लक्षण अजून दिसत नाहीं. ब्रिटिश साम्राज्यावर सूर्य कधींच मावळत नाहीं असें म्हणतात. पण या सूर्याचे किरण दीन हैद्राबादच्या प्रजेवर पडत आहेत, असें मुळींच वाटत नाहीं. ब्रिटिश हिंदुस्थानांतील पत्रांना हैद्राबादच्या हद्दीमध्यें जाण्यास मज्जाव आहे. निजामसाहेबांच्या राज्यामध्यें सभा स्वातंत्र्याला सुद्धां आश्रयस्थान नाहीं. संस्थानांतील कारभार कसा असतो, हें आपल्यास पूर्णपणें ठाऊक असू-नहि आपण आपल्या भाषणांत त्यासंबंधीं उल्लेख कोठेंच करीत नाहीं. यामुळें निजामसाहेबांच्या प्रजेवर जुलमाचें दडपण अधिकच पडूं लागून त्यांना कोणी त्राता नाहीं, असें झालें आहे. साम्राज्यसूर्याच्या एका किरणाचाहि प्रवेश हैद्रा-बाद संस्थानांत होत नसल्यामुळें तेथील प्रजेच्या मनांत त्या सूर्याविषयीं आदर बुद्धी कशी बरें उत्पन्न व्हावी! ब्रिटिश साम्राज्याचे पायाचा दगड हिंदुस्थानांत घट्ट बसविण्यास ज्या प्रमाणें निजामसाहेबांनीं मदत केली, त्याचप्रमाणें गेल्या महायुद्धांत त्यांनीं क्रोडो रुपये व हजारों माणसें देऊन साम्राज्य सरकारास बहुमोल सहाय्य केलें असें म्हणतात. आपल्यासारख्या दूरदृष्टीच्या मुत्सद्यास ही गोष्ट सांगावयास पाहिजे असें नाहीं कीं, निजामसाहेबांच्या नांवांवर महायुद्धांत मिळालेलें कोट्या-वधी धन व हजारों माणसांचे जीव हे कांहीं त्यांच्या मालकीचे नसून आपल्या प्रजेकडून मागून घेऊनच मग त्यांनीं तें साम्राज्य सरकाराला दिलें आहे.

मरहूम महाराणी व्हिक्टोरिया यांच्या जाहिरनाम्यांत देण्यांत आलेलीं वचनें संस्थानी प्रजेकरितां नाहींत असें आपल्यास वाटतें काय? संस्थानिकांनीं आपापल्या राज्यांमधून जबाबदार राज्यपद्धती सुरू करावी, असें मॉँटग्यू–चेम्स-फोर्ड सुधारणांच्या रिपोर्टामध्येंहि ध्वनित केलेलें आहे. किंबहुना गेल्या नवंबर महिन्यांत आपल्या भाषणामध्येंहि असाच ध्वनि उमटला होता. पण या सर्वांचा प्रत्यक्ष असा परिणाम झालेला मात्र अजून दिसून आला नाहीं. म्हैसूर, बडोदें, राजकोट, औंध वगैरे संस्थानांप्रमाणें हैद्राबादी प्रजेला नवे हक्क मिळण्याचें तर बाजूलाच राहिलें, पण उलट पूर्वापार चालत आलेल्या भाषणस्वातंत्र्याचे व व्यक्तिस्वातंत्र्याचे हक्क यांच्यावरूनच घाव घालण्यांत येत आहे. एक ब्रिटिश नागरिक या नात्यानें आपल्याला हैद्राबादी प्रजेच्या सामान्य हक्कांची सुद्धां कशी गळचेपी करण्यांत येत आहे, याची जाणीव होण्यास मुळींच वेळ लागणार नाहीं. आपल्या एकतंत्री राज्याखालीं वऱ्हाडला द्यावें, अशी इच्छा करण्यांस निजामसाहेबांना कोणता अधिकार पोंचतो तें समजणें कठीण आहे. आतां नव्या मनूला सुरुवात झाली आहे, या वेळीं प्रजाजन म्हणजे आपल्या मालमत्तेचा एक मोठा भाग आहे, अशा भ्रामक समजुतीवर कोणत्याहि राज्यकर्त्यानें राहूं नये. आपल्यावर राज्य कोणाचें असावें, हें ठरविण्याचा प्रत्येक प्रजाजनाला जन्मसिद्ध अधिकार आहे. हिंदुस्थानाला तिऱ्हाइत अशा वाटणाऱ्या राज्यकर्त्यांनीं या हक्काला मान्यता दिली असून एकाच हाडामासाच्या हिंदी संस्थानिकांनीं ती देऊं नये याचें सखेदाश्चर्य वाटतें. लेजिस्लेटिव्ह असेंब्लीच्या ता. १८ फेब्रुवारीच्या बैठकींत श्री. रंगाचारियर यांनीं रिफॉर्म्स ॲक्ट सुधारण्यासंबंधीं भाषण करतांना असें सांगितलें कीं, वऱ्हाडला स्वयंसत्ताक राज्यपद्धती देण्याचें निझामसरकारनें वचन दिलें आहे. पण आपल्या संस्थानांतील प्रजेला जे हक्क देण्यास ते तयार नाहींत, ते हक्क वऱ्हाडला देण्यास ज्या अर्थीं निजामसाहेब तयार झाले आहेत, त्या अर्थीं त्यांच्या मनांत उदारपणाचा खरोखर जन्म झाला नसून केवळ वऱ्हाडच्या प्राप्तीकरतां निजामसाहेब औदार्याच्या लांब गप्पा ठोकीत आहेत, असें म्हणणें प्राप्त आहे. हें वचन केवळ वऱ्हाडी लोकांना जाळ्यांत अडकविण्याकरितां आमीष म्हणूनच टाकण्यांत आलें आहे, असें डॉ. गौर यांनीं बोलूनहि दाखविलें. खुद्द निजामाच्या राजधानींत—हैद्राबाद शहरांत साधे प्रातिनिधिक स्थानिक स्वराज्याचे अधिकार सुद्धां जर निजामसाहेब देण्यास तयार नाहींत, तर त्यांच्या

या नांवानें ओळखली जाणारी मजलिस तर केवळ इंग्रजी कायदेकानूंची उरदू भाषांतरें प्रसिद्ध करणारें एक भाषांतर खातेंच आहे. म्युनिसिपालट्यांत अथवा ह्या नामधारी कायदेकौन्सिलांत प्रजेनें निवडून दिलेला असा एकही प्रतिनिधी नसून प्रजेला कसल्याही प्रकारचे राजकीय हक्क देण्यांत आले नाहींत.

लॉर्ड डलहौसी अथवा लॉर्ड कर्झन यांनीं वऱ्हाडाबरोबरच हैद्राबादचाही भाडेपट्टा करून घेतला नाहीं हें एक दुर्दैवच म्हणावयाचें, कारण तसें झालें असतें तर आज निझाम सरकार वऱ्हाडाबरोबर हैद्राबादच्या प्रजेलाही स्वायत्त-तेचे–स्वराज्याचे–पूर्ण अधिकार द्यावयास एका पायावर तयार झालें असतें !

ब्रिटिश राज्यांत कांहींही अन्याय दडपशाही व जुलूम होत असलेतरी तेथील प्रजा संस्थानी अमलाखालीं यावयास मुळींच तयार होणार नाहीं. मात्र संस्थानी प्रजेस विचारल्यास ती एकमुखानें ब्रिटिशांच्या संरक्षणाखालीं यावयास तयार आहों असें म्हणेल.

ब्रिटिश इलाख्यांत भयंकर राजकीय चळवळे म्हणविणारे देखील जशा-प्रकारचें स्वातंत्र्य उपभोगितात तसलें स्वातंत्र्य हैद्राबाद संस्थानांतील एखाद्या भिऱ्या व जी हुजूरांच्या स्वातंत्र्यापेक्षां किती तरी पटींनें जास्त आहे याची तुलना केल्यास सहज कळून येईल. ज्या देशभक्तांनां हैद्राबाद संस्थानांत पाय देखील ठेवण्यास मनाई आहे अर्थात् ते इतके भयंकर समजले जातात असे लोक ब्रिटिश हद्दींत पूर्ण स्वतंत्रतेनें पाहिजे तिकडे वावरतात आणि आपली चळवळ चालू ठेवतात, आणि ज्या वर्तमानपत्रांना संस्थानांत येण्यास बंदी आहे त्यांना इंग्रजी राज्यांत सर्व प्रकारच्या सवलती प्राप्त आहेत.

अशा स्थितींत वऱ्हाडांतील लोक इंग्रजी सत्तेखालून आपल्या सत्ते-खालीं येतील अशी कल्पना निझामांनां कशी सुचली ही एक आश्चर्यजनक गोष्टच म्हणावी लागेल !

सध्यां वऱ्हाडचा प्रश्न आपल्यासमोर आहेच. हैद्राबादी प्रजा आपण वऱ्हाडसंबंधीं निर्णय करतांना हैद्राबादच्या तक्रारीसंबंधीं काय न्यायनिर्णय द्याल याची वाट पहात आहे.

( ५ एप्रिल इ. स. १९२४ )

# नेक नामदार राजा राजायानराजा महाराजा
# सर कृष्णप्रसाद बहादूर
## जी. सी. आय. ई; के. सी. एस. आय. यांस



**सोलापूर शहर नागरिकांतर्फे मानपत्र** ( ता. १५।१।१९२८ )

हैद्राबादचे मुख्य प्रधान उस्मानाबाद जिल्ह्याला दौऱ्यावर जातांना सोलापूर येथे त्यांचा मुक्काम राजा धनराजगीरजी नरसिंग गीरजी बहादुर यांच्या मिलचे बंगल्यांत झाला होता ह्या संधीचा फायदा घेऊन सोलापूर शहरच्या नागरिकांतर्फे त्यांना जेमानपत्र देण्यांत आले तें याखाली दिलें आहे. मानपत्र देण्याचा समारंभ श्री. सिद्धेश्वराचे देवालयांतील पटांगणांत झाला. मानपत्रावर सुमारें शंभर हिंदू मुसलमान प्रतिष्ठित नागरिक व पुढाऱ्यांच्या सह्या होत्या व हें मानपत्र सोलापूर म्युनिसिपालिटीचे अध्यक्ष श्री. डॉ. मुळे यांनीं वाचल्यावर तें महाराजांना सुंदरशा रौप्य करंडकांत अर्पण करण्यांत आलें.

**महाराज,**

आम्हीं खालीं सही करणारे सोलापूर शहरवासीयांतर्फे या शहरीं आपल्या आगमनाच्या प्रसंगीं अत्यंत आदरयुक्त आपलें स्वागत करितों. येथील इतिहासप्रसिद्ध किल्ला व सुंदर तलावानें वेष्टित असें पुरातन श्रीसिद्धेश्वर देवालय यासाठींच हें शहर प्रसिद्ध नसून, येथील भरभराटींत असलेल्या गिरण्यांमुळेंही हें शहर प्रसिद्धीस आलें आहे. या सुतकापडाच्या गिरण्यांमुळें या शहरचा व्यापार व लोकसंख्या झपाट्यानें वाढल्यामुळें मुंबई इलाख्यांत या शहरचा तिसरा नंबर लागत आहे.

२ निजामसरकारच्या मुलखाची हद्द व या जिल्ह्याची हद्द एकमेकास भिडल्यामुळें दोन्हीं मुलुखांतील परस्पर दळणवळण अव्याहत चालतें व शेजारधर्मामुळें अन्यसंबंध व एकमेकांविषयींची सहानुभूति आपोआप वाढते, यामुळें हिंदुस्थानांतील पहिल्या दर्जाच्या संस्थानचे मुख्य प्रधान या नात्यानें हं स्वागतपर **मानपत्र** अर्पण करण्याची परवानगी देऊन आपणांविषयीं आह्मास वाटणारा आदर व्यक्त करण्याची संधि दिली याबद्दल आम्हीं आपले अत्यंत ऋणी आहोंत.

३ राज्यकारभाराच्या निरनिराळ्या पद्धतीमुळें जरी निजामसरकारची व ब्रिटिश सरकारची प्रजा एकमेकापासून अलग दिसत आहे तरी दोन्हीं एकाच

हिंदमातेचीं मुलें आहेत, या राष्ट्रीय भावनेनें दोघांचीं अंतःकरणें प्रेरित असल्यामुळें एकमेकांच्या राजकीय, सांपत्तिक व सामाजिक प्रगतीविषयीं आम्हाला पूर्ण सहानुभूति वाटणें साहजिक आहे. व्यापार व शेतकी यांमध्यें या जिल्ह्याचा निजाम सरकारच्या मुलुखाशीं निकट संबंध येत असल्यामुळें या शहराच्या एकंदर लोकसंख्येचा बराच मोठा भाग आपल्या हद्दींतील विणकरवर्गाचा असल्याचें ऐकून आपणास समाधान वाटेल. या शहरच्या पूर्व भागाची वस्ती या लोकांचीच असून एकंदर या लोकांची संख्या पंचवीस हजारांपेक्षां कमी नाहीं. विशेषतः गेल्या पंधरा वर्षांत हातमागाच्या धंद्यांत या लोकांनीं जी प्रगती केली ती आपण लक्ष्यांत घेण्यासारखी आहे.

४ थोर शील, कर्तृत्वशक्ती व जबाबदारीची पूर्ण जाणीव, मुख्यप्रधान या नात्यानें केल्या जाणाऱ्या आपल्या राज्यकारभारांत स्पष्ट दिसत असल्यामुळें, निजामसरकारच्या प्रजेचींच अंतःकरणें आपण आकर्षण करून घेतलीं असें नसून अखिल हिंदुस्थानांत आपणाविषयीं आदर व कौतुक वाटत आहे, हें या प्रसंगीं नमूद करण्यास आम्हांस अभिमान वाटत आहे. त्याचप्रमाणें बाहेरील कारभार व परराष्ट्रीय संबंध यामध्यें आपण जें राजकारणपटुत्व व विशिष्ट कर्तबगारी दाखविलीं त्यामुळें परराष्ट्रांतही आपण उच्च लौकिक कमावला आहे.

५ आपण तत्त्वज्ञानी, कवी, राजकारणधुरंधर व देशभक्त असल्यामुळें, महान मोगल बादशहा अकबर यांचा सु-प्रसिद्ध हिंदु प्रधान राजा **तोडरमल** यांचे वंशज या नात्यानें त्यांचें थोर घराणें आपण निःसंशय भूषित केलें आहे— इतकेंच नव्हे तर आपले पणजे दानवीर महाराजे **चंदुलाल**, ज्यांचा धर्मादाय सर्व हिंदुस्थानभर प्रसिद्ध आहे, त्यांचें घराणेंही आपण अधिक तेजस्वी केलें आहे.

हल्लींच्या लोकशाहीच्या काळांत राजानें प्रजेच्या हिताच्या व उन्नतीच्या दृष्टीनें राज्यकारभार करणें कर्तव्य आहे, हें तत्व सर्वमान्य झालें आहे. अशा वेळीं ब्रिटिश मुलुखांत जबाबदार राज्यपद्धति अमलांत आली असतांना देशी संस्थानांना यापुढें मागें राहणें इष्ट नाहीं. हें आपल्या नजरेस आणण्याची आम्ही परवानगी घेतों. व आम्हीं आशा बाळगतों कीं, ब्रिटिश मुलुखांतील जबाबदार राज्यपद्धतीच्या ध्येयाशीं तुलनात्मक दृष्टीनें कोणत्याही प्रकारें कमी नसणारी, राजकीय सुधारणा आपल्या मुलुखांत आपण आपल्या कारकीर्दींत प्रत्यक्ष घडवून, निजामसरकारच्या प्रजेची कृतज्ञता आपण संपादन कराल.

७ प्रजेला कौंसिलचे हक्क देणाऱ्या, निजामसरकारनीं पांच वर्षांखालीं काढलेल्या संस्मरणीय फर्मानची आपणांस आठवण देणें आम्हीं आमचें कर्तव्य समजतों. परंतु आपल्या पूर्वीचे मुख्य प्रधान सर अल्ली इमामबहादूर यांच्या कारकीर्दींत सदर कौंसिलची घटना तयार करण्यासाठीं कमेटीची नेमणूक होऊनही अद्यापपावेतों हें फर्मान अमलांत आलें नाहीं. एच. ई. एच. निजामसाहेबांनीं आपल्या राज्यकारभाराचें धुरीणत्व पुन्हां आपल्याकडे दिलें असल्यामुळें आम्ही बळकट आशा बाळगतों कीं, निजामसरकारच्या राज्यांत राजकीय सुधारणा शक्य तितक्या लौकर अमलांत आणण्यासाठीं आपण हर प्रयत्न कराल व हिंदुस्थानांतील सर्वांत मोठ्या अशा एका प्रमुख संस्थानच्या राज्यघटनाविषयक इतिहासांत आपल्या कारकीर्दीची कायमची आठवण ठेवाल.

८ शिक्षणाविषयीं आपणांस पूर्ण कळकळ वाटत असल्यामुळें आपल्या बारा वर्षांच्या कारकीर्दींत खाजगी शाळांना शिक्षणाचे बाबतींत पूर्ण स्वातंत्र्य उपभोगतां येत होतें, परंतु अलीकडे अशा शाळासंबंधीं जे बंधनकारक हुकूम काढण्यांत आले आहेत त्यामुळें निजामसरकारच्या शाळाखात्याचें धोरण पिछेहाटीचें झालें आहे, हें नाखुषीनें आम्हांस या ठिकाणीं नमूद करणें भाग आहे. व हें संकट लौकर नाहींसें होण्यासाठीं निजामसरकारची प्रजा आपल्याकडे आतुरतेनें पहात आहे.

९ कै. निजामसाहेब **मीर महिबुब अल्लीखान बहादूर** यांच्या कारकीर्दींत आपण अनेक वर्षें मुख्य प्रधानाचें काम केलें असल्यामुळें त्या वेळेपासून हिंदू व मुसलमान या दोहोंना धर्मस्वातंत्र्य व समानतेची वागणूक हें तत्त्व आपल्या अंतःकरणांत पूर्ण बिंबलें असल्यामुळें हिंदू-मुसलमानांच्या एकीचे आपण आज कट्टे पुरस्कर्ते आहांत व आपलें वय व अनुभव यामुळें, एच. ई. एच. निजाम-साहेबांनीं ज्या अत्यंत जबाबदारीच्या हुद्यावर आपणास नेमलें आहे, त्या जागेस आपण सर्वस्वी लायक आहांत. निजामसाहेबांनीं या निवडणुकीबद्दल व हैद्राबाद शहरांतील अनेक शहरसुधारणेच्या व पाणीपुरवठ्याच्या योजने-बद्दल आपल्या प्रजेचा दुवा मिळविला आहे यांत शंका नाहीं.

१० आपलें स्वागत करण्याची ही संधि आपण दिल्याबद्दल आम्हांस जो आनंद झाला आहे तो पुन्हां एकवार व्यक्त करून, सोलापूर शहरवासीयांचे हें नम्रतापूर्वक अर्पण करण्यांत येणारें मानपत्र स्वीकारल्याबद्दल आम्ही आपले आभार मानतों. ईश्वर आपणास दीर्घायुषि व सुखी ठेवो अशी आम्हा सर्वांची प्रार्थना आहे.

**आपले नम्र व आज्ञाधारक**

# हैद्राबाद संस्थान प्रजाशिक्षण परिषद्.

## अधिवेशन पहिलें.

## अध्यक्ष पंडित हृदयनाथ कुंझरू यांचें अत्यंत स्फूर्तिदायक व समतोल भाषण.

### शिक्षण मोफत व अवश्य करा! सरकारी शिक्षणसंस्थांतून धर्मशिक्षणाला गचांडी द्या!!

### प्रजाप्रतिनिधींची एकमुखी व जोराची मागणी!!

### 'सहीफया' चा शिष्टाचार व लोकमताची प्रक्षुब्धता!

हैद्राबाद संस्थान प्रजापरिषदेचे नियोजित अध्यक्ष ता. २४ आक्टोबर (१९२८) रोजीं सकाळच्या गाडीनें आले. वाटेंत बेगमपेठ येथें श्री. वामन रामचंद्र नाईक यानीं त्यांस पुष्पहार अर्पण केला. व स्टेशनवर पंडितजींच्या स्वागताकरितां २५०।३०० नागरिक हजर तेथें होते. त्यांत स्वागताध्यक्ष, येथील प्रमुख पुढारी मंडळी, शेट, सावकार, वकील व इतरहि बरीच मंडळी होती. स्वयंसेवकांचीं पथकें—अभिनव भारत मंडळ, आदि हिंदु स्वस्तिक मंडळ, आंध्र व्हालंटीयर कोअर बँडसह जय्यत तयारींत खडीं होतीं. गाडी थांबतांच व्हालंटीयर कोअर तर्फें त्यांस हार घालण्यांत आला. तसेंच स्वागतमंडळातर्फें व इतर संस्थांतर्फेंही हार घालण्यांत आले. नंतर मोटारींतून मिरवणूक निघाली. मोटारमध्यें सर्वांच्या पुढें बँड असून व्हालंटीयर लोक सायकलवरून चालले होते. पहिल्या मोटारींत पंडितजी, राजा धनराजगिरजी व श्री. वामन नाईक असून पाठीमागून सुमारें ३० मोटारींतून सर्व मंडळी बसली होती. अशा रीतीनें थाटानें मिरवणूक निघाली ती ऑबिड शॉप, कोठी, रेसिडेन्सी, अफजलगंजवरून पुलापर्यंत जाऊन तेथून बेगम बाजारांतून श्रीमंत राजा धनराजगिरजी यांच्या ज्ञानबागेंत येऊन पोंचली. वाटेंत गौळीगुड्यांत श्रीमान वामन रामचंद्र नाईक यांच्या घराजवळ श्री. विश्वनाथ नाईक यांनीं हार

घातला. निजाम विजय कचेरीतर्फे त्याच ठिकाणीं त्यांस हार घालण्यांत आला.

परिषदेला सुरुवात पूर्वी प्रसिद्ध केल्याप्रमाणें ता. २५ आक्टोबर (१९२८) रोजीं विवेकवर्धिनी थिएटरांत सायंकाळीं ५। वाजतां झाली. थिएटर उत्तम प्रकारें शृंगारलें असून डायसवर प्रमुख मंडळीची बसण्याची सोय करण्यांत आली होती. प्रतिनिधि, स्वागत मंडळाचे सभासद, प्रेक्षक वगैरेनीं थिएटर चिकार भरून गेलें होतें, तें इतकें कीं बऱ्याच लोकांस तिकिटें घेऊनहि उभें राहावें लागलें. स्वागत सभासदांची संख्या १२५ व प्रतिनिधींची संख्या ३५० होती. अध्यक्ष व स्वागताध्यक्षांच्या स्वाऱ्या येतांच टाळ्यांच्या प्रचंड कडकडाटांत सर्वांनीं त्यांचें उभें राहून स्वागत केलें; शहरांतील प्रमुख पुढारी मंडळी, कांहीं स्त्रिया, व कांहीं सरकारी अधिकारी डायसवर दिसत होती. त्यांत चीफ जस्टिस नवाब मिर्झा यारजंग बहादूर, मि. महंमद हसन ॲक्टिंग डायरेक्टर ऑफ पब्लिक इन्स्ट्रक्शन, डेप्युटी डायरेक्टर, मि. गुलाम महंमद तालुकदार, मेजर अमीर सुलतान मदतगार पोलिस सिटी, नवाब तुराबअली खान स्पेशल ऑफिसर, मि. अहंमद हुसेन प्रिन्सिपाल दारुलउलम, मि. एस्. एम् आजम प्रिन्सिपाल सिटी कॉलेज; मि. सय्यदअलि अकबरखान इन्स्पेक्टर ऑफ स्कूलस बी. ए. ( कॅन्टब ) हे सरकारी अधिकारी, व मिसेस रुस्तुमजी, मिसेस व मिस मल्लणा, मिसेस सुबाराव इत्यादि स्त्रिया दिसत होत्या. श्रीमंत राजा धनराज गिरजी, पंडित केशवरावजी, श्रीमान वामन नाईक, बॅ. नाईक, दि. ब. अरवामुडु अयंगार, राजा बीरभानगिरजी, गोस्वामी लालगिरजी, मि. पंजतनसाहेब वकील, श्री. एम्. हणमंतराव वकील, श्री. वैद्य वकील, श्री. गानू वकील, श्री. पांडुरंगराव जोशी वकील, डॉ. मल्लण्णा व रा. ब. व्यंकटरड्डी, मि. पिंगल व्यंकटरामा रड्डी व इतरहि वकील, शेट, सावकार व प्रतिष्ठित व्यक्ती डायसवर दिसत होत्या.

श्री. टोकरे गवई यांनीं प्रथम ईशस्तवनपर दोन पद्यें म्हटल्यावर स्वागताध्यक्ष श्रीमंत राजा धनराजगिरजी यानीं स्वागतपर भाषण वाचून दाखविलें. स्वागताध्यक्षांच्या भाषणानंतर पंडित केशवरावजी यानीं पं. कुंझरू यानीं परिषदेचें अध्यक्षस्थान स्वीकारावें अशी सूचना केली. तिला दि. ब. अरवामुडु अयंगार व मि. पंजतन साहेब हा. को. वकील यांनीं अनुमोदन दिल्यानंतर स्वागताध्यक्षानीं अध्यक्षांस पुष्पहारांनीं विभूषित केलें. नंतर अध्यक्षांचें भाषण होऊन पहिला राजनिष्ठेचा ठराव त्या दिवशींच टाळ्यांच्या गजरांत उभ्यानें पसार झाल्यावर त्या दिवसाची बैठक समाप्त झाली.

रात्रीं विषयनियामिक कमिटीची सभा होऊन ठराव कायम करण्यांत आले. दुसऱ्या दिवशीं सकाळीं आठ वाजतां पुनः अधिवेशनास सुरुवात झाली व १०–४५ वाजेपर्यंत कांहीं ठराव पास झाले. दुपारीं बरोबर दोन वाजतां पुनः सुरुवात होऊन संध्याकाळीं साडे सात वाजेपर्यंत राहिलेले ठराव पसार झाले व सेक्रेटरीनीं अध्यक्ष, स्वागताध्यक्ष, स्वयंसेवक, स्वागत मंडळ व प्रतिनिधींचे आभार मानल्यावर हार तुरे वगैरे व अध्यक्षांचा समारोप होऊन समारंभ अत्यंत यशस्वी रीतीनें समाप्त झाला. नंतर येथील ‘ सहीफा ’ पत्रानें शिष्टाचार सोडून परिषदेच्या अध्यक्षांविषयीं कुत्सितपणाची केलेली टीका श्रीमान नाईक साहेबानीं श्रोतृगणाच्या निदर्शनास आणली. तें ऐकतांच सर्व थिएटरांतून ‘सहीफ्या’ विषयीं धिःकारदर्शक उद्गार निघाले व पत्र त्या ठिकाणीं जाळून टाकण्याबद्दलहि सूचना करण्यांत आल्या, पण त्या पत्राची कवडी किंमत लोक समजत असल्यामुळें त्याचें नांव घेणेंहि पाप आहे असें समजून लौकरच सर्वांनीं शांतता धारण केली व पत्रकर्त्यांच्या अकलेचे कौतुक करीत लोक घरोघर निघून गेले !

---

श्री. टोकरे गवई यांनीं प्रथम ईशस्तवनपर दोन पद्यें म्हटल्यावर स्वागताध्यक्ष श्रीमंत राजा धनराजगिरजी यानीं स्वागतपर भाषण वाचून दाखविलें. स्वागताध्यक्षांच्या भाषणानंतर पंडित केशवरावजी यानीं पं. कुंझरू यानीं परिषदेचें अध्यक्षस्थान स्वीकारावें अशी सूचना केली. तिला दि. ब. अरवामुद्दु अयंगार व मि. पंजतन साहेब हा. को. वकील यांनीं अनुमोदन दिल्यानंतर स्वागताध्यक्षानीं अध्यक्षांस पुष्पहारांनीं विभूषित केलें. नंतर अध्यक्षांचें भाषण होऊन पहिला राजनिष्ठेचा ठराव त्या दिवशींच टाळ्यांच्या गजरांत उभ्यानें पसार झाल्यावर त्या दिवसाची बैठक समाप्त झाली.

रात्रीं विषयनियामिक कमिटीची सभा होऊन ठराव कायम करण्यांत आले. दुसऱ्या दिवशीं सकाळीं आठ वाजतां पुनः अधिवेशनास सुरुवात झाली व १०–४५ वाजेपर्यंत कांहीं ठराव पास झाले. दुपारीं बरोबर दोन वाजतां पुनः सुरुवात होऊन संध्याकाळीं साडे सात वाजेपर्यंत राहिलेले ठराव पसार झाले व सेक्रेटरीनीं अध्यक्ष, स्वागताध्यक्ष, स्वयंसेवक, स्वागत मंडळ व प्रतिनिधींचे आभार मानल्यावर हार तुरे वगैरे व अध्यक्षांचा समारोप होऊन समारंभ अत्यंत यशस्वी रीतीनें समाप्त झाला. नंतर येथील ‘ सहीफा ’ पत्रानें शिष्टाचार सोडून परिषदेच्या अध्यक्षांविषयीं कुत्सितपणाची केलेली टीका श्रीमान नाईक साहेबानीं श्रोतृगणाच्या निदर्शनास आणली. तें ऐकतांच सर्व थिएटरांतून ‘सहीफ्या’ विषयीं धिःकारदर्शक उद्गार निघाले व पत्र त्या ठिकाणीं जाळून टाकण्याबद्दलहि सूचना करण्यांत आल्या, पण त्या पत्राची कवडी किंमत लोक समजत असल्यामुळें त्याचें नांव घेणेंहि पाप आहे असें समजून लौकरच सर्वांनीं शांतता धारण केली व पत्रकर्त्यांच्या अकलेचे कौतुक करीत लोक घरोघर निघून गेले !

---



श्री. गोस्वामी राजा **धनराज गीरजी नरसिंग गीरजी** बहादूर
हैद्राबादचे लोकप्रिय व दानशूर श्रीमंत व पहिल्या हैद्राबाद
प्रजाशिक्षण परिषदेचे स्वागताध्यक्ष.

# एकंदर जिल्हे व तालुक्यांचा तपशील.

| जिल्हे | तालुके | खेडीं |
|---|---|---|
| १ औरंगाबाद | औरंगाबाद, अंबड, भोकर्धन, गंगापूर, जालना, कन्नड, पैठण, खुलदाबाद, *सिलोड, वैजापूर. | १४९२ |
| २ बीड | बीड, मोमिनाबाद, आष्टी, गेवराई, माजलगांव, *पाटोदा. | ८५५ |
| ३ परभणी | परभणी, वसमत, हिंगोली, जिंतूर, कळमनूरी, पाथरी, *पालम. | १३४३ |
| ४ नांदेड | नांदेड, बिलवली, देगलूर, हदगांव, कंधार, मुधोळ. | १०६७ |
| ५ गुलबर्गा | गुलबर्गा, चिंचोळी, कोडगल, सेडम, यादगीरी, अंदोला, *शहापूर, *सुरापूर. | १०२० |
| ६ रायचूर | रायचूर, आलंपूर, देवदुर्ग, गंगावती, कुष्टगी, लिंगसुगूर, मानवी, सिंधनूर. | ११३८ |
| ७ उस्मानाबाद | उस्मानाबाद, *कळम, परंडा, औसा, तुळजापूर. | ५७० |
| ८ बेदर | बेदर, निलंगा, अहमदपूर, उदगीर, *जनवाडा. | ६५० |
| ९ वरंगल | वरंगल, खम्मम, महिबूबाबाद, मधरा, पाखाल, पालोंचा, मलग, यलंदू. | ९२३ |
| १० करीमनगर | करीमनगर, जगत्याल, हुजूराबाद, महादेवपूर, परकाल, सिरसिल्ला, सुलतानाबाद. | ९८८ |
| ११ आदिलाबाद | आदिलाबाद, चिन्नूर, आसफाबाद, लक्ष्मीपेठ, किनवट, निर्मल. राजूर, सिरपूर, उढनूर, बोथ. | १४३५ |
| १२ मेदक | मेदक, अंदोल, बागात, कलबगूर, सिद्धीपेठ. | ५२७ |
| १३ निझामाबाद | निझामाबाद, आरमूर, बोधन, कामारड्डी, यल्लारड्डी. | ५२२ |
| १४ महिबूबनगर | महिबूबनगर, नागर कर्नूल, अमराबाद, कलवाकुर्ती, मखतल, परगी. | ६६४ |
| १५ नलगुंडा | नलगुंडा, भोनगीर, जनगांव, देवर कोंडा, कोदाड, ( उर्फ हुजूर नगर ), मिरयालगुडा, सूर्यापेठ. | १०२१ |

* ज्यावर फुली आहे ते ७ तालुके सरफखास इलाख्याचे असून राज्यव्यवस्था खालसा सरकारची आहे. ह्याचा वसूल निझाम सरकारच्या खासगी खर्चास दिला जातो.

## शहरें व खेडीं.

खानेसुमारीचे रिपोर्टांत जेथें लोकवस्ती ५००० पर्यंत असेल त्यास **ग्राम** व एक लक्षापर्यंत असलेले आणि म्युनिसिपालिट्या, क्यँटोन्मेंट व त्याच्या आसपास एकत्र वस्ती करून राहिलेल्या गांवास **शहर** आणि एक लाखावर असलेल्या शहरास **नगर** city अशी संज्ञा देण्यांत आली आहे.

सदरी वर्गीकरणाप्रमाणें हैद्राबाद संस्थानांत एकंदर ८८ शहरें व एक नगर ( खुद्द हैद्राबाद आणि २१२२३ ( खेडीं ) **ग्रामें** आहेत. त्यांचा प्रांतवार तपशील येणेंप्रमाणें.

| प्रांत. | नगर | शहर | ग्राम |
|---|---|---|---|
| तेलंगण | १ | ३२ | ९९३३ |
| महाराष्ट्र | ० | ५६ | ११२९० |
| ऐकूण | १ | ८८ | २१२२३ |

**हैद्राबाद शहरः**—हें राजधानीचें ठिकाण असून ह्या ( भाग्यनगराचा ) विस्तार ५१ चौ. मैल आहे. दर मैलास ७९२५ लोकसंख्या पडते, त्याचा तपशील येणेंप्रमाणें:—

| | |
|---|---|
| सिटी म्युनिसिपल हद्दींत ... ... ... | १,४४,१४५ |
| चादर घाट ... ... ... ... | १३०,०६३ |
| लष्करी लोक ... ... ... ... ... | १९२८५ |
| रेसिडन्सी बझार ... ... ... ... ... | १५५४३ |
| सिकंद्राबाद ( बुलारमधरून ) ... ... ... | ९५१५१ |
| एकूण | ४०४१८७ |

लोकसंख्येच्या मानानें पाहतां हें शहर हिंदुस्थानांत चौथ्या नंबरचें शहर होय.

# जहागिरी व खालसांतील खेड्यांचा तपशील.

हैद्राबाद् संस्थानांतील खंडणी देणारीं अंतर्गत संस्थानें व निझाम सरकारच्या खासगी खर्चाकरितां राखून ठेविलेला इलाखा ज्यास **सर्फेखास** म्हणतात आणि इतर जाहागिरी वगैरे मिळून राज्याचें एकचतुर्थांशापेक्षां जास्त क्षेत्र व्यापिलें आहे. त्याचा तपशील येणेंप्रमाणें.

## सर्फेखास इलाख्याचा तपशील.

ह्या इलाख्याची एकंदर लोकसंख्या १०, ६७, ३८८ असून त्यांत खास निजाम सरकारचे उत्पन्नाचीं खेडीं १३३६ व जाहागिरीचीं ४४३ आणि मक्ते ४७ व अग्रहार ५ आहेत. एकूण १८३१ खेडीं व १०४ बेचिराग खेडीं मिळून १९३५ खेडीं आहेत.

ह्या सर्फेखासच्या उत्पन्नाशिवाय खालसांतील सरकारी खजिन्यांतून वार्षिक **पन्नासलक्ष** ( ५० लक्ष ) रुपये निझाम सरकारच्या खासगी खर्चाप्रीत्यर्थ दिले जातात.

एकूण निजाम सरकारचें खासगी उत्पन्न वार्षिक सव्वा कोट रुपये आहे. त्याशिवाय नजरनजरण्याचें उत्पन्न हल्लींचे निझाम सरकारचे कारकीर्दींत बेसुमार वाढलें असून त्याचा हिशेब मिळणें शक्य नाहीं. वार्षिक निदान अंदाजी २५ लाख कमींत कमी नजराण्याच्या रूपानें वसूल केले जातात. हे सर्व नजराण्याचे रुपये सरकरी खजिन्यांत दाखल होत नसून निजाम साहेबांच्या खासगी खिशांत जमा होतात. नक्की हिशेब प्रसिद्ध केल्यास अंदाजाची जरूर राहणार नाहीं.

निजाम साहेबांच्या खासगी खजिन्यांत सुमारें ६ अब्ज २५ कोट रुपये ( सोन्याचें नाणें ) असल्याचें मि. सेंट निहालसिंगांनीं लंडन मासिकांत प्रसिद्ध केलें आहे ( जानेवारी १९२४ चा अंक ). शिवाय हिरे माणके व जड जवाहीर इतकें आहे कीं सहा माणसें सहज त्यांत पुरलीं जातील.

आजच्या प्रसंगीं आमचे निजाम साहेब जगांतील एक बडे लक्ष्मीपुत्र आहेत. सर्वे गुणाः ( जनाः ) कांचनमाश्रयंते.

---

## खालसा व जाहगिरीच्या खेड्यांचा तपशील.

इ. स. १९१९.

| नं. | खेड्याचा प्रकार | स. १३०३ फ | स. १३०७ फ | स. १३२४ फ. | स. १३२८ फ. |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| | ( खालसा ) | | | | |
| १ | रयतवारी | १२६२२ | १३१७९ | १३४७१ | १३५५२ |
| २ | सरबस्तापनमक्ते | ८१६ | १०९१ | ६८० | ६८० |
| ३ | इजारा | ४३१ | ४२८ | ८५ | ५३ |
| ४ | अग्रहार | ४४० | ४१६ | १४१ | १४४ |
| ५ | मोकासा व पेष-कष | २४२ | २४९ | ७०५ | ७१४ |
| ६ | चेचिराख | १३५३ | १०१९ | ८११ | ७८३ |
| | एकूण | १६२५९ | १६४०७ | १६३१६ | १६४५४ |
| | ( जहागिरी ) | | | | |
| | जातजाहगीर | १७४८ | २६३८ | २७४८ | २६७७ |
| | तंनखाजाहगीर | ५४ | ५१ | ४१ | १०८ |
| | मशरुती इतर जाहगिरी | ११६५ | २१० | २२५ | २१५ |
| | एकूण जाहगिरी | २९६७ | २८९९ | ३००९ | २९०० |
| | सर्व मिळून एकूण | १९२२६ | १९३०६ | १९३२५ | १९३५४ |

## शेतकऱ्यांची संख्या.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| पट्टेदार | ... | ... | ... | ७,२८,५७४ |
| पोटपट्टेदार | ... | ... | ... | १,१२०९० |
| शिकमीदार | ... | ... | ... | १,६६,४५२ |
| | | | एकूण | १००७११६ |

# समाजाचा ऱ्हास.

मागील दशकांत ( १९०१ ते १९११ ) जनसंख्या १,३३,७४,६७६ होती. हल्लीं वर्णिल्या जाणाऱ्या ( १९११ ते १९२१ ) दशकांत ती १,२४,७१,७७० भरल्यानें, ९,०२,९०६ लोक कमी झाल्याचें दिसून येतें. ह्या क्षीणतेचें विवरण खालील कोष्टकांत केलें आहे.

| नांव | जन संख्या १९११ | जन संख्या १९२१ | फरक |
|---|---|---|---|
| ( तेलंगण ) | | | |
| हैद्राबाद शहर | ५,०१,६४६ | ४,०४,१८७ | –९७,४६९ |
| अतराफबल्दा जिल्हा | ५,३७,०२५ | ४,९७,४९८ | –३९,५२७ |
| वरंगल ,, | ९,०५,५२२ | ९,२५,०४१ | +१९,५१९ |
| करीमनगर ,, | ११,२९,१९८ | १०,९५,४४४ | –३३,७५४ |
| आदिलाबाद ,, | ६,२०,४२६ | ६,५५,५३६ | +३५,११० |
| मेदक ,, | ६,८२,०३० | ६,४२,७९६ | –३९,२३४ |
| निजाम बाद ,, | ५,६५,८९० | ४,९९,७६५ | –६६,१२५ |
| महबूबनगर ,, | ७,४९,४१७ | ७,५०,७३० | + १,३१३ |
| नलगोंडा ,, | १०,३५,७७० | ९,४८,३०१ | –८७,४६९ |
| ( महाराष्ट्र ) | | | |
| औरंगाबाद | ८६९७८७ | ७१४००८ | –१५५७७९ |
| बीड | ६२२५३१ | ४६७६१६ | –१५४९१५ |
| नांदेड | ६९८४११ | ६७१०१९ | –२७३९२ |
| परभणी | ७७९३७९ | ७६५७८७ | –१३५९२ |
| गुलबर्गा | ११९०३२७ | १०९५७५३ | –९४५७४ |
| उस्मानाबाद | ६४१००५ | ६१५२१६ | –२५७८९ |
| रायचूर | ९९८६८४ | ९२२३२२ | –७४३६२ |
| बेदर | ८४९६२८ | ८००७५१ | –४८८७७ |
| समस्त तेलंगाण | ६७,२६,९२४ | ६४,१९,२९८ | –३,०७,६२६ |
| समस्त मराठवाडी | ६६,४७,७५२ | ६०,५२,४७२ | –५,९५,२८० |
| समस्त राज्य | १,३३,७४,६७६ | १,२४,७१,७७० | –९,०२,९०६ |

( + ) ही खूण वाढल्याची ( – ) ही खूण कमी झाल्याची

१९११ सालाच्या संख्येचीं १९२१ सालांतील संख्येशीं तुलना केली असतां एकंदर राज्याची लोकसंख्या शेंकडा ६.८ नें कमी झाल्याचें दृष्टोत्पत्तीस येतें. प्रांतवार पाहतां हें न्यूनतेचें प्रमाण तेलंगणांत शेंकडा ४.५ व मराठवाडींत शेंकडा ८.८ बसतें. जनसंख्या इतकी कमी होण्याचीं कारणें सरकारी खानेसुमारीचे रिपोर्टांत खालीलप्रमाणें दाखविलीं आहेत.

देशांतील लोकसंख्या कमी अधिक होण्याला सामान्यतः तीन कारणें असतात.

( १ ) देशाच्या विस्तारांत फेरफार.

( २ ) एका दशाब्दाच्या हिशेबापेक्षां दुसऱ्या दशाब्दाचे हिशेब अधिक चोखपणें तयार करणें.

( ३ ) जनसंचलन. ( देश सोडून जाणें )

पहिल्या दोन कारणांचें विस्तारें करून विचार करण्याचें प्रयोजन दिसत नाहीं. खानेसुमारीला आरंभ झाल्यापासून ह्या राज्याच्या विस्तारांत मुळींच फेरबदल झालेला नाहीं. खर्च सोसून चोख हिशेब तयार करविण्याकडेच निझाम सरकारचे सर्व प्रयत्न झाले आहेत. म्हणून दुसरें कारणही विशेष चिकित्सा न करितां सोडून देतां येईल. हातच्या कांकणाला आरसा कशास पाहिजे ह्या म्हणीस अनुसरून तिसऱ्या कारणाला आपल्या अनुभवाचीच साक्ष पुरे आहे. ह्या अनुभवाला साधारणपणें आधार म्हटला म्हणजे पिकांचे स्थितीचा व लोकांचे आरोग्याचा होय. हींच जनाभिवृद्धीचीं मुख्य कारणें होत. ह्या दोहींचें किंचित् विस्तृतपणें विवेचन करूं.

**पिकें— आरोग्यस्थिति—** १३२० ( अक्टोबर १९११ पासून ) फसलींत पाऊस विपुल नव्हता तरी शेतकऱ्यांच्या कामाला पुरेसा होता. पिकें सर्व फार चांगलीं आलीं होतीं, परंतु शेवटीं शेवटीं पर्जन्य फार झाल्यानें भात व गळितांचीं धान्यें ( तीळ कारळी, करडी वगैरे ) मात्र चांगलीं आलीं. कापसाच्या पिकाची नासाडी झाली. १३२१ फसलींत पाऊस कमी झाल्यानें जोंधळा खेरीज करून बाकीचीं सर्व पिकें निम्म्याहूनही कमी आलीं. कापसाचें पीक बुडाल्यानें कापसाच्या अनेक गिरण्या बंद ठेवाव्या लागल्या. साऱ्या राज्यभर प्लेगदेवतेचा

धुमाकूळ माजून राहिला. एका हैद्राबाद शहरांतच तिनें १६००० हून अधिक प्राणांची आहुति घेतली.

१३२१ फसलींतही राज्यच्या पश्चिमोत्तर जिल्ह्यांत वर्षाकाल कमी झाल्यानें अनेक मासपर्यंत गुरांना चाऱ्याची टंचाई झाली. पूर्वेकडील पाऊस हवा तितका पडल्यानें अटकळीच्या बाहेर पिकें आलीं. परंतु इतर जिल्ह्यांत दुष्काळ पडल्यानें रमारमी होऊं शकली नाहीं. म्हणून सहा लक्ष रुपये साऱ्याची सूट देऊन शिवाय दोन लक्ष रुपये तगाईच्या रूपानें शेतकऱ्यांना कर्जाऊ द्यावे लागले. १३२३ फसलींत पाऊस अर्ध्याहून अधिक झाला. मुख्य मुख्य पिकें बरीं आलीं. परंतु आरोग्यस्थिति बरी नव्हती. मागील सालाशीं तुलना केली असतां लोकांची मृत्युसंख्या १६ हजारांहून अधिक भरली. १३२४ फसलींत पाऊस बरा झाला. पिकें चांगलीं पिकलीं. परंतु युरोपांतील महायुद्धामुळें व्यापारांत चलबिचल होऊन गळितांचीं धान्यें व कापूस परदेशीं जाईनात, म्हणून भाव मंदावले. ह्या जिनसांचा खप होईनासा झाला.

१३२५ फसलींस पाऊस चांगला पडला. परंतु पुष्कळ जिल्ह्यांत प्लेग उद्भवून साल अखेरीच्या सुमारास हैदराबादेंतही त्याचा प्रवेश झाला. १३२६ फसली फार कष्टाची गेली असें म्हटलें पाहिजे. आरंभींची कालपरिस्थिति फार चांगलीच होती, परंतु खरीपाचीं पिकें हातीं येण्याच्या सुमारास अकालवृष्टि झाल्यानें कापसाच्या व गळिताच्या धान्याचें पिकांना शेंकडा तीस ह्या प्रमाणांत खोट आली. ईशान्येकडील जलवायूंचा लोप झाल्याकारणानें पाऊस कमी झाला व त्यामुळें रब्बीचीं पिकें अर्ध्याहून फार कमी आलीं म्हणून कापडाचे व खाण्याच्या पदार्थांचे भाव फार वाढले. तशांत प्लेगव्याधीनें फार कहर केला. प्लेगनें त्यासालीं ह्या राज्यांतील ५०,००० हून अधिक बळी घेतले. एकट्या हैदराबाद शहरांतच १५,००० हून अधिक लोक प्लेगनें मेले. १३२७ फसलीही बहुतेक त्याच्या मागच्या सालाप्रमाणेंच गेली. अतिवृष्टीनें पिकांची नासाडी झाली. कांहीं जिल्ह्यांत जोंधळ्याची रुपायाला ५ शेर धारण झाली. खाण्याच्या पदार्थांचे भाव १३०९ फसलींतल्या मोठ्या दुष्काळांतल्या वेळाप्रमाणेंच किंवा त्याहून अधिक वाढले. ते इतर ठिकाणांहून आणवून पुरवावे म्हटलें तर युरोपांतील महायुद्धामुळें रेलवे कंपनीकडून मालाचे पुरेसे डबे ( वाघिणी ) मिळेनात.

सरकारी दुकानें लावून धान्य एकत्र करून ठरीव दराप्रमाणें विकण्याचे पुष्कळ प्रयत्न करावे लागले. रयतेला पांचलक्ष रुपयांपर्यंत तगाईच्या रूपानें कर्जाऊ द्यावे लागले.

सामान्य पाटबंधाऱ्याच्या कामासाठीं दोन लक्ष रुपये मंजूर करावे लागले. दुष्काळांत तेरावा महिना म्हणतात त्याप्रमाणें अशा आपत्तीच्या वेळेला प्लेगोबानेंही जिल्ह्यांतून साधारणपणें डोकें वर काढिलें. १३२८ फसलीनेंही मागील दोन सालांचा कित्ता उचलला. पर्जन्याच्या अभावीं पिकें चांगलीं न आल्यानें सरकारला गरीब लोकांकरितां दुष्काळी रिलीफ कामें काढावीं लागलीं. अशा कामांत सरकारला ४५ लक्ष रुपये खर्च करावे लागले. दररोज सरासरी ८५,००० लोकांना मजुराचें काम करावें लागलें. ह्या दुष्काळाला जोड म्हणून इन्फ्लुएन्झा नामक ज्वर उद्भवला. ह्या तापामुळें हैद्राबाद राज्यांत सुमारें ३,५०,००० लोक मृत्युमुखीं पडले. कोठें कोठें प्लेगही होता. १३२९ फसलींत पाऊस फार कमी होता. राष्ट्रांतील १६ जिल्ह्यांपैकीं अकरांत **पाण्याचा दुष्काळ.** शेवटीं शेवटीं पडलेल्या पावसानें पिकें कांहीं ठिकाणीं बरींच आल्यानें खाण्याच्या जिनसांचे भाव किंचित् उतरले. इतक्यांत राज्यांतून प्लेगनें सुमारें २१,००० लोक उचलले. त्यापेक्षां मलेरिया तापानें जास्त ह्यानि झाली. ह्या तापानें सुमारें ८०,००० हून अधिक लोक मेले. ह्या दहा वर्षांत हैद्राबाद राज्यांत प्लेगनें १,९४,३२५ व कालऱ्यानें ( पटकी ) ४२,२४६ लोक मरण पावले.

अशा विपत्तींत गेलेल्या ह्या दहा वर्षांत जन्मलेल्या संख्येपेक्षां मृतांची संख्या फार अधिक झाल्यानें, जगून राहिलेल्यांतले कांहीं लोक दुष्काळामुळें आपल्या चरितार्थाकरितां शेजारी असलेल्या ब्रिटिश इंडियांत ( इंग्रजी हद्दींतील मुलुखांत ) गेल्यानें व इतर देशांहून आलेल्यांची संख्या कमी झाल्यानें जनसंख्या कमी झाली.

ह्या खालील कोष्टकावरून हा विषय वाचकांच्या लक्षांत चांगला येईल.

| जन संख्या | १९११ | १९२१ |
|---|---|---|
| राज्यांत आले | २,६०,७१३ | २,०३,७८१ |
| राज्यांतून निघून गेले | ३,०६,९९३ | ३,६५,२३१ |

हिंदुस्थानांतील विविधप्रांतांतून ह्या राज्यांत येणाऱ्यांमध्यें शेंकडा ८६ लोक मद्रास व मुंबई व मध्यप्रांत आणि वऱ्हाडांत राहणारे आहेत. ह्या तिन्ही प्रांतांनीं मिळून आमच्याकडे १,७०,०२७ लोकांची रवानगी केली. ह्या जनसंख्येंत मद्रास इलाख्यांतून आलेल्यांची संख्या शेंकडा ४९, मुंबई इलाख्यांतली शेंकडा ३६ व मध्यप्रांत व वऱ्हाडांतून आलेल्यांची शेंकडा १५ भरतें.

ह्या राज्यांतून हिंदुस्थानांतील निरनिराळ्या प्रांतीं गेलेल्यांची संख्या ३,६,४,३४१ होती. ह्यांत ३,३८,०८८ म्हणजे शेंकडा ९२ वर दिलेल्या तीन प्रांतांत गेले. शेंकडा ६१ मुंबई इलाख्यांत, २७ मध्यप्रांतांत व वऱ्हाडांत, व १२ मद्रास इलाख्यांत गेले.

## जनन मरण

| प्रांत | १९११ पासून १९२० पर्यंत. | |
|---|---|---|
| | जनन संख्या | मरण संख्या |
| तेलंगण | ५,२०,२१८ | ८,१६,४८१ |
| महाराष्ट्र | ४,५६,५५५ | ७,६१,२१९ |
| एकूण | ९,७६,७७३ | १५,७७,७०० |

दर मैलीं लोकसंख्येचें प्रमाण.

मागच्या दहा वर्षांत ह्या राज्यांत राहणारांची सरासरी दरमैलाला १६२ होती ती हल्लींच्या दशकांत १५१ भरली. ह्यांत १२९ लोक हिंदू, १६ मुसलमान, ५ जंगली जातीचे व राहिलेल्या एकांत ख्रिस्ती इत्यादिकांचा समावेश होतो.

प्रांतवारीनें पाहिलें असतां तेलंगणांत दरमैली १५५ व महाराष्ट्रांत १६६ लोकवस्ती पडते.

## राज्यांतील विविधमतानुयायी लोकांची संख्या

| | धर्म व पंथ | पुरुष | | स्त्रिया | | एकूण | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | १९११ | १९२१ | १९११ | १९२१ | १९११ | १९२१ |
| १ | हिंदू ... ... ... | ५८,९७,१५८ | ५४,०६,५९३ | ५७,२८,९८८ | ५२,४९,८६० | १,१६,२६,१४६ | १,०६,५६,४५३ |
| २ | जैन ... ... ... | ११,०३२ | ९,८५२ | ९,९९४ | ८,७३२ | २१,०२६ | १८,५८४ |
| ३ | शीख ... ... | २,६४३ | १,५३९ | २,०८३ | १,२०६ | ४,७२६ | २,७४५ |
| ४ | मुसलमान ... ... | ७,०६८२१ | ६,६४,०२२ | ६,७४,१३९ | ६,३४,२५५ | १३,८०,९९० | १२,९८,२७७ |
| ५ | ख्रिस्ती ... ... | २९,४९५ | ३३,१३९ | २४,८०१ | २९,५१७ | ५४,२९६ | ६२,६६५ |
| ६ | पारशी ... ... | ८२२ | ७५८ | ७०७ | ७३२ | १,५२९ | १,४९० |
| ७ | जंगली जातीचे ... | १,४९,०२३ | २,२८,७७५ | १,३६,६९९ | २,०१,९७३ | २८५,७२२ | ४,३०,७४८ |
| ८ | इतर ... ... ... | १२४ | ३९३ | ११७ | ४२४ | २४१ | ८१७ |
| | एकूण | ६७,९७,११८ | ६३,४५,०७१ | ६५,७७,५५८ | ६१,२६,६९९ | १,३३,७४,६७६ | १,२४,७१,७७० |

वरील कोष्टकावरून पाहतां ह्या राज्यांतील लोकसंख्येच्या मानानें हिंदूंचा नंबर पहिला लागतो. कारण त्यांची संख्या शेंकडा ८५ पडते, दुसरा नंबर मुसलमानांचा, कारण त्यांची शेंकडावण १० बसते, जंगली जातींची संख्या शेंकडा ३ भरते, सबब त्यांचा नंबर तिसरा येतो व ख्रिस्ती लोकांची संख्या शेंकडा ½ असल्यानें ते चवथ्या नंबरावर येतात. आठव्या ( इतरपंथाचे ) सदराची संख्या ८१७ आहे तिची फोड येणें प्रमाणें:—

५४५ आर्यसमाजी.

२५८ ब्रह्मसमाजी,

१० बौद्धमताचे.

४ ( ज्यू ) यहूदी.

एकूण ८१७

हिंदुधर्मतत्त्वाच्या दृष्टीनें विचार केला असतां हिंदुधर्मात जन्म पावून कोणत्याही मतांचा अवलंब केला तरी त्या मनुष्याची गणना हिंदूंतच होते म्हणून ४ ज्यू मताचे वगळले तरी राहिलेल्या ८१३ ची गणना हिंदूमध्येंच करावी लागते. पण सरकारच्या रिपोर्टांत हे वर्ग वेगळे दाखविण्यांत आले आहेत.

राज्यांतील एकंदर स्त्रीपुरुषांची संख्या पाहतां दर एक हजार पुरुषास ९६६ स्त्रियांचें प्रमाण पडतें. मागील दशाब्दांत ही संख्या ९६८ होती. प्रांतवार पाहिलें तर तैलंगणांत मागील दशाब्दांत हें प्रमाण ९५५ असून ह्या दशाब्दांत ९६१ वर आलें आहे. महाराष्ट्रांत मागील दशाब्दांत हें प्रमाण ९८१ असून ह्या दशाब्दांत तें ९७१ वर आल्याचें कळून येतें. महाराष्ट्रांत स्त्रियांची संख्या कमी होण्याचीं कारणें म्हटलीं म्हणजे पुष्कळ लोकांचें जीवनार्थ आसपासच्या ब्रिटिश प्रांतांत निर्गमन व स्त्रियांवर अधिक करडी नजर ठेवणारें प्लेग, इन्फ्लुएन्झा व्याधींचें ह्या प्रांतांत अधिक वेळां आगमन, हें होय.



## लोकसंख्येचा जिल्हेवार, व धर्मवार तपशील.

| जिल्हा | हिंदु | जैन | शीख | मुसलमान | ख्रिस्ती | पारशी | जंगलीजातीचे | इतर | एकूण |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| हैद्राबाद ( शहर ) | २,११,५८९ | १,२३८ | ७३८ | १,७४,५२६ | १३,७१७ | ९० | ६६८ | ८०३ | ४,०४१८७ |
| अतराफबल्दा | ४,३४,८२३ | १०९ | १८ | ५४,१३६ | १,०४२ | ७२ | ७,२९८ | ,, | ४,९७,४९८ |
| वरंगल | ७,४४,४७६ | ८९ | १६७ | ५३,२७६ | ११६०६ | १४४ | १,१५,२८७ | ,, | ९,२५,०४१ |
| करीमनगर | १०,३४,४३९ | ५ | ७२ | ४५,६५५ | १,५८१ | १ | १३,६९१ | ,, | १०,९५,४४४ |
| आदिलाबाद | ५,२९,५९३ | २१४ | ९ | ३५,२१८ | ६८१ | ६ | ८९,७९९ | ,, | ६,५५,५३६ |
| मेदक | ५,७०,९८३ | २२९ | ६ | ५९,९५१ | ६,७०३ | ,, | ४,९२४ | ,, | ६,४२,७९६ |
| निजामाबाद | ४,५१,५०७ | १४५ | ६१ | ३६,८५२ | २,१९९ | २१ | ८,९८० | ५ | ४९९७७० |
| महबूब नगर | ६,६२,६५० | ४८ | ४८ | ६०,९४५ | १,१७० | ६ | २५,८६३ | ,, | ७,५०,७३० |
| नलगोंडा | ८,५८,०२८ | ३४ | ३७ | ५१,०४८ | ११,२३८ | २५ | २७,८९१ | , | ९,४८,३०१ |
| औरंगाबाद | ६,००,५१४ | ३,९३० | १४९ | ९४,२५५ | ५,२२३ | १५६ | ९,७८५ | ,, | ७१४००३ |
| बीड | ४,१६,७६१ | २,२६८ | ,, | ४१,२६४ | ६१ | ,, | ७,२६२ | ,, | ७६५७८७ |
| नांदेड | ५,७९,०२९ | ८६७ | १,१५१ | ७३,०२३ | ३२ | २० | १६,८८२ | ६ | ६७१०१८ |
| पर्भणी | ६,६१,२२५ | ३,०६१ | ७७ | ७४,१६० | ३३० | ४८ | २६,८८६ | ,, | ४,६७,६१६ |
| गुल्बर्गा | ८,७४,४७२ | १,८२८ | ४० | १,०७,६२३ | १,३३४ | ५८ | ४७,३९६ | ३ | १०३२७५४ |
| उस्मानाबाद | ५,४६,८१२ | ३,०४६ | ,, | ६२,३२३ | २१६ | ,, | २,८१९ | ,, | ६,१५,२१६ |
| रायचूर | ८,१३,५५६ | ६५६ | ३३ | ९२,८०२ | १,९७५ | १६ | १३,२८४ | ,, | ९,२२,३२२ |
| बीदर | ६,६५,९९६ | ७८७ | १३१ | १,१८,२२४ | ३,६४८ | ,, | १२,०६५ | ,, | ८,००,७५१ |
| राज्याची वटसंख्या | १,०६,५६४५३ | १८,५८४ | २,७४५ | १२,३५,२७७ | ६२,६५६ | १,४९० | ४,३०,७४८ | ८१७ | १,२४,०८,७७० |

म्हटलें तरी प्रजाजनांनीं प्रत्यक्ष कार्याकरितां कंबर कसल्याशिवाय केवळ सरकारी प्रयत्न अपुरे पडणार हेंहि तितकेंच खरें.

अशा शिक्षण परिषदेची जाणीव आम्हांस १३२४ फ. मध्यें येथें जी अधिकाऱ्यांनीं जनतेंत शिक्षणाविषयीं आवड उत्पन्न करण्याकरितां पहिली शिक्षण परिषद् भरवली त्यावरून आली. आजपर्यंत या परिषदेच्या आठ बैठकी झाल्या असून पहिल्या बैठकीचें अध्यक्षस्थान नबाब हैदर नवाज जंग बहादूर व शेवटचीचें नबाब जुलकदर जंग बहादूर यांनीं अलंकृत केलें होतें. या सर्व अधिवेशनांत सरकारी अधिकाऱ्यांनीं कमालीचे श्रम घेतले ही गोष्ट खरी असली तरी जनतेला अपेक्षेप्रमाणें त्याचा फायदा मिळाला नाहीं असें मोठ्या कष्टानें म्हणावें लागतें. याचें कारण कदाचित् आम्हांला त्यांत भाग घेण्याला संधि मिळाली नसेल किंवा त्याचा फायदा घेण्याची आमची पात्रताहि नसेल ! कोणी सांगावें ? कारण परिषद् भरवण्याचा खरा हेतु म्हणजे बहुजन समाजानें एकत्र विचारविनिमय करून एखादें कार्य व्यवहार्य करणें असा असतो, हें सर्वांस ठाऊकच आहे. प्रजाशिक्षण परिषदेची अवश्यकता गत सालीं येथील कांहीं लोकपक्षीय पुढाऱ्यांना भासूं लागली व अशा प्रसंगीं प्रजेच्या मनांतील विचार योग्यप्रकारें मांडील असा बिनसरकारी अध्यक्ष मिळण्याचा प्रयत्नहि झाला, पण गत सालीं त्या कल्पनेला मूर्तस्वरूप आलें नाहीं. म्हणून येथें त्या करितां नेमलेल्या एका कमिटींतील लोकपक्षीय पुढाऱ्यानें सरकारी शिक्षण परिषदेकडे कांहीं ठराव पाठवून आपल्या म्हणण्याकडे अध्यक्षांचें लक्ष वेधण्याचा प्रयत्न केला. परंतु ते परिषदेपुढें येऊनहि दिले नाहींत. प्रजाशिक्षण परिषद् भरवण्याचा आज सुप्रसंग लाभला असून ती प्रजेच्या शिक्षणप्रगतीला चालना देईल व संस्थानच्या इभ्रतींत भर घालील अशी आशा करण्यास जागा आहे.

आपल्या सध्यांच्या आला हजरतच्या कारकीर्दींत शिक्षणाला चालना मिळाली त्यामुळें प्रजेंतील व्यक्तींच्या भावना व महत्वाकांक्षा

उद्दीपित झाल्या आहेत. त्यांस संघटित स्वरूप देऊन योग्य मार्गानें वळण न दिल्यास आपण आपल्या कर्तव्यापासून च्युत झालों असें होईल, असें वाटूनच ता. ९ आबान १३३७ फ. रोजीं येथील कांहीं सुशिक्षित मंडळींनीं सरकारी परिषद् भरण्यापूर्वीं आपल्या शिक्षण-विषयक भावना व आकांक्षा जाहीर कराव्या या हेतूनें प्रस्तुत परिषद् भरवण्याचें ठरवलें. व त्याप्रमाणें आज आपण स्वतंत्रपणें विचार-विनिमय करण्याकरितां येथें जमलोंही. परंतु या परिषदेबद्दल कांहीं हितशत्रूंनीं ती हिंदुमुसलमान व सरकारी अधिकारी व प्रजा यांच्यांत भेदभाव उत्पन्न करण्याकरितां भरत असल्याचा दुष्ट प्रयत्न चालविला आहे. त्याबद्दल एवढेंच सांगावयाचें कीं, हे आरोप पूर्ण निराधार असून त्यांस वेळोवेळीं उत्तरेंहि देण्यांत आलीं आहेत; तरी पण मी इतकेंच सांगतों कीं ही परिषद् वरील सारख्या गलिच्छ आरोपांस अगदीं अपात्र असून ती जाति--वर्ण--धर्म--भेदापासून पूर्णपणें अलिप्त आहे. प्रत्येकाला या परिषदेचा फायदा घेतां यावा अशी योजना करणें एवढ्याच परि-देचा खरा हेतु आहे.

आतां आपण आपल्या प्रस्तुताकडे वळूं. या परिषदेंत दोन प्रकारचे ठराव येतील. एक प्रजेच्या शिक्षणाशीं प्रत्यक्ष संबंध असेल अशा सूचना व दुसरा प्रकार म्हणजे शिक्षणाच्या मार्गांत उत्पन्न झालेले अडथळे दूर करण्यासंबंधीं. येथील शिक्षणपद्धतींत दिवसें-दिवस अनिष्ट बदल होत असल्याचें अलिकडे दिसून आलें असून शिक्षणावर प्रजेचा इतका पैसा खर्च होत असतांहि प्रगतीच्या नांवानें शून्य. असें कां होतें तें आतां आपणांस पाहिलें पाहिजे. सन १८८० इसवी पासून येथील सुशिक्षितांचें प्रमाण पाहिलें तर तें २८ वरून ३८ वर गेल्याचें दिसतें ! ही गोष्ट खरोखर अभिनंदनीय नाहीं. आमचें संस्थान शिक्षणांत फारच मागसलेलें आहे ही गोष्ट पहिल्या सरकारी परिषदेच्या अध्यक्षांनीं त्रावणकोर, म्हैसूर वगैरे ठिकाणच्या परिस्थि-तीशीं तुलना करून त्याच वेळेस जाहीर केली व त्यांत अद्यापहि

कांहीं फरक झालेला नाहीं. जगांतील झगडयाशीं तोंड द्यावयाचें म्हणजे अज्ञानाचें प्रथम उच्चाटण करणें जरूर आहे. वरिष्ठ शिक्षण देखील टाळतां येण्यासारखें नाहीं ही गोष्ट खरी असली तरी प्राथमिक शिक्षण सार्वत्रिक करण्याकडे प्रथम लक्ष पुरवणें हें कर्तव्य होय. त्याचप्रमाणें शिक्षणप्रसारांत सरकारी अधिकाऱ्यांकडून ज्या अडचणी उपस्थित केल्या जात आहेत, त्या दूर करण्याचाही प्रयत्न झाला पाहिजे. यंदाच्या सरकारी शिक्षण परिषदेचे अध्यक्ष महाराजा बहादूर असून ते आमच्या परिषदेंत पास झालेल्या ठरावांकडे सहानुभूतिपूर्ण नजरेनें पहातील अशी आशा आहे. आज आपल्यास पं. हृदयनाथ कुंझरूसारखे विद्वान गृहस्थ लाभले आहेत. त्यांच्या नेतृत्वाखालीं परिषदेचें कार्य यशस्वी रीतीनें पार पडावें, व आपण त्यांचें भाषण लक्षपूर्वक ऐकावें, अशी विनंति करून मी आपलें भाषण पुरें करतों.

---

# अध्यक्ष



**पंडित हृदयनाथ कुंझरु, एम. एल. ए., यांचें भाषण.**

आजच्या या सुप्रसंगीं अध्यक्षस्थान स्वीकारण्याचा जो मान आपण मला दिला आहे त्याबद्दल आपणां सर्वांचे आभार मानणें मी आपलें कर्तव्य समजतों. हैद्राबाद संस्थानामध्यें लोक अलिकडे शिक्षण-विषयासंबंधानें कळकळ व्यक्त करूं लागले असल्याचें पाहून प्रत्येकास समाधान वाटेल अशी माझी खात्री आहे. गतवर्षीं येथें जी शिक्षणपरिषद भरली तिचे अध्यक्ष नबाब जुलकद्र जंग बहादूर, शिक्षण खात्याचे सेक्रेटरी, यांनीं शिक्षणप्रसार सर्वत्र होणें असेल तर लोकांनींहि आपआपल्यापरी मदतीकरितां पुढें आलें पहिजे असें म्हटले होतें. त्यांनीं असेंहि सांगितलें कीं, शिक्षणप्रसारार्थ जनतेंत जागृति घडवून आणण्याचें कार्य लोकांनीं करण्यास सुरुवात केली तर सरकार त्यांच्या प्रयत्नांकडे सहानुभूतिपूर्ण दृष्टीनेंच पाहील. गतसालीं नबाब साहेबांच्या या उत्तेजक भाषणाचा सुपरिणाम म्हणजेच आजची प्रजाशिक्षण परिषद असेंहि एका अर्थानें म्हणण्यास हरकत नाहीं. परिषद कोणत्याही विशिष्ट धर्मीयांची अथवा भाषीयांची नसून संस्थानांतील प्रत्येक नागरिकास जाति–धम–पंथाचा यत्किंचितहि विचार न करितां परिषदेंत भाग घेण्याचा त्यास पूर्ण अधिकार आहे. अशा तऱ्हेच्या प्रयत्नांमुळें संस्थानांतील शिक्षणपद्धतीत जनतेस अधिकाधिक भाग घेण्याची संधि मिळत असल्यानें अशा प्रयत्नांचें सर्वांकडून सदैव स्वागतच व्हावें.

गेल्या कांहीं वर्षांपासूनच्या येथील सरकारच्या फायनॅन्स खात्याच्या धोरणाबद्दल सरकारचे आभार मानणें जरूर आहे. या खात्याकडून शिक्षणाकडे अलिकडे विशेष लक्ष देण्यांत येत असतें ही समाधानाची गोष्ट होय. सरकारी अहवालावरून सरकारचें हें प्रगतिपर धोरण उत्तम

तऱ्हेनें नजरेस येतें. कारण सन १९११-१२ सालांत येथील सरकार-कडून उच्च शिक्षणाकरितां एक लाखाहूनहि खर्च कमी होत होता परंतु तेव्हांपासून पुढें २॥ लाख झाला. खासगी ४००० शाळांवरील खर्च त्यांत सामील केल्यास ३॥-लाख रुपये व तो वाढतां वाढतां १९२५ पर्यंत लोकलफंड, खासगी शाळा वगैरेवरील सर्व शिक्षणखर्च घेतला तर तो ७४ लक्षांपर्यंत गेल्याचें आढळेल. त्यांत बराचसा खर्चाचा भाग वरिष्ठ शिक्षणाकडे विशेषतः उस्मानिया विद्यापीठावर होत असतो. उस्मानिया विद्यापीठाच्या कार्याबद्दल मतभेद असूं शकेल. तरी पण विद्यापीठाच्या कक्षेंत जें कार्य होत आहे त्याकडे भविष्यत्कालीं सुधा-रणा होईल, अशा आशापूर्ण दृष्टीनेंच नवीन होतकरूंनीं पहावें, असें मला वाटतें. शिवाय प्रचलित शिक्षणपद्धतींतहि कांहीं विचारणीय गोष्टी आहेत.

सरकारीरीत्या शिक्षणावर येथें खर्च होत असल्याचें वर जें दाखविलें आहे त्याच्याशीं तुलना करितां तितकाही शिक्षणावर खर्च करणारीं संस्थानें क्वचितच सांपडतील. परंतु वर जो ७४ लाख रुपये खर्च होत असल्याचें सांगितलें त्यांत प्राथमिक शिक्षणावर फक्त २१½ लाख किंवा शेंकडा ३० खर्च होतो व तो पुष्कळ होतो असें नाहीं. मात्र म्हैसूर सरकार व ब्रिटिश इंडिया यांतहि हीच स्थिति आहे. सन १९२५ सालीं ब्रिटिश सरकारनें २२॥ कोटी शिक्षणखर्चांतून ६॥-कोटि रुपये प्रत्यक्षतः प्राथमिक शिक्षणावर खर्च केले आहेत. प्राथमिक शिक्षणावर अधिक खर्च करण्यांत, हैद्राबादच्या कांहीं दक्षिणेकडील व कांहीं उत्तरेकडील संस्थानें फारच पुढें आहेत असें दिसेल. म्हैसूर सरकार आपल्या एकंदर ३३९ लक्ष रु. उत्पन्नांतून २१½ लक्ष रुपये प्राथमिक शिक्षणावर खर्च करतें. त्याचप्रमाणें त्रावणकोर व बडोदें येथील सरकारचीं उत्पन्नें अनुक्रमें २३० व २४० लक्ष रुपये अशीं आहेत व तीं संस्थानें अनुक्रमें २१½ व १९ लक्ष रुपये खर्च करतात. हैद्रा-बादच्या मानानें पहातां वरील प्राथमिक शिक्षणाचा खर्च पुष्कळच अधिक आहे हें उघड आहे.

हैद्राबाद संस्थानांतील सुशिक्षितांचें प्रमाण पाहिलें तर तेंहि इतर पुढें आलेल्या संस्थानांच्या मानानें फार कमी असल्याचेंच आढळेल. हैद्राबादेमध्यें शेंकडा २॥, ब्रिटिश इंडियांत शें. ४, म्हैसूरमध्यें शें. ५॥, बडोद्यांत शें. १०, त्रावणकोरमध्यें शेकडा १२॥, असें सुशिक्षितांचें प्रमाण पडतें. गतसालीं शिक्षण परिषदेच्या अध्यक्षांनीं हैद्राबादच्या या मागासलेल्या परिस्थितीवर विशेष जोर दिला होता. शिक्षणविषयक परिस्थिति ब्रिटिश इंडियांत देखील समाधानकारक आहे असें नाहीं. आतां स्त्रीशिक्षणासंबंधीं विचार करूं लागल्यास मात्र येथें अनुकूल परिस्थिति असूनहि समाधानकारक स्थिति नाहीं, याचें आश्चर्य वाटतें. उत्तर हिंदुस्थान अथवा बंगाल वगैरेसारखा पडद्यासंबंधीं कडक निर्बंध नसतांना येथें स्त्रीशिक्षणासंबंधीं अशी मागासलेली परिस्थिति कां असावी ? नवीन रिपोर्टावरून पहातां येथें फक्त एकंदर शिक्षण घेणाऱ्या मुलींची संख्या ३५ हजार असल्याचें आढळतें. ही स्थिति अत्यंत विघातक आहे. कारण स्त्रिया या राष्ट्रांतील नागरिकांच्या जननी असून त्यांच्याकडून त्यांच्या आपत्यांस शिक्षण मिळणार. मी असेंही एक वेळ म्हणेन कीं, मुलांचें शिक्षण मागें ठेवूनहि मुलींना अवश्य शिक्षण देण्याचा उपक्रम झाला पाहिजे. मुलींच्या शिक्षणाच्या बाबतींत हिंदु मुसलमानांनीं अफगाणिस्थानचें उदाहरण दृष्टीपुढें ठेवावें. तेथील सरकारनें फ्रान्समध्यें शिक्षणार्थ नुकत्याच मुली पाठवल्या आहेत हें आतां सर्वांस विदित आहे.

प्राथमिक शिक्षण देण्याची अत्यंत आवश्यकता आहे ही गोष्टही आतां दुर्लक्ष्य करण्यासारखी नाहीं. व सक्तीचें प्राथमिक शिक्षण केल्याशिवाय प्राथमिक शिक्षण सार्वत्रिक होणेंहि शक्य नाहीं. सक्तीनें प्राथमिक शिक्षण सुरू करावयाचें तर खर्चाची तरतूद झाली पाहिजे. परंतु येथील जमाखर्चखात्याचा अहवाल पाहिला तर येथें ही गोष्ट अवश्य वाटत नाहीं. कारण गेल्या दोन वर्षांत सरकारी खजिन्यांत चार कोटी रुपये शिल्लक पडली असल्याचें आढळतें. शिवाय अंदाजपत्रक पाहिलें

तरीही प्रत्येक वर्षी ५० हजार रुपये शिल्लक पडणार असें दिसतें. शिवाय लोकलफंडाकडून शिक्षणार्थ मिळणाऱ्या रकमेपैकींहि ५५॥ लाख रुपये शिल्लक आहेत ! शिक्षणाशिवाय या रकमांचा अधिक चांगला उपयोग काय करणार ! शिक्षणाच्या प्रत्येक शाखेवर अवश्य तो खर्च करण्याची येथील सरकारची आर्थिक स्थिती आहे यांत तर शंकाच नाहीं. याकरितां या सूचनेचा अवश्य विचार व्हावा. दुसरी गोष्ट शिक्षणावर होणाऱ्या खर्चाच्या योजनेचा विचार करण्याकरितां एक कमिशन नेमणें जरूर आहे, अशा कमिशनाचा बाहेर तादृश उपयोग झाला आहे असें नाहीं. कारण कमिशन पुष्कळ वेळां कालातिक्रम करण्याचें एक साधन असेंच ठरलें आहे. पण तोहि एक मार्ग आहे. तरी सरकारनें याही सूचनेचा विचार करावा. शिक्षणाच्या प्रगतीकरितां सरकार आपल्याकडून प्रयत्न करीत आहेच पण लोकांनींहि जागृत होऊन तिकडे लक्ष्य द्यावें एवढेंच सुचवावयाचें आहे.

संस्थानामध्यें एकंदर खासगी शाळांची संख्या ४००० असून त्यांतून ७६००० विद्यार्थी शिक्षण घेत आहेत हें आपण पूर्वी पाहिलेंच. या सर्व शाळांतून विद्यार्थ्यांची एवढी मोठी संख्या आहे, यावरूनच शैक्षणिक दृष्ट्या त्यांची योग्यता कोणत्याही प्रकारें कमी असावी असें वाटत नाहीं. परंतु सन १९२४–२५ सालीं एका सरकारी हुकुमानें खासगी शाळा नवीन निघण्याच्या मार्गांत नसतीं संकटें उपस्थित करण्यांत आलीं आहेत, इतकेंच नव्हे तर अशा खासगी शाळांपैकीं ज्यांस सरकारी मदत नाहीं त्यांच्या अस्तित्वावरहि गदा आली असल्याचें दिसतें ! संस्थानांतील सर्व शिक्षणेच्छु विद्यार्थ्यांची शिक्षणाचीं स्वतः सोय करण्याची सरकारनें तयारी दर्शविली असती तर एक वेळ सरकारचें वरील कृत्य समर्थनीय तरी ठरलें असतें ! शिक्षणेच्छु विद्यार्थ्यांच्या शिक्षणाची पूर्णत्वानें स्वतः सोय न करितां असला हुकूम काढणें केवळ अन्याय होय. वरील हुकूम काढण्याचीं कारणें मला

नीटशीं समजलीं नाहींत पण तो कोणत्याही कारणानें निघाला असला तरी यापुढें तो अंमलांत राहाणें योग्य नाहीं.

वाचनालयांसारख्या शैक्षणिक संस्थांवर निर्बंध घातले जातात व वाचनालयांच्या वार्षिक समारंभालाही बंदी करण्यांत येते असें सांगण्यांत आलें आहे. असें असेल तर हैद्राबादच्या इभ्रतीला ही गोष्ट निखालस कमीपणा आणणारी आहे. आमच्याकडे असले प्रकार घडून येतील तर त्याबद्दल लोक आकाश पातळ एक करून सोडल्याशिवाय खात्रीनें राहणार नाहींत. असले निर्बंध ताबडतोब दूर झालेच पाहिजेत. शिक्षणाच्या माध्यमाचा विचार करतां मला येथें तेलगू व महाराष्ट्रीय लोक उर्दू बोलतांना पाहून अतिशयच आनंद झाला हें खरें असलें तरी मातृभाषांच्या वाढीकडे दुर्लक्ष करतां येणार नाहीं असें माझें स्पष्ट मत आहे. मातृभाषांना प्राथमिकच नव्हे तर दुय्यम व वरिष्ठ शिक्षणांतहि योग्य स्थान मिळालेंच पाहिजे. धार्मिकशिक्षणाबद्दल स्पष्टच मत द्यावयाचें तर शिक्षणांतून धार्मिक विषयांची जितक्या लौकर हाकालपट्टी होईल तितका देशाचा उद्धार लौकर होईल, हें नक्की समजावें. शिक्षणाचा प्रमुख उद्देश देशाला उपयुक्त असे खरे नागरिक तयार करणें हा आहे. व खरें नागरिकत्व जातिधर्मपंथांना दूर ठेवण्यानेंच प्राप्त होणारें आहे. अफगाणिस्थान, तुर्कस्थान वगैरे देशांचें उदाहरण या बाबतींत दृष्टीपुढें ठेवण्यासारखें आहे. असो. माझे विचार मीं आपल्या पुढें मांडले आहेत व त्यांवर आपणहि विचार करून आपल्या देशाच्या प्रचलित स्थितींत योग्य तो मार्ग आपण स्वीकारावा अशी विनंति करून मी आपलें भाषणें पुरें करतों.

---

# परिषदेंत पास झालेले ठराव.



**ठराव १ लाः**—आला हजरत निझाम सरकाराविषयीं राजनिष्ठा व्यक्त करणें ( बॅ. नाईक, अनुमोदक—पांडुरंगराव जोशी )

**ठराव २ राः**— शिक्षणावर सरकारीरीत्या झालेल्या खर्चाची विभागणी आजपर्यंतच्या अनुभवावरून समाधानकारक दिसून न आल्यामुळें शैक्षणिक धोरण प्रगतिपर होण्याकरितां सरकारी व बिन-सरकारी सभासदांचें कमिशन नेमून चौकशी करावी. ( सूचकः— बॅ. रामचंद्र नाईक, अनुमोदक—मौ. गुलाम पंजतनसाहेब ).

**ठराव ३ राः**— प्राथमिक शिक्षण हैद्राबाद शहरापुरतें सक्तीचें व मोफत करण्याविषयीं सरकारनें आखलेल्या धोरणाबद्दल आम्ही सरकारचे आभार मानीत असून पुढील गोष्टींकडे त्यांचें लक्ष वेधतों. ( अ ) सक्ती फक्त मातृभाषेपुरतीच असावी आणि विद्यार्थ्यांचें शिक्षण त्यांच्या मातृभाषेंतच दिलें जावें, ( ब ) क्रमाक्रमानें शहरांतून, कसब्यांतून व खेड्यांतूनहि प्राथमिक शिक्षण सक्तीचें करावें, ( क ) प्राथमिक शिक्षण मोफत देण्याकरितां झालेल्या फर्मानाची पूर्णपणें अंमलबजावणी व्हावी. ( सूचकः— दे. वामनराव नाईक, अनु.—के. रामकिशनराव )

**ठराव ४ थाः**— सरकारनें अस्पृश्यांकरितां स्थापन केलेल्या शाळांबद्दल सरकारचे आम्ही आभार मानीत असून त्यांच्या शैक्षणिक सुधारणेकरितां अधिक प्रयत्न करावे. ( अध्यक्ष )

**ठराव ५ वाः**— संस्थानांतील प्रजेच्या शैक्षणिक प्रगतीकरितां खालील गोष्टी शक्य तितक्या लौकर अमलांत आणाव्या ( अ ) सन १३३४ फसलींत खासगी शाळांच्या स्थापनेसंबंधीं झालेला कायदा रद्द करण्यांत यावा, ( ब ) मालगुजारीची गस्ती नि. नं. २२ सन १३३० फ. आणि नि. ( नं. नाहीं ) १६ दय सन १३२० फसली या अन्वयें खासगी शाळा व वाचनालयें यावर सरकारी देखरेख सुरू झाली. त्या

गस्त्याचें उच्चाटण करण्यांत यावें. ( क ) शिक्षणसंबंधीं सार्वजनिक सभांवर घालण्यांत आलेले निर्बंध दूर करण्यांत यावे. ( सूचकः– श्री. काशिनाथराव वैद्य एम्. ए. एल्. एल्. बी, अनुमोदक–श्री. पी. व्यंकट-रंगराव वकील. )

**ठराव ६ वा:**– येथील स्टेट लायब्ररींत तेलगू, कानडी, मराठी व हिंदीचीहि एक एक शाखा उघडण्यांत यावी व त्या भाषांतील पुस्तकांच्या हस्तलिखित प्रतीहि ठेवण्यांत याव्या. तसेंच संस्कृत पुस्तकांच्या शाखेंतहि वाढ करण्यांत यावी ( सूचकः– श्री. श्रीपतराव पळनिटकर, हा. को. वकील, अनुमोदक–श्री. के. व्यंकटेश्वरराव )

**ठराव ७ वा:**– पुणें महिला विद्यापीठाच्या अभ्यासक्रमांस अनुसरून हैद्राबाद, औरंगाबाद, वरंगल, गुलबुर्गा या ठिकाणीं एकएक स्त्रियांकरितां हायस्कूल काढावें ( सू:– श्रीमती सौ. अहल्याबाई मल्लण्णा, अनुमोदक–पंडित राम कोटेश्वरराव वकील )

**ठराव ८ वा:**– हिंदीभाषेचें महत्त्व लक्षांत घेऊन उस्मानिया विद्यापीठांतील अभ्यासक्रमांत हिंदीचा समावेश व्हावा ( सूचकः–राय विश्वंभर दयाळ वकील, अनुमोदक–श्री. कृष्णस्वामी मुद्दीराजा )

**ठराव ९ वा:**– ( अ ) इतर विद्यापीठांप्रमाणें उस्मानिया विद्यापीठाच्या संबंधीं कायदा कायदेमंडळाकडून पास करून घ्यावा. ( ब ) उस्मानिया विद्यापीठाच्या कॉलेजांत कांहीं देशी भाषांच्या शिक्षणार्थ प्रोफेसराची अद्याप नेमणूक झाली नाहीं. ती देशी भाषांचें महत्त्व लक्षांत घेऊन करण्यांत यावी ( सूचकः– पं. केशवरावजी. अनु.–श्री. बळवंतराव घाटे. )

**ठराव १० वा:**– संस्थानांत ( १ ) शेतकी ( २ ) आयुर्वेदिक ( ३ ) व्यापार व कर्नाटकाकरितां एक नॉर्मल स्कूल या शाळांची आवश्यकता आहे. या काढण्याची व्यवस्था करावी ( सूचकः–श्री. लक्ष्मी नरसय्या वकील, अनु.–श्री. हकीम रामकृष्णय्या. )

**ठराव ११ वाः–** (अ) शिक्षणक्रमांतील धार्मिक विषय जातीय व देशीय प्रगतीला विघातक असल्यानें शिक्षणक्रमांतून धार्मिक शिक्षणक्रमाला अजीबात फांटा द्यावा, (ब) ट्रॅन्स्लेटिंग ब्यूरोमध्यें पुस्तकांची निवड करण्याची पद्धतीच काढून टाकण्यांत यावी. ( सूचकः– मौ. बशीर अहंमद साहेब बी. ए., अनुमोदक–मौ. गुलाम पंतजन साहेब, हा. को. वकील, बॅ. एस्. बी. शर्मा )

**ठराव १२ वाः–** जाहगीरी, संस्थानें, व सेर्फखासमध्यें शैक्षणिक परिस्थिति आज जी दिसते ती पहातां त्यांत सुधारणा होणें जरूर आहे. तरी त्यांच्या मालकांनीं तेथील शिक्षण प्रगती करितां लक्ष द्यावे ( सूचकः– श्री. पाटील बी. ए. एल्. बी. वकील, अनु. श्री. एम्. रामचंद्रराव )

**ठराव १३ वाः–** परदेशी शिक्षणार्थ देण्यांत येणाऱ्या सरकारी शिष्यवृत्या विद्यार्थ्यांचे गुण व त्यांची सांपत्तिक दृष्ट्या गरिबीची स्थिति या दोन्ही गोष्टी विचारांत घेऊन देण्यांत याव्या ( सूचकः– श्री. शंकर नारायणराव बी. ए. अनुमोदक बॅ. विनायकराव, बॅ. श्रीधर नाईक.

**ठराप १४ वाः–** मेडिकल व इंजिनियरिंगचें शिक्षण संद्यःस्थितीचा विचार करून इंग्रजींतच द्यावें. ( सूचकः– डॉ. रामस्वामी नायडू अनुमोदक बॅ. रामचंद्र नाईक )

**ठराव १५ वाः–** या परिषदेचीं घटना तयार करण्याकरितां पुढील गृहस्थांची कमिटी नेमण्यांत येत असून त्यांना पुढील परिषदेच्या पुर्वी घटना तयार करून ती मंजूर करून घ्यावी. (१) पंडित केशवरावजी (२) श्री. काशिनाथराव वैद्य. (३) श्री. लक्ष्मणराव गानू (४) श्री. एम्. हणमंतराव ( सूचकः– राय विश्वेश्वरनाथ अनुमोदक श्री. बळवंतराव घाटे )

**ठराव १६ वाः**– परिषदेच्या ठरावाची योग्य ती व्यवस्था करण्याकरितां पुढील गृहस्थांची कमिटी नेमण्यांत येत आहे (१) पं. केशवरावजी (अध्यक्ष) (२) श्री. वामन रामचंद्र नाईक जाहागीरदार (जनरल सेक्रेटरी) (३) पं. एम्. हणमंतराव, श्री. बिंदु वकील, श्री. गोविंदराव कोठी वकील (जाईंट सेक्रेटरीज) (४) श्रीमती सौ. अहल्याबाई मल्लण्णा श्री. विठलराव देशपांडे, श्री. राय विश्वंभर दयाळ साहेब श्री. भीमसेनराव साहेब कुद्रीमोती (सभासद) अध्यक्षानां आधिक सभासद घेण्याचा अधिकार आहे.



# भाग तिसरा.

## हैद्राबादच्या १९२१ च्या खानेसुमारीचे
## रिपोर्टांतील कांहीं महत्त्वाची
## व
## इतर उपयुक्त माहिति

# हैद्राबाद राज्यवर्णन.

## चतु:सीमा



पूर्वेस वर्धा व गोदावरी ह्या नद्या असून पश्चिमेस मुंबई इलख्यांतील सोलापूर, विजापूर, धारवाड व अहमदनगर हे जिल्हे आणि दक्षिणेस कृष्णा व तुंगभद्रा ह्या नद्या व उत्तरेस खानदेश जिल्हा व वऱ्हाड प्रांत आहे.

## क्षेत्रफळ व लोकसंख्या.

ह्या राज्याचें क्षेत्रफळ ८२६९८ चौरसमैल असून एकंदर लोकसंख्या इ. स. १९२१ च्या खानेसुमारीप्रमाणें १ कोट, २४ लक्ष ७१, हजार ७७० आहे, त्यांत **हिंदू** एक कोट सहा लक्ष छप्पन हजार व **मुसलमान** बारा लक्ष आठ्याण्णव हजार आहेत. सर्व मुख्य जातीची संख्या खालील कोष्टकांत दिली आहे.

| हिंदू | जैन | शीख | मुसलमान | ख्रिस्ती | पारशी | वन्यजातीचे | इतर |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १,०६,५६,४५३ | १८५२४ | २,७४५ | १२,९८,२७७ | ३२,३५३ | ६४८० | ४,३०,७४८ | ८७१ |

ह्या राज्यांत एकंदर १५ जिल्हे व १०३ तालुके आणि १४२१८ (खालसांतील खेडीं) व जाहगिरी वगैरे मिळून एकंदर २१२२१ खेडीं आहेत. आणि एकंदर घरांची संख्या २७ लक्ष, २२ हजार, १७६ आहे.

खालसांतील एकंदर १०७ तालुक्यांपैकीं १३ तालुके व ( एक जिल्हा अतराफ बल्दादें = ) हे **"सरफखास"** इलाख्याचे ( – निझाम सरकारच्या खासगी खर्चाबद्दल तोडून घेतलेले ) आहेत.

खानेसुमारीच्या रिपोर्टात निझाम सरकारानीं ह्या राज्याचे दोन भाग केले असून तेलगू भाषा बोलणारे ज्या प्रदेशांत राहतात त्यास **तेलंगण** आणि मराठी भाषा बोलणारे विशेषेंकरून ज्या प्रदेशांत राहतात त्यास **मराठवाडी** ( महाराष्ट्र ) असें म्हणतात.

**तेलंगण भागांतील जिल्हेः**—अतराफबल्दा, ( हा जिल्हा सर्फखास इलाख्याचा आहे. ) वरंगल, करीमनगर, आदिलाबाद, मेदक, निजामाबाद, महिबूबनगर, नलगोंडा, हे जिल्हे तेलंगणांत मोडतात.

**महाराष्ट्रांतील जिल्हेः**—औरंगाबाद, बीड, नांदेड, परभणी, गुलबर्गा, उस्मानाबाद, रायचूर, बेदर, ह्या आठ जिल्ह्यांची मराठवाडींत गणना केली आहे

वर दर्शविलेल्या तेलंगण अर्थात् आंध्र आणि महाराष्ट्र ह्या दोन्ही प्रांतांतील लोकसंख्येचें प्रमाण येणेंप्रमाणें:—

| प्रांत | चौ. मैल | लोकसंख्या |
|---|---|---|
| तेलंगण | ४१३४१ | ६४१९२९८ |
| महाराष्ट्र | ४१३५७ | ६०५२४७२ |
| एकूण | ८२६९८ | १,२४,७१,७७० |

सर्व जिल्ह्यांत वरंगल जिल्हा मोठा ( ३९४४ चौ. मैल ) व अतराफबल्दा जिल्हा सर्वांत लहान ( २६५२ चौ. मैल ) आहे.

वरील कोष्टकाचा विचार करितां असें दिसून येईल कीं, ह्या राज्यांतील सर्व जिल्ह्यांपेक्षां करीमनगर जिल्ह्यांत हिंदू लोकवस्ती अधिक आहे. ह्या जिल्ह्यांतील लोकसंख्येंत शेंकडा ९४.४ हिंदू आहेत. **तेलंगणांत एकंदर ५४,९८,०८८ व महाराष्ट्रांत ५१,५८,३६५ हिंदू आहेत.** इतर जिल्ह्यांच्या लोकसंख्येशीं ताडून पाहतां तेलंगणांतील वरंगल जिल्ह्यांत हिंदूंची वस्ती सर्वांत कमी आहे असें दृग्गोचर होतें. त्यांत हिंदूंचें प्रमाण शेंकडा ८०.४ बसतें. तसेंच महाराष्ट्रांतील जिल्ह्यांत सर्वांत कमी प्रमाणांत हिंदूंची लोकवस्ती असलेला जिल्हा गुलबर्गा होय. त्यांत हिंदूंचें प्रमाण शेंकडा ७९.८ आहे. आदिलाबाद जिल्ह्यांत शेंकडा ८०.७, बीदर जिल्ह्यांत शेंकडा ८३.१, औरंगाबाद जिल्ह्यांत शेंकडा ८४.१ लोक हिंदु आहेत. हैदराबाद नगरींत शेंकडा ५२.३ लोक हिंदू व ४३.१ लोक मुसलमान व सुमारें शेंकडा ३ लोक ख्रिश्चन व राहिलेल्या शेंकडावळींत इतर पंथांतले लोक असा हिशेब निघतो, येथें हिंदूंचें प्रमाण इतकें कमी असण्याचें कारण बाहेरून पुष्कळ जातीचे लोक उद्योग, व्यापार, धंद्यासंबंधानें इकडे आकर्षिले जातात हें होय.

**तेलंगणांत** (हैदराबादची संख्या वगळून) **मुसलमानांचें** प्रमाण शेंकडा ८.९ व **महाराष्ट्रांत** शेंकडा १२ पडतें. **महाराष्ट्रांत मुसलमानांचें प्रमाण अधिक** असण्याचें कारण हेंच कीं, पुरातन मुसलमानांचें राज्य ह्या भागांत होतें. जिल्हेवारी तपासतां अतराफबल्दा, औरंगाबाद, नांदेड, गुलबर्गा, व बीदर ह्या जिल्ह्यांत मुसलमानांचें प्रमाण अधिक आहे.

वन्यजातीचे लोक तेलंगणांत शेंकडा ४.६ प्रमाणें महाराष्ट्रांत शेंकडा २,३ प्रमाणानें आहेत. ह्यांचा भरणा विशेषेंकरून तेलंगणांतील आदिलाबाद व वरंगल जिल्ह्यांत आणि महाराष्ट्रांतील गुलबर्गा जिल्ह्यांत आहे.

ख्रिस्तिधर्मातील पुष्कळ लोक हैदराबादेंत आहेत. मिशनऱ्यांचीं मुख्य निवासंस्थळें म्हटलीं म्हणजे वरंगल (१.७ %). नलगोंडा (१.१ %) मेदक (१ %) व औरंगाबाद (.७ %) हीं होत. ख्रिस्तिधर्माचा प्रचार महाराष्ट्रापेक्षां तेलंगणांत अधिक आहे. मिशनऱ्यांचीं ठाणीं तेलंगणांत बसल्यानंतर फारा दिवसांनीं त्यांची दृष्टि महाराष्ट्राकडे वळली हेंच त्याचें **कारण** होय.

# हिंदु समाजाचा ऱ्हास.

येथवर दिलेल्या संख्येवरून पाहतां ह्या राज्यांत हल्लीं सुद्धां हिंदू लोक अधिक आहेत असें स्पष्ट दिसून येत असतांही, त्यांची संख्या **क्रमशः क्षीण होत चालली आहे** असें सरकारी जनपरिगणनेवरून कळतें. केवळ निझाम राज्यांतच नव्हे तर ब्रि. हिंदुस्थानांत देखील हिंदूंची संख्या दिवसेंदिवस कमी होत चालली आहे, हें खालील आंकड्यांवरून कळून येईल.

| | | | | | निजामराज्यांत | ब्रि. हिंदुस्थानांत | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| इ. | स. | १८८१ | सालीं | शेंकडा | ९० | ७४ | लोक | हिंदू | होते. |
| ... | ... | १८९१ | ,, | ,, | ८९ | ७२ | ,, | ,, | ,, |
| ... | ... | १९०१ | ,, | ,, | ८८ | ७० | ,, | ,, | ,, |
| ... | ... | १९११ | ,, | ,, | ८७ | ६९ | ,, | ,, | ,, |
| ... | ... | १९२१ | ,, | ,, | ८५ | ६८ | ,, | ,, | ,, |

ह्या क्षीणतेचीं कारणें लिहिण्यापूर्वी राज्यांतील मुख्यजातींच्या फेरफारांची संख्या ह्याखालीं आम्ही देत आहों:—

| नांवें. | १८८१ त १०,००० जनसंख्येंत | १८९१ त १०,००० जनसंख्येंत | १९०१ त १०,००० जनसंख्येंत | १९११ त १०,००० जनसंख्येंत | १९२१ त १०,००० जनसंख्येंत |
|---|---|---|---|---|---|
| हिंदू | ९,०३३ | ८,९४१ | ८,८६० | ८,६९३ | ८,५५४ |
| तेलंगण | ९,०५३ | ८,९८५ | ८,०१५ | ८,६१५ | ८,५६५ |
| मराठवाडी | ९,०१२ | ८,८९७ | ८,७८६ | ८,७७१ | ८,५२३ |
| मुसलमान | ९४० | ९८७ | १,०३७ | १,०३२ | १,०४१ |
| तेलंगण | ९१५ | ९२१ | ९४६ | ९३१ | ८९२ |
| मराठवाडी | ९६४ | १,०४७ | १,१४४ | १,१३६ | १,२०१ |
| ३ वन्यजातीचे | ,, | २१ | ५९ | २१४ | ३४५ |
| तेलंगण | ,, | ५५ | १०१ | ३८२ | ४५९ |
| मराठवाडी | ,, | ,, | १९ | ४३ | २०५ |
| ४ ख्रिस्ती | १४ | ३८ | ३५ | ४० | ५० |
| तेलंगण | २७ | ३१ | ३२ | ६६ | ७८ |
| मराठवाडी | ३ | ६ | ७ | १५ | २१ |

ह्या दहा वर्षांत **जैन** शेंकडा ११ नीं कमी झाले. ते मुख्यत्वेंकरून व्यापारी असल्यानें त्यांचा भरणा शहरांतूनच असावयाचा. तसेंच **शीख** शेंकडा ४१ नें कमी झाले. ह्यांच्या जनसंख्येंत शेंकडा ४२ लोक **श्रीगुरु गोविंदसिंग** रहात होते त्या **नांदेड** शहरीं असतात, व शें. २७ लोक हैदराबाद शहरांत, आणि बाकीचे इतर जिल्ह्यांतून तुरळक तुरळक आढळतात.

निझाम राज्यांतील "विशेषतः **जैन** व **शीख**" लोकांची संख्या ह्या दशकांत इतक्या मोठ्या प्रमाणांत कमी कां झाली ह्याचा त्या धर्मांच्या पुढाऱ्यांनीं अवश्य विचार करावा.

पारशी शेंकडा २.५ नें कमी झाले. ह्यांच्या जनसंख्येंतील शेंकडा ६० इसम हैदराबाद शहरांत, व बाकीचे औरंगाबाद, वरंगल, गुलबर्गा वगैरे ठिकाणीं राहतात.

ब्रि. हिंदुस्थानांतील स्थिति पाहिली तरी वरचेवर फेरफार दृग्गोचर होतात.

१९२१ सालीं झालेल्या खानेसुमारीच्या हिशेबावरून ब्रि. हिंदुस्थानांतील लोकसंख्या ३१, ८९, ४२, ४८० होती. हिला धरून पाहिल्यास १९११ सालापेक्षां शेंकडा १.२ ची वाढ दिसते. ह्या जनसंख्येंत पुरुषांची संख्या १६, ३९, ९५ ५५४ व स्त्रियांची १५, ४९, ४६, ९२६; म्हणजे एक हजार पुरुषांच्या मानानें ९४५ स्त्रिया होत्या असें झालें.

पंथवारीचें प्रमाण खालील कोष्टकावरून दिसेल.

| | १९११ सालानंतर दरहजारीं | शेंकडा कमी (–) अधिक (+ |
|---|---|---|
| हिंदु | ६८६ | –.४ |
| शीख | १० | +७.४ |
| जैन | ४ | –५.६ |
| मुसलमान | २१७ | +५.९ |
| बौद्ध | ३७ | +७.९ |
| ख्रिस्ती | १५ | +२२.६ |
| इतर मताचे | ३१ | –५.१ |

ब्रि. हिंदुस्थानातील मुख्य जातींचे ठोकळ आंकडेही खालीं दाखविले आहेत. ( इ. स. १९२१ मधील )

| | |
|---|---|
| हिंदु ... ... ... ... ... | २१, ६७, ३४, ५८६ |
| मुसलमान ... ... ... ... | ६, ८७, ३५, २३२ |
| बौद्ध ... ... ... ... ... | १, १५, ११, २६८ |
| ख्रिस्ती ... ... ... ... ... | ४७, ५४, ०६४ |
| पारशी ... ... ... ... ... | १, ०१, ७७८ |
| ज्यू ( यहुदी )... ... ... ... ... | २१, ७७८ |
| इतर जातींचे ... ... ... ... | ९७, ७४, ६११ |

## निझाम राज्यांत हिंदूंची संख्या कमी होण्याचीं कारणें.

आपल्या राज्यांत हिंदूंची संख्या कमी होण्याचीं कारणें निझाम सरकारांनीं ठरविलेलीं आहेत तीं अशीं:—

हिंदू समाजाची वाढ खुंटण्याचीं चार निरनिराळीं कारणें आहेत.

पहिलें — इ. स. १८९१ सालापासून खानेसुमारीचे अहवालांत वन्य जातींचें निराळें वर्गीकरण.

दुसरें—हिंदु लोकांचें धर्मांतर.

तिसरें—हिंदूंचा देशत्याग.

चौथें—हिंदू लोकांच्या सामाजिक चालीरीति.

ह्या चारही कारणांपैकीं प्रत्येकाचा स्वतंत्र रीतीनें विचार करूं.

## १ वन्य जाती व इतर हिंदू याचें पृथक्करण

इ. स. १८९१ सालच्या खानेसुमारीच्या अहवालांत गोंड, भिल्ल वगैरे रांनटीजातींच्या लोकांची बरोबर गणती करितां आली नाहीं असें विधान कां करण्यांत आलें याचा उलगडा होत नाहीं. पूर्वीं त्यांचा अंतर्भाव हिंदूमध्येंच केलेला होता असें असूनही हिंदूधर्माचे लोक व वन्य जाती यांची लोकसंख्या

पृथक् दाखविण्याचा प्रयत्न १८९१ सालांतच प्रथम करण्यांत आला हें विधान पुढील प्रत्येक अहवालांत कां करण्यांत आलें हें समजत नाहीं.

सन १८८१ सालाच्या खानेसुमारीच्या अहवालांतील आठव्या कोष्टकाकडे पाहिल्यास असें दिसून येईल कीं, रानटी जातींच्या संख्येचे आंकडे जरी हिंदूंच्या लोकसंख्येंत सामील केले होते तरी हिंदू या मुख्य सदराखालीं त्यांचे आंकडे निराळा वर्ग करून दाखविले होते. इ. स. १८८१ सालीं वन्य-जातोंची लोकसंख्या ( २४५३१८ ) असून प्रत्येक दहा हजारीं त्यांचें प्रमाण ( २४९ ) होतें. हे सर्वच लोक खरोखरी रानटी नव्हते आणि म्हणून १८८१ च्या पुढील खानेसुमारींत त्यांच्यापैकीं कांहींचा समावेश हिंदू या सदराखालीं करण्यांत आला.

त्या वेळीं रानटी लोकांच्या २६ जातींचा उल्लेख रिपोर्टांत आहे. पण आतां वन्यजाती या सदराखालीं फक्त ११ च जातींचे लोक येतात. बाकीच्या १५ जातींपैकीं १२ ची गणना हिंदूंमध्यें केली असून ब्यानडू, कोरकू, रामोशी, या तीन जातींचे लोक संस्थानांत सध्यां आढळतही नाहींत. १८९१ सालापासून हिंदू व वन्य जाती यांचें वर्गीकरण काळजीपूर्वक करण्यांत येऊं लागलें व त्या-मुळें त्या पुढील प्रत्येक खानेसुमारीचे वेळीं वन्यजातीच्या लोकांची संख्या वाढत आहे असें दिसून आलें.

जे लोक आपणास वन्यजातीचे म्हणवून घेतात त्यांचें प्रमाण वाढूं लागल्या-कारणानें अर्थातच हिंदूंच्या एकंदर लोकसंख्येवर त्याचा उलट दिशेनें परिणाम होऊं लागला. ह्याचें उदाहरण म्हणजे १९११ सालीं वन्यजाती या नांवाखालीं ( २, ८५७२२ ) लोक होते.

१९११ ते १९२१ या दहा वर्षांत एकंदर संस्थानची लोकसंख्या ६.८ ह्या प्रमाणांत कमी झाली. त्याचा परिणाम वन्यजातींवरही झाला पाहिजे व त्या-मानानें त्यांची संख्या अदमासें ( २,६६२९३ ) व्हावयाला पाहिजे होती; परंतु १९२१ सालीं प्रत्यक्ष असें दिसून आलें कीं, त्यांची संख्या कमी होण्याऐवजीं शें. ६१ टक्के वाढली असून ती ( ४,३०७४८ ) झाली. अर्थात् पूर्वींच्या खाने-सुमारीचे वेळीं हिंदू या वर्गांत गणले गेलेले बरेचसे लोक १९२१ च्या खाने-

सुमारींत वन्यजाती म्हणून गणले गेले असले पाहिजेत असें म्हटल्याखेरीज ह्या वाढीचा बरोबर उलगडा होत नाहीं.

वन्यजातीच्या लोकसंख्येच्या वाढीचा आंकडा ( १,६४४५५ ) जर १९२१ सालाच्या हिंदूंच्या संख्येंत मिळवला तर हिंदूंची संख्या एकंदर ( १८, २०९०८ ) होते. ह्या हिशेबानें गेल्या दशकांत हिंदूंची संख्या ६९ टक्के कमी झाली आहे. खानेसुमारीचे रिपोर्टांतून असें सांगण्यांत आलें आहे कीं, संस्थानच्या एकंदर लोकसंख्येच्या ऱ्हासाच्या मानानें हिंदू समाजाचा ऱ्हास कांहीं फारसा अधिक नाहीं.

**२ धर्मांतर**-परधर्मांतील लोकांना आपल्या धर्मात घेण्याचा प्रघात जरी हिंदू धर्मात नाहीं तरी वन्यजातींचा प्रवेश हळूहळू हिंदुधर्मांत होत आहे. कांहीं काळानें त्यांच्यांतील भेद नाहींसे होऊन सर्व लोक हिंदू समजले जातील. कांहीं रानटी जातींत आतां दोन भाग होऊं लागले आहेत. एक हिंदूंचें अनुकरण करणारा व दुसरा पूर्वीच्याच वळणाचा. उदाहरणार्थ **पारधी** लोकांचीच गोष्ट घ्या. त्यांच्यापैकीं चार हजार लोकांनीं खानेसुमारींत आपला धर्म हिंदू असल्याचें दाखविलें असून फक्त ३७५ लोकांनीं मात्र आपल्या मूळजातीचेंच नांव दिलें आहे. हे लोक हळूहळू आपली मूळची भाषाही सोडीत असून हिंदू लोकांचा धर्म व त्यांच्या चालीरीतीचें अनुकरण करीत आहेत. अशा रीतीनें वन्य जातींमुळें हिंदूंच्या लोकसंख्येची वाढ भासत असली तरी **धर्मांतरामुळें** हिंदूंच्या लोकसंख्येच्या वाढीला **जबरदस्त धका** बसला आहे.

इ. स. १९११ च्या मानानें आर्य व ब्राह्मसमाजिस्टांची संख्या पुष्कळच वाढली असली तरी एकंदरीनें ती इतकी थोडी आहे कीं तिचा परिणाम हिंदूंच्या एकंदर संख्येवर फारसा झालेला नाहीं. तसेंच संस्थानांतील मुसलमानांकडून हिंदूंना बाटविण्याचे **विशेष प्रयत्न चालू नसल्यानें** मुसलमानी धर्माचा स्वीकार केलेल्यांची संख्याही फारच थोडी आहे असें सरकारचें म्हणणें आहे.

**मुसलमानांनीं देखील हिंदूंना बाटविण्याचे जे प्रयत्न चालविले आहेत त्याबद्दल सरकार मुग्ध कां ? तसेंच मुसलमानी राज्य व मुसलमान अधिकारी वर्गाकडून त्यांना प्रोत्साहन व मदत किती मिळते हें सरकारांनीं दाखवावयास नको का ?**

धर्मांतराच्या बाबतींत **ख्रिस्ती मिशनऱ्यांचे** प्रयत्न विशेष जोराचे आहेत. हिंदूंच्या **खालच्या वर्गांतील** लोकच बहुधा ख्रिस्ती होतात, आपल्या जुन्या धर्माचा त्याग केल्यामुळें त्यांचें फारसें नुकसान होत नाहीं. जातिभेदाच्या तीव्रतेमुळें त्यांचे अत्यंत हाल होतात व त्यांना नेहमीं नीच कामें करावीं लागतात. जातिनिर्बंध कमी करून घेण्याचें सामर्थ्य त्यांच्यामध्यें नसतें, तसेंच त्यांना शिक्षणही मिळत नाहीं आणि अस्पृश्यतेमुळें तर त्यांची हीनता त्यांना विशेष रीतीनें भासून येते, अशा लोकांना ख्रिस्ती झाल्यानंतर शिक्षणाच्या सवलती मिळून शिवाय कारागीर, शेतकरी किंवा त्यापेक्षांही अधिक उच्च प्रकारचा धंदा करण्याची संधि मिळते.

ह्या सर्वांपेक्षां धर्मांतर करणाऱ्या अस्पृश्याला होणारा सर्वांत मोठा फायदा म्हटला म्हणजे नीच गणल्या गेलेल्या जातींतून वर निघून ख्रिस्ती समाजांत त्याला इतरांच्या बरोबरीनें वागतां येतें, पाद्रीलोक त्यांचा कैवार घेतात आणि सरकारी अधिकाऱ्यांपुढें त्यांचीं गाऱ्हाणीं नीट रीतीनें मांडण्याच्या कामीं त्यांना मदत करितात. ख्रिस्ती झालेल्या आपल्या जातिबांधवाची अशी उन्नति झालेली पाहून **हिंदू धर्मांतील गुलामगिरींतून** आपली मुक्तता करून घेण्याकडे अस्पृश्य वर्गाची प्रवृत्ति वाढत आहे. अशाच लोकांकडे मिशनऱ्यांचीही विशेष दृष्टि असते व ते लोक अडचणींत असले अथवा दुष्काळानें नाडले गेले म्हणजे त्यांना ख्रिस्ती करून घेणें सुलभ जातें.

ख्रिस्ती होणाऱ्यांची संख्या कशी वाढत आहे ती पहा.

गेल्या दहा वर्षांत ( १९११ ते १९२१ ) एकंदर लोकसंख्या शें. ६·९ नें कमी झाली; परंतु संस्थानांतील ख्रिस्ती लोकांची संख्या मात्र शें. २३ टक्के वाढली. १९११ सालीं, संस्थानांत ( ४५९०८ ) ख्रिस्ती लोक होते ते १९२१ मध्यें ५६७२९ झाले. धर्मांतरामुळेंच ही संख्या वाढली असली पाहिजे आणि धर्मांतर करणारे बहुतेक सर्व लोक हिंदू धर्मांतूनच ख्रिस्ती धर्मांत गेले असले पाहिजेत.

**३. हिंदू लोकांचा देशत्याग.** १८८१ सालापासूनचे लोकसंख्येच्या हालचालींचे आंकडे पाहिल्यास इतर धर्मांतील लोकांपेक्षां **हिंदूंची संख्या** सारखी कमी होत चालली आहे असें दिसून येईल.

राज्यांतून बाहेर जाणारांची संख्या वाढत चालली आहे हें यापूर्वीं दाखविलें आहे. दुष्काळांत जवळ असलेल्या सर्व ब्रिटिश इंडियांत हिंदू लोक अधिक निघून जातात असें दिसतें. त्यांतून **महाराष्ट्रांतून जास्त** जातात म्हणूनच तेलंगणापेक्षां महाराष्ट्रांतील हिंदूलोकांची संख्या फारच कमी झाल्याचें दिसतें.

**४. सामाजिक चालीरीती.** हिंदु लोकांत, मुख्यत्वेंकरून उच्चवर्णांतील लोकांत बालविवाह प्रचलित व विधवाविवाह निषिद्ध असल्यानें त्यांची संख्या, वाढ घेत नाहीं. बालविवाहामुळें पूर्णवयांत न आलेल्या बालिकांना मातृपद प्राप्त झाल्यानें, त्या व त्यांची संतति बलहीन होऊन मरणसंख्या वाढू लागते. **विधवाविवाहनिषेधामुळें संतान होण्यास लायक अशा स्त्रियांचें वय फुकट जातें.** १५ पासून ४० वर्षांच्या वयांतील विवाहित स्त्रियांची संख्या त्या वयाच्या स्त्रियांमध्यें, शेंकडा ८१ हिंदुलोकांत व शें. ८० मुसलमानांत असली तरी ५ वर्षांच्या आंतील मुलींचें प्रमाण १०० विवाहितांमध्यें ७८ हिंदुलोकांत व ७९ मुसलमानांत असल्याचें दिसून येतें. म्हणजे हिंदूमध्यें विवाहितांची संख्या अधिक असली तरी संततीची संख्या मुसलमानांच्या संख्येपेक्षां कमी आढळून येते.

## तबलीग.

संस्थानांतील मुसलमानांकडून हिंदूंना बाटविण्याचे यापूर्वीं सुसंघटित असे जारीचे प्रयत्न झाले नसले तरी इसलामी धर्माचा पाया व त्याची वाढ इतरांना आपल्या धर्मांत ओढून घेण्यावरच अवलंबून आहे. आमच्या समाजाची धर्मांतराबद्दल बेफिकिरी व गेले त्यांस परत घेण्याबद्दलची अनास्था, शिवाय दुष्काळ, दारिद्र्य, अज्ञान, विषयवासना, गृहकलह इत्यादींमुळें, मुसलमानांना हिंदूंना बाटविण्याचा मार्ग सुकर झाला आहे. मुसलमानांध्यें गुलामगिरीची पद्धत पूर्वींपासून चालत आली असून प्रत्येक मोठ्या कुटुंबांत, **लौंडी व गुलाम** हे असावयाचे व ह्या लौंडी ( स्त्री ) गुलाम ( पुरुष ) लोकांचा भरणा बहुतेक हिंदू ( अस्पृश्य ) अनाथ मुलांमुलींना दुष्कळांत किंवा अडचणीच्यावेळीं त्यांच्या आईबापांनीं विकल्यामुळें अथवा टाकून दिल्यामुळें झालेला असतो व एकदां त्यांचा प्रवेश मुसलमानांच्या घरीं झाला म्हणजे लवकरच त्यांचें धर्मांतर करून त्यांना मुसलमानी धर्माची दीक्षा दिली जाते. ही गुलामगिरीची व मानवी

क्रयविक्रयाची अनिष्ट चाल नाहींशी करण्याबद्दल निझाम सरकारांकडून प्रयत्नही करण्यांत आला होता पण अलीकडे सर्वच धोरण बदलल्यामुळें व इस्लामी धर्मप्रसाराची ( शुद्धीची चळवळ सुरू झाल्यापासून त्याचा वचपा काढण्याकरितां ) अलीकडे उत्तर हिंदुस्थानांत जोराची लाट आली असून जेथें मुसलमानांचेंच राज्य आहे तेथें हिंदूंना बाटविण्याचें कार्य जास्त सुलभ आहे; ह्या भावनेनें संस्थानांतील मुसलमानांनीं आपल्या पूर्वींच्या धर्मप्रसाराच्या चळवळीस सुसंघटित स्वरूप देऊन हैद्राबाद शहरांत तीन मोठमोठ्या संस्था स्थापना केल्या असून त्याच्यां शाखा व प्रचारक सर्व निझाम राज्यांत खेडोखेडीं हिंदूंना बाटविण्याचे प्रयत्न करीत आहेत. ही त्यांची संघटना दिल्लीचे सुप्रसिद्ध **खाजाहसन** निझामी यांच्या योजनेप्रमाणें होत आहे, व एवढेंच नव्हे तर हसन निझामी यांना निझाम सरकारांकडून दरमहा २०० रु. दिले जातात, आणि त्यांच्या पुस्तकांचा सरकारी शाळा खात्यांतून उपयोग करण्याबद्दल निजाम सरकारची आज्ञा झाली आहे.

मुसलमानी धर्माच्या दृष्टीनें इतरांनां बाटवून आपल्या धर्मांत घेणें हें एक पवित्र कर्तव्य समजलें जातें असल्यामुळें निझाम साहेबांपासून तो एखाद्या शिपायापर्यंत आपल्या धर्मप्रसाराच्या चळवळीबद्दल सक्रिय सहानुभूति असणें अपरिहार्य आहे. राज्यांतील बहुतेक सर्व अधिकारी, नोकर व धर्मखातें व विशेषतः शाळाखात्यांतील शिक्षकांकडून धर्मप्रसाराचें अप्रत्यक्ष व गुप्तरीतीनें काम चालू असल्याचें समजतें. हैद्राबाद शहरांतील वर वर्णिलेल्या ज्या तीन संस्था आहेत त्यांचीं नांवें अनुक्रमें **सिफतुल इसलाम, खादिमुल इसलाम, इसलाहे हाल मुसलमानान** आहेत. दोन वर्षांपूर्वीं फक्त **सिफतुल इसलाम** ह्या एकाच संस्थेनें थोड्या अवकाशांत ५४।५५ अज्ञान मुलांना बाटवून मुसलमान करून घेतलें आहे. ह्या सर्व संस्थांचें काम गुप्त असल्यामुळें एकंदर राज्यांत मुसलमानांकडून दर वर्षीं किती मुलांमुलींना माणसांना बाटविण्यांत येतें ह्याचा हिशेब मिळणें शक्य नाहीं. सरकारनींही तो प्रसिद्ध करावयाचा नाहीं असेंच ठरविल्यासारखें दिसतें. ह्याशिवाय मुसलमानी धर्मप्रचारकांकडून **जेलमधून हिंदू कैद्यांनाही** बाटविण्याचे प्रयत्न चालू आहेत. ह्या सर्व गोष्टींकडे लक्ष देऊन **संस्थानांतील हिंदू पुढारी** वेळींच सावध होऊन स्वधर्मरक्षणाचा स्वार्थत्यागपूर्वक प्रयत्न करितील काय !

ह्या खालीं दिलेल्या पत्रकांत मुख्य जातींच्या

| नांव | जनसंख्या | | | अविवाहित | |
|---|---|---|---|---|---|
| | एकूण | पुरुष | स्त्रिया | एकूण | पुरुष |
| हिंदू | १,०६,५६,४५६ | ५४,१६,५९३ | ५२,४१,८६० | ३९,८१,२३२ | २४,२११७२ |
| जैन | १८,५८४ | ९,८५२ | ८,७३२ | ६,८११ | ४,३९२ |
| शीख | २,७४५ | १,५३९ | १,२०६ | १,१०१ | ६९४ |
| आर्यसमाजी | ५४५ | २६८ | २७७ | ३७७ | १९९ |
| ब्रह्मसमाजी | २५८ | ११६ | १४२ | १०५ | ५९ |
| बौद्ध | १० | ७ | ३ | ५ | ५ |
| मुसलमान | १२,९८,२७७ | ६,६४,०२२ | ६,३४,२५५ | ५,७०,११२ | ३,३६,७१२ |
| ख्रिस्ती | ६२,६५६ | ३३,१३९ | २९,५१७ | ३१,७३९ | १८,८७१ |
| पारशी | १,४९० | ७५८ | ७३२ | ७४२ | ३७२ |
| यहुदी | ४ | २ | २ | ३ | १ |
| वन्यजातीचे | ४,३०,७४८ | २,२८,७७५ | २,०१,९७३ | १,९९,९२५ | ९,१६,१४३ |

राज्याची एकंदर लोकसंख्या पाहिली असतां त्यामानानें अविवाहितांची संख्या पुरुषांत शेंकडा सुमारें ४६ व बायकांत ३१ आहे. शंभरांत सुमारें ४८ पुरुष व ५० स्त्रिया विवाहित आहेत. शेंकडा ७ पुरुष व २० स्त्रियांचे विवाहबंध सुटून गेलेले दिसतात. **विधवांच्या एकंदर संख्येंत शेंकडा तीन १५ वर्षांच्या वयाच्या आंतल्या होत्या.** ह्या वयाच्या स्त्रिया इतर देशांत कौमार्यदशा भोगीत असतां आपल्या देशांत गृहस्थाश्रमांतून पार पडून जुलुमाच्या संन्यासिनी होण्याला बालविवाहच ना कारण! मुसलमानांत विधवाविवाह निषिद्ध

गटवारीनें बेरजा दिल्या आहेत.

| | विवाहित | | | विधुर | | विधवा |
|---|---|---|---|---|---|---|
| स्त्रिया | एकूण | पुरुष | स्त्रिया | एकूण | पुरुष | स्त्रिया |
| १५,६०,०६० | ५२,५३,७८० | २६,१४,२६४ | २६,३९,५१६ | १४,२१,४४१ | ३,७१,१५७ | १०,५=,२८४ |
| २,४९९ | ८,७५९ | ४,४३२ | ४,३२७ | २,१३४ | १,०२८ | १,१०६ |
| ४०७ | १,२५३ | ७०८ | ५४५ | ३९१ | १३७ | २५४ |
| १७८ | १२९ | ६१ | ६८ | ३९ | ८ | ३१ |
| ४६ | १०५ | ५० | ५५ | ४८ | ७ | ४१ |
| ... | ४ | २ | २ | १ | ... | १ |
| २,३४,२०० | ५,६१,८७६ | २,९०,१९१ | २,७१,६८५ | १,५७,४८१ | ३७,१११ | १,२०,३७० |
| १२,८६८ | २५,४१८ | १३,०१९ | १२,३९९ | ५,४१९ | १,१६९ | ४,२५० |
| ३७० | ५९५ | ३०९ | २८६ | १५३ | ७७ | ७६ |
| २ | १ | १ | ... | ... | ... | ... |
| ८२,९८२ | १,९२,२४८ | ९९,७४३ | ९२,५०५ | ३८,५७५ | १२,०८९ | २६,४८६ |

मानला जात नसला तरी पुष्कळ दिवसापांसून चालत आलेली हिंदूंची चाल पाहून पाहून त्यांच्यांत सुद्धां उत्तम म्हणविणारे विधवांचा पुनर्विवाह करीत नाहींत.

आतां एकंदर संख्या बाजूला सारून आपण प्रत्येक जातीच्या सामाजिक स्थितीचा विचार करूं. वर दिलेल्या कोष्टकांत मुख्य संख्या दाखविलेली आहे. हजाराला इतके लोक असा हिशेब केला तरी इतरांशीं ताडून पाहिल्यानें फरक दृष्टीसमोर येतो. म्हणन आपण आतां तसें करून पाहूं.

| जातींचें नांव | दर एक हजारांत | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | पुरुष | | | स्त्रिया | | |
| | अविवाहित | विवाहित | विधुर | अविवा-हित | विवाहित | विधवा |
| सर्वजाती सरासरीनें | ४५७ | ४७६ | ६७ | ३०९ | ४९५ | १९६ |
| हिंदु | ४८८ | ४८३ | ६९ | २९७ | ५०३ | २०० |
| मुसलमान | ५०७ | ४३७ | ५६ | ३६९ | ४४१ | १९० |
| ख्रिस्ती | ५६९ | ३९६ | ३५ | ४३६ | ४२० | १४४ |
| वन्यजातीचे | ५११ | ४३६ | ५३ | ४११ | ४५८ | १३१ |

वरील संख्येचा विचार करितां असें दिसून येतें की, हिंदुलोकांत विवाह र्वसाधारण असून अविवाहितांची संख्या इतर लोकांच्या मानानें कमी आहे. ख्रिस्ती लोकांत वर दाखविलेल्या सर्व जातींपेक्षां विवाहितांची संख्या कमी, विधवा व विधुर यांची संख्या सर्वांपेक्षां हिंदूंत अधिक व ख्रिस्ती लोकांत कमी असल्याचें दिसतें. वन्यजातींमध्यें अशांची संख्या ख्रिस्त्यांहून कमी.

## आयुर्मर्यादा

खालील कोष्टकांत मुख्यजातींच्या जीवितकालाची सरासरी दाखविली आहे.

| जात | आयुर्मर्यादेची सरासरी ( वर्षें ) | |
|---|---|---|
| | पुरुष | स्त्रिया |
| हिंदु | २५.८ | २५.४ |
| वन्यजातीचे | २४.६ | २३.० |
| मुसलमान | २६.१ | २५.६ |
| ख्रिस्ती | २४.५ | २३.७ |

## वयोमानास अनुसरून मुख्य मुख्य जातींची गटवार संख्या ह्याखालीं दर्शविली आहे.

### दर हजारीं

| वय | हिंदु | | | | | | मुसलमान | | | | | | ख्रिस्ती | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | पुरुष | | | स्त्रिया | | | पुरुष | | | स्त्रिया | | | पुरुष | | | स्त्रिया | | |
| | अविवाहित | विवाहित | विधुर | अविवाहित | विवाहित | विधवा | अविवाहित | विवाहित | विधुर | अविवाहित | विवाहित | विधवा | अविवाहित | विवाहित | विधुर | अविवाहित | विवाहित | विधवा. |
| ० ते ५ ... ... | ९८६ | १३ | १ | ९६९ | २९ | २ | ९८८ | १० | २ | ९८८ | १६ | ४ | ९९३ | ६ | १ | ९७९ | १७ | ४ |
| ५ ते १० ... ... | ९४७ | ४७ | ६ | ७६९ | २२१ | १० | ९६३ | ३५ | २ | ९३४ | ५९ | ७ | ९८९ | ९ | २ | ९६१ | ३६ | ३ |
| १० ते १५ ... ... | ८३१ | १५५ | १४ | ३४६ | ६१७ | ३७ | ९३३ | ६० | ४ | ७१२ | २७२ | १६ | ९६१ | ३८ | १ | ७९९ | १९१ | १० |
| १५ पासून ४० ... | २२४ | ७२६ | ५४ | ४२ | ८११ | १४७ | ३५९ | ५९९ | ४२ | ७३ | ८०३ | १२४ | ४४८ | ५३१ | २१ | १२२ | ७९९ | १०६ |
| ४० सावर ... ... | ४७ | ७५९ | १९४ | २४ | ३८२ | ५९४ | ३८ | ८०० | १६२ | २८ | ३८९ | ५९२ | ४१ | ८२७ | १३२ | ३७ | १२२ | ५३७ |

वरील कोष्टकावरून ५-१०, १०-१५, १५-४० ह्या वयवारींत विवाहितांची संख्या हिंदूंमध्यें सर्वांहून अधिक आहे व वयाच्या ५ वे वर्षापर्यंत लग्न झालेल्यांची संख्या हिंदुस्त्रियांमध्यें सर्वांत अधिक असल्याचें दिसून येतें.

हिंदु पुरुषांत शेंकडा ४५ लोक अविवाहित असून ४८ विवाहित व ७ विधुर, तर मुसलमानांत ही संख्या अनुक्रमें ५१, ४४ व ५ अशी आहे. स्त्रियांमध्यें ह्या भेद याहून ठळक दिसून येतो. हिंदुस्त्रियांत शेंकडा ३० अविवाहित, ५० विवाहित व २० विधवा, तर मुसलमान स्त्रियांत हें प्रमाण अनुक्रमें ३७, ४० व १९ असें आहे.

वयवारीस अनुसरून पाहतां, ०-५, ५-१० वयवाल्यांमध्यें विवाहित हिंदूंचें प्रमाण हजारीं अनुक्रमें १३ व ४२ असून मुसलमानांचें अनुक्रमें १० व ३५ असें आहे. त्याच्यापुढच्या वयःकाल ( १०-१५ ) वाल्यामध्यें तर ह्या भेद अधिकच दिसून येतो. म्हणजे हिंदु पुरुषांत हजारांत १५५ लोक विवाहित असले तर महम्मदीयांत फक्त ६० च दृष्टीस पडतात. पुढच्या वयमानाच्या ( १५-४० ) लोकांत आणखी अधिक फरक ( १२३ ) दिसतो. म्हणजे १००० हिंदूंपैकीं ७२२ विवाहित असले तर मुसलमानांत १००० रामागें ५९९ विवाहित असतात. ४० वर्षे वयाच्या नंतर लग्न झालेल्या लोकांमध्यें मात्र हिंदूंपेक्षां मुसलमान दर हजारींत ४१ नें अधिक ( ८००-७५९ ) आहेत.

शिवाय स्त्रियांच्यासंबंधानें पाहतां हिंदुमुसलमानांच्या संख्येंत फार भेद दिसून येतो. ५ वर्षांपर्यंतच्या वयाच्या विवाहित मुसलमान मुलींची संख्या त्याच वयोमानाच्या विवाहित हिंदुमुलींच्या संख्येच्या जवळ जवळ निम्मी आहे. ५-१० वयोमानाच्या संख्येंत ती सुमारें $\frac{1}{4}$ च दिसते. त्या पुढच्या ( १०-१५ ) वयःकाळांत हिंदु सुवासिनींची संख्या हजारीं ६१७ असून मुसलमान सुवासिनींची फक्त २७२ आहे. १५ पासून ४० च्या वयःकालमानांत दोघांची संख्या ( ८११-८०३ ) जवळ जवळ येऊन फक्त ८ चा फरक दिसून येतो.

विधवांमध्यें हिंदूंची संख्या मुसलमानांहून साधारणतः अधिक आहे. वयाच्या ४० वर्षांवरील संख्येंत हजारांत ४७ हिंदु पुरुष अविवाहित व ३८ मुसलमान अविवाहित सांपडतात. उलट पक्षीं ह्याच वयोमानाच्या स्त्रियांच्या संख्येकडे पाहिलें तर अविवाहित मुसलमान स्त्रियांची संख्या ( २८ ) हिंदु अविवाहित स्त्रियांपेक्षां ( २४ ) अधिक दिसते. ( १५–४० ) वयःकालवाल्यांत मुसलमान विधवांची संख्या व हिंदु विधवांची संख्या ५ ते ४ प्रमाणांत बसते व ५० वर्षें झाल्यावर त्यांच्या संख्येंत ह्या उभय जातींतील विधवांची संख्या बहुतेक समानच दिसते. तरुण वयांत वैधव्य प्राप्त झालेल्या महम्मदीय स्त्रियांना पुनर्विवाहित होण्याला हिंदु स्त्रियांपेक्षां अधिक सवड असते हें ह्यावरून दिसून येतें.

ख्रिस्त्यांमध्यें पुष्कळ भरणा हिंदूंतील हीनवर्णांतल्या लोकांचा असतो असेंच आजपर्यंत सांगण्यांत येतें. म्हणून त्यांच्यांतील पुष्कळ लोक ह्या ख्रिस्तीधर्मांत शिरण्यापूर्वींच बालविवाहाचा अंगीकार केलेले असतात. पूर्वमताचा संस्कारच नसलेले मात्र बालविवाहापासून व विधवाविवाहनिषेधापासून अलिप्त आहेत. म्हणून ख्रिस्त्यांतसुद्धां बालविवाहाचे आंकडे आहेत. तरी पण एकंदरीच्या मानानें पाहतां इतरांपेक्षां त्यांच्यांत अविवाहितांची संख्या अधिक व विवाहितांची कमी आहे. त्यांच्यांत विधवांची संख्या सुद्धां वन्यजातीपेक्षां थोडी अधिक आहे, परंतु बाकीच्या जातींशीं पाहतां ह्या बाबतींत त्यांचा नंबर शेवटला लागतो ( १५–४० ) वयोमानांतली विवाहितांची संख्या सुद्धां त्यांच्यांत इतरांपेक्षां कमी आहे.

महाराष्ट्र व आन्ध्रांतील कांहीं मुख्य जातींचे आंकडे ह्या खालील कोष्टकांत दिले आहेत.

## दर हजारीं

| जात | अविवाहित | | विवाहित | | विधवा विधुर | | विधवा वयवारीनें | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | पुरुष | स्त्रिया | पुरुष | स्त्रिया | विधुर | विधवा | ०—५ | ५—१२ | १२—२० | २०—४० | ४० मांवर |
| ब्राह्मण | ३७७ | २६४ | ५१९ | ५४२ | १०४ | १९४ | ५ | ३५ | ८० | १८८ | ४९१ |
| गोल्ला | ४०५ | ३३३ | ४९९ | ४७७ | ९६ | १९० | १ | २८ | १४३ | २२२ | ४०९ |
| गौंड्ल | ४७२ | ३२९ | ४०३ | ५१३ | १२५ | १५८ | ५ | २३ | १३० | २३७ | ३५२ |
| कापु | ३९३ | ३०९ | ५०३ | ४९० | १०४ | २०१ | ३ | ४१ | ११५ | २३२ | ४४६ |
| कोमटी | ४०२ | २८६ | ४९८ | ४६३ | १०० | २५१ | ७ | ६८ | १३७ | २८५ | ४८७ |
| मादिगा | ४८३ | ३८२ | ४२५ | ४४० | ९२ | १७८ | १५ | ४१ | १२० | २२७ | ३७८ |
| माला | ४७३ | ३६७ | ४३७ | ४५५ | ९० | १७८ | ६ | ५५ | १३० | १८० | ४२८ |
| मुन्नूर | ४२१ | ३२० | ४८५ | ४९२ | ९४ | १८८ | २२ | ३७ | २१० | २०५ | ३२८ |
| मुताराच | ४२४ | ३३९ | ४३८ | ४७२ | १३८ | १८९ | ७ | ३७ | ११६ | २१७ | ४५५ |
| साळी | ४१२ | ३१२ | ४९४ | ५०२ | ९४ | १८८ | ४ | ३९ | १२३ | १४६ | ४४९ |
| तेलंगा | ४१५ | ३३० | ४७७ | ४६९ | १०८ | २०० | १ | २१ | ९९ | २६६ | ५०९ |
| धनगर | ३९३ | २६२ | ५१८ | ५१५ | ८९ | २२३ | २ | २५ | ७६ | ११७ | ४९१ |
| कोळी | ४५३ | ३१८ | ४८७ | ३७६ | ६० | ३०६ | १८ | २७ | १३५ | ३५१ | ६९९ |
| लिंगायत | ४९९ | २६१ | ४२३ | ४८५ | ७८ | २५४ | २ | ३३ | ४७ | २११ | ६१२ |
| महार | ४६६ | ३३३ | ४८१ | ५०७ | ५१ | १५० | २ | १९ | ५८ | ११५ | ५३२ |
| मांग | ४३९ | ३१६ | ४८७ | ४८६ | ७४ | १९८ | ३ | १ | ३५ | १७० | ५५१ |
| मराठा | ४१८ | २८६ | ५०७ | ५३० | ७५ | १८४ | १ | १६ | ४३ | १३९ | ६२१ |

## शिक्षण—साक्षरता.

राज्याच्या जनसंख्येस धरून पाहिलें तर हजारीं ३३ लोकांना मात्र लिहितांवाचतां येतें असें दिसतें. त्रावणकोर संस्थानांत हें प्रमाण दर हजारीं ९७६, कोचीनांत २१४ बडोयांत १४७ म्हैसूरांत ८४ आढळतें. हिंदुस्थानांतील

इतर मोठ्या प्रांतांशीं तुलना केली तरी **हैद्राबादचा नंबर सर्वांच्या खालीं लागतो.** १९११ त २२०४ मुलांच्या शाळा व ९१ मुलींच्या शाळा असून १९२१ त ७,३५८ मुलांच्या व ६८१ मुलींच्या पाठशाळा होत्या. म्हणजे सर्व प्रकारच्या शाळा पूर्वी २२९५ होत्या त्या आतां ८०३९ पर्यंत वाढल्या. सन १९११ सालीं– ३,६८,१६६ लिहितांवाचतां येणारे होते तर हल्लींच्या खानेसुमारींत त्यांची संख्या ३,६५, २९० झाली आहे. म्हणजे शेंकडा एकानें कमी झाली आहे. राज्याची जनसंख्या जेथें ६.८ नें कमी झाली आहे तेथें साक्षरांची संख्या शेंकडा केवळ एकानें कमी झाली तरी त्यांची संख्या पुष्कळ वाढली असा निझाम सरकारचा अभिप्राय पडतो.

विद्येच्या बाबतींत तेलंगणाची महाराष्ट्रावर सरशी आहे. तेलंगणांत हजारामागें ४२ लोक व मराठवाड्यांत हजारामागें २४ लोक लिहावयास व वाचावयास शिकले आहेत. तेलंगणांत विद्या शिकलेल्या पुरुषांची संख्या प्रत्येक हजाराला एकानें वाढली असून **महाराष्ट्रांत** ती **हजाराला ४ या प्रमाणांत कमी झाली आहे.** शिकणाऱ्या स्त्रियांसंबंधानें पाहतां तेलंगणांत ही संख्या हजारांत ५ होती ती १३ पर्यंत वाढलेली आहे व मराठवाड्यांत ती १ पासून ४ पर्यंत वाढली आहे. विद्येच्या बाबतींत **हैदराबाद शहर** पुढें पाऊल टाकीत आहे हेंच तेलंगणांतील विद्याभिवृद्धीचें कारण होय. कारण हैदराबाद शहराचा समावेश तेलंगणांत होतो. तशांतून पुनः मराठवाड्यांतील तीन जिल्ह्यांत मात्र विद्या येणाऱ्या पुरुषांची संख्या कमी झालेली आहे आणि तेलंगणांतील पांच जिल्ह्यांत ती कमी झाली आहे. आदिलाबाद व नलगोंडा ह्या दोन जिल्ह्यांत मात्र शिकलेल्या पुरुषांची संख्या वाढली आहे. अतराफबल्दा जिल्ह्यांत कांहीं कमजास्त नाहीं. महाराष्ट्रांतील पांच जिल्ह्यांत पुरुषांच्या शिक्षणाची वाढ झाली आहे. एकंदरींत दोन्ही भागांत स्त्रीशिक्षणाचें पाऊल पुढें पडलें आहे.

हैदराबाद शहरची संख्या जमेस न धरली तरी हजारांला ३० लोक असें प्रमाण बसत असल्यानें महाराष्ट्रापेक्षां तेलंगणाची विद्याविषयक स्थिति थोडीशी पुढारली आहे असेंच म्हणतां येईल.

## संस्थानातील विविध जातींची साक्षरता.

| नांव | ५ वर्षांहून अधिक वयाचे दर हजारांत | | एकूण सरासरी दर हजाराला. |
|---|---|---|---|
| | पुरुष | स्त्रिया. | |
| सर्वजातींचे | ५७ | ८ | ३३ |
| ( १ ) हिंदु | ४७ | ४ | २६ |
| ( २ ) मुसलमान | १४० | ३५ | ८९ |
| ( ३ ) वन्यजातींचे | १० | ५ | ८ |
| ( ४ ) ख्रिस्ती | ३०८ | १८८ | २५२ |
| ( ५ ) जैन | ३९९ | ३५ | २३० |
| ( ६ ) शीख | ३२७ | ५० | २०९ |
| ( ७ ) पारशी | ८३४ | ६३९ | ७४० |
| ( ८ ) आर्यसमाजी | २१२ | ५२ | १३० |
| ( ९ ) ब्राह्मसमाजी | ४८१ | २११ | ३३५ |
| ( १० ) बौद्ध | ८३३ | ,, | ३५५ |
| ( ११ ) यहुदी | ५०० | १००० | ६६६ |

राज्यांतील तुरळक दिसणाऱ्या अल्पसंख्याक जाती, म्हणजे वरील पत्रकांतील अनुक्रम नंबर ३, ५, ६, ७, ८, ९, १० व ११ पुढें दाखविलेल्या वगळल्यावर साक्षरांत **ख्रिस्त्यांचा** नंबर पहिला, मुसलमानांचा दुसरा, व **हिंदूंचा तिसरा** असें निष्पन्न होतें. हिंदू जातींत अनेक पोटजाती आहेत. त्यांतील मुख्या ४६ पोटजातींचीं नांवें, त्यांची जनसंख्या व त्याची विद्यास्थिति खालीं दिलेल्या पत्रकांत दाखवीत आहों.

| पोटजातीचें नांव. | जनसंख्या | हजारांत लिहिणें शिकलेले | | |
|---|---|---|---|---|
| | | पुरुष | स्त्रिया | स्त्रीपुरुषांची सरासरी. |
| १ भोयी ... ... ... | २,६७,३७८ | ११ | ... | ६ |
| २ ब्राह्मण ... ... ... | २,४७,१२६ | ४८२ | ७२ | २९० |
| ३ चाकली ( परीट ) ... ... | १,८६,६६४ | १५ | १ | ८ |
| ४ चांभार ... ... ... | १,१३,५३४ | ४ | १ | २ |
| ५ देवांग ... ... ... | ८८,५१६ | ३१ | २ | १७ |
| ६ धनगर् ... ... ... | ४,६६,२५६ | ८ | २ | ५ |
| ७ धोबी ... ... ... | ५६,९४४ | १३ | २ | ७ |
| ८ डोंडिग ... ... ... | २६,०७७ | १८ | १ | १० |
| ९ गौंल्ड ... ... ... | ९१,३०४ | ९० | २ | ५३ |
| १० गोल्ल ... ... ... | ३,५३,९९३ | १४ | १ | ७ |
| ११ गौंल्ड ... ... ... | १,२१,४९४ | ३९ | ८ | २४ |
| १२ हजाम ... ... ... | १६,८२२ | १११ | १ | ५७ |
| १३ हट्कर् ... ... ... | २१,३३२ | २५ | ४३ | ३४ |
| १४ कलाल् ... ... ... | २,३८,७६९ | ४९ | ५ | २७ |
| १५ कम्मीर ... ... ... | ४१,७२३ | ३९ | १ | २१ |
| १६ कापु ... ... ... | ७,४७,८४९ | ५४ | ३ | २८ |
| १७ कोळी ... ... ... | ३९,८१९ | ५ | ... | ३ |
| १८ कोमटि ... ... ... | २,३८,०७२ | ३०७ | १२ | १६१ |
| १९ कुंभार ... ... ... | ५५,३३२ | २७ | १ | १४ |
| २० कुम्मर ... ... ... | ६५,८२५ | १३ | १ | ८ |
| २१ कुरमा ... ... ... | १,५६,१८९ | २४ | १ | १२ |
| २२ लिंगायत ... ... | ६,८७,५३९ | ८९ | ३ | ४६ |
| २३ लोहार ... ... ... | ३०,९०८ | १८६ | ४ | १०३ |
| २४ मादिग ... ... ... | ६,६९,२०३ | २ | १ | १ |
| २५ महार ... ... ... | ४,९४,३१६ | ३ | १ | २ |
| २६ माला ... ... ... | ३,७५,७४८ | १३ | १ | ८ |
| २७ मालि ... ... ... | ८५,४७६ | २१ | १ | ११ |

| पोटजातीचें नांव | जनसंख्या | हजारांत लिहिणें शिकलेले | | |
|---|---|---|---|---|
| | | पुरुष | स्त्रिया | स्त्रीपुरुषांची सरासरी |
| २८ मांग ... ... ... | ३,३०,८४० | ३ | १ | २ |
| २९ मंगल ... ... ... | १,०३,७५३ | १७ | १ | ९ |
| ३० मराठा ... ... ... | १४,०७,२०० | २६ | ३ | १५ |
| ३१ पुन्नुरु ... ... ... | १,८३,३५६ | ४३ | १ | २१ |
| ३२ मुतराच... ... ... | २,३७,६६२ | १७ | ... | ८ |
| ३३ पंचाल ... ... ... | ५५,९७५ | ४८ | ६ | २७ |
| ३४ राजपुत्र... ... ... | ५७,०३२ | १४२ | २४ | ८५ |
| ३५ साळी ... ... ... | २,७९,०७० | ५३ | ३ | २३ |
| ३६ सातानि... ... ... | ३९,७३३ | १८७ | १४ | ९१ |
| ३७ सोनार ... ... ... | ९९,०६५ | २०५ | २१ | ११८ |
| ३८ सुनार ... ... ... | ७८,९४७ | ५३ | ५ | ३२ |
| ३९ तलब ... ... ... | ६,६२,१८८ | ३० | ४ | १७ |
| ४० तेली ... ... ... | ४४,१६१ | ६६ | ४ | ४९ |
| ४१ उप्पार ... ... ... | ७४,१८५ | ८ | ... | ४ |
| ४२ वेलमा ... ... ... | ३६,४५६ | ... | ... | ... |
| ४३ वड्डुर ... ... ... | १,०७,६६८ | ४ | ... | २ |
| ४४ वंजरी ... ... ... | ४०,०६५ | २७ | २ | १६ |
| ४५ अवुतुल... ... ... | १५,८२१ | *... | *... | *... |
| ४६ भोगमुवारु ... ... | २१,२५८ | *... | *... | *... |

ह्यावरून असें निष्पन्न होत आहे कीं, साक्षरतेंत ब्राह्मणांचा नंबर पहिला व कोमट्यांचा दुसरा. ब्राह्मणांत प्रतिसहस्रांत ४८२ पुरुष व ७३ स्त्रिया साक्षर आणि ख्रिस्त्यांतही एकंदर सरासरी ( २९० ) हून अधिक शिक्षित लोक असले तरी, वरील पत्रकांत दाखविलेल्या विविध अंतराच्या जातींचे पुष्कळ लोक असल्यानें पण्डुरोगानें पीडित झालेला मनुष्य जसा अनेक प्रकारच्या रोगांनीं कमी अधिक प्रमाणानें पछाडला जाऊन अधिकच निस्तेज दिसूं लागतो, तद्वत् हिंदुसमाजाची ह्या बाबतींत स्थिति झाली आहे.

## भाषा.

ह्या राज्यांतील मुख्य भाषा बोलणारांची संख्या ह्या खालीं दिली आहे.

| भाषेचें नांव | ती बोलणारांची संख्या. |
|---|---|
| तेलुगु | ६०, १५, १७४. |
| मराठी | ३३, ९४, ८५८. |
| कानडी | १५, ३६, ९२८. |
| उर्दू | १२, ९०, ८६६. |
| तामील | २१, १६८. |
| गुजराथी | १६, ७९३. |

वरील संख्येवरून ह्या राज्यांत तेलगु बोलणारे सर्वांपेक्षां अधिक आहेत असें कळून येतें. १८८१ सालापासून तेलंगणाची जनसंख्या शेंकडा ४५ नें वाढून तेलगु बोलणारांची संख्या शेंकडा ४१ अधिक झाली आहे. मागील दशाब्दापेक्षां ह्या दशाब्दांत मराठी व उर्दु बोलणारांची संख्याही वाढली असून, कानडी बोलणारांची संख्या क्रमाक्रमानें कमी होत चालली आहे असें दिसतें. ह्याचें स्पष्टीकरण खालीं दिलें आहे.

## दरहजारास.

| भाषा बोलणारे | १८९१ | १९०१ | १९११ | १९२१ |
|---|---|---|---|---|
| तेलंगी | ४३० | ४८२ | ४७६ | ४८२ |
| मराठी | ३०३ | २६० | २६१ | २६४ |
| कानडी | १२६ | १४० | १२६ | १२३ |
| उर्दु | १०४ | १०४ | १०० | १०४ |

तेलगु भाषा बोलणारांमध्यें शेंकडा ८९ लोक तेलंगणांतले व बाकीचे महाराष्ट्रांत राहणारे आहेत. त्याचें विवेचन खालीं केलें आहे.

तेलगु बोलणारांची संख्या.-

| | |
|---|---|
| हैदराबाद शहर | १,५५,८०६ |
| अतराफबल्दा जिल्हा | ३,९८,७१८ |
| वरंगल ,, | ८,०९,३७९ |
| करीमनगर ,, | १०,३९,१८६ |
| आदिलाबाद ,, | ३,६७,४९० |
| मेदक ,, | ५,७५,८२४ |
| निजामाबाद ,, | ४,४७,२६४ |
| महबूबनगर ,, | ६,४२,७४३ |
| नलगोंडा ,, | ९,०२,६४१ |
| औरंगाबाद ,, | ४,४३९ |
| बीड ,, | १,१८१ |
| नांदेड ,, | १,१९,०८३ |
| पर्भणी जिल्हा | १०,८२४ |
| गुल्बर्गा ,, | १,७६,८६४ |
| उस्मानाबाद ,, | ५,५९२ |
| रायचूर ,, | २,३०,७५७ |
| बीदर ,, | १,३४,३८३ |
| एकूण | ६०,१५,१७४ |

नलगोंडा जिल्ह्याच्या लोकवस्तीच्या मानानें शेंकडा ९५ पेक्षां अधिक लोक तेलुगु बोलणारे असल्यानें त्यांची नंबरवारी पहिली लागते. जवळ जवळ शेंकडा ९५ लोक ही भाषा बोलणारे करीमनगर जिल्ह्यांत असल्यानें त्या जिल्ह्याचा नंबर दुसरा येतो. वरंगल, मेदक व निजामबाद जिल्ह्यांत शेंकडा ८७ पासून

८९ लोक तेलुगु बोलणारे आहेत. त्यांची संख्या अतराफबल्दा जिल्ह्यांत शेंकडा ९०, महबूबनगर जिल्ह्यांत ८५ व आदिलाबाद जिल्ह्यांत ५५ अशी आहे. हैदराबाद, शहराला हें प्रमाण ३९ पडतें.

औरंगाबाद, बीड, पर्भणी, उस्मानाबाद हे जिल्हे मुख्यत्वें **महाराष्ट्रीय** आहेत. ह्या जिल्ह्यांतले शेंकडा ८० लोक मराठी भाषा बोलतात. शेंकडा ८८ लोकांना मराठी बोलविणारा **बीड** जिल्हा सर्वांत अग्रस्थान पटकावतो. नांदेड व बीदर जिल्ह्यांत तेलुगुपेक्षां मराठी अधिक असून, गुल्बर्गा व रायचूर जिल्ह्यांत मराठी-पेक्षां तेलुगु अधिक आहे. तेलंगणांतील सर्व जिल्ह्यांमध्यें आदिलाबाद जिल्ह्यांत तेलुगु बोलणारे कमी, तेथें सर्वांहून अधिक लोक मराठी बोलणारे आहेत. हैदराबाद शहरांत शेंकडा फक्त ३ माणसें मराठी बोलणारीं सांपडतात.

ह्या राज्यांत शेंकडा ९३ लोक **कानडी** बोलणारे जिल्हे म्हटले म्हणजे गुल्बर्गा, रायचूर व बीदर हे होत. तरी पण १८८१ सालापासून गुल्बर्गा, व रायचूर जिल्ह्यांत अनुक्रमें शेंकडा ४० व ३२ ह्या प्रमाणांत लोकसंख्या वाढली असूनही कानडी बोलणारांची संख्या शेंकडा २५ सावर गेलेली नाहीं. ह्या जिल्ह्यांतील एक भाग तेलुगु बोलणारांनीं व दुसरा भाग मराठी बोलणारांनीं व्यापिलेला आहेसें दिसून येतें.

उर्दु बोलणारे वरील भाषा बोलणारांप्रमाणें प्रत्येक जिल्ह्यांत सामील न होतां राज्यभर पसरले आहेत. हीच राजभाषा. ह्या दशाब्दांत ज्यांची मातृभाषा उर्दु आहे अशांची संख्या १२,९०,८६६ होती. म्हणजे मागील दशाब्दांपेक्षां ५०७५६ नें ती कमी झाली. तथापि मागील दशाब्दांत प्रतिहजारीं १०० असलेलें ही भाषा बोलणारांचें प्रमाण हल्लींच्या दशाब्दांत १०४ वर गेलेलें आहे. मुसलमानांची संख्या १२,९८,२७७ असतां, उर्दु मातृभाषा असलेल्यांची संख्या १२,९०,८६६ दाखविण्यांत आली आहे ह्यावरून राहिलेल्या ७४११ जणांनीं इतर भाषा आपली **मातृभाषा** असल्याचें लिहून दिलें असावें असें दिसतें. मागील दशवार्षिक गणतीच्या वेळींही सुमारें ४०,००० मुसलमान लोकांनीं उर्दु शिवाय इतर एखादी भाषा आपली मातृभाषा असल्याचें लिहविलें होतें.

## हैद्राबाद शहरांतील मुख्य भाषांची संख्या.

| | |
|---|---|
| उर्दू........१,९९,०७८ | राजस्थानी......६,१३६ |
| तेलगु......१,५५,८०६ | इंग्लिश.........५,८,५१ |
| तामिळ ...१३,५९३ | हिंदी ......४,८५३ |
| मराठी......११ ३९९ | कानडी.........२,१०५ |

## उद्योगधंदे.

आपल्या देशांत जातीला धरून वृत्ति व वृत्तीला धरून हातचीं कामें करावीं लागतात. आतांपर्यंत दिलेल्या पत्रकांत विविध मुख्यजातींचीं नांवें देण्यांत आलीं. परंतु त्यांतल्या कोणाच्या वृत्ति कोणत्या हें आपणांस माहीत असतेंच म्हणून तो खुलासा एथें केलेला नाहीं.

ह्या देशांतील वृत्ति चार प्रकारच्या आहेतः

| | जनसंख्या | |
|---|---|---|
| ( १ ) सर्व पदार्थांचें उत्पादन ... ... ... | ६९,४७,९१३ | ... ५६ % |
| ( २ ) पदार्थ तयार करून देणें ......... | ३१,२३,६१६ | ... २५ % |
| ( ३ ) राज्यपरिपालन, स्वतंत्रकला ......... | ७,६३,०९२ | ... ६ % |
| ( ४ ) इतर ........................ | १६,३७,१४९ | ... १३ % |
| एकूण | १,२४,७१,७७० | |

( १ ) सर्व पदार्थांचें उत्पादन.

ह्यांत कृषिकर्म, आणि खनिज पदार्थांची उत्पत्ति असे दोन भाग. कृष्यादि-कर्मे—ह्यांत पांच भाग आहेत.

( अ ) **शेतकीः**—राज्यांतील प्रजेपैकीं **शेंकडा ६० लोक** ह्यावरच पोट भरतात. म्हणून हा धंदा फार प्रमुख आहे शेतकऱ्यांची परिस्थिति ह्या खालीं दिलेल्या कोष्टकांत दाखविली आहे.

## राज्याचा एकंदर विस्तार ८२, ६९८ चौरस मैल.

| भाग | सरासरीवर दरएक मैलास जनसंख्या | एकंदर विस्तारांत शेंकडा | | | साधारण पर्जन्याचें मान | लागवड केलेल्या क्षेत्रफळांत शेंकडा. | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | लागवड करण्या लायक | लागवड केलेली. | लागवड केलेल्या जमिनींत शेंकडा पाण्यानें भिजलेली | | भात | गहूं | डाळीचे पदार्थ | जोंधळे | कापूस | गळिताचीं धान्यें | इतरपीक. |
| एकंदर राज्य | १५१ | ७६.५ | ५८.५ | ८.२ | ३०.१= | ३.७ | ३.१ | २.६ | १६.२ | ७.३ | ३.८ | ६३.३ |
| तेलंगण | १५५ | ६६.६ | ४५.७ | १४.१ | ३१.९४ | ७.७ | ०.१ | १.८ | ११.२ | १.४ | ४.५ | ७३.३ |
| महाराष्ट्र | १४६ | ८७.३ | ७२.४ | ३.० | २८.२० | १.० | ५.१ | ३.३ | २१.२ | १३.४ | २.८ | ५३.२ |

शेतकींत ह्याखालीं दिलेल्या निरनिराळ्या प्रकारच्या लोकांचा समावेश होतो.

| नांव | उपजीविका करणारांची संख्या | |
|---|---|---|
| | १९११ | १९२१ |
| (१) जमीन कौलानें देऊन उत्पन्न भोगणारे | ७,३१,८०३ | ७,६१,६१४ |
| (२) जमीन नांगरणारे ... -- ... | ४०,६४,९५० | ३६,०७,३६६ |
| (३) एजंट, संस्थानांचे मॅनेजर इत्यादि | ३४,५४० | ३३,२०२ |
| (४) पगारी नोकर, मजूर ... ... | २७,८८,२१२ | १७,६३,५६२ |
| | ७६,१९,५०५ | ६१,६५,७४४ |

वरील संख्येवरून मागील दहासालांपेक्षां ह्या दहा सालांत एकंदरीनें ह्या धंद्यांतल्या लोकांची संख्या शेंकडा १९ नें कमी झालेली दिसते. ह्याला कारणें म्हटलीं म्हणजे ह्या दशाब्दांत आलेल्या रोगांच्या सांथी व दुष्काळ. पहिल्या प्रकारच्या लोकांत वाढ झालेली आहे त्यावरून असें दिसतें कीं, जमिनी **शेतकऱ्यांच्या व मालकांच्या ताब्यांतून निघून** केवळ खंड वसूल करणारांच्या ताब्यांत जाऊं लागल्या आहेत.

१. भाजीपाला, फळफळावळ, विड्यांचीं ( खायचीं ) पानें, द्राक्षें इत्यादि पदार्थांची पैदास करणारांची संख्या मागील दशाब्दांत २२,८०० होती, ती आतां ५०, १८३ झाली आहे. म्हणजे शेंकडा १२० लोक ह्या धंद्यांत अधिक शिरले आहेत. ह्यावरून असें म्हणतां येईल कीं, सामान्य शेतकीपेक्षां असल्या शेतकीकडे लोकांचा ओढा अधिक दिसूं लागला आहे.

२. इमारतींचीं लांकडें, जळाऊ लांकडें, कोळसे तयार करणे इत्यादि धंद्यांतील लोकांची संख्या मागील दशाब्दांत ४०, ९०५ होती, ह्या दशाब्दांत ती ६०,६४१ आहे. ह्यांत सुद्धां शेंकडा ४८ लोक जास्त झाले आहेत.

३. पशूंची जोपासना करणारांची संख्या मागील दहा वर्षांत ५,९७,७२८ होती ती ह्या दहा वर्षांत ५,१६,३२५ भरली. म्हणजे शेंकडा १४ लोक कमी झाले. हें आपल्या देशास फार हानिकारक आहे. तपशीलवार आंकडे खालीं दिले आहेत.

| | ह्या उद्योगावर पोट भरणारांची संख्या | |
|---|---|---|
| | १९११ | १९२१ |
| गाई, म्हशी पाळणारे ... ... ... | ४२,४१८ | २७,९९९ |
| शेळ्या, मेंढ्यांचे कळप बाळगणारे ... | १,०९,७३९ | ५२,७३२ |
| घोडे, खेचर इत्यादि पाळणारे ... ... | ४१३ | १,५५१ |
| गुरें सांभाळणारे ( राखणारे ) ... ... | ४,४५,१५८ | ४,३४,०४३ |
| एकूण | ५,९७,७२८ | ५,१६,३२५ |

वरील पत्रकावरून असें निदर्शनास येतें कीं, मानवजातीच्या जीवनाला आधारभूत असलेल्या **गायी** वगैरे जनावरांची जोपासना करणारांची संख्या कमी होऊन आपल्या सुलभ जीवनाला उपयोगी पडणारे घोडे, गाढव यांचा अभिलाष धरणारांची संख्या वाढत चालली आहे.

४. मासे धरणारे, पारध करणारे ह्यांची संख्या अनुक्रमें शेंकडा २७ व ९ ह्या प्रमाणांनीं वाढली आहे.

(आ) **खनिज पदार्थांची उत्पत्तिः**—ह्यांत खाणी खणणें, शहाबादी वगैरे कठिण दगड काढणें, मीठ तयार करणें इत्यादि कामें येतात, ह्या राज्यांत मीठ तयार करावें लागत नाहीं. दगड काढणारांची संख्या मागील दशाब्दांत ३,१४९ होती ती ह्या दशाब्दांत ४,८८३ झाली आहे. मागील दशाब्दांत खाणीवर उपजीविका करणारांची संख्या १५,३२५ होती ती ह्या दशाब्दांत १५,४५४ भरली.

ह्यांतले १५,०५८ लोक तर वरंगल जिल्ह्यांतील कोळशाच्या खाणी-वर काम करणारे आहेत. सोन्याच्या खाणींतलें काम ह्या दशाब्दांत बंद करावें लागलें. एकंदरीनें ह्या धंद्यांतील लोकांची संख्या शेंकडा १३ नें वाढली आहे.

## २. पदार्थ तयार करून देणें.

ह्याचे ( अ ) हातकाम, ( आ ) वाहतूक, आणि ( इ ) व्यापार असे तीन भाग केले आहेत.

[ अ ] **हातकामः**—ह्यांतील मुख्य प्रकारांची संख्या खालीं दिली आहे.

| कामाचा प्रकार | त्यावर उपजीविका करणारांची संख्या | |
|---|---|---|
| | १९११ | १९२१ |
| विणकाम ... ... | ५,१७,७[illegible]० | ४,३८,७५३ |
| कातड्याचें काम ... ... | १५,९३० | २८,३०० |
| कापण्याचें काम ... ... | १,४६,६४७ | १,६७,४११ |
| लोखंडी काम ... ... | ८८,७७२ | २९,८०७ |
| विटा पाडण्याचें काम ... | १,०३,५१४ | १,१२,९७० |
| रासायनिक पदार्थ ... ... | १९,२११ | २२,४२४ |
| खाण्याचे पदार्थ तयार करणें ... | १,१९,२४५ | १,०३,०३७ |
| कपडे व त्याला लागणारें सामान तयार करणें. | ६,४२,४४८ | ५,४२,२८८ |
| इमारती काम ... ... ... | १,११,१७४ | ९०,५५६ |
| इतर कामें | ९७,९५१ | १,१४,८१७ |
| | १८,६२,७४२ | १६,५०,३६३ |

वरील संख्येवरून पाहतां एकंदर शेंकडा ९ हातानें कामें करणारांची संख्या कमी झाल्याचें दिसतें. ह्या शाखेंत **कापड विणणाऱ्या लोकांची** संख्या

शेंकडा १५ नें कमी झाली आहे, तसेंच **कपडे तयार करणारे** शेंकडा १६ नीं कमी झाले आहेत. दुष्काळ व रोगांची सांथ हींच ह्या व इतर धंद्यांतील लोकांची संख्या कमी होण्याचीं कारणें आहेत असें निझाम सरकार म्हणतें. खाण्याचे जिन्नस तयार करणारांची संख्या शेंकडा १४ नें कमी झाली असून, **खाटकांची** संख्या, जी मागील दहा वर्षांत २१, १९२ होती ती हल्लींच्या १० वर्षांत २५, ७३८ झाल्यामुळेंच कदाचित् चामड्याचा धंदा करणारांची संख्या वाढली असावी.

( आ )—**वाहतूकः**—ही जलमार्गानें, जमिनीवरील सडकांनीं व लोह-मार्गानें ( रेल्वे ) होत असते. तिचा तपशील खालीं दिल्याप्रमाणें आहे.

| काम | त्यावर पोट भरणारांची संख्या | |
|---|---|---|
| | १९११ | १९२१ |
| जलवाहकत्व ... ... ... | २,६६७ | ३,३१२ |
| सडकांची वाहतूक ... ... | १,११,४७६ | १,६१,८७६ |
| रेलवेची वाहतूक... ... ... | १८,६०९ | २३,७३२ |
| एकूण | १,३२,७५२ | १,८८,९२० |

असले परिश्रम करणारांची संख्या शेंकडा ४४ नें वाढल्याचें दिसतें. पडावांचें मालक होणें, पडाव चालविणें, पालख्या वगैरे वाहनें वाहणें, रेल्वे, टपाल, टेलिग्राफ व टेलिफोनचें काम करणें ह्या धंद्यांत लोक अधिक शिरत असल्यानें ही वाढ झाली आहे. शेतांत मजुरी करणारे भोयी लोक दुष्काळांत आपल्या वडिलोपार्जित वाहतूक वृत्तीचा पुनः अवलंब करीत असावे. ह्या दहावर्षांत **शिकंदराबाद-गदग रेल्वे** उघडली गेल्यानें रेल्वे वगैरे शाखांतल्या लोकांत वाढ झाली आहे.

( इ ) **व्यापारः**—ही पुष्कळांना आश्रय देणारी वृत्ति आहे. मागच्या दशाब्दांत त्यावर गुजराण करणारांची संख्या ११,३४,३६८ होती ती ह्या दहा-

वर्षांत १२,१८,६९६ झाली आहे, म्हणजे एकंदरीनें शेंकडा ७ माणसें अधिक झाली. मुख्य व्यापारांतील घडामोड ह्या खालीं दिली आहे.

| वृत्ति | गुजराण करणारांची संख्या | |
|---|---|---|
| | १९११ | १९२१ |
| कापड इत्यादि विणलेल्या वस्तूंचा व्यापार | ८१,१३९ | ६२,३३१ |
| कातडीं, केंस इत्यादिकांचा व्यापार ... | १५,२१८ | ९,४६८ |
| इमारतीला लागणाऱ्या लांकडांचा व्यापार | ८,५११ | ५,४३० |
| लोखंडाचा व्यापार ... ... ... | ९५९ | २,५७४ |
| दूध, लोणी, तूप इत्यादिकांचा व्यापार ... | १७,०४० | ७४,३२२ |
| वेलदोडे, पानसुपारी, भाजीपाला ह्यांचा व्यापार | ९७,५६४ | १,१२,३७१ |
| धान्यें, डाळीचे प्रकार वगैरेंचा व्यापार ... | १,०६,१७१ | १,१७,८३९ |
| तंबाकू, अफू, गांज्यांचा व्यापार ... | ४,६१५ | २४,०८८ |
| फर्निचरचा व्यापार ... ... ... | ७,६७० | ९,५४६ |
| जळाऊ लांकडांचा व्यापार ... ... | १५,८८० | ३९ ८०० |

## ३ राज्यपरिपालन व स्वतंत्रकला.

याचेही तीन भाग केले आहेत. ( अ ) सैन्य, ( आ ) राज्यपरिपालन, ( इ ) स्वतंत्रकला.

( अ ) **सैन्यः**— ह्या राज्यांत असलेलें इंग्रजी सैन्य शेंकडा ४४ नें व देशी सैन्य शेंकडा ३ नें वाढलें आहे. ग्रामरक्षक व पोलीस मिळून शेंकडा सुमारें ६० लोक जास्त झाले आहेत त्यांची संख्या येणेंप्रमाणें:—

| | १९११ | १९२१ |
|---|---|---|
| सेना ( इंग्रजी ) ... ... | ५,५५४ | ८००० |
| सैन्य ( देशी ) ... | ६३,१९६ | ६५,२१९ |
| पोलीस ... ... | ३५,१३५ | ४२,७९१ |
| ग्रामरक्षक ... ... | ६०,५१३ | १,१०,२०२ |

**( आ ) राज्यपरिपालनः**–ह्यांत स्टेट सर्व्हिसवाले, इंडियन् व फॉरेन् सर्व्हिसवाले म्युनिसिपल् ( शहरसफायी ) इत्यादि शाखांचे लोक, ग्रामरक्षकांशिवाय ग्रामसेवकांचा समावेश होतो. ह्यांची वटसंख्या मागील दहावर्षांत ३,४६,१८४ होती ती सांप्रतच्या दहावर्षांत ३,३५,४५९ झाली आहे, म्हणजे शेंकडा ३ लोक कमी झाले. ग्रामसेवकांपैकीं कांहीं लोकांना कमी केलें हेंच त्यांची संख्या कमी होण्याचें कारण होय.

**( इ ) स्वतंत्रकलाः**––ह्या शाखेंत धर्म न्यायशास्त्र ( कायदा ), वैद्यकी, उपाध्यायत्व, ग्रंथकर्ते, कलाविद, प्रकृतिशास्त्रज्ञ इत्यादिकांचा समावेश होतो तपशील येणेंप्रमाणें:–

| | १९११ | १९२१ |
|---|---|---|
| धर्म ( पुरोहित, पाद्री, पुजारी वगैरे ) ... | १,०१,१८७ | ६०,४२९ |
| न्यायशास्त्र ( लॉ अथवा कानू ) ... ... | | |
| वकील, कार्जी, मुखत्यार वगैरे ... ... | ६,८३५ | २६,६४१ |
| वकिलांचे गुमास्ते, दरखास्ती लिहिणारे ... | २८ | ४७७ |
| वद्य ( सर्वप्रकारचे ), दाया, देवी काढणारे, कम्पाउंडर इत्यादि ... ... ... ... ... | ३०,९७३ | २९,४९९ |
| उपाध्यायत्व ( प्रोफेसर, सर्व प्रकारचे उपाध्याय इत्यादि ) ... ... ... ... ... | २३,५७४ | ५३,०६३ |
| ग्रंथकर्ते, कला जाणणारे, प्रकृतिशास्त्रज्ञ, ... लेखक इत्यादि... ... ... ... ... | ४६,४४२ | २७,३०२ |
| एकूण | २,०९,०३९ | २,०१,४११ |

स्वतंत्र कलेंतील लोक एकंदरीनें शेंकडा ४ कमी झाले आहेत. मात्र वकिलीच्या धंद्यांतले लोक शेंकडा २९० नें व उपाध्याय शेंकडा १२५ नें वाढले आहेत, व बाकीच्या धंद्यांतलें कमी झाले आहेत असें दिसून येतें.

## ४ इतर धंदे.

ह्या शाखेंत, आपल्या उत्पन्नावर निर्वाह करणारे, घरांतली कामें करणारे, किरकोळ धंदेवाले, देशाचा लाभ न करणारे ( अनुत्पादकवृत्ति ) असे भाग पाडले आहेत.

| | १९११ | १९२१ | |
|---|---|---|---|
| आपल्या उत्पन्नावर राहणारे,(उपकाराचें वेतन घेणारे इत्यादि) ... ... ... ... | २८,३७७ | ३१,७७९ | |
| गृहसेवक ( स्वयंपाकी, पाणके, वगैरे, ... | ४,२१,१४७ | ३,४४,५०३ | |
| किरकोळ ( माफी करणारे वगैरे ) ... | ३,८०,१४८ | ९,४२,८७७ | |
| देशाला फलप्राप्ति न करून देणारेः-- | | | |
| कैदी, वेडे, ( पागलखान्यांतले लोक )... | .. ३,४२८ | १,९६६ | |
| भिकारी, मंत्रवाले, इत्यादिः-- | | ३,०३,७६० | |
| व्यभिचारी, कुंटणागरी करणारे ... | २,७२,७११ | १०,८६४ | ३,१६,०२४ |
| इतर निष्फल वृत्तिवाले | | १,४०० | |

देशाचे प्रगतीच्या मुळाला कीड लावून तिचा नाश करणारे **भिकारी व व्यभिचारी** ह्यांची संख्या कमी होण्याऐवजीं वाढत जाणें हें देशाचें दुर्भाग्य होय. ह्या वृत्तींचा नायनाट करण्यास सर्वांनीं झटलें पाहिजे.

## उद्योगाचीं मुख्य स्थळें.

रेशमाचें हातविणकाम...................... सिद्दिपेट, संगारेड्डि.

| | | |
|---|---|---|
| टसर रेशीम | वरंगल, मठवाडा, हसनूपर्ति ............ | वरंगल जिल्हा |
| | कोसगी.......................................... | गुल्बर्गा, ,, |
| | नारायणपेठ...................................... | महबूबनगर ,, |
| | महादेवपूर .................................. | करीमनगर ,, |
| | आरमूर........................................ | निजामाबाद,, |

नारायणपेठचीं रेशमी लुगडीं फार प्रसिद्ध आहेत. त्यांची किंमत ५० रुपयांपासून ५०० पर्यंत असते.

किनखाब्, हिंम्रू, मश्रू, रेशमीकपडे ............औरंगाबाद्

सुती व रेशमी लुगडीं ...............शोरापूर, शहापूर, कोडंगल ( गुल्-
वर्गा जिल्हा )

कांबळी { मक्तल्, अमराबाद्, नागरकर्नुल्, देवर्कद्रा ( महबूब नगर जिल्हा
गुडिकेश्वार, चिंचोळीं ( गुल्बर्गा जिल्हा )

सतरंज्या ... ... ... ... ... ... ... ... ... ... ... ... ...मठवाडा

पितळेचें सामान { सिद्धिपेट [ मेदक जिल्हा ]
पेंबर्ति [ नलगांडा जिल्हा ]

कागद् ............गुडूर, माडूर, दोंर्ती, गोमार, बाजलीपूर, वायिलूर,
वरंगल्, कोयिलकोंडा [ महबूबनगर जिल्हा ] कोरटला [करीमनगर
जिल्हा ]

## कारखाने.

खालीं नमूद केलेलीं कर्मागारें सरकारच्या हुकमतीखालीं चालतातः—

१. हैद्राबादची टांकसाळ ( Mint )

२. ,, विद्युच्छक्तिशाखा ( Electric Department )

३. अल्कोहोल् फ्याक्टरी, कामारेड्डि.

४. सरकारी मुद्राणालय.( Government Central Press. )

५. विणकाम परिश्रमाची प्रदर्शनशाला, हैद्राबाद्.

इ. स. १९२३ ( १३३३ फसलींत ) मधील खासगी कारखाने ह्या खालीं दाखविले आहेत.

ह्या राज्यांत फ्याक्टरीसंबंधाचे कायदे अद्याप निर्माण झाले नसल्यानें, वाफेच्या व विद्युच्छक्तीच्या वगैरे सहाय्याभावीं चालविल्या जाणाऱ्या हातकामाच्या कारखान्यांची संख्या उपलब्ध झाली नाहीं.

## खासगी कारखाने.

| नांव | जिल्हा | संख्या |
|---|---|---|
| बर्फाचा कारखाना ( Ice-factory ) | हैद्राबाद् | १ |
| लोखंडाचा ,, | ,, | १ |
| कौलांचा ,, | ,, | १ |
| विद्युत्शक्तीच्या आधारें चालविल्या जाणाऱ्या पिठाच्या गिरण्या | ,, | ७० |
| ,, ,, ,, ,, भाताच्या गिरण्या | ,, | ३ |
| ऑइल(तेल)एन्जिनूवर चालविलेल्या भाताच्या गिरण्या | ,, | १ |
| डिस्टिलऱ्या ( दारूच्या फॅक्टऱ्या ) | ,, | ३ |
| कापूस पिंजून कापड विणण्याच्या गिरण्या. | ,, | २ |
| मोटारी नीट करण्याचे वर्क्शॉप | ,, | ७ |
| विद्युत् शक्तीवर चालविलेल्या तेलाच्या गिरण्या | ,, | १ |
| ,, ,, छापखाना | ,, | १ |
| ,, ,, सोडा लेमोनेडच्या फॅक्टऱ्या | ,, | १ |
| डाळी करण्याच्या फॅक्टऱ्या | ,, | १० |
| मोटारीच्या टायरी नीट करण्याचीं यंत्रें | ,, | १ |
| सिगारेट फॅक्टरी | ,, | १ |
| आगकाड्यांची फॅक्टरी | ,, | १ |
| आसिड् ( सल्फ्युरीक् आसिड् इत्यादि ) फॅक्टरी | ,, | १ |
| इमारती लांकडें कापण्याची फॅक्टरी | ,, | १ |
| | एकूण | १०७ |
| | वरंगल जिल्हा | |
| वाफेच्या एन्जिनाचीं जिनें | ,, | ४ |
| ऑइल् ,, ,, | ,, | २ |
| कापूस दाबण्याचे प्रेस | ,, | १ |
| जिनिंग व प्रेसिंग फॅक्टऱ्या | ,, | १ |
| ऑइल एंजिनानें चालविलेल्या भाताच्या गिरण्या | ,, | १ |

| नांव | जिल्हा | संख्या |
|---|---|---|
| स्टीम एंजिनानें चालविलेल्या भातकांडण्याच्या व सरक्या काढण्याच्या फॅक्टऱ्या | | १५ |
| पाण्याचें पंपिंग स्टेशन | ,, | १ |
| | एकूण | २५ |
| वाफेच्या एंजिनाचीं जिनें | करीमनगर जिल्हा | १ |
| | एकूण | १ |
| वाफेच्या एंजिनाचीं जिनें | आदिलाबाद जि. | १ |
| | एकूण | १ |
| | मेदक | |
| ऑइल् एंजिनवर चालणाऱ्या भाताच्या गिरण्या | | १४ |
| वाफेच्या ,, ,, ,, ,, | ,, | ६ |
| | एकूण | २० |
| | निजामाबाद | |
| वाफेच्या एंजिनाचीं जिनें | ,, | २ |
| जिनिंग व प्रेसिंग फॅक्टऱ्या | ,, | १ |
| ऑइल् एंजिनच्या भाताच्या गिरण्या | ,, | १ |
| वाफेच्या ,, ,, ,, | ,, | ७ |
| स्टीमएंजिनवर चालणाऱ्या भात कांडण्याच्या व सरक्या काढण्याच्या गिरण्या | | ५ |
| रेशमाची फॅक्टरी | ,, | १ |
| | ,, | |
| | एकूण | १७ |
| | महबूबनगर | |
| वाफेच्या शक्तीवर चालणाऱ्या भाताच्या गिरण्या | ,, | २ |
| डिस्टिलरी ( दारू गाळण्याचा कारखाना ) | ,, | १ |
| | एकूण | ३ |
| | नल्लगोंडा | |
| वाफेच्या शक्तीवर चालणाऱ्या भाताच्या गिरण्या | ,, | १ |
| | एकूण | १ |
| | औरंगाबाद | |
| वाफेच्या एंजिनाचीं जिनें | | २९ |
| जिनिंग व प्रेसिंग फॅक्टऱ्या | ,, | ११ |
| | ,, | |

४

| नांव | जिल्हा | संख्या |
|---|---|---|
| ऑइल् एंजिनच्या पिठाच्या गिरण्या | ,, | ७ |
| वाफेच्या ,, ,, ,, | ,, | १ |
| कापूस पिंजून कापड विणण्याची फॅक्टरी | ,, | १ |
| | एकूण | ४९ |
| | बीड | |
| वाफेच्या इंजिनाचीं जिनें | ,, | ११ |
| ऑइल ,, ,, | ,, | ३ |
| ,, ,, पिठाच्या गिरण्या | ,, | ५ |
| | एकूण | १९ |
| | नांदेड. | |
| वाफेच्या एंजिनाचीं जिनें | ,, | २९ |
| ऑईल् ,, ,, | ,, | ३ |
| कापूस दाबण्याचे प्रेस | ,, | ४ |
| जिनिंग व प्रेसिंग फॅक्टऱ्या | ,, | १० |
| पाण्याचीं पंपिंग स्टेशनें | ,, | ३ |
| | एकूण | ४९ |
| | पर्भनी | |
| वाफेच्या एंजिनांचीं जिनें | ,, | ३४ |
| आईल ,, ,, | ,, | २ |
| कापूस दाबण्याचे प्रेस | ,, | ५ |
| जिनिंग व प्रेसिंग फॅक्टऱ्या | ,, | १३ |
| ऑईल् इंजिनाच्या पिठाच्या गिरण्या | ,, | १२ |
| वाफेच्या ,, ,, ,, | ,, | १ |
| डिस्टिलरी ( दारू गाळण्याचा कारखाना ) | ,, | १ |
| | एकूण | ६८ |
| | गुलबर्गा | |
| वाफेच्या एंजिनांचीं जिनें | ,, | ९ |
| कापूस दाबण्याचे प्रेस | ,, | २ |
| जिनिंग व प्रेसिंग फॅक्टऱ्या | ,, | ३ |

| नांव | जिल्हा | संख्या |
|---|---|---|
| ऑईल् एंजिनांच्या पिठाच्या गिरण्या | ,, | ९ |
| ,, ,, भाताच्या ,, | ,, | १ |
| वाफेच्या ,, ,, ,, | ,, | ३ |
| कापूस पिंजून कापड विणण्याच्या फॅक्टऱ्या | ,, | १ |
| वाफेच्या इंजिनांच्या तेलाच्या गिरण्या | ,, | १ |
| सिमेंट फॅक्टरी | ,, | १ |
| | एकूण | ३० |
| | उस्मानाबाद् | |
| वाफेच्या एंजिनांचीं जिनें | ,, | ७ |
| ऑईल ,, ,, | ,, | ४ |
| कापूस दाबण्याचे प्रेस | ,, | १ |
| जिनिंग व प्रेसिंग फॅक्टऱ्या | ,, | ४ |
| ऑइल एंजिनांच्या भाताच्या गिरण्या | ,, | ६ |
| | एकूण | २२ |
| | रायचूर | |
| वाफेच्या एंजिनांचीं जिनें | ,, | १० |
| ऑइल् ,, ,, | ,, | १३ |
| कापूस दाबण्याचे प्रेस | ,, | ३ |
| जिनिंग व प्रेसिंग फॅक्टऱ्या | ,, | ३ |
| विद्युत् शक्ति निर्माण करण्याचें स्टेशन | ,, | १ |
| ऑइल् एंजिनच्या पिठाच्या गिरण्या | ,, | २ |
| | एकूण | ३२ |
| | बेदर | |
| वाफेच्या एंजिनांचीं जिनें | ,, | १ |
| ऑइल् ,, ,, | ,, | १ |
| ,, ,, पिठाच्या गिरण्या | ,, | १ |
| | एकूण | ३ |
| | एकदर संख्या | ४४९ |

## राज्यांतील व्याधिग्रस्तांची संख्या.

| तपशील | हिंदु | मुसलमान | ख्रिस्ती | वन्य जातीचे | इतर | एकूण. |
|---|---|---|---|---|---|---|
| वेडे ......... | २,०६५ | ३५२ | १६ | ७८ | ८ | २,५१९ |
| बहिरे व मुक | २,८७० | ४०१ | १८ | ११० | ११ | ३,४१० |
| आंधळे ...... | १६,३९८ | २,०६३ | ४९ | ५५४ | ७४ | १९,१३८ |
| कुष्ठरोगा ... | ३,६८० | ३८४ | ४२ | १०० | ८ | ४,२१४ |
| | | | | | एकंदर | २९, २८१ |

## ब्राह्मण समाजाचा भयंकर ऱ्हास.

### ( १९२१ च्या खानेसुमारीवरून )

हैद्राबाद संस्थानांत इ. स. १९०१ च्या खानेसुमारींत ब्राह्मणांची एकंदर संख्या ६,६६,८५६ होती ती दहा वर्षांनंतर म्हणजे इ. स. १९११ सालीं २,६१,२४१ झाली अर्थात ह्या दहा वर्षांत ४० ५६ १५, **चार लाखांवर** ब्राह्मण कमी झाले. ब्राह्मणांच्या संख्येंत एवढी मोठी क्षीणता कां झाली याचीं कारणें खरें पाहतां सरकारांनीं दाखवावयाचीं होतीं, पण लक्षांत कोण घेतो ? म्हणजे शेंकडा ६·१८ ह्या प्रमाणानें ब्राह्मण कमी झाले.

इ. स. १९२१ च्या खानेसुमारींत त्यांची संख्या पुनः कमी होऊन २,४७,१२६ झाली. अर्थात् ह्या दहा वर्षांत त्यांची संख्या १४११५ ह्या प्रमाणांत कमी झाली. पूर्वीच्या दशकापेक्षां ह्या दशकांत क्षीणतेचें प्रमाण कमी आहे तरी एकंदरींत हिंदूंतील इतर जातींपेक्षां ब्राह्मणांच्या 'क्षीणतेचें प्रमाण जास्त कां ह्याचा विचार स्थानिक पुढारी लोक करितील अशी आशा आहे.

### ब्राह्मणांच्या संख्येचा जिल्हेवार तपशील.

### एकूण पुरुष १२८७६८ व स्त्रिया ११८३५८

| | | | |
|---|---|---|---|
| हैद्राबाद शहर | १६,६३० | औरंगाबाद | २९,१२४ |
| अतराफबल्दा | ६,९६४ | बीड | १७,१८१ |
| वरंगल | ११,१५३ | नांदेड | १२,९०९ |
| करीमनगर | १५,२९७ | परभणी | २१,१२८ |
| आदिलाबाद | ८,१७९ | गुलबर्गा | १७,०७८ |
| मेदक | ६,०१८ | उस्मानाबाद | १६,२८६ |
| निझामाबाद | ७,१५४ | रायचूर | २८,८८६ |
| महिबूबनगर | ८,७७८ | बेदर | १४,८२० |
| नलगोंडा | ९,४३१ | | |
| एकंदर तेलंगण | ८९ ६१४ | एकंदर महाराष्ट्र | १, ५७ ४१२ |

एकूण—२,४७, १२६

एकंदरींत तेलंगणापेक्षां महाराष्ट्रांत ब्राह्मणांची संख्या पावणे दोन पटीनें जास्त आहे.



## हल्लींच्या निझाम सरकारांनीं दिलेल्या देणग्या वगैरेंचा तपशील.

( खालील सर्व आंकडे रुपयांचे आहेत. )

१ राज्यारोहणानिमित्त बारा हजार रुपये वार्षिक ( यो मिये ) निरनिराळ्या लोकांच्या नांवानें देण्यांत आले.

१ अजमेर येथें यात्रेस जाऊन सुमारें चाळीस हजार रुपये अन्नदान व धर्म इ. मध्यें देण्यांत आले.

१ अलीगड कॉलेजास **पन्नास हजार** रु. ची देणगी देऊन अरबी शिक्षणाकरितां वार्षिक एक हजार रुपये देण्यांत आले आणि तेंथील अरबीच्या प्रोफेसराला व मशीदीच्या सेवकांना मिळून एक हजार रुपये देण्यांत आले. आतां अलीगड कॉलेजची मदत वाढविण्यांत येऊन एकंदर ३००० दरमहा दिले जातात. ( ५०००० रु. मध्यें उस्मानिया बिल्डिंग, ह्या नांवाची इमारत व्हावी )

### एकदम दिलेल्या देणग्या.

१ हज ( मक्केच्या ) यात्रानिमित्त यात्रेकरूंना ५००० रु.

१ अलीगड येथील मुसलिम युनिव्हर्सिटी **पांच लाख** रु.

१ मुसाफरखाना तयार करण्याकरितां हजरत नबी दादा साहेबांना २५५

१ मलबारी मेमोरियल फंड मुंबई ५०००

१ भावनगर येथील दुष्काळपीडित स्त्रियांना ५०००

१ शाहसूफीही बाबा साहेब हजरत यांची दरगा बांधावयास १०००

१ औरंगाबादच्या स्टेशन मास्तरांस तेथें गेल्या वेळीं ५००

१ मनमाडच्या स्टेशनमास्तरांस २५०

१ औरंगाबाद येथील दरग्यांकरितां १९५०

१ मौलवी अनवारुल्लाखान ( निझाम सरकारचे शिक्षक ) यांच्या मुलांच्या तसामियाखानी बद्दल ५००

१ हैद्राबाद फ्रीमेसन मेसिंगफंड १००००

१ सिकंद्राबाद रेसग्राउंड करितां ६०००

१ अजमीर येथील दर्ग्याच्या सेवकांना दोन वेळा सहा सहा हजार असे, १२००० आणि गरिबांना अन्नदान करण्याप्रीत्यर्थ ५०००

१ लेडी हार्डिंज यांजकडे. लार्ड हार्डिंज बाँबच्या अत्याचारापासून सुखरूप बचावले ह्या बद्दल अभिनंदन म्हणून दानधर्मार्थ १०००० रु.

१ रेड क्रॉस फंड १५०००

१ दक्षिण अफ्रिकेंतील हिंदी लोकांच्या दुःखनिवारण फंडास २५००

१ मौलवी हबीबोद्दीन अकौंटंट जनरल यांच्या कामगिरीबद्दल ५०००

१ हजरत महम्मद पैगंबराच्या जन्मादिनाप्रीत्यर्थ २५००

१ टर्कींच्या जखमी सैनिकांकरितां १५०००

१ सिमला येथील अंजुमन इस्लामास ५००

१ सिकंद्राबाद येथील महबूबिया कॉलेजच्या इमारत फंडास २५०००

१ हैद्राबाद येथील मद्रसे निझामियाच्या विद्यार्थ्यांनां ( ५८० ) कापडाचे ठाण व ( ४७८ ) पगड्या आणि कापडाचे ठाण.

१ आसफुल्लुगात ( डिक्शनरी ) च्या संपादकाला पूर्वीच्या देणगीशिवाय जास्त ५००

१ लेडी हार्डिंज झनाना हॉस्पिटलला **एक लाख रुपये.**

१ हजरत शहालतीफ यांचा दरगा व मुसाफरखाना बांधावयास ५०००

१ मुमताज यारुद्दवला यांच्यावरील खटल्यासंबंधीं मो. हबीबोद्दीन अकौंटंट जनरल यांच्या कामगिरीबद्दल २०००

१ दक्षिण आफ्रिकेंतील हिंदी विपद्ग्रस्त लोकांकरितां १००००

१ ब्रिटिश रेडक्रॉस फंडास बालकन येथील दुःखित मुसलमानांच्या मदतीकरितां दोन हजार पौंड ( ४०००० रु. )

१ अजमीर येथील साहेब जादे महम्मद हनीफ यांना १०००

१ महम्मद अमीर साहेब सुपनवीस यांना १०००

१ पुनः बाल्कन युद्धांतील मुसलमानांच्या मदतीकरितां ब्रि. रेडक्रॉस फंडास दोन हजार पौंड ( ३०००० रु. )

१ ब्रि. रेडक्रॉस फंडास ७५००

१ कर्नाटकचे नबाबाच्या मदतीकरितां १०००

१ हैद्राबादचा नकाशा तयार केल्याबद्दल मि. **मन** यांना १५०००

१ मराठी भाषेंत कुराणाचें भाषांतर केल्याबद्दल एका मौलवींना ७५००

१ मौ. अहमद खैरोदीन साहेबांना नबीखाना बांधण्याबद्दल ४०००

१ एका मुसलमानाला हजरत अमीर खुसरो या सुप्रसिद्ध कवीचे ग्रंथ-प्रकाशन व मसऊद्दी कानू छापण्याकरितां १५०००

१ लेडी विग्लिंडन यांनीं स्थापिलेल्या मुंबई प्रेसिडेन्सी रिलीफ फंडाच्या झनाना शाखेस ५०००

१ निझाम सरकारची स्वारी सिमल्याहून परत येतांना दानधर्माबद्दल म्हणून व्हाइसरॉय साहेबांच्या स्वाधीन केले १००००

१ गोखले मेमोरियल फंडास ५०००

१ मुसलमान गरीबांच्या मदतीकरितां २१४१६ रु.

१ लखनौ येथील महापुराच्या संकटग्रस्त लोकांना १००००

१ दिल्ली येथील लेडी हार्डिंज मेडिकलकॉलेज हॉस्पिटल **एक लाख** रु.

१ हैद्राबादच्या स्टेशनमास्तराला ५००

१ मौ. शफक्कत अलीखां शाहजहान पुरी यांना एक पुस्तक लिहिल्याबद्दल २००

१ लॉर्ड किचनेर यांच्या स्मारकाबद्दल १००००

१ अली बखष महम्मद हुसेनखां यांना बिदागी १०००

१ हाफिज अबदुल लतीफखां भोपाळी यांना ( कलाम मजीद ) कुराणाची मत दाखल केल्याबद्दल बक्षीस १०००

१ लखनौ येथील पाद्री साहेबांच्या विनंतीवरून बेलजमच्या अनाथ मुलांच्या रक्षणाकरितां १५००

१ मौ. अलताफ हुसेन हालींच्या मेमोरियल फंडास १००००

१ मौ. फरीद् अहमद् आब्बासी यांना कांहीं ग्रंथ लिहिल्याबद्दल ५००

१ उमरावती ( वऱ्हाड ) येथील महॉमेडन हायस्कूलच्या इमारतीबद्दल १०००० व दरमहा खर्चाबद्दल ५०

१ मद्रास प्रांतांतील वानंबाडी येथील शाळेचें नांव उस्मानिया कॉलेज वानंबाडी ठेवून त्याला देणगी २५००० व पुढें दरमहा १०००

१ बैगनपल्ली ( मद्रास ) येथील संकटग्रस्त लोकांना १००००

१ बसरा येथील मशीद बांधणें व इतर खर्च २५०००

१ मुंबई येथील विलिंग्डन रेस क्लबला १००००

१ ऑलइंडिया महॉमेडन एज्युकेशनल कॉन्फरन्सला एकदम **एकलाख ७१ हजार पांचशेंच्या** प्रामेसरी नोटा हवाली करण्यांत आल्या. ज्यांच्या व्याजाचें उत्पन्न दरमहा ६००० होतें ( ही संस्था उत्तर हिंदुस्थानांत आहे )

१ वरंगल येथील सुभे कचेरीचे मशीदींत नमाज पडण्याकरितां गालीचें ( जा जा नमाज ) घेण्याबद्दल २०००

१ नादार व गरीब हाजी लोकांच्या ( मक्केच्या यात्रेकरूंना ) मदतीकरितां पूर्वी १०००० दिले होते व आतां पुनः १०००० दिले

१ सैयद सजाद हुसेन महमद एडीटर अवधपंच ( लखनौ ) यांच्या पत्नीस ५०० रु. मदत.

१ मौ. अबदुल रौफ यांनीं लिहिलेलें ' मुरक्के रहमत,' हें पुस्तक निझाम सरकारांस अर्पण करण्याची परवानगी देऊन त्यांना ५०० रु. द्यावे व पुस्तकाच्या ५०० प्रती विकत घ्याव्या.

१ नवाबजादा हमीदुल्ला खां ( भोपाळच्या बेगम साहेबांचे चिरंजीव ) यांच्या प्रयत्नानें डेहराडून येथें जें कॉलेज स्थापन होत आहे त्याच्या मदतीकरितां २५०००

१ हैद्राबाद येथील फत्ते मैदानाजवळ एक हौद बांधावयास एकदम ५००० आणि खर्चाकरितां वार्षिक २००

१ विहार ( कटारपुरच्या ) हिंदूमुसलमानांच्या दंग्यांत तेथील मुसलमान संकटग्रस्तांच्या मदतीकरितां **एक लाख** रुपये.

१ मौ. फाजिल अबदुरब साहेब कौकब, यांना अतालीक नांवाच्या मासिक पुस्तकाबद्दल १२२५ ( ७६२ प्रती )

१ हैद्राबाद एज्युकेशनल कॉन्फरन्स बरोबर शैक्षणिक प्रदर्शन भरविण्याबद्दल २५००.

१ बांकीपूर ( विहार ) च्या मौ. मोहिबुलहक यांना एका पुस्तकाबद्दल ५०० बक्षीस आणि आजन्म १०० रु. माहवार.

१ हैद्राबाद येथील मौ. अबदुलवहाब यांनीं एक पुस्तक लिहिल्याबद्दल एकदम ४०० रु. बक्षीस व दरमहा ५० रु. तनखा

१ मौ. अबदुल्लाखां साहेबांनीं कांहीं पुस्तकें लिहिलीं त्याबद्दल ५०० रु. व त्यांचीं इतर पुस्तकें शाळाखात्यांनीं विकत घेण्याबद्दल मंजुरी

१ हैद्राबाद येथील मक्का मशीदींत ( जानमाज ) नमाज पढतांना अंथरुण्याकरितां ( सतरंज्या अथवा गालीचे ) ५३५८ रु.

मुंबई येथील विलिंग्डन फंड कमेटीस २५०००

## निझाम सरकारांनीं देणगी दिलेले दरमहा पगार

१ हल्लींच्या निजामाचे राज्यारोहणानिमित्त चौघां मुसलमानांना रोजचे पांच रुपये व अकरा मुसलमानांना रोजचे दोन रुपये आणि तिघांना रोजीं एक रुपया देणगी.

१ दोघा हिंदूंना पं. जगतप्रसाद व रामविलास यांना प्रत्येकीं रोजीं २ रुपये व पं. मारुतीरावांना रोजीं एक रुपया, आणि चादरघाट येथील पार्शी दस्तूर यांना रोजीं एक रुपया.

१ मौ. अबदुल रहिमान साहेब बगदादी यांना १२०० रु. माहवार

१ प्रो. महम्मद हुसेन हार्मोनियम मास्टर यांस ५० रु. माहवार

१ हाफिज महम्मदगियासोद्दीन साहेबांना रोजीं २ रु.

१ अजमीर येथील दर्ग्याचे मेणबत्ती रोषनी व कवालीकरितां दरमहा ५० रु.

१ उत्तर हिंदुस्थानांतील देवबंद येथील मौलवींच्या शाळेकरितां दरमहा २५० रु. वाढविण्यांत आले.

१ मौ. अबदुल जब्बारखां साहेबांना दीडशें माहवार.

१ मौ. शिबली नेमानी यांना तीनशें माहवार.

१ मौ. मगदूम हुसेन सावी यांना १०० रु. माहवार.

१ मौ. महबूब आलम एडिटर पैसा अखबार लाहोर यांना वार्षिक (२९००) हें पत्र सध्यां बंद पडलें असूनही पगार चालू आहे. आतां २०० दरमहा मिळतो.

१ मौ. खाजा कमालोद्दीन मुसलिम मिशनरी यांना दरमहा २५० (लोकांना वाटविण्याकरितां)

१ अजमीर येथील दक्षिणी दर्ग्यास दरमहा ३०० व खिलतकरितां १०००रु.

१ इसलामियास्कूल अवध संस्थान राजपुतान्याच्या मदतीकरितां दरमहा ५०० रु.

१ दिल्लीच्या जुमामशिदीचे इमाम यांना दरमहा ३०० रु.

१ मौ. हबीब अहमद यांना चार पुस्तकें लिहिल्याबद्दल दरमहा ताहयात ५० रु. पगार व पुस्तक छपाईबद्दल ५०० रु.

१ अलीबखष महम्मद हुसेनखां साहेब शिकारपुरी यांना पूर्वीच्या अडीचशेंत पुनः २५० वाढवून ५०० दरमहा मुक्रर केले.

१ मिरझा नसीरोद्दीन (लोहाऱ्याच्या नबाबांचे बंधू) यांना दरमहा १०० रु. ताहहयात.

१ मद्रास येथील कर्नाटकचे नबाबांच्या कुटुंबांपैकीं नबाब गुलामगोसखां साहेबांना दरमहा ७०० रु. ताहयात.

१ अलहाबाद् येथील मद्रसे सुबहानिया शाळेस दरमहा १००

२ बंगलोरच्या सायन्स इन्स्टीट्यूटला तीन वर्षेपर्यंत वार्षिक १०००० दहा हजार रु.

१ उ. हिंदुस्थानांतील इटावा येथील इस्लामिया हायस्कूलचे मदती-करितां १०००० दहा हजार देणगी आणि त्या संस्थेचे व्यवस्थापक मौ. बशी-रोद्दीन यांना ताहयात १०० रु. माहवार.

१ दिल्लीच्या बादशाही कुटुंबांतील नूरजहां बेगम व फखरजहां बेगम ह्या दोन विधवांना प्रत्येकीं ५० रु. दरमहा.

मक्का येथील एका शाळेला २०० रु दरमहा देऊन त्या शाळेचें नांव मद्रसे उस्मानिया ठेवण्याची परवानगी देण्यांत आली व शाळेच्या व्यवस्थापकांचें नांवें दरमहा १०० रु. पगार तहहयात.

१ नवाब फरीदून मुल्क यांच्या दोन नातींच्या नांवें प्रत्येकीं दरमहा सव्वाशें ताहयात.

१ नवाब फजीलतजंग ( निझाम सरकारचे शिक्षक ) यांच्या स्मारकार्थ २५ रु. दरमहाच्या दोन शिष्यवृत्त्या

१ हकीम याकूबखां यांना कुराणाचें भाषांतर गुजराथी भाषेंत केल्याबद्दल ३७०० रु. एकदम देऊन ४६९ प्रती त्यांचेकडून निराळ्या विकत घ्याव्या व महाराष्ट्रांतील प्रत्येक शाळेंत व मशीदींत वांटाव्या व पुस्तकर्त्याच्या नांवें दर-महा ५० रु. ताहयात द्यावे. यांनाच मराठी भाषांतराबद्दल पूर्वी ७५०० देण्यांत आले आहेत.

१ मि. अलेक्झांडर पेनशनर स्टेशन मास्तर हैद्राबादचे नांवें ताहयात दरमहा ७० रु. पगार.

१ नवाब सादजंग माजी हायकोर्ट जज्ज यांच्या विधवेस दरमहा १०० रु. ताहयात आणि त्यांच्या मुलाच्या नांवीं १८ वर्षांपर्यंत ५० रु. दरमहा व पुढें २१ व्या वर्षापर्यंत १०० दरमहा व तीन मुलींचीं लग्नें होईपर्यंत २५ रु. दरमहा.

१ महम्मद इब्राहीम कुरेषी यांच्या मृत्यूमुळें त्यांच्या वारसांच्या पोषणाकरितां दरमहा ५० रु.

१ महम्मद शमसोद्दीन साहेबसिद्दीकी यांच्या पांच पुस्तकांचा सर्व छपाई खर्च देऊन त्याचें पारितोषक म्हणून ताहयात ५० रु. माहवार.

१ मौ. सय्यदशाह इब्राहीम साहेबांच्या नांवीं एक पुस्तक लिहिल्याबद्दल ५० रु. माहवार.

१ अबदुल्लाखां साहेब कसमंडी एडीटर **इस्लामिक** मुंबई यांच्या नांवें ताहयात २०० रु. दरमहा.

१ अंजुमन तरक्की उरदू या संस्थेस तीन वर्षांपर्यंत दरसाल तीन हजार रु. वाक्प्रचार संशोधनार्थ.

१ शेख उमर यांच्या नांवें ५० रु. माहवार ताहयात.

१ महम्मद शफीओद्दीन हुसेन आरिफ यांना हायकोर्टाच्या नवीन इमारतीची तारीख ( पद्यांत ) तयार केल्याबद्दल ५० रु. माहवार.

१ पंजाबांतील मौलवी **जफरअलीखां** ( लाहोरच्या जमीनदार पत्राचे संपादक ) यांची संस्थानांतून हद्दपारी झाल्यावर त्यांनीं आपल्या गांवीं बसून तर्जुम्याचें काम करण्याकरितां दरमहा ५०० रु. ( ह्या पूर्वी त्यांना शंभर माहवार मिळत असे त्याशिवाय ).

१ अखतर अलीखान ( मौ. जफर अलीखां ह्या सदरीं गृहस्थांचे पुत्र ) यांना २०० माहवार—त्यांनीं तर्जुम्याचे कामांत आपल्या वडलांना मदत करावी.

१ मद्रसे शमसिया हिसामिया हैद्राबादच्या शाळेला दोन वर्षेपर्यंत दरमहा ४० रु.

१ शेतकी शिक्षणाबद्दल महम्मद आकिलखां यांचें नांवीं एक वर्षाकरितां ५० रु. स्कॉलर्शिप.

१ सय्यद यासीन अलीसाहेब **निझामी** जे कुराणाचें भाष्य लिहीत आहेत ते निझामसाहेबांच्या नांवीं समर्पण करण्याची परवानगी देऊन त्यांना ५० रु. माहवार ताहयात द्यावे.

१ सय्यद् महमद् हुसेन अगलब मोहानी यांचे नांवें त्यांच्या कांहीं ग्रंथलेखनाबाबत ५० रु. माहवार ताहयात.

१ जी. पी. चुलहे ग्रँट मेडिकल कालेजांतील विद्यार्थ्यांचे नांवीं दरमाहा ७५ ची स्कॉलरशिप एकवर्षाकारितां.

१ मौ. अबदुल हलीमसाहेब **षरर** यांचें हैद्राबादेंतून उच्चाटन करून **इस्लामचा इतिहास** लिहिण्याकरितां दरमहा ५००.

१ लखनौच्या हाफिझ गुलाम मोहियोद्दीन ( जे मौ. अबदुलबारी फिरंगी महालाच्या खांदानींतील आहेत ) यांचे नांवीं ५० माहवार ताहयात.

१ इज्जत हुसेन यांच्या मुलाचे नांवीं कुराण घोष शिक्षणाकरितां दरमहा ५० स्कॉलरशिप.

१ बरेली येथील इस्लामिया स्कूल करितां २०० माहवार दोन वर्षेंपर्यंत.

१ देवबंद ( उ. हिंदुस्थान ) येथील प्रसिद्ध **इस्लामी** धर्म शिक्षणसंस्थेस वर्षांतून दोनदां ( रमजान व झीहज्जा या महिन्यांत ) २५०।२५० एकंदर ५०० देणगी.

१ शेख महम्मद् पीरा हुसेनी चिष्ती साबरी यांचे नांवीं ५० माहवार ताहयांत.

१ मक्केच्या शेख महम्मद् मुलक्कर साहेब मक्की यांचे नांवीं १०० माहवार ताहयात.

१ महम्मद् अबदुल अझीझ मुवाजिर यांचे नांवें कांहीं ग्रंथलेखनाबद्दल ५० माहवार—

१ दिल्ली येथील सैय्यद् हसन रसूल यांचे दरग्याचे सज्जादे अहुमदहुसेन साहेब यांचे नांवीं १०० रु. माहवार ताहयात.

१ महम्मद् सज्जाद् मिरझा बेग यांना ग्रंथलेखनाबद्दल २५०० देणगी व २०० रु. माहवार ताहयात.

१ सै. मुखतार अहमद् यांना त्यांच्या एका पुस्तकास निझाम सरकारचें नांवीं अर्पण करण्याची परवानगी देऊन पुस्तक तयार झाल्यावर छपाई खर्च देऊन १०० रु. माहवार पांच वर्षेंपर्यंत.

१ मालेगांव येथील इस्लामिया स्कूलचे नांवीं दरमहा ५० रु.

१ मौ. मुषताक हुसेन ( नबाब विकारुल मुल्क अलीगड युनिव्हर्सिटीचे ) यांच्या तीन नातवांच्या नांवें प्रत्येकीं ५० रु. दरमहा वयाच्या २१ वर्षपर्यंत

१ काझिम बेगम ( नाझिमुलमुल्क यांची विधवा ) यांचे नांवीं १०० माहवार गुजाऱ्याकरितां.

१ आसफिया ग्रंथसंग्रहालयांतील नोकर अबदुल्लाखां यांचे नांवीं ताहयात ५० रु. माहवार.

१ मक्केंतील मद्रसे सौलनिया व त्याचे व्यवस्थापक मौ. महम्मद सईद साहेबांच्या मदतीकरितां दरमहा २०० रु. देऊन अशी आज्ञा देण्यांत आली कीं मद्रसे निझामिया येथील विद्यार्थ्यांना कुराण घोषाच्या शिक्षणाकरितां सदहू संस्थेंत पाठविण्यांत यावें.

१ हैद्राबाद येथील ' बयतुल माजुरीन ' अनाथ पंगुगृहास पूर्वीची ६००० रु. वार्षिक हंगामी नेमणूक होती ती यापुढें वाढवून १०००० हजार नेहमींकरितां द्यावी व महागाई संपेतों वार्षिक १२००० द्यावे.

१ मरहूम तालुकदार मौ. नुरुल्ला हुसेनी यांच्या मुलाला ( जो अलीगढ येथें एम्. ए. चा अभ्यास करीत आहे ) ५० रु. दरमहा स्कालर्शिप दोन वर्षेपर्यंत देण्यांत यावी.

१ शमसुल उलमा मौलाना षिबली यांनीं लिहिलेले ८ सीर तुलनबी हे पैगंबराचें चारित्र पूर्ण करून छापून प्रसिद्ध करण्याकरितां संस्थानाकडून दरमहा २०० रु. दोन वर्षांकरितां देण्यांत यावे व प्रत्येक भागाच्या २५ प्रती शाळा खातें इ. करितां विकत घ्याव्या.

१ लखनौ येथील **एक आणा** फंडा करितां दरमहा ५० रु.

१ अंजुमन इस्लामिया बरेलीचे ऑ. सेक्रेटरी सय्यद अबदुलवदुद यांचे नांवीं १०० रु. दरमहा.

१ डॉ. अबदुल अझीज यांना दरमहा १५० रु. ह्या अटीवर देण्यांत आले कीं त्यानीं नेहमीं **अजमीर** येथें राहून यात्रेकरूंची शुश्रूषा करावी.

१ मिस्. एम प्यारट हिचे नांवी ( जी टीचर्स ट्रेनिंग कॉलेज बेंगलूर येथें अध्ययन करित आहे ) ५० रु. स्कॉलर्शिप.

## एकदम ( रक्कम ) दिलेल्या देणग्या.

१ लेडी चेम्सफर्ड यांच्या योजनेप्रमाणें अनाथ मुलें व मातांच्या हिताकरितां काढलेल्या फंडास ५०००० रु.

१ दिल्लीच्या मेयूर प्रेसचे मालक बुलाकीदासांच्या प्रेसमध्यें छापलेलें **कुराण** १०००० रु. मध्यें घेऊन सरकारी धर्मखात्यांनीं त्याच्या प्रती वांटाव्या.

१ पॅलेस्टाईन येथील युद्धस्मारकाच्या फंडास **३००० पौंड.**

१ हैद्राबाद् येथील निझाम कॉलेजांतील फारशीचे प्रो. सय्यद् महमद् अली यांना दोन वर्षांची पूर्ण पगाराची रजा देऊन इराणांत वाटेल तेथें राहून फारशी **कोश** तयार करण्याकरितां वाटखर्चाबद्दल १००० रु.

१ ऑल इंडिया ओरिंयंटल कान्फरन्सच्या मदतीकरितां पुणें येथील भांडारकर रीसर्च इन्स्टिट्यूटला १००० रु.

१ निझाम सरकारानीं काढलेल्या राज्यांतील दौऱ्याचें स्मारक म्हणून रयतेच्या सुखसमृद्धीच्या मार्गांत योग्य सोई उत्पन्न करण्याकरितां संस्थानांत निरनिराळ्या ठिकाणीं स्थानिक अडचणी दूर करण्याच्या हेतूनें **पंधरा लक्ष** रु. खालीं लिहिल्याप्रमाणें द्यावयाचें ठरलें.

खालसांतील खजीन्यांतून पांच लक्ष, सर्फखासमधून एक लक्ष, लोकल फंडांतून ९ लक्ष, ( खालसांतील ).

१ स्मर्ना येथील तुर्की विपद्ग्रस्तांच्या मदतीकरितां **एक लक्ष** रु.

१ यावर अलीखां ( कस्टम खात्याचे नोकर ) यांच्या विधवेस ४४८ रु.

१ के. राजगोपाल नायडूंच्या आईचे पालनार्थ ५०० रु.

धर्मखात्याच्या विनंतीप्रमाणें मद्रसे निझामियामध्यें शिकत असलेल्या मुसलमानी धर्मसेवकांच्या मुलांना पोषाकाकरितां १४९४ खर्च केल्याची मंजुरी व पुढें दरसाल ७२२ रु. बजेटमध्यें राखून ठेवावयाचे.

१ अफजलगंज हॉस्पिटल मधील माजी सुपरिंटेंडेंट मिस् केस हिला ५६०० इनाम.

१ व्हिक्टोरिया मेमोरियलकरितां **एक लाख** वर्गणी.

१ मुलींच्या शाळेकरितां ‘ हिफ्के कमर ’ ह्या पुस्तकाच्या ४२५ प्रती विकत घेऊन कल्यास ४२५ रु. किंमत.

१ आग्र्याच्या ‘ एजाजनबी ’ छापखान्यांत छापलेल्या कुराणाचे तीन हजार पारे ( भाग ) एकहजार रुपये देऊन प्रेसचे मालक सय्यद् महम्मद् अली यांजकडून विकत घ्यावे कारण **परधर्मीयांचे** हातांत पडून त्या **अपवित्र** होऊं नयेत.

१ लेडी रेडिंग यांच्या स्त्रियांचे फंडास २५००० रु.

१ शाळाखात्यांतील नाझर फैजुद्दीन साहेबांनीं युरोपांत तीन वर्षें राहून शिक्षण मिळवावें. वाटखर्चाबद्दल २०००, व राहण्याचे खर्चाबद्दल **१३५० पौंड** ( २५००० रु. ).

१ कानपूर येथील मुसलिम हायस्कूलला ५००० रु. व पुढें दरमहा ५०रु.

१ सिमला येथें **मशीद** बांधण्याकरितां ३००० रु.

१ मलबारांतील विपद्ग्रस्तांच्या मदतीकरितां ( मोपल्यांच्या व इतर अनाथ बायकांमुलांच्या रक्षणार्थ ) **५०००० पन्नास हजार रु.**

१ अमृतसर येथील ‘ अलकुरेष ’ ह्या मासिकाचे मदतीकरितां ५०० रु. देऊन तें विकत घेण्याकरितां २०० रु.

१ सिमला येथील मुसलिम कबरस्तानाच्या मशीदीचें बांधकाम पूर्ण करून विजेचे दिवे इ. व्यवस्थेकरितां ३००० रु.

१ शेखुल मशायख हमजा रफाई यांच्या मुलांना मदीना येथें जाण्याकरितां वाटखर्चाबद्दल, १००० रु.

## निझाम सरकारांनीं देणगीदाखल दिलेला दरमहा.

१ अमृतसर येथील अंजुमन तरकी तालीमच्या नांवीं २५० रु. दरमहा पांच वर्षेंपर्यंत ह्या अटीनें कीं त्यापैकीं १०० रु. अरबी शिक्षणाकरितां खर्च करण्यांत यावा.

१ लखनौ येथील ( मौलाना अबदुलबारी यांच्या ) फिरंगी महालमधील मद्रशाकरितां दरमहा १०० रु. दोन वर्षांकरितां.

१ माजी दुय्यम तालुकदार कावसजी मरहूम ह्यांच्या विधवेच्या नांवें मुलांच्या पालन व शिक्षणाकरितां दरमहा ४८ रु.

१ मद्रास येथील मद्रसे महम्मदी संस्थेस दरमहा ५० रु.

१ कटक येथील इस्लामी हायस्कूलचे नांवें दरमहा ५० रु.

१ अबदुल गफूर साहेब मक्की यांचे नांवें ३० रु. दरमहा व वाटखर्चाबद्दल २५० रु.

१ मुरादाबाद येथील मद्रसे इस्लामियास ५० रु. दरमहा.

१ देवबंद ( उ. हिं. ) येथील दारुल उलूमला दिल्या जाणाऱ्या दरमहा ८०० मध्यें जास्त २०० ची वाढ करून संस्थेचे व्यवस्थापक मौ. महम्मद अहमद यांच्या पेनशनमध्यें १०० रु. वाढवून त्यांना दरमहा २५० रु. ( सध्यां ह्या गृहस्थांना दरमहा १००० रु. पगारावर हैद्राबाद हायकोर्टांत मुफतीचे जागीं नेमिलें आहे ).

१ सय्यद सादिक हुसेन गुबार यांना हायकोर्टावर कविता लिहिल्याबद्दल दरमहा ५० रु. ताहयात.

१ सय्यद हमजा साहेब मदनी यांना मदीना येथें फराषीबद्दल ( झाड झूड वगैरे स्वच्छता ) पूर्वी जे दरमहा शंभर मिळत होते त्यांत वाढ करून ते मदीना येथें गेल्यानंतर दरमहा ३०० रु. द्यावे.

१ असमतुन्निसा बेगम हिला तोहफे उसमानी, हें पुस्तक लिहिल्याबद्दल दरमहा ५० रु. ताहयात.

१ हबीब अहमद साहेबांच्या नांवें युरोपमध्यें जाऊन शिक्षणाकरितां वार्षिक ३०० पौंड ( ४५०० रु. ) स्कालर्शिप.

१ हबीबुल रहमानसाहेब यांना एम. ए. च्या शिक्षणाकरितां १०० रु. दरमहा स्कालर्शिप व खर्चाबद्दल रु. १००

१ खैरुन्निसा बेगम हिला दिल्ली येथील मेडिकल कॉलेजांत शिक्षणाकरितां स्कालर्शिप दरमहा ७० रु.

१ माजा नाझम फॉरेस्ट स्टर्ज यांच्या बहिणीचे नांवें ७५ रु. दरमहा.

१ कटक येथील इस्लामिया स्कूलला दरमहा ५० रु.

१ कर्नाटकचे नबाबांच्या वंशांतील प्रतिनिधी महम्मद मुनवर खांसाहेब गोहर यांचे नांवीं ७५ रु. दरमहा.

१ अबूबकर खांसाहेबांच्या नांवीं १०० रु. दरमहा स्कालरशिप पांच वर्षांकरितां.

१ अबदुलकरीम शिक्षक मद्रसे व सतानिया यांना अरबी (तजवीद) चें शिक्षण घेण्याकरितां १०० रु. स्कालर्शिप दोन वर्षेंपर्यंत व कपडे आणि पुस्तकांकरितां वार्षिक १५०.

१ माजी कोतवाल इमाद जंग बहादुर यांच्या दोघां विधवांचे नांवीं दरमहा १५० व चौघां मुलांच्या नांवीं स्कालर्शिप दरमहा ५० व चार मुलींच्या नांवीं दरमहा २०० एकंदर ७०० रु. दरमहा.

१ मदीना येथील राहिवाशी हजरत शहा महम्मद मासूम यांना दरमहा ३०० ताहयात.

१ मेजर शॉमरेट यांच्या विधवेच्या नांवीं दरमहा ६२.

१ माजी तालुकदार सय्यद महम्मद बिलग्रामी यांच्या विधवेस १०० दरमहा ताहयात.

१ हाफिज सय्यद अबदुल मजीद (खैराबाद. उ. हिंदु) यांना दरमहा ५० रु.

१ हकीम गुलाम अहमद नाबीना (अंध) यांना दोन वर्षांपूर्वी १०० रु. दरमहा मिळत असे. आतां त्यांनीं हिमायत सागर नांवाच्या बांधकाम चालू असलेल्या तळ्याची तारीख कवितेंत तयार करून हुजूरांत दाखल केल्यावरून फर्मान झाला कीं आणखी २५ रु. वाढवून यापुढें दरमहा १२५ द्यावे.

१ भोपाळचे सय्यद शहा उस्मान साहेबांना दरमहा ५० ताहयात ह्या शर्तीवर यावे कीं त्यांनीं हैद्राबाद येथें राहून **इस्लाम**ची परलौकिक सेवा करावी.

१ माजी कारोनर डॉ. के. खुसरो जीवनजी यांना ८० रु. दरमहा.

१ है. येथील दारुल उलूमचे विद्यार्थी जहीरोद्दिन अहमद जे मिसर देशांत शिक्षण संपादन करीत आहेत त्यांना मागील स्कालर्शिपांशिवाय यापुढें दरमहा ६ मिसरी पौंड व कॉलेजफीबाबत वार्षिक १५ पौंड.

१ बेनजीर शहा साहेबांच्या दरमहा ३० मध्यें २० वाढवून यापुढें ५० यावे.

१ नवाब विकारुल मुल्क ( अलीगड ) यांचे पुत्र मुषताक अहमद यांना पूर्वीं २५० पौंड देण्यांत येत असत ( हे सध्यां विलायतमध्यें शिकत आहेत ) यापुढें ३०० पौंड वा. देण्यांत यावे.

१ मिरझा मुनीरोद्दीन साहेबांचे नांवें १०० दरमहा ताहयात.

१ बरेली येथील मद्रसे अहलेसुन्नतच्या मदतीकारितां दरमहा २०० रु.

१ मौ. अबूरझा मरहूम यांच्या चार मुलांना दरमहा १५ रु. स्कालर्शिप व पुढें मॅट्रिक पास होऊन शिक्षण घेतल्यास संस्थानांत दरमहा ४५ व बाहेर ५० रु.

१ सय्यद तकीओद्दीन यांना यापुढें आणखीं दोन वर्षें ५० रु. दरमहा स्कॉलार्शिप.

१ शाह महम्मद साहेब सिद्दीकी यांना ५० रु. दरमहा ताहयात.

१ माजी ज्यूडिशल सेक्रेटरी यांचे चिरंजीव बाबर मिरझा यांना ५० दरमहा स्कॉलर्शिप पुढें दोन वर्षांकरितां ( यापूर्वीं यांना मिळत असे )

१ मेहेदी हसन यांना दरमहा १०० स्कॉलर्शिप यापुढें कर्ज म्हणून आणखी एक वर्ष.

१ सज्जाद मिरजा यांचे नांवीं जो पगार पांच वर्षांकरितां होता तो यापुढें ताहयात.

१ मीर कासिम अली यांनीं ' मिफताहुल हदीस पुस्तक लिहिल्याबद्दल दरमहा २५ रु. ताहयात व सरकारी खर्चानें पुस्तक प्रसिद्ध करावें.

१ अबदुल रहीम उपदेशकाचे नांवें ८० रु. दरमहा नेहमींकरितां ( हे गृहस्थ जिल्हे रायचूर येथें राहून **हिंदूमुलांना व लोकांना** बाटविण्याचा उद्योग करीत असतात. )

१ कारी अबदुल हक मक्की यांच्या कुटुंबांतील बायकांमुलांनां ५० रु. दरमहा ताहयात.

१ इटावा येथील मद्रशाचे नांवीं ५० रु. नेहमींकरितां दरमहा.

१ महम्मद शाकिर यांच्या चार मुलांच्या नांवें ५० दरमहा स्कॉलर्शिप.

१ मद्रसे इस्लामिया बरेलीला १०० रु. दरमहा नेहमींकरितां.

१ हकीम महम्मद यूसुफ साहेब बीड यांना १०० रु. दरमहा.

१ दीन महम्मद एडीटर म्युनसिपल गॅझेट लाहोर यांचे नांवीं १०० दरमहा.

१ मगदूम हुसेन सावी यांना मद्रसे तय्यबा येथें जाण्याकरितां पूर्वी ५० दरमहा होता तो वाढवून यापुढें २०० द्यावे व त्यांची पत्नी त्यांजबरोबर रहावी. त्यांच्यानंतर त्यांच्या बायकोस ५० दरमहा मिळावा.

१ दारुल उलूम कॉलेजांतील प्रो. अबदुल हयी यांना दरमहा २०० रु. पांच वर्षांकरितां ह्या शर्तीवर कीं त्यांनीं ( वाक् प्रचार ) पुस्तकाचे १५ भाग संपवून शाळा खात्यांत दाखल करावे. ते पसंत ठरल्यास पुढील वर्षीं मदत चालू राहील.

१ मुरादाबाद येथील मद्रसे इसलामियाची मदत ५० दरमहा नेहमींकरितां.

१ फरुखाबाद ( उ. हिं. ) येथील मद्रसे तकवीतुल इसलाम, ह्याला २५ दरमहा दिली जाणारी मदत वाढवून ५० करावी.

१ ख्वाजा झयनुल आबदीन पोष्ट कारकुनाच्या विधवेस दरमहा ५० रु. मदत ताहयात.

१ महम्मद जलालुद्दीन विद्यार्थी (जो मुंबई येथें चित्रकलेचें काम शिकतो) त्याची स्कॉलर्शिपची मुदत अजून दोन वर्षे वाढवून दरमहा ५० रु.

१ कमरोद्दीन हैदर यांचे नांवीं दरमहा १०० ताहयात.

१ नबाब मुकदरुद्दौला यांच्या दोन विधवा व एक मुलगी यांना प्रत्येकीं ५० दरमहा.

१ बशीर अहमद धर्मोपदेशक याचे नांवीं ५० रु. दरमहा. (धर्मोपदेशाकरितां).

१ मुशताक अहमद देहलवींच्या नांवीं. ३० रु. दरमहा.

१ ख्वाजा हिदायत अली शहांच्या नांवीं ५० रु. दरमहा ताहयात.

१ सय्यद शहा अली हुसेन सज्जादे नशीन यांना दरमहा १०० रु.

१ मिरझा महम्मद शुजा गुरगानी यांचे नांवें ५० रु. दरमहा ताहयात.

१ तेलिचेरी (मलबार) येथील मुसलमानांच्या शिक्षण व सुधारणेकरितां मौ. सय्यद अबदुल रहमान साहेबांना १२५ दरमहा ताहयात.

१ सय्यद हमजा रफाई साहेब मदनी शेखुलमशायख ५० रु. दरमहा ताहयात.

१ अबदुल हफीज साहेब यांना ५० रु. दरमहा ताहयात.

१ नागपूर येथील मद्रशास दरमहा २५० रु. मदत.

१ डॉ. अबदुलगनी यांच्या विधवेस दरमहा २०० ताहयात.

१ महम्मद रफी मरहूमांच्या मुलांचें नांवीं ५० रु. दरमहा ताहयात.

१ अंजुमन ईदुल बलाद मद्रासचे नांवीं १२५ वार्षिक.

१ कमरोद्दीन हैदर यांच्या विधवेच्या नांवीं ५० रु. ताहयात दरमहा.

१ पी. व्ही. नायडू यांच्या बिधवेच्या नांवीं ८१ रु. ताहयात दरमहा.

१ मौ. अबदुल अझीझ मरहूम अ. सेके. पोलिटिकलडिपार्टमेंट यांच्या कुटुंबाचे नांवीं २०० दरमहा.

१ लेडी हार्डिंज मेडिकल कॉलेज दिल्ली २००० रु. वार्षिक

१ मौ. यासीन अली निझामी यांच्या विधवेचा पगार ५० करावा.

१ नौषाबा खातूनच्या नांवें दोन वर्षांकरितां दरमहा १०० रु.

१ मिरझा सुलेमान शांहा यांचे नांवीं ५० रु. दरमहा ताहयात.

१ सय्यद मुजफ्फर अहमद आरकनी औरंगाबाद येथील धर्मोपदेशक व उस्मानिजंत्रीचे कर्ते यांना ५० रु. दरमहा ताहयात व ५०० रु. एकदम.

१ सिकंद्राबाद येथील मजलिस मीलादुन्नबी ( हजरत पैगंबराचा जन्मदिन साजराकरणारी सभा ) यास वार्षिक ३०० रु. मदत.

१ नबाब खेदिव जंग यांच्या मुलींच्या नांवें लग्न होईपर्यंत प्रत्येका १०० रु. दरमहा.

१ अलीगड कॉलेजांतील विद्यार्थी सिराजल हुसेन यास ४० रु. स्कॉलर्शिप.

१ एकबाल अहमद सिद्धीकी ह्यांस दोन वर्षें ( बी. ए. पास होईपर्यंत ) ५० रु. स्कॉलर्शिप.

१ सहारनपूर येथें मौ. अबदुल रहमान साहेब यांच्या देखरेखीखालीं चालू असलेल्या मद्रसे दीनियात " ( धर्मशिक्षण ) ला २०० रु. दरमहा.

१ अलीगड येथील मद्रसे इस्लामिया अरबियाला १०० दरमहा.

१ महम्मद इब्राहिम साहेब बिसाती यांचे नांवीं ५० रु. दरमहा.

१ मदीना येथील सय्यद हमजा रफाई यांना ह्यापुढें दरमहा १५० व त्यांच्या तीन मुलांच्या नांवीं प्रत्येकीं ५० स्कॉलर्शिप आणि मुलांना मदीना येथें जाण्याकरितां वाटखर्च २५००.

१ युनिव्हर्सिटीब्यूरो ऑफ दि ब्रिटीश एम्पायरला वार्षिक **एक हजार पौंड** ( १५००० रु. ) मदत ह्या अटीवर देण्यांत आली कीं त्यांनीं उस्मानिया युनिव्हर्सिटीला सर्व प्रकारची मदत द्यावी.

१ कानपूर येथील हलीम मुसलिम हायस्कूलाला ५००० रु. एकदम व पुढें दरमहा ५० रु. पांच वर्षेंपर्यंत.

१ 'दीवान हाफिझ' हा ग्रंथ सुधारून तयार केल्याबद्दल मौ. अबदुल रहीम साहेबांना १५०० इनाम देण्यांत येऊन सरकारी छापखान्यांत ग्रंथ छापावा.

१ मलबारांतील **मोपल्यांचे बंडांत** अनाथ व निराश्रित झालेल्या **मोपल्यांच्या** बायकांमुलांकरितां मलबारांत अनाथालयें व उद्योगधंद्याचे कारखाने काढून त्यांचें रक्षण करण्याकरितां ५०००० **पन्नास हजार रु.**

१ मद्रसे कदामा फरंगी महाल ( लखनौ ) मौ. अबदुल बारीच्या शाळेस १०० रु. दरमहा.

१ मुंबई येथें सेंट झेवियर कॉलेजांत शिकणाऱ्या सय्यद इब्राहिम विद्यार्थ्यांचे नांवीं दरमहा ४० रु. स्कॉलर्शिप.

सिंध येथें राहणारे सय्यद मीरांशाहसाहेब बुखारी यांना यापुढें ५० दरमहा ( इंग्रजी शिक्षा ) द्यावे.

१ सय्यद अजमतुल्ला व मुजिबुल्ला ह्या दोघां विद्यार्थ्यांना दरमहा १५ रु स्कॉलरशिप.

१ सहारनपूर येथील मद्रसे मुजाहर उलूमला दरमहा २०० रु.

१ महम्मद महमूद साहेब अटेची यांना नोकरी मिळेपर्यंत २०० रु. दरमहा.

१ अमृतसर येथील मौ. सनाउल्लासाहेब यांना १०० दरमहा ताहयात.

१ अमृतसर येथील अंजुमन इसलामियाला १०० दरमहा व त्या संस्थेच्या शाळेस दरमहा १०० रु.

१ हबीब अहमद बिरंजी यांना यापुढें ७५ दरमहा.

१ गोदावरी येथील झिया उल्ला यांना दरमहा २० रु.

१ अलीगड येथील काजी सईदोद्दीन यांना २० रु. दरमहा ताहयात.

१ नझीर हुसेन गंगोई यांच्या पगारांत १५ ची वाढ.

१ बदायून ( उ. हिं. ) येथील जुमा मशीदीचे खतीबांच्या विधवेस दर-महा १५ रु. ताहयात.

१ लखनौ येथील नदवतुल उलेमासंस्थेला यापुढें दरमहा ३०० रु.

१ अलीगड येथील झनाना स्कूलची मदत यापुढें ५० रु. जास्त.

१ महम्मद आकिलखां ह्यांना पुसा येथील शेतकी कॉलेजांत शिक्षण संपादनाकरितां दरमहा १०० स्कॉलर्शिप.

१ कर्नूल ( मद्रास ) येथील मद्रसे इस्लामियाला दरमहा ५० नेहमी-करितां

१ लखनौ येथील नदवतुल उलेमांच्या दारुल उलूम पाठशाळेस ३०० **दरमहा.**

१ सय्यद अबदुल्ला मुकबिल यांनीं मक्का येथें राहून दिवाबत्ती करावी म्हणून दरमहा ५० रु. ताहयात ( पैगंबरांकरितां ).

१ पॅलेस्टाईन येथील मशीदीकरितां **एक लाख** रु.

१ लंडन येथील मशीदीकरितां ५०००० रु. **पन्नास हजार**

१ हैद्राबाद येथील पाब्लिक गार्डन बागेंत मशीदीकरितां २५००० रु.

१ तुर्की येथील रेडक्रेसेंट फंडास ७५००० **पाऊण लाख.**

१ दिल्लीचे सुप्रसिद्ध **तबलीग** चळवळीचे जहाल पुरस्कर्ते **खाजा हजन निझामी** ज्यांनीं **दाईये इसलाम,** नांवाची हिंदूंना ( साम दाम दंडभेदादि युक्तीनें विश्वयोषितांमार्फत देखील ) बाटवून मुसलमान करण्याकरितां गुप्त चोपडी प्रसिद्ध करून ती योजना अमलांत आणण्याकरितां निझाम सरकारांची मदत मागितली होती व हैद्राबाद संस्थानांत जेथें निझामसाहेबांसारखा मुसलमान धर्मीय राजा राज्यावर आहे म्हणून अशी सदिच्छा प्रदर्शित केली होती कीं, त्यांच्या धर्मप्रसाराच्या कार्यास पूर्ण वाव मिळेल आणि हें तबलीगचें कार्य संस्थानांतील सर्व अधिकारी वर्गांनीं व नोकरांनीं करावें अशी त्या योजनेंत व्यवस्था केली असून ही चोपडी संस्थानांतील सर्व बडे बडे अमीर उमराव व अधिकाऱ्यां-कडे फुकट पाठविण्यांत येऊन सर्व मुसलमानांत तिचा जारीनें प्रसार **करण्यांत**

आला. ह्या सर्व कार्यास यश मिळून सदहू **निझामी** यांना निझाम साहेबांकडून दरमहा २०० रु. पगार दोन वर्षांपासून चालू आहे.

वरील देणग्या व पगार मिळणारे बहुतेक सर्व मुसलमान बांधवच असून त्यांतूनही सर्व भरणा **राज्याबाहेरील** यू. पी. पंजाब व उ. हिंदुस्थानांतील लोकांचाच आहे. ह्याशिवाय अजून पुष्कळ देणग्या दिल्या असून त्यांचा तपशील पुढील भागांत देण्यांत येईल.

## सरकारी नोकऱ्यांची स्थिति व पक्षपात.

ह्या राज्यांत सरकारी नोकरांची संख्या कांहीं कमी नाहीं. तसेंच नेमणुकांच्या बाबतींत पक्षपात हा पूर्णपणें दिसून येतो. राज्यकारभागांतील मोठमोठ्या जबाबदारीच्या व हुद्याच्या जागा बहुतेक सर्व मुसलमानांकरितांच राखलेल्या ( रिझर्व्हड ) आहेत. कार्यकारी ( एक्झिक्युटिव्ह ) कौन्सिल, पोलिटिकल खातें, न्यायखातें, मुलकीखातें, पोलिसखातें इत्यादि मुख्यमुख्य खात्यांत मुख्यतः मुसलमानांचाच भरणा असून शाळाखातें, पी. डब्ल्यू. डी. व डॉक्टरी खात्यांत कांहीं हिंदू आढळतात, पण मोठ्या पगाराच्या व महत्त्वाच्या जागा त्यांना मिळणें शक्य नाहीं. सरकारी नोकरीच्या बाबतींत हिंदू-मुसलमानांचा असा पक्षपात निझाम सरकारांनीं कां करावा हें समजणें कठीण आहे.

ह्या सर्व नोकरांमध्यें उत्तर–हिंदुस्थानांतील व संस्थानाबाहेरील लोकांचाच भरणा जास्त आहे. संस्थानांतील नोकरींत संस्थानाबाहेरील लोकांचा जास्त भरणा असणें हें संस्थानाच्या हिताच्या दृष्टीनें अत्यंत अनिष्ट आहे. नोकरीच्या बाबतींत योग्य माणसाचीच नेमणूक झाली पाहिजे, तेथें जातीचा पक्षपात करणें न्यायास विघातक आहे.

मुसलमान जातीशीं कोणाचें कांहीं वैर नाहीं तरी पण मुसलमान नेमावयाचाच तर तो ( मुलकी ) संस्थानांतील रहिवासी असावा व हा नियम संस्थानांत आजवर पाळण्यांत येत आहे व स्वतः निझाम सरकारांनाही हें तत्त्व मान्य आहे. असें असतां बाहेरील लोकांचा वरचष्मा असणें हें संस्थानचें दुर्दैव होय.

संख्येच्या मानानें पाहतां हिंदू प्रजेची संख्या शेंकडा ९० आहे व मुसलमान शेंकडा १०, पण नोकरींच्या बाबतींत त्याच्या उलट देखील प्रमाण पडत नाहीं. हा धडधडीत होत असलेला अन्याय निझाम सरकारांना कळत नसेल असें आमच्यानें म्हणवत नाहीं. प्रश्न एवढाच आहे कीं यापुढेंही हा असाच चालू राहणार कीं काय ?

ब्रिटीश–हिंदुस्थानांतील बंगाल व पंजाब इ० प्रांतांत राहणारे मुसलमान लोक आपल्या संख्येच्या मानानें सरकारी नोकऱ्या आपल्यास मिळाव्या असा राजरोस कौन्सिलांतून प्रयत्न करीत आहेत व सरकारकडून त्यांच्या मागणीला योग्य मान मिळत आहे. असें असतां ह्या संस्थानांतलि हिंदू प्रजेची मागणी मात्र अन्यायाची आहे असें कसें म्हणतां येईल ? एकंदरींत नोकरींमध्यें निझाम सरकारांनीं हिंदू–मुसलमानांत पक्षपात करणें हें अनिष्ट आहे. हा चालू असलेला अन्याय ते लवकरच दूर करितील अशी आशा बाळगणें जरूर आहे.

ह्या संस्थानांतलि हिंदू समाज शिक्षणाच्या बाबतींत मागसलेला असण्याचें हेंही एक कारण आहे कीं, त्यांची अशी खात्री झालेली आहे कीं त्यांनीं उच्च शिक्षण व पदव्या मिळवून देखील सरकारी नोकरींत त्यांचा ते केवळ हिंदू असल्यामुळें प्रवेश होत नाहीं. अशा स्थितींत तो नाद सोडलेलाच बरा असें सर्व हिंदू तरुणांना वाटतें व ह्या बाबतींत संस्थानांतील हिंदू तरुण पूर्ण निराश झालेले आहेत. असें होणें हें कितपत योग्य व न्याय्य आहे ह्याचा न्यायी म्हणविणाऱ्या सरकारांनीं विचार करावयास नको काय ? ह्या तक्रारीचा योग्य निकाल करण्याचा न्यायसंमत मार्ग म्हटला म्हणजे सरकारी नोकरीच्या बाबतींत हिंदू-मुसलमानांचें प्रमाण ठरविणें हें होय. त्यांच्या एकंदर संख्येच्या मानानें नाहीं तरी सुरवात म्हणून यापुढें नोकरींत निम्मी संख्या दोघांची सारखी होईपर्यंत हिंदूंचीच भरती करणें इष्ट आहे असें कोणाही न्यायप्रिय माणसास वाटणें साहजिक आहे.

संस्थानांतील मोठ्या जागा तर राहोच पण कारकून शिपायांची जागा देखील हिंदूंना मिळणें अशक्य झालें आहे. सरकारी रीत्या फक्त गेझेटेड ऑफिसरांची यादी ( सिव्हिललीस्ट ) प्रसिद्ध होते त्याचे कोष्टक यापुढें दिलें आहे त्यावरून कसा पक्षपात होत आहे हें स्पष्टपणें दिसेल. एकंदर १०२१ जागांपैकीं ७५२ मुसलमान व फक्त १७५ हिंदू आहेत.



# ग्याझेटेड ऑफिसर्स–सिव्हिल खात्यांतील अधिकारी वर्ग

## इ. स. १९२६ च्या सरकारी सिव्हिल लिस्टावरून.

| खात्याचें नांव. | एकंदर जागा | हिंदू | मुसल-मान | पार्शी व ख्रिस्ती |
|---|---|---|---|---|
| बाबे हुकूमत=एक्झिक्यूटिव्ह कौन्सिल | १२ | ० | ११ | १ |
| चीफ सेक्रेटरी | ५ | ० | ५ | ० |
| पोलिटिकल सेक्रेटरी | ९ | ० | ७ | २ |
| फायनान्स खातें | २२ | ६ | १३ | ३ |
| रेव्हिन्यू सेक्रेटरी | १४ | ० | १४ | ० |
| ज्यूडीशिअल सेक्रेटरी | ६ | ० | ६ | ० |
| पी. डब्ल्यू. सेक्रेटरी | १० | १ | ८ | १ |
| मिलिटरी सेक्रेटरी | ४ | ० | ४ | ० |
| इंडस्ट्रिचल खातें | १२ | ४ | ७ | १ |
| कायदे कौन्सिल सेक्रेटरी | ४ | १ | ३ | ० |
| धर्मखात्याचे सेक्रेटरी | १ | ० | १ | ० |
| डेव्हलपमेंट सेक्रेटरी | ४ | ० | ४ | ० |
| ट्रेझरी खातें | १५ | ५ | ९ | १ |
| मिंट व स्टांप व इलेक्ट्रिकल व आर्ट-स्कूल खातें | १६ | ४ | २ | १० |
| **रेव्हिन्यू खातें** | | | | |
| इन्स्पेक्टिंग ऑफिसर | २ | ० | २ | ० |
| कलेक्टर्स्=तालुकदार | १६ | १ | १५ | ० |
| असिस्टंट कलेक्टर्स् | ३० | ३ | २६ | १ |
| एडिशनल अ. कलेक्टर | ४ | १ | ३ | ० |
| तहशीलदार | ११७ | ९ | १०५ | ३ |
| बंदोबस्त खातें ( जमीन मोजणी ) | २८ | ४ | २१ | ३ |
| फॉरेस्ट खातें ( जंगलांत ) | २० | ५ | १३ | २ |
| कस्टम खातें ( करोडगिरी ) | १६ | ४ | १० | २ |

| खात्याचें नांव | एकंदर जागा | हिंदु | मुसलमान | पार्शी व खिस्ती |
|---|---|---|---|---|
| अबकारी खातें | २५ | ६ | १८ | १ |
| मायनिंग खातें ( खाणी ) | ४ | २ | २ | ० |
| शेतकी खातें | २ | ० | १ | १ |
| कोऑपरेटिव्ह खातें | ७ | ० | ७ | ० |
| **न्याय खातें ( अदालत )** | | | | |
| हायकोर्ट जज्ज | ७ | १ | ६ | ० |
| मुफती ( काजी ) | १ | ० | १ | ० |
| रजिस्ट्रार व अ. रजिस्ट्रार | ३ | ० | ३ | ० |
| सरकारी वकील | ६ | १ | ५ | ० |
| सिटी सिव्हिल जज्ज | ५ | ० | ५ | ० |
| सिटि म्याजिस्ट्रेट्स् | ५ | ० | ५ | ० |
| दारुलकजा ( इस्लामी न्यायकोर्ट ) | १ | ० | १ | ० |
| स्पेशल म्याजिस्ट्रेट ( जिल्हा ) | १ | ० | १ | ० |
| सेशन जज्ज ( सुभ्यांतील ) | ६ | ० | ६ | ० |
| जिल्हा म्याजिस्ट्रेट | १५ | ० | १५ | ० |
| ऍडिशनल म्याजिस्ट्रेट | ८ | ० | ८ | ० |
| मुनसफ | ९४ | ८ | ८५ | १ |
| जेल खातें ( तुरुंग ) | ५ | १ | ३ | १ |
| **पोलीस खातें** | | | | |
| सिटी पोलीस, डिस्ट्रिक्ट पोलीस | ८ | १ | ७ | ० |
| इन्स्पेक्टर जनरल ऑफिस | ६ | ० | ५ | १ |
| पोलीस ट्रेनिंग स्कूल | २ | २ | ० | ० |
| मोहतमीम पोलीस, डी. एस. पी. | १५ | २ | १३ | ० |
| सुप. सी. आय. डी ( खुफिया ) | २ | ० | २ | ० |
| असिस्टंट डी. एस. पी. | १५ | २ | १३ | ० |
| सु. सी. आय. डी | २ | २ | २ | ० |
| क्रिमिनल ट्राइब्स ऑफिसर | १ | ० | १ | ० |
| **शिक्षण खातें.** डायरेक्टर्स ऑफिस | ५ | १ | ४ | ० |
| इन्स्पेक्टर | २१ | ३ | १७ | १ |
| निझाम कॉलेज. प्रोफेसर | १७ | ७ | ३ | ५ |

| खात्याचें नांव. | एकंदर जागा | हिंदू | मुसलमान | पार्शी व ख्रिस्ती |
|---|---|---|---|---|
| **उस्मानिया युनिव्हर्सिटी** | | | | |
| ट्रान्सलेशन खातें व राजिस्ट्रार | १४ | ० | १२ | ० |
| उस्मानिया कॉलेज | | | | |
| प्रोफेसर अ. प्रो. | ३९ | ७ | ३२ | ० |
| हायस्कूल = शिक्षकवर्ग | २६ | ६ | ९ | ११ |
| **पोस्ट खातें व मेडीकल खातें** | ९ | ० | ८ | १ |
| डायरेक्टर आफिस | ४ | ० | ३ | १ |
| उ. मेडिकल कॉलेज प्रोफेसर | १३ | २ | ८ | ३ |
| सिव्हिल सर्जन | १७ | १ | १० | ६ |
| असिस्टंट सर्जन | ५४ | २५ | २२ | ७ |
| लेडी सि. सर्जन | ३ | ० | ० | ३ |
| लेडी. असि. सि. सर्जन | १० | १ | १ | ८ |
| यूनानी हकीम | १२ | ० | १२ | ० |
| मद्रसे तिब्बी यूनानी व स्टोअर | ३ | ० | ३ | ० |
| **रजिस्ट्रेशन व. स्टँप खातें** | ५ | ० | ५ | ० |
| **पी. डब्ल्यू.** जनरल ब्रांच | ४८ | ११ | ३४ | ३ |
| सिटी **इंप्रुव्हमेंट व लोकलफंड** | ४ | २ | २ | ० |
| पी. डब्ल्यू. इरिगेशन व **डेव्हलपमेंट खातें** | ६६ | २५ | ३३ | ८ |
| **मिसलेनियस कंठाळी खातें** | २८ | ७ | २१ | ० |
| म्युनिसिपालीटी ( सफाई खातें ) | १० | १ | ७ | २ |
| एकूण | १०२१ | १७५ | ७५२ | ९४ |





मुंबई येथें ता. २८ नोव्हेंबर १९२६ रोजीं भरलेल्या हैद्राबाद संस्थान प्रजापरिषदेचे अध्यक्ष, स्वागताध्यक्ष, चिटणीस इ. कार्यकारी मंडळी.



धर्मवीर दे. भ. वामन रामचंद्र नाईक जाहगिरदार.
हैद्राबादचे सुप्रसिद्ध पुढारी.

# हैद्राबाद संस्थान प्रजा परिषद्, मुंबई.



मुंबई येथें तारीख २८ नोव्हेंबर सन १९२६ इसवी रोजीं **श्री० यादव माधव काळे.** बी. ए. एल. एल. बी, एम एल. सी. मध्यप्रांत कायदेकौन्सिलचे माजी अध्यक्ष यांच्या अध्यक्षतेखालीं भरलेल्या हैद्राबाद संस्थानांतील प्रजाजन व त्यांचे हितचिंतक यांच्या परिषदेंत पास झालेले ठराव—

## ठराव पहिला

नेक नामदार व्हॉईसरॉय लॉर्ड रिडिंग यांनीं ता. २६ मार्च १९२६ रोजीं वऱ्हाडसंबंधीं निजाम सरकारास पाठविलेल्या खलित्यांत संस्थानच्या अंतर्गत राज्यकारभारांत हात घालण्याबद्दलचें जें तत्व आणि धोरण जाहीर केलें आहे त ह्या परिषदेस पसंत व मान्य आहे; आणि ह्या परिषदेची हिंदुस्थान सरकारास अशी विनंति आहे कीं, निजाम सरकारनीं आपल्या प्रजेवर अन्याय व जुलूम केल्याबद्दलच्या ज्या तक्रारी करण्यांत आल्या आहेत, त्यांची पूर्ण कायदेशीर चौकशी करण्याकरितां सदरहू खलित्यांतील धोरणास अनुसरून एक कमिशन ताबडतोब नेमण्यांत यावें.

## ठराव दुसरा.

निजाम सरकारच्या अन्यायी व जुलमी राज्यकारभाराची कमिशन-मार्फत किंवा अन्य रीतीनें चौकशी होऊन त्यासंबंधीं योग्य ती व्यवस्था लागेपर्यंत संस्थानांत हल्लीं बेधडक चालू असलेल्या अन्यायाच्या व जुलमाच्या गोष्टींना आळा घालण्याकरतां हिंदुस्थान सरकारांनीं आपल्या अधिकारयुक्त मित्रत्वाच्या सल्ल्यानें खालील सुधारणा तावडतोब घडवून आणण्यास निजाम सरकारास भाग पाडावें अशी ह्या परिषदेची विनंति आहे.

( १ ) भाषण, लेखन स्वातंत्र्य व सभा यांवरील निर्बंध काढून टाकण्यांत यावे.

( २ ) वृत्तपत्रांवरील व व्यक्ति स्वातंत्र्यावरील बंदी काढून टाकण्यांत यावी.

( ३ ) खासगी शिक्षणसंस्थांवरील निर्बंध काढून टाकण्यांत यावेत, व शिक्षण प्रजाजनांच्या मातृभाषांतून देण्याची व्यवस्था करावी.

( ४ ) अन्यायानें खालसा केलेल्या किंवा जप्त करून कोर्ट ऑफ वॉर्ड-सच्या ताब्यांत दिलेल्या हिंदुमुसलमानांच्या जहागिरी व वतनें परत करण्यांत यावींत, व त्यांना योग्य तें नुसकान भरून देण्यांत यावें.

( ५ ) नजराणा घेण्याची पद्धत अजिबात बंद करण्यांत येऊन जुलूम-जबरदस्तीनें घेतलेला नजराणा परत करण्यांत यावा.

( ६ ) लांचलुचपत घेणाऱ्या व जबरदस्तीनें नजराणा वसूल करण्याचे कामीं प्रसिद्धीस आलेल्या अधिकाऱ्यांना बडतर्फ करून त्यांना कायदेशीर शासन करण्यांत यावें.

( ७ ) संस्थानांत हिंदूंची संख्या शेंकडा ९० या प्रमाणांत असूनही त्यांना सरकारी नोकरींत जबाबदारीच्या जागा शेंकडा पांचहि न देतां सरकारी नोकरीं-तून बुद्धीपुरस्सर वगळण्यांत येत आहे. हा अन्याय दूर करून हिंदूंना त्यांच्या संख्येच्या आणि महत्त्वाच्या प्रमाणांत जागा देण्यांत याव्या, व तोंपर्यंत सरकारी नोकरींत जास्त मुसलमान घेण्यांत येऊं नयेत.

( ८ ) हिंदू प्रजेचे धार्मिक विधि आणि आचार यांच्या मार्गांत उत्पन्न केलेले अडथळे दूर करण्यांत येऊन हिंदूंचें धार्मिक स्वातंत्र्य अबाधित राखण्यांत यावें.

## ठराव तिसरा.

ता. २० ऑगस्ट १९१७ रोजीं पार्लमेंट सभेंत स्टेट सेक्रेटरींनीं जाहिर केलेल्या जबाबदार राज्यपद्धतीच्या ध्येयाला अनुसरून ही परिषद ब्रिटीश सरकारला अशी विनंति करीत आहे कीं ब्रिटीश सरकारनीं हिंदुस्थानच्या भावी राज्यघटनेंत हिंदी संस्थानिकांचा दर्जा ठरवून घेण्याकरितां एक रॉयल कमिशन नेमावें व त्या कमिशनवर सार्वभौम सरकार, हिंदी संस्थानिक, संस्थानांतले प्रजा-जन व ब्रिटीश हिंदुस्थानांतील लोक ह्यांचे प्रतिनिधि घेण्यांत यावेत.

## ठराव चवथा.

हैद्राबाद संस्थानांत जबाबदार राज्यपद्धतीची स्थापना शक्य तितक्या लौकर करण्यांत यावी, अशी ह्या परिषदेची आग्रहाची विनंति आहे.

## ठराव पांचवा.

आपल्या गाऱ्हाण्यांची दाद लावून घेण्याकरितां व संस्थानांत जबाबदार राज्यपद्धतीची स्थापना करून घेण्याकरितां हैद्राबाद संस्थानच्या प्रजाजनांनीं शांततेच्या मार्गांनीं जी सनदशीर चळवळ चालू केली आहे, तिला ब्रिटिश इंडियांतील लोकांनीं व इतर संस्थानांतील प्रजाजनांनीं, त्यांच्या पुढाऱ्यांनीं, राष्ट्रीय सभेनें व इतर सर्व राजकीय संस्थांनीं व वृत्तपत्रकारांनीं पूर्ण पाठिंबा देऊन शक्य ती मदत करावी, अशी ह्या परिषदेची त्या सर्वांस नम्रतापूर्वक विनंति आहे.

## ठराव सहावा.

वरील ठरावांतील मागण्या नेक नामदार व्हॉईसरॉयसाहेबांपुढें मांडण्याकरितां खालील गृहस्थांचें एक डेप्युटेशन पाठविण्यांत यावें, असें या परिषदेचें मत आहे. डेप्युटेशनमध्यें आणखी जास्त मंडळी घेण्याचा अधिकार डेप्युटेशनला आहे.

१ परिषदेचे अध्यक्ष **श्री. वाय्. एम्. काळे,** बी. ए. एल्एल्. बी., एम्. एल्. सी., ( बुलढाणा जिल्हा. ) माजी अध्यक्ष—सी. पी. कायदेकौन्सील.

२ स्वागताध्यक्ष ( **श्री. डी. ए. तुळजापूरकर,** बी. ए. एल्., एल्. बी. हायकोर्ट वकील, मुंबई )

३ **श्री. एस्. एस्. परशा,** परिषदेचे मुंबई येथील सेक्रेटरी.

४ **श्री. स. ल. सिलम,** बी, ए. एलएल. बी., मुंबई म्युनिसिपालिटीचे सभासद, परिषदेचे मुंबई येथील सेक्रेटरी.

५ **श्री. एस्. के. पुप्पाला,** परिषदेचे मुंबई येथील सेक्रेटरी.

६ **श्री. एम्. आर. जयकर,** एम्. ए. ए. एल्. एल्. बी; बार ॲट लॉ, एम्. एल. ए. मुंबई.

७ **श्री. एन्. सी. केळकर,** बी. ए. एलएल. एम्. एल्. ए. बी. संपादक केसरी पुणें.

८ **डॉ. व्ही. आर. भूसरथ,** एम् बी. बी. एस्. मुंबई.

९ श्री. **पंडिताप्पा चिकोडी**, बी. ए. एम्. एल. सी. प्रेसिडेंट, डिस्ट्रिक्ट बोर्ड, बेळगांव.

१० श्री. **डी. व्ही. बेळवी**, बी. ए. एल्एल. बी., एम्, एल., ए., बेळगांव.

११ श्री. **टी. प्रकाशम्**, एम्. ए., बी. एल., एम्. एल. ए., बार ॲट लॉ एडिटर, 'स्वराज्य' मद्रास.

१२ श्री. **राघवेंद्र शर्मा**, माजी हायकोर्ट वकील, हैद्राबाद, पुणें.

१३ श्री. **डॉ. बी. एस्. मुंजे**, एल्. एम्. अँड एस्., एम्. एल्. ए. नागपूर.

१४ श्री. **एम्. एस्. अणे**, बी. ए. एल्एल्. बी., एम् एल्. ए. यवतमाळ, वऱ्हाड.

१५ श्री. **प्रो. जी. आर्. अभ्यंकर**, बी. ए. एलएल, बी., वकील सांगली.

१६ श्री. **ए. व्ही. पटवर्धन**, बी. ए. एडिटर, संस्थानी स्वराज्य, जनरल सेक्रेटरी दक्षिणी संस्थान प्रजा परिषद्, मेंबर सर्व्हंट्स ऑफ इंडिया सोसायटी, पुणें.

## ठराव सातवा.

ह्या परिषदेंत पास झालेल्या ठरावांच्या प्रती हिंदुस्थानचे बादशहा, स्टेट सेक्रेटरी, व्हॉइसरॉय, हैद्राबाद येथील ब्रिटिश रेसिडेंट, निजाम सरकार, राष्ट्रीय सभा व इतर सर्व राजकीय संस्था यांचेकडे अध्यक्षांच्या सहीनें पाठवून देण्याचा व व्हॉइसरॉयांकडे जावयाच्या डेप्युशनसंबंधीं सर्व व्यवस्था करण्याचा अधिकार ही परिषद् सेक्रेटरी यांस देत आहे.



# हैद्राबाद संस्थान प्रजापरिषद्, मुंबई.

## स्वागत मंडळाचे अध्यक्ष रा. दत्तो अप्पाजी तुळजापुरकर, बी. ए., एल्‌एल्. बी. हायकोर्ट वकील, यांचें भाषण.



( रविवार तारीख २८ नोव्हेंबर १९२६ )

प्रतिनिधि बांधव, निमंत्रित मित्रमंडळी, आणि परिषदेच्या कार्याला स्वयंस्फूर्तीनें मदत करण्याकरितां आलेली पाहुणे मंडळी या सर्वांचें अंतःकरणपूर्वक स्वागत करण्याचें गोड काम स्वागत मंडळानें माझ्यावर सोंपविलें आहे. एका सर्वसाधारण अशा संकटाला तोंड देण्याकरितां व त्याचा एकजुटीनें प्रतिकार करण्याचा मार्ग शोधून काढण्याकरितां एकत्र जमलेल्या प्रतिनिधींचें आणि मित्र मंडळींचें स्वागत करण्यास मला अत्यंत आनंद होत आहे. ज्या परिषदेच्या कार्याकरितां आपण आलां आहांत ती परिषद् एका दृष्टीनें अपूर्व खरीच. एखादी विशिष्ट स्वरूपाची सुधारणा घडवून आणण्याकरितां किंवा एखाद्या विवक्षित ठिकाणीं जमलेलों नाहीं. परंतु अन्यायांची परंपरा अव्याहतपणें चालूं ठेवण्याचें ज्यांनीं एकप्रकारें व्रतच स्वीकारलें आहे अशा एका बलिष्ठ हिंदी संस्थानिकाच्याविरुद्ध सार्वभौम ब्रिटिश सरकारांनीं ज्यांना 'सर्वोन्नत' His Exalted Highness अशी पदवी दिली आहे त्या हैद्राबादच्या निजाम साहेबांविरुद्ध–हिंदी जनतेपुढें आणि सार्वभौम सरकारापुढें आपलें गाऱ्हाणें मांडण्याकरितां आपण ह्या ठिकाणीं जमलेलों आहों.

ह्या बाबतींत असा एक प्रश्न उद्भवण्याचा संभव आहे कीं, ही परिषद् खास हैद्राबादेस किंवा संस्थानांतल्या दुसऱ्या एखाद्या ठिकाणीं न भरवितां मुंबईस कां भरविली ? पण ह्या प्रश्नांतच त्याच्या उत्तराचा अंतर्भाव होत आहे. परिषद् मुंबईस कां भरविली तर संस्थानांत भरविणें अशक्य म्हणून ! राजकीय, धार्मिक किंवा सामाजिक कोणत्याहि स्वरूपाच्या कसल्याहि गाऱ्हाण्यांची दाद लावून घेण्याकरितां संस्थानांत सभा भरविण्यास निजाम सरकारच्या कायद्याप्रमाणें मनाई आहे. परवानगी मागितली असतां कोणत्या तरी सबबीवर ती नाकरण्यांत येते. राजकीय सभा भरवण्यास परवानगी पाहिजे हा कायदा, पण कायद्याप्रमाणें परवानगी मागितली तर, 'तुमची सभा राजकीय आहे

म्हणूनच परवानगी देतां येत नाहीं ' हें उत्तर मिळतें. सरकारी हुकूम किंवा कायदा एक प्रकारचा असला तर त्याची बरोबर उलट रीतीनें अम्मलबजावणी करण्याच्या कलेंत निजाम सरकारचे अधिकारी अत्यंत निष्णात आहेत. ' तुझ्या घराची मी पायरीसुद्धां चढणार नाहीं, ' अशी शपथ घेतलेली असल्यामुळें पायरी चुकवून उडी मारून घरांत शिरणाऱ्या तोतयाच्या बंडांतल्या बगंभटालाहि लाजविण्यासारख्या युक्त्या हे अधिकारी योजीत असतात. भाषण किंवा लेखन-स्वातंत्र्य ह्यावरील निर्बंध इतके कडक आहेत कीं, खुद्द निजामसाहेबांच्या किंवा त्यांच्या अधिकाऱ्यांच्या अन्यायी व जुलुमी वर्तनाच्या संतापजनक बातम्या चुकूनमाकून एखादे वेळेस बाहेर येऊं शकतात. अशा स्थितींत ही परिषद् संस्थानांत भरवावयाची कशी ? हैद्राबाद संस्थान हा एक प्रकारचा जनानाच आहे; तेव्हां त्या जनान्यांत स्वतंत्रतादेवीला वाव कसा असूं शकेल ?

केवळ अशक्य, नाउपायाची गोष्ट म्हणून ही परिषद् मुंबईस भरविण्यांत आली आहे. प्रसंग कठीण आणि आणीबाणीचा आहे यांत शंका नाहीं. आणि म्हणूनच आपण येथें येण्याचे श्रम घेतल्याबद्दल आम्ही आपले अत्यंत ऋणी आहोंत. मोंगलाई राज्यासंबंधींच वाटाघाट करण्याकरितां आपण या ठिकाणीं आलां आहांत. तेव्हां आमच्या व्यवस्थेंतहि आपल्याला थोडीशी मोंगलाई आढळून आल्यास आपण त्याबद्दल कांहीं विषाद मानणार नाहीं अशी खात्री आहे. आमच्या व्यवस्थेंतील दोषांकडे आपली गुणैकदृष्टि जाणें शक्यच नाहीं. आपल्या दिलदार स्वभावावर व उदार अंतःकरणावर आमचा पूर्ण भरंवसा असल्यामुळेंच आम्ही हें अवघड काम हातीं घेतलें आहे.

अनियंत्रित राजसत्तेचीं अंधारांतील दुष्ट कृत्यें चवाट्यावर आणण्या-करितांच ही परिषद् भरलेली आहे. निजामच्या राज्यांतल्या अंदाधुंदीचीं अंगा-वर शहारे आणणारीं वर्णनें तज्ज्ञ अशा मंडळींच्या मुखांतून आपल्याला ऐकावयाला मिळतीलच व त्यासंबंधीं योग्य तो निर्णयहि आपण कराल. पण मला आप-ल्याला एवढेंच सांगावयाचें आहे कीं, या परिषदेसंबंधानें आपल्या हितशत्रूंकडून वाटेल त्या कंड्या उठविण्यांत येतील तिकडे आपण लक्ष देऊं नका. अप्रतिहत अधिकार, मुबलक द्रव्य आणि पोटभरू वर्तमानपत्रें या त्रयीच्या जोरावर विषारी टीकेचे बाण आपल्या अंगावर फेंकण्यांत येतील. अन्यायाचें परिमार्जन होण्याचा मार्ग अजीबात बंद करून प्रतिपक्षावर वाटेल तो भयंकर आरोप केला म्हणजे

आपल्या दुष्कृत्यांवर अनायासेंच पांघरूण घातलें जातें, अशी जुलूम करण्यास सवकलेले लोक आपल्या मनाची समजूत करून घेत असतात. आपल्या परिषदेवर नाना तऱ्हेचे खोटेनाटे आरोप करण्यांत येतील. निजाम सरकारच्या सुरळीत चाललेल्या राज्यव्यवस्थेच्या गाड्याला खीळ घालून त्याला खड्ड्यांत पाडण्याचा प्रयत्न करणारे आपण कोणीतरी दुष्ट विध्वंसक लोक आहोंत असें म्हणण्यांत येऊन राजद्रोहाचा शिक्काहि आपल्या कपाळावर मारण्यांत येईल. नाइलाज आहे, नाहीं तर फांशीची शिक्षाच फर्मावण्यांत आली असती ! अशा लोकांकडे आपणाहि पूर्ण दुर्लक्षच केलें पाहिजे. जिवंत राहून नुसत्या माणुसकीचे हक्क मागणारे आम्ही गरीब लोक जर राजद्रोही, तर सभाबंदीचे हुकूम काढून लोकांची मुस्कटदाबी करणारे, ज्ञानप्रकाश किंवा सर्व्हंट ऑफ इंडिया यांच्यासारख्या निरुपद्रवी पत्रांनाहि बंदी करणारे, महमद् अल्ली जिनासारख्या प्रसिद्ध मुसलमान पुढाऱ्यांलाहि आपल्या राज्यांत पाऊल न ठेवूं देणारे निजामसाहेब कोण ? पंडित मदन मोहन मालवीय हिंदु आहेत, पण जिना तर मुसलमान आहेत ना ? जिना किंवा मालवीयजी यांच्यासारख्या सर्वमान्य पुढाऱ्यांनाहि ज्या राज्यांत पाऊल ठेवण्याची परवानगी नाहीं, त्या अंधेरनगरींतील राज्यव्यवस्था तेथील लोकांना किती जाचक व असह्य होत असेल याची कल्पना इकडील लोकांनीं कल्पनेनेंच केली पाहिजे.

आपल्या परिषदेवर दुसराहि असा एक आरोप घेण्यांत येईल कीं, निजामसाहेब मुसलमान आहेत म्हणून त्यांचा आम्ही हिंदु लोक द्वेष करतों. खरोखर सध्यांचा काळ मोठा विलक्षण आहे. हिंदुमुसलमानांत जागुनबुजून तंटे लावण्यांत येत आहेत. सर्वसाधारण मुसलमान समाज हिंदूंशीं शत्रुत्व करण्यास तयार नाहीं, आणि हिंदूंनाहि मुसलमानांशीं वैर करण्याचें कांहीं कारण नाहीं. परंतु दुर्दैवाची गोष्ट अशी आहे कीं, हिंदु लोक हिंदुस्थानांत हिंदुपद् बादशाही स्थापन करण्याच्या विचारांत आहेत असली भलतीच वेडगळ कल्पना अलीकडे कांहीं मुसलमान पुढाऱ्यांच्या डोक्यांत शिरली असल्यामुळें विनाकारण हिंदुमुसलमानांत फाजील तेढ उत्पन्न झाली आहे; आणि त्याचाच प्रतिकार करण्याकरितां म्हणून भल्या बुऱ्या उपायांनीं हिंदूंचें धर्मांतर घडवून आणण्याची चळवळ सुरू करण्यांत आली आहे. वस्तुतः हिंदुमुसलमानांनीं एकमेकांचा द्वेष करण्याचें कांहीं एक कारण नाहीं. आमच्या परिषदेवर तर अशा तऱ्हेचा

आक्षेप केव्हांहि करतां येणार नाहीं. निजामसाहेब मुसलमान आहेत म्हणून आम्ही हिंदु लोक त्यांचा द्वेष करितों हें म्हणणें निखालस खोटें आहे. हल्लींच्या निजाम साहेबांच्या वडिलांचेंच उदाहरण घ्या. त्यांच्याविरुद्ध कोणाहि हिंदु गृहस्थानें ब्र तरी काढला होता कीं काय ? त्यांना हिंदुलोक एखाद्या साधूप्रमाणें पूज्य मानीत नव्हते काय ? त्यांच्यासारख्या उदार आणि साधुपुरुषाचा द्वेष कोण कशाकरितां करील ? त्यांनीं काय लोकांचें भाषण किंवा लेखनस्वातंत्र्य हिरावून घेतलें होतें ? सरसकट सभाबंदीचे हुकूम सोडले होते ? लोकांच्या जहागिरी किंवा वतनें जप्त केलीं होतीं ? किंवा सक्तीनें नजराणा वसूल केला होता ? त्यांनीं यांपैकीं काय केलें होतें ? कांहींहि नाहीं. म्हणूनच त्यांच्या राज्यांत हिंदुमुसलमानांचे दंगे झाले नाहींत, हिंदूंचीं देवळें फोडून टाकण्यांत आलीं नाहींत, किंवा भ्रष्टहि करून टाकण्यांत आलीं नाहींत. ते दयाळू व न्यायी होते म्हणून त्यांच्याविषयीं लोकांच्या अंतःकरणांत पूज्यबुद्धि होती, प्रेम होतें. हल्लींचे निजामसाहेब त्यांच्या अगदीं उलट, अन्यायी, जुलमी आणि ' हम करेसो कायदा ' या जातीचे. विलक्षण फरक ! त्यामुळें हॅम्लेटप्रमाणें 'तें चित्र पहा आणि हेंहि पहा ' असे उद्गार सहज कोणाच्या मुखांतून बाहेर पडले तर त्यांत नवल काय ? पण यांत धर्माचा संबंध कसा येतो ? समजा, उद्यां हल्लींच्या निजामसरकारांनीं राज्यत्याग केला आणि त्यांचे चिरंजीव तख्तनशीन किंवा सिंहासनाधिष्ठित झाले, तर मी आपल्याला खात्रीनें सांगतों कीं, संस्थानांतले एकूण एक हिंदु लोक अत्यंत राजनिष्ठापूर्वक नवीन पादशहांचें अभिनंदन करतील. संस्थानची लोकसंख्या सव्वाकोट आहे. त्यांपैकीं मुसलमान फक्त तेरा लाखच आहेत. पाहिजे तर नुसत्या मुसलमानांचींच तुम्ही मतें घ्या. तींहि मतें निजामसाहेबांना अनुकूल पडणार नाहींत. फाजील धर्मवेडानें ज्यांचीं डोकीं भणाणून गेलीं आहेत अशी कांहीं मंडळी सोडून दिली, न्यायभ्रष्ट असणारे अधिकारी किंवा पोटार्थी तोंडपुजे लोक वगळले आणि असे लोक किती आहेत, तर मुसलमानांचा बहुजनसमाजहि आमच्याच मताचा आहे. काय निजाम साहेबांनीं हिंदूंच्याच तेवढ्या जहागिरी जप्त केल्या आहेत ? फक्त हिंदूंच्याच पुढाऱ्यांना हद्दपार केलें आहे ! त्या बाबतींत त्यांनीं हिंदुमुसलमान असा भेद केलाच नाहीं ! एवढ्याबद्दल त्यांची तारीफ करावयाची असेल तर खुशाल करा ! हिंदूंना धार्मिक बाबतींत मुसलमानांचाच काय पण कोणत्याहि अन्य

धर्मीयांचा द्वेष करण्याचें कारण नाहीं. परमेश्वराकडे जाण्याचे मार्ग अनेक आहेत, अशीच त्यांना आपल्या धर्माची शिकवण असल्यामुळें ते कमालीचे परधर्मसहिष्णु बनलेले आहेत. हें धर्मद्वेषाचें भूत लोकांच्या डोळ्यांत केवळ धूळ फेंकण्याकरितां उभें करण्यांत येत असतें. नीच वृत्तीच्या कार्यसाधु लोकांचा हा एक डावच आहे. पण आपणहि तितक्याच निष्ठुरपणानें तें भूत गाडून टाकलें पाहिजे.

आपल्याला जो ठरावाचा मसुदा देण्यांत आला आहे त्यावरून एक गोष्ट प्राधान्येंकरून आपल्या लक्षांत आली असेल कीं, एकहि ठराव निजाम सरकारला उद्देशून नाहीं आणि कोणत्याहि ठरावानें निजाम सरकारांकडे कसलीहि मागणी करण्यांत आलेली नाहीं. हें आपल्याला जरा चमत्कारिक वाटेल. पण माझ्या अल्पसमजुतीप्रमाणें परिषदेच्या चालकांनीं हा स्वाभिमानाचा आणि शहाणपणाचाच मार्ग स्वीकारला आहे. ज्या राज्यांत मनुष्याचें जीवित किंवा मालमत्ता सुरक्षित राहूं शकत नाहीं, जेथील न्यायमंदिरें नुसत्या फर्मानावर नाचविलीं जातात, जेथील अंधेरनगरींतल्या अंदाधुंदीच्या राज्यकारभाराकडे पाहून मद्रास हायकोर्टाच्या मुख्य न्यायाधिशाच्या अंगावर कांटा उभा रहातो, त्या संस्थानच्या अधिपतीपुढें तोंड वेंगाडण्यांत अर्थ तरी काय ? जुलुमानें उकळलेल्या पैशावर ज्यांची चैन चालते, लोकांना गुलामगिरींत ठेवणें यांतच ज्यांना फायदा आहे. त्यांच्याकडून न्याय कसा मिळणार ? सर्व जगांत यावेळीं नवीन चैतन्याचें आंदोलन सुरू झालेलें आहे. खुद्द ब्रिटिश हिंदुस्थानांतहि नोकरशाहीबरोबर आमचा झगडा चालूं आहे. ब्रिटिश साम्राज्यांत बरोबरीच्या नात्यानें रहाण्याचा आपला हक्क शाबित करून घेऊन त्या हक्काची पुरी पुरी बजावणी करून घेण्याची जोराची चळवळ आम्ही इकडे करीत आहों. अशा स्थितींत हैद्राबाद संस्थानांत रहाणारे आमचेच भाईबंद गुलामगिरीच्या गर्तेत खितपत पडलेले असावेत हें दृश्य कोणाला सह्य होईल ? हैद्राबाद संस्थानांत मराठे आणि तेलगू ह्या एकाच संस्कृतीच्या परंतु भिन्न भाषा बोलणाऱ्या हिंदु लोकांचीच वस्ती मोठ्या प्रमाणांत आहे. दक्षिणेंतील 'हुसेन गांगो बहामनी' या इतिहासप्रसिद्ध मुसलमानी राज्याचा उदय एका तैलंग ब्राह्मणाच्या मदतीनें आणि अक्कलहुषारीनें झाला आहे. आणि खास निजामच्या राज्याची इमारतहि मराठे सरदारांच्या आधारस्तंभावर उभारली गेली आहे. निजामच्या

पदरच्या मराठे सरदारांनीं निजामाकरितां नागपूरकर भोंसल्यांशींहि युद्ध करण्यास मागेंपुढें पाहिलें नाहीं. परंतु निजामसरकार आणि त्यांचे हिंदु जहागिरदार यांच्या ह्या प्रेमाच्या सलोख्याच्या संबंधांना पूर्वीच्या निजामसाहेबांच्या शवाबरोबरच मूठमाती देण्यांत आली. त्यांचा अंतकाल होऊन कांहीं फार वर्षे लोटलीं नाहींत; परंतु आपण कोठल्या तरी दुसऱ्या युगांत येऊन पडलों आहों, असें लोकांना वाटण्याइतकी राज्यव्यवस्थेची उलथापालथ हल्लींच्या निजामसाहेबांनीं करून टाकिली आहे. आतां संस्थानच्या प्रजेला जर कांहीं आधार राहिला असेल तर तो फक्त सार्वभौम सरकारच्या मदतीचाच. परंतु संस्थानच्या प्रजेनेंहि हें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं सार्वभौम ब्रिटिशसरकार आपण होऊन त्यांना मदत करणार नाहीं, किंवा करूं शकणार नाहीं. तुम्ही आपली चळवळ जितकी जोरानें, चिकाटीनें आणि स्वार्थत्यागानें चालवाल त्या मानानें सार्वभौम सरकारकडून तुम्हांला मदत मिळेल.

कांहीं दीडशहाणे मंडळी असा प्रश्न काढतात कीं, निजामच्या अंतर्गत राज्यव्यवस्थेंत हात घालण्याचा ब्रिटिशसरकारला तरी अधिकार आहे का? वस्तुतः कायद्याच्या मूलतत्त्वाप्रमाणें हा प्रश्नच उपस्थित होऊं शकत नाहीं. सार्वभौम सरकारला जर हा अधिकार नाहीं, तर त्यांचें सार्वभौमत्व राहिलें कोठें? हिंदी संस्थानांतील मांडलिक संस्थानांमुळेंच इंग्लंडचा राजा हिंदुस्थानचा बादशहा बनतो. इंग्लंडच्या राजाची ही काय नुसती शोभेचीच पदवी आहे? परराष्ट्रांबरोबर स्वतंत्र तह करण्याचा हिंदी संस्थानिकांचा अधिकार ब्रिटिश सरकारनीं काढून घेतलेला आहे, संस्थानिकांचें लष्करी सामर्थ्य मर्यादित करण्यांत आलें आहे, त्यांचे आपापसांतील तंटेहि ब्रिटिश सरकारच्या मध्यस्थीनेंच तुटले पाहिजेत असा त्यांच्यावर निर्बंध घालण्यांत आला आहे हीं स्वतंत्रतेचीं लक्षणें कां मांडलिकत्वाचीं लक्षणें? निजामसाहेब स्वतःला कितीहि मोठे समजत असले, तरी ते सार्वभौम ब्रिटिशसरकारचे मांडलीकच आहेत हें त्यांनीं विसरतां कामा नये; आणि सार्वभौम सरकारलाहि त्या बाबतींतली आपल्यावरची कायदेशीर जबाबदारी टाळतां येणार नाहीं. स्वतः संस्थानिकच जर आपल्या प्रजेचा अनन्वित छळ करूं लागले तर संस्थानच्या प्रजेनें सार्वभौम सरकारकडे नाहीं, तर मग कोणाकडे दाद मागावयाची? याच जबाबदारीची जाणीव ठेवून जुलुमानें गांजलेल्या प्रजेचें संरक्षण करण्याकरितां सार्वभौम

ब्रिटिशसरकारनीं बोअर लोकांबरोबर युद्ध करण्यासहि मागेंपुढें पाहिलें नाहीं. पण इतकें लांब कशाला ? गेल्या सालींच महाराजा तुकोजीराव होळकर यांच्या जुलमी कारकीर्दीची चौकशी कमिशनमार्फत करण्याचें सार्वभौम सरकारानींच ठरविलें होतें कीं नाहीं ? राज्यसंन्यास करून तुकोजीराव होळकरांनीं तो प्रसंग टाळला हा भाग निराळा; पण त्यावरून हिंदी संस्थानच्या अंतर्गत राज्यकारभारांत हात घालण्याचा सार्वभौम सरकारला पूर्ण अधिकार आहे ही गोष्ट उघडपणें सिद्ध झाली आहे. सार्वभौम सरकारचा हा अधिकार निव्वळ कल्पनासृष्टींतला नसून सत्यसृष्टींतला आहे. संस्थानच्या अंतर्गत कारभारांत सार्वभौम सरकारनें विनाकारण हात घालावा असें कोणीहि म्हणणार नाहीं. संस्थानिकांची इभ्रत आम्हांलाहि प्रिय आहे. परंतु त्यांच्या इभ्रतीपेक्षांहि प्रजेच्या स्वातंत्र्याची, हक्काची आणि जीविताची आम्हांला जास्त मातब्बरी वाटते. संस्थानच्या प्रजेला गुलामगिरींतच जर खितपत पडावयाचें असेल तर त्यांनीं जिवंत तरी कशाला रहावें ?

सार्वभौम सरकारला जर इकडे लक्षच द्यावयाचें नसेल तर त्यांनीं उघडपणें असें जाहीर तरी करावें कीं ' हैद्राबाद संस्थानच्या प्रजाजनांशीं आमचा काडीइतकाहि संबंध नाहीं. त्यांनीं वाटेल तर मरावें नाहींतर निजामसाहेबांच्या फर्मानाला बळी पडावें.' पण मग परमेश्वराचा दरबार तर कोठें गेला नाहीं ! शेवटीं तो परमेश्वरच त्यांचा पाठीराखा होईल. परंतु ब्रिटिश सरकारला आम्ही एवढें मात्र सुचवून ठेवतों कीं, त्यांनीं जुलमानें गांजलेल्या लोकांचा यापुढें जास्त अंत पाहूं नये. अशा परिस्थितींत इतर देशांतल्या लोकांनीं काय केलें असतें, बंड करण्याची किंवा सशस्त्र प्रतिकार करण्याची त्यांनीं कशी धमकी दिली असती, या गोष्टी आम्ही सांगावयाला पाहिजेत असें नाहीं. परंतु आमचें शील तसें नाहीं. शांततेच्या आणि सनदशीर चळवळीच्या मार्गानींच आम्हांला जावयाचें आहे. पण त्यामुळेंच सार्वभौम सरकारांवर जास्त जबाबदारी येऊन पडत नाहीं का ? ब्रिटिश सरकारनीं निजाम साहेबांना ' सर्वोन्नत ' His Exalted Highness अशी मोठ्यांतली मोठी पदवी दिली आहे. पण ती कशाकरितां ? मोठ्यांतलें मोठें पातक करण्याकरितां ! ' सर्वोन्नत ' ही पदवी धारण करणारा माणूस ' सर्वोन्नत ' असें पातक करूं लागला तर त्याला प्रायश्चित्तहि ' सर्वोन्नत ' अशाच स्वरूपाचें मिळालें पाहिजे ! प्रजेचीं हीं

गाऱ्हाणीं ब्रिटिश सरकारच्या कानावर गेलीं नाहींत असें नाहीं. कांठाळ्या बसण्या-इतक्या मोठ्या आवाजानें त्यांचा उच्चार करण्यांत आला आहे. त्यामुळें ब्रिटिश सरकार जागें होऊन त्या बाबतींत त्यांची थोडीशी चुळबुळ सुरू झाल्याचें आमच्याहि कानावर आलें आहे. कोणी म्हणतात, निजामसरकारला तंबी देण्यांत आली आहे, कोणी म्हणतात विनंति करण्यांत आली आहे, कोणी त्याला उपदेश म्हणतात, कोणी कानमंत्र म्हणतात, तर कोणी त्याला साधाच मित्रत्वाचा किंवा अधिकारयुक्त मित्रत्वाचा सल्ला म्हणतात. पण आम्हीं मात्र येवढेंच म्हणतों कीं, या कामीं एवढी चोरी कशाला? गुप्त खलबत करण्याइतकें कांहीं यांत राजकारण नाहीं. उघड चर्चा करण्यामुळें निजाम साहेबांच्या इज्जतीला धक्का पोहोंचेल अशी भीति बाळगण्याचें मुळींच कारण नाहीं. कारण निजाम साहेबांची इज्जत त्यांच्या प्रजेच्या दृष्टीनें तर केव्हांच नाहींशी झाली आहे. इज्जत ही कांहीं जनान्यांतली स्त्री नव्हे, कीं चोरट्या मार्गांनीं किंवा नुसत्या भुलथापांनीं तिला सुप्रसन्न करून घेतां येईल? निजामसाहेबांना आपल्या इज्जतीची काळजी असती तर त्यांनीं तिचा हा असा खेळखंडोबा केलाच नसता. आतां याप्रसंगीं निजामसाहेबांच्या इज्जतीचा किंवा इभ्रतीचा प्रश्न नसून सार्वभौम ब्रिटिशसरकारच्या इभ्रतीचा प्रश्न आहे. सार्वभौम सरकार आपल्या सार्वभौमत्वाच्या अधिकारापासून च्युत होणार कीं काय? जगांतल्या गुलामगिरीचीं पाळेंमुळें खणून काढण्याकरितां आपलें सर्व सामर्थ्य खर्ची घालणारें ब्रिटिश सरकार एका हिंदी मांडलिक संस्थानिकाच्या गुलामगिरींतून त्याच्या प्रजेची मुक्तता करण्यास असमर्थ आहे? मुळींच नाहीं. पण त्या मानानें तुम्हीं आपली चळवळ चालू ठेवली पाहिजे.

पुनः एकदां आपण येथें येण्याचे श्रम घेतल्याबद्दल आपले मनःपूर्वक आभार मानून परिषदेच्या कार्याला सुरवात करण्याबद्दल आपल्याला विनंति करतों.



## मुंबई येथें ता. २८।११।२६ रोजीं भरलेल्या हैद्राबाद संस्था-नांतील प्रजा व हितचिंतक यांच्या परिषदेचे अध्यक्ष

## श्री. यादव माधव काळे

### ( बी. ए. एल्‌एल्. बी. )

### यांचें भाषण.

### श्री. तुळजापूरकर व बंधुभगिनींनो,

या महत्त्वाच्या परिषदेच्या अध्यक्षपदाचा मान मला दिल्याबद्दल मी आपणा सर्वांचा फार आभारी आहे. या मानाबरोबर येणाऱ्या जबाबदारीच्या कामांत देखील आपण मला सहानुभूतिपूर्वक मदत कराल व परिषदेचें काम यशस्वी रीतीनें पार पाडण्यास सहाय कराल असा माझा विश्वास आहे. हैद्राबाद संस्थानांतील परिस्थितीचें प्रत्यक्ष ज्ञान व अनुभव असलेला खास हैद्राबादी पुढारी आपणांस अध्यक्ष लाभला असता तर फार उत्तम झालें असतें. परंतु सध्यांच्या परिस्थितींत ही जागा स्वीकारून, राजकर्त्यांची गैरमर्जी व तिज-पासून भोगावे लागणारे दुष्परिणाम सोसण्यास तयार होणारा गृहस्थ आपणांस लाभूं शकत नाहीं हें आपणां सर्वांस विदितच आहे. हैद्राबाद संस्थानांत आपल्या संस्थानी बांधवांस सहाय्य करण्यास जास्त उत्सुक असलेले लायक लोक पुष्कळ आहेत. परंतु दुर्दैवानें त्यांच्या मदतीचा फायदा आज आपणांस मिळूं शकत नाहीं ! त्यांतल्या त्यांत समाधानाची गोष्ट इतकीच, आजचा आपला अध्यक्ष हा वऱ्हाडचाच रहिवाशी असल्यानें एक प्रकारें आपल्याच संस्थानचा प्रजाजन व आपलाच बांधव आहे. वऱ्हाड परत हैद्राबाद संस्थानाकडे जाणार अशी जी नुकतीच वार्ता पसरली होती तीमुळें आम्हां वऱ्हाडी लोकांचें लक्ष हैद्राबाद संस्थानांतील अंतर्गत कारभाराकडे जास्त जास्त जाऊं लागलें व आमच्या सांप्रतच्या परिस्थितीची तुलना आम्ही मोंगलाईतील आपल्या बांध-वांशीं करूं लागलों. मजप्रमाणें जे कोणी हैद्राबाद संस्थानांत स्वतः जाऊन परिस्थिति पाहून आले त्यांना हैद्राबाद संस्थानांतील प्रजेची व त्यांतल्या त्यांत

हिंदू प्रजेची कींव आल्याखेरीज राहिली नाहीं, म्हणूनच वऱ्हाडांतील हिंदू प्रजेनें हैद्राबादी अंमलाखालीं जाण्याचें एकमतानें नाकारलें. परंतु याविषयीं मी पुढें बोलणारच आहें.

वास्तविक ज्यांच्या हितसंबंधांचा विचार करण्याकरितां आज आपण येथें जमलों आहों त्याच प्रजेच्या संस्थानांत ही सभा न भरतां मुंबईसारख्या दूरच्या व त्रयस्थ ठिकाणीं ही सभा भरविण्याचा ' ' यावा याबद्दल फार वाईट वाटतें. ही सभा संस्थानांत भरविण्याकरितां राजकीय पुढाऱ्यांनीं व " हैद्राबाद स्टेट रिफॉर्म असोसिएशन " नें केलेल्या सर्व प्रयत्नांस वाटाण्याच्या अक्षता लावण्यांत येऊन परिषद् संस्थानांत भरविण्याची परवानगी देण्यांत आली नाहीं. त्यामुळें संस्थानी प्रजेपैकीं पुष्कळ प्रमुख लोकांना या परिषदेंत भाग घेतां येणार नाहीं व आपणांपैकीं ज्यांचा संस्थानाशीं प्रत्यक्ष कांहींच संबंध नाहीं अशांना " बाहेरून आलेले चळवळे " असा शिक्का मारण्यांत येईल. परंतु या दूषणांस न जुमानतां आपणांस आपल्या संस्थानी बांधवां- विषयींचें कर्तव्य बजावलें पाहिजे.

हैद्राबाद संस्थान या नांवानें ओळखला जाणारा सर्व मुलूख मुख्यतः हिंदूंचाच आहे. तेथील सर्व समाज हिंदू संस्कृतीच्या भक्कम पायावरच उभारलेला आहे. हिंदू व बुद्ध संस्कृतीच्या संमिश्र प्रतिमा ज्या वेरूळच्या व अजिंठ्याच्या लेणी, घृष्णेश्वर व नागनाथ यांचीं मंदिरें, संस्थानांतील जमीनीस पाणी पुर- विणारी पवित्र गोदावरी, चालुक्य व इतर मोठमोठ्या राजवंशांची राजधानी कल्याण, प्राचीन संस्कृत विद्येचें पीठ व शालिवान राजकुलाची राजधानी पैठण ( अथवा प्रतिष्ठान ) दक्षिणेंतील अखेरच्या हिंदू राजांचीं स्मारकें म्हणजे देव- गिरि व विजयानगर, देवी भवानीचें स्थान तुळजापूर—हें सर्व याच मुलखांत आहे. ज्ञानेश्वर, एकनाथ, नामदेव, जनार्दनस्वामी, केशवस्वामी आदिकरून महाराष्ट्रांतील असंख्य संतांचें वास्तव्य याच मुलखांत झालें व तेथेंच त्यांनीं हिंदु तत्त्वज्ञान व हिंदु नीतिशास्त्राचा प्रसार केला. लिंगायत व महानुभाव पंथांचें धार्मिक पुनरुज्जीवन याच ठिकाणीं झालें. या मुलखांतील लोकसंख्या शेंकडा ९० हिंदु व सदृशधर्मीय लोकांची असून राहिलेली शेंकडा १० मुसलमानांची आहे. सुमारें ६०० वर्षांपासून हा मुलूख मुसलमानी अमलाखालीं असून,

अगदीं आरंभीं झालेले धर्मवेडाचे स्फोट सोडून दिले तर धार्मिक असहिष्णुता व धार्मिक छळ यांपासून बहुधा अलिप्त आहे. आरंभींची बंडाळी सोडून दिली तर या मुलखांतील मुसलमानी राज्यकर्त्यांनीं आपल्या हिंदु प्रजेस दयेनें व बऱ्याच निःपक्षपातानें वागविलें असें दिसून येतें. अधिकाराच्या व जबाबदारीच्या जागा हिंदूंनां देण्यांत येत असत व निजामाचे हिंदू नोकरांनीं, मराठ्यांच्या वर्चस्वाच्या कठिणकाळांत देखील निजामाशीं इमानी राहून निजामाच्या तख्ताचें रक्षण केलें अशी इतिहासाची साक्ष आहे. एकाकडे एक जातें असें म्हणतात, परंतु मराठे सेनापति व मुत्सद्दी यांनीं निजामाची नोकरी इमानानें केली व आपल्या आंगची सर्व करामत व वजन निजामाकरितां खर्ची घातलें. निंबाळकर, जाधव, रायरायान, नेमीवंत इत्यादि निजामी राज्यांतील अनेक हिंदू जहागीरदार व इनामदार घराणीं याच इतिहासाची साक्ष पटवितात.

भाषेच्या दृष्टीनें या मुलखाचे मुख्यतः दोन विभाग पडतात. एक मराठवाडी व दुसरा तेलंगण. एक मोठा भाग कानडी भाषा बोलणाऱ्या लोकांचाही आहे. प्रमाण पाडावयाचें झाल्यास एक हजार लोकसंख्येस ४८२ तेलगू, २६४ मराठी, १२३ कानडी व १०४ उर्दू भाषा बोलणारे असें पडतें. यावरून दिसून येईल कीं या राज्यांत तेलगू व मराठी ह्याच दोन मुख्य भाषा आहेत. उर्दू ही फक्त $\frac{१}{१०}$ लोकसंख्येची भाषा असून मुख्यत्वेंकरून शहरांतच प्रचलित आहे. तेलगू व मराठी या दोन्हीही सुसंस्कृत भाषा असून वाङ्मयाचे दृष्टीनें हिंदुस्थानांतील कोणत्याही प्रचलित भाषेशी तुलना केल्यास कमी पडणार नाहींत हें सर्वांस माहीतच आहे.

हैद्राबाद संस्थानचा गेल्या शंभर वर्षांचा इतिहास म्हणजे सांपत्तिक दृष्टीनें व राज्यकारभाराच्या दृष्टीनें निव्वळ अंधार आहे. संस्थानास भयंकर कर्ज झालेलें; अशा स्थितींत जो सर्वांत जास्त पैसे देईल त्यास मुलखाचा तुकडा तोडून द्यावयाचा; नंतर अर्थातच त्यानीं गरीब रयतेपासून पैसे पिळून काढावे; जमीनमहसुलाचा कोठेंही कायदा नाहीं; अरब व रोहिले लोक, शेळ्यांवर लांडगे तुटून पडावे, त्याप्रमाणें गरीब प्रजाजनांना लुटीत; राज्यकर्त्यांना राज्य चालविण्याची अक्कल नसावयाची; मंत्री जरी चांगले हुषार लोक असत तरी अंदाधुंदी व लांचखाऊपणामुळें टाकाऊ बनले. राज्यपद्धति वळणावर आणणें त्यांच्या सामर्थ्याबाहेर होतें. अशा स्थितींत बरीच सुधारणा घडवून आणण्याचें श्रेय सर चार्लस मेटकाफ

च्या धोरणी मुत्सद्याच्या निष्काम प्रयत्नांस दिलें पाहिजे. त्यानें राज्यकारभारांत पुष्कळ सुधारणा घडवून आणल्या. त्यानें जवळजवळ सर्व कारभार आपल्या हातींच घेतला व सिव्हिल सर्व्हिसमधील पुष्कळ युरोपियन अधिकाऱ्यांना संस्थानांत आणून राज्यकारभारांत पुष्कळ सुधारणा घडवून आणली. सन १८७५ सालीं सर सालरजंग यानीं पुन्या केलेल्या जमीनधारापद्धतीचा पाया त्यानेंच घातला. संस्थानच्या आर्थिक स्थितींत त्यानें सुधारणा करण्याचे पुष्कळ प्रयत्न केले व त्यामुळें त्यास पामर कंपनीशीं झगडादेखील करावा लागला. परंतु नंतर संस्थानच्या कारभारांत ढवळाढवळ न करण्याचें धोरण लॉर्ड विल्यम् बेंटिंक यानें सुरू केलें, त्यामुळें ही सुधारणा थांबली व राज्यव्यवस्थेंत पूर्वीप्रमाणें पुन्हां गोंधळ सुरू झाला. सर सालरजंग यानीं राज्यसूत्रें हातीं घेतल्यानंतर कारभारांत पुन्हा सुधारणा होऊं लागली व सन १८८३ सालांत सर सालरजंग यांचा मृत्यू होईपर्यंत ती तशीच चालली. पुन्हां जुना प्रकार व अंदाधुदी सुरू झाली ती मरहूम निजामसाहेब यांच्या मृत्यूपर्यंत चालूच होती असें म्हणण्यास हरकत नाहीं.

मरहूम निझामसाहेबांची स्मृति प्रजाजनांत अद्याप जागृत आहे, याचें कारण ते फार उदार, धार्मिक मनाचे होते व त्यांचे जवळ हिंदू व मुसलमान असा भेद नसे. राज्यकारभार जरी मुख्यतः त्या काळीं देखील मुसलमानांच्याच हातीं होता तरी स्वतः निजामसाहेब या भेदापासून अलिप्त होते व पुष्कळ महत्त्वाच्या जागांवर हिंदू अधिकारी होते.

परंतु सध्यांचे निजामसाहेब मीर उस्मान अल्लीखान हे गादीवर येतांच रंग बदलला. निजामसाहेबांचे अंगीं उत्साह व बुद्धिमत्ता हीं भरपूर आहेत; परंतु त्यांचा सर्वदा दुरुपयोगच होत आहे. आधुनिक पद्धतीनें शिक्षित असून राज्यकारभाराच्या प्रत्येक बाबींत स्वतः लक्ष घालीत असल्याकारणानें त्यांनीं संस्थानच्या सांपत्तिक स्थितींत पुष्कळ सुधारणा घडवून आणली आहे व राज्यकारभारांत पुष्कळ सुशिक्षित लोकांचा भरणा मुख्यतः अलीगडहून केला आहे. अलीगडचें धार्मिक वारें शिरल्यामुळें इस्लामी धर्म व संस्कृति यांचा प्रसार करण्याच्या तरुणपणच्या हौसेला दुजोरा मिळाल्यासारखेंच झालें व हिंदू म्हणून जें कांहीं असेल त्याचा नायनाट करण्याचा पद्धतशीर प्रयत्न सुरू झालेला दिसून येतो. एकामागून एक हिंदू अधिकारी काढून टाकण्यांत आले अगर ज्या ज्या

वेळीं हिंदूंच्या जागा रिकाम्या पडल्या त्या त्या वेळीं मुसलमानांच्या नेमणुका करण्यांत आल्या. उस्मानिया युनिव्हर्सिटी ही एका विशिष्ट धर्माचीच आहे. तेलगू व मराठी या प्रमुख देशी भाषांपेक्षां उर्दूच शिकण्याची सक्ती करणें व तिलाच महत्त्व देणें, तेलगू व मराठी शाळांना मदत न करणें, इतकेंच काय परंतु गांवांचीं पुरातन हिंदू नांवें बदलून मुसलमानी नांवें ठेवणें वगैरे गोष्टी वरील विधानास पुष्टी देतात. हीच जातिविशिष्ट भावना खालच्या अधिकाऱ्यांतही दिसते व मुसलमानांविरुद्ध हिंदूस न्याय मिळणें अशक्य झालें आहे. परदेशांत पाठविण्यांत येणाऱ्या विद्यार्थ्यांस शिष्यवृत्त्या देण्याच्या बाबतींत देखील हाच भेद दिसून येतो.

परंतु पुष्कळ प्रकार असे आहेत कीं त्यांचा त्रास हिंदू व मुसलमान या दोघांसही होतो व त्यांचा विचार आपण पहिल्यानें करूं. मालमत्तेच्या हक्कासंबंधीं निजामसाहेबांस काडीमात्र आदर नाहीं असें दिसतें. कायदेशीर चौकशीचा नुसता देखावा देखील न करितां त्यांनीं आपल्या पुष्कळ सरदारांच्या व जहागिरदारांच्या मालमत्ता काढून टाकल्या आहेत व त्यांना कंगाल बनविले आहेत. अशीं पुष्कळ उदाहरणें वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध झालीं असून शिवाय पुष्कळ घडलीं असलीं पाहिजेत. हा जाच हिंदू व मुसलमान दोघांसही सारखाच आहे. किंबहुना मुसलमान जहागिरदारांची संख्या जास्त असल्यामुळें मुसलमानास जास्त जाणवला असल्याचा संभव आहे. जेथें जेथें कांहींही खुसपट काढून अडचणी उपस्थित करणें शक्य होतें तेथें तेथें निझामसाहेबांनीं संधि वाया जाऊं दिली नाहीं. हिंदूधर्मशास्त्रांत व कायद्यांत दत्तक घेण्याचा जो हक्क हिंदूंना देण्यांत आला आहे तो हक्क देखील हिरावून घेण्यांत आला असून राजेसाहेबांच्या परवानगीशिवाय दत्तक घेतां येत नाहीं. याचा फायदा घेऊन इस्टेटी सरकारजमा करण्यांत येतात अगर मोठाल्या रकमा नजर घेण्यांत येऊन सदरहू परवानगी देण्यांत येते.

## नजराणा पद्धति.

नजराण्याच्या पद्धतीसंबंधीं आतांपावेतों पुष्कळच गवगवा झालेला आहे. नजराण्याच्या साळसूद नांवाखालीं मोठमोठ्या रकमा उकळण्यांत येतात. क्वचित् शुभ प्रसंगीं लहानसहान वस्तु नजराण्यादाखल स्वीकारण्याची जुनी पद्धत होती; पण द्रव्य जमा करण्याचा हा मार्ग नव्हता. मोठमोठ्या लोकांची अशी पद्धत

आहे कीं नजराणा म्हणून आलेल्या वस्तूंस स्वीकारादाखल नुसता स्पर्श करावयाचा व आलेल्यापेक्षां जास्त किंमतीच्या वस्तू नजराणा देणाऱ्यास परत बक्षीस द्यावयाच्या. परंतु ह्या संस्थानांत खालच्या अधिकाऱ्यांकडून नजराण्याच्या नांवाखालीं सरकारी कराप्रमाणें मोठमोठ्या रकमा गोळा करण्याचा पद्धतशीर प्रयत्न सुरू असतो व जेथें जेथें निजामसाहेबांचा तळ असेल तेथें तेथें शेंकडों लोकांस जमा करून त्यांचेकडून नियमित पैसा उकळण्यांत येतो. हा सर्व पैसा संस्थानच्या खजिन्यांत जात नसून निजामच्या खाजगी तिजोरींत जातो व प्रजेस कोणत्याही रीतीनें त्याचा परत फायदा मिळत नाहीं. कांहीं काळापूर्वी वऱ्हाडचा मुलूख इंग्रजसरकारापासून परत मिळविण्यासाठीं "चंदा" या नांवाखालीं पैसे उकळण्यांत आले. या जबरदस्तीच्या व बेकायदेशीर "चंदा" बद्दल संस्थानांतील मूक अशा लाखों प्रजाजनांनीं सुद्धां एवढा मोठा गिल्ला केला कीं अखेर हे जमा केलेले सर्व पैसे ज्याचे त्यास परत करण्यांत यावे असें फर्मान निघालें. हें बहुधा संस्थानाबाहेरून आलेल्या दाबामुळें झालें असलें पाहिजे. ह्या जमा केलेल्या रकमेपैकीं रयतेच्या हातीं परत किती रुपये पडले हें सांगतां येणें कठीण आहे. औरंगाबाद व जालना येथें निजामसाहेबांची स्वारी नुकतीच आली होती. त्यावेळीं हुजूराच्या दर्शनाचा दर प्रारंभीं १०० रुपये असून उतरत उतरत अखेरीस एक रुपयावर आला होता. हुजूरच्या दर्शनाकरितां लोक जमवून आणण्याचें काम सरकारी अधिकाऱ्यांकडून एकसारखें सुरू होतें असें प्रत्यक्ष पाहून आलेले लोक सांगतात.

## हिंदी लोकांचें हिंदी संस्थानिकांवरील स्वाभाविक प्रेम.

सर्व हिंदी लोकांना हिंदी संस्थानिकांसंबंधीं एक प्रकारचा आदर व आपलेपणा वाटत असतो व निजामसरकारची प्रजा या नियमास कांहीं अपवाद नाहीं. ब्रिटिश अंमलाखालीं असणाऱ्या हिंदी प्रजेस देखील संस्थानिकांविषयीं आदरयुक्त प्रेम वाटतें व संस्थानिकांचा राज्यकारभार फारच अंदाधुंदीचा झाल्याखेरीज ते सहसा त्याचा बोभाटा करीत नाहींत. परंतु पुष्कळशा हिंदी संस्थानिकांना राज्यकारभाराच्या आधुनिक कल्पनांचा गंधही लागला नाहीं. ते आपल्या राजनिष्ठ प्रजेचा पैसा वाटेल तसा उधळीत असून ज्या प्रजेच्या कल्याणाची जबाबदारी त्यांचेवर आहे तिच्या हिताविरुद्ध दुसऱ्या कामांतसुद्धां त्याचा व्यय करीत

आहेत. बडोद्याचे महाराज व इतर संस्थानिक यांच्या युरोपच्या सफरी व काश्मीर व इंदूर येथील संस्थानिकांकडून घडलेले अनीतीचे प्रकार पाहिले म्हणजे या म्हणण्यास पुष्टी येते. संस्थानांतून कररूपानें वसूल केलेला पैसा हा राजाची खाजगी मालमत्ता नसते; परंतु पुष्कळसे हिंदी संस्थानिक हें साधें तत्व देखील विसरलेले दिसतात. अर्थातच ह्या नियमास म्हैसूरसारखे कांहीं सामान्य अपवाद आहेतच; तसेंच प्रजेचा पैसा प्रजेच्याच हितसंबंधाविरुद्ध–मग ते हितसंबंध धार्मिक असोत अगर भौतिक असोत–खर्च करितां कामा नये. निजामसाहेबांनीं खिलाफत, अलीगड युनिव्हर्सिटी व इतर अनेक मुसलमानी संस्थांना जशा देणग्या दिल्या तशाच जर हिंदू युनिव्हर्सिटी व इतर हिंदू संस्थांना दिल्या असत्या तर दूषणास जागा राहिली नसती. निजामसरकारचा $\frac{९}{१०}$ करभार हिंदूधर्मीय रयतेपासून येतो ही गोष्ट ध्यानांत ठेवली पाहिजे. म्हणूनच हिंदुधार्मांच्या हिताविरुद्ध सरकारी पैसा मुळींच खर्च होतां कामा नये.

## सरकारी नोकऱ्या.

राज्यकारभारांतील सरकारी नोकऱ्या प्रजेंतील निरनिराळ्या लोकांस त्यांच्या लायकीप्रमाणें आपापल्या संख्येच्या मानानें मिळाव्यात हा प्रजेचा नैसर्गिक हक्क आहे. ह्यापासून पैशाच्या दृष्टीनें जो फायदा व्हावयाचा तो सर्व जातींस सारखा मिळून राज्यकारभार निःपक्षपातीपणानें व न्यायीपणानें चालूं शकतो. हैद्राबाद संस्थानाची " सिव्हिल लिस्ट " पाहिली तर आपणांस असें दिसून येईल कीं सर्व जागांवरून हिंदूंना हळू हळू काढून टाकण्यांत येत असून लहानमोठ्या सर्व सरकारी जागांवर लायक हिंदू मिळत असतांना मुसलमानांचीच भरती होत आहे. राजा या नात्यानें असा पक्षपात करणें किती गैर आहे व यामुळें हिंदु प्रजेंत किती असंतोष होत असेल याची कल्पना प्रत्येकास करतां येईल.

## धार्मिक असहिष्णुता.

हिंदूमुसलमानांचे हितसंबंध व भावना यांचा जेव्हां जेव्हां प्रश्न उत्पन्न होतो, तेव्हां तेव्हां निजामाचे राज्यांतील हिंदू प्रजेस न्याय मिळणें अशक्य होतें. स्वतः निजामसाहेब व त्यांचे मुसलमान अधिकारी यांचे ठिकाणीं परधर्माविषयीं अस-

हिष्णुता व स्वधर्मवेड इतकीं आहेत कीं परधर्मी प्रजेवर राज्य करण्यास ते सर्वथा नालायक आहेत. हिंदूंच्या वाद्यांस बंदी ( फर्मान १७ आबान १३२६ ), मोहरमकरितां दसऱ्यासारखा महत्त्वाचा सण थांबवून पुढें ढकलणें, गणपतीच्या स्थापना व मिरवणुकी यांना हरकत घेणें, हिंदू देवालयें बांधणें व त्यावर कलश चढवून त्यांची डागडुजीची मनाई करणें यांत दाखविण्यांत येणारा विरोधभाव, गाईच्या चित्रांवर कुराणांतील वाक्यें लिहिलीं म्हणूनच तीं चित्रें सरकारजमा करणें वगैरे कृत्यें या धर्मवेडाची साक्ष देतात.

## हिंदू लोकसंख्येचा क्षय.

हैद्राबाद संस्थानांतील हिंदूंची लोकसंख्या झपाट्यानें कमी कमी होत असून तितक्याच झपाट्यानें मुसलमान लोकसंख्या वाढत आहे. गेल्या चाळीस वर्षांत हिंदूंचें सर्व लोकसंख्येशीं प्रमाण शेंकडा १५ नीं कमी झालें आहे. लोकसंख्या अशा रीतीनें कमी होण्यास कारणें म्हणजे शेजारच्या प्रांतांत लोकांनीं रहावयास जाणें, बेकारी व हिंदूधर्मांतून दुसऱ्या धर्मांत परिवर्तन हीं आहेत. बेकार लोकांच्या पोटापाण्याची सोय करणें व खालच्या दर्जाच्या लोकांची सामाजिक स्थिति सुधारण्याचा प्रयत्न करणें हींसुद्धां सरकारचींच कामें आहेत. वरच्या दर्जाच्या हिंदू जातींच्या कर्तृत्वास संस्थानांत वाव नसल्यामुळें ते शेजारच्या मुलखांत रहावयास गेल्याचीं पुष्कळ उदाहरणें आहेत.

## गुलबर्गा येथील दंगा.

हिंदू लोकांनीं गजबजलेल्या गुलबर्गा शहरांतील दंगे या पक्षपाती धोरणामुळेंच होऊं शकले. गुलबर्गा येथील मुसलमान लोकांची अशी खात्री असली पाहिजे कीं हिंदू लोक व त्यांचीं धार्मिक ठिकाणें यांजवर आपण कांहींही अत्याचार केले तरी निझामसरकारकडून त्यांस प्रत्यक्ष संमती न मिळाली तरी आपणांवर गैरमर्जी तरी खास होणार नाहीं. या बाबतींत कायदेशीर चौकशीचा निव्वळ फार्स करण्यांत आला. चौकशींत गुन्हेगार ठरलेल्यांना शिक्षा न देतां व कमिशनचा रिपोर्ट प्रसिद्ध न करितां एका फर्मानद्वारें त्यांना सोडण्यांत आलें. या सर्व प्रकारांवरून गुन्हेगार लोकांस शासन करण्याची निजामाची इच्छाच

नव्हती असें स्पष्ट दिसतें. यामुळें गुन्हेगार मुसलमानांस हिंदूंवर अत्याचार करण्यास उत्तेजनच दिलें गेलें आहे.

## फर्मानांचा कारभार.

निजामसरकार जीं फर्मानें काढीत असतात तीं एखादें सरकारी धोरण जाहीर करण्याकरितां असतात असें नाहीं. स्वतः निजामसाहेबांनीं एखाद्या लहानसहान बाबींत लक्ष घालावें व फर्मान काढावें असें चालतें. यावरून राज्यकारभाराचा एककल्लीपणा दिसून येईल. या फर्मानांच्या द्वारें न्यायकोर्टांनीं अगर मुद्दाम नेमलेल्या कमिशनांनीं दिलेल्या निकालांत ढवळाढवळ करण्यांत येते व स्वतः राजेसाहेबांची मर्जी अगर विक्षिप्त कल्पना हाच कायदा बनतो. एकसत्तात्मक राज्यपद्धतीचे सर्व दोष हैद्राबादच्या राज्यकारभारांत एकवटलेले असून तिचा गुण मात्र एकही नाहीं. त्यामुळें हैद्राबाद संस्थान कोणाही स्वाभिमानी पुरुषास राहण्यास योग्य राहिलें नाहीं. हायकोर्टापर्यंत सर्व न्यायकोर्टें असतांना मामुली खानगी मुकदम्यांत सुद्धा एखादें फर्मान मध्येंच सुटतें व त्या योगानें न्यायकोर्टांची इज्जत कमी होते व अन्यायही होतात. कारण कोणीहि उठावें व मोठासा नजराणा हुजूरास देऊन आपल्या तर्फे मुकदम्याचा निकाल करून घेऊन मामुली न्यायकोर्टांचा ठराव व कायदा धाब्यावर बसवावा असा प्रकार चालतो. शेट चांदमल यांच्या दिवाणी दाव्यामध्यें मुदतीचा कायदा गुंडाळून ठेऊन डिक्री दिली गेली ही गोष्ट मद्रास हायकोर्टांत घडलेल्या हास्यकारक प्रकारावरून दिसून येईल. असले किती अन्यायी प्रकार संस्थानांत होत असतील याची आपण कल्पना करावी.

## सभा, वर्तमानपत्रें आणि व्यक्ति यांना बंदी.

मॅग्नाचार्टा व हेबीअॅस कार्पस यांसारखे व्यक्तिमात्राच्या स्वातंत्र्यास कायदेशीर मान्यता देणारे कायदे नसल्यानें भाषण, लेखन अथवा संघटनाचें स्वातंत्र्य निजामशाहींत कोठेंच आढळून येत नाहीं. अधिकाऱ्यांच्या परवानगीवांचून राजकीय, सामाजिक अथवा धार्मिक कोणत्याही सभेला निजामसाहेबांच्या फर्मानानें बंदी केली आहे आणि परवानगी मागितल्यास ती मिळण्याची आशाच नको. हैद्राबाद स्टेट रिफॉर्म असोसिएशननें संस्थानी सुधारणांचा मसुदा तयार करण्याकरितां संस्थाननेंच नेमलेल्या कमिटीला तिच्या कामांत मदत करण्याचा हेतु

आपल्यासमोर ठेवला असतांना देखील, त्यांना आपली परिषद भरविण्याला मुळींच परवानगी देण्यांत आली नाहीं. बॅ. जिना व पंडित मालवीय यांच्यासारख्या पुढाऱ्यांना निजामच्या हद्दींत पाऊल ठेवण्याची बंदी करण्यात येते. पण हसन निजामी व त्यांच्याच मालिकेंतले लोक यांना मात्र येण्याला मोकळीकच नव्हे तर पैसाही मिळतो. बंदी झालेल्या वर्तमानपत्रांची लांब यादी पाहिली तर निजामसाहेबांना उघड टीका रुचत नाहीं व आपल्या कारभाराविरुद्ध ब्रही काढलेला खपत नाहीं हें सहज दिसून येतें. बरें राज्यांतल्या राज्यांतसुद्धां वर्तमानपत्रांना लेखनस्वातंत्र्य नाहीं व भाषणस्वातंत्र्याला सुद्धां मज्जाव आहे. बाहेरून मदत दिली गेली तर ती बाहेरच्या लोकांची लुडबुड ठरून तिच्याही माथीं बंदीचा हुकूम येणेंप्रमाणें सुटतो. पद्धतशीर आणि सुसंघटित अशी दडपशाही तेथें सुरू आहे. लोक अगदीं भीतिग्रस्त झाल्यामुळें खासगी रीतीनें बोलण्यास सुद्धां धजत नाहींत. योग्य न्यायकोर्टांत चौकशी झाल्याशिवाय कोणास बंदींत टाकतां येणार नाहीं अगर भाषणास व लेखास बंदी होणार नाहीं असा स्पष्ट कायदा झाला पाहिजे व त्यास ब्रिटिश सरकारचा आश्रय पाहिजे.

## लांचलुचपती.

राज्यांतील नोकरशाही लांचलुचपतीला सोकावलेली अशीच बहुधा आहे आणि ही गोष्ट निजामसाहेबांनींच आपल्या एका फर्मानांत कबूलसुद्धां केली आहे. परंतु खुद्द निजामसाहेबांचा द्रव्यलोभ व राज्यकाभार चालविण्याची एकंदर पद्धत यांमुळें हा लांचलुचपतीचा निंद्य प्रकार निर्मूल होणें तर दूरच, परंतु त्यास उलट उत्तेजन मिळतें. निजामी राज्यांत असें एकहि खातें सापडणार नाहीं कीं त्यांत अत्यंत लांचलुचपत व दिरंगाई नाहीं. करोडगिरीचें खातें तर या कामांत फारच प्रसिद्ध आहे.

## उपाय—जबाबदार राज्यपद्धतीची एक योजना.

निजामसाहेबांच्या एकतंत्री, लहरी व अनियंत्रित राज्याकारभाराच्या कृत्यांची पूर्ण जंत्री देणें हा आमचा प्रधान हेतु नसून दुरुस्तीचा प्रयत्न करणें हा आहे. निजामशाहीची आधींच आमूलाग्र दोषपूर्ण राज्यव्यवस्था, सध्यांच्या राज्यकर्त्यांच्या लहरीपणामुळें व धार्मिक दुराग्रहामुळें अधिकच दूषित झाली आहे. ही परिस्थिति सुधारण्याचा एकच उपाय म्हणजे ज्यांत अल्पसंख्याकांचे हित-

संबंध राखण्याची योग्य ती खबरदारी घेतलेली आहे व निरनिराळ्या समाजाच्या संख्याबलाप्रमाणें प्रमाणशीर अशी प्रातिनिधिक निवडणुकीची पद्धत पत्करलेली आहे, अशी जबाबदार राज्यपद्धति अमलांत आणणें हा होय. एकदां खुषींत येऊन ता. १४ जमादिलावल १३३८ या दिवशीं निजामसाहेबांनीं एक फर्मान काढून अशी इच्छा प्रदर्शित केली कीं लेजिस्लेटिव्ह कौन्सिलची व एकंदर राज्य-यंत्राची वाढ करून सुधारणा करावी व याकरितां त्यांनीं सदर इ. आझम सर अली इमाम यांना एक योजना तयार करण्याचा हुकूम दिला. ही योजना पुढील तत्वाप्रमाणें करण्याची होती.

( अ ) निवडणुकीच्या तत्वाला मान्यता.

( ब ) प्रत्यक्ष मतदानाची पद्धति अमलांत आणणें.

( क ) सर्व महत्त्वाचे वर्ग व हितसंबंध यांस प्रतिनिधित्वाचा हक्क.

( ड ) अल्पसंख्याकांच्या हितसंबंधांचें रक्षण.

मताचा हक्क, सरकारी नोकरांचें लोकनियुक्त व बिनसरकारी प्रतिनिधींशीं प्रमाण आणि कौन्सिलचे हक्क व कामकाज यांविषयीं बारीक गोष्टी ह्या बाबती नक्की ठरविण्यांत याव्या.

या फर्मानाप्रमाणें, राय बालमुकुंद बी. ए. यांनीं एक व चार सरकारी अधिकाऱ्यांच्या कमिटीनें एक अशा दोन योजना तयार केल्या व त्या निजामसाहेबांस पुष्कळ दिवसांपूर्वीं सादर करण्यांत आल्या. परंतु गेल्या तीन वर्षांत त्या योजना अमलांत आणण्याचा कांहींच प्रयत्न करण्यांत आला नाहीं व तें फर्मान मनापासून काढलें होतें कीं गंमत म्हणून काढलें होतें अशी शंका लोकांस वाटूं लागली आहे. त्याबाबतींत यापुढें कांहींच न करण्याचा निजामसाहेबांचा बेत दिसतो. वऱ्हाडच्या लोकांना भुलविण्याचा हा एक प्रयत्न असावा, कारण त्यांना पूर्ण प्रांतिक स्वायत्ततेचीं वचनें देण्यांत आलीं होतीं व त्याचा आरंभ म्हणून अशा कांहीं तरी योजनेची हूल उठविणें अवश्य वाटलें असावें. परंतु हें वचन पूर्ण करावयास भाग पाडण्याचा असा एकही कायदेशीर मार्ग आपणाजवळ नाहीं आणि कोणत्याही अंतर्गत अथवा बाह्य दडपणाला निजामसाहेब भीक घालण्याचा संभव नाहीं. आणि म्हणूनच हैद्राबाद–सुधारणा योजनेचा कलमवार

विचार करण्यांत अर्थ नाहीं. परंतु कोणत्याही अशा योजनेंत साधारणपणें पुढील गोष्टींचा समावेश झालाच पाहिजे एवढें मात्र नमूद केलें पाहिजेः—

( १ ) एकदां केलेल्या सुधारणा कायद्यांत कोणतीही ढवळाढवळ करण्याचा अधिकार निजामसाहेबांस नसावा.

( २ ) तो कायदा १९१९ च्या हिंदुस्थान सरकारच्या सुधारणा कायद्याच्या धर्तीवर असावा.

( ३ ) कायद्यानें स्थापिलेल्या राज्ययंत्रांत ( Constitution ) फेरफार करण्याचा अधिकार कायदेमंडळाकडे ठेवण्यांत यावा. त्यांस निजामसाहेबांची संमती आवश्यक असावी; परंतु अशी संमती साधारणपणें नेहमीं मिळाली पाहिजे असें मामुली धोरण असावें.

( ४ ) संस्थानांतील जमाखर्च व अंमलबजावणीखातें यांवर कायदेमंडळाचा पूर्ण दाब असावा. कायदे करण्याचा व प्रश्न विचारण्याचा हक्क सदहूप्रमाणेंच असावा.

( ५ ) कायदे कौन्सिलचे अध्यक्ष व उपाध्यक्ष हे निवडलेले बिनसरकारी सभासद असावे आणि दिवाण हेहि निवडलेले असून कौन्सिलला जबाबदार असावेत. सैन्य व परराष्ट्रखातें याशिवाय सर्व खातीं दिवाणांकडे सोंपविण्यांत यावीं.

( ६ ) जहागीर व सर्फ-इ-खास जमीनीकरितां एक कुळांचा कायदा असावा. जमीनींसंबंधी कायम मालकी व योग्य धारापद्धति ठरविण्यांत यावी आणि ह्या गोष्टी जहागीरदारांवर सोंपवूं नयेत.

( ७ ) कायदेमंडळानें संमती न दिलेले कर बंद करण्यांत यावे.

( ८ ) व्यक्तिस्वातंत्र्याचा व भाषणस्वातंत्र्याचा पूर्ण हक्क देणारा कायदा असावा व त्याच्या ( अंमलबजावणीची ) हमी इंग्रज सरकारनें घ्यावी.

( ९ ) संख्याबळाप्रमाणें मुसलमानांना तूर्त स्वतंत्र प्रतिनिधि द्यावेत पण मतदारसंघ दोनही समाजांचा मिळून एकच असावा.

(१०) अंमलबजावणी खातें कायदेमंडळाला जबाबदार रहावें.

आपल्या मार्गांत कितीही अडचणी आल्या तरी या राजकीय सुधारणा सर्व कायदेशीर उपायांनीं मिळविण्याचा आपण आटोकाट प्रयत्न केला पाहिजे. या प्रयत्नांतील पहिली पायरी म्हणून ठरावाच्या व अर्जाच्या रूपानें आपण आपली या बाबतींतील उत्कट इच्छा निजामसाहेबांच्या कानावर घातली पाहिजे. म्हणजे त्यांचा यासंबंधीं कल आपल्या नजरेस येईल.

## साम्राज्यसरकारची हुकमत.

पूर्वी म्हटल्याप्रमाणें हें सर्व निजामांच्या इच्छेवर अवलंबून आहे. राज्यकारभारांतील तीव्र दोष काढून टाकण्याचा आजचा उपाय म्हणजे ब्रिटिश सरकारकडे अपील करणें हा होय. या बाबतींत ब्रिटिश सरकावर मोठी जबाबदारी आहे. एतद्देशीय संस्थानांचें आंतील व बाहेरील शत्रूपासून रक्षण करण्याची हमी ब्रिटिश सरकारनें घेतली आहे. प्रजेमध्यें असंतोष उत्पन्न होऊन संस्थानांत बंडाळी उत्पन्न झाल्यास, ( संस्थानिकाच्या स्वतःच्या कृत्यांनींच बंडाळी उत्पन्न झाली असली तरी, ) संस्थानिकाचें रक्षण करण्याची जबाबदारी त्यांनीं आपल्या अंगावर घेतली आहे. जुलमी राजाच्या बेलगामी अंदाधुंदीस आळा घालण्याचा प्रजेस एकच मार्ग निसर्गानें मोकळा ठेवला आहे. तो म्हणजे प्रजेच्या असंतोषामुळें राज्यकर्त्यांस वाटणारी असुरक्षितता हा होय. त्या मार्गानें देखील संस्थानच्या प्रजेस जातां येत नाहीं. स्वतंत्र देशांत राजा व प्रजा यांच्यांत भांडण सुरू झालें म्हणजे कोणीही त्रयस्थ एका पक्षास मदत करीत नसतो. ज्या त्या देशांतील लोकांनीं आपली राज्यपद्धति स्वसामर्थ्यानें ठरवून घ्यावी असा अंतर्राष्ट्रीय कायदा आहे. या शांततेच्या व नैसर्गिक क्रांतीनें पुष्कळ लोकसत्तात्मक राज्यें स्थापन झालीं आहेत. परंतु हिंदुस्थानांतील एतद्देशीय संस्थानिक व त्यांची प्रजा यांच्यांत तेढ सुरू झाल्यास हिंदुस्थान सरकारास असें स्वस्थ बसतां येणार नाहीं. ब्रिटिश सरकार ही सार्वभौम सत्ता असल्यामुळें संस्थानिकांचें आंतील व बाहेरील शत्रूंपासून रक्षण करण्याच्या जबाबदारीबरोबर प्रजेचा कारभार योग्य रीतीनें चालला आहे कीं नाहीं हें पहाण्याची जबाबदारी देखील त्यांचेवरच येऊन पडते. हैद्राबादच्या राज्यकारभारासंबंधींच्या वर दिलेल्या सर्व तक्रारी ब्रिटिश रेसिडेंट यांना समजल्या आहेत असें दिसतें व नुकतेंच पार्लमेंटमध्यें झालेल्या प्रश्नोत्तरावरून हिंदुस्थान सरकारही या बाबतींत बंदोबस्त करीत

असावें असें दिसतें. सार्वभौम सत्ता या नात्यानें संस्थानिकांच्या प्रजेच्या कल्याणाचे, ब्रिटिश सरकार हें "ट्रस्टी" आहेत. आणीबाणीच्या प्रसंगीं संस्थानच्या कारभारांत हात घालण्याचा अधिकार त्यांना असून, प्रसंगीं ते मार्गे घेणार नाहींत, असें पुष्कळ प्रसिद्ध मुत्सद्यांच्या उद्गारांवरून व मागील उदाहरणांवरून स्पष्ट दिसतें. दुःखाची गोष्ट एवढीच कीं पुष्कळ काळपर्यंत लाखों प्रजाजनांला अपमान व दुःखें यांशीं झगडत ठेवून ज्यावेळीं परमावधीची पायरी येते त्याच वेळीं सार्वभौम सरकार संस्थानाच्या कारभारांत हात घालतें.

स्वतंत्र वृत्तीच्या हिंदु अधिकाऱ्यांचें पुरेसें प्रमाण वरिष्ठ नोकऱ्यांतून होई-पर्यंत व दडपशाहीचा जाच थोडाफार कमी करण्याकरितां व राज्यकर्त्यांचा लहरीपणा आणि खालच्या दर्जाच्या नोकरांचा कमकुवतपणा व लांचलुचपती यांवर नियंत्रण ठेवण्याकरितां युरोपियन अधिकाऱ्यांचें दडपण संस्थानी अधि-काऱ्यांवर ठेवणें अवश्य आहे. ब्रिटिश हिंदुस्थानच्या अधिक स्वतंत्र वातावरणांत शिक्षण पावलेल्या हिंदु अधिकाऱ्यांचें प्रमाण ताबडतोब वाढविण्यांत आलें पाहिजे. स्वतंत्र बाण्याच्या अधिकाऱ्यांस नजीकच्या इंग्रजी मुलखांतून मागवून घ्यावें म्हणजे ते चोख व निःपक्षपाती राज्यकारभाराचें वळण संस्थानी लोकांस देतील आणि कांहीं दिवसांत संस्थानी लोकच यांत तरबेज होतील. लांचलुचप-तीचा प्रकार कडक उपाय योजून बंद केला पाहिजे. मुसलमान अधिकारी आपल्या जातभाईविषयीं पक्षपात व हिंदूबांधवांबद्दल द्वेषभाव दाखवीत असतील अशांना काढून त्यांचे जागीं निःपक्षपाती मुसलमानांची नेमणूक केली पाहिजे. संस्थानांत जन्म पावलेल्या हिंदु आणि मुसलमान दोघांनाही आपल्या संस्था-नची सेवा करितां येईल असें शिक्षण दिलें जावें आणि दोघांनाही संस्थानची नोकरी करण्याला सारखी संधी देण्यांत यावी. हा हेतु साध्य करण्याकरितां उदार मनाच्या युरोपिअन अधिकाऱ्यांच्या नेमणुकी मुख्य मुख्य जागीं कांहीं दिवस तरी कराव्या. मात्र त्यांनीं साम्राज्यसरकार आणि युरोपिअन अधिकारी यांच्याच हिताचें रक्षण न करितां संस्थानांतील हिंदु व मुसलमान दोघांच्याही हिताविषयीं दक्ष असलें पाहिजे.

संस्थानी प्रजेच्या पुढाऱ्यांचें, अथवा तें शक्य नसल्यास, इंग्रज मुलखांतील संस्थान सुधारणेंत लक्ष घालणाऱ्या व त्यास पाठिंबा देणाऱ्या लोकांचें एक शिष्टमंडळ बनवून त्यानें व्हाइसराय साहेबांची मुलाखत घ्यावी व एक चौकशी-

कमिशन नेमण्याची त्यांना विनंति करावी. त्या कमिशनसमोर आपली बाजू मांडण्याची प्रत्येक पक्षाला संधी देण्यांत यावी. त्या कमिशनची बैठक हैद्राबादे-बाहेर स्वतंत्र वातावरणांत व्हावी. कमिशननें संस्थानी कारभाराची सद्यःस्थिति व ती सुधारण्याचे उपाय याविषयीं संपूर्ण अहवाल लिहावा.

शेवटीं एक गोष्ट सांगावयाची राहिली आणि ती म्हणजे इंग्रजी मुलखांतील आमच्या मुसलमान बंधूंची वृत्ति अनेक दिवसांपासून हिंदु व मुसलमान हे आपसांत एकी घडवून आणून सर्वांना एकच अशा राष्ट्रीय भावनेचा विकास करण्याकरतां आटोकाट प्रयत्न करीत आहेत. प्रयत्नांत स्वार्थी व जातिधर्मविषयक द्वेषाच्या क्षोभाचें वारें मधून मधून शिरतच असतें. तरी उभय समाजांतील समंजस लोकांस हें पूर्णपणें कळून चुकलें आहे कीं दोन्ही समाजांचें अंतिम कल्याण आकुंचित वृत्ति टाकून उदार धोरण पत्करण्यांतच आहे. संस्थानांतील मुसलमानांनीं राजाच्या धार्मिक दुराग्रहाचा फायदा घेण्याच्या भानगडींत न पडतां आपल्या संस्थानांतील व शक्य तर बाहेरील हिंदुबांधवांस सुद्धां मदत करण्यास झटावें. ब्रिटिश हिंदुस्थान व संस्थानी हिंदुस्थान हे आतां फार दिवस एकमेकांपासून भिन्न राहूं शकत नाहींत. हैद्राबाद संस्थानांतील दुःखपीडित लोकांबद्दल सहानुभूति फार थोड्या मुसलमान पुढाऱ्यांनीं दाखविलेली आहे. हैद्राबादेंतील अंदाधुंदी चव्हाट्यावर खेचण्याचे प्रयत्न ज्या ज्या वेळेस होतात तेव्हां तेव्हां कांहीं अदूरदृष्टी लोकांची मजल, ‘ही चळवळ हिंदुलोकांनीं निजामाच्या विरुद्ध ते मुसलमान म्हणूनच निष्कारण उभारली आहे.’ असा आरोप करण्यापर्यंत गेली आहे. हिंदु राजेरजवाड्यांकरितां आम्हांला जसा आदर आहे तसाच मुसलमानी राजांबद्दलहि वाटतो. पण धार्मिक असहिष्णुतेची पराकाष्ठा झाली म्हणजे मात्र तिचा प्रतिकार करणें हें हिंदु व मुसलमान दोघांच्याही सारखेंच हिताचें असतें. लाहोरच्या निजामपरिषदेचे उद्गार, तिचा अलाहाबादचा प्रतिध्वनी आणि कांहीं मुसलमान पत्रांचे प्रलाप हे या जाति-द्वेषाच्या वातावरणांत रोज पहावयास सांपडतात. पण एक दिवस असाही उगवण्याची आशा करण्यास हरकत नाहीं कीं जेव्हां आमचे मुसलमानबंधू हिंदूंच्या हिताविषयीं स्वतःच्या हिताइतकीच दक्षता दाखवतील व हिंदूही मुसलमानांचे बाबतींत तसेंच करितील. मुसलमानांत यालाही सन्मान्य असे अपवाद आहेत व वरील दोष सरसहा सर्व मुसलमानांना लागू नाहींत. आम्ही सर्व हिंदू

व मुसलमान बांधवांना, हैद्राबादच्या प्रजेस त्यांच्या ह्या झगड्यांत साहाय्य करण्याची विनंति करितों.

सद्गृहस्थ हो! आपण आपल्या मागण्यांना निश्चित स्वरूप देऊन आपल्या इच्छा योग्य ठरावांच्या रूपानें मांडणार आहोंत. ज्यांना या परिस्थितीची अधिक माहिती आहे ते आपल्याला तीविषयीं जास्ती सांगतील. झगडा मोठा आहे. शुद्ध हेतूनें व निधड्या छातीनें आपण पुढें सरूं या.

माझें भाषण शांतपणें ऐकून घेतल्याबद्दल आपले आभार मानून आपण आतां परिषदेंतील प्रत्यक्ष विचारविनिमयास आरंभ करावा अशी मी आपणांस विनंति करितों.





**हिंदु सामाजिक परिषद, दक्षिण हैद्राबाद.**

डावीकडून उजवीकडे खुर्चीवर बसलेले:—बॅ. रामचंद्र नाईक, ( स्वागताध्यक्ष ) श्री. सौ. अहल्याबाई मल्लण्णा, ( उपस्वागताध्यक्ष ) श्री. सरलादेवी चौधरी, ( अध्यक्ष ) श्री. चिंतामणराव वैद्य, ( अध्यक्ष, विदर्भ साहित्य परिषद् ) श्री. दत्तोपंत लेले, ( स्वयंसेवकांचे कॅप्टन ).



**ना. पंडित केशवराव** माजी हायकोर्ट जज्ज व हैद्राबादचे
सुप्रसिद्ध नेमस्त पुढारी

# चौथी हैद्राबाद विदर्भ साहित्य परिषद्.

## ता १० जून इ. स. १९२७

## स्वागताध्यक्ष ना. केशवराव यांचें भाषण.



अध्यक्षमहाराज, मद्देशबांधवहो, आणि भगिनींनों, स्वागतमंडळातर्फे आज मी आपल्या स्वागतार्थ उभा आहें. विदर्भ साहित्याचें हें जरी चौथें अधिवेशन आहे तरी हैद्राबादकरांना हें पहिलेंच आहे. पूर्वींचीं तीन सम्मेलनें केवळ वऱ्हाडांतच झालीं व त्यामुळें आम्हां हैद्राबादकरांना आपलें स्वागताचा व संगतीचा लाभ मिळाला नाहीं व या वेळींहि आम्हांस हें श्रेय मिळेल अशी आम्हांस कल्पनाहि नव्हती, परंतु यवतमाळ येथें भरलेल्या तिसऱ्या अधिवेशनामध्यें निरनिराळ्या ठिकाणांहून आलेल्या आमंत्रणपत्रिकांपेक्षां आमच्या आमंत्रणपत्रिकेचा मान केला, याबद्दल पहिल्यानें त्यांचे आभार मानतों.

परंतु आपणासारख्या मान्यवर गृहस्थांचें स्वागत कसें करावें, हें आमच्यासारख्या अनभिज्ञांना समजत नाहीं. कारण आपल्यासारख्यांचे

### आगमनाचे प्रसंग येथें फार कमी

त्यामुळें चुकाहि होण्याचा संभव आहे. परंतु आपल्या उदार अंतःकरणाचा आम्हांस पूर्ण परिचय असल्यामुळें आपण आमच्या चुकांबद्दल क्षमा कराल अशी आशा आहे.

### ही विदर्भ साहित्य परिषद येथें कां ?

विदर्भ साहित्य परिषदेचा व निझाम हैद्राबादचा सम्बन्ध काय ? हा प्रश्न साहजिकच उत्पन्न होतो. परन्तु माझे व्यवसायबंधू रा. ब. यादवराव माधवराव काळे बी. ए. एलएल. बी. ह्यांनीं वऱ्हाडचा इतिहास लिहून लोकांना दाखविलें आहे कीं, निझाम इलाख्यांतील महाराष्ट्र प्रांत हा महाराष्ट्र नसून विदर्भ आहे. याचा विस्तार बाहेरपर्यंत आहे. इ. स. १८५३ पर्यंत आमच्या या सर्व विदर्भाचे मालक आमचें निझाम सरकारच होतें. परन्तु १८५३ मध्यें इंग्रजांनीं त्यावर हळुहळू कबजा करून नंतर १९०२ मध्यें हल्लींच्या प्रांतास वऱ्हाड म्हणतात तो आमच्यापासून वेगळा केला. सारांश,

## विदर्भाचा एक तुकडा ब्रिटिश रियासतींत

आहे व दुसरा विदर्भाचा तुकडा म्हणजे आमचा निझाम महाराष्ट्र. जरी राजकीयदृष्ट्या २ विभाग पडले आहेत तरी सामाजिकदृष्ट्या व वाङ्मयसेवेंत आम्ही सर्व एक आहों. आमचे आचार, विचार, संस्कार सर्व एकच आहेत.

आम्हांस आमचे बांधव आमच्यापासून दूर केले गेले हें पाहून अतिशय वाईट वाटतें, तरी त्यांची वाङ्मय व इतर अंशानें झालेली सुधारणा पाहिली म्हणजे खरोखरच आमचे बांधव तिकडे गेले हें बरें वाटतें. कारण,

## ब्रिटिश सरकारनें त्यांची सर्वांगीण उन्नति करवली

व आमचे निझाम सरकारांनीं आमच्या उन्नतीकडे मुळींच लक्ष दिलें नाहीं; त्यामुळें आम्ही फार मागासले गेलों आहों. राजकीयदृष्ट्या कांहींहि असलें तरी वाङ्मयदृष्ट्या आम्हांस आमचे बंधुत्वाचा विलक्षण अभिमान वाटतो.

आमचा विदर्भ एक देश आहे व त्याच्या पाठीमागें इतिहास आहे. ' मराठीचे नगरीं,' जर कुठल्या साधुसंतांनीं सेवा केली असेल तर फक्त विदर्भीय संत कवींनीं केली आहे.

## अगदीं पौराणिक काळांत पाहिलें

तरी विदर्भ देशाचा इतिहास हा एक चकचकणारा इतिहास आहे. शूरसेन नळराजाची दमयन्ती जिच्या पातिव्रत्याचे पोवाडे अनादि कालापासून गाईले जातात, ती विदर्भकन्याच होती. ऐवढेंच नव्हे तर त्यानंतर म्हणजे श्रीकृष्णासारख्या मुत्सद्याची पत्नी जिनें श्रीकृष्णासारख्या अद्वितीय माणसाच्या आयुष्याला राष्ट्रीय वळण लावलें ती एक वैदर्भीच होती.

पौराणिककाल सोडून अलीकडे आलें तर दण्डीसारखे साहित्यसेवक आमचे विदर्भांत उत्पन्न झाले. हेमाडपंत, चोपदेव यांसारखे प्रसिद्ध राजकारण व धर्मकारणपटु व नीतिललामभूत रत्नें येथेंच झालीं. भट्ट भास्करासारख्या ज्योतिष्यांनींहि ह्याच भूमींत जन्म घेऊन आपलें कौशल्य इतरांचे दृष्टोत्पत्तीस आणलें. तदनंतर म्हणजे इ० स० पूर्वी १२०० म्हणजे एक साहित्याचा उज्ज्वल इतिहास आहे. महानुभाव पंथाचे सर्व मराठी ग्रंथ येथेंच झाले आहेत. ज्ञानेश्वर, मुकुंदराज, एकनाथमहाराज, महाराष्ट्र धर्मप्रणेते स्वामी समर्थ रामदास, दासोपंत हे सर्व संत

कवि व मुत्सद्दी ज्यांनीं वाङ्मयाच्या आजन्मसेवेचें व्रत चालवून फक्त विदर्भासच नव्हे तर जगतास जागें केलें तेहि महात्मे विदर्भांत जन्म घेऊन विदर्भभूमीस पवित्र करते झाले. एवढेंच नव्हे तर हल्लींहि उत्तमोत्तम वाङ्मय विदर्भांत तयार होत आहे.

## ज्ञानेश्वरकालीन मराठी

इजला आपणास निर्मळ मराठी असें म्हणण्यास हरकत नाहीं, परन्तु त्यानंतर मुसलमानी भाषेचा किंचितसा संस्कार मराठीवर होत होत आतां बराच संस्कार झाला आहे; एवढेंच नव्हे तर ते शब्द मराठी भाषेंत रूढ होऊन गेले आहेत.

शिवाजीमहाराजांनीं राज्यसंस्थापनेच्या एवढ्या धामधुमींतसुद्धां महाराष्ट्र-भाषा—शुद्धीचें काम मागें टाकलें नाहीं. व त्यांनीं मुद्दाम राज्यव्यवहार कोश तयार करविला. परंतु महाराजांनंतर मराठी भाषेकडे नंतरच्या मराठी राजांनीं मुळींच लक्ष पुरविलें नाहीं. तरी त्या काळांत मराठी भाषेचें फारसें नुकसान झालें नाहीं व त्याकाळीं मुसलमान राजांनींहि तिचा ऱ्हास करावा अशा तऱ्हेनें प्रयत्न केले नाहींत. मुसलमानी राज्यांत सर्व दप्तरें मराठींतूनच असत व त्याकाळींहि मराठी भाषा कायमच होती.

इतर ठिकाणची स्थिति आमचे इलाख्यांतील परिस्थितीपेक्षां फारच निराळी व समाधानकारक आहे. पुण्या—मुंबईकडे मराठी ही अतिशय उन्नत अवस्थेस पोहोंचली असून तिची उन्नति करण्याकरतां मुंबई सरकारनेंहि बरीच खटपट केली. सर्व

## युनिव्हर्सिट्यांनीं मराठी हा ऐच्छिक विषय

ठेविला आहे, एवढेंच नव्हे तर मॅट्रिकच्या परिक्षेंत ज्यांची मातृभाषा मराठी असेल त्यांना मराठींत लिहिण्याची परावनगी दिली आहे, व पुण्यास मराठी युनिव्हर्सिटी काढण्यांत यावी अशा तऱ्हेचे प्रयत्नहि होत आहेत. तेथें सरकारची अतिशय मदत आहे; परंतु निझाम स्टेटमधील स्थिति अतिशय निराशाजनक आहे. मातृभाषेंत शिक्षण द्यावें याबद्दलचें तत्व त्यांनीं मानलें याबद्दल त्यांचे मानावे तेवढे आभार थोडेच आहेत व त्या तत्वाला अनुसरून

त्यांनीं Osmania University काढली व त्यांतील शिक्षणक्रमाचा 'माध्यम' उर्दू ठेविला आहे. परंतु त्याच युनिव्हर्सिटींत फसवणूक म्हणून मराठी कॉलेज-मध्यें ठेविलें आहे तरी खालीं शिक्षणक्रमच असा चमत्कारिक व आमच्या मातृभाषेला विघातक आहे कीं त्यामुळें आमचे विद्यार्थी मराठी भाषा सहसा घेण्यास धजतातच कमी. या युनिव्हर्सिटीच्या शिक्षणक्रमांत उर्दू मातृभाषा समजणाऱ्या लोकांशिवाय बाकी सर्व इतर मातृभाषा असणाऱ्या लोकांची म्हणजे उ. मराठी, तेलगू, कानडी वगैरे मातृभाषा असणाऱ्या विद्यार्थ्यांची पूर्ण गैरसोय आहे. इतिहास, भूगोल व गणित हे विषय जे मातृभाषेंत उत्तम तऱ्हेनें समजतात ते सर्व उर्दूतून समजण्यास अवघड जात असूनहि विद्यार्थ्यांना मातृभाषेंतून न शिकतां उर्दूतून शिकावे लागतात. बरें

## युनिव्हर्सिटी राहो; पण न्यायखात्यांत

तोच प्रकार. ज्या भागांत जी भाषा प्रचलित असते त्या देशांत त्याच्या भाषेमध्यें 'राज्यविषयक' काम चाललें तर अतिशय सुलभ व न्याय्य होतें, परंतु अगदीं लहान दप्तरापासून एकदम मोठ्या दप्तरांत सर्व उर्दूतूनच चालत आहे; त्यामुळें कामांत वेळोवेळीं अनेक अडचणी उत्पन्न होतात. असो, या गोष्टींबद्दल सरकारनें विचार करणें जरुरीचें आहे. कोर्टांतील सर्व अधिकारी उर्दू जाणणारे असतात व तद्देशीय लोक मातृभाषेशिवाय दुसरी कोणतीहि भाषा जाणत नाहींत व यामुळें न्यायामध्यें विलक्षण घोटाळा होतो. मामलतदार कचेऱ्यांत तर विशेषच असा प्रकार दृष्टीस पडतो. मामलतदार साहेब यांना त्या देशांतील मातृभाषा येत नाहींच; परंतु इतर दुसरा ती भाषा जाणणारा कारकूनहि मिळत नाहीं व पटवाऱ्याचें ज्ञान विचारूंच नका आणि सर्व भानगड एकाद्या गरीब माणसाबद्दल कीं जो साधारण फाटकी तुटकी मातृभाषा जाणतो, त्याच्याबद्दल असा सर्व घोटाळा होतो. सद्गृहस्थ हो ! मला येथें बजावलें पाहिजे कीं, मी राजकीय गोष्टीबद्दल बोलत नाहीं, पण ह्या चमत्कारिक पद्धतीनें आमचे मराठी भाषेला एक विलक्षण धक्का बसला आहे. ही चमत्कारिक पद्धति कशी असेल याचें तुम्हास गूढ असेल; पण वस्तुस्थितीस इलाज नाहीं. यामुळें राजाश्रय नाहींच; पण येथील

## मुख्य युनिव्हर्सिटीचा शिक्षणक्रम

मराठी मातृभाषा असणाऱ्या विद्यार्थ्यांना इतका निरुपयोगी असा असल्यामुळें येथें सार्वत्रिकच हें परभाषेंतून शिकावयाचें शिक्षण अतिशय जड जातें व त्यामुळें विद्यार्थ्यांचें आयुष्य विनाकारण फुकट जाऊन ज्ञानप्राप्तीच्या आकांक्षांवर असोलभ्यानें जबरदस्त धक्का बसतो व यामुळेंच आमचे येथें मराठी भाषेची इतकी अवनति झाली आहे कीं मराठी भाषा आतां कायमची बुडणार कीं काय अशी काळजी वाटूं लागली आहे.

## संस्थानांत नाहीं तर संस्थानाच्या बाहेर

मातृभाषेचें ज्ञान करून घेण्यास उपयुक्त साधनांचीहि बंदी करून सरकारनें महाराष्ट्र भाषेच्या चाललेल्या दैन्यावस्थेंत एक मोठी भर घातली आहे. केसरीसारखें मराठी भाषा व मराठी साहित्य यांचें ज्ञान देणारें महाराष्ट्राचें प्रमुखपत्र, ज्ञानप्रकाश, भाला इत्यादिसारखीं पत्रें बंद झाल्यामुळें आमचे भाषाप्रगतीचे सर्वच मार्ग सरकारनें बंद केले आहेत व ' आई जेवावयाला घालीना व बाप भीक मागूं देईना ' अशी केवीलवाणी स्थिति झाली आहे. सद्गृहस्थहो ! मी आपणापुढें वर्णन केली त्यापेक्षांहि अतिशय जास्त केविलवाणी स्थिति आमचे रियासतींत मराठी भाषेची झाली आहे.

सारांश, आपला हा आजार केवळ हेळसांडीमुळें व अनास्थेमुळें इतका विकोपास गेला कीं याला उत्तम योजना झाली तरच जिवंत राहूं अशी स्थिति आहे व याकरतांच म्हणून आपल्या येथें या शास्त्राचा अतिशय व्यासंग असलेले सुप्रसिद्ध वैद्य येथें आणले आहेत. ( टाळ्या ) तेव्हां आपण व वैद्यसाहेब उपाय आम्हांस लवकरच दाखवाल अशी मला आशा आहे-आपण अध्यक्षांचें भाषण ऐकण्यास अतिशय उत्सुक असाल म्हणून पुनः एकदां आपणां सर्वांचे आभार मानून मी रजा घेतों.



# चौथी हैद्राबाद विदर्भ-साहित्यपरिषद्.

## अध्यक्ष श्री. चिंतामणराव वैद्य एम्. ए. एल एल. बी. यांचें भाषण.

स्वागताध्यक्ष न्यायमूर्ति केशवरावसाहेब आणि साहित्यप्रेमी बन्धुभगिनीनों, आपल्या या चौथ्या विदर्भसाहित्यसंमेलनाच्या अध्यक्षपदाचा मान आपण मला दिलांत याबद्दल मी आपला अत्यंत आभारी आहें. मागील सभेचे अध्यक्ष श्री. तात्यासाहेब केळकर यांनीं सांगितल्याप्रमाणें प्रांताबाहेरचा अध्यक्ष करावा अशी कॉंग्रेसनें घालून दिलेली परिपाठी इतरत्र अनुसरण्यांत येते, हें सहजच आहे. पण यंदां या परिपाठीला विशेष मान देण्याचें कारण मला वाटतें देवाण घेवाण हें झालें आहे. आमच्या महाराष्ट्राच्या साहित्यसंमेलनाचे अध्यक्ष आपल्या विदर्भांतील प्रसिद्ध लेखक श्री. तात्यासाहेब कोल्हटकर हे होते. तेव्हां आपल्या विदर्भांतील साहित्यसंमेलनाच्या अध्यक्षपदाचा मान महाराष्ट्रांतील एखाद्या लेखकास देणें हें क्रमप्राप्तच होतें. तात्यासाहेब कोल्हटकर यांच्या मानानें देवाणघेवाणींत आपल्यास नुकसान झालें तरी माझी अल्प सेवा आपण प्रेमानें गोड करून घ्याल अशी मला पूर्ण आशा आहे.

## विदर्भ-साहित्य-संमेलन निराळें कां ?

हा प्रश्न प्रारंभींच उपस्थित होतो. विदर्भ म्हणजे महाराष्ट्र नव्हे काय ? आणि विदर्भांतील लोकांनीं महाराष्ट्र-साहित्य-संमेलनांत कां भाग घेऊं नये ? माझ्या मतें आपण निराळीं साहित्यसंमेलनें करतां यांत बरीच उपयुक्तता आणि तथ्य असून साहित्यसेवेचें काम या रीतीनें अधिक चांगलें होईल. तें कसें हें मी प्रथम विस्तारानें सांगण्याची परवानगी घेतों. विदर्भ देश कोणता ? याची प्राचीन काळापासून माहिती मिळते ती मी थोडक्यांत सांगतों. महाभारतांत रुक्मी हा विदर्भाचा राजा होता असें वर्णन आहे. त्याचप्रमाणें दमयंती हीहि विदर्भ राजकन्या होती व रुक्मिणी आणि दमयंती या उदारचरित आर्य स्त्रियांच्या पवित्र वासानें पुनीत झालेली आपली विदर्भभूमी महाभारतांतील वर्णनावरून नर्मदेच्या दक्षिणेकडील होय. नल हा निषध ( नरवर ) देशचा राजा दमयंतीस तिच्या माहेरचा वनांत मार्ग दाखवितांना महाभारतांत

जें वर्णन आलें आहे तें याच विदर्भ देशाला अनुलक्षून दिसतें. रुक्मीच्या वर्णनांत तर त्यांस दाक्षिणात्याधिपति असें म्हटलें आहे. दाक्षिणात्यांचा राजा म्हणजे हल्लींच्या विदर्भ महाराष्ट्राचा राजा होय. महाभारत काळांत म्हणजे इ. स. पूर्वी ३०० च्या सुमारें महाराष्ट्र हा शब्द उत्पन्नच झाला नव्हता. दक्षिणापथ व दाक्षिणात्य असे शब्द प्रचलित होते. रुक्मी पाण्डवांकडे गेला तेव्हां मी, 'एकटा कौरवांचा नाश करतों, तुम्हाला पंचाईत कशाची ?' असें म्हणाला. तेव्हां पांडवांनीं इतरांचा अधिक्षेप समजून त्याची मदत घेतली नाहीं. रुक्मीच्या भाषणावरून विदर्भाचे लोक म्हणजे दाक्षिणात्य शूर आणि अभिमानी दिसतात. यानंतर विदर्भाचा किंवा दक्षिणपथाचा उल्लेख कालिदासाच्या मालविकाग्निमित्र नाटकांत आहे आणि कालिदासानें आपलें मेघदूत काव्य रामटेक पर्वतावरून केलें हें प्रसिद्ध आहे. यापुढें वराहमिहिरादिकांच्या लेखांत विदर्भ नांव येतें. येथें दर्भ कमी ( उत्तरेच्या मानानें ) होत असावेत म्हणून यास विदर्भ ही संज्ञा पडलेली दिसते.

## विदर्भ म्हणजे दक्षिणापथ

एवढें म्हटल्यानें त्याची व्याप्ति नीट लक्षांत येत नाहीं. पश्चिमेकडे त्याची व्याप्ति कोठपर्यंत आणि दक्षिणेकडे कोठपर्यंत ? मराठी भाषा जेथपर्यंत बोलली जाते तेथपर्यंत विदर्भ अशी याची दक्षिणसीमा दिसते. पूर्वेकडे आंध्र असून त्यांतील लोक तेलंगी भाषा बोलतात, तेव्हां तेथील मर्यादा स्पष्ट आहे. दक्षिणेकडे कृष्णेपर्यंत विदर्भ मानला जात असे. विदर्भ म्हणजे हल्लींचें वऱ्हाड अशी कित्येकांची समजूत आहे, पण ती चुकीची आहे. वऱ्हाड हा विदर्भाचा एक भाग निःसंशय आहे व विदर्भ दक्षिणेकडे पैठण मध्य धरून कृष्णेपर्यंत पसरलेलें मानलें जात असे याबद्दल निःसंशय पुरावा मी आपल्यापुढें ठेवतों. चौदाव्या शतकाचे आरंभीं विद्यारण्यस्वामींनीं शंकराचार्यांचा दिग्विजय वर्णन केला आहे. तो रामेश्वरापासून सुरवात करून पूर्वकिनाऱ्यानें उत्तरेकडे पाण्ड्य, चोल आणि कांची यांचा जय सांगून आन्ध्रांचा जय सांगितला. आणि व्यंकटाचलेश यांचें दर्शन करून आचार्य विदर्भ राजधानीस गेले असें वर्णन केलें आहे. म्हणजे आंध्रांच्या पश्चिमेस विदर्भ देश वर्णन केलेला आहे. 'निजपादसरोजसेवनाय विनयेन स्वयमागतानुथान्ध्रान् ॥ अनुगृह्य स व्यंकटाचलेशम् प्रणिपत्याथ विदर्भराजधानीम्.' विदर्भ राजधानीस

व्यंकटाचलापासून जाऊन आचार्य क्रथ–कैशिकांची पूजा घेऊन नंतर कर्नाटक देशास जाऊं लागले असें वर्णन आहे. यावरून विदर्भ म्हणजे केवळ वऱ्हाड नव्हे असें स्पष्ट होतें आणि हल्लींचा निजामशाहींतला सर्व महाराष्ट्र भाषा बोलणारा प्रदेश विदर्भांत सामील होता असें स्पष्ट दिसतें. याच्यानंतरचा पुरावा म्हटला म्हणजे फिरिस्तानें आपल्या इतिहासांत असें स्पष्ट नमूद केलें आहे कीं, बिदर ही राजधानी मुसलमानांनीं प्रथम दक्षिणेंत केली, तिचें नांव विदर्भ याच शब्दावरून निघालें आहे. अर्थात् चौदाव्या शतकापर्यंत सुद्धां विदर्भाची व्याप्ति तापीपासून कृष्णेपर्यंत समजली जात होती. हाच सुपीक प्रदेश दण्डकारण्य म्हणून पूर्वीं प्रसिद्ध असून येथें प्रथम महाराष्ट्रीय आर्यांनीं वस्ती केली. पुण्य गोदानदी या देशाचा मध्य असून तिचे कांठीं स्थापिलेलें प्रतिष्ठान नगर म्हणजे उत्तरेकडे गंगेच्या कांठीं असलेलें प्रतिष्ठान ( प्रयाग ) हेंच आर्यांनीं दक्षिणेंत आणलें हें उघड आहे.

## वराहमिहिरानें विदर्भाचें नांव

आन्ध्राबरोबर आग्नेयेकडील विभागांत सांगितलें आहे. दक्षिणेकडील विभागांत नाहीं. त्याचेवेळीं म्हणजे इ. स. ५०० चे सुमारें ( श. ४२७ ) विदर्भदेश म्हणजे दाक्षिणात्य देश आर्यांच्या उत्तरेकडील समूहांत प्रविष्ट होऊन कृष्णेच्या दक्षिणेकडील देशास दक्षिण ही संज्ञा मिळाली होती. यथील भाषा आर्यभाषा असल्यानें असा फरक होणें साहजिक. या भाषेमुळेंच विदर्भास पुढें महाराष्ट्र हें नांव मिळालें. वराहानंतर सुमारें १५० वर्षांनीं आलेला चिनी प्रवासी ह्युएनत्संग या देशास महाराष्ट्र हें नांव देतो. महाराष्ट्र हें देशवाची नांव या कालापासून आपल्यास दिसतें. यावेळीं महाराष्ट्रांत चालुक्य पुलकेशी राजा राज्य करीत होता, तो महाराष्ट्रांत राज्य करीत होता, असें ह्युएनत्संगनें वर्णन केलें आहे. त्याच्याहि एका शिलालेखांत ‘ अगमदधिपतित्वं यो महाराष्ट्रकाणां । नवनवतिसहस्रग्रामभाजा त्रयानाम् ॥ ’ असें वर्णन केलें आहे. हे तीन महाराष्ट्र कोणते हा महत्त्वाचा मनोरंजक प्रश्न आहे. मध्ययुगीन भारत–भाग १ यांत, हे भाग वऱ्हाड ( वर्धातट ), मध्य महाराष्ट्र आणि कुंतल म्हणजे कृष्णेच्या पश्चिमेकडचा भाग अशी मीं कल्पना केली आहे. यांच्या गांवांची संख्या ठोकळपणें ९९ हजार भरत नाहीं असें मीं म्हटलें आहे. मला वाटतें या विभागापेक्षां विदर्भ ( पूर्व महाराष्ट्र ), मध्य महाराष्ट्र आणि अपरान्त असे विभाग केले असतां जास्त

जुळतील. समुद्रापासून सह्याद्रीपर्यंत अपरान्त; कोंकण हें नांव या विभागास मागाहून आलें. ह्यु—एन त्सांग व वराहमिहिर यांच्या देशांच्या यादींत कोंकण हें नांव बनवासीजवळ घाटावरचें आहे आणि शांकरदिग्विजयांत सुद्धां आचार्य गोकर्णाच्या दर्शनास अपरांतांत गेले असें वर्णन आहे. असो, सह्याद्रीपर्यंत अपरांत. वर घाट म्हणजे मध्य महाराष्ट्र आणि खानदेशाच्या पूर्व बाजूस असलेल्या उत्तर दक्षिण जाणाऱ्या डोंगराच्या ओळीच्या पूर्वेस असलेला बालेघाट म्हणजे पूर्व महाराष्ट्र अथवा विदर्भ असे तीन भाग महाराष्ट्री बोलणाऱ्या देशांचे पुलकेशीच्या वेळीं पडले असावे. हल्लीं पूर्व महाराष्ट्र म्हणजे विदर्भ आणि पश्चिम महाराष्ट्र म्हणजे महाराष्ट्र असा योग्य भाग पाडला असतां महाराष्ट्र साहित्य सम्मेलन आणि विदर्भ साहित्यसंमेलन यांची देशाच्या विभागणीनें योग्य, भिन्नता आपल्या ध्यानांत येईल.

## येथें थोडेसें विषयांतर

करणें जरूर आहे. महाराष्ट्र हा शब्द विदर्भालाहि पुलकेशीच्या काळापासून लागत आलेला आहे. अलिकडे भाषेवरून देशांचीं नांवें प्रचलित झालेलीं आहेत. जेथें लोक मराठी बोलतात तो महाराष्ट्र, जेथें लोक गुजराथी बोलतात तो गुजराथ. गुजराथ हें नांव बाराव्या शतकाच्या अलीकडचें आहे. त्यापूर्वी त्याला आनर्त सारस्वत मण्डळ, सौराष्ट्र, अशींच नांवें होतीं. या दृष्टीनें महाराष्ट्र हें नांव योग्य रीतीनें विदर्भालाहि लागूं शकतें, पण संकेतानें महाराष्ट्र म्हणजे पश्चिम महाराष्ट्र असा अर्थ आपण घेतला आहे. तेव्हां विदर्भासह महाराष्ट्र असा अर्थ जेव्हां अभिप्रेत असतो तेव्हां बृहन्महाराष्ट्र अशी शब्दयोजना अलिकडे केली जाते. ही शब्दयोजना बदलली पाहिजे असें मला वाटतें. नुकतीच झांशी येथें बृहन्महाराष्ट्र परिषद् भरली असतांना मी तेथें अध्यक्ष या नात्यानें गेलों होतों, तेव्हां तत्पूर्वीच्या अधिवेशनांत श्री. ज. स. करंदीकर यांच्या अध्यक्षतेखालीं बृहन्महाराष्ट्र या शब्दाची व्याख्या निराळी केली गेलेली मला आढळली आणि ती मलाहि पसंत पडली. जेथें सलग मराठी भाषा बोलली जाते तो महाराष्ट्र. ( अर्थात् नागपुरापासून तों थेट गोवा कारवारापर्यंत महाराष्ट्र ). या महाराष्ट्रांतून अन्य भाषा बोलणाऱ्या प्रांतांत जे मराठी भाषा बोलणारे लोक गेले त्यांच्यासंबंधानें तीं सर्व ठिकाणें बृहन्महाराष्ट्र होत. अशी व्याख्या बृहन्महाराष्ट्र परि-

षदेनें केलेली आहे. म्हणजे बडोदा, इंदूर, ग्वालेर, पंजाब, कलकत्ता, प्रयाग, काशी, बेळगांव, धारवाड, म्हैसूर, तंजावर वगैरे ठिकाणीं गुजराथी, हिंदी, बंगाली, कानडी, तामीळ भाषा बोलणाऱ्या प्रांतांत मराठी लोक मराठी बोलणारे जेथें गेले त्या ठिकाणास बृहन्महाराष्ट्र म्हणजे वाढलेला महाराष्ट्र असा संकेत झाला आहे. या संकेतास अनुसरून विदर्भासहित महाराष्ट्रास निराळें नांव देणें जरूर आहे. आणि तें अखिल महाराष्ट्र असेंच असावें. बृहन्महाराष्ट्र ब्राह्मण परिषद अकोला येथें भरणार आहे तिचें नांव अखिल महाराष्ट्र ब्राह्मण परिषद असें ठेवल्यास पूर्व संकेताचा गोंधळ न होतां सर्व महाराष्ट्राच्या भागांचा बृहन्महाराष्ट्रासह त्यांत समावेश होईल. तेव्हां या सूचनेकडे विदर्भानें जरूर लक्ष द्यावें.

## देशविभागानें दोन संमेलनांची योग्यता

आमच्या नजरेस आली तरी साहित्याच्या भेदांनीं ती भिन्नता ठेवणें योग्य आहे कीं, नाहीं, हा प्रश्न येथें उपस्थित होतो. याचें उत्तर आहे असेंच मला द्यावेसें वाटतें. विदर्भाच्या साहित्याची आणि महाराष्ट्राच्या साहित्याची बरीच भिन्न दिशा आहे असें दिसतें. हें साहित्य अर्थात मराठी भाषेचें अंग आहे हें सांगावयास नकोच. मराठी भाषेची उत्पत्ति इ. स. च्या सुमारें १० व्या शतकांत झाली, हें मीं मध्ययुगीन भारत भाग २ यांत दाखविलेंच आहे. तो विषय येथें सांगण्याची आवश्यकता नाहीं. मराठी भाषेला अभिजात भाषेचें स्वरूप देण्याचें कार्य विदर्भांतील कवींनीं केलें, ही गोष्ट निर्विवाद आहे. प्रथम महानुभावी वाङ्मय झालें आणि लवकरच देवगिरीच्या यादवांच्या अंमलांत ज्ञानेश्वर महाराज उत्पन्न होऊन त्यांनीं मराठींतील पहिला अप्रतिम ग्रंथ भगवद्गीतेवरील अद्वितीय टीका रचून मराठी साहित्याची सेवा केली. ज्ञानेश्वरानंतर सुमारें अडीचशें तीनशें वर्षांनीं एकनाथानें आपले ग्रंथ रचून मराठी भाषेला सौंदर्य आणिलें. यानंतर मुक्तेश्वर कवींनीं आपल्या महाभारताच्या मराठी ग्रंथानें वैदर्भ साहित्यास सुवर्णाचें शिखर चढविलें. त्या नंतरहि अनेक कवि वैदर्भांत उत्पन्न होऊन त्यांनीं साहित्याची सेवा केलेली आहे. या सर्व कवींना मराठी भाषेचा किती अभिमान होता, हें त्यांच्या अनेक उक्तींवरून आपणांस दिसून येतें. मुक्तेश्वराचें आदिपर्व आणि वनपर्व व्यासोक्तीहूनहि बोटभर श्रेष्ठ आहे असें मीं मुक्तेश्वराचें वनपर्व या निबंधांत ( विविधज्ञानविस्तार ) दाखविलें आहे.

या अनेक वैदर्भ कवींची प्रतिभा अत्यंत उज्वल असून त्यांची भाषाशैली प्राचीन विदर्भ कवींच्या सारखीच एका विशिष्ट प्रकारानें सुन्दर आहे. राष्ट्रकूटांच्या अमलापावेतों म्हणजे इ. स. १००० पावेतों विदर्भ कवि संस्कृतांत लिहीत असत. त्यांची विशिष्ट भाषाशैली असून प्राचीन साहित्यकारांनीं या दाक्षिणात्य कवींच्या रीतीस वैदर्भी रीति असें नांव दिलेलें आपणास ठाऊकच आहे. साहित्यकारांनीं देशभेदांनीं चार रीति सांगितल्या आहेत. वैदर्भी दाक्षिणात्यांची, गौडी बंगाल्यांची, पांचाळी उत्तरेकडील मध्यदेशाची आणि लाट म्हणजे पश्चिमेकडील लोकांची. या चार रीतींत वैदर्भीच मनोहर असून सुबोध, मधुर आणि लहान लहान समासांनीं युक्त असें तिचें वर्णन केलेलें आहे. गौडी रीत क्लिष्ट अशी लांब लांब समासानें भरलेली असते. बाणभट्टांतहि

## दाक्षिणात्य कवींच्या श्रेष्ठत्वाबद्दल

आदर प्रदर्शित केलेला आहे, 'उत्प्रेक्षा दाक्षिणात्यानाम् गौडेष्वरक्षडंबरम्' या त्याच्या उक्तीवरून दाक्षिणात्य कवींची उत्प्रेक्षालंकाराबद्दल त्यांनीं प्रशंसा केलेली आहे. विदर्भांतील संस्कृत कवींची धाटणी ( रीति ) कालीदासानें उचलली आणि तो कांहीं दिवस विदर्भांत ( रामटेकगिरिवर ) रहात असावा असें दिसतें. ही भाषाशैली प्राचीन काळापासून विदर्भकवींच्या अंगवळणीं पडलेली असावी. मराठी कवींच्याही वेळीं फार उत्तम रीतीनें आपल्यास ज्ञानेश्वरींत आणि मुक्तेश्वरांच्या महाभारतांत पहावयास सांपडलें. एकावर एक मनोहर उत्प्रेक्षांनातरी या शब्दानें प्रारंभ करून कवि देऊं लागले म्हणजे काव्यरसानें वाचक वाहत जातो. अशा प्रकारची भाषाशैली वैदर्भी कवींची अद्यापपर्यंतहि दिसते असें म्हणावयास हरकत नाहीं.

## प्राचीन कवींपैकीं तुकाराम आणि रामदास

विदर्भाचे कवी नसून महाराष्ट्राचे कवी आहेत अशी माझी समजूत आहे. या कवींची भाषाधाटणी ( रीति ) निराळी असून तिचें स्वरूप कसें भिन्न आहे, हें आपल्यासारख्या विद्वान् समाजास जास्त विस्तारानें सांगण्याची आवश्यकता नाहीं. सरळ जोरदार भाषेंत माधुर्याकडे लक्ष न देतां या दोन्ही कवींनीं आपले विचार जनतेपुढें ठेवले आहेत आणि आपल्या उदात्त विचारांनीं

वैदर्भ कवीप्रमाणेंच पण अन्य रीतीनें मराठी भाषेस अलंकृत केलेलें आहे. हीच रीति महाराष्ट्रांत पुढें चालूं आहे, हें मी पुढें सांगणारच आहें. तात्पर्य, महाराष्ट्र-साहित्याची दिशा वैदर्भ-साहित्यांतून बरीच भिन्न आहे आणि या दोन साहित्यांचा भेद लक्षांत ठेवला असतां दोन साहित्य संमेलनांचें कार्य कसें युक्त आहे, हें दिसून येईल.

## दोन संमेलनांची आवश्यकता

आहे असें माझें प्रामाणिक मत आहे. मराठी भाषेची सेवा या रीतीनें जास्त होईल, यांत बिलकूल शंका नाहीं. मराठी हा शब्द महाराष्ट्री या शब्दावरून निघाला आहे हें प्रसिद्धच आहे. वर्णव्यत्यासानें महाराष्ट्रीच्या ऐवजीं मराहाट्टी असें रूप प्रथम झालें. ही रूपाची व्युत्पत्ति प्राकृत व्याकरणकार हेमचंद्र यांनींहि दिलेली आहे आणि प्राचीन विदर्भांतील कवि मऱ्हाटीया असेंच रूप वापरतात आणि तुकाराम-रामदासहि हेंच रूप वापरतात असें मला वाटतें. या शब्दांतील पुनः ह चा वर्णव्यत्यास होऊन मराठी असें रूप झालें आहे. आणि तेंच हल्लीं सर्वत्र प्रचारांत आहे. इ. स. १० वें शतकापासून मराठीचा उगम झाला, तो आतांपर्यंत ती भाषा परिणत स्वरूपांत आणि एकाच रूपांत अनेक कारणांनीं आपणांस दिसत आहे. पण प्राचीन काळीं देशभेदांनीं मराठीचीं रूपें अनेक पोटभाषेंतून भिन्न होतीं, हें निर्विवाद आहे. ज्ञानेश्वर, एकनाथ यांची वैदर्भीमराठी भिन्न असून महाराष्ट्रांतील तुकाराम-रामदासांची मराठी थोडीशी भिन्न आहे. अपरांत अथवा कोंकण यांतील मराठी गोवें प्रांतापर्यंत फारच भिन्न असून, ती हल्लींच्या लोकांच्या भाषेंत आपल्याला बरीच भिन्न दृष्टीस पडते. पण हल्लींच्या काळच्या वर्तमानपत्रांच्या समृद्धीमुळें चोहोंकडे मराठी भाषेचें स्वरूप एकच होत चाललें आहे, यांत संशय नाहीं. विशेषतः महाराष्ट्र आणि कोंकण यांची भाषा पुण्यांतील भाषेवरून चोहोंकडे एकच झालेली आहे. याच कारणानें विदर्भांतील आणि महाराष्ट्रांतील मराठी भाषा भिन्न दिसेनाशा झाल्या आहेत. मला वाटतें हा परिणाम अनेक दृष्टीनें अभिनन्दनीय आहे. या दोन साहित्य संमेलनांनीं भाषाभेद वाढविण्याचा प्रयत्न करूं नये आणि भावी मराठी भाषेस एक रूप देऊन तिला जोरदार करण्याचा संघटित प्रयत्न करावा. या दृष्टीनें विचार करतां शब्दभरणा योग्य आणि ठसठशीत असेल तेथें दोन्हीकडे करण्याचा प्रयत्न करावा.

या शब्दांतील विदर्भाची व्याख्या केल्यावर आणि हें साहित्य मराठी भाषेंतील आहे हें सांगितल्यावर साहित्य म्हणजे काय याची मीमांसा करणें जरूर आहे. साहित्य म्हणजे वाङ्मयाचें साधन अशा प्रकारचा अर्थ होऊं शकेल. साहित्य म्हणजे सामुग्री असाहि अर्थ मराठींत आहे; पण साहित्यशास्त्रकारांनीं साहित्याचा अर्थ निराळा केला आहे. साहित्य आणि वाङ्मययांमधील भेद लक्षांत घेतला पाहिजे. शब्दांनीं व्यक्त केलेले जितके विषय तितकें वाङ्मय असें म्हणतां येतें आणि वाङ्मय हें सामान्य असून साहित्य हें त्याचा विशेष आहे. वाङ्मयाचा एक विशेष भाग म्हणजे साहित्य होय. तो विशेष भाग म्हणजे शब्द आणि अर्थ हे दोन्ही जेथें महत्त्वाचे आहेत त्या वाङ्मय भागास साहित्य म्हणावें. साहित्य म्हणजे एके ठिकाणीं शब्द आणि अर्थ हे दोन्ही शब्द जेथें एके ठिकाणीं आहेत त्यास साहित्य म्हणावें अशी साहित्यकाराची उपपत्ति आहे आणि ती बरोबर आहे. कोणत्याहि भौतिकशास्त्रावरचा ग्रंथ साहित्य नव्हे, मेडिकल शास्त्रावरचा ग्रंथ साहित्य नाहीं, वैद्यकीवरचा ग्रंथ नव्हे, रसायनशास्त्र साहित्य नव्हे, कारण त्यांत केवळ अर्थाकडेच लक्ष असतें. काव्य, नाटक, निबंध, पुराणें इत्यादि वाङ्मयाचा भाग साहित्य आहे, कारण त्यांत शब्द आणि अर्थ या दोहोंच्याहि मनोरंजकत्वाकडे लक्ष असतें आणि म्हणूनच कालिदासानें रघुवंशाच्या आरंभीं ‘ वागर्थप्रतिपत्तये ’ शब्द आणि अर्थ या दोहोंच्याहि प्राप्तीसाठीं परमेश्वराची प्रार्थना केली आहे. तेव्हां शब्द मधुर लागतील असे आणि अर्थ मधुर लागतील असे योजून तयार केलेलें जें वाङ्मय तें साहित्य होय. अशा वाङ्मयांत इतिहासहि येतो हें सांगण्यासारखें आहे. इतिहासाच्या कारणपरंपरा समजण्यासाठीं योग्य आणि मनोवेधक शब्दांची अवश्यकता असते, हें गीब्हनच्या इतिहासावरून आपल्या लक्षांत येईलच.

## साहित्याची अशी व्याख्या

लक्षांत घेतली असतां साहित्याचा संबंध देशाच्या उन्नतीशीं किती आहे हें दिसून येईल. राष्ट्राच उत्तम शील आणि सामाजिक उन्नति या गोष्टींचें संवर्धन देशाचें साहित्य करीत असतें, हें देशाच्या इतिहासावरून आपणांस कळतें. देशांत बोलल्या जाणाऱ्या भाषेंत उत्तम साहित्य निर्माण होऊन हरएकाच्या वाचनांत तें येऊन लोकांच्या ठिकाणीं सद्गुणांची वृद्धि व्हावी, असा साहित्याचा मुख्य हेतु

असतो. हा हेतु मनोहर शब्दांनीं आणि संस्कृत अर्थांनीं साध्य होऊं शकतो हें सांगावयास नकोच. विदर्भांतील प्राचीन कवींनीं हें कार्य किती उत्तम केलेलें आहे विस्तारानें सांगण्याची जरूर नाहीं. ज्ञानेश्वर, एकनाथ, मुक्तेश्वर, महिपती इत्यादि विदर्भांतील अनेक साहित्यसेवक संत असून त्यांनीं आपल्या कवित्वानीं सद्गुणाचा आणि ईशभक्तीचाच परिपोष केला. इंग्रज पूर्वकाळांतील सवच ग्रंथकार संत असून भगवद्भक्तीचाच विषय निरनिराळ्या प्रकारांनीं गात आले आहेत. त्यामुळें हें वाङ्मय बहुमोल जतन करून ठेवण्यासारखें आहे. विदर्भांत शंकराचार्यांचाच अद्वैत सिद्धांत प्रारंभींपासून मान्य झालेला होता आणि भागवताचांहि भक्तिरसप्रधान उपदेश येथें सर्वसम्मत झालेला होता. महाराष्ट्राचें मुख्य दैवत पण्ढरपूर विदर्भांत असून तेथील विठोबाची भक्ति अन्य वैष्णव भक्तीहून कशी भिन्न आहे, हें मी मध्ययुगीन भारत भाग तीन यांत दाखविलें आहे. हा विशेष गोड भक्तिमार्ग ज्ञानेश्वरापासून विदर्भांतील संत कवींनीं आक्रमिला आहे. शांकरदिग्विजयांत विदर्भांत शंकराचार्यांना विरोध झाला नाहीं, असें दाखविलें आहे, यांतील इंगित हेंच आहे. "अभिगम्य संत भक्तिपूर्वमश्यामकृतपूजः ( क्रथकैशिकेश्वरेण ) अभिवाद्य विदर्भराट् अवादि अथ करनाटवसुंधरामयासः" इत्यादि श्लोकांत कर्नाटकांत आणि त्यापुढें अपरांतांत शंकराचार्यांना विरोध झाला असें वर्णन केलेलें आहे. यावरून ज्ञानेश्वरादि संत कवि अद्वैत मतानुयायी असून भक्तिमार्गाचे पुरस्कर्ते होते, हें आपणांस अन्य तऱ्हेनेंहि दिसून येतें. महाराष्ट्रांत म्हणजे कर्नाटक व गोकर्ण येथें पूर्वकालीन विरोध असला तरी विठ्ठलभक्तीचाच ज्ञानेश्वरांनीं चालविलेला मार्ग पुढें तुकाराममहाराजांनीं चालविला. मला येथें आपल्यास एवढेंच दाखवावयाचें आहे कीं, वैदर्भांतील हें प्राचीन वाङ्मय कविताबद्ध असून अद्वैतमतानुयायी व भक्तिरसप्रधान आहे.

## इंग्रजी राज्य झाल्यानंतर महाराष्ट्रांत

साहित्याला निराळी दिशा लागली, हें प्रसिद्धच आहे. कोंकणांत आणि घाटावर इंग्रजी राज्य प्रथम प्रस्थापित झाल्यानें पद्यरचना मागें पडून गद्यरचना पुढें आली. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनीं गद्यरचनेस मनोहरत्व आणि हृदयग्राहित्व हे गुण प्रामुख्यानें देऊन तीस मराठी भाषेंत बहुतेक पूर्णतेस आणलें. हल्लीं महा-

राष्ट्रांत नाटकें, कादंबऱ्या, इतिहास, चरित्रें इत्यादि गद्य ग्रंथ उत्कृष्ट रीतीचे तयार झाले आहेत आणि होत आहेत. अशा प्रकारचें अभिजात गद्यसाहित्य विदर्भांत सुद्धां अद्याप उत्पन्न झालेलें नाहीं असें मात्र मला वाटतें. याचें कारण विदर्भाचा मोठा भाग अद्यापि पाश्चात्य सुधारणेच्या परिणामाखालीं आलेला नाहीं व वऱ्हाड–नागपूर येथें ही सुधारणा अमलांत येऊन बरींच वर्षें गेलेलीं नाहींत. परंतु काळाच्या प्रगतींत पाश्चात्य सुधारणेची व संस्कृतीची प्रगति विदर्भांतहि झाल्याशिवाय राहणार नाहीं आणि वैदर्भीयांचें भाषापटुत्व पुनः अग्रस्थान पटकावल्याशिवाय रहाणार नाहीं. रा. यादवराव काळे यांचा वऱ्हाडचा इतिहास हा ग्रंथ हेंच अनुमान सिद्ध करतो. रा. कोल्हटकरांचीं नाटकें वरिष्ठ दर्जाचीं असून तींहि वैदर्भास ललामभूत अशींच आहेत, यांत संशय नाहीं. खापर्डे पिता–पुत्र यांचें शब्दलालित्य प्रसिद्ध आहे. मला उमेद आहे कीं, खापर्डे–कनीयान् हे एखादा सुंदर गद्यग्रंथ निर्माण करून वैदर्भाचें भाषाप्रभुत्व जगाच्या निदर्शनास आणून देतील.

## गद्यग्रंथरचनेचा एक मोठा दोष

अशा असतो कीं, त्यांत वाटेल त्या मनुष्यास प्रवेश करतां येतो. मग तो प्रतिभावान असो किंवा नसो. छापखान्याच्या कलेमुळें हा दोष जास्तच वाढत चाललेला आहे आणि महाराष्ट्रांत गलिच्छ प्रकारचें वाङ्मय उत्पन्न होऊं लागलेलें आहे. साहित्याचा हेतु शीलसंवर्धन आणि सभ्यतासंग्रह हा असून या दोन गोष्टींस विरोध करणारें उलट्या दिशेचें गद्यसाहित्य महाराष्ट्रांत रोज रोज बाहेर पडत आहे, ही गोष्ट खरोखरच शोचनीय आहे. व्याजस्तुति व व्याजनिंदा हे अलंकारांत मान्य झालेले आहेत. पण त्यांत सभ्यतेचा अतिक्रम नसून त्यांचाहि उपयोग शीलसंवर्धनाकडेच करावयाचा असतो. पण अशा कठीण प्रयत्नांत न पडतां महाराष्ट्रांतील प्रत्येक लेखक अश्लील वाङ्मय व निंदाप्रचुर लेख लिहिण्यांतच आपलें बुद्धि–वैभव खर्च करीत असलेले दिसतात. कांहीं ठिकाणीं तर नागवी निंदा वावरत असलेली आपणांस दिसते. याचा दुष्परिणाम अर्धशिक्षित अशिक्षित लोकांवर किती होतो याची कोणासहि कल्पना करतां येईल. गद्य वाङ्मयाचा उदय आपल्या विदर्भांत होत आहे अशा वेळीं आपल्या संमेलनानें गुदस्त सालीं ठराव करून निषेध केला, याबद्दल मी आपलें अभि-

नंदन करतों. कादंबऱ्या, नाटकें, व, शिक्षणात्मक लेख इत्यादि साहित्यांत अश्लील व शिष्टाचाराचा भंग करणाऱ्या लेखनपद्धतीचा आपण निषेध केलात, या गोष्टीवरून आपण वेळींच सावध झालां आहांत असें दिसतें. वैदर्भांतील साहित्य-सेवक ज्ञानेश्वरादिकांच्या उत्तम ग्रंथांनीं घालून दिलेल्या सद्वृत्त, बन्धुप्रेम, ईश-सेवा इत्यादि सद्गुण वाढविणाऱ्या मार्गाचा अवलंब करून वैदर्भ साहित्याची कीर्ति पुढें वाढवितील अशी मला उमेद आहे. संमेलनाचें हें कार्य नाजूक आहे पण तें त्यांनीं नेटानें करावें अशी माझी नम्र सूचना आहे. सामान्य निषेधच करून न थांबतां जें जें साहित्य अशा प्रकारच्या सद्भिरुचीचा अतिक्रम करणारें निघेल त्याचा नामानिर्देशासह निषेध करण्यासारखा असल्यास तो जरूर दर वर्षाच्या संमेलनांत करावा असें मला वाटतें.

## सुधारणेची जसजशी वाढ.

होत जाते, तसतसें गद्य वाङ्मय पुढें येऊन पद्य वाङ्मय मागें पडतें असा सर्वत्र अनुभव आहे. त्याचप्रमाणें महाराष्ट्रांतहि आणि वैदर्भांतहि अनुभवास येऊं लागलेलें आहे. आधुनिक कवि महाराष्ट्रांत बरेच कमी झालेले आहेत. त्याप्रमाणें काव्यरचनेची दिशाहि बदललेली आहे. काव्य-रचना मोठ्या प्रमाणावर प्राचीन काळाप्रमाणें या काळांत निर्माण होणें शक्य नाहीं, किंबहुना ज्ञानेश्वर, एकनाथ, मुक्तेश्वर इत्यादिकांसारखे उत्तम कवि हल्लींच्या काळांत निर्माण होणें शक्य नाहीं, असें माझें नम्र मत आहे. कारण गद्य भाषेचा अभ्यास अंगवळणीं पडल्यामुळें गोड पद्यरचना करणें, हें कठीण जातें. शब्दांना शिस्तीला लाऊन पलटणीच्या चालीप्रमाणें चालविणें नयनमनो-हर असतें हें खरें; पण अशी शिस्त लावणें अत्यंत कठीण असतें. अर्थगांभीर्य ठेवून शब्दांची शिस्त लावणारे कवि हे नेहमींच राष्ट्राला वन्द्यहोतात आणि त्यांचीं काव्यें मुखोद्गत करून गातां येत असल्यानें त्यांचा परिणाम गद्य रचने-पेक्षां देशाच्या शीलसंवर्धनावर जास्त होतो. यासाठीं राष्ट्रांत आधुनिक काळां-तहि कवि उत्पन्न होणें आवश्यक आहे. महाराष्ट्रांत असे आधुनिक कवि उत्पन्न होत आहेत, पण वरिष्ठ दर्जाचे उत्पन्न झालेले नाहींत असें मला नम्रपणें वाटत. आपल्या विदर्भांत आधुनिक कवि मधून मधून पुढें येत आहेत, यांत रा. टेकाडे यांची कविता बऱ्याच वरच्या दर्जाची आहे असें मला वाटतें आणि

त्याबद्दल मी विदर्भाचें अभिनन्दन करतों. मला विदर्भांतील नवीन वाङ्मयाची जास्त माहिती नाहीं. यामुळें या दृष्टीनें मी जास्त बोलूं शकत नाहीं.

टेकाड्यांच्या कवितेस ज्या कारणानें विशेष रम्यता आली आहे, तें कारण म्हटलें म्हणजे आपल्या वाङ्मयांत पूर्वी नसलेला व हल्लींच्या परिस्थितींत नवीन उदयास येणारा

## दहावा स्वदेशभक्तिरस

हा होय. नवरसांत याची गणना नाहीं हें साहजिकच आहे. वैदर्भाचें प्रचंड प्राचीन वाङ्मय ईशभक्तिरसानें ओथंबलेलें आहे. तसें वाङ्मय आतां होणें शक्य नाहीं. पण हल्लींच्या काळीं स्वदेशभक्तिरस हा महत्त्वाचा असून त्यानें ओथंबलेलीं काव्यें जशीं पाश्चात्य देशांत आहेत तशीं आपल्याकडे निर्माण झालीं पाहिजेत आणि तीं होऊं लागलींहि आहेत. शेक्सपीयर, टेनिसन, मिल्टन, बायरन, इत्यादिकांचीं काव्यें याच रसानें भरलेलीं असून इंग्रज लोकांच्या स्वदेशभक्तीस हमेशा प्रोत्साहन देत आहेत. त्याचप्रमाणें आपल्याइकडेहि टेकाड्यांसारखे अनेक कवि उत्पन्न होऊन महाराष्ट्रीयांच्या स्वदेशभक्तीस यापुढें प्रोत्साहन देत राहतील अशी उमेद आहे. विदर्भांतील कवि आपल्या प्राचीन काव्यसामर्थ्यानें हा रस पूर्ण आळवतील, यांत मला शंका नाहीं. आधुनिक प्राचीन कवींच्या धर्तीवर काव्यरचना करणारे महीपतितुल्य प्रतिभा असणारे दासगणू यांचें नांव येथें घेतलें पाहिजे. यांची कविता प्रासादिक, सहज स्फूर्तीची, रसाळ असून वैदर्भी रीतीची आहे आणि आश्चर्य हें कीं हे नानाप्रकारचें कवन तात्काळ करतात. दास गणु हे जुन्या तऱ्हेचे कवि आहेत तर रा. टेकाडे हे नव्या तऱ्हेचे कवि आहेत. इंग्रजपूर्व काळांत स्वदेशभक्ति नव्हती, ही गोष्ट निर्विवाद आहे. त्याचें कारण मी येथें सांगत बसत नाहीं. त्यावेळीं त्याची जरूरी नव्हती. पण आतां जगाच्या परिस्थितीप्रमाणें या भारत देशांत स्वदेशभक्तीचा उगम झालेला आहे आणि त्याची आवश्यकताहि आहे. प्रतिभावान् कवि महाराष्ट्रांतील व विदर्भांतील या रसाचीं काव्यें मराठींत निर्माण करून तीस पाश्चात्य देशांच्या भाषांच्या जोडीस बसवतील, अशी मला उमेद आहे. गद्यसाहित्यांत तर या रसाचा जास्त परिपोष होऊं शकतो. ग्रीक वक्त्यांचीं व्याख्यानें, त्याचप्रमाणें मेकॉले वगैरेंचे इतिहास हे स्वदेशभक्तीचा किती परिपोष करतात याचा विचार करतां मराठी वाङ्मय या भागांत अद्याप हीन आहे असें वाटतें. हा कमीपणा

काढून टाकणें विदर्भांतील व महाराष्ट्रांतील ग्रंथकर्त्यांचें कर्तव्य आहे. आपापल्या विशिष्ट रीत्यनुसार ते आपापलें कर्तव्य बजावतील अशी मला आशा आहे.

## भाषेचे गुण कसे असावेत ?

गद्याचे अलंकार कोणते आणि पद्याचे कोणते, रीति म्हणजे भाषाशैली (स्टाइल) भिन्न भिन्न मोहक रीतीची कशी असते इत्यादि विवेचन साहित्य-शास्त्रांतून आपल्या प्राचीन बुद्धिवान् पूर्वजांनीं उत्कृष्ट रीतीनें केलेलें आहे. त्या सर्वांचा उपयोग मराठी पद्य व गद्य साहित्यांत प्रतिभासम्पन्न लेखकांनीं जरूर करावा. मराठी भाषासरणी हृदयंगम असून तिचा शब्दकोश संस्कृताच्या सहाय्यानें फारच मोठा करतां येतो; परंतु संस्कृत शब्द प्राचुर्यानें योजल्यामुळें भाषेस दुर्बोधत्व येतें, एका प्रकारें भाषेस जोर येतो हें खरें, तरीपण भाषेचा मुख्य गुण जो प्रसार तो साधत नाहीं. माधुर्य आणि ओज हे गुण जरी साधले तरी प्रसाद हा गुण जास्त महत्त्वाचा असल्यानें त्याकडे लेखकांनीं जास्त लक्ष द्यावें हें उघड आहे. मुसलमानी शब्द भाषेंत रूढ होऊन मराठी बनलेले असतील तर त्यांस काढून त्यांच्याऐवजीं नवीन दुर्बोध संस्कृत शब्द घालणें केव्हांहि प्रशस्त होणार नाहीं. किंबहुना कांहीं कांहीं इंग्रजी शब्दसुद्धां गद्य वाङ्मयांत अगदीं आपलेसे झालेले अपरिहार्य असे कायम ठेवण्यास हरकत नाहीं. उदाहरणार्थ स्टेशन, तिकिट, मोटार वगैरे शब्द भाषेंत रूढ झालेले आहेत. ते नवीन इंग्रजींत आलेल्या विषयांचे द्योतक असल्यानें तसेच राहिल्यास हरकत नाहीं असें मला वाटतें. या विषयावर जास्त बोलून मी आपला वेळ घेऊं इच्छित नाहीं. येथें त्याचें केवळ दिग्दर्शन केलेलें आहे. गद्य वाङ्मय प्रौढ, मनोरम, प्रसादयुक्त कसें करावें, या विषयावरहि प्राचीन

## संस्कृत गद्याच्या व इंग्रजी गद्याच्या

अनुरोधानें बरेंच सांगतां येण्यासारखें आहे. तेच तेच शब्द किंवा वाक्यें निरनिराळ्या संदर्भांत पुनः पुनः योजून वक्तृत्वपूर्ण व्याख्यान देण्याची उपनिषदांतील गद्यपद्धति पाहिली असतां हे नियम सर्व देशांत कसे सारखे आहेत, हें आपल्या प्रत्ययास येतें. यासंबंधानेंहि अधिक विस्तार न करतां लेखकांस उपनिषदित वाङ्मयाचा जास्त अभ्यास करण्याविषयीं व ग्रीक ग्रंथकार प्लेटो, व

डेमोस्थनिस अशा नामांकित तज्ज्ञांच्या लेखांचा अभ्यास करण्याविषयीं मी शिफारस करतों.

## वैदर्भ साहित्य संमेलनाच्या भावी कार्यापैकीं

मुख्य कार्य माझ्या मतें उमरावतीसारख्या मध्यवर्ती ठिकाणीं शारदा-मंदिर स्थापन करणें, हें होय. विदर्भाचे प्राचीन प्रसिद्ध कवि यांच्या लेखांचें संशोधन करून त्यांचे हस्तलिखित ग्रंथ अशा मंदिरांत एकत्र करून ठेवावे. महाराष्ट्र सारस्वतांत विनायकराव भावे यांनीं या कवींच्या ग्रंथांचा नामनिर्देश केलेला असून त्यांचा इतिहासहि जसा मिळाला तसा लिहून ठेवलेला आहे. हें काम बरेंच झालेलें आहे, तथापि शेंकडों ग्रंथ अद्याप संशोधन करावयाचे आहेत. एकट्या दासोपंतांचें गीतेवर सव्वालक्ष ओव्यांचें व्याख्यान आहे तें वाचलें म्हणजे हा ग्रंथसमूह किती प्रचण्ड आहे याची आपणांस कल्पना होईल. यांपैकीं कित्येक ग्रंथ साहित्याच्या दृष्टीनें अमोलिक आहेत. मुक्तेश्वराच्या महाभारताचीं तीनच पर्वें सांपडलीं आहेत. मुक्तेश्वरानें तीनच पर्वें लिहिलीं असें भावे माननात, पण मला वाटतें मुक्तेश्वराचीं आणखी कित्येक पर्वें विदर्भांतील विद्वान व जिज्ञासु संशोधकांनीं शोध केल्यास सांपडतील आणि त्याचा हा अद्वितीय ग्रंथ बऱ्याच मोठ्या प्रमाणावर भावी पिढीच्या हातीं लागेल. हें कार्य संमेलनानें नेटानें अंगावर घ्यावें आणि एखाद्या मराठींत एम. ए. झालेल्या पदवीधराच्या स्वाधीन हें शारदामंदिर करावें व त्यांच्या-कडून संशोधनाचेंहि कार्य करवावें. विदर्भ जसा विद्वान् आहे तसा सम्पन्नहि आहे. किंबहुना यांत त्याचा महाराष्ट्राशीं विरोध आहे तेव्हां विदर्भास हें कार्य जड जाईल असें मला वाटत नाहीं. तसेंच एक तज्ज्ञमंडळ नेमून नवीन प्रकाशित होणारे जे गद्य व पद्य ग्रंथ शारदा मंदिरांत येतील त्यांपैकीं जो निषेधार्ह भाग असेल त्यावर निषेधाचा शिक्का मारून तो अभिप्राय ग्रंथकर्त्यास कळवावा. हें एक महत्त्वाचें कर्तव्य साहित्यसंमेलनानें केल्यास गुदस्त सालीं केलेला ठराव योग्य रीतीनें अमलांत येईल आणि निंद्य वाङ्मय उत्पन्न होण्यास आळा बसेल.

## ज्या दोन महत्त्वाच्या सूचना

आपणांस मला कराव्याशा वाटल्या त्या मीं केल्या आहेत. आणखी कांहीं गोष्टी आपल्या विषयनियामक कमिटीच्या चर्चेंत पुढें येतीलच. मला

शेवटीं वैदर्भ साहित्यसंमेलन भरवून आपण जें महत्त्वाचें लोकशिक्षणाचें कार्य करीत आहांत त्याबद्दल चार शब्द सांगावयाचे आहेत. पूर्वीं सांगितल्याप्रमाणें उच्च आणि उदात्त साहित्य हें समाजाच्या सर्वांगीण उन्नतीस साधनीभूत असतें. लोकांत श्रेष्ठ गुण वाढावेत, ईशभक्ति,–स्वदेशभक्ति, सत्पुरुषाची भक्ति वाढावी; सत्यप्रीति, उत्तमांचा आदर इत्यादि भावी प्रजेच्या ठिकाणीं गुण विकसित व्हावेत याचें जर परिणामकारक साधन कोणतें असेल तर तें उदात्त साहित्य हेंच होय. कारण या साहित्याचा उपदेश रूक्ष नसून गोड आणि मधुर असतो. आपण काव्याची प्रशंसा करतांना मम्मटांत 'कान्तासम्मिततयोपदेशयुजे' असा गोड दृष्टान्त घेतला आहे. ज्याप्रमाणें प्रिय कांतेचा सदुपदेश मनावर जास्त ठसतो, त्याप्रमाणें उदात्त साहित्याचा उपदेश मधुर शब्द आणि अर्थ यांच्या सहाय्यानें जास्त परिणामकारक होतो. यासाठीं नाटकें आणि कादंबऱ्या या जितक्या उदात्त स्वरूपाच्या असतील तितकें भावी पिढीचें जास्त कल्याण होईल. ग्रंथकारांनीं या गोष्टीकडे जास्त लक्ष दिलें पाहिजे, केवळ मनोरंजन करून लोकांस अनीतीच्या मार्गाचें जास्त प्रलोभन करून देशाची हानि करणें लेखकांस योग्य नाहीं. साहित्यसभेनें यावर जास्त नजर ठेवावी; पण ग्रंथकारानेंहि आपली जबाबदारी पूर्ण ओळखावी. कवींचें सामर्थ्य किती आहे हें रामदासांनीं आपल्या जोरदार शब्दांत येणेंप्रमाणें वर्णिलें आहे.

कवींची आणि साहित्यसेवकांची महती किती आहे याचें वर्णन श्रीसमर्थांच्या जोरदार आणि दिव्यशब्दांनीं मी करतों.

ऐसे पूर्वीं थोर थोर, झाले कवीश्वर अपार,
आतां आहेत पुढें होणार, नमन त्यांशीं ॥
कीं हे अमृताचे मेघ वोळले, कीं हे नवरसाचे ओघ लोटले,
नाना सुखाचे उचंबळले, सरोवर हे ॥
कीं ही सुखाचीं तारवें लोटलीं, अक्षयीं आनंदें उतटलीं,
विश्वजनास उपेगा आलीं, नानाप्रयोगाकारणें ॥
कीं हा ईश्वराचा पवाड, पहातां गगनाहूनी वाड,
ब्रह्माण्डरचनेहूनहि जाड कविप्रबंध रचना ॥

---

# विदर्भ साहित्य परिषदेंत

## पास झालेले ठराव.



ठराव नं. १ यवतमाळ येथील तृतीय अधिवेशनानंतर महाराष्ट्रांतील सुप्रसिद्ध साहित्यसेवक कै. वि. का, राजवाडे, कै. विनायकराव भावे, कै. प्रो. वि. गो. विजापुरकर, कै. रा. ब. साने, कै. रु. ना. आठल्ये दिवंगत झाले. या सर्वांच्या निधनाबद्दल या परिषदेस अत्यंत वाईट वाटत आहे.

ठराव नं. २ केसरी, ज्ञानप्रकाश वगैरे मराठी वृत्तपत्रांस व उषःकाल वगैरे सर्वमान्य ग्रंथांस निजाम इलाख्यांत कित्येक वर्षांपासून बंदी करण्यांत आली असल्यामुळें येथील मराठी वाचकांचें व पर्यायानें मराठी भाषेचें अपरिमित नुकसान होत आहे. तरी ही बंदी काढून टाकण्यांत यावी अशी या परिषदेची निजाम सरकारास विनंति आहे.

ठराव नं. ३ महाराष्ट्रीय ज्ञानकोशाचें कार्य यशस्वी रीतीनें संपविल्याबद्दल ही परिषद डॉ. केतकर व त्यांचे सहकारी यांचें मनःपूर्वक अभिनंदन करिते आणि विदर्भातील सुशिक्षितांनीं आपापल्या प्रांतांतील किंवा जिल्ह्यांतील ऐतिहासिक, भौगोलिक किंवा इतर माहितीसंबंधानें ज्ञानकोशांत चूक आढळून आल्यास ती ज्ञानकोश मंडळास कळवून दुरुस्तीविभाग तयार करण्याचे कामीं साह्य करावें अशी या परिषदेची शिफारस आहे.

ठराव नं. ४ निजाम इलाख्यांत मुद्रण व प्रकाशनाचा धंदा फारच मागसलेला आहे. विद्यावृद्धि व वाङ्मयप्रसाराकरितां जनतेनें व सरकारनें ह्या धंद्याची कसोशीनें जोपसना केली पाहिजे. तरी निजामसरकारनें कोरा कागद, व छापखान्यांस उपयोगी अशा इतर सामानांवरील जकात ( करोडगिरी ) काढून टाकून ह्या धंद्यास उत्तेजन द्यावें, अशी या परिषदेची विनंति आहे.

ठराव नं. ५ ( अ ) मोडी लिपीचा उपयोग दिवसेंदिवस कमी होऊं लागला असून प्रचलित शिक्षणक्रमांत मोडी लिपीविषयीं असलेलें औदासिन्य कायम राहिल्यास ती लिपी नामशेष होण्याची भीति आहे. तरी मुंबई, मध्यप्रांत, व निजाम इलाखा येथील शिक्षणखात्यानें प्राथमिक शिक्षणक्रमांत मोडी ध्य-

लेखन व मोडी वाचनक्रमाचा आवश्यक विषय म्हणून समावेश करावा, आणि परीक्षेतील मराठी प्रश्नपत्रिकांचीं उत्तरें मोडींतून लिहिण्याची परवानगी असावी, अशी या परिषदेची विनंति आहे.

( आ ) प्रत्येक महाराष्ट्रीयानें शक्य तोंपर्यंत पत्रव्यवहार व खाजगी लेखन मोडी लिपींत करावें अशी ह्या परिषदेची शिफारस आहे.

( इ ) मुंबई विद्यापीठानें नव्या सुरू केलेल्या गव्हर्नमेंट कमर्शियल ॲण्ड क्लेरिकल सर्टिफिकेट परीक्षेला मोडीलेखन हा विषय आवश्यक ठेवावा.

ठराव नं. ६ निजामसरकारचें शिक्षणखातें मराठी शिक्षणाकडे दुर्लक्ष करीत आहे तरी मराठी शिक्षणाची योग्य व्यवस्था करावी. आणि प्राथमिक मराठी शिक्षणाच्या स्वतंत्र शाळा उघडून त्यांत मराठी मातृभाषा असणाऱ्या शिक्षकासच नेमावें अशी ह्या परिषदेची विनंति आहे.

ठराव नं. ७ निजाम इलाख्यांतील मराठी विभागाच्या सर्व अदालतींची भाषा ब्रिटिश इलाख्यांत प्रचलित असलेल्या पद्धतीप्रमाणें मराठी असावी अशी या परिषदेची विनंति आहे.

ठराव नं. ८ महाराष्ट्रीय सुशिक्षितांनीं आपला भाषण व लेखन व्यवहार मराठीभाषेव्यतिरिक्त इतर भाषांतून अपरिहार्य कारणाशिवाय करूं नये.

ठराव नं. ९ निजाम सरकारच्या शिक्षण खात्यानें खाजगी शाळासंबंधानें जो कायदा चालू केला आहे तो मराठी भाषेच्या प्रगतीस, विघातक आणि महाराष्ट्रीय विद्यार्थ्यांच्या शिक्षणक्रमांत अडथळा उत्पन्न करणारा असल्यामुळें ही परिषद सदरहु कायद्याचा निषेध करिते, व निजाम सरकारनें आपल्या प्रजेच्या विनंतीस मान देऊन हा कायदा ताबडतोब रद्द करावा अशी या परिषदेची आग्रहाची विनंति आहे.

ठराव नं. १० संस्कृतोद्भव परंतु केवळ विदर्भांतच रूढ असलेले अनेक शब्द व वाक्प्रचार आधुनिक सुशिक्षितांच्या बोलण्यालिहिण्यांतून नाहींसे होत असल्यामुळें मराठी भाषेचें नुकसान होत आहे. तरी असल्या शब्दांचा व वाक्प्रचारांचा संग्रह करून तो प्रसिद्ध करण्याची विदर्भ साहित्य संघानें व्यवस्था करावी. व विदर्भांतील लेखकांनीं स्वतः अशा शब्दांचा व वाक्प्रचारांचा

उपयोग करून व इतर मार्गांनींहि साह्य करावें. अशी ह्या परिषदेची शिफारस आहे.

ठराव नं. ११ हैदराबाद स्टेट लायब्ररींत उर्दू, फारशी, अरबी व इंग्रजी ग्रंथांप्रमाणें मराठी ग्रंथांचाही एक विभाग ठेवण्यांत यावा व अशीं सार्वजनिक मोफत ग्रंथालयें जिल्हानिहाय स्थापन करून त्या त्या जिल्ह्याच्या भाषेंतलि ग्रंथांना प्राधान्य देण्यांत यावें अशी ह्या परिषदेची विनंति आहे.

ठराव नं. १२ मराठी भाषेच्या अभिवृद्धीकरितां निजाम सरकारच्या शिक्षण खात्यानें व उस्मानिया विद्यापीठानें पुढील सूचना अमलांत आणाव्या अशी ह्या परिषदेची विनंति आहे.

( अ ) मराठी जिल्ह्यांत विद्यार्थ्यांना दुय्यम शिक्षण मराठींतूनच यावें.

( आ ) उस्मानिया विद्यापीठांतील मराठी अध्यापकाच्या जागेवर तज्ज्ञ व विद्वान् गृहस्थाची तावडतोब नेमणूक करावी व पुष्कळ दिवस होत असणारी मराठी भाषेची अनास्था दूर करावी.

( इ ) उस्मानिया विद्यापीठांतल्या विद्यमानें मराठी भाषा व वाङ्मय ह्या विषयावर वेळोवेळीं तज्ज्ञांचीं व्याख्यानें करविण्यांत यावींत.



## अध्यक्षांचा समारोप व कांहीं ठरावांवरील महत्त्वाच्या भाषणांचा सारांश

# हैद्राबादकरांचा अनुकरणीय उत्साह



दक्षिण हैद्राबाद येथें शुक्रवार ता. १० जून इ. स. १९२७ रोजीं सायंकाळीं सुमारें ४ वाजतां विदर्भ साहित्य संमेलनाच्या चौथ्या अधिवेशनाला माहाराष्ट्रांतील सुप्रसिद्ध साहित्यसेवक व इतिहासकार दे. भ. चिंतामणराव वैद्य यांच्या अध्यक्षतेखालीं प्रेम थिएटरांत मोठ्या थाटामाटानें व अतिशय उत्साहानें सुरवात झाली. प्रेम थिएटर कागदी व कापडी पताकांनीं सुशोभित करण्यांत येऊन शिवाय मंगलदायक आम्रपपल्लवांच्या माळा थिएटरभर लटकावण्यांत आल्या होत्या. ठिकठिकाणीं कांहीं म्हणीहि लावण्यांत आलेल्या दिसत होत्या. एकंदरींत थिएटर फारच सुंदर शोभिवंत करण्यांत आलें होतें. हैद्राबादकर महाराष्ट्रीयांचा उत्साह आणि एकोपा अवर्णनीय आणि अनुकरणीय असाच आहे. यांत बिलकूल शंका नाहीं.

### संमेलनाच्या कार्यक्रमाला सुरवात

नियोजित अध्यक्षांचें स्वागताध्यक्षांनीं स्वागत केल्यावर कवि श्री. द. वा. पद्माकर यांनीं शारदास्तवन आणि स्वागतपर अशीं दोन पद्यें म्हटलीं. नंतर नांदेडचे कवि राजेश्वर यांनीं एक काव्य गायल्यावर स्वागताध्यक्ष ना. केशवराव यांचें भाषण झालें. संमेलनाला विदर्भांतून ठिकठिकाणची मण्डळी बरीच आलेली दिसत होती. नांदेड, परभणी, बीड, औरंगाबाद, उस्मानाबाद, गुलबर्गा, वगैरे ठिकाणां-हून बरेच प्रतिनिधी आले असून कांहीं स्त्री प्रतिनिधीही हजर होते. प्रतिनिधींची व स्वागत सभासदांची मिळून सुमारें ३०० संख्या होती. शिवाय स्थानिक पुढाऱ्यांपैकीं राजा रायरायान यांचे बंधू राजा त्र्यंबकराज, राजा कारवानकर श्रीनिवासराव, कृ. गो. नाईक बँकर, विश्वनाथराव नाईक, लक्ष्मणराव नाईक, बॅरिष्टर शंकरराव बोरगांवकर, बॅ. विनायकराव कोरटकर, बॅ. रामचन्द्रराव नाईक, बॅ. शर्मा, एम. हणमंतराम, माधवराव गाडगीळ इंजिनियर, निजाम विजयचे सम्पादक श्री. लक्ष्मणराव फाटक वगैरे मण्डळी असून शिवाय व्यापारी वकील वगैरे लोक बरेच हजर होते. प्लॅटफार्मवर जळगांवचे आमदार शेट राजमल लक्ष्मीचंदहि हजर होते. स्त्रियाहि बऱ्याच हजर होत्या. एकंदरींत थिएटर बहुतेक भरलेलें दिसत होतें. परिषदेचे चिटणीस श्री. काशिनाथपंत वैद्य

व दिगंबरराव बिंदु आणि स्वागताध्यक्ष ना. केशवराव ही मण्डळी येणाऱ्या मण्डळींचें अत्यंत अगत्यपूर्वक असें स्वागत करतांना दिसत होती.

## दुसरी बैठक

शनिवार ता. ११ रोजीं सकाळीं आठ वाजण्याच्या सुमारास प्रेमथिएटरांत आरंभ होऊन प्रथम नांदेडचे कवि श्री. देविदासराव महाजन यांनीं एक पद्य गाऊन दाखवल्यावर

### पहिला दुखवट्याचा ठराव

अध्यक्षांनीं मांडला व हा ठराव सर्वांनीं उभे राहून पास केल्यावर दुसरा ठराव

### वर्तमानपत्रांवरील बंदी उठवण्याचा

श्री. गिरीरावआण्णा जहागिरदार यांनीं मांडला. ठरावावर भाषण करतांना श्री. गिरीरावआण्णा म्हणाले कीं, ज्ञानसम्पादन करण्याचीं अनेक साधनें आहेत, त्यांत सुधारणेच्या काळांतील वर्तमानपत्र हें मुख्य साधन आहे. अशा साधनांना बंदी करणें अत्यंत घातुक आहे. चुकीनें, बुद्धिपुरस्सर किंवा आपल्या जातीच्या हितासाठीं वगैरे कोणत्याना कोणत्या तरी कारणानें वर्तमानपत्रांना बंदी केल्यामुळें आपलें फारच नुकसान झालेलें आहे. पातिव्रत्याबद्दलचें शिक्षण जर कोणा नागरिकांना किंवा कोणत्याहि प्रजेला घ्यावयाचें असेल तर तें आमच्या निजाम सरकारच्या प्रजेपासून जरूर घ्यावें. ठिकठिकाणीं लोकांनीं सभा भरवून ही बंदी उठवण्यासाठीं ठराव केले पाहिजेत, चळवळ केली पाहिजे. रेसिडेन्सींत हीं वर्तमानपत्रें येतात व तेथें निजाम हद्दींतील इच्छा असणारे लोक जाऊन वाचतातही ! नंतर अनुमोदन देतांना

### श्री. नारायणराव म्हणाले

पोलिटिकल डिपार्टमेंटच्या प्रेस कमिशनरची ही चूक आहे. २२ वर्तमानपत्रें बंद झालीं व त्यांत सोळा सतरा वर्तमानपत्रें मराठी असल्यामुळें साहजिकच मराठी भाषेचें फारच नुकसान झालें आहे. प्रजेला वाङ्मयापासून परावृत्त करणें हें कोणत्याहि सरकारचें कर्तव्य नाहीं. हा प्रजेवर अत्यंत जुलूम आहे.

अद्याप देखील केसरीसारख्या वर्तमानपत्राची निजाम सरकारनीं बंदी कायम ठेवावी, ही गोष्ट आश्चर्यकारकच होय. नन्तर श्री. पांडुरंगराव जोशी म्हणाले कीं, अलीकडे केसरीवरील बन्दी ब्रिटिश सरकारनींसुद्धां उठवली असतांना आपल्या निजामसरकारनें ही बन्दी कां काढूं नये ? नन्तर अध्यक्षांच्या सांगण्यावरून भाषण करतांना

## ना. केशवराव म्हणाले

जी गोष्ट घडली ती घडली ! पण घडलेल्या गोष्टींची सुधारणा करण्यासाठींच हा ठराव आपणांपुढें मांडीत आहें. मी ज्या वेळीं पुण्यास जातों त्यावेळीं केसरी व ज्ञानप्रकाशचे अंक जे पाहिले नसतील ते पहात असतों. तेव्हां मला येथील एका अधिकाऱ्यांनीं विचारलें कीं, तुम्ही ही गोष्ट कायद्याच्याविरुद्ध करतां आहां ! त्यावर मीं त्यांस असें सांगितलें कीं, आणण्याची बंदी आहे, पाहण्याची बंदी नाहीं. ( हास्य ) निजामस्टेटमध्यें बंदी आहे, पण रेसिडेन्सीमध्यें बंदी नसल्यामुळें मोंगलाईत राहून आंग्लाईत जाऊन वर्तमानपत्र वाचण्याची इच्छा तृप्त करावी लागते व तसें करणारे कांहीं लोक आहेत हेंहि निजामसरकारला माहीत नाहीं असें नाहीं. हैद्राबाद येथें १८८८ मध्यें हैद्राबादवृत्त या नांवाचें वृत्तपत्र प्रथम निघालें व त्याच सालीं तें बंद झालें. नंतर १९०५ सालीं पुनः एक वर्तमानपत्र निघालें व तें निजामवैभवहि त्याच सालीं नष्ट झालें. नंतर १९२१ सालीं एक वर्तमानपत्र निघालें व तें अद्यापर्यंत जीव धरून आहे. पण तें केव्हां मारलें जाईल याचा मात्र नेम नाहीं. अशी स्थिति आपल्या राज्यांतली वर्तमानपत्रांची आहे आणि दुसऱ्या राज्यांतील वर्तमानपत्रांना येथें येण्यास बंदी आहे. अशा स्थितींत लोक रेसिडेन्सीमध्यें जाऊन चोरून वाचतातच. तेव्हां सरकारनें त्यांना उघड उघड वाचण्याची परवानगी द्यावी हाच या ठरावांतील आशय आहे. ज्या कारणानें उर्दू वर्तमानपत्र बंद केलें होतें, तेंच कारण त्या वर्तमानपत्रांत सध्यांहि येत असतांना त्या उर्दू वर्तमानपत्राची बंदी उठवण्यांत येते; पण मराठी वर्तमानपत्रांतील बंदीचीं कारणें बंद झालीं असून सुद्धां त्यांच्यावरील बंदी सरकार उठवीत नाहीं, ही आश्चर्याची गोष्ट आहे. निजाम सरकारनीं विद्वान् माणसांच्यामार्फत रिपोर्ट मागवून वर्तमानपत्रांच्या बाबतींत सहानुभूतिपूर्वक विचार करावा, हेंच या ठरावांत

म्हटलेलें आहे, नंतर ठरावावर मतें घेतां तो एकमतानें पसार झाला. नंतर कवि विद्रकर यांनीं महाराष्ट्राच्या पावन खिण्डींतील बाजी देशपांडे यांच्या पराक्रमावरील पद्य गाऊन दाखविल्यावर माधव शंकर यांनीं पावसाळ्यावरील काव्य फारच गोड गाऊन दाखवलें. नंतर तिसरा ठराव

अध्यक्षांनींच मांडला व तो सर्वानुमतें पास झाला.

नंतर चौथा ठराव नांदेडचे श्री. देवीदासराव महाजन यानीं मांडला.

या ठरावाच्या स्पष्टीकरणार्थ श्री. महाजन यांचें थोडक्यांत भाषण झाल्यावर अनुमोदन देतांना निजामविजय वर्तमानपत्राचे संपादक श्री. लक्ष्मणराव फाटक यांनीं वाङमय आणि मुद्रण या दोन्ही गोष्टींचा किती निकट संबंध आहे हें सांगून शेतकऱ्यांप्रमाणेंच लेखकवर्गाची गरीब स्थिति आहे. करितां सरकारनीं वाङ्मयप्रसार होण्यासाठीं कागद वगैरे वरील कर माफ करावा, अशी विनंति आहे असें सांगितलें. नंतर मतें घेतां ठराव एकमतानें पास झाल्यावर श्री. राजेश्वर मुळावेकर यांनीं पर्वतीच्या पूर्वीच्या व आजच्या दशेचें मार्मिक वर्णन केलेलें स्वकृत काव्य फारच सुंदर म्हणून दाखविल्यावर श्री. देवीदासराव महाजन यांनीं "अरुणोदय झाला, वेल्हाळा" हें पद्य गाऊन दाखवलें व नंतर पांचवा ठराव

**मोडी लिपीचा उद्धार करण्याचा**

अध्यक्षांनींच मांडला व तो सर्वानुमतें पास झाला, साहवा ठराव श्री गोविंदराव नानल वकील यांनीं

**मराठी शिक्षणाच्या शाळा उघडण्याबद्दल**

मांडला. ठराव मांडल्यावर श्री. गोविंदराव नानल म्हणाले, हा ठराव म्हणजे पूर्वी आपण जें करीत होतां तेंच पुनः सुरू करा असें निजामसरकारला विनंति करण्यासारखें आहे. आमच्या लहानपणीं मोंगलाईंत जी शिक्षणपद्धति सुरू होती तीच पुनः सुरू करा असें या ठरावानें निजाम सरकारला सांगत आहोंत. आपणाला उर्दू आणि इंग्लिश या मातृभाषा आमच्या मुलांच्या नसल्यामुळें त्यांचें शिक्षण ओझ्यासारखें वाटत आहे आणि त्यामुळें शिक्षणापासून मिळणाऱ्या ज्ञानाच्या बाबतींत आमचें अतोनात नुकसान होत आहे. खाजगी मराठी शिक्षणाच्या शाळाहि सरकारनें कायदा करून बंद केल्या, ही अत्यंत अनिष्ट गोष्ट झालेली

आहे. परभणी येथील शाळा बंद करतांना शाळा एकदम बंद करा, नाहींतर **पोलीस मार्फत** बंद करण्यांत येईल असा हुकूम देण्यांत आला. खाजगी शाळेची व्याख्याच सरकारनीं अशी केलेली आहे कीं त्यामुळें आमच्या चार पांच भावांच्या एकत्रित कुटुंबांतील मुलांना घरांत शिक्षण देणें सुद्धां कठीण झालेलें आहे. एका गांवीं चार मुलें वैदिकाचा अभ्यास करीत असतांना सुद्धां त्यांना मनाई करण्यांत आलेली आहे. दुसऱ्या भाषासाठीं युनिव्हर्सिट्या निघतात आणि आमच्या भाषेसाठीं सरकार कांहीं करीत नाहींच, पण आमचें आम्ही करतों तेंहि सरकार आम्हांस करूं देत नाहीं ही अत्यंत दुःखाची गोष्ट होय. मराठीकडे दुर्लक्ष होऊं नये म्हणूनच हा ठराव आपणांपुढें मांडण्यांत येत आहे. अशा आशयाच्या भाषणानंतर अनुमोदन देतांना श्री. जिवबाळराव अळंद्कर, वकील, गुलबर्गा, यांनीं सांगितलें कीं, संस्थानच्या एकतृतीयांश भागांत मराठी मातृभाषा असणारे हिंदु लोक राहत आहेत, ही गोष्ट सरकारनें जरूर नजरेपुढें घ्यावी. आमच्या मातृभाषेची हेळसांड प्राथमिक शाळांत मुळांतच होत आहे. नंतर दुजोरा देतांना श्री. श्रीनिवासराव गोळेगांवकर यांनीं सांगितलें कीं, निजाम सरकारच्या हद्दींत बरेच महाराष्ट्रीय मराठी भाषा मातृभाषा असणारे रहात असतांना त्यांना त्या भाषेंत शिक्षण मिळूं नये ही अत्यंत दुःखाची गोष्ट होय. नंतर ठराव सर्वानुमतें पास झाल्यावर सातवा ठराव पुण्याचे प्रो. गोगटे यांनीं मांडला.

श्री. पद्माकर कवि यांनीं तीन पद्यें म्हणून दाखविल्यावर आठवा ठराव

## सर्व अदालतींची कोर्टांची भाषा मराठीच असावी

असा मांडला. या ठरावावर भाषण करतांना श्री. गोविंद्राव नानल म्हणाले कीं, साक्षीदार मराठींत बोलतों व त्याचीं भाषांतरें कारकून करून घेतो. पण तीं नीट केलीं गेलीं नसल्यामुळें खटल्याच्या निकालांत कित्येक वेळां अनर्थ होत असतात. ब्रिटिश हद्दीत जबान्यांचीं भाषांतरें केलीं जात नाहींत. तर साक्षीदार ज्या भाषेंत बोलतो त्याच भाषेंत लिहून घेण्याची व्यवस्था केली आहे त्याचप्रमाणें आपल्या इकडेहि व्यवस्था करणें जरूर आहे. यानंतर अनुमोदन देतांना श्री. नारायणराव अयाचित ह्यांनीं, साक्षीदाराप्रमाणेंच आरोपींचीहि जबानी लिहून घेत असतां कसें खऱ्याचें खोटें व खोट्याचें खरें होतें हें स्पष्ट रीतीनें सांगितल्यावर श्री. बळवन्तराव घाटे ह्यांनीं ठरावाला दुजोरा दिला

च ठराव सर्वानुमतें पास झाला व सकाळचें काम संपविण्यांत आलें. नंतर दुपारीं साडेतीन वाजतां श्री. दत्तोपंत पद्माकरांच्या ईशस्तवनपर पद्यानें सुरुवात होऊन नववा ठराव श्री. काशिनाथपंत वैद्य ( सम्मेलनाचे चिटणीस ) ह्यांनीं मांडला.

## खासगी शाळांच्या कायद्याचा निषेध

करणारा ठराव वाचून दाखविल्यावर श्री. काशिनाथपंत वैद्य म्हणाले कीं, या कायद्याला कौन्सिलची मंजुरी घेतली, पण लोकांची ओरड झाली त्या वेळीं घेतली ! प्रथम कायदा पास केला त्यावेळीं मंजुरी घेतली नव्हती. शिक्षणाच्या बाबतींत निजामसरकार इतर संस्थानिकांपेक्षां फारच मागें आहे. या ठरावाला अनुमोदन देतांना श्री. गिरीराव अण्णा जहागिरदार म्हणाले कीं, हा कायदा करून ज्ञान उत्पन्न होऊंच नये, अशी व्यवस्था निजामसरकारनें प्रजेंत करून ठेवलेली आहे. यानंतर दुजोरा देतांना श्री. गोविंदराव नानल वकील माहिती-पूर्ण भाषण करतांना म्हणाले कीं, विचार न करतां विसंगत असा हा कायदा केलेला आहे. हा कायदा अत्यंत त्रासदायक आहे. नंतर नानल वकिलांनीं कायदा वाचून दाखवून त्याच्या स्पष्टीकरणार्थ भाषण करतांना तो कसा अव्यव-हार्य व त्रासदायक आहे याचें मार्मिक विवेचन सविस्तर केलें. नंतर मतें घेतां टाळ्यांच्या प्रचंड गजरांत ठराव सर्वानुमतें पास झाला. नंतर दहावा ठराव संमेलनाचे दुसरे चिटणीस श्री. दिगंबरराव बिन्दु यांनीं मांडला.

## संस्कृतोद्भव वाक्प्रचारांचा संग्रह

हा ठराव मांडल्यावर भाषण करतांना श्री. दिगंबरपंत बिंदु म्हणाले कीं, मराठी भाषेला निश्चित स्वरूप यायला लागलेलें आहे यांत बिलकूल शंका नाहीं. मराठीच्या गद्य लिहिण्याला सुरवात मुंबई इलाख्यांत झाली असून व्याकरणालाहि सुरवात पुण्या मुंबईकडेच झाली आहे. आणि त्याचाच प्रसार इतर ठिकाणीं झाला आहे. आपल्याकडे नांदेडची भाषा औरंगाबादला नाहीं, औरंगाबादची भाषा परभणीला नाहीं व परभणीची भाषा वऱ्हाडांत नाहीं अशी स्थिति आहे. पूर्वीचे वाक्प्रचार आपणांस सांपडणार नाहींत. " मी काम करून राहिलों आहे " हा वाक्प्रयोग आपणांस हास्यास्पद वाटेल, पण वऱ्हाडांत आणि औरंगाबादला असे वाक्प्रचार आपणांस नेहमीं आढळतील. भाषा प्रथम व नंतर व्याकरण हें

तत्त्व लक्षांत ठेवून, व्याकरणाला न भितां भाषा रूढ केली पाहिजे. तेव्हां जे रूढ शब्द प्रचारांत आहेत त्यांचा व मागें रूढ होते त्यांचा संग्रह करणें अत्यंत आवश्यक आहे. अनुमोदन देतांना श्री. दत्तोपंत तुळजापुरकर म्हणाले कीं, वाक्प्रचारांचा संग्रह पुण्याच्या माणसानें येऊन केला पाहिजे म्हणजे तो व्यवस्थेशीर रीतीनें होईल. नंतर दत्तोपंत पद्माकर यांनीं दुजोरा दिल्यावर ठरावाच्या स्पष्टीकरणार्थ अध्यक्ष श्री. चिंतामणराव वैद्य म्हणाले कीं, प्रत्येक भाषेला विकृति असते. कोणत्याहि देशांत जा, प्रांतीय व जिल्हानिहाय फरक पडत असतो. पण विदर्भ देशाच्या मूळच्या शब्दांचा संग्रह करावयाचा आहे, ही गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे. कांहीं देशांत ' न ' चा ' ण ' होतो. मुलें वऱ्हाडांत आईला माय म्हणतात पण मुंबई इलाख्यांत " देमाय धरणी ठाय " या वेळींच तो शब्द उपयोगांत आणतात. या माय शब्दांत खरोखरच मोठी माया भरलेली आहे. नंतर मतें घेतां ठराव पास झाला. रा. अनंत गोपिनाथ आणि व्यंकटराव गोविकर यांनीं काव्य म्हटल्यावर अकोल्याच्या श्रीमती शारदाबाई परांजपे यांच्या संमेलनावरील एका लेखांतील कांहीं भाग श्री. दत्तोपंत पद्माकर यांनी वाचून दाखविला. नंतर त्यांनीं अकरावा ठराव

## स्टेट लायब्ररींत मराठी ग्रंथांचा समावेश

करण्यासंबंधाचा माण्डला. हा ठराव सर्वानुमतें पास झाल्यावर सौ. लक्ष्मीबाई लेले यांनीं दोन पद्यें सुस्वर आणि गोड आवाजांत म्हणून दाखविलीं. नंतर बारावा ठराव

## निजाम सरकारच्या शिक्षण खात्याला व उस्मानिया विद्यापीठाला सूचनार्थ

श्री. काशिनाथपंत वैद्य यांनीं माण्डला. वरील ठराव मांडल्यावर श्री. काशिनाथपंत वैद्यांचें ठरावांच्या स्पष्टीकरणार्थ फारच सुंदर आणि कळकळीनें भरलेलें भाषण झाल्यावर बॅ. शंकरराव बोरगांवकर अनुमोदनार्थ बोलले, त्यांस श्री. घारे यांनीं दुजोरा दिला व सर्वानुमतें ठराव पास झाल्यावर कवि राजेश्वर यादवराव व कवि देवीदास महाजन या दोघांनींहि कवितेला उद्देशून असलेल्या कविता सुस्वर आणि गोड म्हणून दाखविल्या. विशेषतः कवि राजेश्वर यादवराव यांचा आवाज व म्हणण्याची पद्धत फारच नामी आहे. नंतर

**संमेलनास आलेल्या यशःचिंतनपर पत्राचा उल्लेख** करतांना श्री. काशिनाथपंत वैद्य म्हणाले कीं, श्री. राघवेंद्रराव शर्मा यांचें पत्र पुण्याहून आलेलें आहे. राघवेंद्रराव शर्मा यांची आठवण आम्हांस वेळोवेळीं होत असून त्यांची उणीव अशा सार्वजनिक कार्याच्या वेळीं फारच आम्हांस भासत असते. कोल्हापुराहून प्रो. श्री. नी. चापेकर, पुण्याहून गो. मा. चिपळूणकर साताऱ्याहून वाग्भट देशपांडे, वऱ्हाडांतून यादवराव काळे, बळवंतराव खापर्डे, नागपुराहून गोपाळराव ओगले, यवतमाळहून माधवराव अणे, काश्मीराहून येथलि पुढारी श्री. वामनराव नाईक वगैरे मंडळींचींहि पत्रें आलेलीं आहेत. नंतर

**अध्यक्षांचा सुंदर समारोप**

झाला. त्या वेळीं श्री. चिंतामणराव वैद्य म्हणाले कीं, आपल्या संमेलनाचें कार्य यशस्वी रीतीनें पार पडलें याबद्दल परमेश्वराचे प्रथम आपण आभार मानले पाहिजेत. तसेंच साहित्यसेवा उत्तम करावी ही जी आपणांमध्यें कळकळ उत्पन्न झाली आहे त्यामुळेंच ही परिषद् अत्यंत निर्विघ्नपणें पार पडली आहे. विदर्भ-देशांत ५० लक्षांहून जास्त लोक मराठी बोलणारे आहेत. अशा देशांतील अभि-जात भाषेच्या उद्धारासाठीं झटणें हें प्रत्येकाचें पवित्र कर्तव्य आहे. उत्तम वाङ्मय उत्तम साहित्य तयार होऊन लोकांच्या सद्गुणांचा परिपोष झाल्यावर विकास व्हावा याचसाठीं आपण हा संमेलनाचा जो प्रयत्न केलात त्याबद्दल मी आपलें, हैद्राबादकरांचें अभिनंदन करतों. अडचणीं असून सुद्धां न भितां तुम्हीं संमेलन यशस्वी रीतीनें पार पाडलेंत याबद्दल मी आपलें पुनः एकदां अभिनंदन करतों. ज्ञानेश्वर, मुक्तेश्वर इत्यादि कवींच्या प्रतिभा या प्रांतांत आहेत यांत बिलकूल शंका बाळगण्याचें कारण नाहीं असें मला आतां संमेलनांत ऐकलेल्या काव्यावरून म्हटल्या-वांचून रहावतच नाहीं, लालमभूत असे ग्रंथहि निर्माण होतील अशीहि मला आशा आहे, "वैदर्भ साहित्य संमेलनाचा। उत्कर्ष होतो प्रतिवर्षी साचा। ज्ञाने-श्वराच्या सुकृपा प्रसादें। विदर्भकीर्ति पसरो प्रसादें॥" हें काव्य म्हणून मी आपणां सर्वांचे पुनः एकदां आभार मानून रजा घेतों. अशा आशयाच्या अध्य-क्षांच्या भाषणानंतर स्वागताध्यक्षानीं अध्यक्षांना टाळ्यांच्या गजरांत हार घातल्यावर स्वागताध्यक्ष ना. केशवराव यांनीं अध्यक्षांचे आभार मानल्यावर संमेलनाचे चिटणीस श्री. काशिनाथपंत वैद्य आणि श्री. दिगंबरराव बिंदु यांचे उत्साहपूर्वक अत्यंत मेहनतीनें काम केल्याबद्दल आभार मानल्यावर व्हालण्टी-

असेंच कॅप्टन श्री. लेले व कृष्ण स्वामी अय्यर यांचे स्वयंसेवकांसह आभार मानल्यावर थिएटरचे मालक शेट लालजी मेघजी यांचे आभार मानले व श्री. कृष्णाजीपंत नाईक यांनीं सर्व प्रतिनिधींचा जेवण्याखाण्याचा खर्च केल्याबद्दल त्यांचें आणि श्री. लक्ष्मणराव नाईक व श्री. विश्वनाथराव नाईक यांनीं आपलीं घरें प्रतिनिधींना उतरण्यास मोकळीं करून दिलीं त्यांचे आभार मानून इतरहि मंडळींचे आभार मानले. अध्यक्षांची उतरण्याची व्यवस्था श्री. विश्वनाथपंत नाईक यांनीं फारच उत्तम आणि आपलेपणानें ठेवली होती. नंतर स्वागताध्यक्षांचे आभार मानतांना श्री. गिरीराव अण्णा जहागिरदार यांनीं ना. केशवराव कसे स्वावलंबनावर व स्वतःच्या पायावर शिक्षण घेऊन न्यायाधिशापर्यंत चढले याचें मार्मिक वर्णन केलें व ना. केशवराव लवकरच रिटायर होऊन देशकार्यासाठीं बाहेर पडणार आहेत असें सांगून त्यांना परमेश्वर दीर्घायुषी करो अशी परमेश्वराची प्रार्थना केल्यावर श्री. कृष्णाजीपंत नाईक व ना. केशवराव यांना टाळ्यांच्या गजरांत हार घातले व संमेलन अत्यंत यशस्वीपणानें पार पडलें ही आनंदाची व हैद्राबादकरांच्या अभिनंदनाच्या पात्र अशीच गोष्ट होय.

# हैद्राबाद हिंदु सामाजिक परिषद्.



## अधिवेशन ६ वें.

## स्वागताध्यक्षांचें दणदणीत भाषण ! लोकांची स्पृहणीय विचारक्षमता !



हैद्राबाद हिंदू सामाजिक परिषदेच्या नियोजित अध्यक्ष श्री. सरलादेवी चौधराणी बी. ए. यांची स्वारी गेल्या रविवारीं सकाळीं नऊ वाजतां कलकत्त्याहून मेलनें आली. स्टेशनावर त्यांच्या स्वागतार्थ २००।२५० पर्यंत मंडळी आली होती. गाडी स्टेशनमध्यें येतांच त्यांस तेथें हार घालण्यांत आल्यावर मोटार-मधून त्यांस त्यांच्या उतरण्याच्या ठिकाणीं डॉ. मल्लाण्णा यांच्या बंगल्यावर पोंचवून मंडळी घरोघर निघून गेली. ४॥ वाजतां प्रेमथिएटरमध्यें परिषदेच्या कामास सुरवात झाली. ठरलेल्या वेळापूर्वींच सर्व थिएटर चिकार भरून गेलें होतें. स्त्रियांची संख्याही २५०।३०० पर्यंत असावी. स्वा. मं. चे सभासद व प्रतिनिधि मिळूनच सुमारें ३०० पर्यंत मंडळी असून प्रेक्षकांना तर जागा पुरण्याचीही पंचाईत वाटूं लागली. स्टेजवरती स्वागताध्यक्ष बॅ. नाईक, न्या. केशवराव, श्री. राजा रायरायानं, श्री. कारवानकर, रा. ब. व्यं. रड्डी. डॅा. सौ. व कुमारी मल्लाण्णा, श्री. चिंतामणराव वैद्य, श्री. प्रो. गोगटे व इतर बडी मंडळी दिसत होती. प्रथम ईशस्तवनपर एक पद्यगान झाल्यानंतर आंध्र मुलींनीं एक दोन पदें म्हटलीं व नंतर श्री. दे. ल. महाजन यांचेंही एक पद्यगायन झालें. नंतर स्वागताध्यक्ष बॅ. रामचंद्र नाईक यांनीं आपलें अत्यंत सुश्राव्य भाषण वाचून दाखविण्यास सुरवात केली; इतक्यांत येथील ए. कौं. चे अध्यक्ष महाराजा बहादुर सर किसन प्रसाद यमिनुस सल्तनत यांची स्वारी आल्याचें समजल्यामुळें बॅ. नाईक त्यांस आणण्याकरितां पुढें गेले. ते येतांच सर्व जमलेल्या मंडळी-कडून टाळ्यांच्या कडकडाटांत उभें राहून त्यांचें स्वागत करण्यांत आलें व बॅ. नाईक यांनीं ते आल्याबद्दल त्यांचे परिषदेतर्फे आभार मानून आपल्या भाषणास पुनः सुरुवात केली. ते म्हणाले,

हैद्राबाद सामाजिक परिषदेचा स्वागताध्यक्ष या यात्यानें मी आपणां सर्व प्रतिनिधि बंधु भगिनींचें अंतःकरणपूर्वक स्वागत करितों. या दिवसांत आपण त्रास सोसून येथपर्यंत येण्याची तसदी घेतली आहे, पण आमच्याकडून आपल्या राहण्याची नीट व्यवस्था होऊं शकली नाहीं हें आम्ही जाणून आहों. तथापि ज्या महत्कार्याकरितां आपण जमलां आहां तिकडे लक्ष्य देऊन व्यवस्थेंतील दोषांबद्दल क्षमा कराल अशी आशा आहे. या अधिवेशनाच्या अध्यक्ष श्रीमती सरलादेवी चौधराणी बी. ए. या उत्तर हिंदुस्थानांतील एक नामांकित सुशिक्षित विदुषी असून पौर्वात्य व पाश्चिमात्य सामाजिक परिस्थितींचा त्यांनीं बराच विचार केलेला आहे आणि आपलें सर्व आयुष्य राष्ट्रसेवेंत अर्पण केलेलें आहे. स्वागत मंडळाच्या उपाध्यक्ष श्रीमती अहिल्याबाई मल्लुणा याही विलायतच्या पदवीधर असून समाजसुधारणेंत बराच भाग घेणाऱ्यांपैकीं—विशेषतः स्त्रीशिक्षणाबाबत विशेष उत्साहानें झटणाऱ्या आहेत. अशा रीतीनें देशांतील दोन निरनिराळ्या भागांतील दोन विदुषी भगिनी या परिषदेंत भाग घेत आहेत व त्यामुळें ही परिषद् यशस्वी होण्यास मदत झाली आहे.

प्रत्येक व्यक्तीनें किंवा समाजानें वेळोवेळीं आपल्या स्थितीवर विचार करून तींत सुधारणा करण्याचे उपाय शोधून काढले पाहिजेत. हिंदूधर्मांत अनेक परिवर्तनें घडलीं असून संस्कृति कायम ठेऊन बदललेल्या परिस्थितीप्रमाणें वेळोवेळीं सुधारणा अंगिकारणें हेंच हिंदूसमाजाच्या जिवंतपणाचें लक्षण आहे आणि म्हणूनच शास्त्राद्रूढिर्बलीयसी, होऊन बसली आहे.

जोंपर्यंत आमच्या समाजाची सुस्थिति होती तोंपर्यंत सत्तेच्या जोरावर किंवा समाजाच्या जिवंतपणामुळें आम्ही आपल्या आचारपद्धतींत योग्य ते फेरफार घडवून आणीत होतों. यासच कौटुंबिक स्थानिक किंवा सामाजिक चालीरीती ही संज्ञा दिली जात असे. आज हिंदुसमाजाकरितां अशी कोणतीही संस्था उरली नाहीं. आम्ही अशा प्रकारें कमकुवत व भ्याड झालों आहों कीं जरी आपल्या प्रचलित चालीरितींना अपायकारक समजतों तथापि नवीन चालीरीति अमलांत आणण्याची आपल्याजवळ धमक नाहीं.

या भरतखंडांत बऱ्याच सन्माननीय महापुरुषांनीं हिंदु संस्कृतीच्या सुधारणेकरितां वेळोवेळीं यशस्वीरीतीनें प्रयत्न केले. त्यांचीं नांवें उदाहरणार्थ राजा राममोहनराय, स्वामी विवेकानंद, स्वामी रामकृष्ण, स्वामी रामतीर्थ, स्वामी

दयानंद सरस्वती, न्या. रानडे, न्या. चंदावरकर हीं होत. हैद्राबाद इलाख्यांत प्रथमतः ज्या कांहीं महनीय व्यक्तींनीं अशा प्रकारच्या प्रयत्नाचा आरंभ केला त्यांत डॉ. अघोरनाथ, राय बाल– मुकुंद साहेब, वरदराज साहेब मुदलीयार, रामचंद्र साहेब पिळे इत्यादि होत. हैद्राबाद इलाख्यांतील समाजसुधारणेचे नेते या दृष्टीनें आपण डॉ. अघोरनाथ साहेबांना जाणत आहों. राय बालमुकंद साहेबांना समाजसुधारणेच्या प्रश्नाविषयीं अत्यंत गोडी होती आणि त्यांनीं समाजसुधारणेसंबंधीं सर्वसाधारणरीत्या व अस्पृश्योद्धारासंबंधीं जें कार्य केलें आहे तें आपणां सर्वांस उत्तम रीतीनें विदित आहे. ते बोलके सुधारक नव्हते !

इलाख्यांत अशा प्रकारच्या परिषदा भरविण्यांत येण्याची आवश्यकता वाटूं लागली त्यावेळीं पहिलें अधिवेशन सन १९१८ सालीं श्रीसाधुनंद महाराज यांच्या अध्यक्षतेखालीं नांदेड जिल्ह्यांतील कवाणा गांवीं भरविण्यांत आलें. दुसरें अधिवेशन मु. हद्गांव येथें १९१९ सालीं न्या. केशवरावजी यांच्या अध्यक्षतेनें भरविण्यांत आलें. त्यानंतर तिसरें अधिवेशन श्रीमान् वामन नाईक साहेब जहागीरदार यांच्या अध्यक्षतेखालीं नांदेड येथें भरविण्यांत आलें. चौथें अधिवेशन प्रो. कर्वे यांच्या अध्यक्षतेखालीं हैद्राबाद येथें भरविण्यांत आलें असून पांचवें गुलबर्गा येथें बॅ. जयकर यांच्या अध्यक्षतेखालीं झालें. गेलीं अधिवेशनें यशस्वी करण्यांत श्री. राघवेंद्रराव शर्मा यांचा भाग बराच प्रामुख्यानें होता. याप्रसंगीं त्यांची आम्हांस विशेष आठवण होते. जरी ते आज येथें हजर राहाण्याच्या परिस्थितींत नाहींत तरी ते अंतःकरणानें आपल्यांतच आहेत. एवढें या ठिकाणीं म्हणणें अप्रासंगिक होणार नाहीं. ते जर येथें असते तर आपणास सहाव्या अधिवेशनाऐवजीं दहावें अधिवेशन पहाण्यास मिळालें असतें ( टाळ्या ).

राजकीय व धार्मिक महत्त्वाचे ठराव आमच्या परिषदांत समाविष्ट असतात असा आक्षेप आहे. पण असे प्रश्न समाजहितकारक असतात एवढें सांगितलें म्हणजे पुरें. एखाद्या प्रश्नाचा धार्मिक व राजकीय परिषदांतून विचार होतो इतक्यावरूनच अशा परिषदांतून त्यांचें उच्चाटन होणें योग्य होणार नाहीं. हिंदूंच्या धार्मिक चालीरीतींत योग्य ते फेरफार घडवून आणील अशी हिंदुस्थानांत विशेषतः इलाख्यांत एकही धार्मिक संस्था नाहीं. व यामुळें जनतेच्या धर्मविचारांचें नियमन होत नाहीं.

सर्व साधारणपणें कोणतेंही सरकार जनतेच्या धार्मिक बाबतींत हात घालीत नाहीं. सरकारा परवानगीशिवाय येथें मात्र राजकीय सभा भरविण्याची बंदी असून गेल्या सहा वर्षांत येथें एकही राजकीय सभा भरली नाहीं. इतकेंच नव्हे तर राजकीय भानगडी उत्पन्न होतील. या सबबीवर सामाजिक व शिक्षणविषयक सभांनाही बंदी झाली आहे. त्यामुळें आमच्या प्रगतींत व्यत्यय येत आहे. इतकेंच नाहीं तर इतर छोट्या संस्थानांच्या प्रजेच्या दृष्टी-नही आमची योग्यता कमी ठरते. याकरितां धार्मिक व राजकीय प्रश्नांचा विचार करतां यावा म्हणून राजकीय सभाबंदीचा कायदा अजीबात रद्द करणें जरूर आहे.

सरकारी धर्मखात्यांत एका विद्वान् पंडित किंवा शास्त्री इसमाची नेमणूक होणें आवश्य आहे. गणेशोत्सव, रथ ओढणें इत्यादि अनेक धार्मिक व सामाजिक असे प्रश्न आहेत कीं त्यांत वेळोवेळीं अनेक अडथळे आणण्यांत येतात व ते वरील नेमणुकीनें बंद होतील.

विशेषतः आमच्या येथील धर्मखात्यांत एक देखील शास्त्री अथवा पंडित नाहीं कीं ज्याला हिंदू प्रजेच्या आचार व्यवहार व रीतिरिवाजांसंबंधीं माहिती असून त्यांच्या उन्नती व सुधारणेसंबंधीं वेळो वेळीं उपयुक्त योजना सरकारा-पुढें मांडून योग्य असे हुकूम मिळवील, ज्याप्रमाणें मुसलमानांच्या धर्मशिक्षण व सामाजिक चालीरीतीसंबंधीं वेळोवेळीं व्यवस्था केली जाते तसें हिंदूप्रजे-बद्दल कां होऊं नये !

एके काळीं सुधारणेच्या शिखरावर असलेल्या आम्हांला आज प्रत्येक क्षुल्लक बाबतींतही दुसऱ्याच्या तोंडाकडे पहावें लागत आहे. हा केवळ काल-महिमा होय. पूर्वी प्रौढपणीं शिक्षण पुरें झाल्यावर विवाह करण्यांत येत पण बालविवाहानें विवाहसंस्था सांप्रत हास्यास्पद झाली आहे. पूर्वी परदेशगमन सररहा चाले. आतां तरुणांस त्यापासून परावृत्त करण्यांत येतें. क्षुद्र प्राण्यांनाही दुःख न देणारे आमचे बांधव असंख्य विधवांचे क्लेश अविमनस्क स्थितीनें पहात आहेत ! जनावरांचे हक्क देखील मान्य करणाऱ्या पूर्वजांचे वंशज म्हणविणारे आम्ही आज सात कोटी अस्पृश्यांस जनावरांपेक्षांही हीन असें समजतों. तेव्हां इतरांच्या दृष्टीनें आम्ही तिरस्करणीय ठरलों नाहीं तरच आश्चर्य !

पूर्वी एका काळीं स्त्रिया तत्त्वज्ञान व गणितासारख्या विषयांत पारंगत असत असें दिसतें; आज आम्हांपैकीं कांहीं त्यांस पडद्यांत ठेवून सामान्य शिक्षणहि देत नाहीं. इतर देशांतून अनाथालयें काढून व इतर रीतीनें लाखों मुलांच्या पोटा-पाण्याची सोय करण्यांत येते. त्या बाबतींत येथें आपण काय केलें आहे! आम्ही पाषाणहृदयी बनल्यानें हजारों मुलांना धर्म सोडण्याची वेळ येते. एकंदरींत आमची संख्या दिवसेंदिवस कमी होत असून अन्य धर्मीयांची मात्र वाढत आहे.

हैद्राबाद संस्थानांत जेथें शेंकडा ८५ हिंदु, ज्यांची संख्या एक कोट अकरा लक्ष आहे, त्यांच्या वस्तुस्थितीकडे आणि खानेसुमारीच्या आंकडयाकडे पाहिलें तर ही गोष्ट पूर्णपणें चांगली लक्षांत येईल कीं, हमाली, मजुरी आणि भिक्षावृत्तीशिवाय इतर सर्व धंद्यांत त्यांची संख्या कमी होत चालली आहे. जर आमच्या प्रगतीचें असेंच प्रमाण राहील तर आम्ही लवकरच इतके दुर्बल होऊन जाऊं कीं त्याची कल्पना करणें ही भीतिदायक आहे. ही अवनति केवळ आम्हां हिंदूंची नसून सर्व देशी संस्थानांत श्रेष्ठ दर्जाचे असें जें हैद्राबाद त्या संस्थानचीच अधोगति होय. कारण कीं, ज्या देशांतील शेंकडा ८५ लोकांची स्थिति वाईट असेल तो देश कधींच प्रगति करूं शकणार नाहीं, जर आमची उन्नति व्हावी अशी इच्छा असेल तर प्रथम शिक्षणप्रसाराचा प्रयत्न करणें अवश्य आहे.

आमच्या या राज्यांत शिक्षणाप्रीत्यर्थ म्हणून वार्षिक सत्तर लक्ष रुपये खर्च केले जातात हा खर्च केवळ इतर देशीसंस्थानेंच नव्हे तर ब्रिटिश हिंदुस्थानापेक्षांही सरासरीनें जास्त आहे असें असून देखील येथें साक्षरांची संख्या केवळ शेंकडा तीन आहे. पण ह्या विरुद्ध साक्षरांची संख्या म्हैसूर संस्थानांत शेंकडा १२, बडोद्यांत शें. १४, त्रावणकोरांत शें. २२, व कोचीनांत शें. २७ अशी आहे.

येथें ही गोष्टही दिसून येईल कीं, हिंदु समाजांत इतर समाजांपेक्षां सुशिक्षितांचें प्रमाण दिवसेंदिवस कमी होत चाललें आहे. आपल्यांतील अज्ञान दूर करून आपली उन्नति व्हावी अशी आपली इच्छा असेल व इतरांच्या मनांत आपल्या देशा विषयींचा मोठेपणा व योग्यता कायम रहावी असें वाटत असेल

तर प्रथम ह्या प्रश्नाचा पूर्णपणें विचार करणें अत्यंत अवश्यक आहे कीं हे सत्तर लक्ष रुपये जे वार्षिक शिक्षणानिमित्त म्हणून खर्ची पडतात त्याचा योग्य व्यय झाला पाहिजे.

ह्या बाबतींत सर्व साधारण उपाय सुचविणें शक्य असलें तरी एखादी खास कमेटी ह्या संबंधीं चौकशीअंतीं विचारपूर्वक योजना तयार करण्या-करितां नेमून त्यांनीं योग्य सूचना मांडल्यास माझी अशी खात्री आहे कीं, एवढ्या खर्चांन ह्यापेक्षां जास्त प्रमाणांत लोकांना शिक्षण मिळून प्रजेला व देशाला दुप्पट फायदा होईल.

अस्पृश्य मानिल्या गेलेल्या बांधवांच्या उन्नतीकडे खास लक्ष पुरविणें हें आपलें अवश्य कर्तव्य असून हिंदु धर्मावरील हा अस्पृश्यतेचा कलंक त्वरित काढून टाकिला पाहिजे. स्त्रीशिक्षणाची खास व्यवस्था केली पाहिजे. कारण तोच आपल्या उन्नतीचा पाया होय. आपल्या राज्यांतील खानदानी लोकांना परदेशांत जाऊन शिक्षण संपादन करण्यास प्रोत्साहन दिलें पाहिजे. विधवांच्या शिक्षणा-बद्दल खास व्यवस्था करण्यांत येऊन ज्यांना पुनर्विवाह करावयाचा असेल त्यांच्या मार्गांत अडथळे उत्पन्न करूं नयेत, त्यांना मनाई करण्यांत येऊं नये.

जोंवर आपण आपसांतील दुही दूर करणार नाहीं तोंवर आमची उन्नति होणार नाहीं. मग ती दुही हिंदू हिंदूंतील असो अथवा हिंदू मुसलमान व खिस्ती यांची आपसांतील असो. अर्थात् देशांत ऐक्य नांदल्याशिवाय प्रगति शक्य नाहीं ही गोष्ट मी विशेषतः ह्या परिषदेमार्फत सर्व हिंदू बांधवांना निवे-दन करितों. प्रत्येक जातीनें अगर व्यक्तींनीं आपली उन्नति व सुधारणा करणें केवळ योग्यच नव्हे तर अवश्यक आहे. पण ती अशा रीतीनें व्हावी कीं त्यामुळें इतरांच्या स्वातंत्र्यास बाध येऊं नये. एवढेंच नव्हे तर एकाच्या उन्नतीमुळें दुसऱ्यास आनंद झाला पाहिजे. परंतु जेथें एथवर मजल पोंचली असेल कीं इतर जातीची उन्नति असह्य वाटत असेल तर तो देश कधींच प्रगति करूं शकणार नाहीं.

विशेषतः हिंदू मुसलमानांच्या ऐक्याबद्दल आम्हांला खास रीतीनें विचार करणें जरूर आहे. आम्ही ही गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे कीं, हैद्राबाद संस्था-नांत पूर्वीं कधींही हिंदू मुसलमानांत अशी दुहीं माजली नव्हती तर नेहमीं

चांगलें ऐक्य नांदत आलें व या गोष्टीचा आम्हांला अभिमान असे कीं आमचें संस्थान बाहेरील प्रांतांना आदर्शभूत असें आहे.

अलीकडे नित्यशः येथें ही हिंदुस्थानांतलि इतर स्पर्शजन्य रोगांप्रमाणें आपसांतील वैमनस्य व द्वेषाचा प्रसार होत चालला आहे. अशा स्थितींत प्रत्येक हैद्राबादी म्हणविणाऱ्या खऱ्या देशहितचिंतकाचें हें कर्तव्य आहे कीं त्यानें शक्य त्या उपायाची योजना करून आपसांतील तेढ नाहींशी करण्याचा मनःपूर्वक प्रयत्न करावा ज्यामुळें पूर्ववत् ऐक्य व प्रेम नांदेल आणि आपली उन्नति होईल, असें होणार नाहीं तर त्यामुळें केवळ दोघांचेंच नुकसान नसून देशाचें अधःपतन होईल.

असा माणूस जो आपसांतील तेढ वाढविण्याचा प्रयत्न करीत असेल तो खरा हिंदू अथवा खरा मुसलमान नाहीं, कारण प्रत्येक धर्माची अशीच शिकवण आहे कीं आपल्या देशाच्या उन्नतींतच आपली उन्नति आहे आणि जो कोणी आपल्या देशाच्या अवनतीस कारण होईल तो कोणत्याच धर्माचा होऊं शकणार नाहीं.

आपल्या पुढें जे ठराव येतील त्यांसंबंधीं अनुकूल किंवा प्रतिकूल मत देण्याची पूर्ण मोकळीक असून ठराव पास व नापास झाल्यास त्याबद्दल आनंद अथवा खेद वाटण्याचें कांहीं कारण नाहीं. आमचा उद्देश केवल सामाजिक प्रश्नांवर चर्चा व विचारविनिमय व्हावा एवढाच आहे, मला अशी आशा आहे कीं परिषदेंतील काम कळकळीनें व शांततापूर्वक पार पडेल.

आपल्या प्रयत्नांना चांगलें फळ मिळून हिंदू समाजांत चैतन्य उत्पन्न होवो आणि त्यांच्यांतील अज्ञान नाहींसें होऊन देशाची प्रगती होवो व आपल्या भगिनींस अशा प्रकारचें शिक्षण मिळावें कीं त्यांच्यांत सीता, सावित्री, अहिल्याबाई, जिजाबाई सारख्या शूरवीर स्त्रिया निर्माण होतील आणि आपल्याच बांधवांना अस्पृश्य मानून आपल्या संस्कृतीवर जो एक कलंक लाविला आहे तो लवकर काढून टाकावा, ह्या शिवाय दुसऱ्या अनेक लज्जास्पद व हानिकारक चालीरीती आहेत त्या नाहींशा कराव्या आणि अशा रीतीनें आपली आर्य संस्कृति अशी उज्वल व तेजस्वी व्हावी कीं त्यामुळें केवळ हिंदु समाजच नव्हे तर इतर समाजांनाही त्याचा फायदा घेण्याची संधी मिळेल. शेवटीं पुनः एकदा

मी आपलें स्वागत करून अशी आशा करितों कीं ह्या परिषदेनें केवल " कर्मण्ये-वाधिकारस्ते माफलेषु कदाचन " हें गीतेंतील तत्त्व आपल्या पुढें ठेवून केवल कर्म करीत जावें. शेवटीं परमेश्वरापाशीं अशी प्रार्थना करितों कीं ही परिषद् यशस्वी होण्यास त्यानें आम्हांला सहाय्य करावें.

## अध्यक्षांची सूचना ना. केशवराव

यांनीं करतांना श्रीमती सरलादेवी चौधराणी यांचें गुणवर्णन करून त्यांनीं सार्वजनिक कामासाठीं किती स्वार्थत्याग केला आणि त्यांना या शिक्षणाचे धडे माहेरीं आणि सासरीं कसे मिळाले, याचें मार्मिकपणें विवेचन केलें व महात्मा गांधी यांच्या सहवासांत त्यांना स्वावलंबनाचें शिक्षण मिळाल्याचें सांगून आजच्या परिषदेला त्या लायक अशाच अनुभवी वृद्ध भगिनी आपणांस लाभल्या आहेत असें सांगितलें. अध्यक्षांच्या सूचनेला अनुमोदनार्थ राय विश्वेश्वरनाथ, श्री. गोविंदराव गंगाखडेकर, औरंगाबादचे वकील श्री. दिगंबरदास चौधरी, रा. ब. वेंकटरट्टी, पि. किसनराव यांचीं भाषणें झाल्यावर अध्यक्षस्थानीं श्री. सरलादेवी चौधराणी बसल्या व त्यांना सौ. अहिल्याबाई मल्लण्णा यांनीं टाळ्यांच्या गजरांत हार घातल्यावर त्यांनीं आपलें इंग्रजींतील भाषण वाचून दाखविलें.

## परिषदेला आलेलीं यशश्चिंतनपर पत्रें.

बॅ. शर्मा यांनीं वाचून दाखविलीं. त्यांत मार्तंड माणिक प्रभु खंडेराव, वामनराव नाईक, गुलबर्ग्याचे जनार्दनराव, वकील, रा. ब. माधवराव किबे, पुण्याचे राघवेंद्रराव शर्मा, खांडव्याचे कर्मवीराचे सम्पादक लोंढे वगैरे मंडळींचीं मुख्यत्वें आहेत.



# अध्यक्ष श्रीमती सरलादेवी चौधराणी बी. ए.

## यांच्या भाषणाचा सारांश.

---

### ता. १२ जुलै, इ. स. १९२७.

माझा जन्म ब्राह्मणकुळांत झाला असल्यामुळें, मी माझ्या **वाडवडिलांना दोष** देणें हें योग्य नसलें तरी, हिंदु समाजाची सध्यांची खालावलेली स्थिति पाहिली म्हणजे ब्राह्मण वर्गाला दोष दिल्याशिवाय माझ्याच्यानें राहवत नाहीं. कारण, समाजाची काळजी वाहून समाजसुधारणा करणें हें ब्राह्मणांचें कर्तव्य आहे आणि सध्यांच्या ब्राह्मणवर्गाचें स्वकर्तव्याकडे मुळींच लक्ष नाहीं ! आपलें आत्मिक बळ वाढविणें व त्याबरोबरच समाजकल्याणाकडे लक्ष देणें, समाजाला वळण लावणें व समाजाला सुशिक्षित करून त्याची उन्नति करणें—हीं कामें ब्राह्मणांनीं करावयाचीं असतात. सर्व जातींत शरीरिक मानासिक शुचिर्भूतपणा उत्पन्न करण्याचें स्वकर्तव्य ब्राह्मण विसरले—म्हणूनच समाजाला पडता काळ प्राप्त झाला. आपापसांतील दोष वाढत गेले व त्यामुळेंच आपली संघटन—शक्ति नाहींशी झाली.

बालविवाह ज्यास्त होऊं लागल्यामुळेंच, समाजांत बालविधवांची संख्या दिवसेंदिवस ज्यास्त वाढत असल्याचें दृष्टोत्पत्तीस येत आहे. ज्या मुलींना **नवरा म्हणजे काय** व संसार म्हणजे काय हें समजत नाहीं अशा मुलींना लग्नमण्डपांत उभें करून त्यांचीं लग्नें लावणें ही गोष्ट समाजाच्या अवनतीला मुख्यतः कारणीभूत झालेली आहे. बालवयांत लग्नें झाल्यामुळें लहान मुलांची मृत्युसंख्याहि वाढूं लागली आहे. मुलगे व मुली वयांत आल्याशिवाय त्यांचीं लग्नें करूं नयेत. हें पुण्यकर्म ब्राह्मणांनींच योग्य रीतीनें पार पाडिलें पाहिजे. ज्या मुलींचीं **लग्नें अगदीं लहानपणीं** करण्यांत येऊन वयांत येण्यापूर्वींच ज्यांचा नवरा मरण पावला असेल अशा **विधवांना पुनर्विवाह** करण्यास समाजाकडून प्रतिबन्ध होऊं नये असें माझें मत आहे. प्राचीनकाळीं ब्रह्मकर्मनिपुण ब्राह्मणांचीं **( क्षात्रिय ) राजकन्यांशीं लग्नें** होत असत. आपल्या इतिहासांत अशीं कांहीं उदाहरणें सांपडतात. त्याचप्रमाणें, आर्य व अनार्य यांच्यामध्येंही **मिश्रविवाह झाल्याचीं उदाहरणें** आहेत. सध्यांचे काळीं जातीजातींची संघटणा करण्यासाठीं, मुख्य चार वर्ण कायम टेवून, पोटजातींनीं आपापसांत मिश्रविवाह

करावा. शेंकडों जाती व उपजाती सध्यां आपल्या समाजांत आहेत त्या नाहींशा करून ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र असे फक्त चारच वर्ण कायम ठेविले तर, आपल्या समाजाचें उत्तम संघटण होईल व समाजांतही **सहजगत्या सुधारणा** करण्यास आवश्यक असणारा आपलेपणा उत्पन्न होईल.

अस्पृश्योद्धाराचें कार्य मात्र आपण प्रथम हातीं घेतलें पाहिजे. आपण ज्यांना अस्पृश्य लोक समजतों ते हिन्दु आहेत. एवढेंच काय पण, फार प्राचीन काळापासून, ते भरतभूमीचे रहिवाशी आहेत. आपण अस्पृश्य लोकांना हिन्दूच्याच नात्यानें वागविलें पाहिजे. त्यांना शिक्षण देऊन, त्यांचीं योग्यता वाढविणें हें आपलें महत्त्वाचें कर्तव्य होय असें आपण समजलें पाहिजे. अस्पृश्यांना आपण हिन्दुधर्मांत वागवून घेत नसल्यामुळेंच, परधर्मीयांनीं त्यांना आपल्यांतून ओढून नेण्याचे प्रयत्न आज कित्येक वर्षें चालविलेले आहेत.

स्त्रियांना सर्वांच्या अगोदर गृह–शिक्षण देण्यांत आलें पाहिजे. बाल–संगोपन, पावित्र्य– संवर्धन व आत्मसंरक्षण करण्याचीं योग्यता व सामर्थ्य स्त्रियांच्या अंगीं आलें पाहिजे.

समाजाचा उद्धार स्त्रियांकरवींच केला जातो हें आपण लक्षांत ठेवून, स्त्रिया सामर्थ्ययुक्त होतील असें शिक्षण त्यांना देण्यांत आलें पाहिजे.

## पास झालेल्या ठरावांचा सारांश.

ठराव पहिला–हिंदुस्थानचे सार्वभौम बादशाहा सम्राट् पांचवे जॉर्ज आणि आपले परमपूज्य पादशाह आला हजरत बंदेगान आली यांच्यासंबंधीं राजनिष्ठेची भावना ही परिषद् अत्यंत नम्रतेनें व्यक्त करीत आहे.

ठराव २ व ३– निजाम इलाख्यांतील समाजसेवक श्री. राय बालमुकुंद, श्री. रंगराव टेकमालकर, व नांदेडकर वगैरे मंडळी स्वर्गनिवासी झाली या सर्वांच्या निधनाबद्दल या परिषदेस अत्यंत वाईट वाटत आहे.

ठराव ४ था – आपल्या रयतेच्या कल्याणाकरितां निजाम सरकारनीं फर्मान काढून प्राथमिक शिक्षण मोफत देण्याची व्यवस्था अंमलांत आणिली आहे, त्याबद्दल ही परिषद् त्यांची अत्यंत आभारी आहे. आणि हें शिक्षण लौकरच सर्कीचें मातृभाषेंतून केलें जावें.

ठराव ५ वा—देशाची सर्वांगीण प्रगति होण्याकरितां स्त्रीशिक्षणांत योग्य रीतीनें वाढ करण्यांत यावी आणि स्त्रियांच्या सुधारलेल्या स्थितीकडे लक्ष्य देतां पुण्याच्या अखिल भारतीय महिलाविद्यापीठाच्या धर्तीवर हैद्राबाद शहरांत एक हायस्कूल २ वर्षांचे आंत स्थापण्यांत यावें.

( अ ) कन्याशाळांच्या तपासणीकरितां स्थानिक भाषेच्या स्त्रियांनाच नाजर व मोहतमीम नेमण्यांत यावें.

ठराव ६ वा—स्त्रियांच्या उन्नतीकरितां हिंदु समाजांतील पडद्याची पद्धत नाहींशी करण्यांत यावी अशी या परिषदेची शिफारस आहे.

ठराव ७ वा—देशांतील एकंदर जनतेंत परस्पर स्नेहसंवर्धन आणि बंधुप्रेम दृढ आणि चिरस्थाई होण्याकरितां व्यवहार्य उपाय अंमलांत आणावेत अशी या परिषदेची शिफारस आहे.

ठराव ८ वा—प्रत्येक तालुक्याच्या ठिकाणीं एक मोफत पुस्तकालय उघडण्यांत यावें व त्यांत स्थानिक भाषेंतील पुस्तकांचा विशेष भरणा असावा अशी या परिषदेची दयाळू सरकारास व जनतेस विनंति आहे.

ठराव ९ वा—देशाची हानि न व्हावी आणि आरोग्य व स्वास्थ्य कायम रहावें म्हणून मादक पदार्थ वर्ज्य करणें आणि इतर प्रतिबंधक उपाय योजण्यांत यावेत असें या परिषदेचें मत आहे.

ठराव १० वा— वाचनालयांच्या वार्षिक समारंभास जो प्रतिबंध घालण्यांत येतो त्याचा ही परिषद् अत्यंत तीव्र निषेध करिते.

ठरावा ११ वा—आपल्या मुलांमुलींच्या आरोग्यसंरक्षणाकरितां त्यांच्या व्यायामाकडे पालकांनीं अवश्य लक्ष्य पुरवावें आणि प्रत्येक गांवांत व शहरांत सोई गैरसाई पाहून आखाडे काढण्यांत येतील अशी या परिषदेस अपेक्षा वाटते.

ठराव १२ वा—हैद्राबाद इलाख्यांतील शिक्षणाची सुधारणा होण्यासाठीं सरकारांनीं एक कमिशन मुकर करून त्यांत जनतेचे प्रतिनिधी घ्यावेत अशी या परिषदेची विनंति आहे

( अ ) प्रत्येक जिल्ह्यांतील कमींतकमी २ गृहस्थांची निवड होऊन क्षणिक परिस्थितीची चौकशी करून १ वर्षाचे आंत रिपोर्ट सादर करावा अशी परिषदेची शिफारस आहे.

ठराव १३ वा–हिंदु मुसलमानांचें दृढ ऐक्य व्हावें आणि सामाजिक प्रश्नांविषयीं विचारविनिमय व्हावा म्हणून गणेशोत्सवासारख्या धार्मिक उत्सवांस व सामाजिक सभांस आणि त्यांतील कार्यक्रमास उत्तेजन देणें जरूर आहे. तरी निजाम सरकारनें धर्मखात्याच्या परवानगीची अट काढून टाकून सदर उत्सवांच्या व सभांच्या मार्गांत स्थानिक अधिकाऱ्यांकडून येणाऱ्या अडचणी दूर कराव्या अशी या परिषदेची विनंति आहे.

ठराव १४ वा— याचनेचा प्रतिबंध होणें अवश्य असल्यामुळें अपात्र धंदेवाईक भिक्षेकऱ्यांना भिक्षा न देतां त्यांना धंदे व कला शिक्षणाकडे प्रवृत्त करावें आणि पंगु व निराश्रित लोकांच्या पोटापाण्याची योग्य व्यवस्था करावि अशी या परिषदेची अखिल जनतेला विनंति आहे.

ठराव १५ वा— खासगी शिक्षण संस्थांचा कायदा या संज्ञेनें सरकारी शिक्षण खात्याकडून जो कायदा अंमलांत आणला जात आहे त्यायोगें देशाची शैक्षणिक अवनति होण्यासारखी असल्यामुळें तो कायदा तावडतोब रद्द करण्यांत याव. अशी या परिषदेची सरकारास विनंति आहे.

ठराव १६ वा– अस्पृश्य समजल्या जाणाऱ्या देशबांधवांची सुधारणा व उन्नति हा अत्यंत विचारार्ह प्रश्न असल्यामुळें तिकडे लक्ष्य पुरविलें पाहिजे आणि अस्पृश्यत्वाचा निषेध करून अखिल जनतेस विशेषतः हिंदु बांधवांकडून या परिषदेस अशी अपेक्षा आहे कीं, अस्पृश्यत्वाची भावना अंतःकरणांतून समूल काढून टाकण्यांत यावी आणि त्यांची नैतिक, शैक्षणिक आणि सामाजिक सुधारणा करण्यांत यावी.

( अ ) सार्वजनिक विहिरींतून अस्पृश्य मानले जाणाऱ्यांना पाणी नेण्याची मोकळीक असावी.

( ब ) त्यांच्या मुलाबाळांनां सार्वजनिक शाळांतून प्रवेश करण्यास प्रतिबन्ध नसावा.

ठराव १७—वा मुलीचा सोळा वर्षांपूर्वी आणि मुलाचा चोवीस वर्षांपूर्वी विवाह होऊं नये असें या परिषदेचें मत आहे.

( अ ) लग्नकार्य व इतर प्रसंगीं अवास्तव खर्च आणि नीतिगर्ह्य गोष्टी होऊं नयेत.

( ब ) कन्याविक्रय करणें, हुंडा घेणें या दोन्ही पद्धति गर्हणीय असल्यामुळें त्या बंद केल्या पाहिजेत.

( क ) अपात्र मनुष्याचे आणि विषम असे विवाह होऊं नयेत असें या परिषदेचें मत आहे.

ठराव १८–१९—वा विधवांचें शिक्षण, समाजसेवा आणि त्यांच्या चरितार्थाचे साधनाची योग्य व्यवस्था करण्यांत यावी. बालविधवांना पुनर्विवाहाची परवानगी असावी आणि प्रौढ विधवांना पुनर्विवाह करणें इष्ट वाटल्यास त्यांस विरोध करण्यांत येऊं नये, असें या परिषदेचें मत आहे.

ठराव २० वा –पुनर्विवाहाच्या कायद्याला कायदे मंडळानें सम्मति द्यावी.

ठराव २१ वा—प्रत्येक वर्णांतील पोट विभागांत परस्पर विवाहसंबंध घडून येणें इष्ट व अवश्य आहे असें या परिषदेचें मत असून हिंदु बांधव अशा प्रकारचे विवाह घडवून आणतील अशी अपेक्षा आहे.

ठराव २२ वा—कांहीं कारणामुळें एखादा हिंदु आपल्या धर्मांतून दुसऱ्या धर्मांत गेला असेल आणि त्याला पुनः आपल्या धर्मांत परत येण्याची इच्छा झाल्यास त्याला शुद्ध करून आपल्या धर्मांत घ्यावें व धर्मांतरापूर्वी ज्या प्रकारचे हक्क त्यांस प्राप्त होते तेच पुनः धर्मांत आल्यावरही त्यांस असावेत असें या परिषदेचें मत आहे.

ठराव २३वा — या परिषदेचे पूर्वोक्त ठराव अंमलांत आणण्याकरितां एक मंडळ नेमणें अवश्य आहे व त्यामध्यें समाजसेवकांची निवड व्हावी असें या परिषदेचें मत आहे.



# ६ वी हैद्राबाद हिंदु सामाजिक परिषद.



## महत्त्वाच्या ठरावांवरील उपयुक्त भाषणें.

### पुनर्विवाहाबद्दल श्री. चिंतामणराव वैद्यांचें मत.

### अध्यक्षांनीं मांडलेले ठराव.

( १ ) निजाम सरकार आणि इंग्रज सरकार यांच्याबद्दल राजनिष्ठा च ठगण्याबद्दलचा, ( २ ) ना. राय बालमुकंद साहेब माजी हायकोर्ट जज्ज यांच्या व पण्डित रंगरावसाहेब टेकमालकर यांच्या निधनाबद्दल दुःखःप्रदर्शन, ( ३ ) मोफत शिक्षण सक्तीचें करण्याबद्दल ( ४ ) पडदा पद्धत नाहींशी करण्याबाबत, ( ५ ) मराठी लायब्ररी स्थापन करण्याबद्दल, ( ६ ) व्यसनांपासून अलिप्त राहण्यास हिंदु समाजाला विनंति करण्याबद्दल, ( ७ ) आखाडे उघडण्याबद्दल, ( ८ ) भिक्षेकऱ्यांच्या सहानुभूतीबद्दल, ( ९ ) हुण्डापद्धतीचा निषेध, ( १० ) उस्मानिया युनिव्हर्सिटीमध्यें, हिंदु संस्कृति कायम राहण्यासाठीं संस्कृतची शाखा स्थापन करण्याबद्दल, ( ११ ) शुद्धीकरणाच्या आवश्यकतेबद्दल, ( १२ ) पोट जातींतील परस्पर विवाह करण्याबद्दल ( १३ ) वेश्या व्यापार, प्रतिबंधक उपायाबद्दल वगैरे अनेक ठराव अध्यक्षांनीं माण्डले व ते सर्वानुमतें पास झाले.

### महिला विद्यापीठ स्थापन करण्याचा ठराव.

हा ठराव श्री. राय विश्वेश्वरनाथ यांनीं वाचून दाखविल्यावर ते म्हणाले कीं, स्त्रियांच्या शिक्षणाच्या सोयीसाठीं पुण्याच्या प्रो. कर्वे यांच्या महिलाविद्यापीठाच्या धर्तीवर एक विद्यापीठ स्थापन करणें अत्यंत जरूर आहे. प्रो. कर्वे यांनीं महाराष्ट्रांत फारच उत्तम कामगिरी ही युनिव्हर्सिटी स्थापन करून केलेली आहे. त्याच पद्धतीवर आपल्या संस्थानांतहि एक युनिव्हर्सिटीची योजना अमलांत येणें जरूर आहे. स्त्रीशिक्षणाची अत्यंत आवश्यकता आहे. या ठरावावर औरंगाबादचे श्री. दिगंबरदास चौधरी हायकोर्ट वकील यांनीं भाषण केल्यावर श्री. गिरीराव आण्णा

जहागिरदार यांनीं ठराव मराठींत सांगून स्पष्टीकरणार्थ आणि आवश्यकतेबद्दल भाषण केलें. नंतर श्री. सौ. अहिल्याबाई मह्लाणा म्हणाल्या, प्रो. कर्वे यांच्या युनिव्हर्सिटीनें महाराष्ट्रांत फारच उत्तम कामगिरी केलेली आहे व त्याच धर्तीवर येथेंहि एक युनिव्हर्सिटी स्थापन करणें जरूर आहे. तसेंच मुलींच्या शाळा तपासण्यासाठीं स्त्रियांचीच नेमणूक करावी. यानंतर जळगांवचे

## आमदार राजमलशेटजी म्हणाले,

आपला देश शिक्षणाच्या बाबतींत तर मागें आहेच, पण त्यांतल्या त्यांत स्त्रीशिक्षणाबद्दल तर फारच मागसलेला आपला देश आहे. हा ठराव फारच महत्त्वाचा आहे. गृहस्थधर्म सुखदायी होण्यासाठीं आणि पुरुषांना सुसंस्कृत बनविण्याकरितां स्त्रियांना शिक्षण देण्याची फारच आवश्यकता आहे. पुरुषांपेक्षां स्त्रियांवरच पुढील तरुणांच्या सुसंस्कृतीबद्दल जास्त जबाबदारी असल्यामुळें स्त्रियांनां शिक्षण दिलें पाहिजे. स्त्रियांना देवता बनविण्याकरितां आणि तरुणांची पुढील पिढी देव बनविण्यासाठीं स्त्रियांना सरस्वती देवीची जोड दिली पाहिजे. स्त्री-शिक्षणामुळें पाश्चिमात्य फॅशन व संस्कृति स्त्रियांनीं उचलली असा कांहीं लोक त्यांच्यावर आरोप करतात, यालाहि मूळ कारण स्त्रियांना सुसंस्कृतीच्या शिक्षणाचा अभाव हेंच आहे. नंतर श्री. काशिनाथपंत वैद्य यांनीं १९२१ च्या सेन्सस रिपोर्टावरून स्त्री-शिक्षणाच्या बाबतींत आपण कसे मागासलेले आहोंत याचें स्पष्टीकरण केल्यावर श्रीमती लक्ष्मी नरसिंहाम्मा या भगिनींचें भाषण झाल्यावर ठराव सर्वानुमतें पास झाला.

## भाषणबन्दीच्या हुकुमाचा निषेध.

सार्वजनिक समारंभप्रतिबंधक जे कायदे अस्तित्वांत आहेत त्यांयोगें सामाजिक सुधारणेंत बरेच अडथळे उत्पन्न होत असल्यामुळें ते रद्द करण्यांत यावेत अशी या परिषदेची सरकारास विनंति आहे.

हा ठराव पण्डित एम्. हणमंतराव यांनीं माण्डला व त्याच्या स्पष्टीकरणार्थ कांहीं हास्यास्पद कायद्यांच्या अंमलबजावणीचीं उदाहरणें दाखविलीं. नंतर स्त्रियांच्या व्याख्यानालाहि बंदी केल्याचें सांगितल्यावर ठरावाला अनुमोदन श्री. पण्डित नारायणरावसाहेब यांनीं दिलें व ठराव सर्वानुमतें पास झाला.

## शिक्षणसुधारणेसाठीं कमिशनची स्थापना.

हैद्राबाद इलाख्यांतील शिक्षणाची सुधारणा होण्यासाठीं सरकारांनीं एक रॉयल कमिशन मुक्रर करून त्यांत जनतेचे प्रतिनिधी घ्यावेत अशी त्यांस या परिषदेची विनंति आहे. या वरील ठरावांत ( अ ) म्हणून आणखी असें कलम आहे कीं, एक कमिटी नेमून एक वर्षांत रिपोर्ट करावा. हा ठराव स्वागताध्यक्ष बॅ. रामचंद्र नाईक यांनीं माण्डला. त्याला रावसाहेब केशवराव यांची अशी उपसूचना होती कीं, आपणच एक कमिटी नेमून चौकशी करावी व नंतर सरकारकडे त्याचा रिपोर्ट करावा श्री. श्रीपादराव पळणीटकर ठरावानुकूल बोलल्यावर नंतर औरंगाबादचे श्री. दिगंबरदास चौधरी मूळ ठरावानुकूल बोलले. अध्यक्षांनीं मूळ ठराव मांडणारे बॅ. रामचंद्रराव नाईकांना उपसूचना मान्य करण्यास दोनदां सांगितलें, पण नाईकांनीं तें न ऐकल्यामुळें ठरावावर मतें घेतां बहुमतानें बॅ. नाईक यांचा मूळ ठराव पास झाला.

## अस्पृश्यता निवारण्याचा ठराव.

हा ठराव श्री. दिगंबरदास चौधरी हायकोर्ट वकील औरंगाबाद यांनीं माण्डल्यावर बॅ. विनायकराव कोरटकर यांनीं अनुमोदन दिलें व नंतर अस्पृश्य समाजाचे पुढारी

## श्री. भाग्य रड्डी म्हणाले

कीं, अस्पृश्यता जर काढली नाहींत तर साहेब, आपला हिन्दु समाज सुरळीत चालणार नाहीं ही गोष्ट पक्की लक्षांत ठेवा. सात कोटी अस्पृश्यांना बाहेर घालवून हिन्दु समाजाचें कधींच कल्याण होणार नाहीं, उद्धार होणार नाहीं, आणि स्वातंत्र्यहि मिळणार नाहीं. अस्पृश्य बांधवांच्या गळ्यापर्यंत दुःखें येऊन ठेपलेलीं आहेत. आम्हीं भीक मागूं, एवढेंच काय, पण तीन दिवस उपवासीहि राहूं, पण हिंदुधर्म आम्ही कधींहि सोडणार नाहीं. तुम्हीं इतर लोक नोकरीला ठेवतां मग आम्हांला कां ठेवीत नाहीं ? नुसते अस्पृश्यता निवारण्याचे ठराव आतां साहेब ! पुष्कळ झाले आहेत, ते ठराव कृतींत उतरण्याचा प्रयत्न करा, एवढेंच मला सांगावयाचें आहे. नंतर पुण्याचे प्रो. गोगटे यांचें भाषण झाल्यावर हा ठराव सर्वानुमतें पास झाला.

## पुनर्विवाहाचा ठराव

विधवांचें शिक्षण, समाजसेवा आणि त्यांच्या चरितार्थाचे साधनांची योग्य व्यवस्था करण्यांत यावी. बाल विधवांना पुनर्विवाहाची परवानगी असावी आणि प्रौढ विधवांना पुनर्विवाह इष्ट वाटल्यास त्यांस विरोध करण्यांत येऊं नये, असें या परिषद्‌चें मत आहे.

[ अ ] पुनर्विवाहाच्या कायद्याविषयीं ही परिषद् आपली अनुमति प्रद्-र्शित करते.

ठराव अकरावा–प्रत्येक वर्णांतील पोटविभागांत परस्पर विवाहसंबंध घडून येणें इष्ट व अवश्य आहे असें या परिषद्‌चें मत असून, हिंदु बांधव अशा प्रकारचे विवाह घडवून आणतील अशी ही परिषद् अपेक्षा करिते.

हा ठराव श्री. राय विश्वेश्वरनाथ ह्यांनीं मांडण्यापूर्वीं सौ. लक्ष्मीबाई लेले यांनीं याच ठरावाच्या पुष्ट्यर्थ असलेलें 'समाजसुधारकांस एक सवाल' हें हृदयस्पर्शी पद्य फारच उत्तम गाऊन दाखविलें. त्यांत विधुर पुनर्विवाह करतात मग बाल विधवांचा पुनर्विवाह करण्यास काय हरकत आहे असा स्पष्ट सवाल सौ. लक्ष्मीबाईनीं समाजास केला आहे. या ठरावावर बोलतांना श्री. राय विश्वेश्वरनाथ म्हणाले कीं, हा ठराव अत्यंत जिव्हाळ्याचा आहे. कोणत्याहि बालविधवेला पाहून डोळ्यांतून अश्रु आल्याशिवाय कोणत्याहि सहृदयी माणसाच्यानें राहवणार नाहींत. पुरुष विधुर झाल्याबरोबर जर दुसरें लग्न करण्याला उतावळा होतो तर मग विधवांनींच काय पाप केलें आहे ? या ठरावाला अनुकूल असें श्री. व्यंकटचरणदास बोलल्यावर परभणीचे वकील श्री. गोविंदराव नानल ह्यांनीं सांगितलें कीं, सशास्त्र असेल तर बालविधवांचे पुनर्विवाह करा, जाहीर रीतीनें अशा प्रकारची चर्चा करून विधवाभगिनींची हेटाळणी करूं नका. या ठरावावर बोलतांना

## कुमारी शरयूबाई किर्लोस्कर म्हणाल्या,

पुरुषांनीं दुसरें लग्न मात्र करावें आणि स्त्रियांनीं–विशेषतः बालविधवांनीं मात्र पुनर्विवाह करूं नये, संन्यास घ्यावा हा कोठला न्याय, ही कोठली रीत, हें कोठलें समाजशास्त्र ? सध्यां तरी निदान बालविधवांना पुनर्विवाहाची मोक-

ठीक दिलीच पाहिजे. पुढें १६ वर्षांच्या वयाच्याच कुमारिकेचीं लग्नें झाल्यावर बालविधवा होणारच नाहींत व हा प्रश्न शिल्लकच रहाणार नाहीं. यानंतर

### ना. केशवराव म्हणाले

पुरुष जर दुसरें लग्न करूं शकतो तर मग स्त्रियांनाच त्याची बंदी कां हेंच मला समजत नाहीं. गोतम मुनी म्हणतो कीं, जोंपर्यंत गर्भादान झालें नाहीं तोंपर्यंत त्या स्त्रियांचीं लग्नें करण्यास हरकत नाहीं. तेव्हां फक्त बाल-विधवांचेच पुनर्विवाह करावे अशी मी उपसूचना मांडतों.

यावर श्री. काशिनाथपंत वैद्यांनीं सध्यां विधवांची संख्या कशी वाढत आहे यांचे आंकडे देऊन दिग्दर्शन केल्यावर भाषण करतांना

### श्री. चिंतामणराव वैद्य म्हणाले

श्रुति आणि स्मृति यांमध्यें अक्षतयोनी विवाह मंजूर केलेला आहे. ज्या स्त्रीचें गर्भादान झालेलें नाहीं, अशा बालविधवा स्त्रियांचे पुनर्विवाह करण्यास कोणतीच आडकाठी नाहीं. अशा स्त्रियांचें पहिलें गोत्र रूढ समजून पुनर्विवाह संस्कारयुक्त करावेत. आणि ज्यांना मुलें बाळें आहेत अशा विधवा स्त्रियांनीं समाजकार्य करण्यांत आपलें आयुष्य घालवावें. या नंतर

### श्री. गिरीराव अण्णा जहागिरदार म्हणाले,

पुरुषांप्रमाणेंच स्त्रियांनाहि सुखदुःखें कळत असतात, मनोधर्म आणि मनोविकार दोघांनाहि असतात, मग पुरुषांनीं मात्र द्वितीय तृतीय लग्न करावें आणि बालविधवेनेंच काय पाप केलें आहे कीं तिनें संन्यस्त वृत्ति धारण करावी ? भलत्याच मार्गांत पाऊल पडण्यापेक्षां बालविधवांचे पुनर्विवाह करणें अत्यंत जरूर आहे. यानंतर श्री. धारवाडकर यांनीं मनुस्मृति समजण्याचा आव आणून श्री. चिंतामणराव वैद्यांच्या मतांचें खंडण करण्याचा प्रयत्न केला; पण त्यावर श्री. चिंतामणराव वैद्य म्हणाले कीं, मनुस्मृतीचा अर्थच धारवाडकरांना समजला नाहीं. जें वचन धारवाडकरांनीं वाचून दाखविलें त्यांत विधवा हा शब्द असतांना तोच त्यांनीं वाचून दाखविला नाहीं. नंतर उत्तरादाखल राय विश्वेश्वरनाथ यांनीं भाषण करतांना श्री. केशवराव यांची उपसूचना मान्य केल्यावर बाल-विधवांनीं पुनर्विवाह करावे असा ठराव एकमतानें पास झाला.

## अध्यक्षांचा समारोप.

समारोप करतांना **श्री. सरलादेवी चौधराणी म्हणाल्या,** मला येथील लोकांचा परिषदेसंबंधीं उत्साह आणि कळकळ पाहून अत्यंत आनंद वाटत आहे. हैद्राबाद म्हणजे पंजाबचा एक तुकडा आहे, असें मला वाटत आहे. इकडील महाराष्ट्रीय लोक इतके चांगले उर्दू बोलतील असें मला वाटलें नव्हतें. पंजाबी लोकांप्रमाणें येथील लोकांची भाषा व शरीर आहे फक्त रंगांतच फरक आहे ( रामचंद्र नाईक म्हणाले कीं आमचा जहरी रंग आहे; हास्य व टाळ्या ) इतकें चैतन्य उत्पन्न झालेलें पाहून मला समाधान वाटत आहे. आपल्यांत उत्पन्न झालेली इलेक्ट्रीसिटी अशीच कायम राहील अशी मला खात्री वाटत आहे. नंतर स्वागताध्यक्षांनीं अध्यक्ष, चिंतामणराव वैद्य, ना. केशवराव, थिएटरवाले, शेट लालजी मेघजी, व्हालंटीअर कॅप्टन श्री. लेले, देसाई व कृष्णस्वामी, सर्व प्रतिनिधींची रहाण्याची व जेवण्याखाण्याची फुकट व्यवस्था केल्याबद्दल श्री. कृष्णाजीपंत नाईक, लक्ष्मण नाईक, विश्वनाथ नाईक वगैरे मंडळीचे आभार मानल्यावर सौ. अहिल्याबाई मह्लाणा यांनीं अध्यक्षांना हार घातला व स्वागताध्यक्षांनीं ना. केशवराव, चिंतामणराव वैद्य, कृष्णाजी नाईक यांना हार घातल्यावर अध्यक्षांनीं सौ. अहिल्याबाई मह्लाणा यांना हार घातला व शेवटीं श्री. काशिनाथपंत वैद्यानीं स्वागताध्यक्षांना हैद्राबादचे **टायगर** ही पदवी देऊन हार घालून आभार मानले व परिषदेचें काम संपलें.



# महाराष्ट्र हिंदुधर्म परिषद.



## हैद्राबाद येथील पांचवें अधिवेशन.

### श्रींचें अपूर्व स्वागत.

महाराष्ट्र हिंदुधर्म परिषदेचे आद्य प्रवर्तक जगद्गुरु श्रीशंकराचार्य डॉ. कुर्तकोटी यांची स्वारी परिषदेसाठीं ता. २९ मार्च रोजीं कांचीगुड्डा स्टेशनवर येणार हें हस्तपत्रकांच्या द्वारें जाहीर झाल्यामुळें स्टेशनावर लोकांची गर्दी जमली होती. स्टेशनाच्या विस्तीर्ण प्लॅटफॉर्मवर मानपत्रसमारंभाची व्यवस्था जय्यत ठेवण्यांत आली होती. राजा धनराजगिरजी, गोस्वामी लालगिरजी, भुवनेश्वरगिरजी वगैरे मंडळी हजर होती. गाडी स्टेशनावर येतांच 'सनातन धर्मकी जय' या जयघोषांत श्रींचें स्वागत करण्यांत आलें. श्रींची स्वारी व्यासपीठावर अधिष्ठित झाल्यावर श्री. वामनराव नाईक यांनीं मानपत्र वाचून दाखविलें. मानपत्र ठेवलेला नकशीदार चंदनाचा करंडा चांदीच्या तबकांतून अर्पण करण्यांत आला. मानपत्रांत हिंदुधर्माच्या सध्याच्या अवनत स्थितीचा उल्लेख करून श्रींच्या कार्याचा पुढील शब्दांत गौरव करण्यांत आला होता. "आपण देशकालवर्तमानाभिज्ञ आहां; आपण प्रागतिक आहां, मुंबई, जळगांव येथील आपल्या सर्वविश्रुत धार्मिक कामगिरीनें 'क्रियासिद्धिः सत्वे भवति महतां नोपकरणे' या तत्त्वाचा प्रत्यय आपण आणून दिला आहां; कालोचित सुधारणा करून लोकसंग्रह करणाऱ्या आद्य शंकराचार्यांचे आपण यथार्थ अनुयायी आहां; हिंदुधर्म व संस्कृति ह्रीं शक्य तितकीं सुधारून तीं उपयुक्त, उदात्त व चिरस्थायी करण्याकरितांच आपण शिखासूत्रांचा त्याग करून संन्यासाश्रम स्वीकारला आहे हें आपल्या आजपर्यंतच्या कार्यावरून सिद्ध होत आहे." मानपत्रावर प्रमुख हिंदु पुढाऱ्यांच्या सह्या होत्या. उत्तरादाखल श्रींनीं थोडेंसें भाषण केलें. ते म्हणाले "मानपत्रांत केलेलें वर्णन अवतारी पुरुषाला शोभण्यासारखें आहे, साधारण मनुष्याला तें अयोग्य आहे. तथापि परिषदेंत काय करावें हें या मानपत्रांत सांगितलें आहे. त्याप्रमाणें वागून मानपत्राला मी कृतीनेंच उत्तर देण्याचा प्रयत्न करीन." मानपत्रसमारंभ आटो-

चतांच श्रींची मिरवणूक काढण्यांत आली. ओंकार चिन्हांकित झेंडा घेऊन स्वयंसेवकांचें प्रथक " रघुपति राघव राजाराम " हें भजन तालावर म्हणत चाललें होतें, सर्व रस्ता प्रेक्षकांनीं फुलून गेला होता. परिषदेचे नियोजित अध्यक्ष **राजा प्रतापगिरजी** हे ता. ३० रोजीं रात्रौ मुंबईहून आले व त्यांचेंहि थाटानें स्वागत करण्यांत आलें.

## पंडित-परिषद्

पूर्वी जाहीर झाल्याप्रमाणें महाराष्ट्र हिंदुधर्म परिषदेचें अधिवेशन सुरू होण्यापूर्वी दोन दिवस स्वागताध्यक्षांनीं प्रचलित धार्मिक विषयांची चर्चा करण्याकरितां विद्वान पंडितांची सभा बोलाविली होती. परिषदेस वे. शा. सं. चित्रावशास्त्री, धुंडिराजदीक्षित बापटशास्त्री, सदाशिवशास्त्री भिडे, नारायणशास्त्री मराठे, महादेवशास्त्री दिवेकर, तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, लक्ष्मणशास्त्री मुरगुडकर, रंगाचार्य रड्डी, व्यंकटाचार्य, राघवाचार्य वगैरे सुमारें १५।२० महाराष्ट्रीय शास्त्रीमंडळी आली असून हैद्राबाद संस्थान व मद्रास इलाखा यांतीलहि बरेच शास्त्री- पंडित हजर होते. श्रीशंकराचार्य ( डॉ. कुर्तकोटी, ) व प्रज्ञानंदस्वामी ( घारपुरे ) हेहि सभेस हजर होते. चर्चेचे प्रसंगीं शंभर-दीडशें गृहस्थ मंडळीहि हजर असत. सभेचें काम सकाळीं व दुपारीं असें चाललें होतें.

ता. ३० रोजीं प्रारंभीं स्वागताध्यक्ष श्री. वामनराव नाईक पंडितांचें स्वागत करतांना म्हणाले, ' आम्हां गृहस्थांना शास्त्र कळत नाहीं. देशाची आजची अवनति कां झाली, व यांतून सुटण्यास शास्त्र काय मदत करतें, याचें शास्त्राधारें आम्हांला उत्तर मिळावें, म्हणून आम्ही मुख्य परिषदेचे आधीं आपणा पंडितांची ही परिषद् भरविली आहे. देशस्थितीकडे आपण लक्ष द्या, व त्यास अनुसरून शास्त्रार्थ काय आहे तो मात्र निर्भीडपणें सांगा. ' यानंतर श्रींचें आशीर्वादपर थोडें भाषण झाल्यावर श्री. वामनराव व श्रीशंकराचार्य यांच्या जोड अध्यक्षतेखालीं पंडितचर्चेस सुरवात झाली. पहिला विषय धर्मत्वाधर्मत्वनिर्णायक प्रमाणविचार हा होता.

## शब्दप्रामाण्य व तर्कबुद्धि

प्रथम वे. नारायणशास्त्री म्हणाले " श्रुतिस्मृति अपौरुषेय मानून त्यांचा मीमांसापद्धतीनें अर्थ करावा, परिस्थिति वगैरे कांहीं लक्षांत घेऊं नये व असा

निघेल तोच शास्त्रार्थ मानावा असा एक पक्ष आहे. पण श्रुतिच फक्त अपौरुषेय मानून श्रुतिस्मृतींचा अर्थ लावतांना मीमांसापद्धतीबरोबर श्रुत्यनुगृहीत पुरुषबुद्धि म्हणजे युक्ति हिचाहि उपयोग करावा, परिस्थिति अगदींच डोळ्यांआड करूं नये, असा पंडितांचा दुसरा पक्ष आहे. पहिला पक्ष ज्यांचा असेल त्यांनीं तो आतां मांडावा.

वे. राघवाचार्य म्हणाले, स्मृतिकार अपरोक्ष ज्ञानी होते. त्यांना पुरुषबुद्धीचा उपयोग करण्यास अधिकार होता. तो त्यांनीं बजावला. आज आपली इतकी पात्रता नाहीं. वे. रंगाचार्य रड्डी म्हणाले, धर्मवचनांची उपपत्ति लागत नसली तरी पुत्रप्राप्ति, पर्जन्य वगैरे बाबतींतील कर्मांचीं फलें प्राप्त होतात, म्हणून विश्वास ठेवावा लागतो. पोक्तपणानें अर्थ केल्यास आज सुद्धां धर्मवचनें सोडावीं लागणार नाहींत. पुरुषबुद्धिवादी पक्ष मांडतांना वे. चित्रावशास्त्री म्हणाले, धर्मशास्त्रांत आमच्या बुद्धीस जर कोठेंहि वाव न मिळेल तर आम्ही जगणार नाहीं. जुन्या पद्धतीनें आतां चालणार नाहीं, 'स्वस्थ च प्रियमात्मनः' या न्यायानें पुरुषबुद्धीस वाव मिळालाच पाहिजे. वेद फक्त अपौरुषेय, वेदसंमत पुरुषबुद्धीला तात्पर्यनिर्णयार्थच उपयोगांत आणावयाचा इतकेंच. राष्ट्रावर भयंकर आपत्ति कोसळली असतां विज्ञानाचा आश्रय करावा. धर्मनिश्चयार्थ बुद्धीचा उपयोग करावा असें शांतिपर्वांत सांगितलें आहे. पुरुषबुद्धीला स्मृतितुल्य प्रामाण्य द्यावयाचें तर मीमांसेचे पहिले तीन पाद सोडावे लागतील याचा विचार करावा असें दिवेकरशास्त्री म्हणाले. मीमांसेचे ५०।६० पाद आहेत व त्यांतले ३ सोडावयाचे म्हटलें तरी अडचण नाहीं. निबंधकारानीं कित्येक स्थळीं 'असें मला वाटतें' असें सांगण्याच्या वेळीं मूळ वचनास विरोध दाखवून पुरुषबुद्धीचा उपयोग केला असल्यानें आम्हांला भिण्याचें कारण नाहीं, वगैरे भिडे व चित्राव यांनीं सांगितलें. तर्काला वाव द्यावयाचा नाहीं तर स्मृतीनंतर कोणास धर्म कळलाच नाहीं असें होईल; बुद्धिमान्, स्वार्थत्यागी व समाजाकरितां तळमळणारे लोक हेच स्मृति करण्यास लायक असतात व ते आजहि आहेत वगैरे मुरगुडकर व बाळशास्त्री यांनीं सांगितलें. याप्रमाणें पुरुषबुद्धीस धर्मवचनतात्पर्यनिर्णयापुरताच वाव देणारा व स्वतंत्रपणें स्मृतितुल्य सत्ता देणारा असे एकंदर तीन पक्ष स्थापित झाले. नंतर श्रींनीं समारोप केला.

## अस्पृश्यता व जातिभेद.

ता. ३१ रोजीं सकाळीं चातुर्वर्ण्य हा विषय विचारांत घेण्यांत आला. वर्ण गुणसिद्ध कीं जन्मसिद्ध असे दोन पक्ष होते. श्रुतिस्मृतींचे आधार पाहिले तर जन्मसिद्ध वर्ण याबद्दलच पुरावा मिळतो, गुण चंचल असल्यामुळें त्यावर वर्णाधिकार नसावा असें एका पक्षाचें म्हणणें पडलें, तर छांदोग्यांतील सत्याकाम जाबालाची कथा, विश्वामित्राची कथा, युधिष्ठिर–नहुषसंवाद यांवरून पाहतां गुणांसहि वर्णाधिकारत्व कांहीं तरी द्यावें लागेल असें दुसऱ्या पक्षानें सांगितलें.

दोनप्रहरीं अस्पृश्यतानिवारणाचा विषय निघाला. दिवेकरशास्त्री म्हणाले, महार वगैरे जातींनीं आपली पूर्वींची अनार्यवृत्ति टाकून आर्यसंस्कृति स्वीकारली आहे. रजक, चर्मकार, बुरुड हे सुद्धां अस्पृश्य होते. पैकीं बुरुडास व रजकास हल्लीं आपण शिवतों, अशीच उरलेली अस्पृश्यताहि काढून टाकावी, एरवीं आज व्यवहार अशक्य आहे. प्रायश्चित्तादाखल आचमन मात्र ठेवावें. यावर बरीच चर्चा होऊन हा विषय पुनः ता. १ रोजीं सकाळीं घेण्यांत आला.

वे. भिडेशास्त्री म्हणाले, व्यक्तीप्रमाणें राष्ट्राचाहि प्राणात्यय असतो. भुकेनें प्राण जाऊं लागतांच उष्टे कुळीथ खाल्ल्यानंतरहि कांहीं प्रायश्चित्त घेतलें असा उल्लेख नाहीं. सूत्रकारांनीं त्याचें समर्थन केलें आहे. आज राष्ट्र मारावयाला घातलें आहे, तर अस्पृश्यता काढून टाका, उगीच सौम्य प्रायश्चित्तें सांगून तिचें सौम्यत्व तरी कायम ठेवूं नका, ती सपशेल नाहींशी करण्यास प्रायश्चित्त गैर समजलें पाहिजे. वे. चित्राव म्हणाले, उपेक्षा कराल तर गोभक्षकांची संख्या वाढेल, अस्पृश्यता हवी कीं गोरक्षण हवें याचा विचार करा, व हरघडीं जेथें जेथें स्पर्शप्रसंग येणार तेथें आचमन–प्रायश्चित्ताचा फार्स ठेवूं नका.

येणेंप्रमाणें या विषयाची चर्चा होऊन पतितपरावर्तनाचा विषय घेण्यांत आला. त्यावर फारसा वाद न होतां वेळ न उरल्यामुळें सभा आटोपली. पंडित परिषद् केवळ शास्त्रविषयींचीं निरनिराळीं मतें समजून घेण्याकरितांच भरविली होती, याकरितां मतें मोजून ठराव केले नाहींत.

## अधिवेशनाचा प्रारंभ

मुख्य परिषदेस 'प्रेम थिएटरां'त बुधवार ता. १ एप्रिल इ. स. १९२५ रोजीं दोनप्रहरीं चार वाजतां सुरुवात झाली. परिषदेकरितां हैद्राबाद संस्थानांतून आणि

संस्थानाबाहेरील मुंबई व मद्रास इलाख्यांतील शेजाराच्या भागांतून प्रतिनिधींची संख्या भरपूर आली होती. मुंबई, मद्रास, वऱ्हाड, मध्यप्रांत आणि हैद्राबाद संस्थान यां सर्व भागांतून अनेक शास्त्री–पंडितहि परिषदेकरितां आलेले होते. प्रतिनिधींची संख्या ५०० हून अधिक असून शहरांत त्यांची राहण्याची व भोजनाची व्यवस्था स्वागत–मंडळानें उत्तम प्रकारची ठेवलेली होती.

परिषदेकरितां प्रेम थिएटर मुद्दाम शृंगारलें असून त्यांत ' धर्मो विश्वस्य जगतः प्रतिष्ठा, कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन ' इत्यादि वचनें झळकत होतीं. प्रतिनिधी, स्वागतमंडळाचे सभासद, सन्माननीय निमंत्रित मंडळी आणि राजा सर किसन बहाद्दूर, राजा धनराजगिरजी, शेट लालजी मेघजी, मुकुंददास भगवानदास, राजा मोहनलाल, न्या. मू. केशवराव वगैरे स्थानिक बडे गृहस्थ यांनीं थिएटर चिकार भरून गेलें होतें. स्त्रियांची बसण्याची सोय दुमजल्यावर पृथक्त्वें केलेली होती. श्रीशंकराचार्य आणि शास्त्री मंडळी याची प्रशस्तपणें बसण्याची तरतूद करण्यांत आली होती. प्रारंभीं मुलींनीं स्वागतपर व ईशस्तवन-पर पद सुस्वरांत म्हटल्यावर तेलंगणांतील वेदमूर्तीनीं वेदपठनपूर्वक आशीर्वाद दिला. त्यानंतर **स्वागताध्यक्ष श्री. वामनराव नाईक** यांनीं आपलें भाषण मराठींत वाचून दाखविलें.

## स्वागताध्यक्षांचें भाषण.

प्रारंभीं निजाम इलाख्यांतील व बाहेरील महाराष्ट्रीय व इतर बंधूंचें स्वागत करून, हिंदुधर्मासंबंधाची अनास्था जाऊन त्यास पुनः उच्च पद प्राप्त होईल अशी आशा त्यांनीं प्रदर्शित केली. स्वागतमंडळानें यथाशक्ति केलेलें स्वागत गोड करून घेण्याबद्दल विनंति करून ते म्हणाले, "हैद्राबाद प्रांत अनेक ऐतिहासिक गोष्टींनीं महत्त्वाचा आहे. मराठी राज्याचें आदिस्थान दौलताबाद, आंध्रांची राजधानी वरंगल, विजयानगराच्या राज्यवैभवाचीं अवशिष्टें, आनागोंदी व हंपी हीं स्थानें या प्रांतांतच आहेत. श्रीशिवाजी व समर्थ या गुरुशिष्यांचे पूर्वज याच निजाम इलाख्यांत वेरूळ व जांब येथील पाटील व कुळकर्णी होते. हेमाद्रि, भास्कराचार्य, मुकेश्वर, अमृतराय इत्यादि विद्वान् व कवि या प्रांतांत झळकले. पैठण येथील विद्यापीठांत जगाच्या वेगवेगळ्या भागांतून विद्यार्थी येत असत. अजूनहि अजिंठा व वेरूळ येथील लेणीं पाहण्यास जगांतील जिज्ञासू

येत असतात. ज्ञानेश्वर, जनार्दनस्वामी व एकनाथमहाराज यांचे जन्म याच प्रांतांत झाले असून रामदास–पंचायतनापैकीं केशवस्वामीमहाराज याच भाग्य-नगरांत रहात होते.

महाराष्ट्रीय हिंदुधर्म परिषद् निझामशाहींत कां भरावी, या आक्षेपास उत्तर देतांना ते म्हणाले, या संस्थानांत एक-तृतीयांश भाग महाराष्ट्रीयांचा आहे. यानंतर त्यांनीं परिषदेचा पूर्वेतिहास पुढीलप्रमाणें थोडक्यांत निवेदन केला. "दोन वर्षांपूर्वीं गुलबर्गा येथें सामाजिक परिषदेचें चौथें अधिवेशन झालें, त्या प्रसंगीं कांहीं सुधारक मंडळीनें समाजसुधारणेबद्दलचे कांहीं ठराव पुढें आणले होते त्या ठरावांस विरोध करून कांहीं धर्माभिमानी लोकांनीं, हे ठराव धार्मिक असून धर्मगुरूंच्या व विद्वान् शास्त्री-पंडितांच्या मताखेरीज अशा ठरावांचा मताधिक्यानें निकाल लावूं नये अशी तक्रार पुढें आणली होती. व त्या वेळीं याच तक्रारीमुळें बरेच धर्माभिमानी लोक मंडप सोडून बाहेर निघून गेले! एका दृष्टीनें धर्माभिमानी लोकांची ही तक्रार खरी असल्यानें या वादग्रस्त प्रश्नासंबंधानें विचारविनिमय करण्याकरितां धर्मगुरूंच्या अध्यक्षतेखालीं विद्वान् शास्त्री–पंडितांची एक सभा बोलवावी या इच्छेनें प्रेरित होऊन त्याच सालीं श्रीमदाद्यशंकराचार्यांच्या जयंत्युत्सवास हैद्राबादेस निमंत्रण दिलें. परंतु कांहीं अपरिहार्य अडचणींमुळें या उत्सवांत वरील प्रसंग घडवून आणतां आला नाहीं. असा प्रसंग एकवार तरी घडवून आणण्याचा आमचा मानस होता. इतक्यांत देऊळगांवराजा येथें महाराष्ट्र हिंदुधर्म परिषदेचें जें जादा अधिवेशन झालें, त्यास मित्रमंडळींच्या आग्रहावरून हजर राहण्याचा योगायोग आला. याप्रसंगीं श्रीमज्जगद्गुरु शंकराचार्यमहाराजांनीं हिंदु धर्मपरिषद् निजाम इलाख्यांत भरविण्याविषयीं आज्ञा केली. श्रीशंकराचार्यमहाज यांच्या आज्ञेप्रमाणें व येथील मित्रमंडळींच्या साह्यानें आजची ही परिषद् भरविण्याचा सुयोग आला आहे."

नंतर परिषदेच्या कार्याकडे वळून ते म्हणाले, "हिंदुधर्म व त्याचे अनुयायांची स्थिति दिवसेंदिवस फार वाईट झाली आहे. आम्ही आपल्या धर्माच्या रहस्यास व खऱ्या तत्त्वास पारखे झालों त्याचाच हा परिणाम आहे असें म्हटल्यावांचून राहवत नाहीं. कालमानाकडे लक्ष न देतां, वाटेल त्या ग्रंथास व वाटेल त्या व्यक्तीस प्राधान्य दिलें गेल्यामुळें सर्व हिंदु समाजाची स्थिति भयंकर वावटळींत सांपडलेल्या जहाजाप्रमाणें झाली आहे. सध्यांच्या परिस्थितीकडे लक्ष देऊन

अभ्युदयनिःश्रेयस हीं दोनही साधतां येतील असा प्रचलित असलेल्या धर्मग्रंथाच्याच आधारें धर्माधर्मांचा निर्णय करून समाजाच्या संरक्षणाकरितां व शासनाकरितां एकादा ग्रंथ तयार करणें हें श्रीमज्जगद्गुरु व ऋषितुल्य विद्वानांचें कर्तव्य आहे. पूर्ववत् चारहि वर्णांची स्थापना करून प्रत्येक व्यक्तीकरितां चारी आश्रमांचीं बंधनें दृढ केलीं पाहिजेत. बलाबलाचा व देशकालाचा विचार करून परधर्मीयांना आम्ही अस्पृश्य मानीत नाहीं तर ५ कोटि स्वधर्मीयांशीं तसें आचरण कां होऊं नये ! ”

पतितपरावर्तनासंबंधीं ते म्हणाले, “आमच्या पूर्वकालीन ऋषींनीं वैदिक धर्माचा दरवाजा सगळ्या मानव जातीकरितां उघडा ठेवला होता. कालांतरानें, कोणत्या कारणानें कां होईना, वैदिक धर्माचीं द्वारें बंद केलीं गेलीं, पण आंतून बाहेर जाण्याची खिडकी मात्र मोकळी ठेवली गेल्यामुळें किती हानि झाली आहे हें सांगण नकोच. वैदिक धर्म स्वीकारण्याचा मार्ग सर्व मानव जातीस मोकळा ठेवणें इष्ट आहे. समाजानें अनाथालयें काढून व त्यांत धर्मशिक्षण देऊन दारिद्र्यानें होणारें धर्मांतर वांचविलें पाहिजे.” बालविवाहासंबंधीं ते म्हणाले, “विवाहकालीं म्हटले जाणारे मंत्र पाहिले तर पूर्वकालीं हिंदु समाजांत बालविवाह रूढ नव्हता असेंच दिसून येईल. वधूवरांना एकमेकांच्या आचरणासंबंधानें ज्या प्रतिज्ञा कराव्या लागतात त्या कोणत्या वयांत करणें शक्य आहे याकडे लक्ष देऊन आपण शास्त्ररीत्या विवाहाची वयोमर्यादा ठरवाल अशी आशा आहे. शेवटीं ही परिषद् विद्वत्ता दाखविण्याकरितां नसून वैदिक धर्मानुयायांना शास्त्रानुसार योग्य मार्ग दाखविण्याकरितां आहे” असें सांगून त्यांनीं आपलें भाषण संपविलें.

स्वागताध्यक्षांचें भाषण झाल्यावर **बॅ. रामचंद्र नाईक** यांनीं अध्यक्षांचे निवडणुकीची सूचना पुढें मांडली आणि **श्रीयुत राजा प्रतापगिरजी** यांना अध्यक्षपद स्वीकारण्याविषयीं विनंति करतांना प्रतापगिरजींच्या अंगचें दातृत्व, हिंदुधर्माविषयींचें प्रेम, निरभिमानित्व वगैरे गुणांचें वर्णन केलें. औरंगाबादचे वकील दिगंबरदास, हैद्राबादचे वकील एम. हणमंतराव, द्विवेकरशास्त्री, नारायणरावजी गुंजाळ या सर्वांनीं अनुक्रमें हिंदी, तेलंगी, मराठी या भाषांतून अध्यक्षांच्या निवडणुकीच्या सूचनेस अनुमोदन दिल्यावर अध्यक्षांनीं अध्यक्षस्थान स्वीकारलें आणि त्यांस पुष्पहार घातल्यावर त्यांनीं आपलें भाषण उर्दूत वाचून दाखविलें. त्याचा आशय पुढीलप्रमाणें होता.



दक्षिण हैद्राबाद येथें तारीख १०–११ जून १९२८ रोजीं भरलेल्या
चौथ्या विदर्भ साहित्य परिषदेचे अध्यक्ष आणि इतर कार्यकर्ते.



दक्षिण हैद्राबाद येथें तारीख १०–११ जून १९२८ रोजीं भरलेल्या चौथ्या विदर्भ साहित्य परिषदेचे अध्यक्ष आणि इतर कार्यकर्ते.

अध्यक्ष

# धर्मवीर राजा प्रतापगिरजी नरसिंगगिरजी बहादुर

# यांचें भाषण.

भगिनींनो आणि बांधवहो

आपल्याकडून ज्यावेळीं मला असें विचारण्यांत आलें कीं, तुम्ही या परिषदेचें अध्यक्षस्थान स्वीकाराल काय, त्यावेळीं मी आश्चर्यचकित झालों, कारण आपल्याला ठाऊक आहे कीं, मी कांहीं एखादा विद्वान् व वक्ता नसून अशा मोठ्या परिषदांचा अध्यक्ष होण्याची माझी पात्रताहि नाहीं. हा विनय नसून माझ्या बाबतींत वस्तुस्थितिच आहे. तथापि आपली आज्ञा शिरसावंद्य मानून आपल्या सर्वांच्या मदतीच्या भरंवशावर मला ह्या जागेचा स्वीकार करणें भाग पडलें.

माझें याहून मोठें कोणतें भाग्य आहे कीं, जी जागा श्रीशंकाराचार्य ( कुर्तकोटी ) व राजे लक्ष्मणराव भोसले यांसारख्या व्यक्तींनीं सुशोभित केली त्या जागेवर बसण्याचा मान मिळाला.

हिंदुस्थानांतील ह्या पुरातन जातीच्या उन्नती व सुधारणेकरितां सभेची सध्यां अत्यंत अवश्यकता आहे. भारतभूषण पं. मालवीय यांच्या अध्यक्षतेखालीं उत्तर हिंदुस्थानांत ऑल इंडिया हिंदू महासभा आपलें कार्य उत्तम रितीनें बजावीत आहे, आणि त्याच उद्देशाच्या पूर्तीकरितां महाराष्ट्रांत ही परिषद स्थापन करण्यांत आली. अशाच परिषदा इतर प्रांतांत स्थापन झाल्यावर आपली उन्नति खात्रीनें होईल.

ही गोष्ट सिद्ध आहे कीं, हिंदू धर्म हा जगांतील सर्व प्रचलित धर्मांत ऐतिहासिक दृष्ट्या सर्वांत पुरातन असा आहे, व ह्या बाबतींत सुप्रसिद्ध देशभक्त लोकमान्य टिळक व मॅक्समुल्लर वगैरे पौर्वात्य आणि पाश्चिमात्य विद्वानांनीं एकमतानें सिद्ध केलेलें आहे कीं, ऋग्वेद हा जगांतील जुना ग्रंथ आहे.

हिंदू धर्माला याचा अभिमान आहे कीं, तो जगांतील आद्य व सत्य आणि श्रेष्ठ असा धर्म आहे. ह्याकरितांच त्याला सनातन धर्म ही संज्ञा प्राप्त

झाली आहे. ज्यावेळीं जगांतील प्रचलित जातींचा व धर्मांचा मागमूसहि नव्हता त्याकालीं हिंदुधर्म सुधारणेच्या अत्युच्च शिखरावर पोंचला होता. व ह्या आर्य संस्कृतीचाच फैलाव सर्व जगांत होऊन त्याचेंच अनुकरण सर्वत्र करण्यांत आलें.

हिंदु धर्माचें एकेश्वरीमत असून (एकमेवाद्वितीयं ब्रह्म) हें त्याचें तत्त्व आहे व त्याचीच ( एकंसद्विप्रा बहुधावदंती ) ह्या न्यायानें निरनिराळ्या नांवांनीं परमेश्वराची उपासना केली जाते. व ह्या उपासनेचें ज्ञान, कर्म आणि भक्ति हे तीन मार्ग होत.

ईश्वर सृष्टिकर्ता असून त्यांनींच सर्व जग निर्माण केलें; अर्थात् तो आमचा परमपिता व आम्ही सर्व आपसांत बंधू आहोंत, तेथें जातिभेद व उच्च-नीच भाव मुळींच नाहीं. मनुष्यमात्राला आपल्या ज्ञान, कर्म व भक्तीच्या जोरावर मुक्ती मिळूं शकते.

वेदांत अशी आज्ञा आहे कीं, मनुष्यमात्रांनीं आपसांत प्रेम ठेवून बांधवांप्रमाणें वागावें व इहपर उन्नति करून घ्यावी. अर्थात्—

" मित्रस्य चक्षुषा सर्वाणि भूतानि समीक्षामहे " ह्या वेदाज्ञेप्रमाणेंः—

आम्हीं सर्वांना मित्रदृष्टीनें पहावें याहून श्रेष्ठ असें बंधुभाव वाढविणारें कोणतें शिक्षण आहे बरें ?

हिंदु धर्माचीं तत्त्वें आणि त्याचा विस्तृत विचार वेद, उपनिषदें आणि धर्मशास्त्रादि ग्रंथांतून केला आहे. आणि ऐहिक व्यवस्थेकरितां स्मृति तयार करण्यांत आल्या.

आमच्या हिशेबानें सध्यांच्या जगाचा आरंभ होऊन तीन युगें झालीं व चौथ्या म्हणजे कलियुगाचा पांच हजार वर्षें होऊन गेलीं. अशा पुरातन धर्मांत कालचक्राच्या तडाख्यानें जीं कांहीं स्वाभाविक स्थित्यंतरें झालीं त्याचा येथें विचार करण्याची आवश्यकता नाहीं; पण ही गोष्ट निर्विवाद आहे कीं, अनेक संकटें आणि आपत्तींशीं झगडत ईश्वरकृपेनें व ईश्वरी इच्छेनें आपला हा धर्म अद्यापि कायम आहे.

जगांत अनेक राष्ट्रें व जाती आजवर निर्माण झाल्या व नष्ट झाल्या, पण हिंदुधर्म जिवंत असून त्याचे बावीस कोट अनुयायी सध्यां कायम आहेत. परंतु अशा पुरातन व सुधारणेच्या शिखरावर एके काळीं पोंचलेल्या धर्माच्या सद्यःस्थितीकडे पाहिल्यास कोणता असा पाषाणहृदयी असेल कीं, ज्याला दुःख होणार नाहीं.

कालचक्राच्या फेऱ्यांतून हिंदुस्थानचें बचावणें शक्य नव्हतें, व त्याच्या अवनतीचा आरंभ महाभारताच्या युद्धानंतर झाला. परंतु खरोखर हिंदुस्थानच्या अवनतीस परकीयांच्या आगमनानंतर व त्यांनीं येथें राज्य स्थापिल्यानंतर सुरवात झाली.

समाजाची सुव्यवस्था आणि ऐहिक व पारमार्थिक लाभ व्हावा या हेतूनें वर्णाश्रमाची योजना करण्यांत आली. गुणकर्मस्वभावानुरूप ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र मानण्यांत आले. व किमान आयुर्मर्यादा १०० वर्षें ठरविण्यांत येऊन आश्रमधर्माची योग्य व्यवस्था लावण्यांत आली.

आरंभीं जरी फक्त चारच वर्ण होते तरी पुढें अनेक जाती व मतमतांतरांची गडबड उडून सध्यां हिंदुधर्म हा जाती पोट जाती व मतमतांतराच्या जाळ्यांत फारच वाईट रीतीनें अडकला गेला आहे, त्यांतून त्याला वर काढूं अशी भावना उत्पन्न केली पाहिजे. कारण, आपण सर्व हिंदू एक आहोंत व हिंदुधर्माचें रक्षण करणें हें सर्वांचें मुख्य कर्तव्य आहे.

ज्या धर्मांत श्रीरामचंद्र व गीतेचे उपदेशक श्रीकृष्णासारखे देव आणि वसिष्ठ विश्वामित्र वाल्मीकासारखे तपस्वी आणि महाराजा जनक, हरिश्चंद्र, युधिष्ठिर, भीष्म व अर्जुनासारखे क्षत्रिय उत्पन्न झाले त्या धर्माची थोरवी म्यां पामरानें काय बरें वर्णन करावी ?

रामायण व महाभारतादि ग्रंथांत हिंदु धर्माच्या वीर पुरुषांचीं, ज्यांनीं आपल्या पवित्र धर्माच्या रक्षणाविषयीं स्वार्थत्याग केला त्यांचीं चरित्रें पहावयास सांपडतील.

ऐतिहासिक काळांत देखील हिंदु धर्मांत महात्मा बुद्ध, शंकराचार्य, मध्वाचार्य, रामानुजाचार्य, महावीर स्वामी, बसवेश्वर, गुरु नानक, स्वामी रामदास, इ. महापुरुष आणि अशोक, चंद्रगुप्त, पृथ्वीराज, राणा प्रताप, गुरु गोविंदसिंग, वीर वैरागी, बंदा बहादूर, छत्रपति शिवाजी महाराजांसारखे वीर पुरुष निर्माण होऊन त्यांनीं आपल्या देशाच्या व धर्माच्या रक्षणाकरितां अपूर्व स्वार्थत्याग केला.

सुमारें एक हजार वर्षांपूर्वीं हिंदुस्थानांत सर्व हिंदूंचीच वस्ती होती. याच कारणाकरितां ह्याला हिंदुस्थान हें नांव मिळालें. येथें आरंभीं बाहेरच्या हूण

यवन शक लोकांनीं हल्ले सुरू केले. त्यांपैकीं पुष्कळांनीं येथेंच वस्ती केली व त्यांना हिंदू धर्मात सामिल करून घेण्यांत आलें. याप्रमाणें बाह्यांचा प्रवेश झाला व पुढें पुढें अरब मोगल पाठणांच्या स्वाऱ्या झाल्या.

आलेक्झांडरच्या स्वारीनंतर अरबस्थानचा महमद कासिम यानें सिंध प्रांतावर हल्ला केला तसेंच महमूद गिझनीच्या अनेक टोळधाडी व लुटीमुळें हिंदुस्थान फार कमकुवत झालें.

ह्या बाहेरच्या स्वाऱ्या करणारांनीं केवळ संपत्ति लुटून नेली, एवढेंच नव्हे तर त्यांनीं हिंदूंच्या अनेक देवालयें आणि मूर्तींचा उच्छेद करून त्याचा नाश केला व जुलमानें पुष्कळांना मुसलमान करून बाटविलें व गुलाम करून नेले. या संबंधीं इतिहासांतून माहिती मिळते.

हिंदू धर्मीयांमध्यें देखील आपसांतील भांडणें व बंधुप्रेमाचा अभाव, स्वार्थपरायणता आणि एकराष्ट्रीयत्वाची भावना नाहींशी झाल्यामुळें पूर्ण अव्यवस्था व शिथिलता प्राप्त झाली होती, ह्या सर्व गोष्टींचा पूर्ण फायदा घेऊन बाबरानें येथें राज्य स्थापन केलें तें अनेक शतकेंपर्यंत टिकून राहिलें.

मोंगल बादशहांपैकीं मी फक्त दोघांचा नामनिर्देश करणार आहें ते म्हणजे अकबर व औरंगजेब हे होत.

अकबर बादशहानें मुत्सद्देगिरी व दूरदर्शीपणानें राज्यकारभारांतून धर्मवेडाचा शिरकाव नाहींसा करून आपल्या बहुसंख्याक अशा हिंदूंबरोबर न्याय्य आणि मित्रतेचा व्यवहार सुरू केला. त्यांच्यावर विश्वास ठेवून त्यांनीं त्यांची राज्यांतील महत्त्वाच्या मोठमोठ्या जबाबदारीचे हुद्यावर नेमणूक केली व तलवारीच्या जोरावर राज्य करण्याचे ऐवजीं युक्ति व प्रेमाच्या पायावर राज्य केलें. त्याचा असा परिणाम झाला कीं, सर्व हिंदुमुसलमानांत ऐक्य झालें. हे परकीयांचें राज्य ही हिंदूंची भावना नाहींशी होऊन त्याला ते स्वराज्य समजूं लागले व ते त्याचें रक्षण करणें आपलें कर्तव्य समजत व त्याकरितां प्रयत्न करीत. पुढें पुढें मुसलमान हिंदुस्थानास आपला देश असें समजूं लागले व तेथेंच वास्तव्य करून राहिले. हिंदुस्थानचें हित तेंच आपलें हित अशी भावना उत्पन्न होऊं लागली. यामुळें अकबराची कारकिर्द इतिहासांत अत्यंत उत्तम व वर्णनीय अशी झाली आहे.

त्या विरुद्ध औरंगजेबानें अकबराचें धोरण झुगारून देऊन राज्यांत धर्मवेड, अन्याय व जुलूम आरंभिला. त्यानें आपल्या बहुसंख्याक अशा हिंदु प्रजेच्या राष्ट्रीय व धार्मिक भावनांची मुळींच पर्वा केली नाहीं; आणि त्यांची राज्यकारभारांतून हकालपट्टी करून अधिकारच्युत केलें. अशा रीतीनें पूर्ण अविश्वास जाहीर केला एवढेंच नव्हे तर हिंदुधर्माचा उच्छेद करण्याचें ठरविलें. त्यामुळें प्रजेंत असंतोष माजून सर्व हिंदु लोकांत असंतोष फैलावला.

त्यानें केवळ आपल्या हिंदु प्रजेवर जुलूम केला एवढेंच नसून आपल्या पूज्य व वृद्ध बापास कैद केलें आणि तिघां वडील बंधूंच्या खुनांनीं माखलेल्या हातानें राज्यमुकुट आपल्या डोक्यावर धारण केला, व एका प्रसिद्ध अशा सूफी पंथाच्या साधूचा शिरच्छेद केला, पण ह्या धर्मवेडाचा, अन्यायाचा व जुलमाचा काय परिणाम झाला, हें सर्वांस विदित आहेच. त्याचप्रमाणें मराठे, शीख व रजपूत वगैरे लोकांनीं ह्या अन्यायाचा व जुलमाचा चांगलाच वचपा काढून मोंगली राज्य इतकें कमजोर करून सोडलें कीं पुढें लवकरच त्याचा लय झाला.

अशा प्रकारचा राज्यकारभार म्हणजे अवनति व नाशाची पूर्वतयारीच समजली पाहिजे.

त्यानंतर पुष्कळ कालपर्यंत येथें आपसांत भांडणतंटे चालून हिंदू व मुसलमान हे सर्वच कमजार झाले होते. त्यांच्या कमजोरीचा फायदा घेऊन ईस्ट इंडिया कंपनीनें राज्यस्थापनेस सुरवात केली आणि १८५७ च्या बंडानंतर इंग्रजांचें राज्य कायम झालें.

सर्वत्र शांतता झाली, अंतस्थ युद्धें व बाहेरील हल्ल्यांची भीति नाहींशी झाली, सर्व स्थिरस्थावर होऊन देशांत शिक्षण, व्यापार इ. ची वाढ झाली. लोकांना आपल्या स्थितीची जाणीव उत्पन्न झाली व धार्मिक, राजकीय, सामाजिक उन्नतीचा प्रयत्न सुरू झाला, हिंदू मुसलमान एकोप्यानें राहत असत आणि आपल्या उन्नतीचा प्रयत्न करीत.

## खिलाफत.

नुकत्याच संपलेल्या जर्मन महायुद्धांत मुसलमान बंधूंवर आपत्ति आली, त्यांची खिलाफत संकटांत सांपडली अशा वेळीं आपल्या शेजारीं राहणाऱ्या मुसल-

मान बांधवांवर आलेली आपत्ति ही आपल्यावरील आपत्तिच होय अशा बंधु-प्रेमाच्या भावनेनें हिंदूंनीं त्यांना मदत करणें हें आपलें कर्तव्य समजून ह्या संकटांत शक्य ती मदत त्यांनीं केली व शेवटीं खिलाफतीचा निकाल मुसलमानांतर्फे त्यांच्या मर्जीप्रमाणें झाला. मात्र पुढें खुद्द तुर्क लोकांनींच खिलाफतीचें उच्चाटण करून खलीफाला हद्दपार केलें.

खिलाफतीच्या चळवळीचे वेळीं हिंदू व मुसलमानांचें ऐक्य पूर्णतेस पोंचलें होतें, आपसांत बंधुभाव व प्रेमभाव वाढला होता. हैद्राबादेंत देखील तीच स्थिति होती. अशा वेळीं मलबारमध्यें मोपल्यांनीं बंड करून हिंदु लोकांवर भयंकर अत्याचार केले. घरदार व शेतीची लूट करून हिंदूंचे खून केले. देवालयें व मूर्तींचा विध्वंस केला एवढेंच नव्हे तर स्त्रियांची बेअब्रु केली. लहान मुलांवर जुलूम केले व शेंकडों हिंदू स्त्रीपुरुषांना जबरदस्तीनें बाटवून मुसलमान केलें. इतकें कांहीं घडलें असूनहि मुसलमानांनीं ह्या पाशवी कृत्यांचा पूर्ण निषेध केला नाहीं. त्यामुळें हिंदूंमध्यें आपल्या दुर्बलतेची पूर्ण जाणीव उत्पन्न झाली.

अशी कल्पना होती कीं, ह्या संकटाची व आपत्तीची येथेंच समाप्ति होईल, पण ती आशा व्यर्थ ठरली. यापुढें हिंदुस्थानांत सर्वत्र हिंदुमुसलमानांचे दंगे मोठ्या व्यवस्थित रितीनें होऊं लागले. विशेषतः मुलतान, सहारनपूर, अजमेर, कटारपूर, दिल्ली व शेवटीं गुलबर्गा व कोहाट येथें ह्या दंग्याचा कळस झाला. अशा रीतीनें हिंदू मुसलमानांतील ऐक्य नाहींसें होऊन मनें कलुषित झालीं.

हिंदु व मुसलमानांत क्षुल्लक कारणावरून अर्थात् मशीदीसमोरून वाद्यें वाजविणें व धार्मिक मिरवणुकी, मोहरम, दसरा, गणपत्युत्सव इत्यादि गोष्टींवरून ज्यावेळीं पूर्वीं कधीं तंटे होत नसत. तेथें सर्वत्र झगडे होऊं लागले, हिंदू व मुसलमानांत वितुष्ट वाढण्याचें असेंहि एक कारण मुसलमानांकडून सांगण्यांत येतें कीं, मलकानीं रजपूतांच्या शुद्धीची चळवळ हिंदूंनीं आरंभ केली.

ह्या परिस्थितीचा विचार करून हिंदुमुसलमानांत ऐक्य प्रस्थापित करण्याबद्दल महात्मा गांधी, मौलाना अबूलकलाम आझाद, अल्ली भाई, पंडित मालवीय व स्वामी श्रद्धानंद इ० पुढाऱ्यांच्या प्रयत्नांनीं दिल्ली येथें ऐक्य परिषद बोलावण्यांत येऊन असा ठराव पास करण्यांत आला कीं, आपल्या धर्माचा उपदेश व प्रसार करण्याची व परधर्मांतून शुद्ध करून घेण्याची प्रत्येक धर्माला पूर्ण मुभा आहे. प्रत्येक सुबुद्ध व विचारवान् माणसाला हा अधिकार आहे कीं, योग्य वाटेल त्या धर्माचा

त्यानें स्वीकार करावा व वाटेल तेव्हां पुनः आपल्या पूर्वीच्या धर्मांत परत यावें पण अप्रबुद्ध अशा बालकांचें धर्मांतर करण्यांत येऊं नये आणि धर्मांतराचे बाबतींत जुलूम जबरदस्ती, आमिष व धोका देण्यांत येऊं नये.

वरील निकालबरहुकूम हिंदू व मुसलमान सत्यनिष्ठा व साफदिलाचें वर्तन ठेवतील तर धर्मांतरामुळें उत्पन्न होणाऱ्या तंट्यांना कांहीं तरी आळा बसेल.

हिंदु लोकांना तर फक्त आपल्या धर्माचें व आपल्या समाजाचें रक्षण करावयाचें आहे; कोणत्याहि इतर धर्मावर हल्ला करावयाचा नाहीं. करितां हिंदूंना अवश्य आहे कीं, त्यांनीं आपल्या दुर्बलतेस काढून टाकून धर्म व समाज सुधारणेच्या प्रयत्नास लवकर लागावें. जो स्वतःचें रक्षण करूं शकत नाहीं तो इतरांच्या कसा उपयोगी पडेल ?

माझ्या मतें आम्ही स्वतः आमच्या अवनती व ऱ्हासाला जितके कारण आहोंत, तितके परकीय मुळींच नाहींत. हिंदू समाजाची गफलत व बेपर्वाई आणि आपल्याच धर्मबांधवांबरोबर आमचें जुलुमी व अन्यायाचें वर्तन यामुळें परधर्मीयांनीं आमच्या मूर्खपणाचा फायदा घेतला तर त्यांत त्यांचा काय दोष आहे ? आणि आम्हांला तक्रारीला जागा कोठें आहे ?

दुष्काळ व आजारांच्या काळांत दारिद्र्यानें पीडित झालेल्या लाखों हिंदू अनाथांना पोटाकरितां धर्मांतर करण्याचा प्रसंग येतो व आला आहे. अशा-वेळीं हिंदू समाजानें त्यांना ह्या आपत्तींतून वांचविण्याचा कोणता प्रयत्न आज-वर केला आहे बरें ? मुळींच नाहीं. आमच्या पेक्षां अमेरिकन मिशनरी बरे. ज्यांनीं हजारों मैलांवरून इकडे येऊन लाखों रुपये खर्च करून हिंदू समाजानें टाकून दिलेल्या व दुर्लक्ष करून सोडलेल्यांना आपल्या धर्मांत घेऊन त्यांचें रक्षण केलें व त्यांना शिक्षण देऊन समाजांत दर्जा वाढविला, आणि आपलें पोट भरण्यास स्वतंत्र रीतीनें लायक केलें. ही केवढी आश्चर्याची गोष्ट आहे कीं, इतक्या दूर राहणाऱ्या परकीयांनीं हें काम करावें व आम्ही आमच्या शेजारीं राहणाऱ्या स्वकीय व स्वधर्मीयांबद्दल कांहीं करूं नये. करितां धनिक बांधवहो, ह्या प्रश्नाकडे आपण लक्ष देऊन तो तुम्हीं सोडविला पाहिजे. अनाथ-गृह स्थापन करा, पाठशाळा उघडा, धंदेशिक्षणाची सोय करा व शेतकीचें शिक्षण देऊन अशा असहाय्य, निराश्रित व अनाथ लोकांचें रक्षण करा, म्हणजे

त्यांचें अज्ञान व दारिद्र्य नाहींसें होऊन पोटाकरितां आपल्या हिंदू बांधवांना धर्मांतराचा दुःखद प्रसंग येणार नाहीं. द्रव्याचा अशा प्रकारच्या दानामध्यें उपयोग करण्यापेक्षां दुसरा कोणता श्रेष्ठ धर्म होऊं शकतो बरें ? हें जग नश्वर आहे. मनुष्य रिकाम्या हातानें जगांतून जाईल हें आपल्याला सर्व माहीत आहे. करितां योग्य वेळीं धनाचा उपयोग करा. मागाहून पश्चात्ताप करण्याचा प्रसंग येऊं नये हें बरें.

## शुद्धी

काशीच्या अखिल भारतीय हिंदू महासभेनें व महाराष्ट्र हिंदुधर्म परिषदेनें आपल्या पूर्वींच्या अधिवेशनांत शास्त्री पंडितांच्या साह्यानें देवल स्मृतीच्या आधारें धर्मांतर झालेल्यांना परत हिंदू धर्मांत अवश्य शुद्ध करून घेण्याबद्दल ठराव पास केले आहेत आणि त्यांचेबरोबर समाजानें पूर्ववत् सर्व व्यवहार केला पाहिजे. माझ्या मतें आमच्यांत कांहीं कालपर्यंत शुद्धी बंद झाल्यामुळें आमचें अपरिमित व न भरून येणारें नुकसान झालें आहे.

## अस्पृश्यतानिवारण

हिंदू महासभा, राष्ट्रीयसभा व हिंदुस्थानांतील बहुतेक सर्व राष्ट्रीय आणि धार्मिक पुढाऱ्यांनीं आणि महात्मा गांधींनीं अस्पृश्यतानिवारणाबद्दल चळवळ चालूं केली आहे. खरें पाहतां हिंदूधर्मांतील ह्या पांच कोट असहाय्य बांधवांशीं आमचें वर्तन न्यायाचें व भूतदयेचें असलें पाहिजे आणि शिवाशिवीचा विचार टाकून दिला पाहिजे. त्यांना शिक्षण व सदाचार शिकवून योग्य बनवावें. त्यामुळें त्यांचें दारिद्र्य नष्ट होऊन ते स्वच्छतेनें व सदाचारानें वागूं लागतील.

जर आम्ही हें कर्तव्य पार पाडणार नाहीं तर परधर्माचे लोक हें काम करतील व करीत आहेत, त्यामुळें अस्पृश्य वर्गाच्या लोकांच्या मनांत सहजच अशी भावना उत्पन्न होईल कीं, जोंपर्यंत ते हिंदु धर्मांत राहून रामकृष्णांची आराधना करितात, गो ब्राह्मणांना पूज्य समजतात आणि गाईचें रक्षण करि-तात, तोंवर आम्हीं त्यांच्याशीं योग्य व्यवहार करीत नाहीं. व त्यांना दूर करितों व अस्पृश्य समजतों. पण त्यांचें धर्मांतर होतांच ते स्पृश्य व पवित्र होतात, नंतर ते तुमच्या बरोबर समानतेनें वागूं शकतात व सार्वजनिक ठिकाणीं येऊन विहिरीवर पाणी भरूं शकतात. व अशा प्रकारें खुषीनें आपण त्यांच्याशीं समान-

तेनें व्यवहार करण्यास तयारी व उत्सुकता दाखवितो. अशा स्थितींत आपल्या धर्माविषयीं त्यांच्या मनावर किती वाईट परिणाम होत आहे व त्याचाच फायदा घेऊन परधर्मीय लोक कसे धर्मांतराचें काम करीत आहेत याचा आपण वेळींच विचार करावयास नको काय ? त्यांना सहजच असें वाटेल कीं, हिंदु धर्मांत राहून त्यांची उन्नति व सुधारणा होऊन त्यांना चांगले दिवस पाहण्याचा प्रसंग येणार नाहीं. करितां बांधवहो, मी आपल्यास प्रार्थना करितों कीं, आपण कमींतकमी त्यांना मानवी हक्क तरी द्या, कीं जे आपण परधर्मीयांना दिले आहेत. त्यामुळें आमचा समाज व धर्म बलवान् होईल व त्याची दिवसें-दिवस प्रगति व वाढ होईल, व संख्येच्या दृष्टीनें जी ओहटी लागली आहे त्यास आळा बसेल; आणि अशा रीतीनें हिंदूधर्मभास्करावरील हा कलंक निघून जाईल. माझें असें मुळींच म्हणणें नाहीं कीं, त्यांच्याशीं रोटीबेटीव्यवहार करावा फक्त एवढेंच सांगणें कीं, सार्वजनिक जागा, विहिरी, पाणवठे इ० ठिकाणीं त्यांना पूर्ण मुभा देऊन आम्च्याशीं सर्व सामाजिक व्यवहार समानतेनें इतरां-सारखे करण्याची त्यांना पूर्ण स्वतंत्रता असावी. ज्यामुळें त्यांना धर्मांतर कर-ण्याची इच्छा होऊन तसा प्रसंग येणार नाहीं.

## शिक्षण व अनाथ रक्षण

सर्व दुःखांचें मूळ अज्ञान आहे ही गोष्ट सत्य आहे. शिक्षणामुळेंच मनुष्य आणि पशूंत फरक आहे व विद्येमुळें मनुष्य ज्ञान प्राप्त करून आपली उन्नति करूं शकतो व मुक्त होऊं शकतो. शिक्षणाच्या अभावींच आम्हीं या स्थितीस पोंचलों अहो आमचें हें कर्तव्य आहे कीं आम्हीं सर्व गोष्टींहून अगोदर आमच्या समाजांत शिक्षणाच्या प्रसाराचा प्रयत्न केला पाहिजे. धार्मिक शिक्षणाची अत्यंत अवश्यकता आहे. सर्व मुलांमुलींना ( मग ते कोणत्याहि वर्णाचे असोत ) शिक्षण अवश्य दिलें पाहिजे. कोणतेंहि खेडें असें शिल्लक असूं नये की, जेथें हिंदूंची शाळा नाहीं. जर सरकार आमच्या मर्जी-प्रमाणें धार्मिक व इतर शिक्षण देणार नाहीं तर समाजाचें पवित्र कर्तव्य आहे कीं, त्यांनीं आपल्या पुढील पिढीला शिक्षण द्यावें व देशांत एकहि निरक्षर मनुष्य राहतां कामा नये, ब्राह्मणांचें तर हें पवित्र असें धार्मिक कर्तव्यच आहे. त्यांनीं हें काम आपल्या शिरावर घेतलें पाहिजे. प्रत्येक ठिकाणीं देवळें व धर्म-शाळेंतून पाठशाळा स्थापाव्या आणि समाजाचें हें कर्तव्य आहे कीं, त्यांनीं वर्गणी गोळा करून त्या चालवाव्या.

आपण ही गोष्ट प्रत्यक्षहि पाहतों कीं, हजारों साधू, संत, बैरागी, ब्राह्मण वगैरे आमच्या समाजांत फुकट अन्न खाऊन पुष्ट होऊन यथेच्छ संचार करीत फिरतात. अशा लोकांचें मन वळवून त्यांचा शिक्षण व धर्मप्रसाराच्या कामीं योग्य उपयोग करून घेतला पाहिजे आणि अशा रीतीनें हीं समाजांतील योग्य माणसें आपलें कर्तव्य करण्यास तयार होणार नाहींत तर समाजानेंहि त्यांना फुकट पोसण्याची जरूरी नाहीं, आणि अशा लोकांना मदत करणें हा धर्म नाहीं.

आमच्या समाजांत लाखो रुपये दानधर्माच्या नांवानें खर्च होतात पण इकडे मुळींच लक्ष दिलें जात नाहीं कीं, त्याचा सदुपयोग होतों कीं नाहीं ! दानशूर लोकांचें हें धार्मिक कर्तव्य आहे कीं, त्यांनीं शिक्षणाचा प्रसार आणि अनाथांच्या रक्षणाकडे अवश्य लक्ष द्यावें. व सत्पात्रीं दान करावें.

## ब्रह्मचर्य व विवाह

आमच्या सर्व राष्ट्रीय आणि सामाजिक दुर्बलतेचें कारण पाहूं गेलें असतां ब्रह्मचर्याचा अभाव हेंच दिसून येईल ब्रह्मचर्याचें पालन न झाल्यामुळें शारीरिक दुर्बलता प्राप्त होते आणि बालविवाहानें प्रजा दुर्बल व अल्पायुषी निपजते ही गोष्ट आयुर्वेदाच्या दृष्टीनेंहि निषिद्ध ठरविण्यांत आली आहे; करितां मुलींचा सोळा वर्षांपूर्वीं आणि मुलांचा पंचवीस वर्षांपूर्वीं विवाह होता कामा नये.

याशिवाय वृद्ध आणि अयोग्य अशांचा विवाह होऊं नये. ही केवढी दुःखाची गोष्ट आहे कीं, समाजांत कांहीं लोक पैशाकरितां कन्याविक्रय करून निरपराधी बालिकांचा म्हाताऱ्या व आजारी माणसांबरोबर विवाह लावून देतात, हें अत्यंत गर्ह्य होय यामुळें बालविधवांची वाढ होत जाते. समाजांत ह्या गोष्टीचा प्रतिकार करणें अत्यंत जरुरीचें आहे.

तसेंच काहीं ठिकाणीं हुंडा उपटण्याचा प्रकार चालू आहे व त्या शिवाय मुलींचा विवाह होणें मुष्कीलिचें झालें आहे त्यामुळें मुलींच्या बापाला कशा संकटांत पडण्याचा प्रसंग येतो व आपल्या बापाला संकटांतून सोडवण्याकरितां कित्येक ठिकाणीं मुलींनीं आत्महत्या देखील केली. ह्याकरितां हुंडयाची ही दुष्ट व घातुक चाल नष्ट केली पाहिजे ह्या सर्व गोष्टी शास्त्रानें निषिद्ध असल्यामुळें त्याज्य आहेत.

## विधवाची स्थिति

आमच्या अभागी समाजांत अल्पवयो बालविधवांची संख्या कांहीं कमी नाहीं. बालविवाहाचेच हे दुष्परिणाम होत. अशा तरुण बालविधवांना ज्यांच्या-कडून ब्रह्मचर्याचें पालन होणें अशक्य झालें आहे, आपत्तींत व संकटांत सांपडून परधर्मीयांचा आश्रय करून धर्मांतराचा प्रसंग येऊन आपल्या कुलाला व धर्मास कलंक लावण्याची वेळ येण्यापूर्वी त्यांना आपद्धर्म म्हणून पुनर्विवाहाची तरी परवानगी देणें सद्यःस्थितींत ( परधर्मीयांनीं त्यांना आपल्यांत ओढून नेण्याचा प्रयत्न चालविला आहे अशावेळीं ) किती दूरदर्शीपणाचें, न्याय्य व आवश्यक आहे, हें सांगितलें पाहिजे असें नाहीं. माझी आपणा सर्वांना अशी नम्र विनंति आहे कीं, आपण देशकाल मानाचा विचार करून ह्या अत्यंत, नाजुक प्रश्नाचा कांहीं योग्य मार्ग काढून यथायोग्य सहृदयतेनें निकाल द्याल अशी आशा आहे; त्यामुळें आमच्या समाजाची भ्रूणहत्या व बालहत्या इ. पापांपासून मुक्तता होईल, आणि विधवांना पवित्र जीवन व्यतित करण्याचा मार्ग मोकळा होईल.

आणि दुसऱ्या अशा विधवांना ज्यांना पुनर्विवाहाची इच्छा व जरूरी नाहीं, त्यांना आपलें जीवन सभ्यपणानें व अब्रु सांभाळ न करितां यावें म्हणून त्यांना डॉक्टरी, नर्सिंग, शिक्षकणींचें शिक्षण देणें जरूर आहे. अशा रीतीनें आपला समाज स्त्रीवर्गासंबंधींची जबाबदारी ओळखून योग्य मार्ग स्वीकारील अशी आशा आहे.

## मद्यपान- बंदी

आमचा समाज ज्या कारणांनीं ऱ्हास पावला त्यापैकीं मद्यपान व इतर निशेचीं व्यसनें होत. ह्याचा प्रसार अज्ञानी अस्पृश्यांत ज्यास्त प्रमाणांत व इतरत्र सर्वत्र होत आहे. शास्त्राच्या दृष्टीनें सुरापानाची गणना महापातकांत करण्यांत आली आहे. हें व्यसन समाजांस दुःख व दारिद्र्याप्रत पोंचवीत असून नर्कांचें द्वार मोकळें करून देतें. करितां ह्या व्यसनास आळा घालण्याचा प्रयत्न समाजाकडून झाला पाहिजे. हिंदू आणि मुसलमान दोन्ही धर्मांच्या दृष्टीनें मद्य-पानादि व्यसनें हराम आहेत, यामुळें दारिद्र्य दुर्बलता व गुन्ह्याची प्रवृत्ती वाढते, ती समाजाला अत्यंत घातुक आहे. हैद्राबाद संस्थानचे राजे इस्लामी धर्माचे

असल्यामुळें आम्ही निझामसाहेबांना अशी विनंति करितों कीं, त्यांनीं भोपाळ संस्थानाप्रमाणें आपल्या राज्यांतून मद्यपानादींचें सेवन कायद्यानें बंद करावें, म्हणजे प्रजेची आबादानी होऊन निझामसाहेबांचें नांव इतिहासांत अजरामर होईल.

## हिंदुमुसलमानांचें ऐक्य

ही गोष्ट सूर्यप्रकाशाइतकी स्पष्ट आहे कीं, हिंदुस्थानांत राहणाऱ्या सर्व जातींत ऐक्य होणें अत्यंत अवश्य आहे, त्याशिवाय आमची प्रगति मुळींच होणार नाहीं, व आम्हास कोणत्याही चळवळींत यश मिळणें कठीण आहे.

ज्याअर्थीं हिंदू व मुसलमान एकाच परमेश्वराचीं लेकरें व एकाच परमात्म्याला मानणारीं आहेत त्याअर्थीं बंधुभावाच्या दृष्टीनें त्यांच्यांत ऐक्य होणें अवश्य आहे व तें आज नाहीं उद्यां अवश्य घडून येईल.

धार्मिक श्रेष्ठत्व हें स्वार्थत्याग, सदाचार आणि परोपकारावर अवलंबून आहे. जर परस्पर प्रेमदृष्टीनें एक दुसऱ्याकडे बघतील तर परस्परांना एकमेकांच्या पुष्कळ चांगल्या गोष्टी दिसून येतील व दोषदृष्टीनें पाहिल्यास केवळ दोषच दिसतील.

दोघांनीं ही गोष्ट विसरतां कामा नये कीं, ते दोघेहि हिंदमातेचे सुपुत्र असून हिंदुस्थानचें स्वातंत्र्य व उन्नतीची जबाबदारी त्यांच्या शिरावर आहे. करितां एकमेकांनीं वीर लोकांप्रमाणें बंधुप्रेमाची वर्तणूक ठेवावी. एकानें दुसऱ्याच्या सुखदुःखांत मदत करावी व सत्यनिष्ठेनें आपला शेजारधर्म पाळावा.

सध्यां जरी देशांत ऐक्याला परिपोषक अशी स्थिति नाहीं तरी ही स्थिति कांहीं नेहमीं राहणें शक्य नाहीं. तंटेबखेडे व अशांति हीं कांहीं सदासर्वदा राहणारीं नाहींत. जेव्हां शक्य होईल तेव्हां आम्ही आमच्या गैरसमजुती दूर केल्या पाहिजेत आणि मागील गोष्टी विसरून भविष्यकालीन हिताच्या दृष्टीनें एक व्हावें, त्यांतच देशाचें व धर्माचें कल्याण आहे.

## हैद्राबाद संस्थानांतील ऐक्य

हिंदुस्थानांत कधीं कधीं हिंदुमुसलमानांत दंगे होत असत; परंतु अलीकडे दंग्यांची सांथच पसरली आहे. वर्तमानपत्रांतील धार्मिक भावनांना चेतविणारे

बेजबाबदार लेखांनीं हैद्राबाद येथेंहि एखादे दिवशीं भडका उडणार अशी भीति वाटत होती व शेवटीं ती खरी ठरून त्याचा आरंभ रायचूर जिल्ह्यांतील मौजे जवळ गेरा ह्या खेड्यांत झाला, व हा वणवा पेटत गुलबर्गा येथें चांगलाच सुव्यवस्थित असा दंगा झाला.

हैद्राबाद संस्थानांत पूर्वीपासून अशा प्रकारचे दंगे झाले नाहींत, तेथील हिंदुमुसलमानांचें सख्य असे, व दोघेहि एकमेकांच्या लग्नसमारंभांत सामिल होत होते- आणि धर्माच्या नांवाखालीं कधींच भांडणतंटे झाले नाहींत आणि असें समजलें जात असे कीं, ब्रिटिश हिंदुस्थानांतलि हिंदुमुसलमानांनीं हैद्राबादचें अनुकरण करावें. कारण, माजी निजामसाहेबांच्या कालांत सर्वांत मोठ्या दिवाणाचे जागेवर हिंदूची नेमणूक झाली होती व त्यापूर्वींहि राजा चंदुलाल वगैरे इतर हिंदु लोकांना राज्याच्या मोठमोठ्या जबाबदारीचे जागेवर जातां येत असे, आणि प्रजेच्या विशिष्ट धर्मास विशिष्ट सवलत न देतां सर्वांना सारखा न्याय, अधिकार व हक्क देण्यांत येत असे.

सध्याचे निझामसाहेब त्यांचेंच अनुकरण करितील अशी आशा आहे; कारण नुकतेंच निझाम साहेबांनीं हिंदू-मुसलमानांच्या तंट्याचीं कारणें दूर करण्याकरितां व त्यांच्या धार्मिक आचारांची चौकशी करण्याकरितां एक कमिशन नेमलें आहे. त्यांत हिंदु समाजाचा प्रतिनिधी नेमला असता तर फार बरें झालें असतें. निझामसाहेब इकडे लक्ष देतील अशी आशा आहे.

## गुलबर्गा येथील दंगा

हैद्राबाद संस्थानच्या इतिहासांत गुलबर्गा येथें गेल्या मोहरमामध्यें झालेला दंगा अत्यंत उद्वेगजनक असा आहे. कांहीं अशिक्षित, मूर्ख व तंटे लावणाऱ्या लोकांच्या दुष्टपणामुळें दंगेखोरांनीं हिंदुमुसलमानांच्या संबंधाचा व ऐक्याचा विचार न करितां लिंगायत बांधवांच्या सुप्रसिद्ध श्रीशरण बसवेश्वराचे देवालयावर व हिंदूंच्या इतर पुष्कळशा देवालयांवर हल्ला करून त्यांचा नाश केला, व मूर्तिभंग केला आणि अनेक अत्याचार करून मौ. अजीजुल्ला पोलीस सी. आय. डी. सुपरिंटेंडेंटचा खून केला. बिचाऱ्यानें हिंदूंच्या बचावाकरितां आपला बळी दिला. समाधानाची गोष्ट आहे कीं, त्याच्या वारसांना योग्य पेन्शन मिळालें, गुलबर्ग्याच्या दंग्यामुळें निझाम सरकारांनाहि अत्यंत वाईट वाटलें. कां वाटूं नये ? दोघेहि त्यांचीच प्रजा.

गुलबर्ग्याचे दंग्याची चौकशी करण्याकरितां जें कमिशन नेमलें होतें त्याचा निकाल होऊन सर्व गुन्हेगारांना सोडून दिल्याचें कळतें. त्यामुळें असंतोष उत्पन्न झाला आहे. निझामसाहेबांनीं कोणत्या कारणामुळें असें केलें न कळे ! आतां कांहीं विचार चालू असून पुनः कांहीं तरी योग्य न्यायाचा फर्मान लवकरच निघेल अशी आशा आहे.

आनंदाची गोष्ट आहे कीं, अशा प्रकारचे तंटे हे हलकट लोकांत होतात. उच्च विचाराच्या मोठ्या लोकांत त्यांचा फैलाव झाला नाहीं.

माझ्या मतें अशा तंट्यांचा निकाल हिंदु-मुसलमानांच्या संयुक्त सभेमार्फत झाल्यास योग्य होईल. जसें दिल्ली येथील परिषदेनें केलें.

प्रत्येक धर्माच्या लोकांना पूर्ण स्वातंत्र्य पाहिजे. हिंदु लोकांना त्यांच्या दसरा, गणेशचतुर्थी, रामनवमी वगैरे समयीं मिरवणुकी काढण्याची परवानगी मिळावी.

नागपूरचे हिंदू मुसलमान अभिनंदनास पात्र आहेत. त्यानीं पंचांच्या निकालाप्रमाणें वागण्याचें कबूल केलें व हिंदूंचा वाद्यें वाजवीत मशिदीसमोरून जाण्याचा हक्क मान्य केला.

सु. देशभक्त मौलाना अबुल कलाम आजाद यांनीं तर आपल्या एका भाषणांत स्पष्टपणें सांगितलें कीं, मशिदीसमोरून बाजा वाजवीत जाण्याची कुराणांत अथवा मुसलमानी शास्त्रांत मुळींच मनाई नाहीं.

अशा रीतीनें नागपूरच्या हिंदू मुसलमानांनीं इतर प्रांतांला उदाहरण घालून दिलें.

ज्यामुळें हिंदू—मुसलमानांत तंटे उत्पन्न होतात त्याचें अधिक एक कारण म्हणजे हिंदूंना बाटवून मुसलमान करणें हें होय. जरी प्रत्येक धर्माला आपल्या धर्मप्रसाराचें पूर्ण स्वातंत्र्य आहे, तथापि तें जबरीचें मुळींच नाहीं; शक्य तों-वर दिल्लीच्या परिषदेनें केलेल्या ठरावाप्रमाणें दोघांनीं वागल्यास हिंदू—मुसलमानांचें ऐक्य कायम राहून कार्यभाग होईल.

गेल्या आठवड्यांत मुंबई येथें काँग्रेसच्या मालकीची इमारत उघडण्याचा समारंभ ता. २६ मार्च रोजीं महात्मा गांधी यांच्या हस्तें पार पाडण्यांत आला, त्यावेळीं मीहि हजर होतों, त्या दिवशीं हिंदू, मुसलमान, पारशी, ख्रिस्ती, यहुदी,

शीख सर्व जातींच्या व धर्मांच्या प्रतिनिधींनीं एकाच कार्याकरितां ईश्वराची प्रार्थना केली; ती पाहून माझ्या मनावर बराच परिणाम झाला व अशाच रीतीनें सर्वांनीं मिळून कार्य केल्यास कितीतरी उत्तम होईल.

एकंदरींत आपल्या राष्ट्रीय क्षेत्रांत धर्मवेडाचें बीं पडून जो वेल उगवला आहे त्याला मांडवावर चढूं न देतां मुळापासून उपटून टाकला पाहिजे.

मित्रहो, जर तुम्ही आपल्या देशाची व धर्माची उन्नति इच्छीत असाल तर प्रथम आपली स्वतःची उन्नति करा आणि आपल्याबरोबर शेजारीं राहणाऱ्या बांधवांशीं प्रेमानें व सलोख्यानें वागा, आणि त्याकरितां स्वार्थत्याग दाखवा, व धैर्य आम्हांला ईश्वरावर पूर्णपणें भरंवसा ठेवून काम केलें पाहिजे. जर आमचा विश्वास खरा व कार्य सत्य असेल तर ईश्वरकृपेनें आम्हांला यश प्राप्त झाल्याशिवाय मुळींच राहाणार नाहीं, याबद्दल खात्री बाळगा; कारण गीतेंत असेंच सांगितलें आहे–

यत्र योगेश्वरः कृष्णो यत्र पार्थो धनुर्धरः
तत्र श्रीर्विजयोभूतीर्ध्रुवा नीतिर्मतिर्मम ॥

ॐ शांतिः शांतिः शांतिः

अध्यक्षांचें भाषण झाल्यावर श्रीचें आशीर्वादपर भाषण झालें. त्यांनं प्रथम हैद्राबाद संस्थानांत हिंदूंचीं पवित्र स्थळें व ऐतिहासिक विभूतींचीं जन्मस्थानें असल्यानें हा भाग हिंदुधर्माला पवित्र वाटतो असें सांगून श्रींनीं अध्यक्षांच्या अंगच्या बाणेदारपणाचा आणि वीरवृत्तीचा गौरव केला आणि वैदिक धर्म जसा सहिष्णु तसाच जयिष्णु व प्रभविष्णु आहे हें लक्षांत ठेवून आपण परिषदेचें कार्य करावें असें सांगितलें. आणि गेल्या वर्षांतील धार्मिक परिस्थितीचा व कार्याचा उल्लेख करून देऊळगांवराजा व सोनगीर येथील परिषदांनीं एकेक पाऊल पुढं टाकून परिषदेची घटना कशी मंजूर केली आणि शास्त्रीमंडळीहि या कार्यास कशी अनुकूल होत आहेत तें सांगितलें. आणि अखेरीस आपल्या शास्त्रकारांची आणि धर्मग्रंथांची निंदा न करतां त्यांचा हेतु लक्षांत घ्यावा, असें सांगून श्रींनीं आपलें भाषण संपविलें.



# महाराष्ट्र हिंदुधर्म परिषद्.



## दिवस दुसरा

गुरुवारीं ता. २ रोजीं सकाळीं ९ वाजतां अधिवेशनास सुरुवात झाली.

**पहिला ठराव क्षत्रिय व वैश्य** यांचे अस्तित्वासंबंधाचा होता. तो **श्री. धुंडिराज दीक्षित बापट** यांनीं जोरदार भाषेंत पुढें मांडला. क्षत्रिय व वैश्य या जाती नष्ट आहेत अशी समजूत होण्याला जीं वचनें कारणीभूत झालीं तीं वचनें अर्थवादपर असून सर्व कालीं व सर्व स्थलीं अत्यंताभावसूचक नाहींत आणि समाजाच्या धारणपोषणास हे दोनही वर्ग आवश्यक आहेत म्हणून जेथें ते बीजभूत किंवा संस्कारहीन स्थितींत असतील तेथून त्यांचें संस्कारपूर्वक संवर्धन करावें असें बापटशास्त्री यांनीं सांगितलें.

या ठरावास नरहरशास्त्री जोशी, महोपदेशक छोटुराम, यज्ञेश्वरशास्त्री वरूडकर यांनीं दुजोरा दिल्यावर **ज. स. करंदीकर** यांनीं कित्येक आक्षेपकांच्या शंकांच्या निरसनार्थ ठरावांतील प्रत्येक भागाचें विवरण केलें आणि त्यांत हा ठराव करण्याचें प्रयोजन तरी काय, विद्यमान क्षत्रिय–वैश्यांना या ठरावानें कोणत्याहि प्रकारें विषाद मानण्याजोगें यांत कांहीं आहे कीं काय ? प्रायश्चित्त देऊन पुनः वेदोक्त संस्कार सुरू करावेत असें म्हटल्यानें कोणत्याहि क्षत्रिय–वैश्यांस वाईट वाटण्याचें कारण नाहीं, कां तर संस्कारलोपाबद्दल प्रायश्चित्त आपण हरएक वेळां घेतच असतों व वेदोक्त संस्कारांत संस्कारलोपाबद्दल जें प्रायश्चित्त सांगितलें आहे तें पापकृत्याबद्दल नसून केवळ संस्कारांत पडलेला खंड भरून काढण्याकरितांच कसें असतें याचा खुलासा केला.

त्यानंतर राघवाचार्य, श्रीधराचार्य वरखेडकर, अनंतशास्त्री, कृष्णाचार्य वगैरेंनीं या ठरावास विरोध केला आणि कलियुगांत क्षत्रिय व वैश्य या जाती बीजभूतानेंच आहेत, त्यांचें प्रत्यक्ष अस्तित्व नाहीं, असा कोटिक्रम केला. त्यास कन्हय्यालालजी, गोपाळशास्त्री, लक्ष्मणशास्त्री वाईकर इत्यादिकांनीं उत्तरें दिल्यावर सर्वांच्या भाषणांचा समारोप करून **ना. दादासाहेब करंदीकर** यांनीं मूळ ठरावास पुष्टि दिली आणि या ठरावास अनुमति देण्याविषयीं विरोधी शास्त्री-मंडळीसहि विनंति केली. येणेंप्रमाणें चर्चा झाल्यवर हा ठराव **सर्वांनुमतें** मंजूर होऊन सकाळच्या अधिवेशनाचें काम संपलें.

## पतितपरावर्तन.

गुरुवारीं सायंकाळीं ६ वाजतां अधिवेशनास पुनः सुरुवात झाली. स्त्रियांना तिकिटांची अट काढून टाकल्यामुळें स्त्री-वर्गाची गर्दी अतिशय जमली होती. **पतितपरावर्तनाचा दुसरा ठराव चित्रावशास्त्री** यांनीं पुढें मांडला. त्यांत शास्त्रीय वचनांचा आधार देऊन पतितपरावर्तन हें शास्त्रसंमत कसें आहे याचें शास्त्रीबुवांनीं विवरण केलें आणि जुलूम--जबरदस्ती, अज्ञान, मोह, कपट इत्यादि कारणांमुळें आपल्यांतील लोक परधर्मांत गेल्यानें समाजाची किती भयंकर हानि होत आहे त्याचें वर्णन करून ही आपत्ति दूर करण्यासाठीं आपण पतितपरावर्तनाचें कार्य जातीनें सुरू केलें पाहिजे असें त्यांनीं प्रतिपादन केलें. या ठरावास **राजा गोविंदप्रसाद** यांनीं हिंदींत भाषण करून अनुमोदन दिलें. आणि **रंगाचार्य रड्डी** यांनींहि अनेक शास्त्रीय प्रमाणें दर्शवून ठरावास पुष्टि दिली.

**रा. गोपाळराव वकील** आणि **बॅ. रामचंद्रराव नाईक** यांनीं सदर ठरावांतील दुसऱ्या भागांतले ' जातीचे लोक आपणांत मिळूनमिसळून घेण्यास तयार असतील अगर जातीनें न घेतल्यास स्वतंत्रपणें नांदण्याची कबुली असेल तर ' एवढा भाग गाळून टाकावा अशी उपसूचना आणली. तिला उत्तरादाखल **दिवेकरशास्त्री** यांचें भाषण झालें. त्यांत त्यांनीं आपला अनुभव सांगून ही अट असणें किती जरूरीचें आहे आणि प्रथमतःच तशी इशारत न दिली तर प्रायश्चित्त घेऊन हिंदुधर्मांत आल्यावर पुनः पश्चात्ताप होऊन परत जाण्याची पाळी येण्याचा संभव आहे आणि अशी अट न ठेवल्यास शुद्धि-कार्याला किती हरकत येईल तें सविस्तर सांगितलें.

याप्रमाणें चर्चा झाल्यावर उपसूचना नामंजूर होऊन मूळ ठराव एकमतानें मंजूर झाला. श्रींची स्वारी या अधिवेशनाचे वेळीं येऊन स्वस्थानापन्न झाली होती.

त्यानंतर हैद्राबाद संस्थानांतील हिंदूंच्या **धर्मसंबंधी खात्यावर** हिंदु अधिकाऱ्यांचीच नेमणूक करण्याविषयीं **तिसरा ठराव ना. दादासाहेब करंदीकर** यांनीं पुढें मांडला. त्यास **बॅ. रामचंद्रराव नाईक** यांनीं दुजोरा दिल्यावर तो ठराव सर्वानुमतें पास झाला. उस्मानिया युनिव्हर्सिटीनें हिंदु विद्या-

र्थ्यांच्या **धर्मशिक्षणाची सोय** करावी या आशयाचा **चौथा ठराव** अध्यक्षांचेसाठीं **श्रीयुत वामनराव नाईक** यांनीं वाचून दाखवून सभेपुढें मांडला व त्यावर भाषणें न होतांच तो ठराव पास होऊन परिषदेचें सायंकाळचें अधिवेशन आटोपलें.

## दिवस तिसरा.

शुक्रवार ता. ३ रोजीं बैठकीस सकाळीं ८॥ वाजतां प्रारंभ झाला. गीता हें हिंदुधर्माचें "**एक धर्मपुस्तक**" मानण्यांत येऊन, सर्व जातीच्या व पंथांच्या हिंदूंनीं मार्गशीर्ष महिन्यांत गीताजयंतीचा उत्सव साजरा करावा हा **पांचवा ठराव** वे. शा. सं. भिडेशास्त्री यांनीं मांडला व त्यास हणमंतराव वकील यांनीं अनुमोदन दिल्यावर तो सर्वानुमतें मंजूर झाला. **गोरक्षणासंबंधींचा सहावा ठराव** व बकर-ईदचे दिवशीं गोवध बंद करण्याच्या निजाम-सरकाराच्या ठरावाबद्दल त्यांचें अभिनंदन करून **गोवधास नेहमींचीच बंदी** करण्याबद्दल त्यांस विनंति करणारा **सातवा ठराव** हे अध्यक्षांनींच सभेपुढें मांडले व ते वादविवाद न होतांच मंजूर झाले.

**अस्पृश्यतानिवारणासंबंधीं**चा **आठवा ठराव** न्या. केशवराव यांनीं पुढें मांडला व वे. दिवेकरशास्त्री यांनीं त्यास अनुमोदन दिलें. या ठरावावर विषय नियामक कमिटींत बराच वादविवाद झाला होता व सभेंतहि तोच प्रकार दिसून अला. मूळ ठरावाचा आशय असा होता कीं, "शास्त्रांत अस्पृश्यतेला आधार आहे असें मानलें तरी सद्यःस्थितीकडे लक्ष देऊन अस्पृश्यता काढून टाकावी असें या सभेचें मत आहे व हें ध्येय गांठण्याची पहिली पायरी म्हणून ही सभा अशी सूचना करते कीं, ज्या विहिरीवर हिंदुतरांनाहि पाणी भरण्याची परवानगी आहे तेथें अस्पृश्यांना मज्जाव नसावा व हिंदु समाजानें अस्पृश्यांना शिक्षण देऊन त्यांची उन्नति करण्याचा प्रयत्न करावा." या ठरावावर निरनिराळ्या पांचसहा उपसूचना होत्या व त्यांतील कांहीं उपसूचना ठरावाच्या तत्त्वास विरोधी होत्या. अखेर तडजोड होऊन ठरावाची रचना पुढीलप्रमाणें करण्यांत आली. "हिंदुधर्मशास्त्रांत अस्पृश्यताविषयक वचनें आढळत असलीं तरी अस्पृश्यता मानूं नये, अशाविषयीं अपवादात्मक वचनेंहि आढळतात. त्या अपवादात्मक वचनांचा हेतु लक्षांत घेऊन तदनुसार आणि सद्यःकालीन परिस्थितीचा विचार लक्षांत घेऊन हिंदु समाजांतील अस्पृश्यता दूर करावी

असें या परिषदेचें मत आहे व त्या दृष्टीनें ही परिषद् पुढीलप्रमाणें शिफारस करीत आहे. " ( यापुढील भाग पूर्वीचाच कायम ठेवण्यांत आला. )

ही तडजोड उपसूचनेच्या रूपानें श्री. ज. स. करंदीकर यांनीं पुढें मांडली व **नारायणराव गुंजाळ** यांनीं तिला अनुमोदन दिलें. तेव्हां दे. कौजलगी, चित्राव व बापटशास्त्री यांनीं आपल्या उपसूचना परत घेतल्या. ना. केशवराव यांनीं करंदीकर यांची उपसूचना मान्य केली व या दुरुस्त ठरावावर दिवेकरशास्त्री यांचें अनुमोदनपर भाषण झालें. दुसऱ्या दोन उपसूचना नामंजूर झाल्या व दुरुस्त ठराव जवळ जवळ एकमतानें मंजूर झाला. **गुलबर्गा येथील दंग्या**संबंधाचा **नववा ठराव** अध्यक्षांनीं मांडून तो ठराव मंजूर झाल्यावर भाग्य रेड्डी नांवाच्या अस्पृश्य मानिलेल्या पुढाऱ्यानीं सभेच्या ठरावाबद्दल कृतज्ञतापूर्ण व कळकळीचें भाषण केलें. त्यांचें भाषण झाल्यावर त्यांस प्लॅटफॉर्मवर अध्यक्षांच्या शेजारीं बसविण्यांत आलें. नंतर श्रीजगद्गुरु यांनीं ठरावास अनुकूल असें मुद्देसूद भाषण केलें आणि एक वाजतां सकाळची बैठक खलास झाली.

सायंकाळीं निजाम-सरकारानें **धार्मिक सभा व व्याख्यानें** यांना केलेली बंदी काढून घेण्यांत यावी अशी विनंति करणारा **दहावा ठराव** अध्यक्षांनीं सभेपुढें मांडला व तो मंजूर झाला. **अनाथालयें** स्थापन करून व्यापक दृष्टीचे धर्मप्रचारक जागोजाग पाठविण्याबद्दल शिफारस करणारा **अकरावा ठराव, ब्रह्मचर्यपालन व शारीरिक शिक्षणाची** व्यवस्था यासंबंधाचा **बारावा ठराव** व श्रीशंकराचार्य यांचे अध्यक्षतेखालीं कार्यकारी मंडळ नेमण्याचा **तेरावा ठराव** हे निर्विवाद मंजूर झाले.

## शेवटचा चौदावा ठराव

**वे. दिवेकरशास्त्री** यांनीं सभेपुढें मांडला या ठरावाचा आशय पुढील प्रमाणें होता "शास्त्रामध्यें ऋतुप्राप्तीनंतर तीन वर्षेपर्यंत तरी विवाह करण्याला आडकाठी नाहीं. तेव्हां लग्नांत मुलीचें वय कमींत कमी १२ व मुलाचें वय कमींत कमी २० वर्षांचें असावें. वधूवरांच्या वयांत ८ वर्षांपेक्षां जास्त अंतर नसावें. " या ठरावास स्वामी विश्वेश्वरानंद व बेदरकरशास्त्री यांनीं अनुमोदन दिलें. सातारचे गजेंद्रगडकर वगैरे कांहीं शास्त्र्यांनीं विरोध केला. श्री. दादासाहेब करंदीकर यांनीं

असा इशारा दिला कीं, शास्त्र्यांनीं विवाहाची वयोमर्यादा वाढविण्यास परवानगी दिली नाहीं तर डॉ. गौर यांच्या बिलासारखीं बिलें त्यांस तसें करण्यास भाग पाडतील! अखेर मूळ ठराव जवळ जवळ सर्वानुमतें मंजूर झाला. पंधराव्या **ठरावानें** अध्यक्षांना निरनिराळे ठराव योग्य अधिकारी व्यक्तींकडे पाठविण्याचा अधिकार देण्यांत आला. नंतर श्री. गिरिराव वकील (सध्याचे हायकोर्ट जज्ज) यांनीं जगद्गुरूंचे व अध्यक्ष राजाप्रतापगिरजी यांचे आभार मानले. वामनराव नाईक यांनीं शास्त्रीमंडळी, प्रतिनिधी, पाहुणे, सहकार्यकारी, स्वयंसेवक वगैरेंचे समयोचित शब्दांत आभार मानले. श्री. दे. भ. कौजलगी यांनीं स्वागतमंडळाच्या स्वागताबद्दल प्रतिनिधींच्या वतीनें आभारप्रदर्शक भाषण केलें, शेवटीं ईशस्तवनपर पद्यगायन झाल्यावर टाळ्यांच्या गजरांत परिषदेचें हें यशस्वी अधिवेशन खलास झालें.



# हैद्राबाद आणि देशी संस्थानें.

## भाग चौथा



देशी संस्थानें अर्थात्
हिंदुस्थानांतील एकंदर संस्थानांसंबंधीची
संक्षिप्त माहिती.



# देशी संस्थानें

## संस्थानांना स्वराज्यप्राप्तीसंबंधीं चाललेल्या चळवळी

आणि

## देशी संस्थानांसंबंधीं संक्षिप्त माहिती.

अखिल भारतीय

# संस्थान प्रजा परिषद्–बेळगांव.

## अध्यक्ष श्री. दे. भ. नरसिंह चिंतामण केळकर, यांचें मननीय व जोरदार भाषण.

बेळगांव कॉंग्रेसच्या वेळीं रविवार ता. २८ इ. स. १९२५ रोजीं सकाळ राष्ट्रीय सभेच्या तंबूंत संस्थान–प्रजापरिषदेचें अधिवेशन भरविण्यांत आलें. स्वागतमंडळाचे अध्यक्ष श्री. **पशुपतिराव,** त्यांचें भाषण म्हैसूर येथील एक प्रतिनिधीनें वाचून दाखविलें.

बरोबर आठ वाजतां मंडपांत मंडळी जमूं लागली. कांहीं वेळानें सेवादलाच्या निशाणाचा समारंभ संपल्यानंतर तिकडील प्रेक्षकांचा घोळका व त्यामागून स्वतः **म. गांधी** हे सभेला आले. ते येण्यापूर्वी सभेच्या कामाला नुकतीच सुरवात झालेली असून सांगलीचे श्री. **गणपतराव अभ्यंकर** वगैरे मंडळींचीं प्रास्ताविक भाषणें चाललीं होतीं. नंतर श्री. **न. चिं. केळकर** यांची अध्यक्षस्थानीं रीतसर निवड झाल्यावर **म. गांधी** यांचें भाषण हिंदींत झालें. त्याचा सारांश.

### महात्मा गांधींचें भाषण.

ते म्हणाले ' मी राष्ट्रीय सभेचा अध्यक्ष या नात्यानें केलेल्या भाषणांत हिंदी संस्थानांविषयीं उल्लेख केलेलाच आहे. त्या ठिकाणीं मला या विषयावर विस्तारानें लिहिण्यास अवकाश नव्हता, म्हणून सामान्यतः हिंदी स्वराज्याच्या योजनेंत सरकार व देशी संस्थानें यांचे संबंध परस्पर काय असावेत यांचा मीं ओझरता उल्लेख केला आहे. त्यांत फक्त संस्थानिकांचाच उल्लेख आहे हें खरें; व हा उल्लेख एकतर्फी असल्यामुळें कित्येकांचा गैरसमजहि झालेला दिसतो. असें होणें स्वाभाविकहि आहे. कारण ज्या मानानें माझ्या कोणत्याहि लेखाकडे किंवा भाषणाकडे लोक महत्त्वबुद्धीनें लक्ष देतात त्या मानानें त्यांतील दोष किंवा उणेपणा हीं त्यांना मोठ्या प्रमाणावर दिसणारच. तथापि मी हें मुद्दाम खुलाशादाखल सांगतों, कीं, देशी संस्थानिकांप्रमाणेंच संस्थानी प्रजेचें हितहि माझ्या डोळ्यांपुढें नेहमीं उभें असतें. आणि लवकरच मी काठेवाडांत भरणाऱ्या संस्थान–



ता. ३०।६।२८ हैद्राबाद पोलिटिकल असोसिएशननीं श्री. **पंडित मदनमोहन मालवीय** यांचे सन्मानार्थ 'ॲट होम' दिली.

प्रजा-परिषदेला अध्यक्ष म्हणून हजर राहणार आहें, तेव्हां तेथें या विषयावरील माझे विचार मी विस्तृतपणें मांडणार आहें. कारण या विषयाचा मी आतां सर्व बाजूंनीं विचार चालविला आहे. आजपर्यंत काठेवाडांत मी संस्थानिकांच्या मोहबतीखातर गेलों नव्हतों. असहकारिता व कायदेभंग यांची चळवळ सुरू असतां मी काठेवाडांत जाऊं नये असा एक प्रकारचा इशारा संस्थानिकांनीं मला दिला होता. मी अशाहि स्थितींत गेलों असतों तर ते माझें काय करणार होते म्हणा ? पण मी त्यांच्या मोहबतीखातर गेलों नाहीं हेंच खरें. आतां स्थिरस्थावर झालें असल्यानें मी लवकरच तिकडे जाईन व तिकडील परिषदेंत आपले विचार जाहीर करीन व त्यांत संस्थानी प्रजाजनांना जे स्वराज्याचे हक्क मिळावेत असें मला वाटतें त्यांचें विवेचन मी करीन.

नंतर महात्माजींना सत्कारपूर्वक निरोप दिल्यावर श्री. केळकर यांनीं आपलें इंग्रजी भाषण वाचून दाखविलें. त्याचा सारांश खालीं दिल्याप्रमाणें आहे.

## अध्यक्षांचें भाषाण.

या सभेचें अध्यक्षस्थान देऊन माझा बहुमान केला याबद्दल मी आभारी आहें. पण त्याबरोबर मजवर आपण दुसराहि एक उपकार केला आहे. तो हा कीं, बाजूला पडलेल्या या विषयावर बोलण्याची मला आपण संधि दिली. महाराष्ट्रांतील संस्थानांसंबंधानें मला थोडीबहुत माहिती आहे. पण या प्रसंगानें इतर भागांतील, विशेषतः कर्नाटकांतील, संस्थानांविषयीं मला कांहीं अधिक माहिती मिळेल हा एक मी फायदाच समजतों. राष्ट्रीय सभेच्या आठवड्यांत ज्या अनेक लहानसान परिषदा येथें मुक्रर करण्यांत आल्या त्यांतीलच ही एक आहे. त्यामुळें तिजकडे लोकांचें लक्ष कमी प्रमाणावर लागणार हें उघड आहे. पण राष्ट्रीय सभेप्रमाणें निवळ राजकीय असें महत्त्व या परिषदेखेरीज इतर कोणत्याहि उपांगभूत परिषदेला येत नाहीं. कारण राष्ट्रीय सभा व खालसांतील प्रजा यांचा जो संबंध स्वराज्यसंपादनाच्या दृष्टीनें आहे तोच संबंध ही आपली परिषद् व देशी संस्थानांतील प्रजा यांचा आहे. संस्थानी प्रजेची ही कॉंग्रेसच होय. संस्थानांचा प्रश्न तीन कारणांनीं आज डोळ्याआड केला गेला आहे. इंग्रज सरकार असा बहाणा करतें कीं, संस्थानिक हे आमचे दोस्त, तहवाले बरोबरीचे मित्र, त्यांच्या अंतर्व्यवस्थेंत व स्वातंत्र्यांत आम्ही हात कसा घालावा ? म्हणून तें हा प्रश्न दृष्टीआड करतें.

सुद्ध संस्थानी प्रजेंत कर्तृत्वसंपन्न व स्वार्थत्यागी पुढारी फारसे लाभत नाहींत व जे थोडे लाभतात त्यांच्या पाठीवर संस्थानिकांकडून तावडतोब तडाखा बसतो म्हणून ते हा प्रश्न दृष्टीआड करतात. व दुर्दैवानें राष्ट्रीय सभेनेंहि, तिला तसें कांहीं कारण नसतां, हा प्रश्न केवळ अनास्थेनें डोळ्याआड केला आहे.

इंग्रज सरकारचें या प्रश्नाकडे दुर्लक्ष कां हें उघडच दिसत आहे. देखावा स्नेहांकित संस्थानिकांचे स्वातंत्र्यांत हात घालणें अन्यायाचें होईल असा; पण असा कानाडोळा करण्यांतच त्यांचा स्वार्थ साधतो व चैन साधते. इंग्रजांना शिकार करण्याकरितांच संस्थानें हीं राखीव कुरणें किंवा रानें ठेवलेलीं आहेत. ही शिकार वाच्यार्थाप्रमाणें लाक्षणिक अर्थानेंहि होत असते. संस्थानी जंगलांत गेल्यास चारदोन वाघ मारतां येणें हें एकाद्या गोऱ्या शिकाऱ्याला जितकें सोपें तितकेंच एकाद्या बड्या अधिकाऱ्याला संस्थानिकाच्या दिवाणखान्यांत बसून एकादा मोल्याचा कंठा किंवा सुंदर हस्तिदंती नक्षी काम केलेलें लांकडी सामान देणगीदाखल मिळणें सोपें असतें. खालसा प्रजेच्या सर्वस्वावर जितका अधिकार सरकाराचा चालत नाहीं तितका तो संस्थानांच्या सर्वस्वावर चालूं शकतो. सुधारलेल्या इंग्रजी राज्यपद्धतीचा रंगीत भपका लोकांना दाखवावयाला त्यामागें संस्थानांतील आंधळ्या कोशिंबिरीचा काळा पडदा सरकाराला चांगलाच उपयोगी पडतो. अशा स्थितींत निजलेल्या संस्थानी प्रजेला त्यांच्या हक्कांची जाणीव उत्पन्न करून डिवचून जागें करण्याचें सरकारला काय कारण ? खालसांतील चाललेल्या स्वराज्याच्या चळवळीची काळजी त्यांना काय थोडी झाली ?

## एक खोटा बहाणा

पण इंग्रज सरकार संस्थानिकांच्या कारभारांत हात घालीत नाहीं ही गोष्ट मुळांत खरी तरी आहे काय ? नाहीं. या बाबतींत जाईल तेथें हत्ती जाईल, मग तेथें तहनामे, न्यायबुद्धि हीं सर्व बाजूला राहतात; आणि मनानें नाहीं म्हटलें म्हणजे मुंगीचाहि रिघाव होण्याइतकी सरकाराला जागा सांपडत नाहीं ! म्हणजे एका जुन्या गोष्टींतील " दिवा काकरवाद्भीता रात्रौ तरति नर्मदाम् " या संस्कृत म्हणीसारखें सरकारचें वर्तन असतें. संस्थानी प्रजेनें तक्रार केली म्हणजे

मात्र सरकाराचा हात संस्थानिकांच्या स्वातंत्र्यांत शिरत नाहीं. पण त्यांचा स्वतःचा स्वार्थ साधावयाचा असला म्हणजे मग तो हात हवा तितका खोल जातो. मग तेथें न्यायान्यायाचा प्रश्न नाहीं. तहांतील शब्दांचा अर्थ सोयीप्रमाणें हवा तसा करतां येतो; संस्थानें खालसा करावयाचीं झाल्यास नवीन कायद्याचीं तत्वें सुचतात; दत्तक घेऊन संस्थानाची गादी चालविण्याचा संस्थानिकांचा हक्क संपुष्टांत आणतां येतो; संस्थानिक सज्ञान होऊन त्याला मुखत्यारी देण्याची वेळ आली म्हणजे त्या संधींत स्वतःला फायदेशीर अशा नव्याच अटी लादून आपलें कल्याण करून घेतां येतें; परकीय भांडवलवाल्या रेलवे कंपन्यांच्या फायद्याकरितां नांवापुरती अल्प किंमत देऊन संस्थानांतील जमीन हवी तशी घेतां येते; संस्थानांतील नद्यांना बंधारे घालून गांवेंच्या गांवें पाण्याखालीं बुडवून त्या तळ्यांतील पाण्यानें काढलेल्या कालव्यानीं खालसांतील प्रजा व इंग्रज सकारची तिजोरी यांचें कल्याण करतां येतें; बहुमूल्य अशी संस्थानांच्या हद्दींतील खानिज द्रव्यें उकरून काढून परदेशीं लुटून नेण्याला फार थोड्या नजराण्यानें परवाने मिळवितां येतात; सर्व देशांत एकच नाणें चालणें व्यापराच्या सोयीचें आहे या सबबीवर नाणें पाडण्यांत होणारा संस्थानिकांचा नफा बुडवितां येतो; व विशिष्ट हक्कांचे मक्ते स्वतः घेऊन संस्थानिकांना थोड्या मोबदल्यावर संतुष्ट राहण्यास भाग पाडतां येतें ! या सर्व गोष्टी होऊं शकतात. त्यांनीं संस्थानिकांच्या अंतर्व्यवस्थेंत हात घातला असें होत नाहीं; पण संस्थानी प्रजेनें राजाविरुद्ध तक्रार केली तर ती मात्र इंग्रज सरकार हातीं धरीत नाहीं ! कां तर संस्थानिकांच्या अधिकारांत हात घातल्याचें पाप लागेल ! !

व्यक्तिशः संस्थानिकांना पोलिटिकल अधिकारी कसें वागवीत असतील याची कल्पना कोणासहि सहज करतां येईल, संस्थानिकांतील किती तरी लोक एजंट किंवा रेसिडेंट पुढें दिसला म्हणजे भित्रे, बावळे ठरतात. एजंट व रेसिडेंट हे बहुधा नाजुक मुत्सद्दिगिरींत प्रवीण असतात, व संस्थानिक भोळाभित्रा असेल तर त्याला वश करण्याला त्यांना मुळींच पंचाईत पडत नाहीं. तो ताठर असेल तरीहि त्याची सुटका नाहीं, कारण त्याला वठणीवर आणण्याचे मुत्सद्दिगिरीचे चाप किंवा कांटेलगामहि पोलिटिकल कचेरींत हमेष तयारच असतात व जरूरीप्रमाणें गुर्मी, धाकदपटशा यांचा अवलंब करण्यास एजंट व रेसिडेन्ट हे माघार घेत नाहींत. या दृष्टीनें पाहतां श्रीमंत संस्थानिकांपेक्षां बिचारा खालसांतील गरीब

प्रजाजन अधिक बरा. स्वाभिमान रक्षावा कीं राज्य रक्षावें असा दुहेरी फांस संस्थानिकांच्या गळ्यावर अनेक वेळां पडतो. पडद्याआड काय घडतें तें बाहेर सांगण्याचीहि चोरी. एजंट व रेसिडेन्ट यांचा जाच गुप्त व सूक्ष्म असतो, पण तो सोसवत नाहीं असा होऊं शकतो. या बाबतींत संस्थानिकांची कींव येते व त्यांचेविषयीं सहानुभूति वाटते. त्यांचें दुःख कोणाला कमी करतां येणार ? पण यांतच एक नतद्रष्टपणाचा विचार सुचतो तोही बोलून दाखविला पाहिजे. तो असा कीं, संस्थानिकांना या गुप्त जाचाचें दुःख होतें खरें, पण त्यामुळें आत्मौपम्याच्या तत्त्वानुसार आपल्या प्रजेला एकतंत्री बेजबाबदार अधिकाराचें दुःख कसें होत असेल याची जर त्यांना कल्पना करतां आली तर तें वाईटांत चांगलेंच म्हणावयाचें.

## संस्थानिकांना रीत लावा

मॉँटेग्यू-चेम्सफर्ड रिपोर्टांत राजकीय सुधारणा करण्याविषयीं संस्थानिकांना सर्वसाधारण उपदेश केला आहे हें खरें. या सुधारणा त्यांना फार दिवस टाळतां येणार नाहींत असेंहि त्यांत सांगितलें आहे. गव्हर्नर-जनरल हे देखील जातां जातां, कोठें कोठें, संस्थानिकांच्या या कर्तव्याचा पुसट उल्लेख करतात. पण इतर रीतीनें संस्थानिकांवर स्तुतीचीं जीं फुलें उधळण्यांत येतात त्यांत हे पुसट इशारे सहजच लोपून जातात. त्यांना दिलेल्या शाबासकीच्या नगाऱ्यापुढें ताकिदीची टिमकी ऐकूं कशीं जाणार ? दुसरेंहि असें कीं, संस्थानिक व हे बडे अधिकारी यांच्या भेटी क्वचित् प्रसंगीं होणार व हे प्रसंग म्हणजे पाहुणचाराचे व सत्कारसमारंभाचे. लाखों रुपये खर्चून हे समारंभ करण्यांत येतात. अशा वेळीं नावडते किंवा भानगडीचे प्रश्न काढणें हें उभय पक्षींहि सहजच अडचणीचें होतें. किंबहुना असले प्रश्न काढणें हें शिष्टाचाराच्या विरुद्ध ठरेल. आणि कोणाच्याहि झालें तरी पाहुणचारांत शिष्टाचाराचा भंग झाला तर तें चालेल असें कसें म्हणावें ? पण आमची तक्रार इतकीच कीं हे खासगी पाहुणचाराचे समारंभ सोडून संस्थानिकांना रीत लावण्याचे इतर प्रसंग व मार्ग जे खुले असतात त्यांचाहि उपयोग सरकारकडून व्हावा तसा होत नाहीं. वसंतऋतूंत अकालीं ढग येऊन वादळ व्हावें आणि त्यांच्या आनंदाचा भंग व्हावा असें कोणी इच्छिणार नाहीं. पण वसंतऋतूंप्रमाणें विर्षाकाल हाहि ईश्वरानेंच मनुष्याच्या हिताकरितां नेमून ठेवला आहे; व ग्रीष्मऋतूंत सांठलेल्या कडक उष्णतेप्रमाणें प्रजेचा असं-

तोष वाढल्यावरहि सरकारदरबारच्या राजकारणांत ढगांनीं गर्जूं नये व विजांनीं चमकूं नये असें कोणी म्हणूं लागल्यास सर्वच ग्रंथ आटोपला ! मग पर्जन्य पडणार कसा व लोकांना अन्न मिळणार कसें ? तात्पर्य, सत्काराच्या वेळीं शिष्टाचार व कामकाजांत करडी शिस्त असें यथोचित धोरण इंग्रज सरकार न स्वीकारलि तर संस्थानांत राजकीय सुधारणा कशी होणार ?

## नरेंद्रमंडळाचा फार्स

नरेंद्र-मंडळ स्थापिलें गेलें तेव्हां वाटले होतें कीं, त्यांत संस्थानिकांचे योग्य हक्क व प्रजेविषयीं त्यांचे योग्य कर्तव्य यांचीं चर्चा होऊन कांहीं तरी शिस्त लागेल, पण तेथें संस्थानिकांना अजून आपल्या योग्य हक्कांच्या चर्चेला प्रारंभहि करतां आलेला नाहीं, व तुम्ही राजकिय सुधारणा कोणत्या करणार असा साधा प्रश्नहि सरकारानें त्यांना अजून विचारला नाहीं. नरेंद्र-मंडळ म्हणजे राजकारणाच्या कोरड्या विड्या फुंकीत बसण्याकरितां रंगवून-सजवून तयार केलेला एक दिवाणखाना, याहून त्याला अजून अधिक महत्व नाहीं. आज दोन वर्षें त्याचीं दारें लागलेलींच होतीं. यंदा तो उघडून जागेचा धुरळा निघाला असला तरी तेथें काम असें थोडेंच झालें, व खऱ्या महत्त्वाच्या प्रश्नांना हातहि लागला नाहीं. नरेंद्रमंडळ हें नांव प्राचीन, संस्कृत, कर्णमनोहर असें आहे पण आज त्याच्या उच्चारानें त्याच्या प्राचीनत्वापेक्षां म्हणजे निरुपयोगीत्वापेक्षां दुसरा कांहीं अर्थ निघत नाहीं, त्याची रचना कळत नाहीं, त्याचें नियम बनलेले नाहींत, कित्येक बडे संस्थानिक नरेंद्रमंडळांत जाऊन बसणें हें अपमानास्पद मानतात. व जे जाऊन बसतात त्यापैकीं कांहीं सरकाराचे मानसपुत्र व कांहीं खिनखटपटीनें खुशाल निवडून येणारे असे आहेत. पण माझ्यामतें पूर्वीच्या कौन्सिलबहिष्काराप्रमाणेंच नरेंद्रमंडळावर बहिष्कार घालणें ही बड्या संस्थानिकांची चूक होत आहे. असो. या मंडळांत बिकानेरचे व ग्वालेरचे महाराज हेच काय ते बडे संस्थानिक आहेत, बाकीच्यांना अव्वल दर्जाच्या महत्त्वाच्या प्रश्नचर्चेंत तोलण्यासारखे नाहींत. अशा स्थितींत घोड्यांची चांगली अवलाद कशी निर्माण करावी अशासारखे प्रश्न नरेंद्रमंडळांत चर्चेला निघाल्यास त्यांत आश्चर्य नाहीं ! स्वतः जाऊन नरेंद्रमंडळांत बसल्यानें लहानमोठ्यांची खिचडी होते व आपण क्षुद्रांच्या पंक्तीला बसलों असें बड्या संस्थानिकांना वाटत असल्यास स्वतः

कोणाच संस्थानिकानें न जातां आपआपले दिवाण चर्चेला पाठवावेत व नरेंद्र-मंडळाऐवजीं वाटेल तर मंत्रिमंडळ बनवावें. पण हा खटाटोप करण्यांत काय अर्थ ! कौन्सिलें व असेंब्ली यात एकत्र बसणारे सभासद काय सगळेच सारख्या दर्जाचे किंवा श्रीमंत आहेत ? मग संस्थानिकांनाच तेवढें खिचडीचें कुपथ्य कां वाटावें ? पण मला संस्थानिकांच्या दृष्टीनें नरेंद्रमंडळाचा फारसा विचार कर्तव्य नाहीं. या मंडळांत संस्थानी प्रजेच्या हक्कांचा जर केव्हांच कांहींच विचार व्हावयाचा नसेल तर तें मंडळ उद्यां मोडलें तरी मला त्याची पर्वा नाहीं.

## संस्थानांतलें होमरूल

असो. हें मंडळ एका बाजूस ठेवलें तरी प्रजेच्या बाबतींत संस्थानिकांचें जें अवश्य कर्तव्य म्हणून आहे तें कोठें जाईल ? पण ही गोष्ट संस्थानिक अजीबात विसरल्यासारखें करतात. बिकानेरचे महाराज हे नरेंद्रमंडळाचे आधा-रस्तंभ. ते संस्थानिकांच्या हक्काबद्दल सरकाराला चुरचुरू उपदेश करतात, पण प्रजेच्या हक्काचा प्रश्न निघाला 'कीं, आम्ही प्रजेचे मायबाप, ममतेनें सर्व कारभार चालला म्हणजे झालें, त्यांत प्रजेच्या हक्कांची गोष्ट कशाला ' असा सूक्ष्म भेद ते काढतात. त्यांच्या म्हणण्याप्रमाणें देशी संस्थानांतून खालसापेक्षां एका अर्थानें होमरूल अधिक आहे ही गोष्ट खरी. पण संस्थानांतले राजे दिवाण अधिकारी हे सर्व हिंदी असतात, परके असत नाहींत. इतक्यापुरताच तो सिद्धान्त खरा आहे. पण प्रातिनिधिक संस्थांच्या द्वारें आपलीं गाऱ्हाणीं बोलण्याच्या व आपल्या इच्छेप्रमाणें गोष्टी घडवून आणण्याच्या बाबतींत संस्थानापेक्षा खाल-सांतच अधिक मजल गांठली गेली आहे, कारण इकडे आतां 'मा. बाप सरकार' हा जुना शब्दप्रयोग कोठेंच ऐकूं येईनासा झाला आहे व जबाबदारीचा अधिकार डोळ्यांसमोर दिसतो तो पकडून हस्तगत करण्याला हिंदी प्रजेचीं बोटें आतां सळसळूं लागलीं आहेत.

बिकानेरच्या महाराजांसारखे सुशिक्षित राजेच असे बेधडक बोलूं लाग-ल्यावर इतरे जनांची गोष्ट सांगावयासच नको. त्यांतील कित्येक अजून जुन्या काळच्या बेबंदशाहींतून जागेहि झालेले नाहींत. कित्येकांना अजून असें वाटतें कीं आपण प्रत्यक्ष ईश्वर. त्याच्या श्वासांतून जसे वेद निघाले तसे आपल्या श्वासांतून जे कायदे व हुकूम निघतील ते प्रजेनें वेदतुल्य मानलेच पाहिजेत.

कित्येकांना असेंहि वाटतें कीं, ईश्वराचा स्वर्ग व आपल्या वाड्यांतला दिवाणखाना या दोहोंत अंतर असें कांहींच नाहीं. स्वर्गांतून उतरावें दिवाणखान्यांत बसावें: दिवाणखान्यांतून उठावें ते स्वर्गांत जाऊन बसवें इतका घरगुती संबंध त्यांचा व ईश्वराचा जणु काय आहे! तरी बरें, इंग्रज सरकार यांना पदोपदीं अधिकाऱ्यांचे धक्के देऊन व न कळत कां होईना अपमान करून यांच्या डोळ्यांत अंजन घालतेंच आहे; त्या अंजनानें तरी आपण ईश्वरतुल्य अशी जी यांची धुंदि किंवा भूल ती उतरावी अशी कोणीहि अपेक्षा करील. आपण कोण व इंग्रज करकार कोण हे पाहून तरी ह्यांना असें वाटावें कीं, संस्थानचें राज्य झालें तरी तेथेंहि हिशेब द्यावा लागतो व घ्यावा लागतो. प्रजा झाली तरी तिलाहि कांहीं हक्क असतील व राजाचें झालें तरी तिजविषयीं कांहीं कर्तव्य असेल. पण हें लक्षांत येईल तेव्हां. कारण अजून पाहावें तों ते जुन्या वंशपरंपरेच्या धुंदींतच आहेत. परवां काठेवाडांत तिकडचे सर्व राजेरजवाडे जमून त्यांनीं लॉर्ड रेडिंग यांना मेजवानी दिली, तेव्हां जामसाहेबांनीं केलेलें भाषण वाचून कोणालाहि हंसूंच येईल. त्यांनीं बहुतेक सर्वांची पूर्वपीठिका सूर्यचंद्रासारख्या किंवा रामकृष्णासारख्या देवतांपर्यंत नेऊन भिडविली. आतां आपण सर्वच आपापल्या घराण्यांचे आपापल्या परीनें अभिमानी असतों हें ठीकच आहे, व त्या दृष्टीनें जामसाहेबांच्या बडेजावीवर मला टीका करावयाची नाहीं. पण मला इतकेंच जाणवावयाचें आहे कीं, त्यांची प्रजा झाली ती देखील त्यांच्याप्रमाणें ईश्वरनिर्मितच आहे. त्यांनाहि आपला मूळ पुरुष परमेश्वर आहे असा दावा सांगतां येईल, ही गोष्ट चुकून देखील त्यांच्या ध्यानांत येत नाहीं. ईश्वराला झालें तरी त्यानें मनुष्यरूप घेतलें तेव्हांच अवतारकृत्य करतां आलें.

## हे श्रीकृष्णाचे वंशज !

काठेवाडचे कित्येक राजेरजवाडे म्हणे थेट श्रीकृष्णाचे वंशज आहेत ! जणुं काय श्रीकृष्णापासून त्यांची कितवी पिढि हें नक्की सांगतां येईल. पण हें ग्राह्य मानलें तरी दुसरी एक गोष्ट त्यांनीं लक्षांत बाळगली पाहिजे कीं, स्वतः श्रीकृष्ण झाला तरी त्याचे आईबाप माणसेंच होतीं, त्याचा जन्म तुरुंगांत झाला. बाळपणीं गवळी या खोट्या नांवाखालीं त्याला दिवस कंठावे लागले, गवळ्यांच्या घाणेरड्या मुलांच्या संगतींत त्याचे दिवस आनंदांत गेले, त्यांच्या कांबळ्यावर तो बसे. त्यांच्याबरोबर गाणीं गाई, त्यांच्याबरोबर खेळ खेळे, आपल्यांतील

लोणी–भाकर त्यांना देई व त्यांच्या सुखदुःखांचा आपण वाटेकरी होई. तो राजा झाल्यावरहि आपल्या खेळगड्यांना विसरला नाहीं. त्याच्या राजधानींत सोन्याची घरें होतीं पण सुदामासारखा बाळपणाचा दरिद्री मित्र फार दिवसांनीं घरीं आला तेव्हां आपल्या सगळ्या बायकांच्या तांड्याकडून श्रीकृष्णानें त्याचे पाय धुवविले, व त्यानें बरोबर आणिलेल्या मूठभर पोह्यांच्या प्रसादांतील वांटा आपणाला मिळावा म्हणून त्यांचे चाललेलें भांडण श्रीकृष्णानें कौतुकानें पाहिले. पांडवांच्या घरीं यज्ञ समारंभांत त्यानें उष्टी काढिली, व ज्या मानवी शिष्याला त्यानें गीतेंत सांठविलेलें उत्कृष्ट सुंदर तत्त्वज्ञान उपदेशिलें त्याच्याच घोड्यांना रणभुमीवर श्रीकृष्णानें आपल्या हातानें खरारा केला. काठेवाडी संस्थानिकांचा आद्यपूर्वज श्रीकृष्ण हा सुष्टांचा कैवारी व दुष्टांचा कर्दनकाळ होता. त्यालाहि कपट माहीत होतें. पण कपटाशिवाय ज्यांचा इतर रीतीनें पराभव होण्यासारखा नव्हता त्यावरच त्यानें कपटप्रयोग केला. म्हणून मला काठेवाडी संस्थानिकांना नम्रपणें असें सुचवावयाचें कीं, त्यांना आपल्या दैवी पूर्वजांचा खरा अभिमान असेल तर त्याच्या गुणांचें त्यांनीं अनुकरण करावें. विशेषतः मनुष्यज्ञातीविषयीं श्रीकृष्णानें बाळगलेलें प्रेम त्यांनीं आपल्या अंगीं आणावें. तसें ते न करतील तर त्यांचे प्रजाजनहि त्यांच्यापुढं धीटपणानें उभे राहून त्यांना हटकून सांगतील कीं, ज्या दैवी खाणींत तुमचा जन्म त्यांतच आम्हीहि पण जन्मलेले आहोंत, व्यर्थ आपल्या घराण्याचा बडेजाव सांगून जुलमी अधिकाऱ्याचें समर्थन कां करतां ! शिवाय घराण्याची गोष्ट सोडली तरी कर्णानें अश्वत्थाम्याला ज्या सणसणीत शब्दांनीं उत्तर दिलें त्याच म्हणजे “ दैवायत्तं कुले जन्म मदायत्तं च पौरुषम् ” या शब्दांनीं काठेवाडांतील प्रजाजन या कृष्णवंशीय संस्थानिकांचा धिःकार करतील. व खरोखरच संस्थानिक लोक यापुढचें धोरण काळवेळ पाहून योग्य असें न ठेवतील तर त्यांच्या संस्थानांची धडगत राहणार नाहीं.

## स्वावलंबन हाच खरा मार्ग.

वरील विवेचनावरून हें दिसून येईल कीं, असलें इंग्रज सरकार व असले संस्थानिक यांच्यावर विसंबून राहिल्यानें संस्थानी प्रजेला स्वराज्य मिळण्याची आशा नको. प्रारंभीं व शेवटीं त्यांना स्वतःच्या पायावरच खंबीर उभें राहिलें पाहिजे. कॉंग्रेसवाले, स्वराज्यवादी वगैरे लोकांवरहि त्यांनीं भार टाकून बसण्यांत

अर्थ नाहीं. विलायतेंतील पार्लमेंटरी पक्षावर हिंदी लोकांनीं अवलंबून राहाण्यासारखेंच तें भ्रामक होईल. कांहीं गोष्टी केवळ प्रतिनिधिद्वारा होत नसतात; स्वतः मेल्याशिवाय स्वर्ग दिसत नाहीं ही म्हण प्रसिद्ध आहे. बाहेरून लोक मदत देतील नाहीं असें नाहीं. पण भोजनांत जसें तिखट तशीच ही बाहेरची मदत केवळ उत्तेजनार्थ होय. कुस्ती पाहाण्यास जमलेले लोक शाबास म्हणून टाळ्या वाजवितील किंवा पंच जवळ उभे राहून कुस्ती बरोबर नियमाप्रमाणें चालली आहे व तींत कांहीं वेडावांकडा प्रकार होत नाहीं एवढेंच फार तर पहातील. पण कुस्ती जिंकण्याला जें शरीरबल, जो जोर, व जी ईर्षा लागते ती स्वतः पहिलवानांचीच पाहिजे. संस्थानी प्रजेला बाहेरून सल्लामसलत व सहानुभूति मिळेल, पण संकटें आलीं तरी तीं सोसून त्यांनीं आपलें भांडण आपणच भांडलें पाहिजे. खालसांतील लोकांना संकटें सोसावीं लागलीं आहेत. स्वराज्य फुकट किंवा स्वस्तहि मिळत नसतें. सभा भरविण्याचाच प्रश्न घेऊं. आजवर संस्थानी प्रजाजनांनीं बाहेरून बाहेरून सभा भरविल्या, पण यापुढें त्यांनीं त्या स्वतःच्या संस्थानांतच भरवाव्या, व बंदीचे हुकूम अयोग्य असतील तर ते खुशाल मोडावेत; पण सुज्ञ संस्थानिक सहसा इतक्या थराला गोष्टी नेत नाहींत व असा एकादा संस्थानिक भेटल्यास प्रजेनेंहि त्याला सांभाळून घेतलें पाहिजे. कारण त्यानें खुषीनें सभा भरूं दिल्या तरी पोलिटिकल अधिकारी त्याबद्दल त्यांना जाच करतात. संस्थानिकांची स्थिति अडकित्त्यांतील सुपारीसारखी असते. हें प्रजेनें ध्यानांत धरले पाहिजे. म्हणून संमतीनें किंवा हट्टानें संस्थानच्या हद्दींत सभा भरविली असतां तेथें इंग्रज सरकारावर टीका किंवा आपल्या अगर परकी संस्थानिकांची व्यक्तिशः निंदा करूं नये. किंवा बेजबाबदार आचरट वक्ते उभे करूं नयेत. सर्वसामान्य रीत्या प्रजेचे हक्क काय आहेत याची चर्चा किंवा स्वताच्या संस्थानांतील खातेवार कारभारावरील टीका एवढा विषय सभेला योग्य व पुरेसाहि असतो. एखादा संस्थानिक जर असें म्हणेल कीं, सभा भरवा पण माझ्या स्वतःच्या संस्थानाशिवाय इतर गोष्टी तेथें काढूं नका, तर त्यानें आणखी अधिक काय करावें ! उलट, एखादा नाठाळ संस्थानिक भेटला व अशाहि अटीवर सभा भरवूं देत नाहीं म्हणाला तर भाषणस्वातंत्र्य व समितिस्वातंत्र्य यांचे हक्क बजावण्याकरितां, पण तेवढ्याचपुरता, सत्याग्रहाचा अवलंब

केल्यास अशा संस्थानिकाला त्या प्रसंगीं तें तर योग्य उत्तर ठरेलच पण या प्रयोगानें त्याची जन्माची खोडहि निघून जाईल.

संस्थानी प्रजाजनांनीं असें केल्यास त्यांना बाहेरून मदत व सहानुभूति मिळेल. राष्ट्रीय सभा द्यावी तितकी मदत देत नाहीं, ही त्यांची तक्रार मला न्यायाची वाटते. देशी संस्थानांच्या खातेवार कारभारांत राष्ट्रीय सभेनें मन घालूं नये हें ठीक आहे, तसें न केल्यास अनवस्था होईल. पण हल्लीं संस्थानें जिल्हावर वांटून दिलीं आहेत व संस्थानी प्रजेला कॉं. कमिट्यांचे सभासद व राष्ट्रीय सभेचे प्रतिनिधि होतां येतें व हा हक्क बजावलाहि जातो. असें असतां राष्ट्रीय सभेंत दरसाल संस्थानी प्रजेच्या स्वराज्याविषयीं निदान एकादा सर्वसाधारण ठराव राष्ट्रिय सभेनें कां करूं हें समजत नाहीं. तसें झाल्यास कॉं. च्या प्रमुख पुढाऱ्यांचीं या विषयावर भाषणें होतील व संस्थानी प्रतिनिधि भाषणें करतांना उदाहरणादाखल त्या सालांतील आपले अनुभव सांगूं शकतील. पण आज दोनतीन वर्षें राष्ट्रीय सभेच्या वर्किंग कमिटीनें या विषयावर स्वतःचा म्हणून एकहि ठराव पुढें आणला नाहीं. महात्माजींच्या भाषणांत आलेला संस्थानविषयक उल्लेख अपुरा असल्याचें त्यांनींच आपणास सांगितलें आहे. हल्लींच्या काळांत महात्माजींना अनाथांचे वाली असें नांव मिळालें आहे व तें योग्य आहे. म्हणून अनाथ संस्थानी प्रजेबद्दलहि त्यांनीं मधून मधून उद्गार काढावेत. खुद्द राष्ट्रीय सभेंतच असे कांहीं पुढारी आहेत कीं, संस्थानिक किंवा राजा म्हटला म्हणजे ते आदरबुद्धीनें मान खालीं घालून मूक बनतात. स्वतः राजापेक्षां त्यांच्या प्रतिष्ठेची काळजी जणुं काय यांनाच अधिक आहे; पण ही त्यांची शुद्ध अतिशयोक्ति आहे. संस्थानें शिल्लक, शाबूत व जिवंत राहावीं, संस्थानिकांना योग्य तो मान मिळावा, असेंच म्हणणारांपैकीं मी एक आहें. नकाशांत संस्थानांच्या मुलखावर सरसकट तांबडा रंग फांसावा हें मत मला अत्यंत त्याज्य वाटतें. पण संस्थानें जिवंत राहावीं किंवा न राहवीं हें संस्थानिकांच्याच हातचें आहे. त्यांना आपली दौलत व आपली इभ्रत सांभाळावयाची असेल तर त्यांनींच काळाकडे नजर देऊन योग्य त्या सुधारणा केल्या पाहिजेत.

अध्यक्षांचें भाषण संपल्यावर खालील ठराव सभेपुढें मांडण्यांत आले व ते पास झाले.

---

# परिषदेंत पास झालेले

## ठराव.

**ठराव १**–हिंदी संस्थानिकांनीं आपल्या राज्यांत प्रजेला स्वराज्याचे योग्य अधिकार देण्याचे हेतूनें ताबडतोब प्रातिनिधिक संस्था निर्माण कराव्या व संस्थानी प्रजेनेंही सुधारणा घडून येण्यास जरूर ते जोरानें प्रयत्न करावेत अशी या परिषदेची उभयतांना विनंति आहे.

**ठराव २**–संस्थानी प्रजेला चळवळीचा योग्य मार्ग दाखविला जावा व तिच्या संकटांत तिला सहानुभूति बाहेरून मिळावी, याकरितां राष्ट्रीय सभेनें व इतर राजकीय संस्थांनीं संस्थानांच्या प्रश्नाकडे अधिक लक्ष द्यावें अशी या सभेची विनंति आहे.

या ठरावावर श्री. सत्यमूर्ति, सुब्रह्मण्यम्, एक मारवाडी गृहस्थ व मलबारांतील श्री. माधवन् वगैरेंचीं भाषणें होऊन ठराव सर्वानुमतें मंजूर झाला. नंतर अध्यक्षांना रतलाम संस्थानांतील हिंदु स्वयंसेवकांच्या धरपकडीसंबंधानें आलेली तार वाचून दाखविण्यांत आली, आणि इंदूरचे सुरजमल जैन यांनीं संस्थान प्रजा–परिषदेला पुढील सालीं खांडवा येथें निमंत्रण दिलें तेंहि वाचून दाखविण्यांत आलें. आणि शेवटीं श्री. राघवेंद्रराव शर्मा यांनीं अध्यक्षांचे व प्रतिनिधी आणि श्रोत्यांचे आभार मानल्यानंतर सभा बरखास्त झाली. सभेला महाराष्ट्रांतील संस्थानांचे, तसेंच हैद्राबादचे श्री. वामनराव नाईक इ. व म्हैसूर या संस्थानांचे प्रतिनिधि, द. प्रजा परिषदेचे चिटणिस श्री. वामनराव पटवर्धन, व राष्ट्रीय सभेंतील इतर कांहीं गृहस्थ हजर होते. पुढील वर्षीं खुद्द राष्ट्रीय सभेंत या प्रश्नाची अधिक चर्चा होईल अशी सर्वांना खात्री वाटत आहे. ही परिषद भरविण्याचें सर्व श्रेय बेंगळूर येथील श्री. जे. भीमराव सेक्रेटरी यांच्याकडे आहे.



# काठेवाड संस्थान प्रजापरिषद्.



## अध्यक्ष महात्मा गांधी यांचें महत्त्वाचें भाषण.



( ता. ८ जानेवारी सन १९२५ )

**म. गांधी**, हे मेसर्स वल्लभभाई पटेल, अबास तय्यबजी, दरबार श्री. गोपाळदास, राणी श्री. भक्तीबा, श्रीमती अनुसया बेन, मि. महादेव देसाई, शेट शंकरलाल बँकर यांसह ता. ८ रोजीं भावनगर येथें आले. परिषदेकरितां सुमारें १५ हजार लोक बसतील एवढा मंडप तयार केला होता.

नंतर परिषदेच्या कामास सुरवात झाली. परिषदेचें काम चालू असतांना दिवाण **सर प्रभाशंकर पट्टणी** व भावनगर संस्थानांतील अधिकारी प्रजेच्या पुढाऱ्यांच्या बरोबर उच्चासनावर बसले होते.

महात्माजींची अध्यक्षस्थानीं निवडणूक होऊन त्यांनीं आपल्या भाषणास सुरवात केली.

### अध्यक्षांचें भाषण.

**मित्र हो,** मी जेलमध्यें जाण्यापूर्वींच काठेवाड परिषदेचें अध्यक्षस्थान मीं स्वीकारावें असें सुचविण्यांत आलें होतें. पण त्यावेळेस ती जबाबदारी स्वीकारण्याचें मीं नाकारलें होतें. त्यावेळचीं ह्या परिषदेच्या अध्यक्षत्वाची जबाबदारी न स्वीकारण्याचीं कारणें हल्लीं राहिलेलीं नसल्यामुळें मीं अध्यक्ष होण्याचें कबूल केलें आहे; पण तेंहि भीत भीतच. भीत भीत स्वीकारण्याचें कारण हे कीं, राजकारणासंबंधींच्या प्रचलित रूढ विचारांहून माझे त्याच्या-संबंधींचे विचार भिन्न आहेत. शिवाय ह्या वर्षीं काँग्रेसच्या अध्यक्षत्वाचें काम माझ्या हातांत असल्यामुळें माझी स्थिति थोडी कठिण झालेली आहे; कारण तो बोजाच माझ्या शक्तीबाहेरचा आहे. अशा स्थितींत ह्या परिषदेच्या अध्यक्षत्वाची जबाबदारी स्वीकारणें हें जास्तच बोजा शिरावर घेण्यासारखें होतें. ह्या परिषदेचें

आणि भावनगर येथील सरकारच्या धोरणांत मात्र फरक असावा ही स्थिति कृत्रिम आहे. आजच्या परिस्थितींत लोक एक असून त्यांच्यासंबंधींचें सरकारचें धोरण मात्र भिन्न आहे. ही स्थिति फार वेळ टिकूं शकणार नाहीं. महासभा मध्यें न पडली तरीहि आधुनिक वातावरणाच्या अदृश्य परिणामाच्या योगानें हिंदुस्थानांत अनेक राज्यें असलीं, तरी त्यांचें धोरण एकच होऊं पाहील आणि त्यांतच हिंदुस्थानच्या संस्कृतीची शोभा आणि परीक्षा आहे.

पण माझा असा दृढ अभिप्राय आहे कीं, ब्रिटिश हिंदुस्थान जोंपर्यंत पराधीन आहे, जोंपर्यंत ब्रिटिश हिंदुस्थानच्या लोकांच्या हातांत सत्ता आलेली नाहीं, म्हणजे जोंपर्यंत ब्रिटिश हिंदुस्थानला आत्मविकास करण्याची शक्ति प्राप्त झालेली नाहीं—थोडक्यांत जोंपर्यंत ब्रिटिश हिंदुस्थानला स्वराज्य मिळालेलें नाहीं, तोंपर्यंत देशी आणि ब्रिटिश ह्या दोन्ही हिंदुस्थानची स्थिति छिन्नभिन्नच राहणार. ह्या छिन्नभिन्नतेवरच तिसऱ्या सत्तेचें अस्तित्व अवलंबून आहे ह्याचा अर्थ सबंध हिंदुस्थानची राजकीय दृष्ट्या सुव्यवस्था असणें ही गोष्ट ब्रिटिश हिंदुस्थानांतील लोकांच्या स्वराज्यावर अवलंबून आहे.

## देशी संस्थानांची स्थिति.

ती सुव्यवस्था एकमेकांचा नाश करणारी नव्हे तर एकमेकांना पोषण देणारी अशी असावयास पाहिजे. स्वराज्य मिळालें म्हणजे हिंदुस्थान देशी संस्थानांचा नाश करूं इच्छिणार नाहीं, तर त्यांना त्याच्यापासून सहाय्य मिळेल. आणि देशी संस्थानांचेंहि हिंदी स्वराज्यासंबंधीं तेंच धोरण राहील.

हल्लींची देशी संस्थानांची स्थिति माझ्या मतें करुणास्पद आहे. कारण तीं स्वतःच जवळजवळ परतंत्र आहेत. आपल्या प्रजेला देहांत शिक्षा देण्याची सत्ता असणें ह्यांत खरी सत्ता नाहीं, तर सर्व जग उलटलें तरी आपल्या प्रजेचें रक्षण करण्याची इच्छा आणि शक्ति असणें ह्या गोष्टींत सत्तेचा वास आहे. आज देशी संस्थानांत तशी सत्ता नाहीं. आणि उपयोगाच्या अभावीं इच्छा देखील गेल्यासारखी आहे. उलट प्रजेचें रक्षण करण्याच्या इच्छेचा लोप झाला असून, तिच्यावर जुलूम करण्याच्या शक्तीची मात्र वृद्धि झालेली आहे, असें दिसतें. विहिरींत जसें पाणी असेल तसेंच पोहऱ्यांत येईल हा न्यायच आहे. साम्राज्यांत अराजकता आहे. त्यामुळें साम्राज्याच्या ताब्यांत अस-

लेल्या देशी संस्थानांतहि अराजकता आहे. संस्थानांतील ह्या अराजकतेचें कारण राजे महाराजेच नाहींत, पण बाहेरची परिस्थितिहि पुष्कळ अंशीं तिला कारण झालेली आहे.

सबंध हिंदुस्थानची स्थिति निसर्ग म्हणजेच ईश्वरी योजनेच्या विरुद्ध झालेली असून, चोहोंकडे अव्यवस्था आणि असंतोष दिसत आहे. एक अंग जर चांगलें सुव्यवस्थित झालें तर सर्वत्र सुव्यवस्था होऊन जाईल, असा माझा दृढ अभिप्राय आहे.

## सुरवात कोणीं करावयाची ?

तर सुरवात कोणीं करावयाची ? ब्रिटिश हिंदुस्थाननेंच ती करावयास पाहिजे हें उघड आहे. ब्रिटिश हिंदुस्थानच्या लोकांत आपल्या भयंकर स्थितीची जाणीव उत्पन्न झालेली असून तिच्यांतून सुटण्याची त्यांची इच्छा आहे. जिज्ञासा उत्पन्न झाल्यानंतरच ज्ञान संभवतें हा नियम आहे. ह्या नियमाला अनुसरून ज्या लोकांना ह्या स्थितींतून सुटण्याची इच्छा झाली, त्याच लोकांना सुटण्याचा उपाय सांपडेल आणि ते तो योजतील. आणि म्हणूनच मी सारखा म्हणत आलों आहें कीं, ब्रिटिश हिंदुस्थानचें स्वातंत्र्य हेंच देशी संस्थानांचें स्वातंत्र्य आहे. ब्रिटिश हिंदुस्थान स्वतंत्र झालें म्हणजे संस्थानांतील राजा आणि प्रजा हा संबंध नाहींसा होणार नाहीं. तो निर्मळ होईल. माझ्या स्वराज्याच्या कल्प-नेंत धनसंचयाचा नाश नाहीं. धनसंचयांतच राजसत्ता राहिलेली आहे. धनिक, मजूर वगैरे लोकांत सद्व्यवहार चालावा, अशी माझी इच्छा आहे. केवळ मजूरवर्गाचें किंवा धनिकवर्गाचें साम्राज्य मी इच्छित नाहीं. हे दोन वर्ग निसर्गतःच विरोधी आहेत, असें मी मानीत नाहीं. जगांत गरीब श्रीमंत हा भेद राहणारच; पण त्यांच्यांतील परस्परांसंबंधींच्या व्यवहारांत परिवर्तन होत गेलें पाहिजे. फ्रान्स प्रजासत्ताक आहे, पण त्यांत सर्व प्रकारचे वर्ग आहेत.

शब्दाच्या जाळ्यांत आपण सांपडतां कामा नये. हिंदु लोकांत जे दोष आपणाला दिसत आहेत, ते सर्व सुधारलेल्या पाश्चिमात्य लोकांतहि आहेत. त्यांना आपण निराळ्या नांवानें ओळखतों इतकेंच. डोंगर जसे दुरून साजतात तशाच पाश्चिमात्यांच्या कांहीं गोष्टी आपणांस दुरून रमणीय वाटतात. वस्तुस्थिति

पाहिली तर तिकडेहि राजा आणि प्रजा ह्यांच्यांत तंटेबखेडे चाललेलेच असतात. तेथें देखील लोक सुख शोधीत असतात, पण शेवटीं दुःख भोगीत असतात.

## देशी संस्थानें.

ह्या रमणीय देशाच्या राजा—महाराजांसबंधीं काठेवाडचे लोक माझ्याकडे फिर्यादी घेऊन येतात, आणि माझ्या शिथिलतेला दोष देतात; त्या उतावळ्या मित्रांना आतां असें कळून चुकलें असेल कीं, मी शिथिल नसून, अव्यवस्था बंद पडण्याचा इलाज शोधून तो मी योजीत आहें. सर्व आपत्तींना रामबाण इलाज म्हणजे स्वराज्य आहे हें जाणूनच मीं त्यासाठीं सर्वस्व अर्पण केलेलें आहे. सूर्य उगवला असतां जसा अंधकाराचा नाश होतो, तसाच ह्या स्वराज्यरूपी सूर्य उगवला असतां राजा आणि प्रजा ह्यांच्यांतील अराजकतारूपी अंधकार नाहींसा झाल्याशिवाय राहणार नाहीं.

## परदेशगमन.

देशी संस्थानांतील धोरणांवर अनेक आक्षेप घेतले जातात. ह्या आक्षेपांतून हें लहानसें काठेवाड कांहीं मुक्त नाहीं. राजेमहाराजे ह्यांच्याविषयीं एक नकार सर्वसामान्य आहे. दिवसोंदिवस यूरोपला जाण्याचा शोक वाढत आहे. कामानिमित्त किंवा ज्ञान मिळविण्यासाठीं विलायतला जाणें ह्याला काहीं अर्थ आहे, पण चैनबाजीसाठीं जाणें हें असह्य आहे. ज्या संस्थानचा राजा फार वेळ बाहेर असतो, त्या संस्थानची स्थिति करुणास्पद होते. ह्या लोकसत्तेच्या आणि व्यवहारज्ञानाच्या प्रचाराच्या युगांत, जें संस्थान लोकप्रिय आणि लोककल्याणकारी नसेल तें टिकणें शक्य नाहीं, ह्याचा आपणाला अनुभव आहे. ह्या नियमाला देशी संस्थानें अपवाद नाहींत. त्यांची ब्रिटिश हिंदुस्थानाशीं आणि स्वराज्यस्थापनेनंतर हिंदी स्वराज्याशीं तुलना होतच राहणार. जॉर्ज बादशहा प्रधानांच्या संमतीवांचून इंग्लंड सोडून जाऊं शकत नाहींत. राज्यावर बसल्यानंतर बादशहांना क्वचितच् बाहेर जावयास सांपडतें. संस्थानांच्या राजाइतकी बादशहांवर कारभाराची जबाबदारी नाहीं. संस्थानांतील राजे राज्याची लगाम आपल्या हातांत ठेवीत असतात. लहानसहान नेमणुकाही तेच करतात. एखादा पूल बांधावयाचा असला तरी तेवढ्यासाठीं त्यांच्या परवानगीची जरूर असते अशा स्थितींत संस्थानांच्या राजांनीं परदेशीं जावें हें प्रजेला खपत नाहीं.

शिवाय परदेशीं जाण्यांत जो खर्च होत असतो तोहि असह्य आहे. नीतीला अनुसरून पहावयाचें तर **राजा हा धनी नसून प्रजेच्या पैशाचा ट्रस्टी** ( रक्षक ) आहे. त्याचें उत्पन्न प्रजेपासून मिळणाऱ्या करांचें असतें. ट्रस्टी जसा खर्च करतो तसाच राजांनीं ह्या उत्पन्नाचा खर्च केला पाहिजे. ह्या तत्त्वाचा अंमल इंग्रजी राज्यव्यवस्थेंत जवळजवळ पूर्णपणें होत असतो, असें म्हणतां येईल. युरोपला जाणारे राजे असंख्य पैशाचा व्यय करतात, त्याचें कोणत्याहि प्रकारें समर्थन होऊं शकणार नाहीं असें माझी अल्पमति मला सांगत आहे.

ह्या परदेशगमनाचें एक असें समर्थन करण्यांत येतें कीं, राजे शरीरप्रकृति चांगली रहावी म्हणून जात असतात. हें समर्थन तर केवळ हास्यास्पद आहे. आपल्या ह्या महान् देशांत जेथें हिमालयासारखा पर्वतराज अचालित राज्य करीत आहे, ज्याच्या कुक्षींतून गंगा, यमुना, सिंधु, ब्रह्मपुत्रा आदि नद्या वाहत आहेत—त्या देशांतून शरीरप्रकृतीसाठीं परदेशीं जाण्याची जरूर असूंच शकणार नाहीं. कोट्यावधि लोक ज्या देशांत सुखानें आपलें आयुष्य घालवीत आहेत तो देश राजांच्या आरोग्याला पुरता असलाच पाहिजे.

## पश्चिमेचें अनुकरण.

परदेशीं जाण्याचा मोठा तोटा म्हणजे राजे लोक पाश्चिमात्य संस्कृतीचें उथळ अनुकरण करतात हा आहे. पाश्चिमात्य संस्कृतींत आपणास पुष्कळ शिकण्यासारखें आणि घेण्यासारखें आहे, पण तिच्यांतील पुष्कळसा भाग त्याज्य आहे. युरोपच्या हवापाण्याला ज्या गोष्टी अनुकूल त्या येथच्याहि हवापाण्याला अनुकूल आहेत, असें मानण्याचें कारण नाहीं. अनुभवावरून असें दिसतें कीं, निरनिराळ्या हवापाण्यांना निरनिराळ्या गोष्टी अनुकूल असतात. पश्चिमचे रीतिरिवाज पूर्वेला पचणार नाहींत, पूर्वेचे पश्चिमेला पचणार नाहींत. पाश्चिमात्य लोकांत स्त्रिया आणि पुरुष संयमपूर्वक बरोबर नाचूं शकतात व नाचतांना मद्यपान करीत असूनही मर्यादा पाळूं शकतात, असें म्हणण्यांत येतें. आपण ह्या चालीचें अनुकरण केलें तर काय परिणाम होईल हें मी सांगण्याची जरूर नाहीं. हल्लीं वर्तमानपत्रांत चालू असलेला एका युवराजाचा खटला आपणांस लाजेनें मान खालीं घालावयास लावीत आहे.

## निरंकुश खर्च.

दुसरी तक्रार राजेमहाराजांच्या निरंकुश खर्चासंबंधींची आहे. हा खर्च दिवसेंदिवस वाढत आहे. त्यापैकीं पुष्कळ खर्च असा आहे कीं, त्याचें समर्थन करतां येणें मुष्किल आहे. अमुक एक मर्यादेपर्यंत राजांना आपल्या भोगविलासाप्रीत्यर्थ खर्च करण्याचा अधिकार असूं शकेल, पण निरंकुश अधिकार असूं शकणार नाहीं व अशा अधिकाराची राजेमहाराजे इच्छाहि राखणार नाहींत असें मी मानून चालतों.

## करवसुलीची पद्धति.

राजे लोकांची कर वसूल करण्याची पद्धति ही दोषरहित दिसून येत नाहीं. त्यांनीं इंग्रजी पद्धतीचें अनुकरण करून प्रजेचें फार नुकसान केलेलें आहे, असें माझें ठाम मत आहे कोणत्याही परिस्थितींत मूठभर इंग्रजांची सत्ता ह्या देशांत टिकविलीच पाहिजे ही गोष्टी नाय्य मानली तरच इंग्रजांच्या वसुलीच्या पद्धतीचा कांहीं बचाव करतां येईल. देशी संस्थानांत हा सिद्धांत रूढ करण्याची आवश्यकताच मूळ नाहीं. तेथें आपलें आस्तित्व प्रजा कायम ठेवणार नाहीं, असें भय नाहीं. मोठ्या लष्कराची त्यांना जरूर नाहीं; कोणत्याहि संस्थानाजवळ तें नाहीं. आणि ब्रिटिश तें ठेऊंहि देणार नाहींत. अशा स्थितींतहि प्रजेकडून प्रजेच्या सामर्थ्याहूनहि जास्त कर वसूल करण्याची पद्धत पडून गेलेली आहे आणि ती प्रजेला सलत आहे. कराची वसुली लोकांच्या कल्याणासाठींच असली पाहिजे अशी आपली पुराणपरंपरा आहे; पण तिचा चोहोंकडे त्यागच करण्यांत आलेला आहे असें मला दिसत आहे.

## अबकारी.

उत्पन्न वाढविण्यासाठीं इंग्रजी अबकारी खात्याचें अनुकरण केलें जावें ही गोष्ट दुःखदायक आहे. अबकारी खातें हा हिंदुस्थानला जडलेला प्राचीन रोग आहे, असें म्हणण्यांत येतें. मला हें म्हणणें मान्य नाहीं. प्राचीन काळीं राजांनीं मद्यादिकांच्या व्यापारांतून उत्पन्न काढलें असेल, पण त्यांनीं लोकांना हल्लींप्रमाणें मद्यपी बनविलेलें नव्हतें. परंतु माझें म्हणणें चुकीचें असलें, प्राचीनकाळींहि हल्लींसारखेंच अबकारी खातें असलें, तरीहि प्राचीन तितकें चांगलें असा मला

मुलींच मोह नाहीं. हिंदुस्थानचें तितकें चांगलेंच असाहि मोह मला नाहीं. दारू, अफू इत्यादि कैफी वस्तु मनुष्याच्या आत्म्याला मूर्च्छित करतात, त्याला सैतानाहूनहि कमी योग्यतेचा करून टाकतात हें आपण प्रत्यक्ष पाहातों. हीं व्यसनें असलेल्या मनुष्यांची स्थिति पाहून आपणाला थरकांप होतो. अशा वस्तूंचा व्यापार करणें हें पाप आहे, ही गोष्ट स्वयंसिद्ध आहे. देशी संस्थानांनीं दारूचीं एकूण एक दुकानें बंद करून इंग्रज अधिकाऱ्यांना उदाहरण घालून दिलें पाहिजे. कांहीं कांहीं संस्थानांत अशा प्रकारचे प्रयत्न होत आहेत, त्याबद्दल मी त्यांचें अभिनंदन करतों, आणि उमेद बाळगतों कीं, लवकरच असा दिवस उगवेल कीं, ज्या वेळीं काठेवाडमध्यें दारूचें एकहि दुकान दिसणार नाहीं.

## व्यक्तिविषयक.

कित्येक संस्थानांविषयीं माझ्याकडे व्यक्तिविषयक तक्रारीहि करण्यांत येतात. त्यांचा उल्लेख मी येथें करूं इच्छित नाहीं. त्याविषयीं 'यंग इंडिया' 'नवजीवन' मध्यें मीं लिहावें असें मला पुष्कळ सांगण्यांत आलेलें आहे. पण संपूर्ण माहिती मिळविल्याविवाय आणि शक्य झाल्यास त्या त्या संस्थानांकडून त्यांचें म्हणणें ऐकून घेतल्याशिवाय बोलणें योग्य नाहीं, म्हणून मीं मौन धारण केलेलं आहे. विषयनियामक कमिटींत त्या आक्षेपासंबंधीं माहिती मिळण्याची मला आशा आहे. आणि ती मला मिळाल्यास मला जें करावयाचें अगर सांगण्याचें तें करीन.

## चरखा आणि खादी.

हे दोन विषय असे आहेत कीं, ज्यांच्या बाबतींत देशी संस्थानांकडून संपूर्ण उत्तेजनाची अपेक्षा राखतां येईल. ह्या देशाची पूर्वीं अशी आर्थिक स्थिति होती कीं, आपलें धान्य आपण उत्पन्न करून खात होतों व कापसाचें सूत कातून, तें विणवून कपडा वापरीत होतों. ह्यांपैकीं एक स्थिति कायम आहे, दुसरी जवळजवळ नाश पावलेली आहे. मनुष्य खाण्यापायीं जितका खर्च करतो त्याचा दहावा हिस्सा कपड्यासाठीं खर्च करीत असतो. म्हणजे शेंकडा दहा रुपयांचा खर्च आपण आपल्या देशांत व आपआपसांत करण्याच्या ऐवजीं परदेशांत व आपल्या गिरण्यांत करीत असतों. म्हणजे आपली तितकी मजुरी गमावतों व कपड्याचा खर्चहि करतों. अशा प्रकारें आपण दुप्पट मार

सहन करतों. याचा परिणाम असा झाला कीं, अन्नखर्च कमी करून आपणांस कपड्यासाठीं खर्च करावा लागतो. त्यामुळें आपण दिवसोंदिवस कंगाल होत चाललों आहोंत. शेती, कांतणें आणि विणणें हे दोन धंदे आपल्या गांवांत शिल्लक न रहातील तर आपला नाशच होईल. भावनगरचीं सर्व खेडीं स्वतःसाठीं लागणारें धान्य आणि कपडा जर भावनगरहून मागवूं लागलीं तर काय स्थिति होईल, ह्याचा विचार परिषदेच्या सभासदांवरच मी सोपवितों. अशा स्थितींत आपण कपड्यासंबंधीं असा व्यवहार करीत आहोंत. आपल्याला लागणारें कापड एक तर परदेशांतून येतें किंवा आपल्या गिरण्यांतून येतें. दोन्ही स्थितींत खेडेगांवचे लोक क्षीण होत आहेत.

दुसरे देश कापड बाहेरून मागवितात तरी देखील त्यांची आर्थिक हानि होत नाहीं. असल्या उदाहरणांनीं आपण फसून जातां कामा नये. ज्या देशांत अशा प्रकारें लोक कांतण्याविणण्याचा धंदा सोडून देतात, तेथें ते त्याहूनहि जास्त कमाई करून देणारा दुसरा एखादा धंदा स्वीकारीत असतात. आपण मात्र कातणें विणणें सोडून रिकामे बसून राहतों.

ह्या स्थितींतून मुक्त होणें काठेवाडाला फार सोपें आहे. राजे लोकांना उदाहरणानें व रयतेला उत्तेजन देऊन काठेवाडांत खादीचा पुन-रुद्धार करतां येऊन, प्रजेचा कंगालपणा कमी करतां येण्यासारखा आहे. काठेवाडांत गिरण्या आणि जिनें व्हावीं ह्यांत मला काठेवाडची उन्नति दिसत नाहीं, तर अवनति दिसते. काठेवाडच्या सामान्य प्रजेला काठेवाड सोडावें लागत आहे, ह्याला मी शुभ चिन्ह मानीत नाहीं. द्रव्यप्राप्तीप्रित्यर्थ कांहीं साहसी लोकांनीं काठेवाड सोडावें ही गोष्ट चांगली असेल, पण कंगाल बनल्यामुळें निरुपायानें लोकांना देशत्याग करावा लागणें ही गोष्ट खेदकारक व संस्थानांना नामुष्की आणणारी आहे. मी बाहेर राहणारा मनुष्य जेव्हां जेव्हां काठेवाडांत येतों, तेव्हां मला लोकांच्या तेजांत वाढ झालेली न दिसतां त्यांची तेजोहानिच दिसते.

आजकाल कांतण्याची व विणण्याची कला ह्यांची दिवसेंदिवस प्रगति होत आहे, व खादीचा महिमा वाढत आहे. ह्या बाबतींत राजेरजवाडे मदत कर-णार नाहींत ? शेतकऱ्यांना शिक्षण देऊन काठेवाडपुरता कापूस काठेवाडां-

तच राखून, स्वतः खादी वापरून, तिचा प्रचार करणें ह्या गोष्टी करण्यांत राजांचें भूषणच आहे. कांतणें आणि विणणें ह्यांना उत्तेजन देऊन विणण्याच्या कामांतील अनेक प्रकारच्या नकशीच्या कामांच्या कलेला पुन्हां जिवंत करणें राजांना शक्य आहे. सुंदर, रंगीत, घुंघुरवाल्या चरख्यावर सूत कांतून त्याची मऊ मलमलीसारखी खादी विणवून जर ती राण्या वापरूं लागतील तर यामुळें त्या सुशोभित व सुरक्षित होतील. काठियावाडमध्यें अनेक प्रकारचें कापड विणलें जात होतें हें मीं डोळ्यानें पाहिलें आहे. ही कला हल्लीं जवळ जवळ अस्तास गेली आहे. अशा कलेला उत्तेजन देणें हें राजेमहाराजांचें खास क्षेत्र आहे.

## अस्पृश्यता.

दुसरा अत्यंत महत्त्वाचा विषय अस्पृश्यता हा आहे. महागुजराथेंतील इतर भागांपेक्षां येथें अंत्यज लोकांना जास्त कष्ट सहन करावे लागत आहेत. त्यांना आगगाडींतहि त्रास देण्यांत येतो. राजेलोक दुसऱ्यांच्या दुःखांचें निवारण करणारे मानलेले आहेत. ते दुर्बळांचें बळ असले पाहिजेत. त्यांनीं अंत्यजांचा पक्ष घेऊं नये ! प्रजेच्या आशीर्वादावर राजा जगत असतो. अंत्यजांच्या आशीर्वादाला पात्र होऊन त्यांनीं आपलें जीवन सुशोभित करून घ्यावें. शास्त्रें तर ओरडून सांगत आहेत कीं ब्राह्मण आणि भंगी ह्यांच्यांत भेद असणें शक्य नाहीं. दोघांनाहि आत्मा आहे, दोघांनाहि पांच इंद्रियें आहेत, दोघांनाहि आहारनिद्रादि वस्तु सामान्य आहेत. राजांना अंत्यजांच्या बाबतींत पुष्कळ सुधारणा करतां येण्यासारख्या आहेत. अंत्यजांना धार्मिक भावनेनें स्पर्श करून त्यांना अस्पृश्यता निर्मूल करतां येण्यासारखी आहे. अंत्यजांसाठीं सुंदर शाळा, विहिरी वगैरे बनवून त्यांना त्यांच्या हृदयांचे स्वामी बनतां येण्यासारखें आहे.

## टीकेचें समर्थन.

देशी संस्थानांवर टीका करणें मला पसंत नाहीं. त्यांच्याशीं असलेला गांधीकुटुंबाचा तीन पिढ्यांचा संबंध मी विसरलेलों नाहीं. तीन राज्यांची दिवाणगिरी मीं पाहिलेली आहे. माझ्या वडिलांचा व काकांचा संबंध त्या त्या संस्थानांशीं स्नेहाचा होता, हें मला आठवत आहे. मनुष्य विवेकहीन नाहीं अशी माझी श्रद्धा असल्यामुळें मी देशी संस्थानांतील गुणच पाहूं इच्छितों. संस्थानांचा

नाश मी करूं इच्छित नाहीं हें आगाऊच सांगितलेलें आहे. देशी संस्थानांमार्फत पुष्कळ लोकहित करतां येईल असें माझें मत आहे आणि जर येथें मी कांहीं टीका वगैरे केली असेल तर ती राजा आणि प्रजा ह्यांच्या हितप्रीत्यर्थच केलेली आहे. माझा धर्म सत्य आणि अहिंसा हा आहे. सत्य माझा परमेश्वर आहे. अहिंसा त्याला अनुसरण्याचें साधन आहे. त्या सत्याला अनुसरून मीं केवळ अहिंसक बुद्धीनें म्हणजे प्रेमपूर्वक टीका केलेली आहे. ती तशाच प्रकारच्या भावनेनें राजेमहाराजांनीं समजून घ्यावी व स्वीकारावी अशी माझी त्यांना विनंती आहे.

## रामराज्य.

देशी राज्याची कल्पना रामराज्याची आहे. रामानें एका धोब्याच्या टीकेवरून प्रजेला संतोष व्हावा म्हणून आपल्या प्राणाहूनहि प्रिय, जगद्वंद्य, सतीशिरोमणी, करुणेची केवळ मूर्तिच, अशा सीतेचा त्याग केला. रामानें कुत्र्याला देखील न्याय दिला. रामानें सत्याच्या पालनासाठीं राज्याचा त्याग केला. तेवढ्यासाठीं वनवास भोगून पृथ्वीवरील यच्चयावत् राजांना उच्च सदाचरणाचें उदाहरण घालून दिलें. रामानें अखंड एकपत्नीव्रत पाळून राजा आणि प्रजा ह्या सर्वांना गृहस्थाश्रमांत संयमधर्म कसा पाळतां येतो, हें दाखवून दिलें. रामानें राज्यासनाला शोभा आणली आणि राज्यपद्धतीला लोकप्रिय केली व रामराज्य ही स्वराज्याची परिसीमा आहे हें सिद्ध करून दिलें. रामाला लोकमत पारखण्यासाठीं हल्लींच्या तुटपुंज्या साधनांची जरूर नव्हती, कारण तो लोकांच्या हृदयाचा स्वामी होता. प्रजेचें म्हणणें रामाला सहज समजत असे. रामराज्यांत प्रजा आनंदसागरांत निमग्न होती.

अशा रामराज्याची आज देखील शक्यता आहे. रामाच्या यशाचा लोप झालेला नाहीं. आधुनिक काळांतहि पहिल्या खलिफांनीं रामराज्यें स्थापिलीं असें म्हणतां येईल. हजरत अबुबकर आणि हजरत उमर कोट्यवधि रुपये वसूल करीत होते; पण ते फकीर होते. राज्याच्या खजिन्यांतून एक कवडीहि घेत नसत. प्रजेला न्याय मिळवून देण्याविषयीं निरंतर जागृत राहत, शत्रूलाहि दगा देऊं नये, त्याला देखील शुद्ध न्याय मिळाला पाहिजे असा त्यांचा सिद्धांत होता.

## प्रजेसंबंधी.

राजासंबंधीं दोन शब्द लिहून मी माझें ऋण फेडलें आहे असें माझें नम्र मत आहे. आतां प्रजेचें ऋण फेडण्याचा प्रयत्न करतों. 'जसा राजा तशी प्रजा' ह्या म्हणींत अर्धसत्य आहे, ह्याचा अर्थ वरचें म्हणणें जितकें खरें तितकेंच 'जशी प्रजा तसा राजा' हें म्हणणें खरें आहे. ज्या ठिकाणची प्रजा जागृत आहे तेथें राजाचें अस्तित्व प्रजेवर अवलंबून असतें. पण जेथें प्रजा निजलेली असते तेथें राजा प्रजेचा रक्षक न राहतां **भक्षक** होण्याचा पूर्ण संभव असतो. निजलेल्या प्रजेला राजाचा दोष काढण्याचा अधिकार नाहीं. राजा आणि प्रजा दोघें परिस्थितीला वश आहेत. धैर्यवान् राजा आणि प्रजा परिस्थितीला आपल्या ताब्यांत घेतात. परिस्थितीला वश करून घेणें ह्याचें नांव पुरुषार्थ. पुरुषार्थहीन मनुष्याचा नाश होतो व तो योग्य आहे. हा सिद्धांत ज्याला समजला तो धैर्य कधींहि सोडणार नाहीं. तो दैवाला दोष देणार नाहीं तर आपलाच दोष काढील व पाहील. ह्या सिद्धांताच्या आधारें मी हिंसा किंवा बलात्कार ह्यांचा विरोध करतों. दोषाचें कारण स्वतःच असतांना दुसऱ्यावर दोषारोपण करून त्याचा नाश इच्छिणें किंवा करणें ह्यानें कांहीं कारण दूर होत नाहीं. उलट कारण दृढमूल होतें व रोगच वाढत जातो.

## सत्याग्रह.

राजांचे जे जे दोष मीं पाहिलेले आहेत त्या त्या सर्व दोषांचें कारण जितक्या अंशानें राजे लोक आहेत, त्यापेक्षांहि जास्त अंशानें जास्त विचार केला तर प्रजा स्वतः आहे हें आपणांला दिसेल. ज्या कार्याच्या विरुद्ध प्रजेचें मत आहे तें कार्य राजा करूं शकणार नाहीं. मत विरुद्ध असणें म्हणजे मनाची तडफड होणें नव्हे. प्रजेचें मत विरुद्ध आहे हें त्यांच्या मागें बळ असेल तेव्हांच दाखविलें जाईल. वडिलांचें कार्य अयोग्य आहे. व म्हणून त्यांच्या विरुद्ध असणारा पुत्र काय करतो ? तें कार्य सोडून देण्याविषयीं तो बापाला नम्र विनंति करतो, म्हणजे तो नम्रपणें अर्ज करतो. अनेक वेळां प्रणिपात करून जेव्हां बाप ऐकत नाहीं तेव्हां तो बापाशीं असलेला आपला सहकार टाकतो, तो इतका कीं, आपल्या बापाचें घर देखील तो सोडतो. हा शुद्ध न्याय आहे. बाप आणि मुलगा जंगली असले तर ते एकमेकांशीं भांडतात, शिव्या देतात व

मारामारीपर्यंतहि पाळी येते. आज्ञांकित पुत्र मरणापर्यंत विनयाचा, शान्तीचा, अहिंसेचा, प्रेमाचा त्याग करीतच नाहीं. प्रेम हेंच त्याच्या असहकाराचें चिन्ह असतें. अशा प्रेममय असहकाराला बाप ओळखूं शकतो. व पुत्राचा त्याग किंवा वियोग करूं शकत नाहीं. त्याच्या अंतरात्म्याला दुःख होतें व तो पश्चात्ताप पावतो. नेहमीं असेंच होतें असें आपणांस न दिसलें तरी मुलानें असहकार करून आपल्या धर्माचें पालन केलेलें आहे, ही गोष्ट निश्चित आहे.

अशा प्रकारचा असहकार राजा आणि प्रजा ह्यांच्यांत असूं शकेल. अमुक एका परिस्थितींत तें प्रजेचें कर्तव्य होईल अशी परिस्थिति केव्हां आली असें म्हणतां येईल ? तेव्हांच कीं जेव्हां प्रजा स्वतंत्र आणि निर्भय असेल. दंडाच्या भीतिशिवाय जेव्हां प्रजा राज्याचे कायदे स्वेच्छापूर्वक व ज्ञानपूर्वक पाळीत असेल. राज्याच्या कायद्यांचें आदरपूर्वक व विवेकपूर्वक पालन हा असहकारितेचा प्रथम पाठ आहे.

दुसरा पाठ तितिक्षेचा. राजाचे पुष्कळ कायदे आपल्या गैरसोयीचे असले तरी ते आपण सहन करून घ्यावे. पुत्राला पित्याच्या पुष्कळशा आज्ञा आवडत नसल्या तरी त्या पाळून तो आपलें पुत्रत्व सिद्ध करीत असतो. तेव्हां त्या पाळणें असह्य होईल, अनीतिमय वाटेल तेव्हांच त्याचा विनयपूर्वक भंग करणें योग्य होईल. अशा प्रकारच्या आज्ञाभंगाचा हेतु पित्याच्या लागलीच लक्षांत येईल; त्याचप्रमाणें जी प्रजा राजाच्या कायद्यांना मान देऊन आपली ज्ञान-पूर्वक राजनिष्ठा सिद्ध करून देईल, तिलाच सविनय आज्ञाभंग करण्याचा अधिकार प्राप्त होईल.

तिसरा पाठ सहिष्णुतेचा. दुःख सहन करण्याची ज्या मनुष्यांत शक्ति नाहीं तो मनुष्य असहकार करण्यास अपात्र आहे. मालमत्ता किंवा कुटुंब देखील सोडून जाण्याइतकी ज्यानें आपली तयारी केलेली नाहीं, तो असहकार करूं शकणार नाहीं. असहकारितेमुळें राजा कोपायमान होऊन अनेक प्रकारच्या शिक्षा होतील असा संभव आहे. ह्यांत प्रेमाची कसोटी आहे. ह्या शिक्षा सहन करण्यास जो तयार नाहीं, तो असहकार करूं शकणार नाहीं. हे तिन्ही पाठ एखाद्दुसऱ्या व्यक्तीनें शिकून घेतले म्हणजे कांहीं प्रजेंत असहकारितेची पात्रता आली असें म्हणतां येणार नाहीं. प्रजेनें असहकार करावयाचा तर प्रजेंतील

पुष्कळ लोकांची तशी तयारी पाहिजे. ह्या गोष्टी लक्षांत न घेतल्या तर वाईट परिणाम होण्याचा पूर्ण संभव आहे. ही गोष्ट ध्यानांत न घेतल्यामुळें कित्येक स्वदेशाभिमानी तरुण उतावळे होऊन जातात. दुसऱ्या गोष्टीसाठीं जसें शिक्षण द्यावें लागतें, तसेंच असहकारिता करावयाचेंहि शिक्षण द्यावें लागतें. केवळ असहकारितेची इच्छा करून कोणीहि असहकारिता करूं शकणार नाहीं. तिच्यासाठीं शिक्षणाची जरूर आहे. अशा प्रकारचें शिक्षण काठेवाडच्या कोणत्याहि भागांत मला दिसत नाहीं. आणि हें शिक्षण आणि तयारी नसेल तर असहकारितेची आवश्यकता सिद्ध झालेली आहे असें मी मानत नाहीं.

सध्यां काठेवाडांत काय किंवा हिंदुस्थानांत काय व्यक्तीच्या तयारीची आवश्यकता मला दिसते. व्यक्तींत सेवा, भाव, त्यागवृत्ति, सत्य, अहिंसा, संयम, धैर्य, अस्तेय इत्यादि गुण पाहिजेत. ह्या गुणांचें शिक्षण मिळण्यासाठीं रचनात्मक कार्याची जरूर आहे. आपण न बोलतां प्रजेंत पुष्कळ काम केलें तर पुष्कळ सुधारणा आपोआप घडून येतील.

## मुत्सद्दी वर्ग.

काठेवाड मुत्सद्दीवर्गाविषयीं प्रसिद्ध आहे. काठेवाडी मुत्सद्यांत औपचारिकपणा फार आलेला असल्यामुळें त्यांच्यांत दंभ, भीति, खुषामत वगैरे दोष उत्पन्न झालेले आहेत. हा वर्ग शिक्षित आहे. त्यामुळें सुधारणेची सुरवात त्यांच्यापासून व्हावयास पाहिजे. प्रजेचें कल्याण करण्याची इच्छा जर ह्या वर्गांत उत्पन्न होईल तर त्या दृष्टीनें ह्या वर्गाला पुष्कळ काम करतां येण्यासारखें आहे ह्या वर्गांत जेथें जेथें चारित्र्यवान् लोक दिसून येतात तेथें तेथें प्रजेंत संतोष दिसून येत आहे. मीं मुत्सद्दीवर्गावर टीका केलेली आहे. मुत्सद्दी तितका ह्या टीकेला पात्र आहे, असा आशय नाहीं. मुत्सद्दीवर्गांतून सुंदर रत्नें उत्पन्न झालेलीं आहेत असा माझा अनुभव आहे; त्यामुळें मुत्सद्दीवर्गाविषयीं आशा मीं सोडलेली नाहीं. मुत्सद्दीवर्ग पैशाचा संग्रह करण्याच्या उद्देशानें नाहीं तर सेवेच्या उद्देशानें जर संस्थानांत नोकरी करील तरीहि पुष्कळ चांगला परिणाम घडून येईल.

## इतर वर्ग.

शिवाय ज्यांनीं संस्थानांतील नोकऱ्या सोडून देऊन इतर स्वतंत्र धंदे पतकरले आहेत, त्यांना तर सर्वच अनुकूल आहे. त्यांच्यांत वर सांगितलेल्या गुणांची वृद्धि पाहण्यास मी अधीर झालेलों आहें. न बोलतां प्रजेचें काम करणाऱ्या सच्चा शिपायांची जरूर आहे. त्यांनीं प्रजेंत प्रवेश करून घेण्याची जरूर आहे. अशी तयारी असणारे बोटावर मोजण्याइतकेच निघतील. काठेवाडच्या प्रत्येक गांवांत असा एक तरी सेवक आहे ? ह्या प्रश्नाचें उत्तर मला नकारात्मकच मिळेल हें मला ठाऊक आहे. जो जो वर्ग माझें भाषण वाचील त्याला खेडे-गांवच्या जीवनाचें फारच थोडें भान असेल. ज्यांना भान असेल त्यांना तें आवडणार नाहीं, खऱ्या हिंदुस्थानाइतकेच खरे काठेवाडहि खेडेगांवांत वास करीत आहेत.

## चरखा.

ही सेवा कशी करावयाची ? ह्यांत प्रथम स्थान मी चरख्याला देतों. चरख्याची अवगणना मीं पुष्कळ ऐकली आहे. ज्या वस्तूची आज निंदा होते त्याच वस्तूची सुदर्शनचक्र म्हणून पूजा होईल, असा काळ लवकर येईल, असें मला दिसत आहे. जी गोष्ट आज आपण खुषीनें करीत नाहीं, ती गोष्ट आपणांस करणें भाग पडणार आहे.

हिंदुस्थानचें अर्थशास्त्र त्या चक्राच्या पकडण्यांत वसलेलें आहे. खेडेगांवच्या जीवनाचा पुनरुद्धार केवळ त्याच्यावर अवलंबून आहे. सूत कांतण्याच्या कर्माची मी धंदा म्हणून ओळख देत नाहीं. तो तर धर्म आहे आणि तो धर्म हिंदुमुसलमान सर्व संप्रदायांचा आहे. तें चक्र फिरवितां फिरवितां वैष्णवांनीं आपला द्वादशाक्षरी मंत्र जपावा; शैवांनीं शिवनामाचा जप करावा, मुसलमानांनीं कलमा म्हणावा. पार्श्यांनीं गाथा म्हणावा, ख्रिस्त्यांनीं येशूनें शिकविलेली प्रार्थना करावी.

एका अमेरिकन लेखकानें लिहिलें आहे कीं, सध्यांचें युग अंगमेहेनतीचें आहे. मूढ यंत्राच्या वाढीनें यंत्राची पूजा करणारे लोक कंटाळत चालले आहेत. आपण शरीररूपी अद्वितीय यंत्र सोडून मूढ यंत्रापासून काम घेण्यांत आपल्या शरीरयंत्राचा नाश करीत आहोंत. शरीराचा संपूर्ण उपयोग करून घ्यावा हा ईश्वरी कायदा आहे. त्याला आपण विसरून चालणारच नाहीं. चरखा हें शरीर-

यज्ञाचें मंगल चिन्ह आहे. हा यज्ञ केल्याशिवाय जो खातो, तो चोरीचें अन्न खात आहे. ह्या यज्ञाचा त्याग केल्यामुळें आपण देशद्रोही बनलों आहोंत. आपण लक्ष्मीदेवीला हद्दपार केलें. अस्थि आणि चर्म बाकी राहिलेले हिंदुस्थानचे असंख्य स्त्रीपुरुष ह्या गोष्टीची साक्ष देत आहेत. मला वंद्य असलेले **श्रीनिवासशास्त्री** म्हणतात कीं, लोकांच्या पोषाकाच्या बाबतींतहि मी डोकें घालीत आहें, ही गोष्ट अगदीं खरी आहे. प्रत्येक सेवकाचा तसें करणें हा धर्म आहे. सर्व लोक पाटलोण घालावयास लागतील तर मी त्याविरुद्ध उठेन. आपल्या हवेला पाटलोण अनुकूल नाहीं, हें मला स्पष्ट दिसत आहे. परदेशी कापडाच्या उपयोगाच्या विरुद्ध चळवळ करणें प्रत्येक हिंदी मनुष्याचा धर्म आहे. कापड परदेशी आहे हा मुद्दा नाहीं, त्या कापडामुळें कंगालपणा उत्पन्न होतो हा वास्तविक मुद्दा आहे. लोक जर ज्वारी बाजरी सोडून स्कॉटलंडमधून ओट अथवा रशियांतून राई ( rye ) आणूं लागतील तर मी जरूर लोकांच्या स्वयंपाकघरांतहि डोकें घालीन. लोकांची पोट भरून निंदा करीन, व धरणें धरून उपवास करून माझ्या अंतःकरणांतला आवाज लोकांना ऐकावयास लावीन. इतिहासांत असे दाखले घडलेले आहेत. यूरोपच्या राक्षसी युद्धांत लोकांनीं अमकें धान्य लाविलें पाहिजे, अशी सक्ति करण्यांत आली होती. लोकांच्या खाण्यापिण्यावर सरकारचा अंकुश होता.

ज्याला खेड्यांत जाऊन सेवा करावयाची आहे त्याला चरखाशास्त्राचा अभ्यास केल्याशिवाय चालावयाचेंच नाहीं. ह्या कार्यांत हजारों तरुण स्त्रीपुरुषांची पोट भरण्याची सोय होऊन, त्यांच्या मोबदल्यांत राष्ट्राचा दुप्पट फायदा होणार आहे. ह्या कामांत संघटना आहे; खेडेगांवच्या लोकांची ओळख त्यामुळें होणार आहे; अर्थशास्त्र आणि राजकीय गोष्टी ह्यांचें ज्ञान त्यामुळें गांवकऱ्यांना देतां येणार आहे. ह्यांतच बालकांना शुद्ध शिक्षण पुरविण्याचें काम होणार आहे, व खेडेगांवांतील लोकांच्या गरजा, उणीवा ह्यांचें ज्ञान होणार आहे.

ह्या खादीच्या कामांत राजा व प्रजा ह्यांच्यांत विरोध उत्पन्न होण्याचें कारण नाहीं. इतकेंच नव्हे तर त्यामुळें त्यांचा संबंध उत्तरोत्तर गोड होत जाण्याचा संभव आहे. हें सिद्ध होणें सेवकांच्या विवेकबुद्धीवर अवलंबून आहे. त्यामुळें चरख्याला मुख्य स्थान देण्यास ह्या राजकीय परिषदेला सांगण्यांत मला मुळींच लाज वाटत नाहीं किंवा मी मुळींच कचरत नाहीं.

## अस्पृश्यता.

त्याचप्रमाणें अस्पृश्यता दूर करणें हें हिंदुधर्माचें कर्तव्य आहे. ह्या बाबतीत राजांचा अडथळा होणारच नाहीं. अंत्यजांची सेवा करून त्यांचा अंतःकरणपूर्वक आशीर्वाद मिळवून जर हिंदु आत्मशुद्धि करतील तर त्यापासून विलक्षण शक्ति उत्पन्न होईल असें माझें दृढ मत आहे. अस्पृश्यता हा हिंदुधर्मावरचा महान् कलंक आहे. तो कलंक धुवून काढणें जरूर आहे. तें कार्य करीत असतांना सेवकांत आणि लोकांत प्रेमाचा संबंध उत्पन्न होईल. जो हिंदू अंत्यजांची सेवा करील तो हिंदुधर्माचा तारक होईल व अंत्यजांच्या हृदयाचा स्वामी होईल.

राज्यें दोन प्रकारचीं असतात. एक दंडाची भीति दाखवून मिळत असतें; दुसरें प्रेमाच्या मंत्रानें साध्य होतें. प्रेमाच्या मंत्रानें साध्य केलेलें राज्य दंडाचें भय दाखवून मिळविलेल्या राज्यापेक्षां हजारोंपट परिणामकारक व स्थायी आहे. राजकीय परिषदेचे सभासद जेव्हां अशी सेवा करून तयार होतील, तेव्हां त्यांना प्रजेच्या वतीनें बोलण्याचा अधिकार प्राप्त होईल, व त्यांच्या विरुद्ध कोणाहि राजाला जाणें शक्य राहणार नाहीं आणि तेव्हांच असहकारिता संभवते.

पण राजांच्याविषयीं माझा असा विश्वास आहे कीं, अशा धार्मिक लोकमताला ते चटकन् ओळखतील. कांहीं झालें तरी राजे लोक हिंदीच आहेत. त्यांचें सर्वस्व हाच देश आहे. त्यांच्या अंतःकरणाला पीळ पाडण्याची शक्यता आहे. त्यांच्याकडून लोकसेवा करून घेणें हेंहि फार सोपें काम आहे. आपण खरा प्रयत्न केलेला नाहीं, आपण उतावीळ झालेलों आहोंत. शुद्ध प्रकारची तयारी करण्यांत आपला विजय आहे—राजा व प्रजा दोघांचाही विजय आहे.

## हिंदुमुसलमान.

तिसरा प्रश्न हिंदुमुसलमानऐक्याचा आहे. माझ्याकडे एकदोन पत्रें आलीं आहेत त्यांवरून असें दिसतें कीं, हा प्रश्न काठेवाडामध्येंहि धुमसून राहिलेला आहे. हिंदुमुसलमान ह्यांच्यांत ऐक्य झालेंच पाहिजे ह्याविषयीं कांहीं सांगण्याची जरूर नाहीं. लोकसेवकाला प्रजेचें एकहि अंग विसरून चालणार नाहीं.

## माझें क्षेत्र.

मला माहीत आहे कीं, माझें भाषण पुष्कळ लोकांना अपूर्ण वाटेल, नीरस देखील वाटेल. पण माझ्या क्षेत्राच्या बाहेर जाऊन मी व्यावहारिक किंवा

उपयोगी सल्ला देऊं शकणार नाहीं. माझें क्षेत्र निश्चित झालेलें आहे. तें मला प्रिय आहे. मी अहिंसेच्या मंत्रानें मुग्ध झालेला आहें. मला अहिंसा ही परिसा-सारखी आहे. अहिंसेच्या मंत्रानेंच हिंदुस्थानचें दुःख टळेल अशी मला खात्री आहे. माझ्या दृष्टीनें अहिंसेचा मार्ग भ्याडांचा किंवा नामर्दांचा मार्ग नाहीं. अहिंसेंत क्षत्रियत्वाची परिसीमा आहे; कारण त्यांत अभयाच्या सोळाहि कलांचा उदय आहे. त्या धर्माच्या पालनांत पलायन, किंवा पराभव ह्यांना अवकाशच नाहीं. तो धर्म आत्म्याचा आहे, व दुःसाध्य नाहीं. समजेल त्याच्यांत तो सहज स्फुरतो, भारतभूमीला ह्याशिवाय दुसरा धर्म अनुकूल नाहीं, असा माझा दृढ विश्वास आहे. भारतभूमीच्या त्या धर्माचें निशाण चरखा आहे. कारण चरखा हा दुःखी लोकांचा विसांवा आहे. कंगाल लोकांची कामधेनु आहे. प्रेमधर्माला देशाची, काळाची, कसलीहि मर्यादा नाहीं. म्हणून माझ्या स्वराज्यांत भंगी, धेड, दुबळे, अपंग ह्यांची नोंद घेतली जाते. चरख्याशिवाय ही नोंद घेणारी दुसरी वस्तु मला माहीत नाहीं.

मीं तुमच्या स्थानिक प्रश्नांची चर्चा केलेली नाहीं. मला त्या प्रश्नांचें पुरतें ज्ञान नाहीं. देशी राज्यांतील राज्यपद्धति कशी असावी, ह्याचा मीं विचार केलेला नाहीं. कारण ती घडणें तुमच्या स्वाधीन आहे. लोकांत शक्ति उत्पन्न होईल असे इलाज शोधून काढणें व योजणें हें माझें क्षेत्र आहे. कारण शक्ति आल्यावर—उत्पन्न झाल्यावर—लोक आपला मार्ग शोधून घेतात. राजा म्हणजे **सेवकाचा राजा** अशी माझी कल्पना असल्यामुळेंच मी त्याला सहन करूं शकतों. **लोक हा धनी आहे**; धनी निजेल तर सेवक काय करील ? म्हणून लोकांना जागृत करण्याच्या कामांत सर्व कांहीं येऊन जातें.

अशी माझी कल्पना असल्यामुळें माझ्या कल्पनेंतील स्वराज्यांत देशी संस्थानांना स्थान आहे, व प्रजेच्या हक्कांचें संपूर्ण रक्षण आहे. कर्तव्य हें हक्कांचें बीज आहे, म्हणून ह्या भाषणांत मी उभय पक्षांचा धर्म आणि कर्तव्येंच दाखविलीं आहेत. आपण सर्व आपलीं कर्तव्यें करूं तर हक्क आपणाजवळ आहेत. कर्तव्यें सोडून हक्कांचे मागें लागूं तर मृगजलाप्रमाणें हक्क दूर दूर पळतील. हीच वस्तु कृष्णानें त्याच्या दिव्य वाणींत गाऊन दाखविली. ' हे राजा, कर्माचाच तुला अधिकार आहे, फळाचा कधींहि नसावा. कर्म म्हणजे धर्म, फळ म्हणजे हक्क आहे. '

शेवटीं महात्माजींनीं परिषदेचा समारोप करतांना खालील आशयाचें भाषण केलें:—

## समारोपाचें भाषण.

काठेवाडांत मी जेव्हां येतों तेव्हां माझ्यावर प्रेमामृताचा वर्षाव होतो. काठेवाडी प्रेमामृताचा वर्षाव मी हिंदुस्थानांत जेथें जेथें फिरतों, तेथेंही मला मिळतो परंतु मला जें प्रेम पाहिजे, ज्या प्रेमास मी किंमत देतों तें दैवी प्रेम; त्या दैवी प्रेमानें आत्म्याचा पोष झाला पाहिजे, शोष होतां उपयोगी नाहीं. दिलेलीं वचनें पार पाडण्याची मनोवृत्ति ज्या प्रेमाचा पाया आहे त्या प्रेमानेंच आत्म्याचें पोषण होणार आहे. लोकसेवा आपल्या व माझ्यामधील समानधर्म आहे. सार्वजनिक आयुष्यक्रमांत खासगी ऋणानुबंधाचें महत्त्व नाहीं. आपल्या प्रेमास लोकसेवेचें प्रत्यक्ष स्वरूप न दिल्यास त्यांत कांहीं अर्थ नाहीं. आपल्याप्रमाणेंच मी एक साधा मनुष्यप्राणी आहें. राग, लोभ मलाही आहेत. परंतु त्यांस मर्यादा घालण्याची मी खटपट करतों. मला जें प्रेम पाहिजे त्या प्रेमानें माझ्या मनास समाधान व्हावयास पाहिजे. त्याच्या पुरांत बुडून जाणें मला नको. त्या प्रेमाच्या उष्णतेनें मला ऊब मिळाली पाहिजे. त्यानें माझ्या अंगास चटके बसावयास नकोत, सबब आपल्या प्रेमाचा ओघ कार्य करण्याकडे वळवा व त्या कार्यानें कांहीं राष्ट्रीय उद्दिष्ट साध्य व्हावें अशी माझी आपल्यास विनंति आहे.

आपल्या परिषदेच्या विषयनियामक कमेटीपुढें संस्थानांतील प्रजेच्या असलेल्या अनेक अडचणींचा उहापोह होणारे ठराव ज्यांत समाविष्ट केले होते असा मसुदा मांडलेला होता; परंतु या ठरावांस कोणतें स्वरूप द्यावें, कोणते कमी करावेत याची पूर्ण मखलत मला दिली याबद्दल मी आपला फार आभारी आहें. संस्थानांतील कारभाराविरुद्ध तक्रारीसंबंधीं व अडचणींसंबंधीं ठराव पास करण्यापूर्वीं आपण सर्वांनीं आपली सोशिक शक्ति वाढविली पाहिजे व आपल्या मनोवृत्तींचें नियमन केलें पाहिजे अशी जी मीं सूचना केली ती आपण मान्य केली, याचें कारण माझेबद्दल आपली आदरबुद्धि आहे हें नसून मी व्यवहारांतील एक मनुष्य आहें व सार्वजनिक आयुष्यक्रमाचा मला अनुभव आहे म्हणून होय. आपणांस निरनिराळ्या संस्थानांतील राज्यकारभारानिमित्त सोसाव्या लागणाऱ्या अडचणींसंबंधानें पास करण्याकरितां पुढें आणलेले ठराव गाळण्याचा सल्ला मी

देऊन सदरबद्दल मीं माझी मुस्कटदाबी करून घेतली आहे असें नाहीं. सदर सल्ला देण्यांत मीं माझेवर वाढती जबाबदारी घेतली आहे. आपल्या अडचणींसंबंधाचा वादविवाद बंद केल्यामुळें मी स्वस्थ झालेला नसून सदर बाबतींचें निराकरण करण्याकरितां मला पुढील वर्षांत आत्यंतिक श्रम करावे लागणार आहेत; परंतु हे श्रम मी एका अटीवर करणार आहें. ती अट म्हणजे तुम्ही काठेवाडाच्या संस्थानिकांवर विश्वास टाकावा ही होय. अमृतसरच्या काँग्रेसमध्यें नवीन सुधारणांच्या कायद्यासंबंधीं ठराव पास करण्याच्यावेळीं मीं असाच सल्ला दिला होता. मरहूम मि. मॉंटेग्यू, लॉर्ड सिंह व बादशहा ह्यांच्यावर भरंवसा ठेवावा असा तो माझा सल्ला होता व तो राष्ट्रीय सभेनें मान्य केला. त्यावेळीं माझ्या विरुद्ध बाजूस **कै. टिळकांसारखा पुढारी होता** व अखेर त्यांनीं माझें म्हणणें मान्य केलें. त्या वेळच्या माझ्या भाषणांत मी म्हणालों कीं, "ज्या सुधारणा आज सद्भावनेनें दिल्या आहेत त्या आपण ग्रहण कराव्यात. ज्या क्षणास त्या हितकर न वाटतां त्रासदायक वाटतील त्याच क्षणीं आपण त्या टाकून द्या. मि. मॉंटेग्यू म्हणत आहेत कीं, त्यांना शक्य होतें तें आज त्यांनीं केलें आहे. लॉर्ड सिंहांसारखा प्रसिद्ध देशभक्त, आंतील सर्व माहिती असणारा मनुष्य जर सुधारणा ग्रहण करण्याबद्दल सल्ला देत आहे तर तो सल्ला ऐकणें इष्ट आहे. बादशहांचा संदेशही योग्य शब्दांत लोकांना पाठविण्यांत आलेला आहे " वरील सर्व विचार सदरहु सल्ला देण्याचे वेळीं माझ्यापुढें होता. परंतु हा विश्वास जेव्हां अस्थानीं ठेवला गेला असें मला वाटलें तेव्हां असहकारितेची चळवळ उत्पन्न झाली. तोच सल्ला मीं आपल्याला आज देत आहें. परंतु या बाबतींत वरील विचारसरणी सर्वतोपरी लावण्याची नाहीं, हें मी बजावीत आहें. हा पूर्वेतिहास सांगण्याचा माझा हेतु एवढाच आहे कीं, मी स्वस्थ बसणार नाहीं. माझ्या कानीं संस्थानांतील अव्यवस्थेबद्दल व जुलुमाबद्दल आपण मांडलेल्या अनेक गोष्टींहूनही किती तरी जास्त गोष्टी आलेल्या आहेत, त्यांमध्यें सत्यासत्य किती आहे हें आज मला सांगतां येत नाहीं, परंतु या तक्रारींच्या सत्यतेबद्दल माझी खात्री पटल्यावर मी शक्य ते सर्व उपाय त्या दूर करण्याबद्दल उपयोगांत आणीन. मी संस्थानिकांच्या गांठी घेईन; त्यांनीं माझें म्हणणें ऐकून घेण्याचें कबूल केल्यास मी तें त्यांचे पुढें मांडीन व त्याचा निकाल जो होईल, तो प्रसिद्ध करण्यास हरकत

शेवटीं महात्माजींनीं परिषदेचा समारोप करतांना खालील आशयाचें भाषण केलें:—

## समारोपाचें भाषण.

काठेवाडांत मी जेव्हां येतों तेव्हां माझ्यावर प्रेमामृताचा वर्षाव होतो. काठेवाडी प्रेमामृताचा वर्षाव मी हिंदुस्थानांत जेथें जेथें फिरतों, तेथेंही मला मिळतो परंतु मला जें प्रेम पाहिजे, ज्या प्रेमास मी किंमत देतों तें दैवी प्रेम; त्या दैवी प्रेमानें आत्म्याचा पोष झाला पाहिजे, शोष होतां उपयोगी नाहीं. दिलेलीं वचनें पार पाडण्याची मनोवृत्ति ज्या प्रेमाचा पाया आहे त्या प्रेमानेंच आत्म्याचें पोषण होणार आहे. लोकसेवा आपल्या व माझ्यामधील समानधर्म आहे. सार्वजनिक आयुष्यक्रमांत खासगी ऋणानुबंधाचें महत्त्व नाहीं. आपल्या प्रेमास लोकसेवेचें प्रत्यक्ष स्वरूप न दिल्यास त्यांत कांहीं अर्थ नाहीं. आपल्याप्रमाणेंच मी एक साधा मनुष्यप्राणी आहें. राग, लोभ मलाही आहेत. परंतु त्यांस मर्यादा घालण्याची मी खटपट करतों. मला जें प्रेम पाहिजे त्या प्रेमानें माझ्या मनास समाधान व्हावयास पाहिजे. त्याच्या पुरांत बुडून जाणें मला नको. त्या प्रेमाच्या उष्णतेनें मला ऊब मिळाली पाहिजे. त्यानें माझ्या अंगास चटके बसावयास नकोत, सबब आपल्या प्रेमाचा ओघ कार्य करण्याकडे वळवा व त्या कार्यानें काहीं राष्ट्रीय उद्दिष्ट साध्य व्हावें अशी माझी आपल्यास विनंति आहे.

आपल्या परिषदेच्या विषयनियामक कमेटीपुढें संस्थानांतील प्रजेच्या असलेल्या अनेक अडचणींचा उहापोह होणारे ठराव ज्यांत समाविष्ट केले होते असा मसुदा म.डलेला होता; परंतु या ठरावांस कोणतें स्वरूप द्यावें, कोणते कमी करावेत याची पूर्ण सवलत मला दिली याबद्दल मी आपला फार आभारी आहें. संस्थानतील कारभाराविरुद्ध तक्रारीसंबंधीं व अडचणींसंबंधीं ठराव पास करण्यापूर्वीं आपण सर्वांनीं आपली सोशिक शक्ति वाढविली पाहिजे व आपल्या मनोवृत्तींचें नियमन केलें पाहिजे अशी जी मीं सूचना केली ती आपण मान्य केली, याचें कारण माझेबद्दल आपली आदरबुद्धि आहे हें नसून मी व्यवहारांतील एक मनुष्य आहें व सार्वजनिक आयुष्यक्रमाचा मला अनुभव आहे म्हणून होय. आपणांस निरनिराळ्या संस्थानांतील राज्यकारभारानिमित्त सोसाव्या लागणाऱ्या अडचणींसंबंधानें पास करण्याकरितां पुढें आणलेले ठराव गाळण्याचा सल्ला मी

देऊन सदरबद्दल मीं माझी मुस्कटदाबी करून घेतली आहे असें नाहीं. सदर सल्ला देण्यांत मीं माझेवर वाढती जबाबदारी घेतली आहे. आपल्या अडचणींसंबंधाचा वादविवाद बंद केल्यामुळें मी स्वस्थ झालेला नसून सदर बाबतींचें निराकरण करण्याकरितां मला पुढील वर्षांत आत्यंतिक श्रम करावे लागणार आहेत; परंतु हे श्रम मी एका अटीवर करणार आहें. ती अट म्हणजे तुम्ही काठेवाडाच्या संस्थानिकांवर विश्वास टाकावा ही होय. अमृतसरच्या काँग्रेसमध्यें नवीन सुधारणांच्या कायद्यासंबंधीं ठराव पास करण्याच्यावेळीं मीं असाच सल्ला दिला होता. मरहूम मि. माँटेग्यू, लॉर्ड सिंह व बादशहा ह्यांच्यावर भरंवसा ठेवावा असा तो माझा सल्ला होता व तो राष्ट्रीय सभेनें मान्य केला. त्यावेळीं माझ्या विरुद्ध बाजूस **कै. टिळकांसारखा पुढारी होता** व अखेर त्यांनीं माझें म्हणणें मान्य केलें. त्या वेळच्या माझ्या भाषणांत मी म्हणालों कीं, "ज्या सुधारणा आज सद्भावनेनें दिल्या आहेत त्या आपण ग्रहण कराव्यात. ज्या क्षणास त्या हितकर न वाटतां त्रासदायक वाटतील त्याच क्षणीं आपण त्या टाकून द्या. मि. माँटेग्यू म्हणत आहेत कीं, त्यांना शक्य होतें तें आज त्यांनीं केलें आहे. लॉर्ड सिंहांसारखा प्रसिद्ध देशभक्त, आंतील सर्व माहिती असणारा मनुष्य जर सुधारणा ग्रहण करण्याबद्दल सल्ला देत आहे तर तो सल्ला ऐकणें इष्ट आहे. बादशहांचा संदेशही योग्य शब्दांत लोकांना पाठविण्यांत आलेला आहे" वरील सर्व विचार सदरहु सल्ला देण्याचे वेळीं माझ्यापुढें होता. परंतु हा विश्वास जेव्हां अस्थानीं ठेवला गेला असें मला वाटलें तेव्हां असहकारितेची चळवळ उत्पन्न झाली. तोच सल्ला मीं आपल्याला आज देत आहें. परंतु या बाबतींत वरील विचारसरणी सर्वतोपरी लावण्याची नाहीं, हें मी बजावीत आहें. हा पूर्वेतिहास सांगण्याचा माझा हेतु एवढाच आहे कीं, मी स्वस्थ बसणार नाहीं. माझ्या कानीं संस्थानांतील अव्यवस्थेबद्दल व जुलुमाबद्दल आपण मांडलेल्या अनेक गोष्टींहूनही किती तरी जास्त गोष्टी आलेल्या आहेत, त्यांमध्यें सत्यासत्य किती आहे हें आज मला सांगतां येत नाहीं, परंतु या तक्रारींच्या सत्यतेबद्दल माझी खात्री पटल्यावर मी शक्य ते सर्व उपाय त्या दूर करण्याबद्दल उपयोगांत आणीन. मी संस्थानिकांच्या गांठी घेईन; त्यांनीं माझें म्हणणें ऐकून घेण्याचें कबूल केल्यास मी तें त्यांचे पुढें मांडीन व त्याचा निकाल जो होईल, तो प्रसिद्ध करण्यास हरकत

नसल्यास, तो प्रसिद्ध करीन. गोंडळच्या ठाकूरसाहेबांविरुद्ध धोराजी येथील मुसलमानांच्या कित्येक तक्रारी आहेत व त्या परिषदेपुढें मांडाव्या असें त्यांचें म्हणणें होतें; परंतु या तक्रारींच्या सत्यासत्यतेबद्दल माझी खातरजमा न झाल्यामुळे व गोंडळच्या ठाकूरसाहेबांचा व माझा परिचय असल्यामुळें हा प्रश्न परिषदेपुढें न मांडतां मजकडे सोंपवावा असा मीं सल्ला दिला. हा माझा सल्ला माझ्या मुसलमान बंधूंस कितपत मानवेल याची मला शंका होती; पण वेळींच मौलाना शौकत अल्ली आल्यामुळें ही अडचण दूर झाली. गोंडळप्रमाणें जामनगराविरुद्ध बऱ्याच तक्रारी आलेल्या आहेत. जामसाहेबांचा व माझा, आमचे तरुणपणीं स्नेह होता. हल्लींचे जामसाहेब गादीनशीन होण्यापूर्वीं त्यांस जामनगरची गादी मिळावी अशी आम्हां स्नेह्यांची इच्छा होती. जामसाहेब यांचा माझा असा पूर्वपरिचय असल्यामुळें त्यांच्याविरुद्ध येणाऱ्या तक्रारींच्या सत्यतेबद्दल विश्वास बसणें थोडें अवघड आहे या तक्रारी मी त्यांस कळवीन व त्या त्यांनीं आपण होऊन दूर कराव्या अशी माझी इच्छा प्रदर्शित करीन. जामसाहेबांना कोणत्याहि प्रकारची अडचण व्हावी अशी माझी इच्छा नाहीं. मी त्यांची मुलाखत घेईन व शक्य त्या योग्य शब्दांत त्यांच्यापुढें माझें म्हणणें ठेवीन. मी हें धोरण सर मायकेल ओड्वायरसारख्या माझ्याबद्दल पूर्वग्रहदूषित असणाऱ्या गृहस्थाबद्दल सुद्धां तो जर बादशाहाचा प्रतिनिधी होऊन आला तर त्याचे बाबतींत स्वीकारण्यास जर तयार आहें, तर तेंच धोरण जामसाहेब यांचे बाबतींत मीं कां स्वीकारूं नये ! संस्थानिकांचे विरुद्ध असलेल्या तक्रारींचे बाबतींत मजपाशीं पुष्कळ सामुग्री आलेली आहे. यासंबंधानें योग्य ती शहानिशा करून चालू साल चौकशी करण्याचें मीं योजिलें आहे. या कामाची दररोजची रोजनिशी ठेवून सालअखेर माझ्या कामाचा अहवाल मीं आपल्यापुढें मांडण्याचा निश्चय केला आहे.

आतां मला एकच शब्द आपल्यास सांगावयाचा आहे. खासगी अथवा सार्वजनिक कडक टीका करून माझ्या मार्गांत अडचणी उत्पन्न करूं नयेत अशी माझी आपल्यास विनंति आहे. टीका करून संस्थानिकांस चिथवूं नये अशी माझी आपल्यास विनंति आहे. ते सत्ताधारी आहेत व सत्ताधारी मनुष्याचा दृष्टिकोण दूषित होणें मानवी स्वभावास अनुरूप आहे. श्रीरामचंद्र किंवा उमर बादशहा यांचेसारखे राज्यकर्ते क्वचितच उत्पन्न होतात. वसुंधरेच्या पोटीं हिरेमाणकें हीं

क्वचितच जशीं सांपडतात तसेंच कालाच्या पोटीं अशीं राजरत्नें थोडींच उत्पन्न होतात. अधिकारी पुरुष रुष्ट झालेला मीं पाहिला कीं त्याचेबद्दल शांतपणाची वृत्ति मी स्वीकारतों. कारण राग हा मनुष्यमात्रास स्वाभाविक आहे. आपण जसे तत्वज्ञानी व साधु नसतों, तसें राज्यकर्तेही नसतात, भारतवर्षात तत्वज्ञानी राजा एक जनकच होऊन गेला. भावी स्वराज्यांत स्वराज्यांतील अधिकाऱ्यांचा राग-लोभ प्रजेला सोसावा लागणार आहे. मला तुम्हीं अध्यक्ष केलें त्या अध्यक्षस्था-नाचा अधिकार बजावून मीं नुकतेंच दोघांस बोलूं दिलें नाहीं. हें मीं योग्य केलें किंवा अयोग्य केलें हें तुम्हींच सांगणेंचें आहे. औटघटकेचा अधिकार आला तरी तो चालविला पाहिजे व त्या अधिकाराच्या कृत्यास दोन बाजू या राहणारच.

मी आपल्यापुढें संस्थानी प्रश्नांसंबंधानें राज्यकर्ते व प्रजाजन या दोघां-च्याही दोन बाजू मांडल्या आहेत. काठेवाडांतील कोणाहि संस्थानिकांनीं आपल्या प्रजेस अन्यायानें वागवावें ही कल्पनाच मला मुळीं असह्य वाटते. अशी तक्रार एखाद्या संस्थानिकाबद्दल आल्यास मी त्यास म्हणणार " बाबा असें वागण्यांत तुम्हांस फायदा काय ? " प्रजाजनांस म्हणणार कीं, " बाबांनो. अपराधाबद्दल माफी व स्वतः कष्ट सोसणें यांचे धडे प्रथम तुम्हीं शिका " मीं परिषदेच्या प्रारंभीं केलेल्या माझ्या भाषणांतील शेवटल्या कलमांत जे विचार प्रदर्शित केले आहेत ते वाचा व त्यांचें मनन करा. कोणताही लोकसमाज आपल्या कर्तव्याचा विचार न करतां आपल्या हक्कांचाच विचार करतो, तो उन्नत होत नाहीं. जे लोक आपलें कर्तव्य करतात त्यांस स्वाभाविकपणें हक्क प्राप्त होतात. आपल्या शास्त्रांत मातापितरांस योग्य मान देणें ही शास्त्राज्ञा आहे. हें आज्ञाधारकत्वाचें व्रत आम्हीं स्वीकारतों याचें कारण आपल्यास पुढें मिळणाऱ्या वारसाचा हक्क त्याचा मोबदला असतो. या हक्काकडे नजर देऊन आम्ही आमचें कर्तव्य करतों असें नाहीं. आमच्या शास्त्राज्ञा आम्हांस असें बजावतात कीं, आम्हीं आमचें कर्तव्य फलाशेवांचून करावें. जो फलाशेवांचून आपलें कर्तव्य करतो त्यास परमेश्वर लाभ करून देतोच व जो लाभाकडेच नुसती नजर देतो व कर्तव्याकडे कानाडोळा करतो त्यास लाभ होतोच असें नाहीं. तुम्हीं आपल्या आचरणानें अशा तऱ्हेचें शुद्ध वातावरण निर्माण केल्यास तुमचा मागणी नाकारणें कोणासही शक्य होणार नाहीं. तुमच्या स्वाभिमानाची

हानि होईल अशी गोष्ट तुम्हीं करावी असें माझें म्हणणें नाहीं. तुम्ही सत्याग्रह करतांना अवश्य आग्रह धरा, मात्र तो आग्रह योग्य शब्दांत व आपला दर्जा जाणून धरा. वर्तमानपत्रांत कोणचे वाद न्यावेत, कोणते नेऊं नयेत याबद्दलचे माझे मनाचे कांहीं नियम आहेत. लिहिण्यासारख्या शंभर गोष्टी मजपाशीं असल्या तरी मी त्यांपैकीं एकादीच प्रसिद्ध करतों. वर्तमानपत्रकारानीं किंवा वक्त्यांनीं आपल्या लेखणीवर व जिव्हेवर सक्त निर्बंध ठेवावा. खुषामत किंवा कडक भाषा हे दोन्ही दोषच आहेत. कडक शब्दांत विचार प्रदर्शित करणें व प्रत्यक्ष कांहीं काम न करणें हें काय कामाचें ? जे लोक कांहीं कृति करतात तेच लोकादरास पात्र होतात. राजसत्ता शिक्षेच्या सामर्थ्यावर कारभार चालविते, तुम्हीं स्वार्थत्याग व प्रेम या हत्यारांचे सहाय्यानें आपलें काम चालू ठेवावें. काठेवाडची उन्नति व्हावी हें ध्येय जर तुमच्या हृदयांत वसत असेल तर समाधानवृत्ति व संनियमन हे गुण तुमचे मार्गदर्शक ठेवा. प्रेम व स्वार्थत्याग यांच्या पुरांत काठेवाडचे राज्यकर्ते व प्रजाजन यांस बुडविल्यास, काठेवाडचें नंदनवन बनण्यास वेळ लागणार नाहीं व तसें तुमच्या हातून घडावें हाच माझा तुम्हास आशीर्वाद आहे. तुमच्या स्वार्थत्यागाचें व प्रेमाचें मूर्त स्वरूप चरका हें व्हावें असें मी चिंतितों. ”

नंतर महात्मा गांधींना खादीवर छापलेलें भावनगरच्या प्रजामंडळातर्फे मानपत्र अर्पण करण्यांत आलें व परिषदेचें काम संपलें.

---

# दक्षिणी संस्थान प्रजापरिषद्.

## पुणें येथील सहावें अधिवेशन.

### ता. २२ व २३ मे १९२६.

यंदांचें अधिवेशन पुणें येथें सार्वजनिक सभेच्या दिवाणखान्यांत सांगलीचे सुप्रसिद्ध वकील प्रो. गणपतरावजी अभ्यंकर यांच्या अध्यक्षतेखालीं ता. २२ रोजीं दुपारीं तीन वाजतां पूर्वीं ठरल्याप्रमाणें सुरू झालें. परिषदेस निरनिराळ्या संस्थानांतून सुमारें पाऊणशें प्रतिनिधी हजर होते व पुण्यांतील कांहीं संस्थानांचे रहिवासी व संस्थानी प्रश्नांबद्दल आस्था बाळगणारे गृहस्थही हजर होते. परिषदेस हैद्राबाद, कोल्हापूर, सांगली, जमखिंडी, मिरज, इचलकरंजी, सावंतवाडी, भोर, अक्कलकोट, औंध, जंजिरा, ह्या संस्थानांतील प्रतिनिधी आलेले होते. पुण्यांतील रावसाहेब शंकरराव बापट, रा. बाबासाहेब कामत, मे. खासेराव पोवार, डॉ. केतकर, रा. गोपाळराव देवधर, रावसाहेब ढेकणे, प्रि. घारपुरे, रा. न. चिं. केळकर, रा. का. ठ. जाधव, मेसर्स दिनकर व एन व्ही. गाडगीळ वकील, रा. बाबासाहेब परांजपे, रा. शंकरराव देव, मि. पी. कोदंडराव, रा. ज. स. करंदीकर, हे हजर होते. संस्थानांतील मंडळींत सांगलीचे रा. माईणकर, खाडीलकर, गोडबोले, रानडे, दत्तोपंत आपटे; जमखिंडीचे रा. माधवराव लेले, महाबळ, आपटे, पेणसे, फडके; मिरजेचे रा. गोविंदराव रानडे, अक्कलकोटचे रा. रामभाऊ शिरवळकर, औंधचे रा. पटवर्धन, भोरचे रा. वाग्भटराव देशपांडे, शेटे, पोतनीस, गोगटे; जंजिऱ्याचे ॲडव्होकेट जोशी, मि. शालोम सालोमन सुगांवकर; कोल्हापूरचे रा. वझे, सावंतवाडीचे रा. जोशी, हैद्राबादचे रा. गिरीराव अण्णा, राघवेंद्र शर्मा, मि. रुबेन, रा. नारायणराव देशपांडे वगैरे प्रमुख मंडळी हजर होती. परिषदेस सुमारें दोनशें समाज हजर होता.

अध्यक्ष

# प्रो. गणेश रघुनाथ अभ्यंकर, बी. ए. एलएल. बी.

## हायकोर्ट वकील, सांगली

# यांचें भाषण



प्रतिनिधि बंधु व सभ्य गृहस्थ हो, दक्षिणी संस्थानप्रजापरिषदेच्या आजच्या या महाव्या अधिवेशनप्रसंगीं माझी अध्यक्षाचे जागीं आपण योजना केली, यांत आपण माझा फार बहुमान केला असें मी समजतों. या परिषदांची व्यवस्था करणाऱ्या गृहस्थांचा अध्यक्षस्थानीं खालसा इलाख्यांतील राजकारणांत मुरलेल्या एकाद्या गृहस्थांची योजना करण्याचा परिपाठ आहे. याचें कारण त्यांच्या अनुभवाचा व शहाणपणाचा फायदा संस्थानी चळवळीस योग्य तऱ्हेचें वळण लावण्यांत सहजीं होणार आहे. यंदांचे वर्षी अशा बऱ्याच गृहस्थांस त्यांनीं हें स्थान स्वीकारणेंबद्दल विनंती केली होती. बॉंबे क्रॉनिकल पत्राचे संपादक हे आजारी पडले नसते तर त्यांनीं आजच्या परिषदेचें अध्यक्षस्थान सुशोभित केलें असतें. ते आजारी पडल्यामुळें आजची निवड करण्याचा आपल्यावर प्रसंग आला. मी गेलीं १५ वर्षे संस्थानी प्रश्नांचा थोडाबहुत अभ्यास करीत आहें. येवढ्याचमुळें माझें नांव परिषदेच्या चालकांचे पुढें आलें असावें, याहून अन्य कांहीं विशिष्ट माझ्यामध्यें नाहीं. आतां आपण निवड केली आहे तेव्हां उत्साहानें मला माझ्या कार्यांत मदत करून परिषदेचें अधिवेशन पार पाडावें अशी माझी विनंती आहे.

## ग्वाल्हेरचे महाराज.

आजच्यासारख्या परिषदेच्या अध्यक्षांचे भाषणांत प्रारंभीं दोन अधिवेशनांच्या दरम्यानच्या कालांत ज्या कांहीं मोठ्या व्यक्ति आपल्यास सोडून गेलेल्या असतात त्यांचा सन्मानपूर्वक निर्देश करणें हा शिष्टसंप्रदाय आहे. गेल्या वर्षांत संस्थानिकांचे वर्गापैकीं ग्वाल्हेरचे महाराज कैलासवासी झाल्यामुळें संस्थानिकांचे वर्गास मोठा धक्का बसला यांत शंका नाहीं. कै. श्रीमंत महाराज शिंदे हे उज्ज्वल देशभक्त, हुषार मुत्सद्दी व मोठे स्वाभिमानी पुरुष होते. ते संस्थानि-

कांच्या हक्कांकरितां निधड्या छातीनें कोणाशीं भांडावयास तयार असत. ते कर्तव्यदक्ष राजकर्ते होते व राजा ही पदवी प्रकृतिरंजनांत मिळते हें त्यांचे ठायीं पक्कें बाणलें होतें. त्यांनीं कोणत्याही राजकर्त्यांनीं आपल्या हातांत असलेली सत्ता कशी वापरावी याबद्दल जें चित्र रेखाटलें आहे तें प्रत्येक संस्थानिकानें आपल्यापुढें कित्त्यासारखें ठेवण्यासारखें आहे. कै. महाराजांचे सर्वच विचार सर्वांना सारखेच संम्मत असतील असें नाहीं; परंतु एकाद्या लहान तालुकदारापासून तों थेट **निजाम** साहेबांपर्यंत सर्वांस मान्य असावयास पाहिजेत अशी जी महाराजांनीं सल्ला सांगितली आहे ती म्हणजे संस्थानचे उत्पन्नांपैकीं फक्त **शेंकडा दोन** या प्रमाणांत रक्कम आपल्या **खासगी खर्चास** घ्यावी ही होय. हा पथ्यकर उपदेश संस्थानिक जर अनुसरतील तर ते हिंदी हिंदुस्थानावर फार मोठा उपकार करतील यांत शंका नाहीं.

## इंदूर संस्थान.

गेलें वर्ष संस्थान व संस्थानिक यांच्या दृष्टीनें मोठ्या खळबळीचें आहे. इंदूरच्या महाराजांचा राजसंन्यास, भोपाळच्या बेगमसाहेबांच्या पश्चात् गादीवर बसण्याच्या प्रश्नाचा निर्णय, फार वर्षांच्या तंट्याचा **वऱ्हाडच्या** प्रश्नाचा निकाल, यांनीं संस्थानी प्रजेमध्यें मोठी खळबळ उडवून दिली आहे. मरहूम बावलाच्या खुनाच्या खटल्यामुळें इंदूरचे महाराजांस गादी सोडावी लागली. या खटल्यांतील हकीकत ऐकणाऱ्यांच्या अंगावर मनुष्याचीं धाडसी कृत्यें ऐकून कांटा उभा राहील व मनुष्याच्या बेशरम कृत्यांची कहाणी ऐकून त्याच्याबद्दल खंत वाटेल. या खटल्याची हकीकत सांगण्यांचें आज प्रयोजन नाहीं. परंतु श्रीमंत सर तुकोजीराव महाराज होळकर यांनीं मुलास गादीनशीन करून आपण राजसंन्यास घेण्यास तयार आहोंत असें कळविण्याचे वेळीं नेक नामदार व्हॉईसरॉय साहेब यांच्या पत्रास उत्तर देतांना जो वादग्रस्त मुद्दा हिंदुस्थानसरकारांस संस्थानिकांच्या वर्तनाची चौकशी करण्याकरितां कमिशन नेमण्याचे बाबतींत अधिकार कितपत आहे याबद्दलचा उपस्थित केला आहे तो संस्थानी प्रजेच्या दृष्टीनें अत्यंत महत्त्वाचा आहे. या प्रश्नांस हिंदुस्थान सरकारनें एकदां स्पष्ट शब्दांत उत्तर द्यावयास पाहिजे होतें. लॉर्ड रेडिंग यांनीं होळकर महाराजांचा राजीनामा चौकशी पुढें न चालविणेंचे करारावर कबूल करून भयंकर स्वरूपाचे गुन्ह्याकडे

कानाडोळा करण्याचें धोरण स्वीकारलें ही मोठी गैर गोष्ट झाली आहे. या प्रश्नांचें उत्तर अप्रत्यक्ष रीतीनें **निजामसाहेबांस वऱ्हाडचे** बाबतींत जो खलिता पाठविला आहे त्यांत लॉर्ड रेडिंग यांनीं दिलें आहे.

या उत्तरांत ब्रिटिश सरकार संस्थानच्या अंतर्गत व्यवस्थेंत साम्राज्याचे हितसंरक्षणाचे वेळीं व **संस्थानी प्रजेची दुःस्थिति** निवारण्याकरितां हात घालील असें स्पष्ट म्हटलें आहे. कारण साम्राज्यसरकारावर देशांतील स्वराज्याची अखेरची जबाबदारी शिल्लक आहे. इंदूरच्या माजी महाराजांनीं उपस्थित केलेल्या प्रश्नांचा अशा तऱ्हेनें निर्णय लावण्यांत आलेला आहे. इंदूरच्या महाराजांच्या राजसंन्यासाचा प्रश्न अगदीं ताजा असल्यामुळें त्याबद्दल, विशेष या प्रसंगीं न बोलणें, हें इष्ट आहे. गेल्या सालांतील दुसरा महत्त्वाचा प्रश्न म्हणजे भोपाळच्या बेगमसाहेबांच्या वारसामध्यें झालेली अदलाबदल हा होय. संस्थानच्या गादीवर कोणता इसम बसावयाचा याबद्दल मान्यता देण्याचा जो अधिकार ब्रिटिश सरकारनें आपल्या हातीं ठेवला आहे, तो त्यांची वरिष्ठ सत्ता स्थापित करण्याचें स्पष्ट चिन्ह आहे, असें लॉर्ड रीडिंग यानीं **निजाम** साहेबांस दिलेल्या उत्तरांत ब्रिटिश सरकारचा अधिकार संस्थानिकांचे वारसास मान्यता देण्याचा आहे व वारशाबद्दल वाद पडल्यास त्याचा निर्णय साम्राज्य सरकारनें करावयाचा आहे असें बजावून सांगितलें आहे. भोपाळ संस्थान या परिषदेच्या कार्यक्षेत्रांत येत नाहीं, तेव्हां तेथील बेगम साहेबांच्या पश्चात् त्यांचे मुलगे अगर नातू यांपैकीं कोण वारस व्हावें याबद्दल अभिप्राय देण्याचें कारण नाहीं. आम्हांस येथें इतकेंच पहावयाचें आहे कीं, संस्थानिक साम्राज्य सरकारच्या प्रतिनिधींची मनधरणी करून आपल्यास आपले इच्छेनुरूप वारसाच्या परंपरेमध्यें फेरबदल करूं शकतो ही गोष्ट लोकांच्या नजरेसमोर आणावयाची आहे. साम्राज्य सरकारची संमति मिळविणें एवढीच एक अडचण फक्त आहे. बेगमसाहेबांनीं आपल्या नातवाचे हक्क बाजूस सारून आपल्या मुलास गादी मिळवून देण्याची खटखट केली व साम्राज्य सरकारची संमति या योजनेस मिळून त्यांची खटपट यशस्वी झाली. या उदाहरणाचा उपयोग अन्य संस्थानिक योग्य वारसांचे हक्क बाजूस सारून आपल्या मर्जीस येईल त्या त्या व्यक्तीस संस्थानच्या गादीचा वारसा मिळवून देण्याची खटपट करण्यांत होणार आहे. ही गोष्ट कितपत योग्य

आहे ह्याचा निर्णय करणें मी आपल्याकडेच सोंपवीत आहें. वारसाचा प्रश्न वाद्ग्रस्त असल्यावेळीं दोन्ही पक्षकारांचें म्हणणें उघडपणें ऐकून नंतर निर्णय देणें न्यायाच्या दृष्टीनें योग्य आहे, यांत मात्र शंका नाहीं. एखाद्या पक्षकाराच्या पश्चात् पडद्याआड चौकशीचा फार्स करून निर्णय करणें केव्हांही इष्ट होणार नाहीं.

## ब्रिटिश सरकारचा राज्याधिकार.

तिसरा महत्त्वाचा प्रश्न गेल्या सालीं जो उपस्थित होऊन निर्णयास लागला आहे तो ब्रिटिश सरकारच्या अधिकाराचा प्रश्न होय. इंग्लंडचे बादशहा हे हिंदुस्थानचे खरे राजे असून हिंदुस्थानांतील कोणत्याही संस्थानिकानें आपल्यास ब्रिटिश सरकारच्या बरोबरीचें मानून त्यांच्याशीं बरोबरीच्या नात्यानें व्यवहार करण्याचा अधिकार हिंदुस्थानांतील कोणत्याही संस्थानिकास नाहीं, ह्या तत्त्वाचें **लॉर्ड रीडिंग** यांनीं पुनरुच्चारण केलें आहे. ब्रिटिश सरकारचें वर्चस्व तह व करारमदार यांवर अवलंबून नसून तें साम्राज्य सरकार म्हणूनच आहे. परदेशी राजकारण व धोरण हें साम्राज्य सरकारनें आपल्या हातीं ठेविलें आहे यामुळें त्यांचें वर्चस्व मान्य करावयाचें आहे असें नसून देशांत सर्वत्र शांतता व सुव्यवस्था नांदेल हें पाहणें, ब्रिटिश सरकारचें कर्तव्य व त्यांचा अधिकार आहे. लॉर्ड रीडिंग यानीं ब्रिटिश सरकार व संस्थानिक यांचे संबंध कोणचे आहेत याबद्दलचें साम्राज्य सरकारचें धोरण स्पष्ट शब्दांत जाहीर केलें आहे. खालसा इलाख्यांतील राजयंत्र जुन्या पद्धतीचें असलेलें बदलण्यांत आलेलें मोडून टाकून तेथें नवीन पद्धतीचें यंत्र उभें केलेलें लोकांस बदलावेंसें वाटूं लागलें आहे. जबाबदार राज्यपद्धतीचें उद्दिष्ट साध्य करण्यास सहाय्यभूत होणारें राजयंत्र कसें निर्माण करितां येईल याबद्दल निरनिराळ्या सूचना निरनिराळ्या लोकांकडून करण्यांत येत आहेत. इंग्रजी व हिंदी प्रमुख मुत्सद्यांस हें राजयंत्र निर्माण करण्याचे वेळीं हिंदी हिंदुस्थानची मोठी अडचण भासूं लागली आहे. संस्थानी हिंदुस्थानच्या बिकट प्रश्नांचें समाधानकारक उत्तर सुचल्यावांचून खालसा इलाख्यांतील सुधारणा यशस्वी होणार नाहींत; इतकेंच नव्हे तर निश्चित केलेलें उद्दिष्ट केव्हांही साध्य होणार नाहीं. लॉर्ड रीडिंग यांनीं संस्थानविषयक साम्राज्य सरकारचें धोरण आतां स्पष्ट शब्दांत मांडलें आहे. तेव्हां संस्थानी प्रश्नांस योग्य वळण लागून त्याचें

रंगरूप ठरेल व खालसा व हिंदी हिंदुस्थान यांतील राजयंत्र समान स्वरूपाचें होऊन हिंदुस्थानांत निरनिराळ्या राजसत्तांचा राष्ट्रसंघ बनेल असें मानण्यास आशा आहे.

लॉर्ड रीडिंग यांनीं ब्रिटिश सरकारच्या राजसत्तेचें जें स्वरूप सांगितलें तें कांहीं नवें नाहीं. टप्पर यांच्या Indian Protectarate या पुस्तकांत या प्रश्नाचें मोठ्या चांगल्या रीतीनें विवेचन केलें आहे. सन १८०३ सालीं सर जॉन बार्लो यांनीं ब्रिटिश सत्तेच्या आधारावर अस्तित्वांत असणाऱ्या किंवा तिचें नियमन राजकीय बाबतींत मानणाऱ्या संस्थानांवांचून अन्य संस्थानें हिंदुस्थानांत राहूं देऊं नयेत असा अभिप्राय व्यक्त केला आहे. सबसिडियरी पद्धत अस्थापित करण्याचा हेतु संस्थानें कंपनीवर इतकीं अवलंबून राहणारीं कीं त्यामुळें ब्रिटिश साम्राज्यास धोका येईल असा कोणचाही संघ त्यांस करितां येऊं नये व संस्थानांतून सर्व साधारण नियंत्रणानें सर्वत्र शांतता नांदावी हा असल्याचें लॉर्ड वेलस्ली यांनीं जाहीर केलें आहे. सन. १८१३ सालीं ब्रिटिश साम्राज्याखालीं निरनिराळीं संस्थानें स्वतंत्र परंतु अंकित अशीं ठेवण्याचें धोरण स्विकारण्यांत आलें.

## सबसिडियरी पद्धत.

सबसिडिअरी पद्धत संस्थानिक अंगिकारूं लागल्यापासून देशी राज्यांच्या ऱ्हासास सुरुवात झाली असें म्हणण्यास हरकत नाहीं. या पद्धतीनें संस्थानिकांच्यामधील मर्दपणाची स्वतंत्रताबुद्धि व त्यांची स्वतंत्र राजसत्ता यांच्यावर अत्यंत वाईट परिणाम झाला. मि. जेम्स मिल्ल यांनीं पार्लमेंटरी चौकशी कमेटीपुढें या पद्धतीच्या दुष्परिणामांचें उत्तम चित्र सन १८३२ सालीं रेखाटलें आहे. स्वतंत्र राजसत्तेला अवश्यक असणारे सर्व गुण कंपनीशीं देशी राजांचा संबंध आल्यापासून त्यांच्यामधून नष्ट होऊं लागले. परकीय राजसत्ता आपलें संरक्षण करीत आहे, अशी खात्री पटतांच स्वसंरक्षणाची भावना त्यांचेमधून नष्ट झाली. कुबडी कांखेंत घेऊन चालणाऱ्याचे जसे पाय जातात ती स्थिति देशी राजांची या पद्धतीनें झाली. सन १८३३ पासून १८५७ पर्यंत देशी राजांशीं जे तह कंपनीनें केले त्यांत "तावेदारी" व 'स्नेहसंबंध' हे शब्द बिनचूक घालण्यांत आले आहेत, हिंदुस्थानचा करिभार कंपनीकडून राजघ-

राण्याकडे गेल्यापासून " **ताबेदारीच्या** " सहकार्याचे तत्त्वाचें पाऊल पुढेंच पडलें. लॉर्ड कॅनिंग यांनीं सन १८६० सालीं इंग्रजी राजसत्ता साम्राज्य सरकारचे स्थानीं असून संस्थानिक तिचे सामंतचक्रांतर्गत अंकित राजसत्ताक आहेत असें जाहीर केलें. स्वतंत्र व आधीन संस्थानांमधील भेदभाव नष्ट होऊन संस्थानांच्या अंतर्गत राज्यकारभारांत अव्यवस्थेचे सबबीवर वाटेल तेव्हां ढवळाढवळ करणेचा अधिकार ब्रिटिश राजसत्तेस आहे हें तत्त्व प्रस्थापित झालें. संस्थानिकांनीं ब्रिटिश सरकारास राजनिष्ठ राहून त्याचें सार्वभौमत्व कबूल केलें व त्यांस संस्थानें अबाधित चालविण्याच्या सनदा ब्रिटिश सरकारांतून देण्यांत आल्या.

## बादशाही पदवी.

सन १८७६ सालीं मि. डिझरायली यांचे सूचनेवरून ब्रिटिश राजघराण्यांतील व्यक्तींना हिंदुस्थानची बादशाही देण्याचा कायदा पार्लमेंटमध्यें पास झाला. या कायद्याच्या बिलावर जो वादविवाद पार्लमेंटमध्यें झाला तो मोठा मनोवेधक आहे. एकाच व्यक्तीस इंग्लंडचा राजा व हिंदुस्थानचा बादशहा अशा भिन्न अर्थबोधक पदव्या असण्यासंबंधानें पुष्कळ टीका झाली. मि. ग्लॅडस्टन यांनीं सदर्हु बिलाचा हेतु हिंदुस्थानांतील संस्थानिकांवर ब्रिटिश राजसत्तेचें वर्चस्व प्रस्थापित करण्याचा दिसतो असें सांगितलें. ईस्ट इंडिया कंपनी व तिच्या मागून तिच्या ठिकाणीं आलेल्या राणीसाहेब यांस कायदेशीर रीत्या अगर न्यायाच्या दृष्टीनें जें वर्चस्व मिळालें नव्हतें, तें या बिलानें मिळवून देण्यांत आलें. मि. व्हाईट यांनीं हें बिल पार्लमेंटपुढें आणण्याचा प्रधानमंडळाचा हेतु काय आहे असा सरळ सवाल घातला होता. मुख्य प्रधानानें या सवालास उत्तर देण्याचें टाळलें. सर वुइल्यम हारकोर्ट यांनीं या चर्चेत भाग घेऊन बिलावर कडक टीका केली. कंपनीकडून हिंदुस्थानचा राज्यकारभार सन १८५८ सालीं राजघराण्याकडे आला त्या सालापासून वीस वर्षेपर्यंत ब्रिटिश सरकारचें वर्चस्व वस्तुतः असूनही तें जाहीर न करण्याचा हेतु संस्थानिकांचीं मनें दुखवूं नयेत हा होता. मि. डिझरायली यांनीं बादशाही पदवी घेण्याचें ठरविलेलें ऐकून पुष्कळ संस्थानिकांस आनंद झाला आहे असें विधान पार्लमेंटांत केलें. यावर प्रधानमंडळास उलट सुलट अनेक

प्रश्न करण्यांत आले. मेसर्स ग्लॅडस्टन, जेंकिन्स कॉवेल, सर वुइल्यम हारकोर्ट यांनीं पुष्कळ आडवे तिडवे प्रश्न केले. नवीन पद्वी धारण करण्यांत राज्यघटनेचें स्वरूपच बदलण्यांत येत आहे असा आक्षेप पार्लमेंटमध्यें घेण्यांत आला. ब्रिटिश राजसत्ता हिंदुस्थानांत सार्वभौम होती परंतु या पद्वीनें ती तशी आहे याचा डंका वाजविण्यांत आला. इंग्लंडचें राजघराणें "शहानशाहा" असून संस्थानिक हे त्याचे **अंकित** मांडलिक आहेत असें जगजाहीर करण्यांत आलें. लॉर्ड लिटन यांनीं १८७७ सालीं मोठा द्रबार भरवून राणीसाहेब यांनीं "बाद्शाही पद्वी" धारण केल्याची जाहिरात लावली व संस्थानिकांनीं याबद्दल हूं कां चूं न करितां द्रबारास हजर राहून इंग्लंडच्या पार्लमेंटच्या कृत्यास संमति दिली. आतां पन्नास वर्षांनंतर आपल्या राजकीय **सत्तेचा टेंभा** कोणा संस्थानिकांनीं मिरविण्यांत काय फायदा आहे ? पन्नास वर्षांपूर्वीं आपल्या हातांनीं गमावून बसलेल्या गोष्टीबद्दल व्यर्थ काथ्याकूट करण्यांत आतां काय मौज राहिली आहे ? इंदूरचे माजी महाराजांचे आजे तुकोजीराव होळकर यांनीं १८७६ सालीं दिल्ली द्रबारचे वेळीं स्पष्ट बोलून दाखविलें कीं "आज आम्हीं आमचें **स्वातंत्र्य** खरें गमावलें" तुकोजीरावांसारख्या शहाण्या संस्थानिकानें जी गोष्ट तेव्हां ओळखली त्याची जाणीव थोड्याच अन्य संस्थानिकांना झाली होती.

## अर्थाचें पिष्टपेषण.

इंग्रजी राजघराण्याच्या राजसत्तेस कायद्याचा पाठिंबा देण्याचा दुसरा प्रयत्न सन १८८९ सालच्या इंटरप्रिटेशन ॲक्टाचे दुरुस्ती बिलाचे वेळीं झाला. ॲक्टानें संस्थानिक या शब्दाची व्याख्या पार बद्लून टाकिली. यांत ब्रिटिश राजसत्तेचें साम्राज्यत्व व संस्थानिकांचें सामंतत्व स्पष्ट शब्दांनीं जाहिर करण्यांत आलें. सन १८३३ च्या व १८६१ च्या कायद्यांतील व्याख्येहून सद्हु व्याख्या अगदीं भिन्न आहे. ही व्याख्या बदलण्याचे वेळीं संस्थानिकांस कोणीं विचारलें नव्हतें किंवा पुसलेंहि नव्हतें. बाद्शाही पद्वी घेण्याचे वेळीं व सन १८८९ चा इंटरप्रिटेशन ॲक्ट पास करणेचे वेळीं संस्थानिकांचा अभिप्राय सद्र बाबतींत काय आहे याची विचारपूस कोणीं कोठें केली होती ? साम्राज्य सरकारचे सोईस जेव्हां संस्थानिकांची मर्जी संपाद्णें पडत असतें तेव्हां तहाचें बुजगावणें पुढें करावयाचें व जेव्हां आपलें कांहीं हित साधावयाचें असेल तेव्हां त्या तहास कोणी चिठोऱ्याइतकीसुद्धां किंमत देत नाहीं.

# संस्थानिकांचा अंतरराष्ट्रीय दर्जा.

सन १८९१ सालीं बादशाही सरकारनें संस्थानिकांस आंतरराष्ट्रीय कायद्याचें तत्त्व लागू पडत नाहीं असें जाहिर करून त्यांच्या आंतरराष्ट्रीय दर्ज्यास जबरदस्त धक्का दिला आहे. एकाचें वर्चस्व, दुसऱ्याची ताबेदारी स्वच्छ दाखविते–हॉल यांच्या ग्रंथांत हिंदी संस्थानिकांच्या दर्ज्याचें उत्तम वर्णन केलें आहे. संस्थानिकांशीं केलेल्या तहांतील कलमांची किंमत साम्राज्य सरकारनें आपखुषीनें आपल्यास कोठपर्यंत बंधनें घालून घेतलीं आहेत तें दर्शविण्यापलीकडे कांहीं नाहीं. लॉर्ड कर्झन यांनीं राणीचा जाहिरनामा किंवा देशी संस्थानिकांबरोबर झालेले तह यांस **चिटोऱ्याचे पलीकडे** किंमत नाहीं, असें स्पष्टपणें सांगून टाकलें आहे. लॉर्ड कर्झन यांचेमध्यें स्पष्ट बोलण्याची तरी दानत होती. त्यांनीं पोलिटिकल खात्यांतील भाषाप्रयोगांस बाजूस सारून स्पष्ट शब्दांत आपले अंतर्गत विचार स्पष्टपणें चव्हाट्यावर मांडले. पोलिटिकल खात्यांत पत्रव्यवहारांत " सल्ला " हा शब्द बिनधडक वापरण्यांत येतो. परंतु त्याचा खरा अर्थ " हुकूम " या शब्दानें सूचित करणाऱ्या शब्दप्रयोगाइतका स्पष्टच असतो. लॉर्ड रेडिंग यांनीं " फेथफुल अलाय " या शब्दाचा अर्थ " फेथफुल " शब्दावर जोर देऊन तो आपण कोणच्या अर्थी वापरतों हें स्पष्ट सांगितलें आहे. उदेपूर येथें भाषण करतांना सन १९०९ सालीं लॉर्ड मिंटो यांनीं संस्थानिकांच्या अंतर्गत राज्यकारभारांत हात न घालण्याचें जेव्हां जाहीर केलें तेव्हांच ब्रिटिश राजसत्ता व संस्थानी राजसत्ता यांचा अन्योय संबंध सार्वभौम व सामंत यांच्यामधील संबंधाप्रमाणें आहे हें मात्र बजावून ठेवलें आहे. ब्रिटिश सरकारनें आपल्या राजसत्तेच्या अधिकाराच्या जोरावर युरोपियन ब्रिटिश लोकांवरील आपली सत्ता प्रस्थापित केली आहे. व त्या सत्तेचा फायदा खालसांतील लोकांस वगैरे दिला आहे. संस्थानांतील कांहीं क्षेत्र आपल्या उपयोगास पाहिजे म्हणून मागून घेऊन त्यावर त्यांच्या हद्दींत ब्रिटिश राजसत्ता प्रस्थापित केली आहे. ब्रिटिश सरकारनें आपल्या राजसत्तेचें घोडें संधि साध साधून एकसारखें शतकभर दामटलें आहे मात्र शब्दप्रयोग करण्याचे वेळीं खरी कल्पना देणाऱ्या शब्दप्रयोगास पूर्ण बहिष्कार घालून ठेविला आहे. संस्थानिकांची मर्जी सुप्रसन्न राखण्याकरितां मऊ मऊ शब्द वेळीं अवेळीं योजण्यांत त्यांचेकडून कमतरता मात्र होत नाहीं.

संस्थानिकांचें मन कोठें दुखेल म्हणून त्यांनीं आपल्या राजसत्तेचें प्रदर्शन सुमारें ७५ वर्षे मुळींच केलेलें नाहीं. संस्थानिकांची राजसत्ता गेली कशी व त्यांत इंग्रजी राजसत्तेचा शिरकाव कसा झाला याचें विवेचन करण्याचा हा समय नव्हे व तसें करण्याचा उपयोगही होणार नाहीं. संग्रामप्रसंगीं सर्वच कांहीं सरळ आणि योग्य आहे या तत्त्वांत सर्व कांहीं परिस्थितीचें रहस्य भरलेलें आहे.

## संस्थानिकांचें स्वातंत्र्य.

संस्थानिकांची राजसत्ता निर्दिष्ट करण्याचे वेळीं "Sovereignty" हाच शब्द योजल्यामुळें पुष्कळच मतिविभ्रम झाला आहे. सर हेन्री मेन यांच्या मताप्रमाणें राजसत्ता विभाज्य आहे व कांहीं सत्ता संस्थानिकांकडे ठेऊन बाकीची राजसत्ता साम्राज्य सरकारांत येते तीच स्वतंत्र राजसत्ता आहे. स्वातंत्र्य हें विभाज्य नाहीं किंवा कमी जास्त होणारें नाहीं. ब्रिटिश सरकार हें साम्राज्य सरकार असून तें पूर्ण स्वतंत्र आहे आणि संस्थानें स्पष्ट शब्दांत बोलावयाचें म्हणजे **परतंत्र** आहेत. यावरून ज्यानें त्यानें आपला दर्जा ओळखावयाचा आहे. शब्दाचा खराच अर्थ पहावयाचा असल्यास हिंदुस्थानांत कमजास्त स्वरूपाच्या अनेक राजसत्ता आहेत; परंतु स्वतंत्र राजसत्ता ब्रिटिश सरकारची फक्त आहे.

**लॉर्ड रेडिंग** यांनीं **निजाम** साहेबांचे पत्रास उत्तर देण्याचे वेळीं ब्रिटिश सरकार व हिंदी संस्थानिक यांचे अन्योन्य संबंध काय आहेत हें स्पष्ट शब्दांत सांगितलें आहे. या तत्त्वानुसार साम्राज्य सरकार संस्थानिकांशीं वागतें किंवा काय हें पाहणें अयोग्य होणार नाहीं. मि. **बालडविन** यांनीं, ब्रिटिश लोकपुढें पहातात मागें पाहत नाहींत, असें ब्रिटिश राष्ट्राचें वर्णन केलें आहे. या तत्वानुसार पहातां ब्रिटिश सरकारनें संस्थानिकांस वेळींच योग्य शब्दांत सूचना दिलेली आहे. सन १९१९ च्या गव्हर्नमेंट ऑफ इंडिया ॲक्टानें मॉटेग्यु चेम्सफोर्ड रिपोर्टांत राज्यकारभाराच्या सुधारणेच्या सूचनांस कायदेशीर स्वरूप दिलें आहे. मांटफोर्ड रिपोर्ट हा १९१७ च्या आगष्ट महिन्यांतील पार्लमेंटांत निर्दिष्ट केलेलें उद्दिष्ट गृहीत धरून लिहिलेला आहे. या रिपोर्टाच्या लेखकांनीं भावी हिंदुस्थानाचें चित्र राष्ट्रसंघाच्या स्वरूपाचें काढलेलें आहे. या संघांत संस्थानांचा समावेश केला आहे. ब्रिटिश इंडियांतील प्रांत स्वायत्त स्वरूपाचे व संस्थानी

अंमल बेबंद अशा भिन्न स्वरूपी राजसत्तांचा संघ केव्हांही टिकाऊ होणार नाहीं, तेव्हां मि. मॉंटेग्यु व लॉर्ड चेम्सफर्ड यांचे मतें संस्थानांतूनही प्रागतिक स्वरूपाची राजसत्ता प्रस्थापित होणें अवश्यक आहे. ते प्रागतिक स्वरूपाचें राजयंत्र संस्थानांतून निर्माण होण्यास भरपूर सवलत देण्यास तयार आहेत. संस्थानावर प्रागतिक स्वरूपाची राजसत्ता परस्थांच्या आग्रहानें लादण्यास मात्र ते तयार नाहींत. तहांतील निर्बंध पाळून स्वस्थ राहावें म्हणजे आपोआपच संस्थानें प्रागतिक स्वरूपाचीं होतील असें ते मानीत आहेत.

## जाहीरनाम्याची जरूरी.

मॉंटफोर्ड रिपोर्टच्या लेखकांच्या विद्वत्तेस मान तुकविणें जरी जरूर आहे तरी त्यांनीं संस्थानी प्रगतीबद्दल जी विचारसरणी स्वीकारली आहे ती चुकीची आहे असें म्हणणें भाग आहे. सार्वभौम सरकारच्या दिरंगाईच्या राजकीय धोरणामुळेंच संस्थानांची हीनदीन स्थिति झालेली आहे. संस्थानी प्रजेबद्दल साम्राज्य सरकारचे अधिकारी **बेफिकीर** राहिलेले आहेत. राष्ट्रसंघाची कल्पना शक्य कोटींतील मानण्यावरच जबाबदार राज्यपद्धति हें साध्य करण्याचें ध्येय असें जेव्हां मानण्यांत येत आहे तेव्हां संस्थानांच्या बाबतींतील साम्राज्य सरकारचें "मीनमेष" धोरण केव्हांही गर्हणीय आहे. हिंदुस्थान सरकारनें हिंदुस्थानांत आपल्यावाचून अन्य राजसत्ता कमी दर्जाच्या व हिणकस आहेत, असें जाहीर केलें असून संस्थानांतील **अंतर्गत** कारभारांत लोकसमाजाच्या हिताचे दृष्टीनें आपल्यास पूर्ण अधिकार आहे असें जाहीर केलें आहे. प्रजाप्रतिनिधितंत्री राजव्यवस्था खालसांतील मुलुखास जर मानवण्यासारखी आहे असें एकदा कबूल केल्यावर त्याच जातीच्या संस्थानी प्रजेस ती राजपद्धति घातक होईल असें म्हणणें केव्हांही शोभणार नाहीं. जें औषध ब्रिटिश प्रजाजनांला फलप्रद होत आहे तेंच औषध संस्थानी प्रजाजनांस घातक होईल असें कोणी म्हटल्यास तें कोणासही पटणार नाहीं. दळणवळणाचीं साधनें, वर्तमानपत्रें, व्याख्यानमाला व साम्राज्य सरकारच्या शिक्षणविषयक संस्था या खालसा मुलुखांतील व संस्थानांतील प्रजाजनास एकत्र आणून जणूं काय एकत्र जखडून टाकीत आहेत. प्रांतिक व मध्यवर्ती कायदे मंडळांतील वाटाघाटींनें लोकांस नवीन मन्वंतील सुधारणांचें

महत्त्व करूं लागलें आहे. आकांक्षा व आशा या संस्थानी प्रजेंत खालसांतलि सुधारणा पाहून उत्पन्न झाल्या आहेत. या मनोविकारांची वाढ अनुकूल भूमिका मिळाल्यामुळें सारखी होत आहे. अशा परिस्थितींत ब्रिटिश सरकारच्या सार्वभौम राजसत्तेनें हात जोडून स्वस्थ बसावें हें अदूरदर्शी व गैरमुत्सद्देगिरीचें लक्षण आहे, वऱ्हाडसारखा प्रांत घशाखालीं उतरविण्यापुरतें राजसभेचें तट्टू हांकावयाचें व बाकीच्या वेळेस तें तट्टू जिवंत आहे किंवा मेलें आहे हें पहावयाचें नाहीं असें करून चालावयाचें नाहीं. अखेरीस राजसत्ता आपली आहे असें जर मानावयाचें आहे तर त्या सत्तेबरोबर अंगावर येऊन पडणाऱ्या जबाबदाऱ्याही पार पाडण्यास तयार व्हावयास पाहिजे. ताबेदारी तुटक रीतीनें व प्रगति झालेल्या लोकसमाजांत ताबेदारीच्या स्थितींतही सहकार्य होणें ही उत्क्रांतीची एक पायरी आहे. सहकार्यापासून विरोधाभावाची स्थिति ही जवळची पायरी आहे. हिंदुस्थानांत राष्ट्रीयसंबंधाच्या दृष्टीनें संघ व सहकार्य हीं उद्दिष्ट साधण्याचीं साधनें आहेत. तेव्हां संस्थानांचे बाबतींत ब्रिटिश सरकार आतां काय धोरण स्वीकारणार हें जाहीर व्हावयास पाहिजे आहे; सन १९१७ सालच्या आगष्टमध्यें जाहीर झालेलें धोरण संस्थानांत लागूं करणें हें क्रमप्राप्त कर्तव्य आहे. हिंदुस्थानच्या राष्ट्रसंघाची स्थापना हें ब्रिटिश राजसत्तेचें ध्येय आहे. तेव्हां संस्थानिकांस सनदशीर राज्यपद्धतींतील राजे बनणें भाग पाडून संस्थानांतून जबाबदार राज्यपद्धतीचें ध्येय असल्याचें जाहीर व्हावयास पाहिजे. संस्थानी प्रश्न सुटण्यास एवढाच एक मार्ग आहे. स्वराज्य लाभलेल्या राष्ट्रसंधी हिंदुस्थानांत संस्थानें व खालसामुलुख यांच्या दरम्यान झगडा असणें केव्हांही इष्ट नाहीं. तेव्हां संस्थानिकांना नियमित सत्ताधारी राजपुरुष बनविणें अवश्यक आहे. ते नियमित सत्ताधारी बनण्यास कबूल झाले तर त्यांच्या इज्जतीची, त्यांच्या गादीची, त्यांच्या दर्जाची, त्यांचे मानापमानाची नुकसानी होणें केव्हांही इष्ट वाटणार नाहीं. आज संस्थानी प्रजेपुढें कांहीं उच्च दर्जाचें साध्य दिसत नाहीं. तें त्यांस उपलब्ध करून दिलें पाहिजे. संस्थानी प्रजाजनास बादशहांचे गादीस राजनिष्ठ राहणें भाग आहे. तरी त्यांस इंग्रजी राजकारणांत 'परस्थ' मानण्यांत येतें व त्यांस त्यांचे मार्गे पोलिस लावून बाहेर काढून लावण्याची मजलही गांठली जाते.

## संस्थानिकांचा हितसंबंध.

अशा तऱ्हेचें उद्दिष्ट निर्णीत होणें संस्थानिकांच्या दृष्टीनेंही हितावह आहे. परंतु त्यांच्या भोंवती असणाऱ्या खराब वातावरणाचा परिणाम इतका वाईट झाला आहे कीं, त्यांस बदललेल्या परिस्थितीची जाणीवही होत नाहीं. लॉर्ड चेम्सफर्ड यांनीं 'भविष्यकालांत वैयक्तिक राज्यकारभारपद्धति 'औषधास' ही पहावयास मिळणार नाहीं. सर्वत्र लोकशाहीचा अंमल फैलावलेला दिसूं लागेल. वैयक्तिक बेबंद कारभाराचीं कटु फळें कशीं असतात याची जाणीव गेल्या कित्येक महिन्यांत ज्या गोष्टी संस्थानी अंमलाच्या चव्हाट्यावर आल्या आहेत त्यांवरून सर्वांस कळून चुकलेंच आहे. युरोपांत व एशियांत सुद्धां या जाणीवेचा परिणाम वैयक्तिक राजसत्तेचा नायनाट करण्यांत येऊन त्याचे जागीं प्रजाप्रतिनिधितंत्री राजयंत्राची संस्थापना झाली आहे.' वगैरे विचार भरतपूर येथील एका भाषणप्रसंगीं सन १९१८ सालीं प्रदर्शित केले होते. सन १९१८ सालच्या स्थितीचें सदरचें चित्र आहे. त्यांत आज फरक चांगल्या बाजूकडे तर झालाच नाहीं, उलट त्याची कृष्णवर्ण छाया कृष्णतर झाली आहे. संस्थानिकांची विचारसरणी प्रगल्भ व दूरदृष्टी नसल्यानें त्यांस ब्रिटिश इंडियांत अंमलांत येणाऱ्या सुधारणांचा परिणाम संस्थानी मुलुखावर झाल्यावांचून रहाणार नाहीं याची कल्पना येणार नाहीं. परंतु ब्रिटिश मुत्सद्यांस जास्त अनुभव असल्यामुळें, त्यांचें राजकीय शिक्षण विस्तृत स्वरूपाचें असल्यामुळें त्यांच्या सहज नजरेपुढें येणार आहे कीं, हिंदुस्थानांतील प्रजाजन मग ते संस्थानी अमलाखालील असोत अगर खालसा अमलांतील असोत, त्यांचेवर एकाच संस्कृतीचा एकच परिणाम होणें साहजिक आहे. खालसा, इलाख्यांत राजकर्ते परकीय आहेत ती स्थिति संस्थानांत नाहीं. ब्रिटिश इलाख्यांत नोकरशाही स्वतःच्या हितापुढें प्रजेचें हित दिसत नाहीं असें म्हणण्यास जागा आहे, तशी स्थिति संस्थानांत नाहीं. संस्थानिकांस त्यांच्या खासगी खर्चाची एकदां व्यवस्था झाल्यावर राजा व प्रजा यांच्या हितसंबंधाचा विरोध राहण्याचें कांहीं कारण नाहीं. प्रागतिक वृत्तीचा संस्थानिक सनदशीर पद्धतीनें आपण वागण्याचा निश्चय करून सहानुभूतिपूर्वक जबाबदार राज्यपद्धतीचा प्रयोग यशस्वी करण्याची खटपट करील तर त्यास यश येण्यास वेळ लागणार नाहीं. अशा एका यशस्वी

उदाहरणानें ब्रिटिश राजसत्तेस धडा मिळणार आहे. संस्थानिकांस आपली प्रजा जबाबदार राज्यपद्धतीचें ओझें उचलण्यास **असमर्थ** आहे असें म्हणण्यास मार्ग नाहीं. कारण तसें तो म्हणेल तर मॅकेव्हेलीनें प्रजेच्या नालायकीची जबाबदारी राजकर्त्यांवर पडते असें जें म्हटलें आहे त्याप्रमाणें तो डाव त्यांचे अंगावर येणार आहे.

## सर मालकम हेले.

ब्रिटिश मुत्सद्दी प्रांतांतील स्वायत्त राजसत्ता व हिंदुस्थान सरकारांतील जबाबदारीचा राज्यकारभार करण्यास हिंदी लोक असमर्थ आहेत असें दाखविण्याकरितां अनेक युक्त्या योजीत असतात.

हिंदुस्थानला प्रांतिक स्वायत्तता व मध्यवर्ती सरकारच्या घटनेमध्यें व वसाहतीच्या स्वरूपाचें स्वराज्य देण्याबद्दल दिवाणबहादूर रंगाचार्य यांनीं एक ठराव आणला होता. सरकारतर्फें उत्तर देतांना गृहमंत्री या नात्यानें सर मालकम हेले यांनीं या ठरावास विरोध केला. ते म्हणाले कीं, हिंदुस्थान अद्याप स्वराज्यास पात्र नाहीं. व बऱ्याच कारणांपैकीं त्यांनीं देशी संस्थानांकडे बोट दाखविलें. तुम्हांस संपूर्ण स्वराज्य पाहिजे तर संस्थानांची वाट काय! स्वराज्याच्या योजनेस संस्थानिकांची संमति आहे काय? संस्थानिकांचें म्हणणें मला माहीत नाहीं. तथापि राज्यकारभाराच्या प्रत्येक बाबतींत म्हणजे दळणवळणाचीं साधनें, व्यापार इत्यादि गोष्टींत त्यांच्याशीं प्रत्येक वेळीं संबंध येत आहे. भावी स्वराज्य हें ब्रिटिश इंडियापुरतेंच व्हावयाचें कीं त्यामध्यें संस्थानिकांचा अंतर्भाव होणार आहे! जर संस्थानिकांचा अंतर्भाव होणार असेल तर ते लोकप्रतिनिधींस जबाबदार असणाऱ्या मध्यवर्ती सरकारच्या हुकमतीखालीं राहण्यास तयार आहेत काय? किंवा मध्यवर्ती सरकारखेरीज गव्हर्नरजनरल-इन-कौन्सिलच्या हुकमतीखालीं व पार्लमेन्टच्या नजरेखालीं संस्थानिकांची व्यवस्था राहणेची आहे. यासंबंधाची कांहीं तरी मूर्त योजना झाल्याखेरीज स्वराज्याचा प्रश्न सोडवितां येणार नाहीं; शिवाय संस्थानिकांशीं तहनामे झाले असलेमुळें त्यांच्या संमतीखेरीज कांहीं करितां येणार नाहीं. सर मालकम यांनीं नुसत्या शंका व अडचणी दाखविण्यापलीकडे कोणचीही विधायक सूचना केली नाहीं. परंतु त्यांनीं एक भावी स्वराज्याला घातुक अशी कल्पना सुचविली आहे व तिचा **निषेध** करणें

अगदीं आवश्यक आहे. ब्रिटिश इंडियापुरती जबाबदार राज्यपद्धतीची राजकीय घटना व त्याखेरीज हिंदुस्थानांत गव्हर्नर जनरल-इन-कौन्सिल हे राहून त्याच्या हुकमतीखालीं अनियंत्रित सत्ता असलेलीं सातशें संस्थानें असा एक सवता सुभा अस्तित्वांत आल्यास तो भावी स्वराज्यास फार घातुक होईल. या दोन राज्यपद्धतींमध्यें हरघडी अडचणी उत्पन्न होऊन खटके उत्पन्न होतील व त्याचा शेवट येथील स्वस्थतेचा भंग होण्यामध्यें होईल. अशा तऱ्हेचें स्वराज्य प्राप्त झालें नाहीं तरी त्याबद्दल कोणास खेद वाटणार नाहीं. स्वराज्याची कल्पना ब्रिटिश इंडियापुरतीच मर्यादित करण्याची कोणाचीही आजपर्यंतची सूचना नाहीं. शिवाय या कल्पनेस कायद्याचाही आधार नाहीं. संस्थानें हल्लीं प्रचलित असलेल्या मध्यवर्ती सरकारच्या ताब्यांत आहेत व पोलिटिकल खात्याच्या मार्फत यांचा कारभार चालतो. भावी स्वराज्य मध्यवर्ती सरकारच्या ठिकाणीं स्थानापन्न होणार आहे व मध्यवर्ती सरकारास आज जे हक्क आहेत तेच हक्क या भावी स्वराज्यास मिळावयाचे आहेत. फक्त हल्लींच्या गव्हर्नर-जनरल—इन—कौन्सिलच्या ऐवजीं भावी स्वराज्याचें मालक जबाबदार मंत्रिमंडळ होणार आहे. या मंत्रिमंडळाचा ताबा अवश्यपणें पोलिटिकल खात्यावर चालावयाचा आहे व तो चालला म्हणजे आजमित्तीस पोलिटिकल खातें संस्थानिकांवर जें नियंत्रण चालवीत आहे तेंच नियंत्रण, तीच सत्ता, भावी स्वराज्यमंत्रिमंडळ संस्थानिकांवर चालवील. ईस्ट इंडिया कंपनीचा अधिकार जसा बादशहांकडे गेला व तो त्यांनीं गव्हर्नर-जनरल-इन कौन्सिलच्या विद्यमानें आजमित्तीस चालविला आहे तोच भावी स्वराज्यमंत्रिमंडळ बादशहाकरितां यापुढें चालवील. स्वायत्त वसाहती व साम्राज्य सरकार यांचा जो संबंध हल्लीं आहे तोच संबंध भावी स्वराज्य मंत्रिमंडळ व साम्राज्य सरकार यांत राहणार आहे. स्वायत्त वसाहतींच्यावर सुद्धां साम्राज्य सरकारचा प्रतिनिधि म्हणून गव्हर्नर-जनरल असतोच; त्याचप्रमाणें हिंदुस्थानमध्येंही तो राहील. परंतु संस्था-निकांचा कारभार त्याच्या हुकुमतीखालीं न राहतां अंतर्गत राज्यकारभाराचा भाग म्हणून तो भावी स्वराज्यप्रधानमंडळाच्या ताब्यांतच आला पाहिजे. भावी स्वराज्याच्या वेळीं सुद्धां हिंदुस्थानांत द्विदल राज्यपद्धति चालू ठेवण्याचा हा नोकरशाहीचा कावा आहे. परंतु अशा तऱ्हेची द्विदल राज्यपद्धतीची कल्पना मूर्खपणाची आहे असें सर स्टॅनियन यांनींही याच वेळीं बोलून दाखविलें.

शिवाय संस्थानिकांचें संरक्षण हल्लींचें हिंदुस्थान सरकार करीत आहे. भावी स्वराज्यास जर संस्थानिकांवरील हुकमत प्राप्त व्हावयाची असेल तर संस्थानिकांचें संरक्षण कोण करणार. जर भावी स्वराज्य ते करणार असले तर मग गव्हर्नर–जनरल–इन कौन्सिलचा संस्थानिकांशीं संबंध कशाकरितां राहील ? भावी स्वराज्यास जर सैन्यावरील हुकुमत मिळावयाची नसेल तर तें स्वराज्य असलें व नसलें तर त्याची किंमत सारखीच आहे. सर मालकम यांनीं सुचविलेल्या द्विदल राज्यपद्धतीच्या कल्पनेचें वेड कांहीं संस्थानिकांच्या डोक्यांत भणमणत आहे. इंदूरचे माजी अधिपति सर तुकोजीराव होळकर यांनीं मॉंटफर्ड रिपोर्टांतील संस्थानविषयक सूचनांबद्दल जो खलिता पाठविला आहे त्यांत त्यांनीं असें म्हटलें आहे कीं, हिंदुस्थानांतील लोकांचे स्वराज्य अस्तित्वांत आल्यास त्यांच्याशीं इंदूर दरबारचा कोणताही संबंध नाहीं किंवा इंदूर दरबार या स्वराज्याच्या हुकमतीखालीं राहण्यास तहनाम्यानें बांधिलेलें नाहीं. आपले तहनामे ब्रिटिश सरकारशीं झाले आहेत व ब्रिटिश सरकारचे प्रतिनिधी म्हणजे व्हॉईसरॉय यांचीच हुकमत आम्ही पाळूं. गव्हर्नर–जनरल इन–कौन्सिल किंवा भावी स्वराज्याचें जबाबदार मंत्रिमंडळ यांची हुकमत आम्ही मान्य करणार नाहीं. ब्रिटिश हिंदुस्थानांतील स्वराज्याचा दर्जा आपल्या संस्थानांशीं इतर संस्थानिकांप्रमाणें म्हणजे ग्वालेर, हैद्राबाद यांसारखा बरोबरीच्या नात्याचा राहील. इंदूरच्या महाराजांची ही कल्पना अगदी निराधार आहे. त्यांचे तहनामे ब्रिटिश सरकारशीं झाले नसून गव्हर्नर जनरलशीं झाले आहेत. त्यांच्यावरील नियंत्रण हिंदुस्थान सरकारच्या पोलिटिकल खात्यामार्फत होत आहे. ब्रिटिश सरकारच्या परराष्ट्राच्या खात्याकडून होत नाहीं. व त्यांचें संरक्षणही हिंदुस्थान सरकारच्या लष्कराकडून होत आहे. तेव्हां हिंदुस्थान सरकारच्या ठिकाणीं जें भावी स्वराज्यसरकार स्थानापन्न होईल त्याची हुकमत पाळणें इंदूर दरबारास भाग पडेल. इंदूरच्या महाराजांची लोकशाहीबद्दलची तिरस्करणीय कल्पना पाहून त्यांच्याबद्दल अद्याप आदर वाटत असलेल्या आपल्यांतील पुष्कळ गृहस्थांना पुष्कळ विस्मय वाटेल !

## नामदार पं. मदनमोहन मालवीय.

सर मालकम यांस नामदार पंडित मदनमोहन मालवीय यांनीं उत्तर देतांना असें सांगितलें कीं, भावी स्वराज्यांत संस्थानिकांचा मुलाजा उत्तम प्रकारें

ठेवण्यांत येईल. त्यांच्या हक्कांचा, त्यांच्या मानापमानाचा, त्यांच्या मागण्यांचा अधिक तत्परतेनें व अधिक काळजीनें विचार होईल व संस्थानिकांना भावी स्वराज्यांत अंतर्भूत होणें स्वाभिमानाचें वाटेल.

## लॉर्ड सिंह.

लॉर्ड सिंह यांनींही या बाबतींत सर माल्कम यांचेप्रमाणेंच शंका प्रदर्शित केली आहे. सुधारणेच्यासंबंधीं चाललेल्या वाटाघाटींत संस्थानिकांच्या स्थितीबद्दल कांहींच विचार झाला नाहीं असें त्यांचें म्हणणें आहे. जकाती, व्यापार, उद्योगधंदे वगैरे दळणवळणाचीं साधनें यायोगानें संस्थानिकांच्याकडून पुष्कळ फायदा होत असतांना त्यांच्यासंबंधानें विचार न करणें किंवा त्यांचें मत अजमावून न घेणें हें चुकीचें आहे असें लॉर्ड सिंह म्हणाले. या सर्व टीकाकारांना आमचा असा प्रश्न आहे कीं सरकारनें या बाबतींत काय केलें आहे ? १९१७ चा बादशाही जाहीरनामा, सेक्रेटरी ऑफ स्टेट यांचें हिंदुस्थानाला आगमन, प्रांतिक व मध्यवर्ति सरकारशीं त्यांनीं केलेली वाटाघाट व लोकमत समजून घेण्याची त्यांची खटपट हें सर्व सरकारनें आपण होऊनच स्वयंस्फूर्तीनेंच केलें नाहीं काय ? ब्रिटिश इंडियाबद्दल जर ही स्वयंस्फूर्तीची वृत्ति ब्रिटिश सरकार बाळगीत आहे तर संस्थानच्या प्रश्नाबद्दलही ऊहापोह त्यांनीं होऊनच कां सुरू केला नाहीं ! कालानुरोधानें व दैववशात संस्थानची उन्नति होईल अशी उदासीन वृत्ति सरकारनें कां स्वीकारली आहे ? आमच्या मतें या उदासीन वृत्तीचा त्याग करून सरकारनें या बाबतींत ब्रिटिश इंडियाप्रमाणें पुढाकार घेतला पाहिजे, विचारविनिमय केला पाहिजे व या प्रश्नाला कांहीं मूर्तस्वरूप आणिलें पाहिजे.

## स्वतंत्र पोलिटिकल खातें.

सार्वभौम सत्तेची दुसरी जबाबदारी म्हणजे मांडलिक संस्थानिकांबद्दल आपलें धोरण लोकांना वेळोवेळीं सरकारनें कळविलें पाहिजे. लोकमताची टीका ऐकून घेण्यास अवसर दिला पाहिजे व हल्लींच्या कारभाराचा गुप्तपणा सोडून दिला पाहिजे. संस्थानिकांचें नियंत्रण हल्लीं फॉरेन व पोलिटिकल खात्याकडून होत असतें. फॉरेन व पोलिटिकल खातें यापुढें ठेवणें इष्ट नाहीं. परराष्ट्र व पोलिटिकल खातें यांचा संबंध एकत्र ठेवणेंही अवश्यक नाहीं. परराष्ट्रखात्याचा संबंध हिंदुस्थानाबाहेरील स्वतंत्र देश, परराष्ट्रीय राजकारण व इंग्लंडचें परराष्ट्रीय धोरण

यांच्याशी असतो. परंतु पोलिटिकल खात्याचा संबंध देशी संस्थानांपुरताच आहे. परराष्ट्रीय कारभाराशीं त्याचा बिलकुल संबंध नाहीं. लढाई किंवा तह असले प्रश्न त्यांचे बाबतींत संभवत नाहींत, हिंदुस्थान सरकारची इच्छा व त्यांचे हुकूम संस्थानिकांना वेळोवेळीं कळविणें एवढाच या खात्याचा उपयोग आहे. तेव्हां हें खातें गव्हर्नर जनरलच्या नजरेखालून काढून गृहमंत्र्याच्या नजरेखालीं देण्यांत यावें. पोलिटिकल खात्याचे अधिकाऱ्यास भरभक्कम पगार मिळत आहे व या जागा म्हणजे जवळजळ तैनातीप्रमाणें बिननोकरीच्याच आहेत. संस्थानांत चाललेल्या राज्यकारभाराकडे डोळेझाक करून संस्थानिकांच्या ऐषआरामाच्या सहवासांत पोलीटिकल अधिकारी आपलें आयुष्यक्रमण आनंदानें करीत आहेत. हिंदुस्थान सरकारच्या मंत्रिमंडळांतील नोकरांना कामाचा पुष्कळ ताण पडतो, कौन्सिलांतील टीकेला तोंड द्यावें लागतें व पुष्कळ वेळां त्यांचा तेजोभंग होत असतो; परंतु पोलिटिकल अधिकारी खुशालचंदपणानें व बिनजबाबदारीनें आपला काळ घालवीत आहेत. तेव्हां अशा अधिकाऱ्यांमध्यें जबाबदारीची जाणीव उत्पन्न करण्याचा एकच मार्ग आहे. परराष्ट्रीय खात्यापासून ते विलग करणें व कौन्सिलांतील टीकेला ते पात्र करणें हाच होय. कौन्सिलच्या कामकाजाचे जे नियम हल्लीं अस्तित्वांत आहेत त्यायोगानें संस्थानिकांसंबंधीं कोणताही ठराव कौन्सिलपुढें आणतां येत नाहीं व कोणताही प्रश्न विचारतां येत नाहीं. नियम २३ ( १ ) व ८ यांनीं हें नियंत्रण घातलें आहे; परंतु या नियमांचा अर्थ फार संकोचित केला आहे. कौन्सिलांत जरी संस्थानिकांबद्दल ठराव मांडतां येत नाहीं तरी कौन्सिलपुढें चाललेल्या कामकाजाच्या बाबतींत संस्थानिकांचे प्रश्न मुद्याला धरून ओघानें प्राप्त होतील तर त्यांची वाटाघाट करण्यास कोणतीही हरकत नाहीं. या नियमाचा या स्वरूपाचा अर्थ पंडित मदन मोहन मालवीय यांनीं वरिष्ठ कौन्सिलपुढें दोन वेळां पुढें मांडला होता, परंतु दोन्ही वेळां तो मान्य करण्यांत आला नाहीं. नाभा संस्थानांतील जैतो येथें पुष्कळ ब्रिटिश हिंदी प्रजाजनांचा नाश झाला. जैतोचे ॲडमिनिस्ट्रेटर ब्रिटिश ऑफिसर होते व ते ब्रिटिश सरकारच्या अनुरोधानें कारभार करीत होते. या सर्व कारणांकरितां जैतो येथील अत्याचाराबद्दल चौकशी व्हावी म्हणून पंडितजींनीं सूचना आणली होती, परंतु तिचा विचार करण्यास सुद्धां परवानगी देण्यांत आली नाहीं. कामकाजाचे नियम २३ ( १ ) व ८ यांचा असा मर्यादित अर्थ करण्यांत आल्यामुळें

या नियमाची दुरुस्ती होणें अगदीं जरूर आहे. ही दुरुस्ती झाल्यास पोलिटिकल सेक्रेटरीला पोलिटिकल अधिकाऱ्यांच्या वर्तनाबद्दल पुष्कळ वेळां जाब द्यावा लागेल व पुष्कळ वेळां त्यांच्या हलगर्जीपणाच्या वर्तनाचा कौन्सिलांत निषेध करण्यांत येईल व यायोगानें पोलिटिकल अधिकाऱ्यांच्यामध्यें जबाबदारीची जाणीव उत्पन्न होईल. हल्लींच्याप्रमाणें इतर सर्व खात्यांच्या कारभारावर लोकप्रतिनिधींना टीका करितां येते, तसेंच या खात्यासंबंधीं टीका करितां आल्यास फार फायदा होणार आहे व अनियंत्रित संस्थानी सत्तेचा त्रास यायोगानें पुष्कळसा कमी होणार आहे. संस्थानिकांची सुधारणा या सुधारणेनें अप्रत्यक्षपणें घडून येईल. पोलिटिकल अधिकऱ्यांना वरचेवर जाबसाल देण्याची पाळी आली म्हणजे ते आपलें काम काळजीनें पाहूं लागतील. संस्थानांतील जुलुमाकडे व अन्यायाकडे ते अधिक लक्ष पोंहचवतील व संस्थानिकांची कानउघाडणी पुष्कळ वेळ करावी लागेल. पोलिटिकल अधिकऱ्यांच्या या कैचीमुळें संस्थानिकाच्या निरंकुश कारभारास आळा पडेल. अशा तऱ्हेची सवलत कौन्सिलच्या कामकाजाच्या नियमानें मिळाल्यास त्याचा दुरुपयोग होईल असें मानण्यास मुळींच कारण नाहीं. संस्थानांतील व्यक्तिविषयक तंटे, कायद्याची अंमलबजावणी किंवा बारीक सारीक अन्याय जे संस्थानच्या अधिकारांतच दूर करितां येतात व ज्याबद्दल पोलिटिकल खात्यांकडे केव्हांही धांव घेण्याचें कारण पडत नाहीं तसल्या गोष्टींचा कौन्सिलांत ऊहापोह केला जाणार नाहीं हें उघड आहे. परंतु एकाद्या संस्थानिकानें आपल्या प्रजेचें वित्त हरण केलें किंवा त्यांच्या मिळकती स्वतःच्या फायद्यासाठीं अपहार केल्या किंवा संस्थानांतील प्रजेची ज्जत किंवा अब्रू नाहकपणानें किंवा स्वैर वृत्तीनें किंवा पापबुद्धीनें घेतली किंवा संस्थानच्या प्रजेस अन्यायानें अटक केली किंवा संस्थानांत येण्याची बंदी केली, किंवा लष्करी कायदा पुकारून त्यांचे जीव घेतले; सारांश ज्या कोणत्याही अमानुष अन्यायाबद्दल संस्थानी प्रजा पोलिटिकल अधिकाऱ्यांकडे स्वयंस्फूर्तीनें पदोपदीं धांवत जाते व ज्या अन्यायाचें निराकरण करण्याची जबाबदारी साम्राज्य सरकारवर आहे, अशा सर्व गोष्टींचा विचार करण्याची मुभा कामकाजाच्या नियमानें दिली पाहिजे व या देण्यानेंच साम्राज्य सरकारच्या नांवानें पोलिटिकल अधिकारी जो अधिकार बेजबाबदार रीतीनें आजमित्तीस चालवीत आहेत त्याला पुष्कळ आळा पडणार आहे व संस्थानी प्रजाजनांची स्थिति त्यायोगानें निःसंशय सुधारणार आहे.

# सार्वजनिक हितसंबंधाचें संरक्षण.

सार्वभौम सरकार या नात्यानें तिसरी महत्त्वाची बाब म्हणजे संस्थानी प्रजेस ब्रिटिश सरकारास अप्रत्यक्षपणें करभार द्यावा लागतो. सरकारच्या धोरणानें निरनिराळ्या संस्थानांतून असलेल्या जकाती उठविण्यांत आलेल्या आहेत व खुल्या व्यापाराचें तत्त्व हिंदुस्थानांत लागू केल्यामुळें हिंदुस्थानांत बाहेरून जो माल येतो तो सर्व संस्थानांत पूर्णपणें पुरविला जात आहे. परंतु या मालावर परदेशांतून या देशांत येतांना ब्रिटिश सरकार जकात बसवितें ती मालाच्या किंमतीवर चढविण्यांत येते. ब्रिटिश प्रजाजनांप्रमाणें संस्थानी प्रजाहि हा माल घेत असून अप्रत्यक्षपणें संस्थानी प्रजेस जकात द्यावी लागत आहे. जकातीचें सर्व उत्पन्न मात्र सरकारच्या तिजोरींत पडत आहे. त्याचप्रमाणें अफू, भांग, गांजा, दारू वगैरेचें नियंत्रण ब्रिटिश सरकार करीत असल्यामुळें व या मालावरही जकात बसत असल्यामुळें त्याचेंही सर्व उत्पन्न ब्रिटिश खजिन्यांत गोळा होत आहे. आगगाड्या, तारायंत्रें, पोस्ट या सर्व बाबींचे उत्पन्नांत संस्थानी प्रजेचा भाग आहे. सर्व चलनपद्धति ब्रिटिश सरकारची असल्यामुळें यांतील फायदाही ब्रिटिश सरकारास पोंचत आहे. संस्थान व ब्रिटिश प्रजाजन यांचा वर नमूद केलेल्या बाबतींमध्यें नफ्यातोट्याचा संबंध पदोपदीं प्राप्त होतो. सर्व फायदा ब्रिटिश सरकारास जातो; परंतु यासंबंधीं आपलें हक्कसंरक्षण करण्यास संस्थानिकांस कोणतीहि सवलत नाहीं. रेल्वेचें भाडें वाढविलें, पोस्टाच्या तिकिटाची किंमत वाढली तर त्यासंबंधीं संस्थानी प्रजेचें मत घेण्यांत येत नाहीं. तसेंच आगगाड्यांतून प्रवास करणाऱ्या लोकांच्या सोईगैरसोईबद्दलही संस्थानी प्रजेस कांहींच करितां येत नाहीं. साम्राज्य सरकारच्या वरिष्ठ सत्तेपुढें संस्थानी प्रजेच्या हक्काची **पायमल्ली** होत आहे. ही स्थिति सुधारण्याकरितां संस्थानी प्रजेचें मत अजमावण्याकरितां एखादी संस्था निर्माण करावी व त्यांत सर्व पक्षांचें म्हणणें ऐकून या बाबतींतील धोरण सरकारनें ठरवावें अशी सूचना मॉंटेग्यू साहेबांनीं आपल्या रिपोर्टांत केली होती; परंतु या सूचनेला आज आठ वर्षांत मूर्त स्वरूप मुळींच देण्यांत आलेलें नाहीं. संस्थानी प्रजेच्या हक्कांची यायोगानें हेळसांड होत आहे, सबब अशा प्रकारची संस्था शक्य तितक्या लवकर निर्माण करावी अशी आमची आग्रहाची मागणी आहे.

## संस्थानी प्रजामंडळ.

या बाबतींत एक गोष्ट लक्षांत ठेवणें जरूर असून ती ही कीं, हा सर्व करभार संस्थानची प्रजा देत आहे. संस्थानचे अधिपति एवढेच देत नाहींत, तेव्हां ज्यांचे खिशांतून हे पैसे घेण्यांत येतात त्या संस्थानी प्रजेचें मत घेणें अत्यंत आवश्यक आहे. वस्तुतः संस्थानिकांनीं संस्थानच्या प्रजेसाठीं वरील प्रकारची संस्था निर्माण करण्याबद्दल व संस्थानी प्रजेच्या हक्काचें संरक्षण करण्याबद्दल नरेंद्रमंडळाच्या द्वारें खटपट करणें अवश्य होतें, परंतु हे नरेंद्र अपल्या प्रजेच्याकरितां कोणतीही खटपट न करितां आपल्या स्वतःच्या उपयोगाकरितां लागणाऱ्या मालावर जकात माफ व्हावी असा प्रयत्न करीत आहेत. या स्वार्थपरायण वृत्तीवरूनच संस्थानी प्रजेबद्दल त्यांना कितपत कळवळा आहे हें दिसून येणार आहे. व याच कारणासाठीं नरेंद्र–मंडळाप्रमाणेंच संस्थानांतील लोकप्रतिनिधींचें एक मंडळ अवश्य स्थापण्यांत यावें अशी आमची आग्रहाची मागणी आहे. हें संस्थानी प्रजाप्रतिनिधींचें मंडळ अस्तित्वांत आल्यानंतर ब्रिटिश इंडियांतील दोन संस्था म्हणजे असेंब्ली व कौन्सिल ऑफ स्टेट व संस्थांनातील दोन संस्था म्हणजे नरेंद्रमंडळ व संस्थानी प्रजामंडळ या सर्वांच्या सल्ल्यानें सामान्य हितसंबंधाच्या प्रश्नाबद्दल खुल्या दिलानें, योग्य सवलतीनें वाटाघाट करितां येईल. व या वाटाघाटींत जें धोरण निश्चित होईल. तदनुसार सरकारला वागावें लागेल. या योगानें संस्थानी प्रजेवर होत असलेला हल्लींचा अन्याय निःशंकपणें दूर होणार आहे.

## एक गैरसमज.

या बाबतींत आमच्या कांहीं मित्रांचा गैरसमज झालेला दिसतो. सामान्य हिताच्या प्रश्नाबद्दल संस्थानी प्रजेचे हक्क संरक्षण करण्याकरितां मध्यवर्ती सरकारच्या कायदे मंडळांत संस्थानी प्रजेचे प्रतिनिधि घेण्यांत यावे असें कांहींचें मत आहे, परंतु ही कल्पना चुकीची आहे. संस्थानें व ब्रिटिश इंडिया यांची अंतर्गत व्यवस्था अगदीं भिन्न आहे. संस्थानांतील प्रजेबद्दल मध्यवर्ती कायदे मंडळास कायदे करण्याचा अधिकार नाहीं, प्रत्यक्ष कर बसवितां येणार नाहींत, ब्रिटिश न्यायकोर्टांना संस्थानच्या हद्दींतील गुन्ह्याबद्दल कोणताही विचार करितां येणार नाहीं, एकतर्फी ब्रिटिश कोर्टाच्या हुकूमनाम्यांचा संस्थानांत काडीइतका फायदा

होत नाहीं, ब्रिटिश अधिकाऱ्यांना संस्थानांत उघडपणें कोणतीही हुकमत चालविता येत नाहीं. आशा रीतीनें अंतर्गत कारभाराच्या बाबतींत संस्थानें व ब्रिटिश इंडिया हीं अगदीं भिन्न आहेत व म्हणून मध्यवर्ती कायदे मंडळांत प्रवेश करण्याची इच्छा चुकीची आहे. ब्रिटिश प्रजाजनांना ती पसंत पडणार नाहीं, ती संस्थानांच्याही हिताची नाहीं. वर ज्या सार्वजनिक हिताच्या बाबी सांगितल्या, त्यांच्यासंबंधीं मात्र संस्थानी प्रजेला आपलें मत विचारण्याचा हक्क आहे व तो हक्क वर सुचविलेल्या योजनेनेंच बजावतां येणार आहे.

## संस्थानी प्रजेचें संरक्षण.

संस्थानी प्रजेला आपल्या अधिपतींना व हिंदुस्थानच्या बादशहांना राजनिष्ठ असावें लागत आहे. त्यांची राजनिष्ठा द्विविध आहे. प्रजेचें राजनिष्ठ असणें हें जितकें अवश्य कर्तव्य आहे तितकेंच राजानें प्रजेचें **संरक्षण** करणें अगदीं अवश्य आहे, स्वामिनिष्ठपणाचा मोबदला संरक्षण होय. साम्राज्य सरकारची संस्थानी प्रजा अंकित असल्यामुळें हिंदुस्थानाबाहेर स्वतंत्र देशांमध्यें संस्थानी प्रजेचें संरक्षण ब्रिटिश प्रजाजनांप्रमाणेंच करण्यांत येत आहे, व यासंबंधीं कायद्यांतही ब्रिटिश प्रजाजन या व्याख्येंत संस्थानी प्रजेचा समावेश झालेला आहे. परंतु ब्रिटिश इंडियामध्यें मात्र संस्थानी प्रजाजन म्हणजे **परकीय** असा मानला जातो. १८६४ च्या तिसऱ्या कायद्याप्रमाणें परकीय म्हणून संस्थानी प्रजेला ब्रिटिश हद्दींतून हाकलून देण्यांत येत आहे व न गेल्यास तुरुंगांत पाठविण्यांत येत आहे. ब्रिटिश इंडियाच्या बादशहाशीं स्वामिनिष्ठ असूनही संस्थानी प्रजेस परकीय म्हणून वागविण्यांत यावें हें अन्यायाचें आहे. ज्या साम्राज्याच्या छत्राखालीं हिंदुस्थानच्या बाहेर देशी प्रजाजनांचें संरक्षण होत आहे त्याच लोकांना खुद्द ब्रिटिश इंडियामध्यें साम्राज्य सरकारच्या प्रत्यक्ष छत्राखालीं संरक्षण मिळूं नये हा दैवदुर्विपाक होय. अशा परिस्थितींत सार्वभौम सरकारशीं असलेल्या राजनिष्ठपणाचा कोणता लाभ संस्थानी प्रजेस मिळत आहे, व बादशहांचे प्रजाजन म्हणून मिरविण्यांत तरी अर्थ काय? ही विषमता व अन्याय तातडतोब दूर होणें भाग आहे. जें संरक्षण हिंदुस्थानच्या बाहेर संस्थानी प्रजेचें होत आहे तेंच संरक्षण ब्रिटिश इंडियांत होणें क्रमप्राप्त आहे.

# जगरदेव तिवारी.

या बाबतींतील अन्याय जगरदेव तिवारी याच्या खटल्यानें उघडकीस आला आहे. या खटल्याची हकीगत अशी आहे. जगरदेव तिवारी संयुक्त प्रांतांतील मिर्झापूर जिल्ह्यांत रामदुपटी या गांवीं जन्मला. यावेळीं हा गांव ब्रिटिश सरकारच्या ताब्यांत होता. १९०९ सालीं जगरदेव याचा बाप मुंबई येथें उद्योगासाठीं आला व तो गवळ्याचा धंदा करूं लागला व १९११ सालीं रामदुपटी हा गांव बनारसच्या महाराजांस देण्यांत आला व या योगानें जगरदेव हा संस्थानी प्रजाजन झाला. जगरदेव १९१४ सालीं मुंबईस आला व आपल्या बापाचा धंदा त्यानें चालूं केला व तो धंद्यानिमित्त बहुतेक काल मुंबईसच आहे. परंतु १९२४ सालीं जगरदेव यास परकीय म्हणून १८६४ च्या तिसऱ्या कायद्याप्रमाणें घालवून देण्यांत आलें व त्यानें मुंबईबाहेर जाण्याचें नाकारल्यामुळें त्याला पकडून तुरुंगांत ठेवण्यांत आलें. या बाबतींत हायकोर्टकडे अर्ज होऊन त्यांनीं जगरदेवास झालेली अटक योग्य आहे, असें ठरविलें आहे. जगरदेव हा परकीय आहे. ब्रिटिश प्रजाजन नाहीं एवढेंच कारण मान्य करण्यांत आलें आहे. चौकशीचे वेळीं जगरदेवाबद्दल किंवा त्याचे वर्तनाबद्दल इतर कोणतेंही विधान करण्यांत आलें नव्हतें. फक्त तो ब्रिटिश प्रजाजन नाहीं व परकीय आहे एवढ्याच गोष्टीवरून त्याला घालवून देण्याचा किंवा त्यानें इनकार केल्यास त्याला तुरुंगांत ठेवण्याचा अधिकार सरकारास आहे असें ठरविण्यांत आलें. हा ठराव देशी संस्थानी प्रजेच्या दृष्टीनें फार घातक आहे. संस्थानी प्रजेस परकीय कसें म्हणतां येईल. ब्रिटिश सरकारशीं जर संस्थानी प्रजेस राजनिष्ठ रहावें लागतें तर त्यांस परकीय म्हणून संबोधणें अन्यायाचें आहे. परकीय मनुष्याला सार्वभौम सरकारशीं राजनिष्ठ असण्याचें मुळींच कारण नाहीं व हाच महत्त्वाचा भेद परकीय व संस्थानी प्रजा यांमध्यें आहे. सबब या गोष्टीकडे जगरदेवाच्या बाबतींत लक्ष गेल्याचें दिसत नाहीं किंवा ही तक्रारही कोर्टापुढें मांडण्यांत आलेली नाहीं. तथापि ज्याअर्थी वरिष्ठ न्यायकोर्टानें हा निकाल केला आहे त्याअर्थी १८६४ च्या तिसऱ्या कायद्यांत दुरुस्ती होणें जरूर आहे. ब्रिटिश इंडियांतील पुढाऱ्यांना माझी अशी विनंति आहे कीं, त्यांनीं कौन्सिलपुढें १८६४ च्या तिसऱ्या कायद्याची दुरुस्ती करण्याबद्दलचें

बिल अवश्य आणावें व त्यांत परकीय या व्याख्येंत देशी प्रजाजन येत नाहींत असें स्पष्टपणें ठरवून घ्यावें. आहे ह्या परिस्थितींत मात्र देशी प्रजेचे हाल अत्यंत होणार आहेत. एकाद्या संस्थानिकानें आपल्या प्रजेला हद्दपार केलें व जगरदेवाच्या सटल्याप्रमाणें त्याची ब्रिटिश इंडियांतूनही हकालपट्टी केली तर त्याला आर्यावर्तासच मुकावें लागेल. आई जेवूं घालीत नाहीं व बाप भीक मागूं देत नाहीं अशी अनन्यगतिक स्थिति होऊन संस्थानिक व हिंदुस्थानचे बादशहा या उभयतांसही राजनिष्ठ असूनही या उभयतांच्या मुलखांतूनही परागंदा होऊन आत्मनाश सोसावा लागेल. ही स्थिति किती **शोचनीय** आहे याचा आपणच विचार करावा.

## रॉयल कमिशन.

संस्थानी प्रश्नांबद्दल प्रत्येक जण शंका प्रदर्शित करीत आहे. परंतु उपायचिंतन किंवा विधायक सूचना एकानेंही केलेली नाहीं. सर मालकम हेले व लॉर्ड सिंह हे संस्थानांचें काय होणार म्हणून विचारतात. सुधारणेच्या योजनेमध्यें भावी स्वराज्याच्या प्रभावळीमध्यें त्यांना कोठें बसविणार असें विचारींत आहेत. संस्थानिक लोक आमची वाट काय म्हणून साशंक झाले आहेत. महाराज गायकवाड यांनीं नुकताच हा प्रश्न लॉर्ड रीडिंग यांस विचारला होता. बिकानेरचे महाराजही असें कांहीं सुचवीत आहेत, तेव्हां या बाबतींत खुल्या दिलानें व जबाबदारीनें चौकशी व्हावयास पाहिजे. सुधारणेच्या कायद्यापूर्वी अशी व्यापक वाटाघाट झाली होती; त्याच मार्गाचें अवलंबन आतांही होणें जरूर आहे. मात्र या वेळीं संस्थानी प्रजेचें मत अजमावलें पाहिजे, नुसत्या संस्थानिकांचें मत घेऊन चालणार नाहीं. संस्थानी प्रजेला आतां वाचा फुटली आहे. आपल्या हक्कांची जाणीव झाली आहे. स्वयंनिर्णयाची कल्पना प्रादुर्भूत झाली आहे व ब्रिटिश इंडियांतलि प्रजेप्रमाणें आपल्याला राज्यकारभारांत हिस्सा असावा, तो आपल्या संमतीनें चालावा, तो आपल्यामार्फत चालावा व तो आपल्याकरतां चालावा असें ते म्हणत आहेत. तेव्हां त्यांचें मत धाब्यावर ठेऊन संस्थानांबाबत केलेला कोणताही निर्णय उपयोगी होणार नाहीं व त्यापासून कोणतीही फलनिष्पत्ति होणार नाहीं.

# समारोप.

शेवटीं संस्थानी प्रजेस एकच विनंति करावयाची आहे. त्यांचा उद्धार होणें **त्यांचेच** हातीं आहे. प्रत्येक संस्थानांत संघटित रीतीनें चळवळ सुरू झाली पाहिजे व समवायानेंही ती चालू ठेवली पाहिजे. या चळवळीला व्यापक स्वरूप प्राप्त होऊन ती अखिलभारतीय होईल तेव्हांच तिचा जोम अनुभवास येणार आहे. व यानंतर या चळवळीचें ब्रिटिश इंडियांतील चाललेल्या स्वराज्याच्या चळवळीशीं सहकार्य घडवून आणणें भाग आहे; म्हणजेच या उदयोन्मुख राष्ट्राच्या अंतिम विकासामध्यें अभिमानाची जागा देशी संस्थानांस मिळणार आहे. हें काम पुष्कळ श्रमाचें व स्वार्थत्यागाचें आहे. चळवळीच्या बाबतींत सोसावे लागणारे हाल व अपेष्टा ब्रिटिश इंडियापेक्षां संस्थानांमध्यें **अपरिमित** आहेत. ब्रिटिश इंडियांतील जुलुमाला कांहीं मर्यादा आहे, तेथें कायद्याचें राज्य आहे. संस्थानांत त्यांचा मागमूसही नाहीं. वाटेल त्या मनुष्याला तुरुंगांत खितपत ठेवणें, वाटेल त्याची मालमत्ता सरकारजमा करणें व घरादारावरून नांगर फिरविणें या गोष्टी संस्थानांत बिनदिक्कतपणें होत आहेत व त्याही पोलिटिकल अधिकाऱ्यांच्या नजरेसमोर होत आहेत. ब्रिटिश इंडियांत जुलूम झाल्यास वर्तमानपत्रांतून जोराची चळवळ होते, सभेंतून अशा कृत्यांचा निषेध होतो, कायदेमंडळांतून व पार्लमेंटांत सरकारची पाठ पुरवितां येते व सरकारच्या जुलुमास बळी पडलेल्या व्यक्तीबद्दल सार्वजनिक सहानुभूतीचा तरी ओलावा असतो. संस्थानांत यांपैकीं एकाही गोष्टीची अनुकूलता नाहीं. वर्तमानपत्राची चळवळ नाहीं. सभांतून निषेध प्रगट करणेची मुभा नाहीं. सरकारला उघडपणें जाबसाल विचारण्याचीं कायदेमंडळें अगर पार्लमेन्टें नाहींत, इतकेंच नव्हे तर लोकांच्या सहानुभूतीचीही जोड नाहीं. ज्या लोकांवरील अन्यायाकरितां खटपट करावी ते सुद्धां आपलें दुःख वेशीवर टांगण्यास किंवा त्याचा उघड स्फोट करण्यास **तयार नाहींत.** अनियंत्रित राजसत्तेचा हा दुष्परिणाम आहे. "जबरदस्त मारे और रोने भी न दे" अशी संस्थानी प्रजेची स्थिति आहे, तेव्हां चळवळीचें कार्य किती दुस्तर आहे. हें समजणार आहे; परंतु तें चिकाटीनें, धैर्यानें, स्वार्थत्यागानें व सनदशीर मार्गानें चालविलें पाहिजे. आमचे भोरकर बंधू यांनीं हिंमतीनें, कष्टानें व स्वार्थत्यागानें जी चळवळ चालविली आहे, त्याबद्दल त्यांचें अभिनंदन

करणें अत्यंत अवश्यक आहे. अर्थात त्यांच्या चळवळीस श्रीमंत पंतसाहेबांच्या दूरदर्शित्वानें, सहानुभूतीनें व प्रजावात्सल्यानें यश आलें आहे हें नमूद करण्यास मला आनंद होत आहे. श्रीमंतांचें हें उदार धोरण प्रत्येक संस्थानिकानें अनुकरण करण्यासारखें आहे. वस्तुतः देशी संस्थानिक व त्यांची प्रजा यांच्यांत सलोखा न राहण्यास कोणतेंच कारण नाहीं. ते एकाच हाडामांसाचे, संस्कृतीचे व परंपरेचे अवशेष आहेत. देशी संस्थानिक व प्रजा यांचेमध्यें कोणताही बलवत्तर विरोधाचा भाग नाहीं. परकीयांच्या हितसंबंधाची जी अडचण पदोपदीं राज्यकर्ते व प्रजाजन यांचेमध्यें ब्रिटिश इंडियांत आढळून येते तशी स्थिति संस्थानांत मुळींच नाहीं. विरोधाचा प्रसंग एक खासगी खर्चाच्या बाबतींतच असतो. ही रक्कम एकदां तडजोडीनें, सलोख्यानें व समंजसपणानें ठरविल्यानंतर संस्थानिक व त्यांचे प्रजाजन यांत मतभेद मुळींच होणार नाहीं; व राज्यकारभार प्रजेच्या हिताप्रमाणें होण्यास यत्किंचितही वेळ लागणार नाहीं. परंतु हें रहस्य संस्थानिकांच्या लक्षांत येईल तो सुदिन होय. स्वकीय प्रजेला परकीय मानून परकीय पोलिटिकल अधिकाऱ्यांना सुप्रसन्न करण्यांत पुष्कळ संस्थानिक चूर झाले आहेत. बिचाऱ्यांचा अमूप पैसा या कामीं खर्च होतो. रात्रंदिवस जाचणी असते. शिवाय प्रजेचा असंतोष, स्वतःच्या नोकरवर्गाची कुरकुर व सदसद्विवेक बुद्धीची टोंचणी मागें लागल्यामुळें पोलिटिकल अधिकाऱ्यांना सुप्रसन्न करणाऱ्या कष्टमय प्रयत्नांत त्यांचा जीव हैराण होतो; मानसिक सुखाचा भंग होऊन ऐश्वर्याचा लाभही सुखासमाधानानें त्यांस घेतां येत नाहीं. यापेक्षां मृगजलाप्रमाणें पोलिटिकल अधिकाऱ्यांच्या सावलीमागें धांवत न जातां स्वतःच्या प्रजेस सहानुभूतीनें व विश्वासानें ते वागवितील तर त्यांना कशाचेंही भय नाहीं. प्रजेचें पाठबळ त्यांना मिळेल. पोलिटिकल अधिकाऱ्यांची पर्वा बाळगण्याचें कारण नाहीं. स्वाभिमानानें व निर्धोकपणानें राज्यकारभार करून दैववशात् प्राप्त झालेल्या थोर पदवीचा संपूर्ण फायदा त्यांस अनुभवतां येईल. पण हें सर्व या आत्मप्रत्ययावरच अवलंबून आहे. आत्मोन्नति ज्याप्रमाणें व्यक्तीच्या उन्नतीवर अवलंबून आहे त्याचप्रमाणें संस्थानिकांना आपल्या व आपल्या प्रजेच्या तादात्म्याची भावना प्रत्ययास आल्यास त्यांची उन्नति अबाधितपणें होणार आहे. परमेश्वर ही जागृति त्यांच्यांत उत्पन्न करो एवढीच प्रार्थना करून मी आपली रजा घेतों.

---

# दक्षिणी संस्थान प्रजापरिषद्.

## कांहीं महत्त्वाच्या ठरावांवरील भाषणांचा सारांश व अध्यक्षांचा समारोप.

### परिषदेंत पास झालेले ठराव.

### खासगी शिक्षणसंस्थांची बंदी.

**ठराव ८ वाः—** निजामसाहेबांचे राज्यांत प्रजेच्या हक्काची पायमल्ली होत आहे. हिंदु संस्कृति, हिंदुधर्म, हिंदुभाषा वगैरे सर्वांचा नाश होण्याचा प्रसंग ओढवला आहे. उदाहरणार्थः — ९/१० प्रजा हिंदु असून सर्व शिक्षण उर्दूत, दरबारची भाषा उर्दु, सर्व अधिकारी मुसलमान अशा स्थितींतही लोकांनीं खासगी शाळा काढून आपलें स्वत्व कायम ठेवलें होतें. अलीकडे निजामसरकारांनीं खासगी शाळा बंद केल्या आहेत, बहुतेक प्रजा हिंदु असल्यामुळें खासगी शाळा हिंदूंच्याच असणार व खासगी शाळांतून शिक्षण हिंदूंना योग्य असें देशी भाषेंत मिळणारें आहे. तें त्यांनीं काढलेल्या हुकुमानें बुडणार आहे. सबब हा हुकूम रद्द करावा अशी निजामसाहेबांस या परिषदेची विनंति आहे.

**ठराव ९ वाः—** स्वायत्त वसाहतीचा दर्जा हिंदुस्थानास प्राप्त करून देण्याबद्दल जे प्रयत्न सुरू आहेत त्या भावी स्वराज्याच्या कक्षेंत संस्थानिकांचा दर्जा कोठें व कशा प्रकारचा राहणार आहे, संस्थानिकांवर कोणती जबाबदारी पडावयाची आहे, संस्थानिकांनीं कसें वागलें पाहिजे, संस्थानिकांच्या हक्कांचें संरक्षण कसें करावें, संस्थानी प्रजेला कोणते हक्क दिले पाहिजेत, संस्थानांत कोणती राज्यपद्धति प्रचलित असावी व भावी स्वराज्यप्राप्तीच्या कामांत संस्थानिक व संस्थानी प्रजा यांनीं कोणत्या प्रकारांनीं सहकार्य करावें या प्रश्नाची छाननी करण्याकरितां व या बाबतींतील मुग्धपणा सोडून देऊन या संबंधीं राजकारणास मूर्त स्वरूप देण्याकरितां एक **रॉयल कमिशन** नेमण्यांत यावें अशी या परिषदेची साम्राज्य सरकारास विनंति आहे.

**ठराव ११ वा**:– लॉर्ड रीडिंग यांनीं वऱ्हाडचे बाबतींत जें अखेरचें उत्तर निजामसाहेबांस पाठविलें आहे त्यांतः——

( १ ) ब्रिटिश सरकार हें सार्वभौम आहे.

( २ ) हिंदुस्थानांतील सर्व संस्थानिक मांडलिक आहेत.

( ३ ) संस्थानी प्रजेच्या हितास भयप्रद व अनिष्टपणाचा धोका संस्थानिकांचे कृत्यानें येण्याचा संभव असेल त्या ठिकाणीं 'सार्वभौम सरकार' या नात्यानें, संस्थानचे अंतर्गत राज्यव्यवस्थेंत हात घालण्याचा व उपाय योजण्याचा ब्रिटिश सरकारास हक्क आहे.

या तीन तत्त्वांचा पुनरुच्चार जाहीर रीतीनें केला आहे. त्यास अनुसरून ब्रिटिश सरकारनें या हक्काच्या अनुषंगानें उत्पन्न होणाऱ्या जबाबदाऱ्या पुऱ्या करण्याकरितां खालील गोष्टी जरूर कराव्यात अशी या परिषदेची नम्र विनंति आहे.

( १ ) सन १९१७ सालीं जो बादशाही जाहीरनामा प्रसिद्ध करण्यांत आला आहे त्यांत नमूद केलेलें धोरण हिंदुस्थानांतील सर्व संस्थानांत लागू केल्याचें जाहीर करावें.

( २ ) संस्थानांचें नियंत्रण फॉरेन व पोलिटिकल खात्याकडून हल्लीं होत असतें; पोलिटिकल खातें, फॉरेन खात्यापासून अलग करून तें खातें होम मेंबरच्या ( गृहमंत्र्याच्या ) देखरेखीखालीं ठेवण्यांत यावें.

( ३ ) हल्लींच्या मध्यवर्ती कायदेमंडळाच्या कामकाजाचा नियम २३ ( १ ) व नियम ८ यांत फरक करून त्या कलमांत नमूद असलेल्या गोष्टींचा ऊहापोह कायदेमंडळांत करण्याची सवलत ठेवण्यांत यावी.

( ४ ) संस्थानिक व ब्रिटिश इंडिया या दोहोंच्या समाईक हितसंबंधाचे प्रश्न म्हणजे जकाती, अफू, दारू, भांग वगैरे एक्साईजखातें, पोस्ट व तारायंत्र खातें, आगगाडया वगैरे खातें व चलन इत्यादि करांच्या बाबी या प्रश्नांसंबंधीं संस्थानांच्या हितसंबंधाचें रक्षण करण्याकरितां एक संस्था जरूर निर्माण करण्यांत यावी व तिच्या शिफारशीप्रमाणें समाईक हिताच्या प्रश्नांचा निकाल करावा.

**ठराव १२ वा**:– लॉर्ड रीडिंग यांनीं सार्वभौम सरकारचा, संस्थानी प्रजेच्या हितासाठीं संस्थानिकांचे अंतर्गत कारभारांत हात घालण्याचा जो हक्क

पुनरुच्चारानें, स्पष्टपणें व जोरदार रीतीनें जाहीर केला त्याकडे लक्ष देऊन संस्थानिकांनीं ब्रिटिश सरकारास या हक्काचा उपयोग करण्याची पाळी आपल्या वर्तनानें आणूं देऊं नये अशी या संस्थानिकांस आग्रहाची विनंति आहे. संस्थानिकांनीं आपल्या प्रजेस जबाबदार राज्यपद्धतीचा लाभ दिला व स्वतः नियंत्रित शास्ते ( constitutional rulers ) याप्रमाणें त्यांनीं आपलें वर्तन ठेवल्यास सार्वभौम सरकारास संस्थानिकांच्या अंतर्गत कारभारांत हात घालण्यास मुळींच अवसर राहणार नाहीं असा परिषदेस भरंवसा वाटत आहे.

**ठराव १३ वाः–** ( अ ) निजामसरकारांनीं आपल्या राज्यांत कायदे कौन्सिलची सुधारणा व प्रजेला मताधिकार देऊन लोकमतानुवर्ती जबाबदार राज्यपद्धति अमलांत आणण्यासंबंधीं ५ वर्षांपूर्वी जो फर्मान काढला होता त्याप्रमाणें व हैद्राबाद राजकीय सुधारणासंघांनीं सुधारणेची योजना सादर केलेली लक्षांत घेऊन शक्य तितक्या लवकर कायदे कौन्सिलची सुधारणा करावी अशी या परिषदेची निजामसाहेबांना विनंति आहे.

( ब ) निझाम सरकारांनीं आपल्या संस्थानांतील सभाबंदीचें फर्मान रद्द करून प्रजेला राजकीय सभा व परिषद भरविण्याची मोकळीक द्यावी आणि वर्तमानपत्रांवरील बंदी काढून टाकावी अशी या परिषदेची विनंति आहे.

( क ) निजामसरकारच्या **नजराणा** न घेण्याच्या बाबत काढलेल्या फर्मानाप्रमाणें सर्वत्र अंमलबजावणी व्हावी व संस्थानच्या प्रजेस निष्कारण या बाबतींत भूर्दंड पडूं नये अशी निजामसाहेबांनीं तजवीज करावी अशी या परिषदेची विनंति आहे. या प्रघातामुळें प्रजेवर अधिकारी वर्गाचा जो जुलूम होत आहे तो लक्षांत घेतां यापुढें निजामसरकारांनीं हें चालूं देणें इष्ट नाहीं.

**ठराव १४ वाः–** कोल्हापूर संस्थानांत घोड्याचे शर्यतीचे बाबतींत फार पैसा खर्चला जात आहे तर या शर्यती ग्वालेर दरबाराप्रमाणें बंद करण्याची श्री. महाराज साहेबांस या परिषदेची विनंति आहे.

**ठराव १५ वाः–** औंध संस्थानाधिपतींनीं आपल्या रयतेस बजेट पास करण्याचा अधिकार पूर्वींच दिला होता. या वर्षापासून कायदे करण्याचा अधिकार रयतसभेस दिला आहे व या रीतीनें जबाबदारीच्या स्वराज्याच्या मार्गावर पहिलें पाऊल टाकून इतर संस्थानिकांस अनुकरणीय असें उदाह-

रण घालून दिलें आहे, याबद्दल ही परिषद या **चीफ**साहेबांचें अभिनंदन करून महाराष्ट्रीय सर्व संस्थानिकांनींही आपापल्या रयतेस हे अधिकार द्यावेत अशी त्यांस विनंति करिते.

**ठराव १६ वाः–** हिंदुस्थानांतील सर्व संस्थानांच्या प्रजेच्या गाऱ्हाण्यांच्या प्रश्नांचा काँग्रेस व लिबरल फेडरेशन वगैरे संस्थांच्या कार्यक्रमांत समावेश करणेबद्दल या संस्थांच्या चालकांस या परिषदेची विनंति आहे.

**ठराव १७ वाः–** संस्थानी प्रजाजनांस ब्रिटिश इंडियामध्यें सन १८६४ च्या तिसऱ्या कायद्याअन्वयें '**परकीय**' ( foreigner ) मानण्यांत आलें आहे. परंतु संस्थानी प्रजेस सार्वभौम सरकार व संस्थानिक यांस **राजनिष्ठ** ( allegiance ) असावें लागतें व हिंदुस्थानाबाहेर 'ब्रिटिश प्रजाजन' या व्याख्येंत त्यांचा समावेश करण्यांत येतो. या गोष्टीकडे लक्ष देऊन सन १८६४ चा तिसरा कायदा दुरुस्त करून हिंदुस्थान सरकारनें ब्रिटिशराज्याच्या सार्वभौमत्वाखालीं असणाऱ्या संस्थानी प्रजेस 'परकीय' असें समजण्यांत येऊं नये असा कायदा शक्य तितक्या लवकर करावा अशी या परिषदेची विनंति आहे व ब्रिटिश हिंदुस्थानांतील पुढाऱ्यांनींही या बाबतींत साहाय्य करून मध्यवर्ती कायदेमंडळांत सन १८६४ च्या तिसऱ्या कायद्यांतील 'प्रजाजन' या शब्दाच्या व्याख्येची दुरुस्ती करण्याचें बिल आणावें अशीही या परिषदेची त्यांस आग्रहाची विनंति आहे.

**ठराव १८ वाः–** ( **अ** ) ब्रिटिश इंडियांतील लोकांचें मत कौन्सिल ऑफ स्टेट व लेजिस्लेटिव्ह असेंब्ली या मार्गानें अजमावण्यांत येतें. संस्थानिकांचे बाबतींत नरेंद्रमंडळ उत्पन्न केलें आहे. परंतु ठराव नं. ११ पैकीं कलम ४ यांत नमूद केलेले **कर** अप्रत्यक्षपणें संस्थानी प्रजेवर पडत असल्यामुळें संस्थानी प्रजेचें मत समजून घेण्याकरितां संस्थानी प्रजेच्या प्रतिनिधींचें एक मंडळ स्थापणेंत यावें.

( **ब** ) ठराव ११ च्या कलम ४ यांत नमूद केलेल्या संस्थेंतही कौन्सिल ऑफ स्टेट, असेंब्ली, नरेंद्रमंडळ व संस्थानी प्रजाप्रतिनिधिमंडळ यांचे प्रतिनिधी असावेत.

## ठरावावरील भाषणें.

**ठराव ८ वा:— श्री. राघवेंद्र शर्मा** यांनीं ८ वा ठराव परिषदेपुढें मांडला. तो मांडतांना ते म्हणले, "आपण वर्तमानपत्रांतून रोज निजामसाहेबांच्याबद्दल पुष्कळ चित्रविचित्र गोष्टी वाचीत असतों. त्या वाचल्या म्हणजे आपणांस काय वाटतें याची कल्पना प्रत्येकाला येत आहे. आज हें फर्मान काढलें, उद्यां तें फर्मान काढलें; आज अशी हिंदूंचे हक्कांची पायमल्ली केली तर उद्यां खासगी शाळा बंद केल्या; आज या संस्थानिकाची जहागिर घेतली तर उद्यां अशाच प्रकारची एक जुलुमाची दुसरी कहाणी ऐकावयास मिळाली. अशा प्रकारच्या चमत्कारिक बातम्या ऐकिल्या म्हणजे निजामसाहेब हे एक विचित्र तऱ्हेचे गृहस्थ आहेत अशी भावना वाचकांची सहजीं होणार. माझ्या स्वतःच्या अनुभवावरून मी आपणांस असें खात्रीलायक सांगूं शकतों कीं निजाम-साहेबांनीं सर्व कायदेकानू वगैरे धाब्यावर बसाविले आहेत. त्या राज्यांत लांच-लुचपत दिल्याशिवाय बहुतेक कोणतेंही काम निघावयाचें नाहीं. रेव्हिन्यू जुडि-शिअल खात्यांतील लोकांनीं 'प्रजेला सळो का पळो' करून सोडलें आहे. लांचलुचपतीस ऊत आला. हायकोर्टांत देखील अशाच प्रकार ऐकण्यांत येतो. लांचलुचपतीची मजल एथपर्यंत गेली कीं शेवटीं प्रत्यक्ष निझामसाहेबांना **फर्मान** काढणें भाग पडलें. ही स्थिति स्पृहणीय आहे का याचा तुम्हीच विचार करा. निजामच्या राज्यांत आपल्या कामाची व्यवस्था लावून घेण्याचें असेल तर अगोदर आपली पिशवी सैल सोडावी लागते. एवंच हा सर्व पैशाचा खेळ झाला आहे. इस्सेभी ज्यादा प्रकार पुढेंच आहे. परवां मद्रास हायकोर्टांत तेथील चीफ जस्टिसनीं जो प्रकार चव्हाट्यावर आणला तो आपल्यास माहीत आहेच. त्या खटल्यांतील हकीकतही मनोरंजक आहे. जी गोष्ट कायद्यानें मुदतीबाहेर गेली आहे तीच गोष्ट मुदतींत आहे कीं नाहीं वगैरेकडे न पाहतां मन मानेल तसें फर्मान काढून कायद्याचे कक्षेंत आणतां येतें हें निजाम साहेबांनीं सिद्ध करून दिलें आहे. परंतु मद्रासला हें निजामसाहेबांचें फर्मान कसें मानलें जाणार ? तें पडलें ब्रिटिश राज्य; तेव्हां तेथील हायकोर्ट जज्जांनीं अर्थात त्यांच्या डिक्रीला मान दिला नाहीं व शेवटीं ते म्हणाले, 'निजामसाहेबांसारखें फर्मान मला काढतां येत नाहीं व त्यांच्या संस्थानचा मी रहिवासी नाहीं याबद्दल मी

आपल्यास धन्य समजतों.' न्यायदानाचा मासला आपल्या नजरेस आणला आहे. हिंदूंवर कोणत्या प्रकारचा जुलूम केला जातो याची कल्पना सुद्धां करवत नाहीं. याचें प्रत्यक्ष उदाहरण म्हणजे **गुलबर्ग्याचा दंगा** ! तेथील ४०।५० हिंदु देवालयांचा विध्वंस झाला; त्याबद्दल कमिशन बसलें; कमिशननें ही स्थिति खरी असल्याबद्दल अभिप्राय दिला; तरी या रिपोर्टाप्रमाणें हिंदूंची कांहीं सोय न लावतां उलट त्यांचाच अपमान झाला व तो रिपोर्ट केराच्या टोपलींत धूळ खात बसला व त्यांतील आरोपी सर्व **निर्दोषी** म्हणून सुटून गेले ! संस्थानी प्रजेचे हातांत राजाला काढून टाकण्याची सत्ता नाहीं; पण जुलमी राजा नको अशी मात्र एकमुखानें वरिष्ठ सरकारकडे मागणी करण्याचा स्वायत्त अधिकार प्रजेला आहे; तो मात्र कोणी काढून घेतला नाहीं. बीड येथील कंकालेश्वराच्या उत्सवाचीही अशीच स्थिति आहे. हिंदूंचे **दसरा, गणपतीउत्सव** वगैरेसारखे सार्वजनिक उत्सवसुद्धां करण्यास निरनिराळें बंधन असतें; अशा स्थितींत हिंदूंची स्थिति कोणच्या प्रकारची आहे व त्यांना काय वाटत असेल याची तुम्हीच कल्पना करा. मनुष्यास वित्त व अब्रू हीं अगदीं प्रिय आहेत; पण त्यांचा सुद्धां येथें स्वाहाकार होत आहे. तेव्हां सर्व विचारी माणसांचीं मनें चिडून जाणें साहजिक आहे. शुद्धीसंबंधानें एक अक्षरसुद्धां काढूं देत नाहींत. गुलबुर्ग्यास बॅ. **जयकर** यांचे अध्यक्षतेखालीं सामाजिक परिषद् भरली होती तेथें हीच अट घालण्यांत आली होती. **अवशाच्या** दुर्वं तालुकदारानें जो अत्याचार केल्याचें ऐकण्यांत आलें तो तर अगदीं भयंकर स्वरूपाचा आहे. हे तालुकदार अर्थातच मुसलमान ! ते तालुक्यांत फिरतीवर निघाले. त्यांच्या मुक्कामाच्या वेळीं त्यांना दुधाची गरज लागली तेव्हां त्यांना कोठें गायीचें दूध मिळालें नाहीं. एका सोनाराचे घरीं त्यांच्या हस्तकास गाय मिळाली. त्यांनीं लगेच ती गाय सोडून आणली. गाय सोनाराच्या बायकोशिवाय कोणास धार काढूं देत नसे म्हणून त्याला त्याचे बायकोस आणण्यास सांगितलें; त्यानें ही गोष्ट नाकबूल केली. पण, धाकदपटशा दाखविल्यावर तो कबूल झाला. नंतर तिनें धार काढून दिली. इतक्यांत एक चमत्कार झाला. सोनाराची बायको जराशी बरी होती तेव्हां तालुकदाराची दृष्टि तिचेवर गेली. झालें, लगेच त्या सोनारास आमचा मुक्काम असेपर्यंत तुझी बायको धार काढण्यास येथें ठेव असें सांगण्यांत आलें. शेवटीं दुर्दैवाची गोष्ट म्हणजे त्यांनीं तिला धर्मभ्रष्ट

करून आपली बेगम करून घेतली. सोनाराची गाय गेली, दूध गेलें व शेवटीं बायकोही गेली. अशा स्थितींत त्यास काय वाटलें असेल याची तुम्ही कल्पना करा. असो, परभणी जिल्ह्यांतील फकीराची गोष्ट याहून विचित्र आहे. त्यास एकदां १२ वर्षांनीं लहर आली आणि आपल्यास दोन मुली असल्याचें वाटलें. झालें, मग काय विचारतां ? युक्तीला काय कमी आहे ? त्यानें लगेच पोलिस सुपरिंटेंडेंटकडे अर्ज केला कीं, माझ्या मुली अमूक एका हिंदु गृहस्थाकडे आहेत. तो आमच्या मुलींना परत पाठवीत नाहीं. झालें; हिंदूकडे मुली आहेत मग काय विचारतां ! सर्वत्र मुसलमानी खातें. लगेच त्या मनुष्यास पकडून आणून वदविण्यांत आलें कीं या मुली आपल्या नव्हत, फकीराच्या आहेत. परंतु कलेक्टराला ही गोष्ट पटली नाहीं. त्यांत याच फकीरानें आपल्यास मुली वगैरे कोणीही नाहीं अशा अर्थाचा एक पूर्वीं जबाब दिला होता वगैरे सर्व हकीकत ऐकिल्यावर आणि त्या मुलीचे बापानें झालेल्या सर्व गोष्टी कळविल्यावर त्या फकीराचा अर्ज काढून टाकण्यांत आला आणि त्यास दिवाणामार्गें इलाज करून घेण्यास सांगितलें. असो. अशा प्रकारच्या पुष्कळ गोष्टी आहेत. त्या सांगून मी आपला अमोलिक वेळ घेऊं इच्छित नाहीं. अलीकडे **खासगी शाळा** बंद करण्याचा जो हुकूम निघाला आहे तोही अशाच प्रकारचा आहे. हेंही आतां आपल्या लक्षांत आलेंच असेल. या सर्व गोष्टींचा प्रतिकार करणें इष्ट आहे. हैद्राबादेस या हुकमाविरुद्ध सभा भरून त्याचा निषेध करण्यांत आला. आमच्या राज्यांत नांवाला एक लेजिस्लेटिव्ह कौन्सिल आहे. त्या कौन्सिलनें कांहीं हा कायदा पास केला नाहीं. डायरेक्टरचा हा हुकूम आहे. तें गव्हर्मेंट ऑर्डर म्हणूनच प्रसिद्ध केलें आहे; तेव्हां तें कायदेशीर होऊं शकत नाहीं असें माझें मत आहे; परंतु मोंगलाई पडली, कायदेशीर व बेकायदेशीर कोण विचारतो ! फर्मान निघालें कीं, अंमल झालाच सुरू. अशा तऱ्हेचें फर्मान रद्द करण्यांत यावें अशाबद्दलची ही सूचना मांडली आहे. वरील सर्व हकीकत आपण ऐकिली आहेच, तेव्हां आपण या सूचनेस पाठिंबा द्याल अशी खात्री आहे."

वरील आशयाचें भाषण झाल्यानंतर मध्येंच एका गृहस्थांनीं निजामसाहेबांचा अधिकार कांहीं वर्षे सस्पिंड करण्यांत यावा अशी उपसूचना केली. लोकांनीं टाळ्यांच्या कडकडाटांत आपली संमति दर्शविली. परंतु अध्यक्षांनीं परिषदेपुढें सदर प्रश्न आज नाहीं असें सांगितलें.

मि. राघवेंद्रराव शर्मा यांच्या सूचनेस मि. गिरिराव अण्णा यांनीं अनुमोदन दिलें. अनुमोदन देतांना ते म्हणाले कीं, 'मी गुलबुर्ग्यास एका खासगी शाळेचा चालक आहें; हल्लीं वयाचे मानानें काम होत नाहीं म्हणून नुसता सभासद म्हणून आहें; आज १५ वर्षें मीं त्या संस्थेंत काम केलें आहे. आतां या फर्मानाचा अंमल आमचे शाळेवर होणार हें ऐकून मला अत्यंत वाईट वाटलें.' ज्या संस्थेंत मीं आज १५ वर्षें काम केलें ती संस्था या फर्मानानें बंद होणार हें पाहून फारच वाईट वाटतें. पण करावयाचें काय हेंच सुचत नाहीं. ज्यांनीं हें फर्मान काढलें त्याच अधिकाऱ्यांना, 'हें रद्द करा' म्हणून म्हणावयाचें, तेव्हां आशा वाटत नाहीं. असो. 'रद्द करा' म्हणून मागणी करावी असें सूचनेमध्यें आहे तेव्हां निव्वळ आशावाद पतकरून मीही हें फर्मान रद्द केलें जावें असें म्हणतों.' रा. गिरीराव अण्णानीं नॉर्टन बॅरिस्टर एका खुनाचे खटल्यांत आल्यावेळीं कोर्टांत काय मजा झाली वगैरे गोष्टींची हकीकत सांगितली. तिचें त्यांनीं मोठ्या विनोदपूर्ण भाषेंत वर्णन केलें. असो. रा. गिरीराव अण्णांनीं आपलें अनुमोदन वरील शब्दांत दिलें. तसेंच या ठरावास पुण्याचे रा. काशिनाथ ठकूजी जाधव यांनींही अनुमोदन देतांना ते म्हणाले, 'जर आपल्यास हिंदुत्व कायम राखावयाचें असेल तर हा ठराव तुम्ही पास करा. आहे ही स्थिति अशी आहे, तेव्हां आपण सर्वांनीं या सूचनेस जोरानें पाठिंबा देऊन हा ठराव पास करावा अशी सर्वांना विनंति आहे.' सदर ठराव टाळ्यांच्या प्रचंड गजरांत पास झाला.

## रॉयल कमिशन.

**ठराव १० वाः**—हा ठराव रा. तात्यासाहेब **केळकर** यांनीं सभेपुढें मांडला. तो मांडतांना ते म्हणाले कीं, 'भावी स्वराज्यप्राप्तीच्या कामांत संस्थानिक व संस्थानी प्रजा यांनीं कोणत्या प्रकारें सहाय्य करावें या प्रश्नाची छाननी करण्याकरितां मुग्धपणा सोडून राजकारणास मूर्त स्वरूप देण्याकरितां एक रॉयल कमिशन नेमण्यांत यावें अशी आपण मागणी या ठरावांत करीत आहों. आपल्या अध्यक्षांनीं ही गोष्ट पुढें आपल्या भाषणांत मांडली आहे ती सर्वथैव बरोबर आहे. हल्लींचें राजकारण अगदीं अमूर्त स्वरूपाचें आहे, तेव्हां त्याला मूर्त स्वरूप देणें पास आहे. आम्हांला स्वराज्य पाहिजे, तें कसा प्रकारचें पाहिजे

आहे असें कोणीं विचारल्यास बाबा अमुक अमुक प्रकारचें तें असावें असें सांगतां आलें पाहिजे. त्याचेंच गमक हल्लींचें Commonwealth of India बिल आहे. मिसेस बेझंटबाईचें हें बिल आहे. मिसेस बेझंटबाईचें हें बिल अशाच प्रकारचें आहे. तें सर्वस्वी मान्य होण्यासारखें आहे असें नाहीं. परंतु कांहीं तरी मूर्त स्वरूपाची कल्पना येण्यास तें साधन आहे. एकाद्यास घर बांधावयाचें झालें तर मालकानें नकाशा वगैरे काढून दिला पाहिजे तरच कॉंट्रॅक्टर त्याप्रमाणें घर बांधूं लागेल. त्यामध्यें पुढें फरक झाला तरी हरकत नाहीं; परंतु ज्या ठिकाणीं घर अमुक तऱ्हेनें बांधावयाचें याचीच कल्पना नाहीं तर घर कसें बांधता येईल? कांहीं तरी चित्रपट पाहिजे. विरही मनुष्य सुद्धां आपल्यास काय पाहिजे याचा चित्रपट काढतो. भूषणें वस्त्रें यांचा त्याग करतो, पण मनोमय सृष्टींतील उद्दिष्टाचें चित्रलेखन तो आपल्या समजुतीनें करतो, हें मात्र आपण विसरून चालावयाचें नाहीं. माझ्या म्हणण्याचा आशय हा आहे कीं, जी गोष्ट हल्लीं निर्गुण स्वरूपांत आहे तिला सगुणत्व द्या. निव्वळ माया व ब्रह्म या भाषेंत न बोलतां अमुक माया व अमुक ब्रह्म अशा निश्चित स्वरूपांत सांगा. निश्चित स्वरूपांत जरी सांगतां आलें नाहीं तरी कांहीं तरी पुढील विचारास चालन मिळेल असें करा. संस्थानिकांनींही रॉयल कमिशनची मागणी केली आहे, आम्हीही करीत आहों. त्यांची मागणी कोणचे कारणाकरितां आहे हें आपणास माहीत आहे. आपण कांहीं कारणाकरितां करीत आहों; पण हें "कांहीं" काय आहे हें मात्र समजून घेतलें पाहिजे. भाकरी ही भाजली पाहिजे. ती भाजल्यानंतर दोन तोंडांनीं खावूं. आपली आगबोट समुद्रांतून सुरक्षित नेली पाहिजे. तेव्हां समुद्रांत असलेल्या खडकांचा व बेटांचा नकाशा काढणें जरूर आहे. तसें जर झालें नाहीं तर आपली आगबोट एकाद्या खडकावर अगर बेटावर आदळून फूटून मात्र जावयाची. तेव्हां रॉयल कमिशन कोणत्या कार्याकरितां पाहिजे हें ठरवितांना आपल्यास हिंदुस्थानांतील ७०० बेटांचा विचार करणें प्राप्त आहे. याचा विचार केला नाहीं तर आगबोटीचीं शकलें उडून जातील. कांहीं बॅसिला उजेडांत वाढून घाणीचा नाश करतात. व कांहीं घाणींत राहून घाणीचा नाश करतात. परंतु पोलिटिकल डिपार्टमेंट घाण वाढवून ठेवितें. तेव्हां ही वस्तुस्थिति इतःपर न टेकतां उजेडांत सर्व प्रकार झाला

पाहिजे; तरच बरें. " यतो वाचो निवर्तते अप्राप्य मनसासह," अशा प्रकारच्या स्वरूपांत जें आहे तें मूर्त स्वरूपांत आणावयाचें आहे. हिंदुस्थान एक देश आहे तेव्हां त्याच्या कल्याणाची गोष्ट घडवून आणली पाहिजे, म्हणून ही मागणी केली पाहिजे. संस्थानें पूर्वीच्या वैभवाची खूण म्हणून ठेवण्यांत भूषण आहे व तीं रहावींत अशा विचाराचा मी आहें. इटालींत जेव्हां क्रांति झाली तेव्हां अशाच एका संस्थानानें मदत करून इटलीस स्वतंत्रता प्राप्त करून दिली. न जाणो ईश्वराचे मनांत आल्यास या ७०० संस्थानिकांपैकीं एखादा तरी आपल्यास मदत करून स्वतंत्रता मिळवून देईल असें मला वाटतें. म्हणूनच तीं ठेवावींत असें माझें मत आहे, तर जरूर या प्रश्नाचा विचार करावा अशी माझी सूचना आहे.' या सूचनेस अनुमोदन रा. माधव व्यंकटेश लेले यांनीं दिलें व तो ठराव पास झाला.

## लॉर्ड रेडिंग यांचीं तत्त्वें.

**ठराव नं. ११** वा:--- हा ठराव रा. रा. **बाबूराव गोखले** संपादक 'मराठा' यांनीं मांडला. तो मांडतांना ते म्हणाले कीं, इंग्रजींत अशी एक म्हण आहे कीं, वाईटांतून चांगलें निघतें त्याचप्रमाणें **वऱ्हाडचे** बाबतींत दिसून आलें. निजामसाहेबांनीं वऱ्हाड परत मागितला. तेव्हां सरकार या प्रश्नांचा निकाल कसा लावतें याकडे सर्वांचें लक्ष वेधलें. महाराष्ट्राचें लक्ष तर सारखें वेधून गेलें होतें. कर्झननें धाकदपटशा दाखवून हा वऱ्हाडचा तुकडा कायमपट्ट्यानें सरकारकडे घेतला होता. हल्लीं निजामसाहेबांनीं आपला प्रांत आपल्यास मिळावा म्हणून सरकारकडे जोराची मागणी केली होती. वऱ्हाडचे बाबतींत अन्याय झाला आहे, तो आमचा आम्हांस परत मिळणें न्याय्य आहे अशी ती मागणी होती. या मागणीस तितक्याच जोराची थप्पड लॉर्ड रेडिंगकडून मिळाली. जातां जातां हा शेवटचा तडाखा त्यांनीं दिला आणि निजामसाहेबांस या बाबतींत नकारात्मक उत्तर देऊन खालील तीन गोष्टी निर्णीत स्वरूपाच्या ठरवून टाकल्या ही त्यांनीं मोठी कामगिरी केली. ( १ ) ब्रिटिश सरकार हें सार्वभौम आहे, ( २ ) हिंदुस्थानांतील सर्व संस्थानिक मांडलिक आहेत, ( ३ ) संस्थानी प्रजेच्या हितास भयप्रद व अनिष्टपणाचा धोका संस्थानिकांचे कृत्यानें येण्याचा संभव असेल तर त्या ठिकाणीं " सार्वभौम सरकार " या नात्यानें, संस्थानचे अंतर्गत

कारभारांत हात घालतां येतो. अशीं हीं तत्त्वें आहेत. ही स्थिति कां प्राप्त झाली ? आपल्या संस्थानिकांनींच आपल्या हातांनीं ही स्थिति प्राप्त करून घेतली आहे. नुकतेंच मोंगलाईत जुलुमाचे प्रकार कसे होत आहेत हें मि. राघवेंद्ररावांनीं सांगितलें आहे. संस्थानिकांस आपलें संस्थान म्हणजे आपली **खासगी मिळकत** अशी वाटते. प्रजेनें ही इस्टेट मिळवून देण्याकरितां कांहींच कां सहाय्य केलें नाहीं. पण त्याचा विचार करतो कोण ? संस्थानांत अब्रूचा व वित्ताचा कसा अपहार होतो, हें वर्तमानपत्रांचे वाचकांस माहीत आहे. ज्या गोष्टी मनुष्यास बहुमोलाच्या वाटतात त्या त्या ठिकाणीं बेपत्ता आहेत. तेव्हां अशा संस्थानांची आम्हीं फिकीर कां करावी ? असें एक वेळ वाटतें. आतांच तात्यासाहेबांनीं सांगितलें कीं, संस्थानें ठेवावींत अशा मताचे ते आहेत. गोष्ट खरी आहे. पण त्यांच्या लीला ऐकून एकवेळ हिंदुस्थानच्या नकाशास **एकच रंग** फांसावा असें उद्वेगानें वाटतें. असें कां वाटावें याचा आपणच विचार करा. निजामाला लॉर्ड रेडिंगसाहेबांनीं जे उत्तर दिलें आहे तें एका दृष्टीनें खेदकारक आहे व एका दृष्टीनें उत्तेजक आहे. पण वर तिसऱ्या कलमांत संस्थानी प्रजेच्या हिताचे दृष्टीनें त्यांस संस्थानिकांपासून धोका होतो त्या वेळेस सरकारास हात घालतां येतो, असें जें तत्त्व सांगितलें त्याप्रमाणें सरकार चालत मात्र नाहीं. यास पुष्कळ कारणें असतील. सरकार आपल्या फायद्याची वेळ आली म्हणजे हात घालतें. संस्थानी प्रजेच्या हिताचे दृष्टीनें हात घालीत नाहीं; कां तर संस्थानिकांस राग येईल व पुन्हां १८५७ च्या बंडाची वेळ येईल. असो. नाभा, पतियाळा वगैरे संस्थानांचा लढा आपल्यास माहीत आहेच. पतियाळा आदिकरून इतर संस्थानांत प्रजेवर जो हरतऱ्हेचा जुलूम होतो तो त्या संस्थानचे हद्दीवर असलेल्या रेसिडेंटास माहीत असतो; परंतु त्याकडे सरकार कांहींच लक्ष देत नाहीं. फक्त आपल्या फायद्याची गोष्ट असते तेव्हां हात घालतें. तेव्हां सरकारास अशी आमची विनंति आहे कीं, आपण ज्याप्रमाणें १९१७ सालचा जाहिरनामा काढून आपलें निश्चित धोरण जाहीर केलें त्याप्रमाणें प्रागतिक स्वरूपाचें धोरण संस्थानिकांनीं स्वीकारावें असें त्यांस भाग पाडणारा कायदा पास करून अस्तित्वांत आणल्यास संस्थानी प्रजेचें हित होईल. तसेंच ठरावांत जी मागणी केली आहे त्याचा योग्य विचार करावा. तसेंच कायदे मंडळांत संस्थानिकांचा प्रश्न काढण्याची बंदी आहे ती काढून टाकण्यांत यावी; म्हणजे संस्था-

नांचे बाबतींत कौन्सिलपुढें प्रश्न विचारवून प्रजेस दाद मागतां येईल. तर हाही दरवाजा खुला करावा. चौथी मागणी संस्थानिकांचे हिताची आहे. ते ती मान्य करतील व संस्थानिकही या आमच्या ठरावास मान्यता देतील अशी आशा आहे. ' या आशयाचें भाषण झाल्यावर या ठरावास रा. गाडगीळ वकील यांनीं पुष्टी दिली व तो ठराव पास झाला.

## संस्थानिकांचा दर्जा.

**ठराव १२ वा**:—हा ठराव **डॉ. केतकर** यांनीं मांडला. तो मांडतांना ते म्हणाले कीं, ' संस्थानिकांचा दर्जा काय आहे हें आपणांस समजून घेतलें पाहिजे. इंटर नॅशनल लॉचे दृष्टीनें आपल्यास याचा निर्णय लावून घेतला पाहिजे. व्हॉइसरॉय यांचा निर्णय कायम होऊं शकत नाहीं; व्हॉइसरॉय म्हणजे कोर्ट नव्हे. व्हॉइसरॉय हा एक पार्टी आहे. तेव्हां याचा निकाल कोर्टमार्फत लावणें अगदीं जरूर आहे. सरकारनें संस्थानी प्रजेस ' परकी ' लेखूं नये व तेही ब्रिटिश प्रजाजन आहेत असेंच लेखावें आणि याचा निर्णय लावून घेणेकरतां एक " जाईंट कोर्ट ऑफ लॉ " स्थापन करून निर्णय करून घ्यावा अशी सूचना केली. तसेंच गायकवाड व खेदीव या दोघांत भिन्न भिन्न पदव्यांमुळेंच कायद्याचे दृष्टीनें त्यांच्या दर्जात तफावत होऊं शकते. खेदीव या शब्दाचा अर्थ व्हॉइसरॉय असा असल्यामुळें त्यास अधिराज ( Sovereign ) असें न समजतां सामान्य माणसाप्रमाणें कोर्टापुढें खेचतां येईल; परंतु ' महाराज ' पदवी गायकवाडास असल्यामुळें त्यांना कायद्याच्या दृष्टीनें कोर्टापुढें आणतां येणार नाहीं. इंग्रज सरकारनें " सार्वभौम " आपण असल्याचा जाहिरनामा जरी काढला असला तरी तो त्यांनीं स्वतःच काढला आहे, त्याला संस्थानिकांनीं मान्यता दिली नाहीं. इजिप्तचे खेदिवाप्रमाणें हैद्राबादच्या निजामची गोष्ट आहे. निजामाला हिज ए. हायनेस अशी पदवी दिली असली तरी वास्तविक पाहतां ते निजाम म्हणजे **सुभेदार** आहेत, महाराज नव्हत. या सर्व प्रश्नांचा आंतर्राष्ट्रीय कायद्यानेंच निकाल लागणें शक्य व अवश्य आहे. '

या ठरावास अनुमोदन देतांना सांगलीचे रा. **विनायकराव माईणकर** म्हणाले, ' या ठरावाच्या रूपानें आपण नवीन अशी कोणतीच मागणी केलेली नाहीं. संस्थानांतील प्रजेला आपल्या संस्थानच्या कारभारांत जबाबदारीचे अधि-

कार नवीन लोकशाहीचे तत्त्वावर मिळावेत; ही मागणी ५।६ वर्षांपासून म्हणजे या सभेच्या सुरुवातीपासून आहे. या मागणीला दुसऱ्या एका दिशेनें दुजोरा द्यावा व संस्थानिकांनीं वेळींच बोध घेऊन आपली व आपल्या प्रजाजनांची स्थिति अधिक अडचणीची करूं नये यासाठीं गेल्या वर्षांत घडलेल्या कांहीं महत्त्वाच्या गोष्टी संस्थानिकांच्या डोळ्यांपुढें या ठरावाच्या रूपानें ठेवीत आहोंत, एवढेंच काय तें नवीन आहे. बाकी ठरावाचा मतलब सर्वांशीं पूर्वींचाच आहे.' वरील आशयाचें भाषण झाल्यावर तो ठराव सर्वानुमतें पास झाला.

## निजामशाहींत सुधारणा.

**ठराव १४ वाः**— हा ठराव रा. **राघवेंद्र शर्मा** यांनीं मांडला. तो मांडतांना ते म्हणाले कीं, 'हैद्राबादच्या प्रजेस सुधारलेल्या पद्धतीचें कायदेमंडळ देण्याचा विचार निजामसाहेबांनीं पांच वर्षांपूर्वीं एक फर्मान काढून जाहीर केला होता व पुढें या बाबतींत विचार करण्याकरतां एक कमेटीही नेमली. त्यावेळीं वऱ्हाड प्रांत परत मिळण्याबद्दल निजामसाहेबांनीं जोराचे प्रयत्न आरंभिले होते व सर अल्ली इमाम यांसारख्या कायदे पंडिताची मदत त्यांनीं मिळविली होती. वऱ्हाड प्रांत परत मिळविणें व हैद्राबाद संस्थानांतील प्रजेला जबाबदार राज्यपद्धतीचे अधिकार देणें या दोन्ही चळवळी त्यावेळीं हातांत हात घालून चालू होत्या. वऱ्हाडचा निकाल काय झाला, हें आपणां सर्वांस माहीत आहे. हैद्राबादच्या प्रजेला खरोखरच जबाबदारीचे अधिकार देण्याची बुद्धि पांच वर्षांपूर्वीं फर्मान काढते वेळीं निजामसाहेबांचे मनांत होती असें जरी गृहीत धरलें तरी त्यांनीं वऱ्हाडच्या प्रश्नाचा निर्णय कांहीं लागला तरी आपल्या ताब्यांतील प्रजेस जबाबदारीचे अधिकार देणें हें निजामसाहेबांच्या जाहीर संकेताप्रमाणें निजामसाहेबांचें कर्तव्यकर्म ठरतें. नजराण्यासंबंधानेंही प्रजेवर अनेक प्रकारें जुलूम होत आहे. निजामसाहेबांच्या वाढदिवसानिमित्त नजराणे द्यावेत एवढीच जरी निजामसाहेबांनीं इच्छा दर्शविली तरी लहानसहान पोलीसापासून मोठ्या अधिकाऱ्यापर्यंत हे नजराणे वसूल करण्याचें काम इतक्या कसोशीनें व नेटानें चालविण्यांत येतें कीं, त्यामुळें प्रजा अगदीं मेटाकुटीस आली आहे व निजामसाहेबांचा जन्मदिन म्हणजे प्रजेची संकष्टी असें म्हणण्याची पाळी येते. निजामसाहेबांचे नांवावर वाहत्या गंगेंत हात धुवून घेणारे नोकरही किती निघत असतील याची आपण कल्पनाच करणें बरें. लांचलुचपतीस "नजराणा" हें प्रतिष्ठित नांव देण्यांत येतें.

या ठरावास रा. नारायणराव दास्ताने यांनीं अनुमोदन दिलें व संस्थानी प्रजेंतही खालसांतील प्रजेप्रमाणेंच जागृति उत्पन्न करण्याचें काम वर्तमानपत्र-कारांनीं कसें केलें आहे व या वर्तमानपत्रांस संस्थानिकांनीं आपल्या हद्दींत येण्यास प्रतिबंध न करतां हीं लोकजागृतीचीं साधनें आपल्या प्रजेला मिळवून देणें किती आवश्यक आहे, यासंबंधानें त्यानीं विवेचन केलें.

नंतर गुलबुर्ग्याचे रा. **गिरीराव** अण्णा जहागिरदार यांनीं या ठरावास पाठिंबा दिला. ते म्हणाले कीं, ' ज्याचे हातून आपणांवर अन्याय झाले आहेत, त्यांचेकडेच आपणांस दाद मागावयाची आहे व ती आपण सतत मागत राहिली पाहिजे. कित्येक वेळां अत्यंत निराशाजनक परिस्थितींत आपणांस हें काम करीत राहवें लागणार हें स्पष्टच आहे. तथापि तें करण्याशिवाय दुसरा मार्ग नाहीं.' नंतर पुण्याचे रा. **शंकरराव देव** यांनीं या ठरावास पाठिंबा दिला व ' आपण संस्थानिकांस अर्जविनंत्या जरूर कराव्यात, परंतु त्याबरोबरच प्रजेला अनुलक्षूनही आपण जर विनंतीपर ठराव केले तर बरेंच काम होण्यासारखें आहे व निराशा टाकून आपण काम केलें पाहिजे. ' याप्रमाणें चर्चा झाल्यानंतर हा ठराव सर्वानुमतें पास झाला.

## आभारप्रदर्शन.

वरीलप्रमाणें परिषदेचें काम झाल्यावर स्वागतमंडळाचे अध्यक्ष रावसाहेब **शंकरराव बापट** यांनीं थोडेंसें भाषण करून परिषद चांगल्या प्रकारें पार पडल्याबद्दल आनंद व्यक्त केला. ' निरनिराळ्या संस्थानांतील जे प्रतिनिधि या परिषदेस हजर राहिले व ब्रिटिश मुलखांतील जे अनेक थोर गृहस्थ हजर राहिले व ज्यांनीं आपल्या अनुभवाचा व सल्लामसलतीचा फायदा संस्थानांतील आपल्या बांधवांना दिला ' त्याबद्दल त्यांचे आभार मानून रावसाहेब बापट म्हणाले, आमच्या परिषदेचे अध्यक्ष रा. **अभ्यंकर** यांचा या चळवळीस केवढा पाठिंबा आहे हें मीं ' आपल्या सुरवातीच्या भाषणांत सांगितलेंच आहे व त्याचेंच प्रत्यंतर या परिषदेंतील त्यांच्या कार्यपद्धतीवरूनही आपणास आलेंच आहे. रा. **नरसोपंत** केळकर यांच्या मागें किती कामें असतात हें सर्वांस माहीतच आहे; तथापि संस्थानी प्रश्नांकडे दुर्लक्ष न करितां ते वेळ काढून होईल तें काम करितात व या परिषदेच्या **सेक्रेटरीची** एक महत्त्वाची जागाही त्यांनीं सुशोभित केली आहे व त्याबद्दल त्यांचे आभार मानले पाहिजेत. तद्वत् या परिषदेचें व आपल्या संस्थानी

चालचालीचे मुख्य सूत्रधार व ' द. सं. हितवर्धक सभे'चे जनक व चालक रा. **वामनराव** पटवर्धन यांचे आभार कोणत्या शब्दांनीं व्यक्त करावेत हेंच मला कळत नाहीं. त्यांच्या कामगिरीची जाणीव आपणां सर्व प्रतिनिधींस आहेच. रा. वामनराव पटवर्धन यांनीं संस्थानविषयक चळवळींबद्दल सुरू केलेली एक महत्त्वाची कामगिरी म्हणजे " **संस्थानी स्वराज्य** " हें पत्र होय; त्या वर्तमानपत्राच्या नांवांतच आपल्या सर्व चळवळीचें ध्येय प्रतिबिंबित झालें आहे; करितां या पत्रास संस्थानांतील प्रजेनें वर्गणीदार होऊन कार्यक्षम करावें व आपल्या उन्नतीचा मार्गही सुलभ करावा. '

रावसाहेब बापट यांनीं या आशयाचें भाषण केल्यावर अक्कलकोट संस्थानांतील रा. **रामभाऊ** शिरवळकर यांनीं या आभारप्रदर्शनाचे ठरावास अनुमोदन दिलें. " सर्वारंभास्तंडुलाः प्रस्थमूलाः " या न्यायानें हें वर्तमानपत्र चालविण्यास निरनिराळ्या संस्थानांतील प्रजेनें वर्गणी देऊन मदत करणें किती अवश्य आहे हें त्यांनीं सांगितलें. त्याचप्रमाणें आपापल्या संस्थानांतील बातम्या वाचणेस लोक कसे उत्सुक असतात व वर्तमानपत्रांचे लेखांचा सुपरिणामही अधिकारीवर्गावर कसा घडून येतो हें रा. शिरवळकर यांनीं सांगितलें. हा आभारप्रदर्शक ठराव टाळ्यांच्या गजरांत पास झाल्यावर अध्यक्षांना व प्रतिनिधी मंडळींना हारतुरे समर्पण करण्यांत आले.

## अध्यक्षांचें समारोपाचें भाषण.

प्रोफेसर **गणपतराव** अभ्यंकर यांनीं शेवटीं समारोपादाखल सुंदर भाषण करून संस्थानविषयक चळवळीचें आपलें ध्येय काय व तें साध्य करण्याकरितां आपण कोणते व कसे प्रयत्न केले पाहिजेत, याविषयींचें पुन्हां थोडक्यांत पण मुद्देसूद विवेचन केलें. संस्थानविषयक चळवळीचे कार्यास अद्यापि यावा तसा जोर आलेला नाहीं, असा जो कांहीं हितचिंतकांकडून आक्षेप येतो त्याला उत्तर देतांना प्रोफेसर अभ्यंकर म्हणाले, " आमच्याकडून अधिक नेटानें प्रयत्न व्हावयास पाहिजेत याबद्दल वाद नाहीं; परंतु आतांपर्यंत झालेले व सध्यां होत असलेले आपले प्रयत्न आपणांस नाउमेद करण्यासारखे खास नाहींत. ब्रिटिश हद्दींतील स्वराज्याच्या चळवळीशीं आमच्या चळवळीची तुलना करणें रास्त होणार नाहीं. ब्रिटिश हिंदुस्थानांतील कॉंग्रेसची चळवळ आज ४० वर्षांची

आहे. तिची बाल्यदशा संपून ती वयांत आलेली आहे. अर्थात् वयोमानाप्रमाणें तिच्यांत अधिक जोम असावा हें साहजिकच आहे. आम्ही संस्थानांतील लोक आधींच त्या मानानें मागसलेले, त्यांत आमच्या चळवळीस नुकतींच ५।६ वर्षे झालीं आहेत. अर्थात् बाल्यदशेमध्यें अद्याप ही चळवळ आहे. तिलाही कालांतरानें परिणत स्वरूप येऊन तिचीं गोड फळें संस्थानांतील प्रजाजनांस चाखा-वयास मिळतील असा आपल्यास पूर्ण भरवंसा आहे व त्याच बळावर आपण हल्लींच्या अडचणींतूनही आपला मार्ग काढीत आहोंत. ब्रिटिश हद्दींतील प्रजाजनांचें सहाय्य आम्हांस अवश्य पाहिजे; ही केवळ संस्थानी बाब आहे असें म्हणून त्यांनीं आमच्या चळवळीकडे दुर्लक्ष्य करतां उपयोगी नाहीं. संस्थांनी प्रजेचें काम हें आपलेंच काम आहे या भावनेनें त्यांनीं आम्हांस सहाय्य करण्यास पुढें आलें पाहिजे. ब्रिटिश हद्दींतील जनतेस शिक्षण व राजकीय सुधारणा यांचा लाभ आम्हां संस्थानी प्रजेपेक्षां अधिक आहे. संस्थानी प्रजेनें आपल्या स्वतःचे पायावर उभें राहून आपलें उद्दिष्ट साध्य करावें हें तत्त्व केव्हांही खरेंच आहे. तथापि संस्थानी प्रजेचा सध्यां होत अस-लेला **कोंडमारा** व त्यांची अनेक दृष्टीनें असलेली मागसलेली स्थिति या कार-णांनीं त्यांना खालसांतील आपल्या बांधवांच्या सहाय्याची व सल्लामसलतीची जरूरी आहे. ब्रिटिश हद्दींतील जनतेला **स्वराज्य** जेव्हां मिळेल तेव्हांच खरोखर संस्थानांतील प्रजेचा स्वराज्यविषयक प्रश्नही सुटणार आहे व त्यावेळीं तो सुट-ण्याला बिलकूल कालावधि लागणार नाहीं; परंतु ब्रिटिश हद्दींतीलही 'स्वराज्या'-च्या चळवळीची सध्यां काय स्थिति आहे हें आपण पहातच आहों. आत्यंतिक स्वार्थत्यागाचा जो मार्ग महात्मा गांधींनीं दाखविला तो चुकीचा आहे असें नाहीं. परंतु त्या मार्गाचा अवलंब करण्यास जनता कितपत तयार असते हा महत्त्वाचा प्रश्न आहे. त्याचें उत्तर ब्रिटिश हद्दींतील लोकांकडून काय मिळालें हें आपण पाहतोंच. संस्थानांतील मनुष्यें त्यांजवर कितीही अन्याय व जुलूम-जबरदस्ती झाली तरी शेवटीं आपल्या कौटुंबिक स्वार्थाला जपूनच राहणार व आत्यंतिक स्वार्थत्यागाला सहसा तयार होणार नाहींत व त्याबद्दल त्यांना विशेष दोष देतां येणार नाहीं. ब्रिटिश सरकार संस्थानच्या अंतर्गत कारभारांत आपण हात घालीत नाहीं असें म्हणतें, परंतु खरोखर तसा प्रकार नाहीं. ब्रिटिश सर-कारच्या हितसंबंधाचा प्रश्न जेव्हां जेव्हां उपस्थित होतो तेव्हां तेव्हां तें संस्था-

निकांच्या अंतर्गत कारभारांत बेलाशक हात घालतें; परंतु प्रजेच्या वतीनें मात्र ब्रिटिश सरकार तसें कांहीं करीत नाहीं; अगदींच भयंकर प्रकार होऊन गळ्याशीं प्रसंग आला तर मात्र ब्रिटिश सरकार तिकडे लक्ष पुरवतें; पण एरवीं संस्थानी प्रजेच्या हितरक्षणाची जबाबदारी बिलकुल अंगावर न घेतां संस्थानिकांचे मदतीलाच आपल्या संगिनी मात्र ब्रिटिश सरकार जय्यत तयार ठेवतें. ब्रिटिश सरकारची संस्थानिकांचे बाबतींतील Non-intervention Policy म्हणजे Divine Right of Misrule हीच होय. ब्रिटिश सरकारनें **खरोखरच** जर संस्थानच्या अंतर्गत कारभारांत कोणत्याही प्रकारें हात घालण्याचें नाकारिलें तर संस्थानी प्रजेला आपले अपेक्षित स्वराज्याचे हक्क मिळविण्यास बिलकूल विलंब लागणार नाहीं. परंतु खालसांतील स्वराज्याच्या चळवळीस ज्याचा विरोध आहे तेंच ब्रिटिश सरकारचें लष्करी सामर्थ्य संस्थानी प्रजेच्या उन्नतीच्या मार्गांत आड येत आहे. ब्रिटिश हिंदुस्थानांतील स्वराज्याचा प्रश्न जेव्हां समाधानकारक रीतीनें सुटेल तेव्हांच संस्थानांतील स्वराज्याचा प्रश्नही अखेरचा सुटणार हें पूर्वीं सांगितलेंच आहे. परंतु ती स्थिति येईपर्यंत आपण स्वस्थ बसणें हें केव्हांही योग्य होणार नाहीं; आपण आहे त्या परिस्थितींतही होईल तें काम करीत राहिलें पाहिजे, तरच आपलें ध्येय थोडें तरी जवळ येईल.' सदरहू आशयाचें भाषण झाल्यानंतर अध्यक्षांनीं आणखी एका गोष्टीचा उल्लेख केला; ते म्हणालेः– 'या परिषदेचे उभयतां सेक्रेटरी जरी भिन्न भिन्न पक्षाचे आहेत तरी ज्या ठिकाणीं मतभेदास मुळींच जागा नाहीं त्या ठिकाणीं कसें सलोख्यानें ( Harmony ) काम होऊं शकतें याचें हें एक उत्कृष्ट गमक आहे. यांतच True right of citizenship ची जाणीव आहे, हें आपल्या सर्वांचे लक्षांत येईल. असो. याबद्दल मी त्यांचे व्यक्तिशः आभार मानतों आणि आपण मला हा अध्यक्षपणाचा बहुमान दिला याबद्दल मी आपल्या सर्वांचा फार आभारी आहें. आतां परिषदेचें सर्व काम पुरें झालें तेव्हां परिषदेची बैठक खलास झाली असें आपल्या परवानगीनें जाहीर करतों.'

**श्री. अभ्यंकर** यांचें भाषण किती मुद्देसूद, माहितिपूर्ण व मननीय आहे हें सांगावयास नको. ( सं. )

---

# संस्थानांचें भवितव्य.



## नेक नामदार श्रीनिवासशास्त्री यांचीं व्याख्यानें.

**कोचीन** संस्थानची राजधानी अर्नाकुलम् येथील महाराजा कॉलेजमध्यें ता. २ व ता. ३ आक्टोबर १९२६ अशा दोन दिवशीं 'संस्थानांचें भवितव्य' या महत्त्वाच्या विषयावर नेक ना. श्रीनिवासशास्त्री यांचीं दोन महत्त्वाचीं व्याख्यानें झालीं. सन १९२५ मध्यें महाराजाकॉलेजची सुवर्णज्युबिली झाली त्यावेळीं "ज्युबिली व्याख्यानमाला" ही कायमची संस्था स्थापन करण्यांत आली व तिच्याच उद्घाटनसमारंभानिमित्त उपरोक्त दिवशीं ना. **शास्त्री** यांचीं हीं व्याख्यानें झालीं त्यावेळीं कोचीन संस्थानचे **युवराज, राजकन्या** राजघराण्यांतील इतर प्रमुख मंडळी, संस्थानचे मोठमोठे अधिकारी व संस्थानातील प्रमुख नागरिक मंडळी यांचा मोठा श्रोतृसमुदाय हजर होता.

संस्थानचे **दिवाण** रा. ब. टी. एस्. नारायण ऐयर आपल्या प्रास्ताविक भाषणांत म्हणाले कीं, 'नेक ना. शास्त्री यांच्यासारखे आपल्या मातृभूमीचे निःसीम सेवक व आन्तर्राष्ट्रीय मोठी कीर्ति मिळविणारे थोर गृहस्थ यंदा या व्याख्यानमालेचा उपक्रम करण्यास लाभले याबद्दल आपणास धन्यता वाटत आहे. ना. शास्त्री हे आमच्या विनंतीस मान देऊन बंगलोरहून मुद्दाम या ठिकाणीं आले ही त्यांची आपणांवर मोठी कृपाच आहे असें मी समजतों. त्यांच्या परिपक्व ज्ञानाचा व अगाध माहितीचा लाभ आपणांस आज घडत आहे ही मोठ्या आनंदाची गोष्ट होय.'

रा. ब. नारायण ऐयर यांचें वरील अशयाचें भाषण झाल्यावर शिक्षण खात्याचे डायरेक्टर मि. सी. मथाई यांनीं ना. शास्त्री यांना टाळ्यांच्या गजरांत पुष्पहारांनीं मंडित केलें व त्यानंतर ना. शास्त्री यांनीं आपल्या भाषणास सुरवात केली. ते म्हणाले, "माझ्याबद्दल दिवाण साहेबांनीं आतांच जे अत्यंत गौरवपूर्वक उद्गार काढले त्यामुळें मी तर कांहींसा गोंधळूनच गेलों आहें. त्यांनीं

माझ्या व्याख्यानासंबंधानें दर्शविलेली अपेक्षा अंशतः सफल झाली तरी मला धन्यताच वाटेल. मी आजच्या व्याख्यानासाठीं घेतलेला विषय हा अत्यंत महत्त्वाचा व त्याबरोबर फारच बिकट व गुंतागुंतीचा आहे. मी महाराजांचा पाहुणा म्हणून येथें राहिलों आहें; त्यांतून संस्थानांतील सुबुद्ध अशा नागरिकांपुढें मला भाषण करावयाचें आहे; त्यामुळें मुळांतच असलेल्या अडचणी अधिक वाढल्या आहेत. या प्रांताची व या संस्थानाच्या महत्त्वाच्या अशा विशिष्ट स्वरूपाच्या प्रश्नांची माहिती मला नाहीं. अखिल हिंदुस्थानाच्या दृष्टीनें सार्वजनिक प्रश्नांकडे पहाण्याची संवय असलेला मी एक मनुष्य आहें. अर्थात् माझे हिंदी संस्थानांच्या भवितव्यासंबंधानें जे कांहीं विचार आहेत ते आपण शांतपणें ऐकून घ्याल असा मला भरंवसा आहे.

## हिंदुस्थानचें ऐक्य.

संस्थानांतील राज्यघटनेचा विषय संस्थानी प्रजेला जितका अगत्याचा व जिव्हाळ्याचा वाटतो तितकाच तो ब्रिटिश हिंदुस्थानांतील रहिवाशांना वाटतो, हे प्रारंभीं मला आपणांस सांगितलें पाहिजे. आपणांत समाजपरत्वें किंवा धर्मपरत्वें अनेक लहान सहान भेद असतील; आपण निरनिराळ्या प्रांतांत राहात असूं व ज्या राज्यव्यवस्थेखालीं आपणांस रहावें लागलें तिचें स्वरूपहि वेगवेगळ्या प्रकारचें असेल; परंतु येवढ्यावरून आपण परस्परांपासून अगदीं भिन्न संस्कृतीचे, भिन्नपरंपरेचे किंवा अलग आहोंत असें केव्हांही म्हणतां यावयाचें नाहीं. आपली पूर्वापार संस्कृती, रहाणी व आकांक्षा या बहुतांशीं एकच आहेत; अर्थात् आपण सर्व एकाच **हिंदी राष्ट्राचे** नागरिक आहोंत व आपणाला सर्वसाधारण अशी **एकच** राज्यपद्धति असावी अशी इच्छा असणें स्वाभाविक आहे. ही कल्पना कोणांस अव्यवहार्य कोटींतील वाटत असेल किंवा ती फलद्रूप होण्याचा काळ फार दूर आहे असेंही कोणास वाटत असेल; परंतु मला स्वतःस तसें मुळींच वाटत नाहीं हें प्रारंभींच सांगून टाकलें पाहिजे. हिंदुस्थानच्या ऐक्यभावनेसंबंधानें ही जी विचारसरणी मीं पुढें मांडली आहे तीच ब्रिटिश हिंदुस्थानांतील प्रगमनशील अशा स्त्री-पुरुषांच्या अंतःकरणांत वास करीत आहे. तिचें प्रत्यक्ष कृतींत रूपांतर होण्यास किती काळ लागेल हें ब्रिटिश हद्दींतील व संस्थानांतील लोकांच्या निरलस व स्वार्थत्यागपूर्वक चालविलेल्या **चळवळीवर** व कर्तबगारीवर अवलंबून राहील.

खुद्द कोचीन संस्थानांतील राजकीय परिस्थिति व येथील विशिष्ट प्रश्न यांची मला मुळींच माहिती नाहीं हें मीं प्रारंभींच सांगितलें आहे. परंतु एक प्रकारें ही गैरसोय नसून उलट सोयच आहे असें मला वाटतें; कारण येथील स्थानिक प्रश्नापासून अलिप्त पण अखिल हिंदुस्थानाच्या एकमेव हिताच्या दृष्टीनेंच मला आपले विचार या प्रसंगीं पुढें मांडणें सुलभ होणार आहे. ब्रिटिश हिंदुस्थानांतील प्रामुख नागरिक व लहान मोठ्या दर्जाचे कित्येक ब्रिटिश अधिकारी व मुत्सद्दी यांची हिंदी संस्थानांच्या भवितव्यासंबंधानें सामान्यतः कोणती दृष्टि आहे हें या प्रसंगीं मी मांडूं इच्छितों. सध्याच्या राजकारणांत अत्यंत बिकट जे कांहीं प्रश्न आहेत व जे हातानिराळे टाकण्याची इच्छा कित्येक सद्धेतुप्रेरित ब्रिटिश मुत्सद्यांसही होते अशा प्रश्नांपैकीं हिंदी संस्थानांचा प्रश्न हें एक महत्वाचें प्रकरण आहे. उलट हिंदुस्थानांत लोकशाही संस्थापित होऊं नये असें ज्यांना मनापासून वाटतें असे आपले कित्येक हितशत्रू एतद्देशीय संस्थानांची स्थिति सध्या आहे तशी निरंतर रहावी असें इच्छितात. हिंदुस्थानांत जोंपर्यंत लहान मोठ्या आकाराचीं कमी अधिक लोकसंख्येचीं पण एकतंत्री राज्यपद्धतीचीं ५६१ संस्थानें अबाधित आहेत तोंपर्यंत हिंदुस्थानांत लोकशाहीच्या चळवळीचा विकास होण्याची आपणांस मुळींच भीति नाहीं, अशी आपल्या हितशत्रूंची खातरजमा झालेली दिसते.

यावरून हा विषय किती बिकट, चिरंतन स्वरूपाचा व व्यापक आहे याची कल्पना येईल. संस्थानांतील रहिवाशांनीं आपण अखिल हिंदुस्थानाचे **नागरिक** आहोंत ही कल्पना दृढ बाळगून व्यापक दृष्टीनेंच या विषयाकडे पहावयास पाहिजे. तुमच्यापैकीं कोणी उतावळे लोक म्हणतील कीं, "यांत कांहीं विशेष अवघड नाहीं. आमच्या अंगीं ही राष्ट्रीयत्वाची भावना उतरली आहे. कारण मद्रासचे "हिंदू" पत्र वाचतों; ब्रिटिश हिंदुस्थानांतील कॉलेजांतून शिक्षण घेतों व मद्रास युनिव्हर्सिटीच्या परीक्षाहि देतों. मग राष्ट्रीयत्वाचें शिक्षण आम्हांस मिळण्याची कमतरता उरते कोठें." परंतु ही गोष्ट दिसते तितकी सोपी नाहीं. वयामुळें व लोकस्थितीच्या निरीक्षणामुळें मला जो कांहीं अनुभव आला आहे त्यावरून मी आपणास सांगतों कीं, लोकांच्या विचारसरणींत पालट घडून येणें हें काम फार प्रयासाचें व दिरंगाईचें असतें. यास्तव कोणत्याही प्रकारचे पूर्वग्रह काढून व स्थानिक अडीअडचणींना न भितां अखिल

हिंदुस्थानच्या हिताच्या दृष्टीनेंच हा प्रश्न सोडविण्याच्या प्रयत्नास आपण निश्चयपूर्वक लागलें पाहिजे.

## राष्ट्रीय सभा व एतद्देशीय संस्थानें.

राष्ट्रीय सभेनें सुरवातीपासून बराच काळपर्यंत हिंदी संस्थानांसंबंधांत अलिप्तपणाचें धोरण ठेविलें होतें. संस्थानविषयक प्रश्नास स्पर्श करावयाचा नाहीं, अशी पराकाष्ठेची खबरदारी घेण्यांत येत असे. राष्ट्रीय सभेच्या त्या वेळच्या धुरीणांनीं एतद्देशीय संस्थानांचा प्रश्न इतका हातावेगळा कां ठेविला याचीं कारणें व हेतू विविध होती. त्यांपैकीं एक प्रमुख कारण सांगावयाचें झाल्यास असें सांगणें भाग आहे कीं त्या वेळच्या पुढाऱ्यांच्या मनांत एक प्रकारची भीति वास करीत होतीं. स्वराज्य, स्वायत्त राज्यव्यवस्था ( किंवा अलीकडे ज्यास जबाबदारीची राज्यव्यवस्था हें नांव देण्यांत येतें. ) मिळविणें हेंच प्रमुख ध्येय समजून त्याकरितां आपल्या शक्तीचा व वेळाचा शक्य तितका विनियोग व्हावा असें राष्ट्रीय सभेच्या पुढाऱ्यांचें त्या वेळीं धोरण होतें. व या ध्येयासाठीं ज्यांच्याशीं झगडा चालवावयाचा ती ब्रिटिश राज्यसंस्थाही कांहीं लेचींपेची नसून फार बळवान् व निग्रही असल्यामुळें आपल्या मार्गांतील अडचणी वाढवूं नयेत अशी खबरदारी घेणें त्यावेळीं राष्ट्रीय सभेला भाग होतें. फक्त एका ब्रिटिश राज्यसत्तेशींच झगडा चालविण्यास आपली सर्व शक्ती एकवटावी व आपल्या विरोधी पक्षास हिंदुस्थानांतील ५६१ लहानमोठ्या संस्थानिकांची फौज उभी राहूं नये ही त्यावेळीं राष्ट्रीय सभेची दृष्टि होती. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे युद्धाची एकच आघाडी असावी, अनेक अघाड्यांवर युद्ध चालूं नये अशी काळजी तेव्हां घेण्यांत आली. दुसरें कारण असे कीं, एतद्देशीय व संस्थानांच्या कृपाछत्राखालीं असलेले आपले हिंदी देशबांधव शांततेनें व सुखासमाधानांत कालक्रमण करीत आहेत व त्यांच्या जीवनक्रमांत ढवळाढवळ करूं नये अशीही कांहींशी भोळी समजूत त्या वेळीं पुढाऱ्यांच्या मनांत वसत होती. पण गेल्या कांहीं थोड्या वर्षांत काँग्रेसच्या या धोरणांत बदल झाला आहे. आतां संस्थानचे प्रजाजन राष्ट्रीय सभेच्या अधिवेशनास हजर राहतात इतकेंच नव्हे तर सभासद म्हणून तिच्या चर्चेंत भाग घेऊं शकतात व ठरावावर मतें देतात. जुन्या वळणाच्या राष्ट्रीय सभेच्या

-चालकांना हा फेरबदल तर अगदीं क्रांतिकारक स्वरूपाचा वाटून त्यांनीं त्यास जोराचा विरोधच केला असता. राष्ट्रीय सभेच्या धोरणांत हें जें स्थित्यंतर घडून आलें त्याचीं मुळें दृढ रुजलीं आहेत असें मात्र म्हणतां येणार नाहीं. सध्यां जे कांहीं संस्थानी प्रजाजन राष्ट्रीय सभेला जातात त्यांची संस्थानविषयक आकुंचित दृष्टि सुटून ते अखिल हिंदुस्थानच्या दृष्टीनें सभेच्या कार्याकडे पहातात असें सद्यःस्थितीवरून म्हणतां येत नाहीं. शिवाय कॉंग्रेसनेंही एतद्देशीय संस्थानांच्या भवितव्या संबंधानें निश्चित असें कोणतेंच **ध्येय** किंवा कार्यपद्धति स्वीकारली नाहीं. याच्या उलट संस्थानी प्रजाजनांतील जे कोणी अत्युत्साहि गृहस्थ कॉंग्रेस-मध्यें सामील होतात त्यांच्या उत्साहावर **विरजण** घालण्याचेच प्रयत्न कॉंग्रेस-मधील प्रमुख व्यक्तींकडून होत आहेत. राष्ट्रीय सभेच्या एकंदर हालचालीवर सध्यां आपला प्रभाव गाजविणारी प्रमुख व्यक्ति असें सांगत आहे कीं, लहानमोठे संस्थानिक राजे, महाराजे व चीफ् यांच्याबद्दलचा पूज्यभाव सोडूं नका. व त्यांच्या स्वास्थ्यांत कोणत्याही प्रकारें बिघाड न आणतां त्यांच्या प्रजाजनांनीं शांततेनें व समाधानानें आजपर्यंत राहत आल्याप्रमाणेंच पुढेंही रहावें. पण हा उपदेश व तज्जन्य धोरण हीं भावी काळांत **टिकाव** धरतील असें मला स्वतःस वाटत नाहीं.

ब्रिटिश हिंदुस्थानांतील जनता आपल्या प्रतिनिधींच्यामार्फत आपल्या इच्छेनुरूप राज्यकारभार चालवीत आहे. मंत्रीमंडळें निर्माण करणें किंवा मोडणें हें ब्रिटिश हिंदुस्थानांतील प्रजेच्या हातीं आहे; अशी स्थिति निर्माण झाली असतां संस्थानांतील आमचे देशबांधव जुन्यापुराण्या राज्यव्यवस्थेखालींच **संतुष्ट** राहतील अशी आशा कोणीही करूं नये. कदाचित् तुमच्यांपैकीं कोणी अशी इच्छा करणार नाहींत व संस्थानिकाच्या एकतंत्री अंमलाखालींच रहाणें हें सुवर्णयुग समजतील, तथापि तुमचीं मुलेंबाळें याच विचाराचीं निपजतील अशी कल्पना करूं नका. ते ब्रिटिश हिंदुस्थानांतील आपल्या देशबांधवां-पेक्षां मागें रहाण्यास **कदापि** तयार होणार नाहींत. ब्रिटिश हिंदुस्थानांतील लोकसत्तात्मक राज्यपद्धतीशीं समानरूप अशीच राज्यपद्धति संस्थानी प्रदेशांतही सुरू होणें एकराष्ट्रीयत्वाच्या दृष्टीनें **अपरिहार्य** आहे. निरनिराळ्या प्रांतांतील कार्ययांत व किरकोळ तपशीलांत फरक राहील हें खरें, तथापि मुख्य मुद्याच्या दृष्टीनें पाहिलें असतां निर्णायक सत्ता **जनतेच्याच** हातीं गेली पाहिजे व असें

होईल तरच जगाच्या राष्ट्रांशीं हिंदी राष्ट्राला **स्वतंत्र व** संघटित राष्ट्र म्हणून व्यवहार करतां येईल. हिंदुस्थानांतील एक तृतियांश $\frac{1}{3}$ भूप्रदेश व सात कोटी म्हणजे जवळ जवळ $\frac{1}{4}$ लोकसंख्या जर लोकसत्तात्मक राज्यपद्धतीपासून मागें दूर रेंगाळत राहील तर अखिल हिंदुस्थानासही एक संघटित राष्ट्र या नात्यानें जगांत दर्जा प्राप्त होणें **अशक्य** होईल.

ब्रिटिश हिंदुस्थानांतील प्रगतीचा गाडा मागें खेचला जाऊं नये याकरितां तरी संस्थानी मुलुखांत प्रगतिपर अशा **लोकसत्तात्मक** राज्यपद्धतीचा प्रवेश होणें आवश्यक आहे.

## शांततेच्या मार्गांनींच आपलें ध्येय साध्य केलें पाहिजे.

ब्रिटिश हिंदुस्थानांत लोकसत्तात्मक राज्यपद्धतीचा नागरिकांशीं प्रत्यक्ष संबंध पोहोंचतो. पण संस्थानांतील नागरिकांशीं हा संबंध मध्यस्थामार्फत म्हणजे राजघराण्यामार्फत पोहोंचतो. हीं मध्यस्थ अशीं जीं राजघराणीं आहेत त्यांच्या विषयीं प्रजेला आदर व निष्ठा असते व संस्थानिकही आपल्या पूर्वापार जुन्या पद्धतीनेंच पण प्रजेच्या हिताची काळजी घेत असतात व त्या मानानें कोणी अधिक तर कोणी कमी लोकप्रियही असतात. संस्थानिक आपल्या प्रजेच्या बऱ्याकरितां झटत असतात असें त्यांच्या संबंधानें सर्वसाधारण विधान करण्यास हरकत नाहीं. त्यांच्यावर सररहा गहजब उडविणें अन्यायाचें होईल. परंतु प्रजेच्या हिताची कितीही काळजी घेणारा संस्थानिक असला तरी त्याला आपल्या हातांतील **सत्ता** सोडून देण्याची इच्छा सहसा होणार नाहीं व होत नाहीं. सर्व जगांतील एकतंत्री सुलतानी राजसत्तेच्या इतिहासावरून हेंच दिसून येतें कीं, ते **सुखासमाधानानें** आपल्या हातची सत्ता सोडण्यास कधींही तयार होत नाहींत. खऱ्या खोट्या प्रतिष्ठेची व दर्जाची आवड, सत्तेचा मोह व कित्येक राजकीय चळवळ्या लोकांकडून होणारी टीका असह्य वाटते या कारणांनीं लोकशाहीच्या चळवळीस संस्थानिक व त्यांचे सहाय्यक हे निकराचा **विरोध** करीत रहाणार हें उघड आहे. अशा स्थितींत जनतेनें आपल्या हातीं राज्य-कारभाराची सत्ता मिळविण्यासाठीं जे प्रयत्न करावयाचे ते फार विचारानें व काळजीपूर्वक केले पाहिजेत. संस्थानिकांच्या विरोधाची तीव्रता निष्कारण न वाढविण्याची खबरदारी आपण घेतली पाहिजे. त्यांच्या विरोधास **तोंड** देऊनच

आपण चळवळ चालविण्यावांचून गत्यंतर नाहीं हें खरें; पण आपण जर शांततेच्या व सनदशीर मार्गांनीं प्रयत्न करूं तर जरा मंदगतीनें पण खात्रीशीर अशी प्रगति झाल्यावांचून रहाणार नाहीं. आपण जर अत्याचाराचे किंवा धाकदपटशाचे उपाय योजिले तर आपल्या चळवळीचा अंतही त्याच उपायांनीं लौकर होऊन ध्येय साध्य होण्याचें काम अधिक बिकट व दिरंगाईचें होणार आहे. यास्तव जे उपाय योजावयाचे ते शांतताप्रधान व सनदशीर असेच असणें जरूर आहे.

## व्यक्तीचें राज्य जाऊन कायद्याचें राज्य आलें पाहिजे.

लोकशाहीच्या चळवळीचें एक मुख्य तत्त्व म्हटलें म्हणजे **व्यक्तीचें**-मग ती कितीही सद्धेतुप्रेरित असो-**एकतंत्री** राज्य जाऊन त्या ऐवजीं कायद्याचें राज्य प्रस्थापित झालें पाहिजे, नागरिकांना कोणाही व्यक्तीच्या रागलोभाची भीति न बाळगतां मान ताठ करून वागतां आलें पाहिजे. फक्त कायद्यापुढेंच त्यानें आदरबुद्धीनें मान लवविली पाहिजे व हे **कायदे** करण्यांत **त्यांचें अंग** असलें पाहिजे. सुधारलेल्या मोठमोठ्या राष्ट्रांतून जे महाराजे किंवा सम्राट् आहेत ते राष्ट्राच्या राज्यकारभारांत ढवळाढवळ करूं शकत नाहींत. व एतद्देशीय संस्थानांच्या बाबतींतही हीच स्थिति घडून येणार हें अपरिहार्य आहे. कायद्यापुढें सामान्य नागरिकांप्रमाणेंच राजेमहाराजांनीं मान लवविली पाहिजे. संस्थानांतील जे कोणी अधिकारी व न्यायाधीश असतील त्यांनीं संस्थानिक अगर त्यांचे चहाते यांच्या रागलोभाची कदर बिलकूल न बाळगतां कायद्यास अनुसरूनच निःपक्षपातीपणानें वागणें जरूर आहे. व खुद्द संस्थानिक जर अन्याय करील तर त्याचेंही **पारिपत्य** न्यायाधिकाऱ्यांनीं कायद्यास अनुसरून केलें पाहिजे. ही जी अपेक्षित सुधारणा आपणांस संस्थानांतून घडवून आणावयाची आहे ती आजमित्तीस ब्रिटिश हिंदुस्थानांतही पूर्णपणें हस्तगत झाली असें नाहीं. पण त्या दिशेनें निश्चयपूर्वक पुढें पाऊल पडत आहे. संस्थानांच्या बाबतींत अद्यापि फारच मागसलेपणा दिसून येतो. प्रजापरिषदेचीं अधिवेशनें ज्या त्या संस्थानांत भरवितां येत नाहींत. म्हणून तीं ब्रिटिश हद्दींत भरवावीं लागतात, अशी सध्यांची स्थिति आहे. हा प्रारंभ संतोषजनक खास नाहीं.

संस्थानी हद्दींतून राहणाऱ्या ७ कोटि लोकांच्या वतीनें लोकशाहीची राज्यपद्धति मिळविण्याकरितां नेटानें पण भारदस्त रीतीनें चळवळ करण्याकरितां टाइम्स ऑफ इंडिया पत्राच्या तोलाचें एकही वर्तमानपत्र अस्तित्वांत नाहीं. संस्थानी हद्दींत वर्तमानपत्र काढणें व तें निर्भिडपणानें व भारदस्तपणानें चालविणें हीच गोष्ट सध्यांच्या स्थितींत फार बिकट आहे. हें औदासीन्य घालवून आपल्या चळवळीच्या पुरस्कारासाठीं एकादें चांगलें प्रमुख **वर्तमानपत्र** चालविणें फार जरूर आहे.

## आत्यंतिक टोंकाला गेलेलीं मतें.

नेक ना. **शास्त्री** पुढें म्हणाले कीं, माझें आजचें व्याख्यान संपविण्यापूर्वीं थोडक्यांत आणखी एका बाबीचा उल्लेख करणें जरूर आहे. व ती म्हटली म्हणजे संस्थानविषयक प्रश्नासंबंधानें कांहीं लोकांची जहाल व आत्यंतिक टोंकास गेलेली विचारसरणी ही होय. कित्येक अँग्लो इंडियन लोक व त्याप्रमाणेंच जहाल प्रवृत्तीचे कांहीं हिंदी पुढारीही संस्थानांच्या भवितव्यतेसंबंधानें अगदीं पराकाष्टेचीं टोंकें गांठतांना आढळतात. कित्येक अँग्लोइंडियन लोक असें प्रतिपादितात कीं, सध्यां असलेलीं संस्थानें अगदीं आहेत त्या स्थितींतच कायम राखावीं इतकेंच नव्हे तर खुद्द ब्रिटिश अमलाखालीं हिंदुस्थानांतील जो मोठा प्रदेश आहे तोही सर्व संस्थानिकांच्या ताब्यांत वांटून द्यावा व जरूर तर कांहीं नवीन संस्थानें निर्माण करावीं. संस्थानिकांची एकमुखी व दडपशाहीची जी सत्ता आहे ती कमी न करितां तिची वाढच करावी. अशी सूचना करण्यांत अँग्लो इंडियन लोकांचा हेतु लोकशाहीच्या प्रस्थापनेस पूर्णपणें **विरोध** करणें हाच असतो. संस्थानिक हे ब्रिटिश सरकारशीं पूर्णपणें राजनिष्ठ असतात येवढेंच नव्हे तर साम्राज्य सरकारच्या शब्दाला होस हो ठोकण्याची त्यांची तयारी सुप्रसिद्धच आहे! असे इमानी व एक-निष्ठ **सेवक** साम्राज्य सरकारला मिळाले म्हणजे लोकशाहीसाठीं हिंदी लोकांनीं चालविलेल्या चळवळीची ब्याद परस्पर संस्थानिकांकडूनच दडपली जाईल व हिंदुस्थानांतील **द्रव्य हरण** करण्याचा मार्गही ब्रिटिश सरकारास मोकळा व निर्वेध राहील, अशी या अँग्लो–इंडियन लोकांची समजूत असते. सबंध हिंदुस्थान देशावर लहान मोठया संस्थानिकांचा अमल सुरू करण्याची त्यांची सूचना तुम्हांस वेडगळपणाची व अशक्य वाटते असें या सभेंतील लोकांच्या उद्गारावरून दिसतें

व तें खरेंही आहे; तथापि या सूचनेच्या मुळाशीं अँग्लो–इंडियन व त्यांच्या पक्षाच्या कित्येक ब्रिटिश लोकांची जी मनोभूमिका आहे ती अजीबात विचाराबाहेर टाकून आपणांस चालतां येणार नाहीं. कित्येक वेळां प्रत्यक्ष दुखणें नाहींसे झालें तरी त्याचें विष अंगांत दबा धरून असतेंच; तद्वत् संस्थानिकांच्या ताब्यांत संबंध हिंदुस्थान देश देण्याची सूचना जरी तुम्ही वेडगळ म्हणून धिक्कारपूर्वक बाजूस सारली तरी लोकशाहीला विरोध करण्याची अँग्लोइंडियन लोकांची जी प्रवृत्ति आहे तिला आपणांस नेटानें तोंड दिलें पाहिजे. हिंदुस्थानांतील रयतेच्या आकांक्षा व मागण्या यांचा काडीइतकाही विचार न करितां केवळ साम्राज्य-सत्तेच्या हितासाठीं व स्वतःच्या स्वार्थाकरितां हिंदी लोकांवर बेजबाबदारपणें हुकमत गाजविण्याचें निंद्य काम पत्करण्यास कित्येक परंपरागत संस्थानांच्या गादीवरील राजे महाराजेही मोठ्या खुषीनें तयार होतील याविषयीं मला संशय वाटत नाहीं.

याच्या उलट बाजूनें कित्येक हिंदी राजकारणी लोकही असेच जहाल स्वरूपाचे विचार कधीं कधीं व्यक्त करतांना आढळतात. झाडून चट सारीं संस्थानें **एकदम खालसा करावीं**; तीं सुधारण्याचा खटाटोप करणें व्यर्थ असल्या-मुळें तीं **अजीबात नष्टच** केलीं पाहिजेत, त्याखेरीज हिंदुस्थानास खरें स्वराज्य लाभणें शक्य नाहीं अशी त्यांची समजूत दिसते; परंतु आत्यंतिक विचाराचीं हीं दोन्हीं टोकें वगळून त्यांच्या दरम्यानचा मार्ग पत्करणेंच आपणास श्रेयस्कर आहे असें मला वाटतें. हा मध्यम मार्ग कांहींसा कमी त्रासाचा आहे म्हणूनच त्याची मी शिफारस करतों असें नव्हे, तर जुन्या संस्थानी राज्यपद्धतीवर सर्वस्वी तुटून पडणें अन्यायाचें होईल. त्यांतही कांहीं चांगला भाग आहे व तो न गमावतां जुन्या पद्धतीचा नवीन लोकशाहीच्या तत्त्वांशीं योग्य प्रकारें मिलाफ घडवून आणण्याचा प्रयत्न करणेंच सर्व दृष्टींनीं श्रेयस्कर आहे.



# संस्थानांचें भवितव्य.

## ना. शास्त्री यांचें दुसरें व्याख्यान.

ता. ३ आक्टोबर १९२६ रोजीं नेक ना. शास्त्री यांचें याच विषयावरील दुसरें व्याख्यान झालें. ते म्हणाले कीं, संस्थानिकांच्या हातीं वंशपरंपरेनें आलेली सत्ता लोकांनीं काढून घेणें हें काम केव्हांही बिकट व फार जिकीरीचेंच होणार हें मीं काल रोजीं आपल्या भाषणांत सांगितलें. त्याचप्रमाणें सर्व हिंदुस्थान देश संस्थानिकांना वांटून द्यावा किंवा सर्व संस्थानें अजीबात नष्ट करून लोकशाहीचा मार्ग निष्कंटक करावा अशा दोन्ही एककल्ली मतांहून वेगळा व मध्यंतरींचा मार्ग काढणेंच कसें श्रेयस्कर आहे याचेंही मीं विवरण केलें. संस्थानिकांना आपल्या हातची सत्ता सुखासुखी कधींही सोडवणार नाहीं. संस्थानिकच कशाला ? ब्रिटिश हिंदुस्थानांतील सिव्हिल सर्व्हंटांची गोष्ट घेतली तरी सुद्धां त्यांना आपली सत्ता लोकांना देववत नाहीं. हा सत्ताभिलाष सिव्हिल सर्व्हंटसपेक्षां संस्थानिकांत अधिकच आढळून येणार हें उघड आहे. शिवाय संस्थानिकांची स्थिति आणखीही एका बाजूनें फार विचित्र आहे हेंही आपण लक्षांत घेतलें पाहिजे. संस्थानिक हे आपल्या राज्यांत सर्व सत्ताधीश आहेत असें कागदोपत्रीं असलें तरी पुष्कळ वेळां त्यांना आपला धनीपणा आपल्या राज्यांतही गाजवितां येत नाहीं. आपलें कांहीं चालत नाहीं असें म्हणून कित्येक वेळां संस्थानिक रेसिडेन्सीकडे बोट दाखवितात. व उलट रेसिडेंटसाहेब राजवाड्याकडे बोट दाखवितात. व यामुळें प्रजेची मात्र केविलवाणी स्थिति होते. आपणावर अन्याय कोणीं केला व त्याचें निराकरण कोणांकडून करून घ्यावयाचें या गोष्टीचें लोकांना निश्चित व स्पष्ट ज्ञान ज्या राज्यव्यवस्थेंत होऊं शकत नाहीं ती विलक्षणच राज्यपद्धति म्हटली पाहिजे. व याच भयंकर स्थितींत आपण सांपडलों आहोंत. रेसिडेन्सी व तिच्यापेक्षां वरिष्ठ अधिकारी यांच्याकडून दररोजच काय पण प्रतिक्षणीं गुप्त खलितें, चिठ्याचपाठ्या चालू असतात. अशा स्थितींत संस्थानिक व राजेमहाराजे यांचा आपण धिक्कार करण्यापेक्षां त्यांची कींव करणेंच योग्य आहे.

## नियंत्रण कमी केल्याचे दुष्परिणाम.

ब्रिटिश सरकारच्या वरिष्ठ अधिकाऱ्यांकडून संस्थानिकांच्या कारभारांत जरी व्यत्यय येतो अशीं उदाहरणें घडतात व तशीं तुम्हांला माहीतही असतील; तथापि गेल्या दहाबारा वर्षांत संस्थानिकांच्या कारभारांत होतां होईल तों हात न घालण्याचें ब्रिटिश सरकारचें धोरण आहे. व अगदींच **भयंकर** प्रकार घडल्याशिवाय सरकार संस्थानिकांच्या कारभाराकडे लक्ष्य पुरवीत नाहीं. ही स्थिति इष्ट नाहीं हेंही आपल्या निदर्शनास आणून देणें मला जरूर वाटतें. संस्थानिकांच्या राज्यकारभारांत कांहीं शिस्त व पद्धत रहाण्याकरितां वरिष्ठ सरकारचें कांहीं नियंत्रण त्यांच्यावर असणें जरूर आहे. हें नियंत्रण अलीकडे एकदम काढून घेण्यांत आल्यामुळें संस्थानिकांना सर्व दिशा मोकळ्या झाल्या असून त्याचा फार अनिष्ट परिणाम घडून आला आहे. आजकाल पहावें तर कोणी संस्थानिक आपल्या राज्यांत क्षणभरही न रहातां **प्रजेच्या** पैशावर लंडन व पॅरिस येथील हवा खात चैनीनें रहातात, कोणी परदेशांत लांचलुचपत व चैनबाजी करीत बसतात तर कोणी आपल्या डामडौलानें पाश्चात्य लोकांना दिपविण्यांतच इतिकर्तव्यता मानतात. **नाभा, काश्मीर** व **इंदूर** येथील संस्थानिकांचीं दुष्कृत्यें आपल्या डोळ्यांपुढें आहेतच. आणि **हैद्राबादच्या निजामसाहेबांसंबंधानें** तर बोलावयासच नको.

## याला उपाय काय ?

ही जी चमत्कारिक व शोचनीय स्थिति दृष्टीस पडते ती नाहींशी करण्याला उपाय कोणता हा प्रश्न साहजीकच उत्पन्न होतो. सर्व राजेमहाराजांवरील नियंत्रण वरिष्ठ सरकारनें सररहा काढून घेतल्यास संस्थानिकांची **बेबंदशाही** सुरू होते. ती नाहींशी करण्याचा खरा व मुख्य उपाय म्हटला म्हणजे ब्रिटिश अधिकाऱ्यांचें जेव्हां जेव्हां व जितकी जितकी नियंत्रणाची सत्ता कमी होईल ती **तात्काळतोब** संस्थानांतील **लोकप्रतिनिधींच्या** हातीं देणें जरूर आहे. ब्रिटिश सरकारच्या पोलिटिकल अधिकाऱ्यांचा दाब ज्या मानानें दूर होत जाईल, त्या मानानें प्रजेला आपल्या प्रतिनिधींच्या द्वारें संस्थानिकांवर नियंत्रण घालण्याची सत्ता दिली पाहिजे. या कामीं दिरंगाई होऊं देणें धोक्याचें

आहे. एकदम व घाई घाईनें प्रजेला संस्थानिकांवर पूर्ण हुकमत द्यावी असें मी म्हणत नाहीं. पण लोकांच्या जीवितावर व मालमत्तेवर ज्यांचा ताबा रहावयाचा त्यांना **निरंकुश** राहूं देणें केव्हांही **भयंकर** आहे. ब्रिटिश अधिकाऱ्यांचें अनिष्ट नियंत्रण काढून टाकून त्याऐवजीं प्रजाप्रतिनिधींचें योग्य, हितकर व लोकसत्तात्मक राज्यपद्धतीस अनुरूप असें नियंत्रण संस्थानिकांवर हळूहळू पण खात्रीशीर रीतीनें प्रस्थापित झालें पाहिजे. ब्रिटिश हिंदुस्थानांतही वरिष्ठ अधिकारी व इलाखाधिपति यांची अनिर्बंध सत्ता स्टेट सेक्रेटरींनीं कमी करावी अशी चळवळ आपण करतों. पण इंडिया ऑफिसचा ताबा कमी करून त्याबरोबरच लोकमताचा ताबा गव्हर्नरादि अधिकाऱ्यांवर प्रस्थापित व्हावा असा प्रयत्न करावाच लागतो. हाच न्याय संस्थानिकांच्या बाबतींतही लाविला पाहिजे.

## सर्वच संस्थानांत लोकशाही स्थापन होणें शक्य आहे काय ?

हिंदुस्थानांत असलेल्या सर्वच म्हणजे ५६१ संस्थानांत लोक शाहीच्या तत्त्वावर सुधारलेली राज्यपद्धति स्थापन होणें शक्य व इष्ट आहे काय, हाही एक महत्त्वाचा प्रश्न आहे. त्यांतील पुष्कळ संस्थानें फारच लहान आहेत. लोकसंख्या व उत्पन्न या दोन्ही दृष्टींनीं लहान असलेल्या संस्थानांत प्रातिनिधिक राज्यपद्धति स्थापन करणें कठीण असतें, कारण कोणत्याही राज्यपद्धतीपेक्षां प्रातिनिधिक राज्यपद्धती फार खर्चाची असते ही गोष्ट दृष्टीआड करून चालतां येणार नाहीं. आज ज्या संस्थानांत एक राजा आहे तेथें नवीन राज्यवस्थेनुसार लहानमोठ्या अधिकारांचे शंभर राजे होतील, कमिट्या वगैरे नेमण्याचाही खर्च फार येतो. शिवाय ज्या ज्या वेळीं जे जे लोक अधिकारारूढ होतील ते ते आपापल्या पक्षाच्या लोकांना किंवा नातेवाइकांना नोकऱ्यांवर लावून देऊं पहाणार हेंही उघड आहे. या कारणांनीं प्रातिनिधिक राज्यपद्धति भारी खर्चाची होते व ही जबाबदारी घेण्यास सर्वच संस्थानें लायक आहेत, असें कोणासही म्हणतां येणार नाहीं. किती संस्थानें लायक आहेत व किती नाहींत हें बारकाईनें नीट चौकशी केल्याखेरीज ठरवितां येणें अर्थातच शक्य नाहीं. ज्या संस्थानची लोकवस्ती कमींतकमी दीड कोटी व उत्पन्न ५ कोटी

असेल अशाच संस्थानांत प्रातिनिधिक राज्यपद्धतीचा उपक्रम करण्यात यावा, अशी एक सूचना एका नियतकालिकांत प्रसिद्ध झालेली मीं पाहिली. ही इयत्ता लेखकानें कोणत्या आधारानें सुचविली हें समजत नाहीं; पण हैद्राबाद सारखें संस्थानही या शर्तीप्रमाणें प्रातिनिधिक राज्यपद्धतीला पात्र ठरेल कीं नाहीं याची शंकाच आहे. पाश्चात्य देशांतील दहालक्ष लोकवस्तीचीं लहान लहान राष्ट्रेंही प्रातिनिधिक पद्धतीवर आपली राज्यव्यवस्था चालवितात हें मशहूर आहे. पाश्चात्य राष्ट्रांतील लोकांची मिळकत मोठी असल्यामुळें कर भरण्याची ताकदही त्यांच्या अंगीं हिंदी लोकांपेक्षां अधिक असते हें खरें; पण त्या अंदाजानें हिंदुस्थानांतील संस्थानिकांचे बाबतींत लोकवस्ती व उत्पन्न यांच्या इयत्तेची कांहीं मर्यादा निश्चित करणें अशक्य नाहीं.

## कांहीं संस्थानिकांना रजा दिली पाहिजे.

हिंदुस्थानांतील सर्वच संस्थानिक व त्यांचीं संस्थानें यावचंद्रदिवाकरौ-अबाधित राहतील किंवा रहावींत असें केव्हांही म्हणतां यावयाचें नाहीं. सर्व संस्थानें सारख्या व एकाच दर्जाचीं आहेत असें नाहीं; त्यांतील भेद मॉंटेग्यु-चेल्म्सफर्ड रिपोर्टांत थोडक्यांत दर्शविला आहे. पण त्याकडे अद्यापि कोणीच लक्ष पुरविलें नाहीं. कोणतीं संस्थानें कायम राखलीं जावीं याविषयीं लिहितांना या रिपोर्टांत म्हटलें आहे कीं, ज्या संस्थानिकांना आपल्या राज्यांत संपूर्ण अधिकार असतील त्यांच्या रक्षणाबद्दलचाच उल्लेख आहे; अर्थात् कमी अधिकारांच्या लहानसान संस्थानिकांस कायमचें अस्तित्व लाभूं यावें अशी रिपोर्ट-कारांची समजूत नाहीं; पण या भागाकडे सरकारनें मुळींसुद्धां लक्ष्य पुरविलें नाहीं. चेंबर ऑफ प्रिन्सेस अस्तितांत आणण्याची व्यवस्था मात्र ताबडतोब करण्यांत आली. हिंदुस्थानांत जीं लहान मोठीं संस्थानें आहेत त्यांचा संबंध शुद्ध बादशाहाशीं किंवा बादशाहांच्या वतीनें व्हाइसरॉयाशीं आहे. व त्या सर्वांशीं कोणत्याना कोणत्या तरी प्रकारचे सनदा, करारनामे वगैरे झालेले आहेत त्यांचा अर्थ लावीत बसण्यांत वकिलांना अर्थात भूषणच वाटणार ! व या सनदांनुसार हीं सर्व संस्थानें चिरंतन टिकलींच पाहिजेत असा निर्णय न्यायकोर्टें देणार हें उघड आहे. पण जनता, त्यांचे पुढारी व मुत्सद्दी यांनीं याच दृष्टीनें आपणांस

बांधून घेणें व सारासार विचारास व सुधारणेच्या ओघास पराङ्मुख होणें शक्य व इष्ट नाहीं. शिवाय संस्थानिकांशीं झालेले सर्व करारमदार व सनदा अगदीं मुळांतल्याप्रमाणेंच आजपर्यंत अबाधित राहिल्या आहेत व त्यांत कोणताही फेरबदल घडून आला नाहीं, असें थोडेंच आहे. खुद्द साम्राज्यसरकार आपल्या फायद्याचा प्रश्न आला असतां या सनदांत फेरबदल करतेंच कीं नाहीं? व यापुढेंही तसा तो करणार नाहीं अशी हमी कोण व कशी देणार? जी गोष्ट साम्राज्यसरकारला आपल्या हिताकरितां करणें शक्य आहे ती संस्थानी प्रजेच्या हिताकरितांही करावयासच पाहिजे. या न्यायानें कांहीं संस्थानिकांना रजा द्यावी लागणार हें ओघानेंच ठरतें. मात्र सरसकट सर्व संस्थानांसंबंधानें माझें हें बोलणें नाहीं, हें आपण लक्ष्यांत ठेवावें अशी माझी विनंती आहे.

## स्वातंत्र्याच्या मार्गांतील अडचणी.

हिंदुस्थानांत यापुढें फेडरेशनच्या पद्धतीवर राज्यघटना व्हावी अशी कित्येक राजकीय पुढाऱ्यांची कल्पना आहे. परंतु या व्यवस्थेंत हीं सर्व ५६१ संस्थानें कशीं समाविष्ट करावयाचीं व हें शक्य तरी आहे काय? यांपैकीं कित्येक संस्थानें इतकीं लहान आहेत कीं त्यांचें क्षेत्रफळ एक हजार एकरांपेक्षां अधिक नाहीं व कित्येकांचें उत्पन्नही एक हजारापेक्षां जास्त नाहीं. इतक्या लहान संस्थानांत तेथील लोकांना आपल्या शारीरिक व बौद्धिक विकासास वाव तो कितीसा मिळणार? त्यांतून ज्यांची उत्तम प्रकारच्या राज्यकारभाराबद्दल परंपरागत प्रसिद्धि आहे व प्रजेच्या हिताकडे लक्ष्य पुरविण्याचा धर्म जीं पाळत आलीं आहेत अशीं म्हैसूर, त्रावणकोर, कोचीन सारखीं थोडीं संस्थानें अशीं आहेत कीं, फेडरेशनच्या राज्यव्यवस्थेंत ज्यांचा समावेश करतां येईल. पण सर्वच लहानसान, व अव्यवस्थेबद्दल दुष्कीर्ति मिळालेलीं संस्थानें कायम रहावींत व त्यांचा फेडरेटेड इंडियांत अंतर्भाव स्वतंत्र अस्तित्वाच्या रूपानें रहावा अशा कल्पनाही आपणांस करणें अशक्य आहे.

## संस्थानांकरितां स्वतंत्र रॉयल कमिशन.

कोणतीं संस्थानें फेडरल गव्हर्नमेंटमध्यें ठेवण्यास लायक आहेत व कोणतीं लायक नाहींत ही सीमारेषा कोणीं ठरवावयाची? कारण कोणीं तरी केवळ दंडपशाहीनें ही निवडानिवड केल्यास तिला कोणताही संस्थानिक

काडीची किंमत देणार नाहीं. याकरितां ब्रिटिश व हिंदी साम्राज्यांतील सर्वांत बुद्धिमान्, निःपक्षपाती व लायक अशा गृहस्थांचें चौकशीकरितां एक न्यायकोर्ट मुद्दाम बसविणेंच जरूर आहे. मग त्याला न्यायकोर्ट म्हणा कीं रॉयल कमिशन म्हणा. असें कमिशन हिंदुस्थानांत येऊन त्यानें संस्थानिकांचे करारमदार, तहनामे, राज्यपद्धति, लायकी नालायकी, वगैरे सर्व दृष्टींनीं चौकशी करून आपल्या शिफारशी पार्लमेंटकडे पाठविल्या पाहिजेत. या रॉयल कमिशनवर सार्वभौम बादशहांचे प्रतिनिधि, ब्रिटिश हिंदुस्थानांतील लोकप्रतिनिधि, काळजीपूर्वक निवडलेले संस्थानिकांचें कांहीं प्रतिनिधि व संस्थानांतील प्रजाजनांचें प्रतिनिधि घेतले जाणें जरूर आहे. संस्थानांतील प्रजेला या बाबतींत वगळून चालणार नाहीं, हा महत्त्वाचा मुद्दा आपण लक्ष्यांत ठेविला पाहिजे. अशा प्रकारचें कमिशन नेमण्याला इंग्लंडांतील मुत्सद्दी सहजासहजीं तयार होतील असा मुळींच संभव नाहीं. त्यांना तसें कमिशन नेमण्यास भाग पाडण्याकरितां मोठी चळवळ केल्यावांचून गत्यंतर नाहीं. व हें काम मुख्यतः संस्थानी प्रजेनें पुढाकार घेऊन व ब्रिटिश हिंदुस्थानांतील लोकांची सहकारिता मिळवून केलें पाहिजे. संस्थानी प्रजा जर आहे हीच स्थिति रामराज्यांतील आहे असें म्हणून स्वस्थ बसेल तर हा प्रश्न निकालास लागणें कठीण आहे हें लक्ष्यांत ठेवा.

## हितशत्रूंची जबरदस्त संघटना.

संस्थानी प्रजाजन व ब्रिटिश हिंदुस्थानचे प्रजाजन यांच्या विरुद्ध फारच मोठी व जबरदस्त अशी संघटना आहे या गोष्टीकडे आपलें दुर्लक्ष होऊं देतां कामा नये. हिंदी राजकीय पुढाऱ्यांनीं हिंदुस्थानास जबाबदारीचें स्वराज्य देण्याचा प्रश्न काढण्याचा अवकाश कीं लगेच लॉर्ड बर्कनहेड, लॉर्ड बाल्फर व टोरीपक्षाचे प्रमुख सभासद यांच्यापासून थेट अँग्लोइंडियन नोकरशाहीपर्यंतचे सर्व अधिकारी हिंदी संस्थानांची व्यवस्था तुम्ही काय लावूं इच्छितां ? असा प्रश्न सोचून विचारतात व त्याला त्याच आवेशानें आपणांतील कित्येक पुढारी उत्तर देतात कीं, हिंदी संस्थानांची ब्याद तुम्हींच उत्पन्न व जतन केली आहे तेव्हां त्यांची व्यवस्था लावण्याची जबाबदारीही तुमच्यावरच आहे. असें जरी आहे तरी संस्थानांच्या चौकशीचें रॉयल कमिशन जेव्हां आपल्या प्रयत्नानें नेमलें

जाईल व तें चौकशीसाठीं हिंदुस्थानांत येईल त्यावेळीं त्याच्यापुढें आपली बाजू जोरदार रीतीनें पण समंजसपणें मांडण्याची तजवीजही आपण एव्हांपासूनच करावयास लागलें पाहिजे.

## संस्थानिकांचें धोरण.

ब्रिटिश हिंदुस्थानांतील स्वराज्याच्या चळवळीस चेंबर ऑफ प्रिन्सेस-मधील कित्येक प्रमुख संस्थानिक आपलेपणानें पाठिंबा देतात व कित्येक वेळां ब्रिटिश हिंदुस्थानांतील उत्तम देशभक्ताप्रमाणेंच या चळवळीचा पुरस्कार करतां-नाहीं आढळतात ही गोष्ट खोटी नाहीं. पण स्वतःच्या प्रजेला **जबाबदारीची सत्ता** देण्याचा नुसता विचार करण्यासही त्यांना मुळींसुद्धा फुरसत मिळत नाहीं ही लक्ष्यांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे. तुम्ही आपल्या प्रजेला जबाबदारीचें स्वराज्य कां देत नाहीं असें त्यांना कोणी विचारल्यास ते म्हणतात कीं आमच्या प्रजेला या गोष्टीची काय आवश्यकता आहे ? आमचा राज्यकारभार उत्तम प्रकारें चालला आहे. प्रजेवर जास्त कराचा बोजा आम्ही लादत नाहीं. सर्व जातींत समाधान नांदावें अशी दक्षता आम्ही बाळगतों, व पैशाचा विनि-योगही पूर्वापार वहिवाटीप्रमाणें करून प्रजेच्या सुखसोयीची व संरक्षणाची काळजी वहातों. त्यांतून आम्ही एक कायदेमंडळही स्थापन केलें आहे ! या पलीकडे आणखी काय करावयास पाहिजे ! " संस्थानिकांची ही विचार-सरणी पाहिली म्हणजे ब्रिटिश हिंदुस्थानांतील स्वराज्याच्या चळवळीस ते दाखवीत असलेली सहानुभूति कितपत प्रामाणिकपणाची आहे याचा उलगडा होतो. आपल्या प्रजेस जबाबदारीची सत्ता देणें हें आपलें धोरण असल्याचें अद्यापि कोणाही संस्थानिकानें जाहीर केलें नाहीं. किंवा या बाबतींत विश्वास बसण्याइतकें अभिवचन दिलेलें नाहीं. अशा स्थितींत कित्येक संस्थानिक ब्रिटिश हद्दींतील स्वराज्याच्या चळवळीस पाठिंबा देतात याचें कारण असें कीं, ब्रिटिश राज्याविषयीं त्यांच्या मनांत द्वेष असतो. आपलें पूर्ववैभव, मानाप-मानाच्या कल्पना व आकांक्षा या त्यांना सुटलेल्या नसतात. ब्रिटिश सर-कारकडून त्यांची अनेक वेळां मानखंडना होते. या कारणानें खालसांतील ब्रिटिशांची सत्ता मावळलेली बरी असें त्यांना ब्रिटिशांच्या केवळ द्वेषामुळें वाटतें. हिंदी प्रजेला स्वराज्याचे अधिकार मिळावे अशी त्यांना इच्छाच

नसते. कारण असें नसतें तर आपल्या ताब्यांतील प्रजेला त्यांनीं लोकशाहीचे अधिकार देण्याचा उपक्रम तरी पद्धतशीरपणें सुरू केला असता; पण तसें कोठेंच दिसून येत नाहीं.

हिंदी संस्थानिकांच्या संबंधांत हिंदी पुढाऱ्यांतील सर्व लोकांचेंही कांहीं निश्चित धोरण आहे असें दिसत नाहीं. संस्थानिक व त्यांचीं घराणीं याविषयीं यांचा **अंध आदर** व अभिमान कित्येक राजकीय पुढाऱ्यांनाही सुटलेला नाहीं. नाभा, इंदूर वगैरे कांहीं संस्थानिकांना व्हॉइसरॉयसाहेबांनीं ज्या तऱ्हेनें वागविलें त्यामुळें हिंदी संस्थानिकांच्या मनांत तर कांहीं दहशत उत्पन्न झालीच आहे. पण ब्रिटिश हद्दींतील कित्येक राजकीय पुढाऱ्यांनींही या संस्थानिकांचा पक्ष घेऊन ब्रिटिश सरकारविरुद्ध चळवळ सुरू ठेविली आहे. ही त्यांची चळवळ मला स्वतःस **पसंत नाहीं** हें स्पष्टपणें सांगणें माझें अप्रिय पण कर्तव्य आहे असें मला वाटतें. संस्थानिकांना ते **करतील ती पूर्वदिशा** अशी स्थिति प्राप्त होऊं देणें लोकशाहीच्या दृष्टीनें केव्हांही श्रेयस्कर नाहीं.

शेवटीं आणखी एका गोष्टीकडे आपलें लक्ष्य वेधणें जरूर आहे. आपणास आवडो किंवा न आवडो, पण हिंदुस्थानच्या भवितव्यतेचीं सर्व सूत्रें ब्रिटिश-जनतेच्या व तद्द्वारा ब्रिटिश पार्लमेंटच्या हातांत आहेत ही सत्यस्थिति दृष्टीआड करून चालणें शक्य नाहीं. करितां संस्थानिकांसंबंधीं कोणतीही सुधारणा अमलांत आणावयाची झाली तर तिला अखेरची मंजुरी ब्रिटिश पार्लमेंटचीच घ्यावी लागणार हें उघड आहे. पार्लमेंटपुढें मांडण्यासाठीं स्वराज्याच्या योजना मधून मधून तयारही होत असतात. डॉ. मिसेस बिझांट यांचें कॉमन वेल्थ ऑफ इंडिया बिल ही यापैकीं एक महत्वाची योजना आहे व ती अनेक दृष्टींनीं फार चांगली असून हिंदी लोकांकडून तिला बराच पाठिंबाही मिळाला आहे. तथापि संस्थानिकांच्या भावी व्यवस्थेच्या प्रश्नाकडे त्यांत लक्ष्य पुरविण्यांत आलें नाहीं हें वैगुण्य त्यांतही आहेच व ही बाब योग्य प्रकारें निकालांत लागावी व संस्थानिकांसंबंधानें पार्लमेंटपुढें मंजुरीसाठीं योग्य अशी कांहीं योजना मांडली जावी याकरितां वर सुचविल्याप्रमाणें एखादें रॉयल कमिशन नेमण्याची व्यवस्था घडवून आणणें आवश्यक आहे.



# अखिल भारतीय संस्थान प्रजा परिषद्.

## मुंबई येथील अधिवेशन.

### मध्यवर्ती कमिटीची स्थापना.

### अपूर्व उत्साह व यशस्वी परिषद्.

**मुंबईंत** ता. १७ व ता. १८ डिसेंबर इ. स. १९२७ रोजीं एतद्देशीय संस्थानांसंबंधानें दोन परिषदा पार पडल्या. एक दक्षिणी संस्थान प्रजापरिषद् व दुसरी अ. भा. संस्थान प्रजा परिषद्. पहिली सर्व्हंट्स ऑफ इंडिया सोसायटीच्या हॉलमध्यें मराठा पत्राचे संपादक रा. **दा. वि. गोखले** यांच्या अध्यक्षतेखालीं पार पडली; आणि दुसरी अखिल भारतीय संस्थान प्रजापरिषदेची बैठक माधवबागेंत मुद्दाम उभारलेल्या विस्तृत मंडपांत मद्रासचे **दि. ब. रामचंद्रराव** यांच्या अध्यक्षतेखालीं झाली.

× × ×

मुंबईच्या इं. नॅशनल हेरल्ड पत्रानें अखिल भारतीय परिषद् प्रातिनिधिक नाहीं अशी कित्येक दिवस टीका चालविली होती. पण प्रत्यक्ष परिषदेचें काम पाहाणारांस तिचें प्रातिनिधिक स्वरूप सहज पटण्यासारखें होतें. हिंदुस्थानच्या निरनिराळ्या भागांतील संस्थानांतून या परिषदेसाठीं शेकडों प्रतिनिधी आले होते. पंजाबांतील नाभा संस्थान, काठेवाडांतील अनेक संस्थानें, बडोदा वगैरे गुजराथमधील संस्थानें, दक्षिणेंतील संस्थानें वगैरे निरनिराळ्या भागांतील संस्थानांचे प्रतिनिधी परिषदेसाठीं मुद्दाम आले होते. बडोद्याचे राजपुत्र कुमारी

श्री. **धैर्यशीलराव** हेहि या परिषदेला पहिल्या दिवशीं हजर होते. त्याचप्रमाणें इंग्लंडमधील स्वतंत्र लेबर पक्षाचे सेक्रेटरी मि. **एफ ब्राकवे** हे या परिषदेला आले होते.

× × ×

माधवबागेंत परिषदेसाठीं मुद्दाम विस्तृत मंडप उभारण्यांत आला होता व परिषदेसाठीं जमलेल्या प्रतिनिधींची व्यवस्था ठेवण्यांत स्वयंसेवक दंग झाले होते. सकाळीं गांवांतून स्वयंसेवकांची मिरवणूकही काढण्यांत आली होती. पताका, निशाणें व सुबोध वचनें लावून मंडप शृंगारण्यांत आला होता. उच्चासनावर मागच्या बाजूस ' स्वातंत्र्यहीन जीवित असह्य आहे. ( Life without freedom is unbearable )" अ. भारतीय संस्थान प्रजापरिषद् देशभक्तांचें स्वागत करते " अशीं वचनें लावलीं होतीं. व मंडपांत ठिकठिकाणीं गुजराथी व हिंदी कवींचीं, निवडक वचनें लावलीं होतीं. परिषदेच्या कामाला शनिवार ता. १७ डिसेंबर रोजीं दुपारीं तीन वाजतां सुरुवात झाली. पण त्यापूर्वीं बराच वेळ प्रतिनिधी मंडपांत जमूं लागले होते. अध्यक्ष दि. ब. रामचंद्रराव सभास्थानीं येतांच सर्वांनीं उभें राहून त्यांचें स्वागत केलें, व वंदे मातरम्चा जयघोष केला. उच्चासनावर बरीच प्रमुख मंडळी बसली होती. त्यांत स्वागताध्यक्ष श्रीयुत गोविंदलाल शिवलाल, सर लल्लूभाई सामळदास, बडोद्याचे डॉ. सुमंत मेहता, जमनालाल बजाज, राजस्थानचे श्री. विजयसिंह पथिक, श्री. मणिलाल कोठारी, श्रीयुत केशवराव, रा. न. चिं. केळकर, रा. गणपतराव, अभ्यंकर ( सांगली ), मिसेस अतिया बेगम, सर पुरुषोत्तमदास ठाकूरदास, सर फिरोज सेटना, मि. जी. बी. त्रिवेदी, रा. श्री. ग. वझे, रा. अमृतलाल ठक्कर, श्री. राघवेंद्र शर्मा, एल. आर. तेरसी, मि. मथुरादास, सरदार दिवाणसिंगजी ( नाभा ), मि. अमृतलालशेट, मि. चुडगर, मि. चौधरी वगैरे मंडळी प्रामुख्यानें दिसत होती. मंडपांत एक हजारापेक्षां अधिक लोक जमले होते. बऱ्याच स्त्रियाहि परिषदेस आल्या होत्या.

आरंभीं गुजराथी मुलींनीं स्वागतपर पद्यें म्हटल्यावर स्वागताध्यक्षांचें भाषण झालें. अध्यक्षांच्या निवडणुकीची सूचना करितांना श्री. पथिकजी म्हणाले कीं, संस्थानच्या दृष्टीनें आतां अत्यंत आणीबाणीची वेळ आली

आहे. संस्थानें व ब्रिटिश सरकार यांचे संबंध कसे असावे, तहनाम्यांचे अर्थ काय वगैरे ठरविण्याकरितां एका कमिशनची नेमणूक करण्यांत आली आहे. पण त्या कमिशनच्या कार्यक्षेत्रांत संस्थानी प्रजाजनांच्या हितसंबंधाकडे मुळींच लक्ष पुरविण्यांत आलेलें नाहीं ही दुःखाची गोष्ट होय.

सध्यांच्या आणीबाणीच्या वेळीं दि. ब. रामचंद्रराव यांच्यासारखा कायद्याचा व राजकारणशास्त्राचा अभ्यास केलेला पुढारी आपल्याला अध्यक्षस्थानीं मिळाला ही सुदैवाची गोष्ट होय. दि. ब. रामचंद्रराव हे लेजिस्लेटिव्ह असेंब्लीचे उपाध्यक्ष होते व संस्थानी प्रश्नांचाही त्यांनीं चांगला अभ्यास केला आहे. तेव्हां त्यांनीं अध्यक्षस्थान स्वीकारावें अशी माझी सूचना आहे.

या सूचनेला बडोद्याचे डॉ. सुमंत मेथा, सर लल्लूभाई सामळदास, मि. मणिलाल कोठारी, श्री. केशवराव, दिल्लीच्या **रिसायत** पत्राचे संपादक सरदार दिवाणसिंगजी, रा. न. चिं. केळकर, मि. तरसी, मि. मथुरादास व मि. जमनालाल बजाज यांनीं अनुमोदन व पुष्टि दिली. डॉ. सुमंत मेथा यांचें भाषण चालूं असतां बडोद्याचे राजपुत्र श्री. धैर्यशीलराव सभागृहांत येऊन दाखल झाले. तेव्हां वंदेमातरम्‌चा जयघोष करण्यांत आला व सर्वांनीं त्यांचें स्वागत केलें. रा. नरसोपंत केळकर यांनीं कालमानाप्रमाणें संस्थानिकांनीं आपलें धोरण बदलणें जरूर आहे, नाहीं तर त्यांना अनिष्ट परिणाम भोगावे लागतील, असा इशारा दिला.

याप्रमाणें भाषणें झाल्यावर अध्यक्ष टाळ्यांच्या प्रचंड गजरांत स्थानापन्न झाले. तेव्हां त्यांना पुष्पहार घालण्यांत आले. नंतर त्यांनीं आपलें भाषण वाचून दाखविलें. त्यांच्या भाषणानंतर विषयनियामक मंडळ नेमण्यांत आलें.

स्वागताध्यक्ष

## श्री. गोविंदलाल राजाबाहादूर शिवलाल मोतीलाल यांचें भाषण.



अखिल भारतीय संस्थान प्रजापरिषदेचे स्वागताध्यक्ष आपल्या भाषणांत म्हणाले, ' मुंबई शहर हें या परिषदेसारख्या परिषदेच्या अधिवेशनाला उत्कृष्ट जागा होय. कारण ५६२ संस्थानांपैकीं ४०० संस्थानें मुंबई इलाख्याला लागून आहेत. सध्यां चोहोंकडे स्वातंत्र्याची चवळवळ उत्पन्न झाली असून हिंदुस्थानांतील संस्थानी प्रजेलाहि तिची बाधा झाली आहे. ब्रिटिश हिंदुस्थान व हिंदी संस्थानें यांचे प्रश्न साधारणपणें सारखेच असले तरी संस्थानांचे कांहीं प्रश्न विशिष्ट स्वरूपाचे आहेत. श्रीराम, बुद्ध, विक्रमादित्य आणि अकबर यांचें परंपरेनें स्मरण संस्थानी इतिहासांत कायम आहे. सध्यां संस्थानें व सार्वभौम सरकार यांच्यामधील संबंधांची चौकशी करण्याकरितां एक कमिटी नेमण्यांत आली आहे. परंतु संस्थानिकांनीं हें पक्कें लक्षांत ठेवावें कीं, सार्वभौम सरकारला आपलीं वचनें पाळण्याला एकच उपाय शक्य आहे. तो म्हटला म्हणजे प्रजाजनांची मदत हा होय. सध्यां संस्थानांचा अंतर्गत कारभार बेजबाबदारपणानें चालतो. दिवाणांवरही या ऑटॉक्रसीची छाया पडलेली असते. न्यायदानाची स्थिति शोचनीय आहे. सर्वत्र लांचलुचपत माजून राहिली असून कायद्याचें साम्राज्य संस्थानांत कांहींच नाहीं असें म्हटलें तरी चालेल. संस्थानांत कायद्याचा पवित्रपणा, विचारस्वातंत्र्य, न्यायदानाची सुधारणा, आणि लोकप्रतिनिधींचें बहुमत असलेलीं कायदेमंडळें स्थापन होणें जरूर आहे. खासगी खर्च मर्यादित केला पाहिजे. संस्थानांतील जनतेच्या गरजांची चौकशी या नवीन नेमलेल्या कमिशननें करावी. लहान लहान संस्थानांचे गट करून त्यांजवर संस्थानिकांपैकींच कोणाला तरी कॉन्स्टिट्यूशनल गव्हर्नर नेमावें. या संस्थानांचे मध्यवर्ती सरकारशीं संबंध जोडणें व एक फेडरेशन स्थापणें जरूर आहे.

अध्यक्ष

# दि. ब. एम. रामचंद्रराव यांचें भाषण.



आपल्याला अध्यक्षस्थान दिल्याबद्दल मनःपूर्वक आभार मानून दि. ब. एम. **रामचंद्रराव** म्हणाले, आपण निरनिराळ्या राज्यकारभाराखालीं असलों तरी संस्थानें व ब्रिटिश हिंदुस्थान यांमध्यें कित्येक बाबी समायिक विचार करण्यासारख्या आहेत. संस्थानें आणि ब्रिटिश इंडिया यांचा एकमेकांशीं कांहीं संबंध नाहीं अशी आजपर्यंत समजूत होती; पण, ती यापुढें सोडून दिली पाहिजे. ही समजूत दूर करण्यास तुमची परिषद् व इतर संस्था यांनीं आतांपर्यंत चांगली मदत केली आहे, या गोष्टीचा अभिनंदनपूर्वक निर्देश करणें जरूर आहे. संस्थानांच्या अंतर्गत कारभारांत खालसांतील प्रजाजनांना हात घालतां येत नाहीं आणि, खालसांतील कारभाराशीं संस्थानांचा कांहीं संबंध पोहोंचत नाहीं हें जरी खरें असलें, तरी स्वराज्यप्राप्तीच्या बाबतींत उभयतांचें सहकारित्व व संगनमत होणें अवश्य आहे. खालसांतील मुलुखांत स्वराज्यप्राप्तीच्या योजनेची सिद्धता होत असतां संस्थानांनीं निश्चल राहणें हें शक्य नाहीं. म्हणूनच संस्थानांतील प्रजाजनांकडून एतद्विषयक जे प्रयत्न चालू आहेत त्यांचें मी याच दृष्टीनें स्वागत करतों.

## संरक्षणाचा प्रश्न.

ज्यांत खालसा व संस्थानें यांचा हितसंबंध एकात्मक आहे अशा अनेक बाबी दाखवितां येतील. पण त्यांतील सर्वांत मुख्य म्हणजे परचक्रापासून हिंदुस्थानचें संरक्षण करणें व हिंदी सैन्यास राष्ट्रीय स्वरूप देणें ही होय. गेल्या महायुद्धांत निरनिराळ्या रणांगणांवर खालसांतील लोकांप्रमाणेंच संस्थानांतील लोकांनींहि जी उत्कृष्ट कामगिरी करून दाखविली ती आपल्या सर्वांच्या आठवणींत ताजीच आहे. या कामगिरीबद्दल आपली सर्वतोमुखीं वाहवाच झाली. युद्धांत केवळ भाडोत्री सैनिकांवर निभाव लागत नाहीं त्याकरितां नागरिक सैन्याची आवश्यकता लागते .ही गोष्ट युद्धानें दृष्टोत्पत्तीस आणली. राष्ट्रांतील क्षात्रवृत्तीच्या व वैश्य वृत्तीच्या दोन्ही नागरिकांचें भरपूर सहाय्य मिळाल्याशिवाय युद्ध शेवटास नेणें शक्य नसतें ही स्थिति या वेळीं प्रत्ययास

आली. अर्थात्, याच परिस्थितीनें राष्ट्रीय सैन्य उभारणें, त्या सैन्यावर हिंदी अधिकारीच नेमणें, ब्रिटिश अधिकाऱ्यांची संख्या उत्तरोत्तर कमी करून अखेर ती शून्यावर आणणें वगैरे प्रश्न तांतडीनें उपस्थित झाले आहेत. तीन वर्षांपूर्वी या प्रश्नांचा विचार करण्याकरितां संढर्स्ट कमिटी नेमिली होती तिचा मीही सभासद होतों. त्या कमिटीस एतद्देशीय संस्थानांचाही विचार करावा लागला. हिंदी सैन्यांतील कांहीं जागांवर संस्थानांतील लोकांचीही योजना झाली पाहिजे व लष्करी शिक्षणाच्या संस्थांतही कांहीं जागा या लोकांकरितां राखून ठेवण्यांत आल्या पाहिजेत असें कित्येक साक्षीदारांनीं कमिटीपुढें सांगितलें. आतांच एतद्देशीय संस्थानांतील लोकांना किंग्ज कमिशन्स हक्कानें मिळतात आणि खालसांतील लोकांप्रमाणें संस्थानांतील प्रजाजनांनाही हिंदुस्थानांतील लष्करी कॉलेजांत प्रवेश मिळावा अशी आमची शिफारस आहे. यावरून संरक्षणाच्या बाबतींशीं ब्रिटिश हिंदुस्थानाप्रमाणेंच संस्थानांचाही कसा निकट संबंध पोहोंचतो हें लक्ष्यांत येईल. या बाबतींत आजच कांहीं योजना करण्यांत आली आहे आणि सँढर्स्ट कमिटीच्या शिफारशीप्रमाणें तजवीज झाल्यास संस्थानी व खालसा सैन्याचा चोखपणा पाहून दोघांतही एकवाक्यता उत्पन्न होईल.

## नाण्याचा प्रश्न व व्यापारविषयक धोरण.

ब्रिटिश हिंदुस्थान व संस्थानें यांचा परस्पर निकट संबध पोहोंचतो अशी दुसरी बाब म्हटली म्हणजे नाण्याचा प्रश्न व व्यापारविषयक धोरण ही होय. व्यापारविषयक जकातीच्या प्रश्नांशीं दोघांचेही हितसंबंध सारखेच निगडित झाले आहेत. **फिस्कल** कमिशनच्या शिफारशींवर असेंब्लींत वादविवाद झाला याचा परिणाम संस्थानविषयक या प्रश्नावरही झाल्याशिवाय राहणार नाहीं. दोन तीन वर्षांपूर्वी कमिटीची बैठक होऊन तिनें **कर** ज्या शिफारशी केल्या त्यांत समुद्रकिनाऱ्यालगत असलेल्या संस्थानांच्या जकातीच्या प्रश्नांचाही अंतर्भाव करणें जरूर पडलें. काठेवाडांतील संस्थानांनीं बंदरावरील जकात बसविल्यामुळें ब्रिटिश हिंदुस्थानांतील कस्टम्स जकातीचें नुकसान झालें. त्यासंबंधांत बऱ्याच भानगडी उत्पन्न होऊन मार्कुंट अबूस हिंदुस्थान सरकार व संस्थानें यांच्या प्रतिनिधींची परिषद झाली, पण त्या परिषदेंतून कांहींच निष्पन्न न होतां हिंदु-

स्थान सरकारनें काठेवाड संस्थान बंदरावर आपले कस्टम जकातीचें ठाणें बसविलें, व त्यायोगानें अनेक महत्त्वाचे व परस्पर हक्काचे प्रश्न उपस्थित झाले आहेत. असे प्रश्न ब्रिटिश हिंदुस्थान व संस्थानें यांच्या सहकारितेनेंच मिटणें जरूर आहे.

## हिंदुस्थानसरकारचें अफूचें धोरण.

गेल्या मे महिन्यांत संस्थानांची अफू परिषद भरली होती. त्या परिषदेंत हिंदुस्थानसरकारच्या धोरणाविषयीं विचार झाला. अफूची निर्गत फक्त औषधाकरतां व्हावी, इतर प्रकारें होऊं नये हें या बाबतींत हिंदुस्थानसरकारचें ध्येय आहे. या ध्येयांत संस्थानांचा समावेश झाल्याशिवाय तें प्राप्त होणें अशक्य होय. या बाबतींत हिंदुस्थानसरकारनें संस्थानांच्या प्रतिनिधींशीं युक्तिवाद करून जें धोरण प्रतिपादन केलें, त्यास संस्थानांनीं मान्यता दिली. संस्थानें आणि खालसा मुलूख यांचे हितसंबंध परस्परांशीं कसे निगडित झाले आहेत याचे हेंही एक स्पष्ट उदाहरण आहे.

## संघाचें तत्त्व.

रेव्हेन्यु, पोलिस, न्याय वगैरे सर्व बाबतींत ब्रिटिश हिंदुस्थान व संस्थानें यांचे संबंध परस्परावलंबी असतात. एकापासून दुसरा अलग ठेवूं म्हटलें तर तें शक्य नसतें. हिंदुस्थानाबाहेर उपस्थित होणाऱ्या बाबींसही हाच न्याय लागू पडतो. ब्रिटिश वसाहतींतील हिंदी लोकांच्या प्रश्नांशीं खालसाप्रमाणें संस्थानांचाही संबंध आहे. स. १९२७ सालीं हिंदुस्थानच्या राज्यपद्धतीसंबंधानें जाहीर झालेल्या धोरणामुळें तर खालसा व संस्थानें यांचा जणूं काय एक संघ आहे. अशा रीतीनेंच येथील राजकीय प्रश्नांची व राज्यकारभाराची विल्हेवाट लागणें जरूर आहे, ही गोष्ट स्पष्टपणें निदर्शनास आली आहे. मॉंटेग्यूचेम्सफर्ड रिपोर्टांत तसा निर्देशही केलेला आहे. खालसा व संस्थानें यांचा संघ व्हावा अशी आपण आज सूचना करीत आहोंत, तिची रूपरेषा सदर रिपोर्टांत दहा वर्षांपूर्वीच दर्शविण्यांत आली आहे.

## लोकमताची वाढ.

संस्थानांत स्वराज्यासंबंधानें परिषदांच्या वगैरे द्वारें अलीकडे जी चळवळ सुरू झाली आहे, त्यावरून खालसांतील राजकीय विकासाचा संस्थानांतील प्रजा-

जनांवरही इष्ट परिणाम होऊं लागला असल्याचें दृश्य संथानिकांना दिसूं लागलें आहे. संस्थानिकांचें एक शिष्टमंडळ विलायतेंत गेल्यामुळें तेथील लोकांचेंही या सुधारून संस्थानांचाही हिंदुस्थानाविषयक राज्यघटनेंत समावेश झाला पाहिजे असें कित्येक वजनदार व्यक्तींचेंही ठाम मत झालें आहे. कॉमन वेल्थ ऑफ इंडिया बिलमध्यें व मजूर पक्षानें तयार केलेल्या योजनेंत संस्थानविषयक प्रश्नांचा विचार करण्यांत आला आहे. अमेरिकेंतील युनायटेड स्टेट्सच्या राज्यघटेनत निरनिराळ्या संस्थानांचा जो दर्जा असतो तसाच दर्जा येथील राज्यघटनेंत संस्थानांचा असला पाहिजे, असेंच आज लोकमत होत चाललें आहे.

## संस्थानिकांची वृत्ति.

अशा प्रकाराची घटना निर्माण करण्यांत निःसंशय अडचणी आहेत; पण त्या अनिवार्य नाहींत. यांशीं संस्थानिकांचा संबंध आहे, त्यांची या बाबतींत असावी तशी वृत्ति नाहीं. ही शंका सिमला परिषदेनें बळावलीच आहे. त्या परिषदेंत संस्थानिक व परिषद् यांचें काय खलबत झालें याचा सुगावा लागला नाहीं. परिषद् कशाकरितां भरली व तींत झालेल्या चर्चेचा काय निर्णय झाला या गोष्टी अद्याप गुप्तच आहेत. रायल कमिशनचें मत कलषित करण्याकरितांच संस्थानिकांचा उपयोग करण्यांत येत आहे, अशी वर्तमानपत्रांतून टीका झाली. संस्थानिकांच्या हक्कांचें परिपालन करण्याचें निमित्त दाखवून स्वराज्याच्या मागणीविरुद्ध त्यांचें सहाय्य मिळविण्याचाच हा डाव होता असेंही वर्तमानपत्रांतून विधान करण्यांत आलें आहे. संस्थानिक इतके देशाभिमानशून्य होतील अशी माझी मनोदेवता मला सांगत नाहीं. सिमला परिषदेचा उद्देश कांहीं असो, ती परिषद् झाल्याबरोबर क. हरकर व डॉ. रशब्रुक वुइल्यम्स हे विलायतेस गेले आणि तेथें विलायतेंतील वर्तमानपत्रांत बराच गाजावाजा झाला. त्यांनीं “ संस्थानिक स्वाराज्याच्या आकांक्षेविरुद्ध नाहींत ” असें संस्थानिकांच्यातर्फे जाहीर केलें. जामसाहेबांनींही नुकतेंच असे उद्गार काढले आहेत. पण येवढें आश्वासन पुरें नाहीं. त्यांनीं या योजनेस अनुसरून आपापल्या संस्थानचे राज्यकारभार सुसंगत करण्याचा प्रत्यक्ष प्रयत्न केला पाहिजे.

## कांहीं अडचणी.

ब्रिटिश हिंदुस्थानशीं स्वराज्याच्या बाबतींत निगडित झाल्यानें संस्थानिकांच्या कांहीं हक्कांवर घाला येईल कीं काय, या प्रश्नाचा कित्येक प्रमुख गृहस्थांनीं विचार केलेला आहे. आज संस्थानिकांच्या स्वतंत्र वर्तनावर नियंत्रण आहेच. हिंदुस्थानचें संरक्षण करण्याची समवायीक जबाबदारी संस्थानांवरही अंशतः आहेच. त्याचप्रमाणें संस्थानचा कारभार लोकहितबुद्धीनें चालला आहे कीं नाहीं, हें पहाण्याची जबाबदारी हिंदुस्थानसरकारवर आहे. कांहीं संस्थानांची स्वतंत्र सत्ता मान्य करण्यांत आली असून हैद्राबाद, म्हैसूर, त्रावणकोर, बडोदा, ग्वाल्हेर, इंदूर, पतियाळा व बिकानेर यांच्या हातीं अंतर्गत कारभारासंबंधांत आजही बरीचशी सत्ता आहे; तरीपण आपल्या प्रतिनिधींच्या द्वारा संस्थानच्या कारभारावर हिंदुस्थानसरकारास नियमन ठेवतां येतेंच. हिंदुस्थान सरकार व संस्थानिक यांच्या दरम्यान तहनामे झाले आहेत त्या तहनाम्यांची अमंलबजावणी, ते झाले त्या वेळच्या परिस्थितीवरून होत नसून, त्यानंतर आजपर्यंत ज्या ज्या गोष्टी घडून आल्या व ज्या वहिवाटी पडल्या, त्यावरूनच होत आहे. अर्थात् संस्थानांनीं स्वराज्याच्या योजनेंत प्रवेश केल्यामुळें त्यांची स्थिति झाली तर याहून अधिक चांगलीच होईल. आज पोलिटिकल खात्याचा सासुरवास त्यांच्या मार्गे जो आहे तो नवीन घटनेंत त्यांचे हक्क व कर्तव्यें हीं स्पष्ट झाल्यावर रहाणार नाहीं. जर्मनीचीं लहान लहान संस्थानें जशीं एकत्रित करण्यांत आलीं किंवा इटलींतील निरनिराळीं लहान लहान राज्यें एकवट करण्यांत आली, तशींच हिंदुस्थानांतील संस्थानेंही एकाच राष्ट्रीय बंधनानें निगडित करतां येतील. संस्थानांत एकादा बिस्मार्क किंवा काव्हूर झाला तर फार चांगलें होईल.

## लहान लहान संस्थानें.

लहान लहान संस्थानांसंबंधांत पुष्कळशा संस्थानांचे कारभार पोलिटिकल एजंटमार्फतच चालतात, अशा पांचशें बासष्ट संस्थानांपैकीं फक्त तीसच संस्थानें क्षेत्रफळ, लोकसंख्या व उत्पन्न ह्या बाबतींत साधारण एखाद्या ब्रिटिश जिल्ह्यायेवढीं आहेत, तीन संस्थानें अशीं आहेत कीं, त्यांतील लोकसंख्या शंभरच आहे. पांच संस्थानें अशीं आहेत कीं, त्यांचें उत्पन्न १०० रुपये

आहे. अशा संस्थानांचा दर्जा मोठमोठ्या संस्थानांइतका मानण्यांत येणें केव्हांही सयुक्तिक नाहीं.

## संस्थानिकांचा वंशपरंपरा दर्जा.

संस्थानिकांचा वंशपरंपरा दर्जा व मानमरातब हीं नवीन योजनेंत कांहीं शर्तींवर अर्थातच कायम राखणें इष्ट होईल. याचा अर्थ संस्थानिकांचा हल्लींचा सुलतानी अमल कायम राहील असा अर्थातच नाहीं. वंशपरंपरा चालत आलेली राजसत्ता व लोकशाहीच्या तत्त्वावर चाललेले प्रांतिक कारभार यांना एकच समवाईक योजना लागूं करणें केव्हांही शक्य होणार नाहीं, असें लॉर्ड मेस्टन म्हणतात. हा आक्षेप खरा आहे असें घटकाभर मानलें तरी, जबाबदार राज्यपद्धतीकडे वळण्याची जी एकंदर परिस्थिति दिसते ती ओळखूनच संस्थानिकांनीं वागलें पाहिजे. ही जाणीव कित्येक संस्थानिकांनाही झालेली दिसते. ब्रिटिश हिंदुस्थानाच्या धर्तीवरच आपली राजकीय प्रगति झाली पाहिजे, अशी जर माझ्या प्रजाजनांची इच्छा असेल तर ती सफळ करावयास मी कधींही कसूर करणार नाहीं, असे जामसाहेबांनीं नुकतेच उद्गार काढले असल्याचें प्रसिद्ध झालें आहे. इतर संस्थानिकांनींहि अशीच श्रेयस्कर भावना धरल्यास संस्थानांचा प्रश्न सुलभतेनें सुटण्यासारखा आहे.

## राष्ट्रीय सरकार व संस्थानिक.

आज, संस्थानें व बादशहा यांच्यामध्यें जो संबंध आहे तोच संबंध हल्लींप्रमाणें पार्लमेंटला जबाबदार नसलेल्या राष्ट्रीय सरकाराशीं कसा होईल याबद्दल लॉर्ड आलीव्हिअर यांनीं शंका प्रदर्शित केली आहे. सर मालकम हेली यांनीं असेंब्लीमध्यें स्वराज्याचा ठराव आला होता, त्यावेळीं हाच मुद्दा उपस्थित केला होता. देशी संस्थानें व गव्हर्नर जनरल यांचे दरम्यान जे तहनामे झाले ते गव्हर्नर जनरल हे ब्रिटिश कौन्सिलचे प्रतिनिधि या नात्यानें झाले. ते हिंदुस्थान सरकारचे मुख्य या नात्यानें झाले नाहींत असें जें समजण्यांत येतें तें निराधार कसें आहे, हें सर पी. एस. शिवस्वामी अय्यर यांनीं उत्कृष्ट रीतीनें दाखविलें. ज्या सत्तेच्या हातीं हिंदुस्थान सरकारचा कारभार असेल त्या सत्तेशींच हे तहनामे झाले आहेत असें समजलें पाहिजे, हा जो सर शिवस्वामी यांनीं मुद्दा उपस्थित केला आहे तो खरोखर समर्पक आहे. अशा सर्व गोष्टींचा विचार

करून संस्थानिक लोक स्वराज्याच्या योजनेंत आपला प्रवेश करून घेतील असा मला भरंवसा वाटतो.

## अंतर्गत कारभार.

लहान काय किंवा मोठ्या काय, सर्व संस्थानांचें एक सामान्य वैशिष्ट्य असें आहे कीं, तेथील कारभारावर एकाच वरिष्ठाची सर्वस्वी हुकमत असते. एकाच व्यक्तीच्या लहरीवर सर्व कारभार अवलंबून असतो. तो कारभार लोकहितबुद्धीनेंच चालेल असा कांहीं भरंवसा सांगवत नाहीं. अकबर हा चांगला राजा झाला पण आपल्यामागून अकबरच येतील अशी त्यालाही योजना करतां आली नाहीं. लोकहित अव्याहतपणें साधतां येत असेल तर त जबाबदार राज्यपद्धतीनेंच होय.

## नवीन मनु.

बरेच एतद्देशीय संस्थानिक बाहेरच्या जगांतील राजकारणाची हवा पाहून आले आहेत. राष्ट्रसंघाचे सभासद या नात्यानें त्यांना स्वयंनिर्णयाचें तत्त्व उत्कृष्ट रीतीनें समजलें आहे. त्याचप्रमाणें ना विष्णुः पृथ्वीपतिः हें तत्त्व आतां, जुनें पुराणें झालें आहे, तीही गोष्ट त्यांच्या ध्यानांत आली असली पाहिजे. आपल्या संस्थानांत हें तत्त्व जसेंच्या तसेंच चालू रहावें अशी त्यांना अर्थातच आतां अपेक्षा करतां येणें शक्य नाहीं. साम्राज्य परिषदेंत कांहीं संस्थानिकांनीं हिंदुस्थानला वसाहतीचें स्वराज्य मिळण्याबद्दलची मागणी केली आहे.

१९२३ च्या परिषदेंत अलवारच्या महाराजांनीं तर ह्यासंबंधांत उत्कृष्ट भाषण केलें. अशाच प्रकारचीं भाषणें इतर संस्थानिकांनींही केल्याचें दाखवून देतां येईल. अर्थात् संस्थानिकांनीं ह्या परोपदेशे पांडित्याचा आपल्या संस्थानास लाभ करून देणें अत्यंत जरूर आहे.

## सर टी. माधवराव यांचा लेख.

सर टी. माधवराव यांनीं या संबंधांत लिहिलेलें एक मेमोरंडम नुकतेंच प्रसिद्ध झालें आहे. हें मेमोरँडम तीस वर्षांपूर्वीं लिहिलें गेलें; त्यांत संस्थानांतील राज्यकारभाराचा मूळ उद्देश लोकहिताचा असला पाहिजे, त्यांतील व्यक्तिनिष्ठ सत्ता बंद झाली पाहिजे, प्रधानांना जबाबदारी देण्याची कांहीं तरी योजना

अस्तित्वांत आली पाहिजे, कायदा करणारी एक निःपक्षपाती संस्था अस्तित्वांत आली पाहिजे, संस्थानिकांच्या खर्चासंबंधांत कायमची मर्यादा घालण्यांत आली पाहिजे, संस्थानच्या पैशाला त्यांना हात लावतां येतां कामा नये वगैरे तत्त्वें गर्भित केलीं होतीं. संस्थानच्या सुधारणेबद्दल ज्यांना कळकळ वाटत आहे, त्यांना हें मेमोरँडम उत्कृष्ट रीतीनें उपयोगी पडण्यासारखें आहे. कारण संस्थानिकांनीं आपल्या अधिकाराचा दुरुपयोग करूं नये म्हणून सर टी. माधवरावांनीं जे उपाय सुचविले आहेत, त्यांची आजही त्या वेळेइतकीच आवश्यकता आहे. खालसा मुलुखांतील प्रजाजनांना राज्यकारभारांत फरक घडवून आणण्याची मागणी करण्याचा जितका अधिकार आहे, तितकाच संस्थानांतील प्रजाजनांनाही संस्थानांतील राज्यकारभारांत सुधारणा सुचविण्याचा आहे, हें संस्थानिकांनीं विसरतां कामा नये.

## मुख्य सरकारची जबाबदारी.

ह्या संबंधांत मुख्य सरकारची जबाबदारी काय आहे, आणि वहिवाटीमुळें ती जबाबदारी अंतर्गत कारभारासंबंधांत कशी मर्यादित झाली आहे, ह्याचें एका प्रसंगीं लॉर्ड रेडिंग यांनीं निदर्शन केलेंच आहे. ब्रिटिश सरकारनें ही जबाबदारी आजपर्यंत योग्य रीतीनें पार पाडली नाहीं. आपल्या मुलुखांत लोक-हितार्थ राज्यकारभारांत फरक घडवून आणणें इष्ट वाटतें आणि ब्रिटिश हिंदुस्थानांत जबाबदारीचें राज्य स्थापन करणें हें जर त्यांचें ध्येय आहे, तर संस्थानांसंबंधांत-ही अशी व्यवस्था घडवून आणणें हें त्यांनीं आपलें कर्तव्य समजलें पाहिजे.

## चौकशीची जरूरी.

देशी संस्थानें व स्वराज्याचे हक्क उपभोगणाऱ्या भरतखंडांतील त्यांची स्थिति या मुद्यासंबंधानें हल्लीं नेमण्यांत आलेल्या रॉयल कमिशनकडून चवकशी होणें जरूर आहे. त्याचप्रमाणें सुद्धा देशी संस्थानांचे जे बिकट प्रश्न आहेत, त्यांची चवकशी एक स्वतंत्र नेमण्यांत आलेल्या रॉयल कमिशनकडून होणें जरूर आहे. या मागणीस ने. ना. श्रीनिवास शास्त्री यांनीं आपली संमति दर्श-विली आहे. हीं दोनही कमिशनें एकाच वेळीं नेमण्यांत यावींत व त्यांच्या शिफारशींची संगत लावून सर्व हिंदुस्थानकरितां एक समवाईक घटना अस्ति-त्वांत आणावी अशीही त्यांची सूचना होती, पण ह्याप्रमाणें अद्याप तजवीज

झालेली नाहीं. रॉयल कमिशनसंबंधानें लोकमतांत अत्यंत क्षोभ उत्पन्न झालेला आहे.

ह्या कमिशनवरील सभासदांची नेमणूक येथील लोकांना पसंत नाहीं, इतकेंच नाहीं तर त्यांजकडे दिलेल्या विचारांचे मुद्देही समाधानकारक नाहींत. एतद्देशीय संस्थानांच्या प्रश्नांचाही त्यांत अंतर्भाव झालेला नाहीं. अशा प्रकारची चौकशी व्हावी एतदर्थ प्रयत्न करणें हें या परिषदेचें कर्तव्य आहे.

ह्यानंतर हिंदुस्थानचें आपण ट्रस्टी आहोंत असें जें ब्रिटिश सरकारकडून सांगण्यांत येतें व ज्याचा लॉर्ड बर्कन हेड यांनीं आपल्या भाषणांतही निर्देश केला त्याचें समर्पक रीतीनें खंडन करून हिंदुस्थानचें ध्येय लॉर्ड लिटन यांच्या खालील शब्दांत अध्यक्षांनीं सांगितलें:—

( १ ) कोणत्याही परकीय सत्तेपासून हिंदुस्थान स्वतंत्र असला पाहिजे.

( २ ) हिंदुस्थानचें संरक्षण आमचेच लोक ज्या सैन्यांत आहेत, त्या सैन्याच्या हातून झालें पाहिजे.

( ३ ) आमच्याच लोकांनीं निवडलेल्या पार्लमेंटला जबाबदार असणाऱ्या अधिकाऱ्यांकडून हिंदुस्थानचा राज्यकारभार चालला पाहिजे.

ह्या ध्येयाबद्दल नापसंती दर्शविणारा देशी संस्थानांत राव किंवा रंक कोणीही सांपडेल असें मला वाटत नाहीं. स्वराज्याच्या बाबतींत ब्रिटिश हिंदुस्थान व संस्थानें यांमध्यें बिलकूल मतभेद नाहीं. स्वतंत्र, सामर्थ्यवान्, संयुक्त स्वयंसत्ताक व स्वायत्त असा आपला हिंदुस्थान असावा हें सर्वांचें ध्येय आहे. ह्या ध्येयाशीं संस्थानांतील लोकांचा परिचय करून देण्याच्या कामीं परिषदेनें केलेली कामगिरी खरोखरच प्रशंसनीय आहे. हिंदुस्थानला नवीन घटना कशी असावी, याबंधानें राष्ट्रीय सभा, मुस्लीम लीग, नॅशनल लिबरल फेडरेशन, हिंदुमहासभा व इतर राजकीय संस्था यांचा विचार चालला आहे. ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीनें याचकरितां एक वर्किंग कमिटी नेमली आहे. या सर्व संस्था आपल्या स्वराज्याच्या घटनेंत संस्थानांचा समावेश केल्यावांचून राहणार नाहींत असा भरंवसा वाटतो. या परिषदेच्या कार्यकारी कमिटीनें ब्रिटिश हिंदुस्थानांतील राजकीय संस्थांचें सहकारित्व संपादन करून सर्व हिंदुस्थानाकरितां एक घटना तयार करण्याचे कामीं यत्किंचित् विलंब लावूं नये अशी परिषदेस विनंति करून अध्यक्षांनीं आपलें भाषण संपविलें.

# अ. भा. संस्थान प्रजा परिषद मुंबई.

## दिवस दुसरा.

रविवारीं दुपारीं दीडच्या सुमारास अखिल भारतीत संस्थान प्रजापरिषदेच्या दुसऱ्या दिवसाच्या कामाला माधव बागेंतील मंडपांत सुरुवात झाली. प्रथम परिषदेचे एक सेक्रेटरी मि. रंगीलदास कपाडिया यांनीं परिषदेसाठीं हिंदुस्थानांच्या निरनिराळ्या भागांतील संस्था व पुढारी यांचेकडून आलेले यशःचिंतनपर संदेश वाचून दाखविले. त्यांत हैद्राबादचे रा. वामनराव नाईक, मंगलोरचे रा. गुंडाप्पा व मद्रास येथील अ. भा. संस्थान परिषदेचे सेक्रेटरी मि. मॅथ्यू वगैरे मंडळी व भोर प्रजा परिषद, मारवाड हितकारिणी सभा वगैरे प्रजापरिषदांचे संदेश होते. मद्रासच्या संदेशांत या परिषदेला अभीष्ट चिंतून प्रतिनिधी पाठविण्याची विनंति केली होती.

## पहिला ठराव.

पहिला ठराव प्रो. गणपतराव अभ्यंकर यांनीं परिषदेपुढें मांडला. संस्थानांतील प्रजेच्या हितसंबंधाच्या रक्षणाकरितां एक मध्यवर्ती संस्था स्थापन करावी व तिची कचेरी सध्यां मुंबईंत असावी असा त्यांच्या ठरावाचा आशय आहे. ते म्हणाले कीं, सध्यां निरनिराळ्या संस्थानांतून प्रजाहितासंबंधीं बऱ्याच संस्था निघाल्या असून त्यांच्यातर्फे काम चालू आहे. अशा वेळीं एकादी मध्यवर्ति संस्था काढण्याची अत्यंत जरूरी आहे. अशा संस्थेतर्फे निरनिराळ्या प्रश्नांवरील वाङ्मय प्रसिद्ध करावें लागेल. वर्षभर काम करण्याची व संस्थेला सढळ हातानें द्रव्यसहाय्य करण्याचीही अवश्यकता आहे. तरी त्याप्रमाणें आपण कार्य कराल अशी मला अशा आहे. या ठरावाला परिषदेचे सेक्रेटरी मि. रंगीलदास कपाडिया यांनीं गुजराथींत भाषण करून दुजोरा दिला व संस्थेसाठीं वर्षभर काम करण्याची किती अवश्यकता आहे हें सांगितलें.

याप्रमाणें भाषण झाल्यावर हा ठराव एकमतानें मंजूर झाला.

## दुसरा ठराव.

यानंतर दुसरा ठराव बडोद्याचे रा. पुरोहित यांनीं मांडला. संस्थानिकांनीं आपल्या संस्थानांत प्रातिनिधिक राज्यपद्धति सुरू करावी असा या ठरावाचा आशय आहे. हा ठराव मांडतांना ते म्हणाले कीं, मी सन १९११ सालीं आयर्लंडमध्यें डब्लिन येथील एका शाळेंत गेलों होतों. तेव्हां तेथील मुलां-मुलींना आयर्लंडचे अश्रू केव्हां थांबतील असें विचारलें. त्यावर होमरूल मिळालें म्हणजे अश्रू थांबतील असें त्या शाळेंतील प्रत्येक मुलामुलीनें उत्तर दिलें. त्याप्रमाणें आपल्या संस्थानांतील सात कोट प्रजाजनांचे अश्रूही स्वरा-ज्याचे हक्क मिळाल्यावर थांबतील. नुसत्या सुराज्यानें स्वराज्याची जरूरी नाहींशी होणार नाहीं. संस्थानिकानें आपण प्रजेचे सेवक आहों हें लक्षांत ठेवावें व प्रजेच्या हितासाठीं कार्य करावें. चैनींत पैशांची उधळपट्टी करून प्रजेच्या हिताकडे दुर्लक्ष करूं नये.

रा. दा. वि. गोखले यांनीं मराठींत भाषण करून या ठरावाला दुजोरा दिला. जोधपूरचे श्री. जयनारायण व्यास, मि. अमृतलाल त्रिवेदी, मि. कन्हयालाल कळंत्री व राजपिंपळा संस्थानचे एक प्रतिनिधि यांनीं या ठरावाला पाठिंबा दिल्यावर तो एकमेतानें मंजूर झाला.

## तिसरा ठराव.

यानंतर सर्व्हंट्स ऑफ इंडिया सोसायटीचे रा. अमृतलाल ठक्कर यांनीं तिसरा ठराव परिषदेपुढें मांडला. खादी, मद्यपानबंदी, रानटी लोकांची उन्नति वगैरे विधायक कार्यक्रमाचा या ठरावांत उल्लेख आहे; रा. ठक्कर यांनीं हा ठराव मांडतांना स्वदेशी कपडा, खादी वापरण्याची आवश्यकता प्रतिपादन केली व कॉर्पोरेशनच्या मानपत्राला उत्तर देतांना अफगाणिस्थानचे अमीर अमानुल्ला यांनीं आपआपल्या देशांतील कपडा वापरण्याचा उपदेश केला याची सर्वांना आठवण करून दिली. नंतर मद्यपानबंदी व शिक्षण या कामीं कोणाचा मत-भेद होणार नाहीं असें सांगितलें.

श्री. जमनालाल बजाज यांनीं या ठरावाला अनुमोदन दिलें. मि. भरूचा यांनीं या ठरावाला पुष्टि देतांना पारशी लोकांनीं दारूच्या व्यापारापासून शक्य तितक्या लौकर आपली सुटका करावी असें सांगितलें.

मि. मणिलाल कोठारी यांनीं या ठरावाला पाठिंबा देतांना निरनिराळ्या संस्थानांत खादीचा कसा प्रसार होत आहे हें सांगितलें.

याप्रमाणें भाषणें झाल्यावर हा ठराव एकमतानें मंजूर झाला.

* * *

## चौथा ठराव.

यानंतर सभा-स्वातंत्र्य, भाषणस्वातंत्र्य, लेखन-स्वातंत्र्याची मागणी करणारा ठराव, मिसेस अतिया बेगम यांनीं मांडला व सर्व समाजानें स्त्रियांना या बाबतींत स्वातंत्र्य द्यावें, असें सांगितलें.

श्री. मणिलाल कोठारी यांनीं या ठरावाला दुजोरा देतांना निरनिराळ्या संस्थानांतून सभाबंदी व वर्तमानपत्रांना बंदी कशी आहे हें सांगितलें. ते म्हणाले कीं, संस्थानांतील लोकांना भाषण व लेखन-स्वातंत्र्य असलें पाहिजे. राजा आपलें कर्तव्य बरोबर रीतीनें करीत नसेल, तर त्याला **पदभ्रष्ट** करण्याचा अधिकार लोकांना असला पाहिजे. या ठरावांतील स्वातंत्र्याकरित प्रत्येक संस्थानांत चळवळ झाली पाहिजे. कच्छमध्यें एकही छापखाना नाहीं, किंवा टाईपरायटरही नेण्याची परवानगी नाहीं. तरी कच्छ प्रजापरिषदेंत या बाबतींत चळवळ होईल अशी मला आशा आहे.

× × ×

## पांचवा ठराव.

यानंतर पांचवा ठराव श्री. निरंजनशर्मा यांनीं परिषदेपुढें मांडला. संस्थानांतून स्थानिक स्वराज्यसंस्था लोकनियुक्त पायावर स्थापन कराव्या व कायदे मंडळें स्थापन करून त्यांना अंदाजपत्रक मंजूर करण्याचा अधिकार असावा, संस्थानिकांचा खाजगी खर्च व संस्थनाचें उत्पन्न अलग ठेवावें व खासगत खर्चावर कौन्सिलची मंजुरी घ्यावी; न्याय व अंमलबजावणी यांची फारकत करण्यांत यावी अशी या ठरावांत मागणी करण्यांत आली आहे. मि. निरंजन शर्मा यांनीं हा ठराव अत्यंत महत्त्वाचा आहे व आमची ही किमान मागणी आहे असें सांगितलें.

या ठरावाला मि. मनसुखभाई व गोंडळ संस्थानांतील धोराजीवाला त्यांनीं पाठिंबा दिला. मि. धोराजीवाला यांनीं गोंडळ संस्थानांत चाललेल्या जुलमाची कहाणी वर्णन केली. बडोद्याचे रा. साने वकील यांनीं हा ठराव संस्थानिकांच्या व प्रजेच्याही दृष्टीनेंही अत्यंत जरूरीचा आहे असें सांगितलें व त्यांतील निरनिराळ्या भागांचें स्पष्टीकरण केल्यावर तो मंजूर झाला.

* * * *

## सहावा ठराव.

यानंर श्री. रामनारायण चौधरी यांनीं सहावा ठराव परिषदेपुढें मांडला. संस्थानांत कोणत्या प्रकारची राज्यपद्धति असावी व त्यांत कोणते फेरबदल करण्यांत यावे हें ठरविण्याचा अधिकार संस्थानांतील प्रजेला असावा असा या ठरावाचा आशय आहे. श्री. रामनारायण चौधरी यांनीं राज्यपद्धतिसंस्थेचा विकास कसा कसा होत गेला हें सांगितलें, व कोणची राज्यपद्धति असावी हें ठरविण्याचा प्रजेचा अधिकार आहे असें प्रतिपादन केलें. रा. राघवेंद्र शर्मा यांनीं या ठरावाला अनुमोदन दिलें व ते म्हणाले कीं, ही प्रजा परिषद् एक प्रकारचा यज्ञ आहे. या यज्ञांत उत्पन्न झालेल्या अग्नीनें अन्यायी व जुलमी राजांचा नाश होऊं शकेल. आपण सर्व संस्थानिकांना एक वर्षाची मुदत देऊं. या अवधींत जे संस्थानिक आपल्या प्रजेला प्रातिनिधिक राज्यपद्धति देणार नाहींत, किंवा देण्याची इच्छा प्रदर्शित करणार नाहींत त्यांना काढून टाकण्याबद्दल पुढील अधिवेशनांत ठराव आणला पाहिजे. याप्रमाणें भाषणें होऊन हा ठराव मंजूर झाला.

* * *

## सातवा ठराव.

यानंतर सातवा ठराव स्वागताध्यक्ष श्री. गोविंदलाल शिवलाल यांनीं मांडला. संस्थानांतील लोकांचे ब्रिटिश हिंदुस्थानशीं राज्यविषयक संबंध आणावे व सबंध हिंदुस्थानासाठीं स्थापण्यांत येणाऱ्या राज्यपद्धतींत संस्थानांतील लोकांना स्थान मिळावें असा या ठरावाचा आशय आहे. राजा बहादूर गोविंद-

लाल यांनीं या ठरावाची सध्यांच्या स्थितींत किती आवश्यकता आहे हें सांगितलें. बडोद्याचे रा. पुरोहित यांनीं दुजोरा दिल्यावर हा ठराव मंजूर झाला व परिषदेचें काम २० मिनिटें तहकूब करण्यांत आलें.

* * *

## आठवा ठराव.

यानंतर प्रो. गणपतराव अभ्यंकर यांनीं आठवा ठराव परिषदेपुढें मांडला. हिंदी संस्थानिकांचे प्रत्यक्ष ब्रिटिश सरकारशीं तहनामे झाले व हिंदुस्थानसरकारचा त्यांच्याशीं संबंध नाहीं ही सबब निराधार असून अखिल भारतवर्षाला स्वराज्य मिळण्याच्या तत्त्वाला घातक आहे, असा या ठरावाचा आशय आहे.

प्रो. गणपतराव यांनीं इतिहासांतील निरनिराळीं उदाहरणें सांगून संस्थानिकांशीं गव्हर्नरजनरलनेंच तह कसे घडवून आणले व प्रत्यक्ष ब्रिटिश सरकारशीं हे तह कसे करण्यांत आले नाहींत हें सांगितलें. मि. शिवदास चापसी व डॉ. घनशामलाल यांनीं गुजराथी भाषेंत भाषण करून या ठरावाला पाठिंबा दिल्यावर हा ठराव मंजूर झाला.

* * *

## नववा ठराव.

यानंतर संस्थानी कमिशनसंबंधाचा ठराव श्री. अर्जुनलाल शेठी यांनीं परिषदेपुढें मांडला. हिंदी संस्थानिकांच्या इच्छेवरून स्टेट सेक्रेटरींनीं एक कमिटी नेमली. या बाबतींत संस्थानी प्रजेचा विचार घेण्यांत आला नाहीं. या कमिटीनें केलेली चौकशी लोकांचे हक्क व स्वातंत्र्य यांना बाधक होईल. व त्यांच्यावरील बोजा वाढेल म्हणून या कमिटीचा निर्णय परिषदेला मान्य होण्याजोगा नाहीं असा या ठरावाचा आशय आहे. श्री. अर्जुनलाल शेठी यांनीं या कमिटीचा निर्णय संस्थानी प्रजेच्या हिताच्या दृष्टीनें कसा घातुक होईल याचें विवेचन केलें. बटलर कमिशन ज्या ज्या संस्थानांत जाईल तेथें तेथें हरताळ पाडावा. बटलर कमिशन वा सायमन कमिशन या दोघांनींही बोरीबंदरवरून परत जावें असा लोकांनीं एकच जबाब द्यावा असें त्यांनीं सांगितलें.

श्री. विजयसिंह पथिक यांनीं या ठरावाला अनुमोदन दिलें. मि. पथिक यांनीं आपल्यावर सुटलेल्या हुकुमाची हकीकत सांगितली व उत्तर हिंदुस्थानांतील अलवार वगैरे संस्थानांतील जुलूमजबरदस्तीची कहाणी सांगितली. या कमिशनचा संस्थानच्या प्रजाजनांशीं संबंध असल्यामुळें प्रजाजनांचें म्हणणें ऐकून घेण्यांत आलें पाहिजे असें त्यांनीं सांगितलें.

श्री. मोतीचंद गिरधर कपाडिया यांनीं या ठरावाला पुष्टि दिली. या कमिशननें संस्थानिकांचें स्वातंत्र्य वाढून प्रजाजनांना सध्यां जे थोडेबहुत हक्क आहेत तेही संपुष्टांत येण्याची भीति आहे असें त्यांनीं सांगितलें.

मि. जी. बी. त्रिवेदी यांनीं या ठरावाला पाठिंबा दिला. सायमन कमिशन हें रॉयल कमिशन आहे; पण बटलर कमिटी ही हिंदुस्थान सरकारनें नेमलेली एक तज्ज्ञ कमिटी असून तिला कमिशनचा दर्जा नाहीं. या कमिटीकडून आमचा विचार न घेतां ठरविला जाणारा एकतर्फी निर्णय कोणालाही मान्य होणार नाहीं, असें त्यांनीं सांगितलें.

याप्रमाणें भाषणें होऊन हा ठराव मंजूर झाला.

## दहावा ठराव.

यानंतर मि. पोपटलाल चुडागर यांनीं पुढील अर्थाचा ठराव परिषदेपुढें इंग्रजींत मांडला. हिंदी संस्थानांच्या अन्तर्गत कारभारांत हात न घालण्याचें धोरण कोणत्याहि तत्त्वावर ठरविलेलें नाहीं. संस्थानच्या अन्तर्गत कारभारांत लोकांच्या हितासाठीं बहुतकरून ढवळाढवळ करण्यांत येत नाहीं. म्हणून अशी ढवळाढवळ करण्याचें तत्त्व स्पष्टपणें जाहिर करण्यांत यावें व त्याप्रमाणें कायदा करण्यांत यावा, असा या ठरावाचा मथितार्थ आहे. संस्थानांतील लोकांवर कितीही जुलूम झाला तरी हिंदुस्थानसरकार तटस्थपणाच्या सबबीवर त्यांत हात घालीत नाहीं. पण ही स्थिति अशीच चालूं देणें इष्ट नाहीं. याकरितां वरिष्ठ सरकारनें आपलें धोरण ठरवावें व तें जाहिर करून त्याप्रमाणें कायदा करावा. म्हणजे जुलमानें पीडलेल्या कोणच्याही नागरिकाला संस्थानच्या जुलमाविरुद्ध वरिष्ठ सरकारकडे दाद मागतां येईल. यानंतर नवानगरच्या जाम-

साहेबांच्या कारकीर्दीतील प्रकाराचें त्यांनीं वर्णन केलें. श्री. माणिशंकर शामजी त्रिवेदी यांनीं या ठरावाला दुजोरा दिला व ठराव पास झाला.

## अकरावा ठराव.

श्री. गोवर्धनलाल लाधाभाई वकील यांनीं संस्थानी प्रजापरिषदेचें कार्य वर्षभर करून लोकमत जागृत करण्यासाठीं एक कमिटी नेमण्याचा ठराव मांडला व नुसतीं जोरदार भाषणें करण्यापेक्षां प्रत्यक्ष कार्य करण्याचा हा ठराव आहे असें सांगितलें.

श्री. मणिलाल कोठारी यांनीं या ठरावाला अनुमोदन दिलें व विषय-नियामक मंडळांत निरनिराळ्या प्रांतांतर्फे कमिटींत कोण सभासद घेण्यांत आले आहेत, त्यांचीं ५८ नांवें वाचून दाखविलीं व त्यांच्या हातून आपलें कार्य यशस्वी रीतीनें पार पडेल अशी आशा प्रदर्शित केली. या कमिटीला लोकांनीं जरूर ती आर्थिक मदत करावी अशी विनंति केली.

याप्रमाणें भाषण झाल्यावर हा ठराव मंजूर झाला.

## बारावा ठराव.

यानंतर श्री. जगजीवन उजमिसी यांनी संस्थानांतील वेठीची निर्दय-पद्धति तावडतोब बंद करण्याबद्दल संस्थानिकांनीं जाहीर करावें अशा अर्थाचा ठराव मांडला व वेठीच्या पद्धतीपासून होणाऱ्या गरीब लोकांच्या हालांचें वर्णन केलें.

इंदूर संस्थानचे मि. एन. जी. ठक्कर व मि. माथुर यांनीं या ठरावाला पाठिंबा दिला व वेठीच्या जुलुमापासून होणाऱ्या हालांचें वर्णन केलें.

## तेरावा ठराव.

यानंतर मि. सुतारिया यांनीं राजकुमार कॉलेजांतील शिक्षणक्रम अनिष्ट व अयोग्य असून त्यामुळें राजकुमारांचें राष्ट्रीय बल नाहींसें होतें अशा अर्थाचा

ठराव मांडला व राजकुमार स्वदेशीच्या तत्त्वाकडे कसें दुर्लक्ष करतात याचें वर्णन केलें. भिक्षु ब्रह्मानंद यांनीं या ठरावाला अनुमोदन दिलें व तो मंजूर झाला.

यानंतर अध्यक्षांनीं राहिलेले ठराव मांडले व ते मंजूर करण्यांत आले. त्यांत हिंदुस्थानचें स्वराज्य हें ध्येय असून तें प्राप्त करून घेण्यासाठीं संस्थानांतील प्रजाजन व त्यांच्या संस्था यांनीं कांग्रेस वगैरे संस्थांशीं सहकारिता करावी अशा अर्थाचा एक ठराव आहे. दुसऱ्या ठरावानें कित्येक संस्थानिक मधून मधून परदेशांत जाऊन वास्तव्य करतात त्याचा निषेध करण्यांत आला आहे.

## फंड जमा करण्याचा प्रारंभ.

यानंतर बडोद्याचे मि. सुतरिया यांनीं स्वागत मंडळाचे आभार मानण्याचा ठराव मांडला व मि. शर्मा यांनीं दुजोरा दिल्यावर तो मंजूर झाला.

मि. पोपटलाल चुडागर व मि. मणिलाल कोठारी यांनीं मध्यवर्ति कमिटीसाठीं मदत करण्याबद्दल विनंति केली, तेव्हां ५१९ रुपये रोख जमा झाले व ९१६ रुपयांचीं अभिवचनें मिळालीं. यापूर्वींच ६०५१ रु. रोख जमा झाल्याचें मि. चुडागर यांनीं जाहीर केलें.

## पुढील बैठक राजपुतान्यांत.

श्री. विजयसिंह पथिक यांनीं पुढील वर्षाच्या परिषदेला राजपुतान्यातर्फे निमंत्रण दिलें व तें स्वीकारण्यांत आलें.

## आभारप्रदर्शन.

यानंतर श्री. वेणीप्रसादजी यांनीं अध्यक्षांचे आभार मानण्याचा ठराव मांडला व त्याला मि. भगवानदासजी, ( इंदूर ) व मोहनलाल, रा. अभ्यंकर, मि. अमृतलाल शेट वगैरे मंडळींनीं दुजोरा दिल्यावर टाळ्यांच्या प्रचंड गजरांत अध्यक्षांचे आभार मानण्यांत आले व अध्यक्षांना पुष्पहारांनीं अलंकृत करण्यांत

साहेबांच्या कारकीर्दीतील प्रकाराचें त्यांनीं वर्णन केलें. श्री. माणिशंकर शामजी त्रिवेदी यांनीं या ठरावाला दुजोरा दिला व ठराव पास झाला.

## अकरावा ठराव.

श्री. गोवर्धनलाल लाधाभाई वकील यांनीं संस्थानी प्रजापरिषदेचें कार्य वर्षभर करून लोकमत जागृत करण्यासाठीं एक कमिटी नेमण्याचा ठराव मांडला व नुसतीं जोरदार भाषणें करण्यापेक्षां प्रत्यक्ष कार्य करण्याचा हा ठराव आहे असें सांगितलें.

श्री. मणिलाल कोठारी यांनीं या ठरावाला अनुमोदन दिलें व विषय-नियामक मंडळांत निरनिराळ्या प्रांतांतर्फे कमिटींत कोण सभासद घेण्यांत आले आहेत, त्यांचीं ५८ नांवें वाचून दाखविलीं व त्यांच्या हातून आपलें कार्य यशस्वी रीतीनें पार पडेल अशी आशा प्रदर्शित केली. या कमिटीला लोकांनीं जरूर ती आर्थिक मदत करावी अशी विनंति केली.

याप्रमाणें भाषण झाल्यावर हा ठराव मंजूर झाला.

## बारावा ठराव.

यानंतर श्री. जगजीवन उजमिसी यांना संस्थानांतील वेठीची निर्दय-पद्धति ताबडतोब बंद करण्याबद्दल संस्थानिकांनीं जाहीर करावें अशा अर्थाचा ठराव मांडला व वेठीच्या पद्धतीपासून होणाऱ्या गरीब लोकांच्या हालांचें वर्णन केलें.

इंदूर संस्थानचे मि. एन. जी. ठक्कर व मि. माथुर यांनीं या ठरावाला पाठिंबा दिला व वेठीच्या जुलुमापासून होणाऱ्या हालांचें वर्णन केलें.

## तेरावा ठराव.

यानंतर मि. सुतारिया यांनीं राजकुमार कॉलेजांतील शिक्षणक्रम अनिष्ट व अयोग्य असून त्यामुळें राजकुमारांचें राष्ट्रीय बल नाहीसें होतें अशा अर्थाचा

ठराव मांडला व राजकुमार स्वदेशीच्या तत्त्वाकडे कसें दुर्लक्ष करतात याचें वर्णन केलें. भिक्षु ब्रह्मानंद यांनीं या ठरावाला अनुमोदन दिलें व तो मंजूर झाला.

यानंतर अध्यक्षांनीं राहिलेले ठराव मांडले व ते मंजूर करण्यांत आले. त्यांत हिंदुस्थानचें स्वराज्य हें ध्येय असून तें प्राप्त करून घेण्यासाठीं संस्थानांतील प्रजाजन व त्यांच्या संस्था यांनीं कांग्रेस वगैरे संस्थांशीं सहकारिता करावी अशा अर्थाचा एक ठराव आहे. दुसऱ्या ठरावानें कित्येक संस्थानिक मधून मधून परदेशांत जाऊन वास्तव्य करतात त्याचा निषेध करण्यांत आला आहे.

## फंड जमा करण्याचा प्रारंभ.

यानंतर बडोद्याचे मि. सुतरिया यांनीं स्वागत मंडळाचे आभार मानण्याचा ठराव मांडला व मि. शर्मा यांनीं दुजोरा दिल्यावर तो मंजूर झाला.

मि. पोपटलाल चुडागर व मि. मणिलाल कोठारी यांनीं मध्यवर्ति कमिटीसाठीं मदत करण्याबद्दल विनंति केली, तेव्हां ५१९ रुपये रोख जमा झाले व ९१६ रुपयांचीं अभिवचनें मिळालीं. यापूर्वींच ६०५१ रु. रोख जमा झाल्याचें मि. चुडागर यांनीं जाहीर केलें.

## पुढील बैठक राजपुतान्यांत.

श्री. विजयसिंह पथिक यांनीं पुढील वर्षाच्या परिषदेला राजपुतान्यातर्फे निमंत्रण दिलें व तें स्वीकारण्यांत आलें.

## आभारप्रदर्शन.

यानंतर श्री. वेणीप्रसादजी यांनीं अध्यक्षांचे आभार मानण्याचा ठराव मांडला व त्याला मि. भगवानदासजी, ( इंदूर ) व मोहनलाल, रा. अभ्यंकर, मि. अमृतलाल शेट वगैरे मंडळींनीं दुजोरा दिल्यावर टाळ्यांच्या प्रचंड गजरांत अध्यक्षांचे आभार मानण्यांत आले व अध्यक्षांना पुष्पहारांनीं अलंकृत करण्यांत

आलें. मि. अमृतलाल शेट हे "सौराष्ट्र" वर्तमानपत्राचे संपादक असून स्वयंसेवकांचे प्रमुख आहेत. ते भाषण करावयास उभे राहिले तेव्हां वंदे-मातरम्‌चा प्रचंड जयघोष झाला. त्यांनीं दि. ब. रामचंद्रराव यांचे आभार मानतांना त्यांच्या कामगिरीचें वर्णन केलें व मद्रास कॉंग्रेसपुढें संस्थानी प्रजेची बाजू मांडण्याबद्दल विनंति केली.

## अध्यक्षांचा समारोप.

यानंतर अध्यक्षांचें समारोपात्मक भाषण झालें. आरंभीं त्यांनीं सर्वांचे आभार मानले. मद्रासच्या कॉंग्रेसला हजर राहून संस्थानी प्रजाजनांचें म्हणणें मांडण्याचें कबूल केलें. नंतर ते म्हणाले कीं, ही परिषद् कशी काय पार पडते याची मला प्रथम शंका होती; पण सर्वांच्या मदतीनें ती यशस्वी रीतीनें पार पडली. मुंबईचे लोक धनाढ्य आहेत येवढेंच नव्हे तर ते फंड गोळा करण्याच्या कामींही वस्ताद् आहेत हें मला आज कळलें. अशा तऱ्हेची ही परिषद् पहिलीच आहे. तिला थोड्याच दिवसांत राष्ट्रीय सभेचा दर्जा प्राप्त होईल अशी मला आशा आहे. सध्यां ब्रिटिश सरकार संस्थानांचा बागुलबोवा पुढें करून स्वराज्याच्या चळवळींत व्यत्यय आणीत आहेत अशा वेळीं संस्थानी प्रजाजनांनीं स्वराज्याच्या चळवळींत भाग घेणें जरूर आहे. लौकरच ह्या दोन्ही संस्था एक होऊन स्वराज्याची चळवळ चालवितील अशी मला आशा आहे. शेवटीं संस्थानी प्रश्नांकडे लक्ष देण्याचें अभिवचन देऊन सर्वांचे आभार मानून त्यांनीं आपलें भाषण संपविलें.

यानंतर वंदेमातरम् राष्ट्रगीत होऊन जयघोषांत परिषदेचें काम रविवारीं रात्रीं आठ वाजल्यानंतर संपलें. अशा रीतीनें ही परिषद् यशस्वी रीतीनें पार पडली.

# दक्षिणी संस्थान प्रजापरिषद्.

## अधिवेशन ७ वें.

### मुक्कामः–मुंबई.

जागाः— सर्व्हंटस् ऑफ इंडिया सोसायटीचा हॉल.
( ता. १७ डिसेंबर १९२७ सकाळीं ८ वाजतां )

दिवस पहिला.

## त्रोटक अहवाल.

'दक्षिणी संस्थान हितवर्धक सभे'च्या कार्यकारी मंडळानें ठरविल्याप्रमाणें दक्षिणी संस्थान प्रजा परिषदेचें सातवें अधिवेशन ता. १७ रोजीं सकाळीं आठ वाजतां मुंबई येथील सर्व्हंट्स ऑफ इंडिया सोसायटीच्या हॉलमध्यें भरलें होतें. संस्थेची कार्यकारी मंडळी अगाऊ मुंबईस गेली होती. त्यांनीं अधिवेशनाची योग्य ती तयारी केली होती. सदर सभेस हजर राहण्याबद्दल संस्थेच्या सभासदांना व इतर सभ्य गृहस्थांना व संस्थानी प्रश्नांची आस्था असणाऱ्या सर्वजणांना विनंति करण्यांत आली होती. अखिल भरभारतीय संस्थान प्रजापरिषद् मुंबई मुक्कामीं भरण्याच्या वेळीं बरेच लोक निरनिराळ्या संस्थानांतून मुंबईस येणार असल्यानें ही संधि साधूनच या परिषदेच्या अधिवेशनाची व्यवस्था मुंबई मुक्कामीं करण्यांत आली होती. सभेकरतां प्रतिनिधी व प्रेक्षक मिळून सुमारें १००।१२५ लोक हजर होते. अधिवेशनाच्या पहिल्या बैठकीचे वेळीं अखिल भारतीय संस्थान प्रजापरिषदेचे अध्यक्ष **दिवाण बहादूर एम. रामचंद्रराव**, रा. रा. **मणि-लाल कोठारी**, मि. विजयसिंह पथिकजी, मि. रामनारायण चौधरी, रा. **केशव**-राव कोरटकर, राजाबहादूर शिवलाल गोविंदलाल मोतीलाल, अमृतलाल शेट,

प्रि. टी. ए. कुळकर्णी, प्रो. ग. र. अभ्यंकर, रा. दादासाहेब साने, बडोदें, रा. बिनीवाले वैद्य सांगली, राघवेंद्र शर्मा हैद्राबाद, ॲ. जोशी जंजिरा, रा. आठवले, भोर, वैनतेयाचे संपादक रा. शिरोडकर सावंतवाडी, रा. एस. जी. वझे, अमृतलालभाई ठक्कर, रा. बखले, विविधवृत्ताचे संपादक रा. तटणीस, वगैरे मंडळी प्रामुख्यानें दिसत होती या परिषदेचे नियोजित अध्यक्ष रा. रा. **बाबुराव गोखले** हे परिषदेच्या आदल्या दिवशीं रात्रींच आले होते. परिषदेचें काम सकाळीं आठ वाजतां चालणार होतें. त्याप्रमाणें रा. रा. बाबुराव गोखले परिषदेच्या हॉलमध्यें येतांच त्यांचें स्वागत करण्यांत आलें. नंतर रा. रा. तात्यासाहेब केळकर संस्थेचे सेक्रेटरी यांनीं जमलेल्या पाहुण्यांचें संस्थेतर्फे मोठ्या प्रेमानें स्वागत केलें. स्वागत करतांना ते म्हणाले, " आपण आमच्या विनंतीस मान देऊन व दगदग सोसून आलांत याबद्दल समाधान वाटतें. आज दुसरीकडे जी अखिल भारतीय संस्थान प्रजापरिषद् भरणार आहे तिचें माझ्या मतें महत्त्व पुष्कळच आहे. आजच सकाळीं वर्तमानपत्रांत संस्थानांच्या आर्थिक व राजकीय संबंधाची चौकशी करण्याकरितां नेमण्यांत यावयाच्या कमिटीच्या सभासदांचीं नांवें प्रसिद्ध झालीं आहेत. तहनामे, सनदा यांवरून संस्थानिकांचे ब्रिटिश सरकारशीं संबंध कोणत्या प्रकारचे आहेत याची शहानिशा सदर कमिटीमार्फत करण्यांत यावयाची आहे, असें जाहीर करण्यांत आलें आहे. हें एका तऱ्हेनें बरें झालें आहे. कमिशनमध्यें कोणकोणत्या व्यक्तींचा समावेश करण्यांत आला आहे त्यांचीं नांवें आज प्रसिद्ध झालीं आहेत. संस्थानिकांनीं आपले स्वतःचे हक्क काय आहेत व आपला दर्जा काय आहे व यापुढें साम्राज्य सरकारशीं आपलें नातें काय आहे हें समजून घेऊन कांहींतरी निश्चित निर्णय करून घेण्याकरितां नरेंद्रमंडळामार्फत चळवळ सुरू केली होती. त्याचें दृश्यफळ म्हणजे ही कमिटीची योजना होय. संस्थानिकांजवळ साधनसामुग्री बरीच आहे व आपली चळवळ ते यशस्वी करण्याकरितां वाटेल तें करण्यास तयार आहेत; मग प्रजेचें तिकडे कांहींही होवो ! आपलें आसन साम्राज्यसरकारचे राज्यांत कसें स्थिर होईल याकडेच त्यांचें लक्ष लागलें आहे. व त्याकरितां लागणारा पैसा वाटेल तसा खर्च होत आहे व ते करीत आहेत. आपली स्थिति याच्या उलट आहे. आपल्याजवळ पैशाची साधनसामुग्री नाहीं, त्यामुळें इतर

अडचणी मार्गांत उत्पन्न होतात त्यास इलाज नाहीं. परंतु आपणांस वाईट वाटण्याचें कारण नाहीं. कारण या कमिटीचा जो रिपोर्ट होईल त्यावरूनच आपलें ध्येय काय ठेवावें हें बनविण्यास बरें होईल. कारण त्याचे संबंध काय हें एकदां निश्चित झाल्यानंतर आपल्यासही संस्थानिकांकडून काय काय मिळण्याची अपेक्षा करतां येईल हेंही ठरवितां येईल. मॉंटेग्यू चेल्म्सफोर्ड रिपोर्टमध्यें संस्थानी प्रश्नाबद्दल जवळ जवळ कांहींच माहिती नाहीं. जी आहे ती अगदींच त्रोटक स्वरूपाची आहे, त्यांत थोडासा संस्थानिकांना मवाळ ( Mild ) उपदेश आहे. रस्त्याच्या एका बाजूस आग लागली असतांना त्याच्या ठिणग्या दुसऱ्या बाजूवर पडण्याचा पुष्कळ संभव आहे अशा अर्थाच्या वाक्याची योजना केली आहे; ही शब्दयोजना बरोबर नाहीं. त्याच्यापेक्षां निराळ्या तऱ्हेनें त्यांना सांगतां आलें असतें. उदाहरणार्थ, समोर एक चांगला बगीचा आहे त्यांतील फुलांचा सुवास आजूबाजूस दरवळत राहणें शक्य आहे वगैरे प्रकारचें वर्णन त्यांना करतां आलें असतें, परंतु अंतरंगांत खालसा प्रजेच्या मागणीबद्दल वैषम्य वाटून ही योजना केली असावी असें उपमेवरून वाटतें. सांगण्याचा मुद्दा असा कीं, शेजारच्या प्रदेशांत जी नवीन तत्त्वाची लाट आली आहे तिचा थोडा बहुत प्रसार संस्थानी वातावरणांत होणार असें सूचित केलें आहे. ह्या बदललेल्या परिस्थित्यनुरूप राज्यकारभाराचें स्वरूप यापुढें संस्थानिकांना बदलणें भाग आहे असें सौम्यशब्दांत सूचित केलें आहे. लॉर्ड रेडिंगसाहेबांनीं वऱ्हाडच्या बाबतींत निजामसाहेबांना जो खलिता पाठविला आहे त्यावरून एकच गोष्ट निश्चित झाली आहे. ती ही कीं, हिंदुस्थानांतील सर्व राजेरजवाडे हे हिंदुस्थानसरकारचे मांडलिक व साम्राज्याचे अंकित आहेत असें स्पष्ट शब्दांत सांगण्यांत आलें आहे. ही गोष्ट त्यावेळीं एकट्या निजाम साहेबांना वऱ्हाडच्या बाबतींत उद्देशून लिहिली तरी त्यानें साम्राज्य सरकारचें व कोणात्याही संस्थानाधिपतीचें नातें काय आहे हें स्पष्ट शब्दांत निश्चित झालें आहे. वाटेल त्या संस्थानिकानें म्हणावें कीं, आमचे तह साम्राज्य सरकारशीं बरोबरीचे आहेत व आमचा दर्जा मोठा आहे; पण हा टोला जो बसला त्यानें संस्थानिकांत खळबळ उडाली व मीं आतांच सांगितल्याप्रमाणें त्यांनीं ही कमिशनची योजना मागून घेतली आहे. लॉर्ड रेडिंगनीं केलेला निर्णय या कमिशनच्या द्वारें खराखोटा ठरणार आहे. हा खुंटा हालवून एकदां बळकट झाला म्हणजे

आपल्यास फायदेशीरच आहे. असें जरी आहे तरी आपणही आपली बाजू स्पष्ट मांडण्याचा विचार केला पाहिजे. Self-determination अगर स्वयंनिर्णयाचा हक्क आपला आहे. तो आपण assert केला पाहिजे. याकरतां संस्थानी प्रजेनेंही फार जोराचे प्रयत्न केले पाहिजे व ते स्वतःचे पायावर उभे राहूनच केले पाहिजेत. कारण स्वतःचें मरण आपल्या या डोळ्यांनीं पाहिल्याशिवाय स्वर्गप्राप्ति मिळत नाहीं. ही चळवळ चालविण्याच्या मार्गात संस्थानी प्रजाजनांना काय काय अडचणी आहेत त्याची थोडीबहुत कल्पना मला आहे. पूर्वी संस्थानिकांचे व प्रजाजनांचे हितसंबंध फार सलोख्याचे होते व त्यांच्यामध्यें आईबापाचें व मुलांचें नातें होतें, परंतु हल्लीं तें नातें दुरावलें आहे; त्यामुळें जवळ असलेल्या आपल्या मुलावरच आईबापांचा हात पडतो तसें झालें आहे. खालसांतील पुढारीही या पवित्र कामास मदत करण्यास सर्वतोपरी तयार आहेत, तेव्हां शक्य ती खटपट आपण केली पाहिजे. या कार्यांत यश मिळावें म्हणून लोकांचीं सुखदुःखें काय आहेत हें कळविण्याकरतां या संस्थेमार्फत "संस्थानी स्वराज्य" हें पत्र रा. रा. वामनराव पटवर्धन यांनीं स्वार्थत्यागपूर्वक चालविलें आहे. त्यांत त्यांना कांहीं एक फायदा नाहीं हें मला माहीत आहे. उलट तोटा कसा येत आहे हें आम्हीं वेळोवेळीं प्रसिद्ध केलेल्या पत्रकांवरून आपल्यास कळून येईलच. त्याच्या खर्चाची तोंडामेळवणीही होत नाहीं. तेव्हां ही गोष्टही आपण लक्षांत घेऊन हें पत्र चालविण्यास शक्य ती मदत केली पाहिजे. खटपट सर्व तऱ्हेनें झाली पाहिजे. आपण मदत केल्यास ही व्यवस्था कायम राहील. आपण तनमनधनानें मदत दिली पाहिजे. तसेंच धैर्यानें अंगमेहनत ही झालीच पाहिजे, तरच कार्य यशस्वी होईल हें ध्यानांत आणून आपण कार्य करा एवढें पुन्हां एकदां सांगून मी आपलें संस्थेतर्फे स्वागत करतों. आतां मामुली वहिवाटीप्रमाणें सभेचें काम चालविण्याबद्दल सुचवितों." वरील आशयाचें भाषण झाल्यानंतर रा. रा. **गणपतरावजी अभ्यंकर** यांनीं अध्यक्षांच्या निवडणुकीची सूचना सभासदांपुढें इंग्रजींत भाषण करून मांडली. त्यांनीं थोडक्यांत सभेचा उद्देश सांगून अध्यक्षांची निवड कशी केली व कां केली याची माहिती दिली. "अध्यक्ष हे एका प्रमुख संस्थानांतील प्रजाजन होते, त्यांनीं तेथील सुखदुःखांची चांगली माहिती व अनुभव आहे, तेव्हां त्यांचा आपल्यास योग्य उपदेश या सभेच्या कार्याकडे होईल हें मनांत आणून ही योजना केली आहे, सबब

आपण या सूचनेस पाठिंबा द्यावा अशी विनंति आहे. " या सूचनेस बडोद्याचे **रा. रा. दादासाहेब** साने यांनीं पाठिंबा गुजराथी भाषेत दिला. तसेंच जंजिऱ्याचे रा. रा. कार्लेकर यांनीं योग्य शब्दांत या सूचनेला पाठिंबा दिला. रा. रा. राघवेंद्रराव शर्मा यांनींही या सूचनेस हिंदीमध्यें पाठिंबा दिला. अनुमोदन देतांना ते म्हणाले " रा. रा. अभ्यंकर यांनीं आतां वर्णन केलेंच आहे. परंतु मी हैद्राबाद संस्थानातर्फे या सूचनेस पाठिंबा देतों. हिंदुस्थानांत जीं लहान मोठीं संस्थानें आहेत त्या सर्वांत प्रसिद्ध पावलेलें असें Autocratic संस्थान म्हणून नांवाजलेलें जें हैद्राबाद संस्थान त्या संस्थानचा मी एक रहिवासी आहें. आजचें अधिवेशन हें दाक्षिणी संस्थान प्रजापरिषदेचें सातवें अधिवेशन आहे. राजस्थानांत प्रसिद्धी पावलेले मि. विजयसिंह पथिकजी किंवा मि. मणिलाल कोठारी यांचेसारखें आम्ही कोणीच कांहीं कार्य केलें नसलें तरी त्यांनीं जें आपलें कर्तव्य बजाविलें आहे तोच मार्ग आम्ही दक्षिणी संस्थानच्या प्रजाजनांच्या बाबतींत चोखाळला पाहिजे. मि. पथिकजी हे आम्हांस त्यांच्या नांवाप्रमाणें मार्गदर्शक होतील अशी खात्री आहे व त्यांचाच मार्ग आम्हांला इकडील भागांत सुरू करावा असें वाटतें. कारण उघडच आहे. हैद्राबादसारखीं संस्थानें जोंपर्यंत आहे. तोंपर्यंत हें असें चालावयाचेंच, त्यास इलाज नाहीं. हैद्राबाद, संस्थानांत सर्व तऱ्हेची बंदी आहे. भाषणास बंदी, वर्तमानपत्रास बंदी, मेसर्स जिना व पंडित मदन मोहन मालवीय यांच्यासारख्या माणसांना येण्यास बंदी आहे. मानवी हक्क म्हणून काय आहेत ते तेथें अधिकाऱ्यांस माहीत नाहींत तेव्हां पथिकजी वगैरेंचा मार्ग आम्हांस यापुढें स्वीकारल्याशिवाय मार्ग नाहीं असें वाटतें. असो, आज आतां जी अध्यक्षाच्या निवडणुकीची सूचना आली आहे ती सर्वतोपरी योग्य आहे व त्याचें वर्णन फिरून करण्याची अवश्यकता नाहीं इतकें सांगून हैद्राबाद संस्थानातर्फे मी या सूचनेस पाठिंबा देतों. " वरील भाषणानंतर रा. रा. **बाबूराव गोखले** यांनीं टाळ्यांच्या गजरांत अध्यक्षस्थान स्वीकारलें. व नंतर त्यांनीं आपल्या भाषणास सुरवात केली.

## अध्यक्ष
## दे. भ. दा. वि. गोखले बी. ए. एल एल. बी.
## यांचें भाषण.

" आपण दक्षिणी संस्थान प्रजापरिषदेच्या सातव्या अधिवेशनाच्या अध्यक्षपणाचा मान देऊन माझा जो आतां सन्मान केला त्याबद्दल मी आपला

आभारी आहें. रा. रा. गणपतरावजी अभ्यंकर यांनीं अध्यक्षाची सूचना आण-तांना जें भाषण केलें त्यांत ही अध्यक्षांची निवड कां करण्यांत आली व त्यांचे ठिकाणीं कोणकोणते गुण असावयास पाहिजे आहेत त्यांचें जें सरस वर्णन केलें ते सर्व गुण जरी माझ्यांत नसले तरी एकच गोष्ट मी सांगूं शकतों कीं, मला संस्थानी राज्यकारभाराचा थोडासा अनुभव आहे. संस्थानी प्रजेच्या चळ-वळीचा प्रश्न किती महत्त्वाचा आहे, याची मला पूर्ण कल्पना आहे तरी मी असें खात्रीनें ह्मणूं शकतों कीं, आपण अतांपर्यंत आपलीं जीं अधिवेशनें पार पाडलीं आहेत व जी खटपट केली आहे त्यावरून लढा अर्धा अधिक प्रजाजनांनीं जिंकला आहे. आपण या परिषदांत केलेल्या विचारविनिमयाचे द्वारें जें लोकमत सर्व देशभर पसरविलें आहे त्यावरूनच लढा जिंकला असें मी म्हणत आहें. दाक्षिण हिंदुस्थानांत नांव घेण्यासारखीं जीं दोन तीन प्रमुख संस्थानें आहेत त्यांपैकींच तिसऱ्या दर्जाच्या परंतु एका मोठ्या संस्थानचा मी रहिवाशी आहें. त्या संस्थानांत नित्य नवीं कुलंगडीं कशीं उत्पन्न होत आहेत व तेथें सध्यां नागरिकांच्या हक्कांची कशी पायमल्ली होत आहे, हें मी नव्यानें सांगण्याची अवश्यकता नाहीं; तें सर्व प्रसिद्धच आहे. त्या संस्थानी वातावरणाची कडक झळ मला लागली आहे त्यामुळें संस्थानी प्रजेच्या बाबतींत चळवळ सूरू करतांना काय काय अडचणी येतात याची मला भरपूर व पुरी कल्पना आहे. ह्मणूनच आपण आपला अनुभव सांगून या परिषदेंत भाग घ्यावा असें वाटल्यावरूनच मीं भाग घेत आहें. आपल्यास मोठें आश्चर्य वाटतें कीं, आमच्याच धर्माच्या, आमच्याच रक्ताच्या व आमच्या संस्कृतीच्या राज्यांत आपण असून आपल्यास विविध प्रकारचे कष्ट भोगावे लागतात. परंतु कष्टाची व तशीच अत्यंत चमत्कारिक गोष्ट ही कीं, तशी स्थिति खरोखरच आहे. तेथें स्वराज्याचें किंचित् सुद्धां वारें नाहीं, मग सुख तरी कोठून अनुभवास मिळणार.

## ऐतिहासिक परंपरा

आपल्यास माहित आहेच कीं, या दाक्षिणी मुलुखांत जीं संस्थानें आहेत त्यांचा विस्तार फारसा नाहीं. लोकसंख्येच्या मानानें अगर क्षेत्रांच्या मानानें तीं ब्रिटिश हिंदुस्थानांतील एका जिल्ह्याएवढीसुद्धां मोठीं नाहींत. आज जे प्रतिनिधी परिषदेस निरनिराळ्या संस्थानांतून आलेले आहेत त्यांत एकच संस्थान, ह्मणजे

हैद्राबाद् वगळलें तर त्याचा विस्तार वरीलप्रमाणें आहे. फक्त हैद्राबाद् संस्थानच संस्थान या नांवास शोभणारें आहे. आतां वर्णन केलेलीं हीं छोटींमोठीं २० संस्थानें त्यांच्या मानानें जरी लहान असलीं तरी त्यांचे अधिकार मोठे आहेत; सबब त्यांकडे आपल्यास लक्ष दिलें पाहिजे. जरी ते आमच्या धर्माचे अगर संस्कृतीचे असले तरी त्यांच्यापासून प्रजेला कोणत्याही प्रकारचा फायदा नाहीं, ही मोठी दुःखाची गोष्ट आहे. दक्षिणेंतील संस्थानिक व बाकीच्या हिंदुस्थानभर पसरलेले संस्थानिक यांचेमध्यें अंतर फक्त ऐतिहासिकच आहे. हल्लींच्या राजेरजवाड्यांच्या पूर्वजांनीं आपल्या स्वतःच्या व प्रजेच्या सामर्थ्यावरच हीं हल्लींचीं राज्यें कमाविलीं आहेत. ज्या लोकांच्या बाहूंच्या बळाची त्यांनीं राज्य मिळवण्याकरितां मदत मागितली तेच लोक आतां त्यांचे प्रजाजन आहेत. तेव्हां या लहान संस्थानांचा जरी प्रश्न असला तरी तो मोठ्या संस्थानांना लागू पडतो. कारण लहानमोठ्या संस्थानिकांचें अधिकारक्षेत्र तितकेंच सारखें व मोठें आहे. जो प्रश्न लहान संस्थानांचा आहे तोच मोठ्या संस्थानचा आहे. व त्या त्या संस्थानिकांच्या रागालोभाचा परिणाम प्रजेला सारखाच भोगावा लागतो. आपलेच संस्थानिक म्हणून तेथें वसंतऋतूंत जसा फुलझाडांना बहार येतो तद्वत् प्रजाजनांची चलती चालली आहे. अशी जर कोणाची समजूत असेल तर ती चुकीची आहे. त्या ठिकाणीं वसंतऋतूंमध्येंच वृक्ष वठलेले व फुलझाडांचा खराटा उभा राहिलेला असें भेसूर, भयानक व उद्वेगकारक दृश्य सर्वत्र दिसत आहे. हैद्राबाद्खेरीज करून जीं संस्थानें आपल्या दक्षिणमहाराष्ट्रांत दिसतात तीं आपल्या मराठी स्वराज्याचीं अवशेष स्मृतिचिन्हें आहेत. श्री शिवछत्रपति महाराष्ट्रभूच्या स्वराज्याचा प्रणेता, मोंगल बादशहाबरोबर हिंदुपदपादशाहीच्या स्वातंत्र्याकरितां लढला, स्वतंत्रता प्रस्थापित केली व त्याचा विस्तार त्याच्या मागून येणाऱ्या त्याच्या मराठे बंधूंनीं केला. ह्या सर्व गोष्टींची आपणांस माहिती आहेच, मराठी साम्राज्याचा कसा विस्तार झाला व त्यास उतरती कळा कशी लागली या सर्व ऐतिहासिक गोष्टी आहेत व त्या थोड्या फार अंशानें या हल्लींच्या राजेरजवाड्यांना लागू आहेत; कारण त्यांचाही थोडा थोडा भाग मराठी राजकारणांत आहे. तेव्हां त्यांचें व त्यांच्या प्रजाजनांचें नातें हें फार कालापासून अगदींच जवळचें आहे असें दिसून येईल; तेव्हां आपल्याच प्रजेबद्दल त्यांची दृष्टि आतां कशी बदलली आहे हें ध्यानांत आणलें पाहिजे.

याचें कारण फार खोल नाहीं. कारण मराठी राज्य काबीज केल्याबर जिकडे तिकडे अबाधित सत्ता ब्रिटिशांची नांदूं लागल्यामुळें हल्लींच्या राजांचे व त्यांच्या प्रजाजनांचे जिव्हाळ्याचे संबंध दुरावले, ही स्थिति ब्रिटिश राज्यामुळें झाली आहे. कांहीं झालें तरी ही गुंतागुंत सोडविली पाहिजे. संस्थानिक व प्रजाजन आणि संस्थानिक व ब्रिटिश सरकार यांचें एकमेकांशीं कसें नातें आहे व त्यांचा संबंध कसा रहावा हा फार गुंतागुंतीचा प्रश्न आहे असें लोकांस वाटतें. परंतु तो तितका गुंतागुंतीचा खास नाहीं असें माझें मत आहे. कारण या विसाव्या शतकांत एकाच व्यक्तीच्या हातांत अनियंत्रित सत्ता असावी असें कोणाच्या मनांत वसत नाहीं व वसणारही पण नाहीं. व्यक्तीच्या हातीं सत्ता एकवटली तर अतिशय नुकसान होतें हें आपल्यास इतिसावरून दिसत आहे. एखादा राजा कदाचित् चांगला असूं शकेल, त्याच्या राज्यसत्तेला वाटेल तर Benevolent despotism म्हणा; अशी सत्ताच एकाचे हातीं असणें हें योग्य आहे कां अशी जेथें पृच्छा होते तेथें आपल्याच लोकांनीं आपल्या मताप्रमाणें आपल्या राज्याचा कारभार चालविणें केव्हांही इष्ट आहे. अशी सर्वत्र आरोळी होते व रयत हा राजा व राजा हा प्रजेचा नोकर अशी त्या ठिकाणीं घोषणा निघते. अशा ठिकाणीं हल्लींच्या राजांचा अनियंत्रित कारभार कोठवर टिकेल याचा विचार करा; युरोपांत ज्या मोठमोठाल्या क्रांत्या झाल्या त्यांत मी मी म्हणणाऱ्या झारचा किती लौकर नाश झाला हें ध्यानांत आणा; युरोपांतील जीं बादशाही सिंहासनें पार धुळीस मिळून गेलीं त्यांचा विचार बाजूस सारतां कामा नये व तो तसा आमच्या राजेमहाराजांनीं सारूं नये अशी आमची त्यांना विनंति आहे. याच्या उलट जर ते वागूं लागले तर काळाच्या पोटांत काय आहे हें सांगतां येत नाहीं.

## लोकशाहीचा प्रादुर्भाव.

" लोकशाहीचा जोर कसा असतो व त्यानें काय काय साध्य केलें आहे हें आतांच सांगितलें आहे. लोकशाहीचा हा वारा कसा जोरानें वाहत आहे हें मनांत आणलें तर आमच्या संस्थानिकांनीं वेळींच आपल्या प्रजेची दाद घेतली पाहिजे व प्रजेच्या काय काय अडचणी आहेत याची जाणीव करून घेतली पाहिजे. यांतच त्यांचें चिरस्थायित्व व सुख आहे हें त्यांनीं जाणलें नाहीं तर

त्यांनाही लोकमताबरोबर कुस्ती खेळणें जड जाईल, हें त्यांनीं पक्कें लक्षांत ठेवावें. आपल्या संस्थानिकांपैकीं पुष्कळ लोक पाश्चात्य देशांत जाऊन प्रवास करून आले आहेत. आपल्या प्रजेकडून वसूल केलेला पैसा आपल्या सफरीवर लाखांनीं त्यांनीं खर्चून टाकलेला आहे. त्याच्या मोबदला त्यांनीं प्रजेच्या सुख-सोयींकडे लक्ष दिले आहे काय ? पाश्चात्य देशांतील राजनीतीचे अडाखे काय आहेत हें त्यांनीं जाणलें आहे काय ? असें कोणी त्यांना विचारल्यास कोणाही संस्थानिकाला या प्रश्नाचें उत्तर देतां येणार नाहीं. परदेशीय प्रवासानें आमच्या संस्थानिकांनीं निरनिराळे ढंग मात्र आपआपल्या संस्थानांत आणून सोडले आहेत. परंतु लोकतंत्री राज्यकारभार पाश्चात्य देशांत जसा जारी आहे तसाच तो आपल्या संस्थानांत खरा शांततेचा व मुत्सद्दीगिरीचा प्रकार म्हणून सुरू करण्यास ते तयार आहेत काय ? लोकशाही ही काय चीज आहे याची त्यांनां नुसती कल्पना आली असती तर त्यांनीं जे परदेशी सफरीवर लाखो रुपये गरीब बिचाऱ्या प्रजेचे उडविले, त्याचें तरी सार्थक झालें असतें; परंतु कष्टाची गोष्ट ही कीं, कोणत्याही संस्थानिकांनीं तशी लोकशाहीची प्राणप्रतिष्ठा आपल्या राज्यांत केली नाहीं; उलट फ्रान्स देशाचा नामांकित बादशहा जो १४ वा लुई त्यांच्या शब्दांत "मी म्हणजे संस्थान, व संस्थान म्हणजे मी" असे या विसाव्या शतकांत उद्गार ते काढूं शकतात, ही मोठ्या दुःखाची व शरमेची गोष्ट आहे. ब्रिटिश राजछत्राखालीं असणाऱ्या या राजांना आपल्या प्रजाजनांच्या संबंधाच्या त्यांच्या कर्तव्याची पूर्ण विस्मृति झाली आहे. संस्थान म्हणजे आपली खासगी मालमत्ता व प्रजेचा पैसा म्हणजे आपलाच पैसा अशी सर्वतोपरी भावना झाली आहे. आपल्या स्वतःची चैन झाली म्हणजे तिकडे प्रजेचें कांहीं कां होईना असें ते आज वागत आहेत. आपले अधिकार मात्र अनियंत्रित असले म्हणजे झाले, आपल्यापुरतें सर्व झालें म्हणजे झालें अशी आतां त्यांची सर्वतोपरी भावना झाली आहे व मी करीन ती पूर्व दिशा झाली पाहिजे अशाच वृत्तीचे सर्व संस्थानिक आढळून येतात. तेव्हां ही भलती सलती राजे लोकांची झालेली कल्पना मुळासकट उपटून काढून टाकल्याशिवाय हा गुंतागुंतीचा प्रश्न लौकर सुटणार नाहीं. या २० व्या शतकांत संस्थानें ही आपली खासगी मालमत्ता ( Property ) आहे असें जें त्यांना वाटतें ती भावना बदलली पाहिजे. त बदलण्यास मागें पुढें पाहूं नका. कारण यावरच तुमचे पुढील सर्व हितान-

हिताचे प्रश्न निगडित आहेत. ही राजे लोकांची आपल्यापुरतेंच पाहण्याची संवय आहे किंवा नाहीं ह्याचें उत्तम उदाहरण पहाण्याचें झाल्यास त्यांनीं हल्लीं आपले अधिकार काय आहेत हें ठरवून घेण्याबद्दल चालविलेली चळवळच साक्ष देईल. त्यांनीं आपल्यातर्फे वकील पाठवून आपलें म्हणणें विलायतेंतील अधिकाऱ्यांपुढें मांडून आपली सत्ता अबाधित व अनियंत्रित राखण्याची जोरानें खटपट सुरू केली आहे.

## नरेंद्रमंडळाचें कार्य.

" नवीन राजवटींत म्हणजे गेल्या १० वर्षांत स्थापन झालेलें " नरेंद्रमंडळ " म्हणजे दुसरें तिसरें कांहीं नसून वर जो १४ व्या लुईचा motto सांगितला, त्याचें तें एक पहिल्या प्रतीचें चित्र आहे. यांतील संस्थानिक ' आपण आपण म्हणजे आपलें संस्थान ' या भावनेशीं अगदीं एकरूप झाले आहेत. ब्रिटिश सरकाराबरोबर आमच्या संस्थानिकांचे जे तह व करार झाले आहेत, त्यांनां ज्या सनदा मिळल्या आहेत, ते सर्व कागद कोणत्या स्वरूपाचे आहेत, या अगर दुसऱ्या, ब्रिटिश सरकारशीं झगडण्यासारख्या पुष्कळ बाबी आहेत, नाहींत असें नाहीं; त्यांचा नीट निकाल लागावा असें आम्हांस वाटतें. परंतु असें प्रेम उत्पन्न होण्या जोगी स्थिति राहिली नाहीं. या नरेंद्रमंडळामार्फत दाद लावून घेण्याकरतां ते जी चळवळ करतात ती चांगली जरी असली तरी त्यांत प्रजेचें अंग कितपत आहे, प्रजेच्या मतास काय मान दिला जातो हें अगोदर पाहिलें पाहिजे. चेंबर ऑफ प्रिन्सेस अथवा नरेंद्रमंडळांत जे ठराव पास होतात त्यांचा प्रथमदर्शनीं परिणाम ज्या प्रजाजनावर होतो त्यांचा नरेंद्रमंडळाच्या कारभारांत हात नसतो अगर तें नरेंद्रमंडळाचें मत बदलूं शकतील इतके जोरकस नाहींत. " मी म्हणजे. संस्थान " अशी जी मनोवृत्ति वर प्रगट होते असें सांगितलें त्यावरून त्यांच्या कामाची वास्तविक कल्पना येईल. प्रजेचा राज्यकारभारामध्यें अगर आर्थिक गोष्टीमध्यें हात नाहीं. उदाहरणार्थ, संस्थानी प्रजेचा पैसा घेऊन संस्थानांच्यातर्फे जें खडें सैन्य उभें केलें जातें, त्याच्यासंबंधानें कांहीं ठराव प्रजेच्या खिशास कमी अधिक प्रमाणांत चट्टे बसणारे झाले तर त्यांना ते भोंवतात. परंतु त्यांचा पतिकार करण्यास साधन प्रजेच्या हातीं नाहीं. कारण त्यांचा तेथील करभारांत हातच नाहीं व त्यांचें मत न घेतांच ठराव

पास न होतांच निकालांत आणतात. वास्तविक चट्टा लागतो प्रजेच्या खिशाला परंतु राजेमहाराजांना त्याबद्दल दिक्कतच वाटत नाहीं. या साध्या गोष्टींत सुद्धां नरेंद्रमंडळाचें काम कसें चालतें हें या वरवरच्या गोष्टी सांगितल्या तर ध्यानीं येईल. यावरून एकच गोष्ट सिद्ध होते कीं, या लोकांची कल्पना 'प्रजा ही कोणी निर्जीव वस्तु असून ती जनावराप्रमाणें आहे.' तेव्हां हीच कल्पना सर्व अडचणींच्या मुळाशीं आहे आणि तीच आपल्याला बदलली पाहिजे. व ती योग्य व कायदेशीर मार्गानें चळवळ करून पार उडविली पाहिजे. तेव्हां वरील गोष्टीवरून आपल्या ध्यानांत आलेंच असेल कीं, संस्थानी प्रजा सर्व तऱ्हेनें, सर्व बाजूनें, कशी गांजली जात आहे. प्रजा अगर तिचें वित्त ही सर्व राजांची खासगी मालमत्ता आहे म्हणूनच असा भयंकर प्रकार प्रजेवर ओढवतो. जरा फडक शब्दयोजना मला करावी लागते याचे बद्दल माफी असावी. आम्ही सर्व संस्थानी प्रजाजन गुलामापेक्षां गुलाम आहोंत असें म्हणण्यास जरी वाईट वाटतें तरी तशी स्थिति खास आहे. मॅझिनीचे काळीं इटालियन प्रजाजनांप्रमाणें हिंदवासीयांची स्थिति आहे. 'ना पार्लमेंट' ना स्वतंत्रता 'संघटना' ना भावनास्फुटता, याहून जास्त वर्णन तें काय करावें !

## ब्रिटिश सरकारची जबाबदारी.

" अशी स्थिति असतांना संस्थानी प्रजेनें कोणाकडे दाद मागावी. दाद लावून घेण्यास संस्थानी प्रजेला दुसरें कोर्टच नाहीं. संस्थानिकांना सर्वतोपरी ब्रिटिश राजसत्तेचा पाठिंबा असल्यामुळें त्यांचा जुलमी व अनयंत्रित राज्य-कारभार प्रजेस सहन करावा लागतो. हें साम्राज्य सरकारचें संरक्षणच परिणामीं घातक होऊन बसलें आहे. जणूं काय संस्थानी प्रजेच्या उन्नतीच्या मार्गांत हा खोडाच आहे. संस्थानी प्रजाजनांस आपल्या संस्थानाच्या अंतर्गत राज्यकारभारांत कांहीं भाग आपण घ्यावा असें वाटल्यास व तो जरी सदनशीर मार्गानें साध्य करून घ्यावा असें वाटलें तरी अशी सनदशीर चळवळ सुद्धां तेथें चालवितां येत नाहीं. सरकारची ही जबाबदारी प्रजेच्या मार्गांत सर्वथैव नडते; संस्थानांत वर सांगितल्याप्रमाणें कोणतींही न्यायनिवाडा योग्य रीतीनें देणारीं कोर्टें अगर स्वतंत्र बाण्याचीं वर्तमानपत्रें नाहींत, त्यामुळें प्रजेला स्वतःच्या मालमत्तेची सुरक्षितता मुळींच वाटत नाहीं. तसेंच संस्थानिकांची खाजगी मालमत्ता कोणती व संस्थानची

कोणती हें सांगण्यास अगर कळण्यास मार्गच नाहीं. तेव्हां या विसाव्य शतकांत अशा तऱ्हेच्या राज्यपद्धतीस सुधारलेल्या जगाच्या पाठीवर थाराच मिळणार नाहीं. परंतु हिंदुस्थान सरकारच्या अधिपत्याखालीं असलेल्या मुलुखां ज्यावेळीं स्वतंत्रता व सुधारणा यांच्या मागणीची ओरड सारखी चालू आहे त्या काळांतही आमचीं राज्यें बिनधोक अनियंत्रित स्थितींत वागत आहेत. याहून दैवदुर्विपाक तो कोणता ? संस्थानी प्रजाजनांचा अशा धोरणानें आपल्य राजांवरील व तसाच ब्रिटिश सरकारावरील विश्वास उडाला आहे असें जर कोणीं म्हटलें तर त्याला काय उत्तर द्याल ? ब्रिटिश सरकारच्या राजवटींत तरी संस्थानिकांची स्थिति कशी आहे हेंही पाहण्यासारखें आहे. वऱ्हाडच्या बाबतींत लॉर्ड रेडिंग यांनीं निजामसाहेबांना आपण कोण आहांत व ब्रिटिश सरकार कोण आहे यांची चांगली जाणीव करून दिली आहे. असें असलें तरी आमचे संस्थानिक त्यांचीच खुशामत करण्यास तयार आहेत. आपले अधिकार कायम राखण्यासाठीं त्यांना ही सर्व कारवाई अपमान सोसून करावी लागत आहे. कारण प्रजेच्या व राजाच्या झगड्यांत खुखाखुशी अधिकार सोडण्यास कोण तयार होईल ? लॉर्ड रेडिंगसाहेबांनीं स्पष्ट शब्दांत निजाम साहेबांना सांगितलें " शहासाहेब, आपण आमचे सर्वतोपरी मांडलिक आहां. जरी बरोबरीच्या नात्यानें ( Allies ) म्हणून तह अगर करारमदार झाले असले तरी ते लक्षांत घेऊनच आम्ही असें सांगतों कीं, आपण मांडलिकच आहां. " या पेक्षां जास्त खुलासा संस्थानिकांच्या बाबतींत कांहीं पाहिजे कीं काय ! कोणच्या खुळ्या भावनेच्या नादीं हे आमचे संस्थानिक लागले आहेत. हेंच कळत नाहीं. जर त्यांनीं आपल्या प्रजेची सहानुभूति मिळविली पाहिजे, जर प्रजेचा पाठिंबा मिळेल तरच त्यांना त्यांचे झगडे झगडण्यास मदत होईल; एरव्हीं नाहीं. त्यांनीं आपल्या वर्तनानें प्रजेची सहानुभूति गमाविली आहे व त्यांचे व प्रजाजनांचे संबंध सर्व दुरावले आहेत. अशी स्थिति होण्यास पुष्कळ जरी कारणें असलीं तरी मुख्य कारण वर सांगितल्याप्रमाणें ब्रिटिश सरकारकडून अंतर्गत शत्रूपासून संरक्षण होत आहे हेंच होय. हें जरी कारण असलें तरी राजाचें आपल्या प्रजेशीं होणारें अन्यायाचें व जुलमाचें वर्तनच पुष्कळ अंशीं कारणीभूत झालें आहे. कांहीं झालें तरी ब्रिटिश सरकारवर फार दोष येतो. प्रत्येक संस्थानांतून अशा तऱ्हेची राजा व प्रजा यांची दुरान्वयाची स्थिति

मुद्दाम कोणी कोणत्या कारणांनीं घडवून आणली याचीं उदाहरणें हिंदुस्थानच्या इतिहासांत पुष्कळच आहेत. पूर्वीं राजा व प्रजा यांचे परस्परावर अवलंबून राहणारे संबंध होते. लढाईत लूट आणली तर ती पूर्वीं सैन्यामध्यें वांटल्याशिवाय स्वतः राजाचें आसन स्थिर रहाणें शक्य नव्हतें. प्रजेच्या संतोषांवर राज्य अवलंबून होतें परंतु त्या वेळच्या मुत्सद्द्यांनीं एकामागून एक राज्य काबीज करून **सबसीडियरी फोर्स**सारखीं तत्त्वें संस्थानिकांबरोबर केलेल्या तहनाम्यांत गोंवलीं तेव्हांच त्यांच्यापैकीं एका मुत्सद्द्यानें ही स्थिति बदलली नाहीं तर हल्लीं अस्तित्वांत असलेल्या पद्धतीनें संस्थानिकांची व त्यांच्या प्रजाजनांची स्थिति कशी होईल याचें उत्तम चित्र रंगविलें आहे. शंभर वर्षांच्या मागें **थॉमस मनरोनें** गव्हर्नर जनरलास लिहिलेल्या एका खलित्यांत त्यांनीं खालील उद्गार काढले आहेत.

"The subsidiary force has a natural tendency to render the Government of every country, in which it exists, weak and oppressive, to extinguish all honourable spirit among the higher classes of society and to degrade and impoverish the whole. The usual remedy of a bad Government in India is a quiet revolution in the palace or a violent one by rebellion or foreign conquest. But the presence of British forces cuts off every chance of a remedy by supporting the prince on the throne against every foreign or domestic enemy. It renders him indolent by teaching him to trust to strangers for his security and cruel and avaricious by showing him that he has nothing to fear from the hatred of his subjects"

वरील पॅरिग्रॅफांत वर्णन केलेली स्थिति आपल्यास तंतोतंत आज प्रत्ययास येत आहे. सदर मुत्सद्यानें काढलेली ही भविष्यपूर्ण वाणी विचाराची व अर्थपूर्ण होती हें ध्यानांत येईल. ही स्थिति कमी अधिक प्रामाणानें संस्थानांतील

राज्यकारभाराची सर्वत्र असलेली कोठें अंधुक तर कोठें अतिशय स्पष्ट अशी आपल्यास ऐकूं येते. अशी जरी स्थिति असली तरी यांतून बाहेर पडण्याचे दोन तीन मार्ग आहेत. एक मार्ग म्हटला म्हणजे प्रजेनें अत्यंत स्वर्थत्याग करून, आपल्या हिताबद्दल झगडा करून, आपल्या संस्थानिकांकडून आपल्या वाजवी हक्कांचें परिपालन करून संघटित चळवळ करणें हा होय. दुसरा मार्ग म्हणजे स्वतःस कर्तव्याची जाणीव होऊन आपली प्रजा जास्त कार्यक्षम व प्रगमनशील होऊन राज्याकारभार चालविण्यास समर्थ होईल अशा रीतीनें त्याची संस्थानिकांनीं स्वता उन्नती करणें हा होय. तिसरा मार्ग म्हणजें ब्रिटिश सरकारनें पूर्वी जे संस्थानिकांबरोबर तह करार वगैरे केले त्यांत 'प्रजेची उन्नती आम्ही ( संस्थानिक ) करूं' अशी अट आहे. त्या अटीबरहुकूम साम्राज्यसरकारनें जर त्यांच्या मागें लकडा लावला तरच शक्य आहे; वर सांगितलेल्या तीन मार्गांपैकीं पहिला मार्ग अतिशय बिकट पण कष्टसाध्य आहे; दुसरा अगदींच असाध्य, कारण राजे लोकांची आतांची दिशाच निराळी आहे; तेव्हां त्यांच्यापासून कांहीं मिळेल ही आशाच नाहीं. आतां राहिला तिसरा मार्ग, पण त्याही मार्गांत आत्यंत काटेकुटे पसरले आहेत. तेव्हां तोसुद्धां जवळ जवळ अशक्यच आहे. ब्रिटिश सरकार अंतर्गत कारभारासंबंधानें कोणत्याही संस्थानच्या राज्यकारभारांत हात घालीत नाहीं हें जरी खरें असलें तरी स्वतःच्या हितसंबंधाविरुद्ध कांहीं ढवळाढवळ होण्याचा जर संभव असेल तर ते हात घालीतच असतात एऱ्हवीं नाहीं. तेव्हां अशी स्थिति असतांना काय केलें तर आपल्यास हक्क मिळतील याचा विचार केला पाहिजे. प्रजेनें स्वतांच्या पायावर उभें राहून अत्यंत चिकाटीनें व नेटानें कशाचीही पर्वा न करतां चळवळ चालविली तरच त्यांचा तरणोपाय आहे. परंतु हें सांगणें जितकें सोपें आहे तितकें आचरणांत आणण्यास किती कठीण आहे याची जाणीव मला आहे. संस्थानांत कोणकोणत्या अडचणी येतात त्याचें चित्र उभें करण्यास स्वतंत्र वर्तमानपत्र अगर संस्थानच्या राज्यकारभारांत योग्य त्याप्रमाणें अधिकाराची वांटणी करून घेण्यासारख्या शिक्षण देणाऱ्या संस्था असल्या तरच हे काम होणार आहे. या दोन मार्गांनीं आपल्या उन्नतीचा मार्ग सोपा होणार आहे. पण ही केवळ सदिच्छाच आहे कारण अशा तऱ्हेची खटपट कोणी संस्थानांत केली अगर करून पाहिली तर त्याला खो देण्याची अव्याहत खटपट चाललेली आपल्या नजरेस

येत आहे; म्हणून हा स्वातंत्र्याच्या कल्पनेचा रोपटा या संस्थानी वातावरणांत खात्रीनें रुजणार नाहीं, असें वाटतें. राज्यकारभाराबद्दल एक शब्द ज्या ठिकाणीं उच्चारण्याची ताकद नाहीं त्या ठिकाणीं कोठलें वर्तमानपत्र नी काय ? असें जरी असलें तरी प्रजेनें निराश न होतां प्रयत्न हा केलाच पाहिजे. हल्लींची खालसा मुलखांतील चळवळ पहा म्हणजे कल्पना येईल. यावर असें म्हणतां येईल कीं, ब्रिटिशसरकार परकें. त्यांना आपल्यास स्वराज्याचे हक्क देण्याचे जिवावर येत असेल पण तसें सुद्धां या संस्थानिकांचें नाहीं. या संस्थानिकांना आपल्या राजनिष्ठ प्रजाजनापेक्षां ब्रिटिश सरकार जास्त जवळचें वाटतें. आपले अधिकार असेच अनियंत्रित व यावच्चंद्रदिवाकारौ असेच अबाधित रहावेत हीच त्यांची उत्कट इच्छा सदैव असणार. असें जरी असलें तरी संस्थानिक आपल्याच हाडा-मांसाचे असल्यानें ते आपण होऊनच कांहीं तरी हक्क देतील असें अंधुक अंधुक आजवर वाटत होतें. मॅंटेग्यू चेल्म्सफोर्ड रिपोर्टांतील म्हणण्याप्रमाणें खालसा इला-ख्यांत जी लोकमताची ज्वाला पसरली आहे तिची झळ जवळच असलेल्या संस्थानी मुलखास लागेल असा इषारा त्यांनी सौम्यशब्दांत सर्व संस्थानिकांना तेव्हांच दिलेला आहे. पण आमचे संस्थानिक किती खमंग आहेत ! त्यांनीं या स्वातंत्र्याच्या वाऱ्याचा स्पर्श प्रजेस होऊं नये म्हणून आपल्या सरहद्दीवर पत्र्यांचें कुंपण घातलें आहे. तें कसें जाचक आहे हें आतांच सांगितलें आहे. हा जो प्रजेबद्दल अविश्वास त्यांनी दाखविला आहे, त्याचें प्रायश्चित्त त्यांना कालांतरानें मिळेलच. आपली राजाबद्दल पूर्वीं किती सोज्वळ कल्पना होती. राजा म्हटला म्हणजे त्यानें प्रजाजनांचें रंजनच केलें पाहिजे. त्यानें लोकांचीच आराधना केली पाहिजे. लोकांची आराधना करणारे पूर्वींचे श्रीरामासारखे परमपूज्य राजे कोणीकडे व हल्लीं सिंहासनाधिष्ठित रावणराजे कोणीकडे ! जगांत एक सत्ताच मोठी आहे व तिलाच किंमत आहे, विद्वत्तेला अगर पैशाला किंमत नाहीं असें मात्र कोणी समजूं नये. विद्वत्तेची किंमत कशासही येणार नाहीं. परंतु इतकी मोठी सत्ता एकाएकीं सोडण्याचें त्यांचे हातून तरी कसें होईल, याचा तुम्ही विचार करून काय योग्य तें करा. या संस्थानिकांनीं आपल्या सत्तेचा कां दुरुपयोग करावा हेंच मला कळत नाहीं. राज्यकारभाराची दगदग जर सोसत नसेल तर संस्थानी प्रजेनें जें साधें मागणें केलें आहे त्याप्रमाणें प्रजाप्रतिनिधितंत्री अशी जबाबदार राज्यपद्धति स्थापन करून त्यांचें अंगावर

सर्व अधिकार सोंपवा आणि मोकळे व्हा. लोकगंगेच्या ओघास बांध घालणें याउपर शक्य नाहीं, हें सर्व लहान मोठ्या संस्थानिकांनीं लक्ष्यांत ठेवावें. आपल्या-चपैकीं एका लहान संस्थानचें उदाहरण देऊन मी असें सांगतों कीं श्रीमंत औंधकरांनीं आपण होऊनच प्रजाप्रतिनिधितंत्री राज्यकारभार सुरू केला आहे. आणि बजेटची मंजुरी वगैरे घेण्याचीं कामें त्यांत होत असतात. हें असलें पहिलेंच उदाहरण दक्षिण महाराष्ट्रांतील संस्थानिकांपैकीं आहे. याकरतां लोकांनां त्यांच्याबद्दल आदरभाव वाटला तर काय नवल आहे ? ह्या संस्थानिकांचें अनुकरण इतर संस्थानिक करतील काय ? याचें उत्तर मी कालावरच सोंपवितों. राज्यावर येणें म्हणजे वाटेल तशा अनियंत्रित राजसत्तेचा उपभोग घेणें नव्हे, त्याच्याउलट सर्व प्रजाजनांच्या बरोबर त्यांच्या हितकारी राज्यपद्धति चालू करणें हेंच राज्यकर्त्यांचें ध्येय असलें पाहिजे. परंतु अशी स्थिति होत नाहींना म्हणून कष्टानें ब्रिटिश सरकारकडे धांव घेतली पाहिजे. ही त्यांचेवर करारा-प्रमाणें जबाबदारी आहे, ती त्यांनीं पार पाडली तरच साम्राज्य सरकारनें प्रजे-बद्दल थोडा तरी आदर बाळगिला असें होईल. ब्रिटिश सरकार संस्थानिकांच्या राज्यकारभारांत हात केव्हां घालतें हें मीं आपल्यास आतां सांगितलें आहे, पुन्हां सांगण्याची गरज नाहीं. ह्या नैतिक जबाबदारीची जाणीव ज्या थोड्याबहुत गव्हर्नरजनरलनां होती, त्यांत लॉर्ड कर्झन हे प्रमुख होत. त्यांनीं इतर कोण-त्याही गोष्टी केल्या असल्या तरी संस्थानिकांना उद्देशून सन १९०० सालीं व भावलपूर येथें १९०३ सालीं जीं दोन भाषणें केलीं त्यांतील तत्त्वें अजूनही अबाधित आहेत. तीं आतां मी वाचून दाखवितों म्हणजे त्यावरून कल्पना येईल.

" Chiefs are not privileged body of persons; as is some time imagined by them. God Almighty has not presented them with a Sanad to do nothing in perpetuity. The revenues are not their privy purse. They exist for the benefit of their people. Their people do not exist for them. They are intended to be leaders, types, examples. A Chief of whom any one of his subjects can point a finger of scorn is not fit to be a Chief."

यांतील तत्त्वाप्रमाणें वागणारा एक तरी संस्थानिक मिळाल्यास पुष्कळच काम होणार आहे. सन १९०३ सालीं भावलपूर येथें भाषण करतांना ते म्हणतातः–

" There is a necesssity of maintaining a clear line between public and private expenditure and of remembering that the resources of the State, belong to the people and not to the chiefs and is contributed by them in one form which ought for the most part to be given in another. "

या उताऱ्यावरून आपल्या ध्यानीं आलेंच असेल कीं, राजा जो आपल्या प्रजेपासून एका नाहीं दुसऱ्या प्रकारचे कर घेत असेल तर त्याचे मोबदला त्याला कांहीं तरी प्रजेला देणें भाग आहे. रघुवंशांत अशा प्रकाराचें राजाचें कर्तव्य सांगितलें आहे. " प्रजानामेव भूत्यर्थं राजा करमग्रहीत " असें तें वचन आहे. प्रजेच्या हिताकरतांच राजा कर घेतो. परंतु अलीकडचा मनु निराळा आहे. म्हणून पदोपदीं प्रजेच्या हक्काची पायमल्ली व हिताची हेळसांड होन आहे. आम्ही जाणून आहोंत, कीं हल्लींचें ब्रिटिश सरकार उत्पन्न झालें म्हणून ह्या त्यांच्या गमजा आहेत; परंतु वरील कर्झनसाहेबांची उक्ति लक्षांत ठेवून त्याप्रमाणें आपलें पुढील धोरण ठरवावें असें मी सुचावितों.

## संस्थानें व सुधारणा.

" वर सांगितल्याप्रमाणें संस्थानी प्रजाजन करूं शकत नाहीं, संस्थानिक देत नाहीं व सरकार आपल्या स्वतःच्या फायद्याखेरीज तिकडे बघत नाहीं ही गोष्ट स्पृहणीय आहे असें कोण म्हणेल ! ब्रिटिश राजसत्तेबरोबर संस्थानिकांचे कशाही प्रकारचे करारमदार झाले असले तरी ते कोणत्या किंमतीचे आहेत याचा निर्णय लॉर्ड रेडिंगसाहेबांनीं वऱ्हाड परत देण्याच्या बाबतींत निजामसाहेबांना एक खलिता पाठवून अगदीं उघड केला आहे. संस्थानिक हे साम्राज्य सरकारचे मांडलिक आहेत व जोंपर्यंत ते आपल्या अधिकाराचा दुरुपयोग करीत असल्याचें आढळून येत नाहीं तोंपर्यंतच त्यांचें आसन स्थिर होईल असें त्यांनीं सांगितलें आहे. मग असें जर आहे तर साम्राज्यसरकारनें हल्लींचे संस्थानिकांचें आपल्या प्रजेशीं चाललेलें धोरण लक्षांत घेऊन त्यांना आपल्या कर्त-

ल्याची जाणीव करून द्यावयास नको काय ? खालसा मुलखांत कोणत्या धोरणा-वर सुधारणा कसकशा होत आहेत व चालू काळास अनुसरून ब्रिटिश हिंदुस्थानच्या राज्यकारभाराबरहुकूम सुधारणेच्या मार्गावर त्यांनां यावयास भाग पाडणें त्यांचें ओघानेंच कर्तव्य आहे असें वाटत नाहीं काय ? जर ते असें करणार नाहींत तर संस्थानी प्रजेच्या हितसंरक्षणाची अक्षम्य उपेक्षा केल्याबद्दल त्यांना दोष देणें भाग पडेल. ब्रिटिश सरकारास आपल्या स्वतःच्या साम्राज्याची शक्ति वाढविण्याकरतांच असे खलिते उपयोगांत आणावयाचे व संस्थानी प्रजाजनांच्या संबंधानें असलेली जबाबदारी पार पाडावयाची नसेल तर त्यांच्या शब्दांवर यापुढें कोणाचाही विश्वास बसणार नाहीं. मॉंटेग्यू चेल्म्सफोर्ड रिपोर्टी-तही भविष्यकाळाकडे नजर देऊनच सौम्य ( Mild ) अगर दरबारी उपदेश केला आहे. आज १० वर्षें झालीं. परंतु लोकशाहीचा मागमूस कोणत्याही संस्थानांत दिसून येत नाहीं. हिंदुस्थान हा एकच आणि अविभाज्य असा देश नाहीं काय ? ब्रिटिश हिंदुस्थानांत मात्र मुत्सद्दी वगैरे निर्माण व्हावेत आणि संस्थानांत मात्र त्यांचा दुष्काळ असावा असें तरी आहे काय ? याच्या उलट परिस्थिति होती असें ऐतिहासिक गोष्टीवरून सिद्ध करतां येईल. स्पष्ट जर बोलावयाचें झालें तर हिंदी संस्थानांत जर ही संस्थानिकांची अनियंत्रित राजपद्धति राहावयाची असेल तर आपल्या या अविभाज्य अशा हिंदुस्थानांत सनदशीर राज्यकारभाराचें बीं रुजणार नाहीं असें म्हणावयास कांहीं हरकत नाहीं. तेव्हां नैतिकदृष्ट्या साम्राज्यसरकारावर संस्थानी राजवटींत खालसांतील नमुन्याप्रमाणें राज्यकारभार चालणार किंवा चालतो हें पाहण्याची जबाबदारी आहे हें त्यांचे पूर्वींचे करारमदार लक्षांत घेतां आद्य कर्तव्य आहे असें माझें स्पष्ट मत आहे. आणि ही जबाबदारी पार पाडण्याची संधि त्यांना आयतीच आलेली आहे.

# अध्यक्ष श्री. गोखले यांचें भाषण

( पुढें चालू. )

## संस्थानें व कमिशन.

“ राजकोटमधील दौऱ्याचे वेळीं संस्थानिकांचे व ब्रिटिश सरकारचे संबंध कोणत्या प्रकारचे आहेत, तसेंच परस्परांचे आर्थिक संबंध काय आहेत यांची शाहनिशा करण्याकरितां एक कमेटी नेमण्यांत येणार असल्याचें लॉर्ड आयर्विन यांनीं सांगितलें आहे. या कमेटीपुढें संस्थानांत लोकसत्ता स्थापन झाली आहे किंवा नाहीं याची चौकशी करण्याचे प्रसंग कार्यवशात् पुढील सुधारणांच्या हप्त्याबरोबर येतील असा अजमास आहे. सदर कमेटीमार्फत संस्थानिक व सरकार यांचे हितसंबंधच निश्चित ठरणार आहेत. प्रजेचें संस्थानी राजकारभारांत कितपत अंग असावें याचा उल्लेख केलेला नाहीं व पुढें याबद्दल वरिष्ठ सरकार काय करणार आहे त्याबद्दल एक अवाक्षरही नाहीं. तेव्हां संस्थानी प्रजेनें आपल्या वतीची मागणी आपले हितसंबंध सुरक्षित राहण्याकरितां एखाद्या डेप्युटेशनच्या द्वारां व्हाईसरॉयसाहेबांकडे पाठविण्याची तजवीज करावी आणि गरजच पडेल तर पार्लमेंटपुढेंही तिला आपलें म्हणणें मांडणें भाग आहे. तेव्हां संस्थानी राजकारणाचा अभ्यास करणाऱ्या गृहस्थांनीं व संस्थानांतील पुढाऱ्यांनीं लोकमत जागृत करण्याकरितां चळवळ करणें अत्यंत जरूर आहे व अवश्यक आहे. अविश्रांत श्रम केल्याशिवाय हें साध्य होणार नाहीं, म्हणून दीर्घोद्योग करण्याबद्दल मी त्यांना मनापासून विनंति करीत आहे.

“ संस्थानिक आपण होऊन आम्हांला ब्रिटिशसरकारकडे धांव घेण्यास भाग पाडीत आहेत त्याबद्दल अत्यंत वाईट वाटत आहे. जे आमच्या रक्ताचे, धर्माचे व एकाच संस्कृतीचे आहेत व ज्यांचे हितसंबंध संस्थानी प्रजाजनांशीं अगदीं जिव्हाळ्याचे व अत्यंत निगडित असे आहेत. त्यांना आपल्या प्रजाजनांनीं लोकशाहीची आपल्या संस्थानांत स्थापना आजवर झाली नाहीं ती तुमच्या वजनानें तेथें स्थापून देण्यास त्यांना भाग पाडा असें तोंड वेंगडून सांगण्याची

पाळी आणून द्यावी, याची त्यांना कांहींच का क्षिति वाटूं नये याचेंच मला आश्चर्य वाटतें. यांत त्यांना आपला अपमान झाला असें वाटत नाहीं काय ! आपल्या पूर्वजांनीं आपल्या प्रजाजनांना स्वराज्य स्थापून गुलामगिरींतून वर आणलें हें ते इतकें विसरूं शकतात कसें ! आणि ते असें विसरले असले तर ती गोष्ट लांछनास्पद नाहीं काय ! संस्थानिकांना प्रजेचें साधें मागणें सुद्धां वावडे वाटतें काय ! ज्या सरकारच्या खजिन्यांत प्रजाजन स्वतःच कर देतात व जेथील प्रजा संस्थानच्या इतर गोष्टीही करते व जी प्रजा अत्यंत राजनिष्ठ आहे त्यांनीं आपल्या संस्थानच्या राजकारभारांत आपल्यास वांटा मिळावा ह्या हेतूनें ‘ प्रजाप्रतिनिधितंत्री अशी राजव्यवस्था सुरू करा ’ अशी साधीसुधी मागणी केली तर तिचा इनकार केला जावा काय ! या मागणींत कोणतीच गोष्ट अनैसर्गिक, अप्रयोजक व असमंजस नाहीं असें असतां त्यांनीं तिचा धिक्कार कां करावा हेंच समजत नाहीं. हल्लींचें युग बदललेलें युग आहे. त्याकडे यापुढें त्यांनीं डोळेझांक करतां कामा नये आणि केल्यास त्यांचाच फडशा उडेल. कारण प्रजेला जर आपल्या विश्वासांत घेतलें तरच संस्थानिकांना आपल्या योग्य हक्कांकरितां झगडतांना प्रजेचा योग्य पाठिंबा मिळेल व सरकारालाही संस्थानांतील राजा व प्रजा यांची एकमताची मागणी अमान्य करणें जड जाईल. हल्लीं संस्थानिकांना प्रजेचा पाठपुरावा नसल्यामुळें त्यांच्या बऱ्याच हक्कांवर गदाच येत चालली आहे. संस्थानिकांना आपल्या प्रजेला विश्वासांत घेऊन तिच्या हातांत सत्ता देण्यास लाज व अपमान वाटतो; परंतु सरकारच्या मोठ्या ऑफिसरची खुशामत करण्यास त्यांना अपमान वाटत नाहीं हीच मोठ्या शरमेची गोष्ट आहे. आमच्या संस्थानिकांनीं आतां आपल्या प्रजाजनांना विश्वासांत घेऊन त्यांच्या योग्य मागण्यांचा स्वीकार केला तर पूर्वकाळीं ते जसे राजास आणीबाणीच्या वेळीं उपयोगी पडत होते तसेच ते आतांही पडण्यास कमी करणार नाहींत ही खात्री असूं द्यावी.

## आमची मागणी

“आमच्या दक्षिणेंतील संस्थानिकांनीं ‘ डिव्हाइन राईट ’ चा सारखा निदिध्यास आतां विसरला पाहिजे. तसेंच ‘मी म्हणजे संस्थान’ या घातक वृत्तीचा त्याग केला पाहिजे. आजपर्यंत ज्या परिषदा झाल्या त्यांत पास

झालेल्या ठरावांकडे नुसती वरवर जर नजर फेंकली तर त्यांत केलेल्या मागण्या किती साध्या आहेत हें कळून चुकेल. जवळच्या ब्रिटिश सरकारच्या राज्यांत जसा सुधारणांचा हप्ता दिला आहे त्या बरहुकूमच कांहीं अधिकार दिले तरी ते त्यांचा उपभोग घेण्यास मोठे उत्सुक आहेत. व ते मिळाल्यानें संतुष्ट होणार आहेत. त्यांच्या मागणीची थोडी कल्पना यावी म्हणून त्याचें थोडें दिग्दर्शन येथे करणें जरूर आहे. त्या मागण्या खालीलप्रमाणें आहेतः—

( १ ) संस्थानांत जबाबदार राज्यपद्धतीचें ध्येय जाहीर करणें.

( २ ) संस्थानच्या जमाखर्चाच्या खात्याचें नियमन करण्याकरतां लेजिस्लेटिव्ह कौन्सिलची स्थापना करणें.

( ३ ) संस्थानाधिपती अगर त्यांचे बडे अधिकारी यांची लुडबुड न चालतां प्रजाजनांस योग्य व चोख न्याय मिळेल अशी न्यायदानपद्धति अगर न्याय कोर्टें स्थापन करणें.

( ४ ) लोकांच्या नैसर्गिक हक्कांचें संरक्षण.

या वरील मागणीकडे लक्ष दिलें तर त्या एकदम फेरबदल करणाऱ्या आहेत किंवा सौम्य मागण्या आहेत हें तेव्हांच कळेल. माझे मतें संस्थानाधिपतींनीं या योग्य मागण्यांचा स्वीकार केल्यास हा झगडा सलोख्यानें मिटण्यास खात्रीनें मदत होईल. संस्थानिकांना असें वाटत असलें पाहिजे कीं, आपल्या प्रजेच्या हातांत सर्व सत्ता दिली तर आपला खासगी खर्च सर्व रीतीनें मर्यादित होऊन आपल्यास सर्वस्वीं त्यांचे तोंडाकडे पाहण्याची वेळ येईल, यामुळेंच संस्थानिकांना भीति वाटत असावी असें वाटतें. परंतु खरा विचार केला तर त्यांना भीति वाटण्याचें कांहीं कारण नाहीं; प्रजाजनांना राजाचा खासगी पैसा अगर खर्च कमी करावा असें खात्रीनें वाटत नाहीं. त्यांचा दर्जा व त्यांचा मानमरातब ते पूर्णपणें जाणत आहेत, तेव्हां त्यांच्या खासगी खर्चाची एकदां रक्कम ठरल्यावर तींत कमति होणार नाहीं हें निश्चितपणें लक्ष्यांत ठेवावें असें मी प्रजेतर्फे जाहीर करतों. प्रजेचें मागणें एवढेंच आहे कीं, खासगीची रक्कम एकदां आपल्यास लागेल तितकी ठरवून घ्या व तिचा विनियोग तुम्हीं वाटेल तसा करा, त्याबद्दल

आम्ही तुम्हांला विचारणार नाहीं. बाकी काय जी रक्कम उरेल ती मात्र आमच्या मंजुरीखेरीज खर्चली जाऊं नये अशी प्रजेची मागणी आहे. व ती सर्वस्वीं योग्यच आहे.

" संस्थानांत न्यायदानाची पद्धत अगदीं चोख पाहिजे. व ती तशी असेल तरच प्रजेला सुख लागेल. कारण न्यायदानाचे प्रश्न त्यांच्या अगदीं जिव्हाळ्याचे असतात. सरकारी अधिकारी अगर स्वतः संस्थानिक यांची त्यांत ढवळाढवळ होतां कामा नये; ढवळाढवळ झाली तर त्यांत प्रजाजनांचें सर्वस्वीं नुकसान होतें. तसेंच चांगले सुविद्य न्यायाधीश असणे बरें; नाहीं तर कांहीं संस्थानांत अशिक्षित बायकाच हायकोर्टचा अधिकार चालवितात तर कांहीं ठिकाणीं अल्पवयी मुलेंच तें काम करण्यास लायख ठरतात. त्यांचें त्या बाबातींतील शिक्षण वगैरे तुम्हीं पाहिल्यास येथें न्याय कितपत मोलाचा मिळेल याची कल्पना सहजच होईल ! कित्येक ठिकाणीं जो न्यायाधीश खालील कोर्टांत दिवाणी फौजदारी कामाचा निकाल करतो तोच इसम न्यायाधीश म्हणून अगर सल्लागार म्हणून अपिलांत येऊन बसतो व अशा रीतीनें प्रजा न्यायास मुकली जाते. तसें होणें इष्ट नाहीं तेव्हां ही पद्धत सुधारणें अगदीं जरूरीचें आहे. ज्याचे राज्यांत न्याय नाहीं त्यास 'राजा' तरी कसें म्हणावयाचे !

हैद्राबाद अगर ज्या संस्थानांत भाषण वगैरेची बंदी करण्यांत येते तेथील प्रजेचे काय हाल होत असतील ते परमेश्वर जाणे. ते कमी करण्याची खटपट झाली पाहिजे. तसेंच खासगी खर्चास मर्यादा असली पाहिजे; नाहीं तर कोणत्याही बड्या पाहुण्याचा मुक्काम जरी तास दोन तासांचा असला तरी खर्च मात्र ३।४ लाखांवर करावयाचा प्रकार दररोजचा आतां झाला आहे. तेव्हां या उधळपट्टीस आळा घालण्याकरतां खाजगी खर्च मर्यादित करून तो तोडून टाकला पाहिजे. नाहीं तर हल्लीं जशी कोल्हापुरांत शर्यतींवर लाखों रुपयांची उधळपट्टी होत आहे, तशी ती प्रजेच्या बोकांडीं कायमची बसेल. हे संस्थानिक स्वतःपुरतेंच नुकसान करून घेतात असें नाहीं; तर या नादानें लोकांना कर्जबाजारी बनवून त्यांच्या घरादारांचें वाटोळें करण्याचें पुण्य संपादतात. हें कितपत श्रेयस्कर आहे याचा सर्व संस्थानिकांनीं तरी विचार करावा. जी मागणी मागितली आहे तिचें सौम्य स्वरूप पहातां तिचा योग्य पुरस्कार करावा अशी विनंति आहे.

" संस्थानिकांनीं खासगी खर्चाकडे संस्थानच्या सर्व तऱ्हेच्या उत्पन्नांचा शेंकडा दहावा भाग घ्यावा व बाकीची जी शेंकडा ९० रक्कम ठरेल तीवर मात्र ताबा प्रजाजनांचाच राहील. असें झालें म्हणजे लोकांना भीति बाळगण्यास कारण नाहीं. कोणत्या राजनिष्ठ प्रजाजनाला आपल्या राजाला दुःखांत व अपमानकारक स्थितीमध्यें ठेवणें आवडेल ! तेव्हां संस्थानिकांनीं आपलें सर्व धैर्य एकवटून या नवीन मनूच्या आखाड्यांत उतरावें व पूर्वजांचा लौकिक लोकगंगेंत मिळून घ्यावा अशी माझी त्यांना आग्रहाची विनंति आहे. तेव्हां ब्रिटिश सरकाराकडे आपल्याच घरच्या तंट्याची दाद लावून घेण्याकरितां धांव घालण्याची ही परिस्थिति संस्थानिकांना प्रजेच्या मागणीचा योग्य विचार करून बदलतां येणार नाहीं काय ! अलबत बदलतां येईल. वरील मागणीचा धिक्कार झाला तर परिस्थिति उभयतांना उद्वेगजनकच उत्पन्न होण्याचा पूर्ण संभव आहे, हें संस्थानिकांनीं पूर्णपणें ध्यानांत ठेवावयास पाहिजे.

## स्वराज्याकरतां धडपड.

" प्रतिनिधीबांधवहो, आतांपर्यंत मला काय सांगावयाचें तें सांगितलें. आपला मार्ग अगदीं स्वच्छ असा आहे. जर आमचे संस्थानिक आमच्या योग्य मागण्यांचा इनकार करतील तर नाइलाजानें हक्कांची योग्य जाणीव त्यांना करून देण्याकरितां आपल्यास बाहेरची मदत जरूर घेणें पडेल. ब्रिटिश हिंदुस्थानांत स्वराज्य मिळविण्याकरितां आपले खालसांतील पुढारी जी खटपट करीत आहेत त्यांच्यांशीं समरस होऊन जाऊन व शक्य तितक्या सनदशीर मार्गानें आपलें ध्येय साध्य करण्याचा मार्ग आक्रमूं या. ब्रिटिश सरकारला संस्थानी प्रजेच्या हितसंबंधाबद्दल संस्थानी राजकारभारांत हात घालण्यास विनंति करूं या, याच पवित्र मार्गाचें आक्रमण करणाऱ्या संस्थांचीसुद्धां मदत मिळवावी लागली तरी ती मिळवून घेऊं या. संस्थानिक असें म्हणण्यास तयार आहेत कां कीं खालसा मुलखांतील प्रजाजन ज्याप्रमाणें स्वराज्याचे प्राप्तीकरतां चळवळ करतात तशी चळवळ केल्याशिवाय कांहींएक प्राप्त होणार नाहीं ! असें ते म्हणत असतील तर मग या लोकमताच्या कुस्तींत कोण जिंकणार हें तेव्हांच दिसेल. खालसांतील प्रजाजनांस लोकमान्य टिळकांनीं " स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे "

झ जो महामंत्र दिला तोच मंत्र आम्ही येथें उपयोगांत आणून ध्येय गांठण्याचा प्रयत्न करूं, परंतु तसें करण्याकरतां लोकमत प्रबळ केलें पाहिजे. ही लोकमताची सुप्तशक्ति भ्रमांत असलेल्या आपल्या संस्थानिकांस मोहनिद्रेंतून जागे खात्रीनें करील करील अशी खात्री आहे. लोकसत्तेचा जोर किती प्रखर असतो याचा इतिहास सांगण्याचें कांहीं कारण नाहीं. खालसांतील प्रजाजनांचें व आपलें ध्येय एकच आहे तेव्हां एकमेकांच्या मदतीनें आपलें ध्येयं गांठण्यास परमेश्वर तुम्हांला मदत करो व तें आपल्यास मिळो व तुम्हाला तें काम धैर्यानें व नेटानें करण्यास हुरूप येवो अशी परमेश्वराची प्रार्थना करून मी आपले पुन्हां एकवार आभार मानून भाषण संपवितों. "



# परिषदेंत पास झालेल्या ठरावांवरील भाषणें.



ठ.नं.१ ते ९ ठराव अध्यक्षस्थानापासून मांडण्यांत आले. त्यांपैकीं पहिले चार ठराव सर्वांनीं उभें राहून पास करण्यांत आले. पांचव्या ठरावाबद्दल थोडीशी चर्चा झाली. पुढें ठराव १२ वा रा. रा. **नरसोपंत केळकर** यांनीं सभेपुढें मांडला. तो मांडतांना ते म्हणाले "आज या ठरावांत म्हटल्याप्रमाणें जी कमिटी बसली आहे त्या कमिटीचें काम जाहीर रीतीनें चालावें व संस्थानी प्रश्नांबद्दल आस्था असणाऱ्या गृहस्थांस आपलें म्हणणें काय आहे हें पुढें ठेवण्याची संधिही मिळावी एवढेंच मागणें या ठरावांत आहे. या ठरावांतील भाषेंत मी थोडासा फरक करूं इच्छितों. त्यांत तज्ज्ञांची कमिटी नमावी असें जें लिहिलें आहे तें म्हणण्याचें कांहीं कारण नाहीं. कारण त्यांतील लोक कोणकोण आहेत हें जाहीर झालें आहे. असो, कांहीं झालें तरी हे बरें झालें ! आजच आपली प्रजापरिषद् भरण्यास व कमिटींतील सभासदांची नेमणूक जाहीर होण्यास एकच गांठ पडली हें बरें झालें. मी हा शुभशकुनच समजतों. या कमिटांत एक प्रोफेसर, एक बडा वकील व एक प्रांताचा अधिकारी असे इसम आहेत. यांच्यापुढें संस्थानिकांचे तहनामे, करारमदार, सनदा यांची शहानिशा होऊन त्यांचें कायदेशीर अधिष्ठान काय आहे हें ठरविण्यांत येणार आहे. तसेंच ब्रिटिश सरकार व संस्थानिक यांच्यामधील आर्थिक लढाई मिटविण्यांत येणार आहे. बंदरांत येण्यांत येणारी मालावरील डयुटी वगैरे सर्व मिळून ४०।५० कोटी रुपये उत्पन्न येतें त्यांतील सुमारें १० कोटी रुपये सर्व संस्थानिकांच्या प्रजाजनापैकीं आहेत. यांत कांहीं वांटणी मिळावी अशी मागणी संस्थानिकांनीं केली आहे. हा नुसता Constitutional प्रश्न नाहीं तर Financial प्रश्न आहे. अबकारी खात्याकडून दर पांच वर्षांस करार होऊन त्याचें कॉपेन्सेशन संस्थानिकांना मिळतें तेव्हां हा जो पैसा संस्थानिकांना मिळतो तो प्रजेच्या हितसंवर्धनाकडे खर्च केला तर त्यांना देण्यांत यावा नाहींतर देऊं नये अशी जोरानें मागणी करावी. नाहींतर प्रजेंत असंतोष उत्पन्न होईल, असेंही बजाविलें पाहिजे. तेव्हां सर्वांच्या म्हणजे खालसा व संस्थानें यांच्या समाईक गुंतागुंतीचा हा प्रश्न आहे. तो सोडविण्यास आम्ही मोठ्या आनंदानें मदत करण्यास तयार आहों; तर यांत जो फरक मीं सुचविला आहे तेवढा मान्य करून हा ठराव सर्वांनीं मान्य करावा, अशी विनंति आहे." या ठरावास अनुमोदन रा. रा. **गणपतराव अभ्यंकर** यांनीं दिलें. अनुमोदन देतांना ते म्हणाले, ' संस्थानिकांनीं हें तहाचें

व करारांच बंड उगीचच माजविलें आहे. मागचे तहनामे अगर करार वाचून पाहिले तर अमुक अमुक काम तुम्ही गैर केलें सबब तुमचे अधिकार कमी करून अमुक अटी लादल्या आहेत वगैरे इतिहासच आपल्यास दिसेल. अबकारी, कस्टम्स वगैरे खात्यांकडे जो पैसा जातो तो प्रजेच्या खिशांतून जातो. स्वतः संस्थानिकांचें कांहीं एक यांत जात नाहीं. जर त्यांच्या मागणीप्रमाणें त्यांना थोडासा हिस्सा दिला तर आणखी त्यांची चैनच वाढेल व आणखी १०।२० रेसकोर्सेस उत्पन्न होतील. प्रजा भिकारी ती भिकारी कायम राहील, पुढेंमागें संरक्षणाचा ( Defence ) प्रश्न येणारच आहे. त्याला सुद्धां प्रजेच्या खिशांतून पैसे घ्यावे लागतील. तेव्हां याचा विचार झाला पाहिजे. तेव्हां या प्रश्नाकडे लोकांनीं जरूर लक्ष्य देऊन व या ठरावाचें महत्त्व लक्षांत घेऊन हा ठराव पास करावा अशी विनंति आहे." नंतर तो ठराव सर्वानुमतें पास झाला. इतकें झाल्यानंतर पहिल्या दिवसाचें काम संपलें व बैठक ता. १८ रोजीं सकाळीं ८ वाजतां पुन्हां येथेंच भरेल असें जाहीर करण्यांत आलें.

---

## दिवस दुसरा.

### ता १८ डिसेंबर १९२७ सकाळीं ८ वाजतां

पूर्वीं जाहीर केल्याप्रमाणें सभेचें काम सकाळीं ८ वाजतां सुरू झालें. १० वा ठराव ॲडव्होकेट रा. रा. एस. सी. जोशी, मुंबई यानीं पुढें मांडला. तो मांडतांना ते म्हणाले " आमच्या जंजिरा संस्थानांत कोणत्या प्रकारची मुस्कटदाबी केली आहे हें आपल्यास कळून येथील दिवाणसाहेबांनीं भलते भलते आरोप प्रजाजनांवर ठेवून तेथील व बाहेरच्या लोकांबद्दल गैरसमज रीजंट बेगमसाहेबांचा करून दिला आहे, त्यामुळें त्यांचाही गैरसमज फार वाढला आहे. मागें जी श्रीवर्धन येथें जंजिरा परिषद झाली. त्यावेळीं तेथें बाहेरून जे लोकपुढारी आले त्यांचेवर नाहक शिंतोडे दिवाणसाहेबांना उडाविलेले आहेत, ही मोठी कष्टाची गोष्ट आहे. मी परिषदेचें डेप्युटेशन घेऊन रीजंटसाहेबांकडे गेलों होतों. त्यांची भेट घेतली. त्यावेळीं त्यांच्या मनांत सुद्धां आपलें राज्य हे चळवळे नाहींसें करणार वगैरेसारख्या खुळचट कल्पना त्यांच्या मनांत भरवून दिल्या आहेत, असें दिसून आलें. त्या कांहीं केल्या आम्ही काढूं शकलों नाहीं, त्यांस इलाज नाहीं. कारण त्यांच्या शिक्षणाकडे पाहिलें असतां वाईट वाटण्याचें कारण नाहीं. नवीन जो प्रेसॲक्ट प्रसिद्ध केला आहे त्यांतील कलमें वाचलीं असतां कोणत्याच प्रका-

रची सभा अगर समित्या भरूं शकत नाहींत. कारण प्रत्येक जातीच्या शेंकडा ९० जणांच्या सह्या अर्जावर असल्याशिवाय कोणतीही गोष्ट करणें अशक्य आहे. लोकसंख्येचें प्रमाण पाहिलें तर ही गोष्ट जास्त स्पष्ट होईल. असो; असे जुलमी कायदे करून जें नुकसान केलें आहे तसें यापुढें होऊं नये म्हणूनच दरबारी अधिकाऱ्यांचा निषेध करणें अगदीं जरूर आहे. सबब या ठरावाचें महत्त्व लक्षांत घेऊन हा ठराव सर्वांनीं मंजूर करावा अशी विनंति आहे. " या ठरावास मि. श्यालोम सावगांवकर यांनीं अनुमोदन दिलें. अनुमोदन देतांना ते म्हणाले, " ही जी गोष्ट झाली ती अगदींच वाईट झाली. याच्यापेक्षां जास्त शब्दच माझे मुखांतून निघत नाहींत. " नंतर सर्वानुमतें हा ठराव मंजूर झाला.

**ठराव १५ वा रा. रा. गणपतराव अभ्यंकर** यांनीं सभेपुढें मांडला. तो मांडतांना ते म्हणाले " गव्हर्नमेंट ऑफ इंडिया ॲक्टांत " India " हा शब्द आलेला आहे व सेक्रेटरी ऑफ स्टेटनीं जें सन १९१७ सालीं 'हिंदुस्थानांत प्रातिनिधिक संस्था निर्माण करून जबाबदार राज्यपद्धतीचें स्वराज्य निर्माण करूं ' असें जाहीर केलें आहे, त्यांतील **हिंदुस्थान** हा शब्द व्यापक अर्थी हिंदुस्थानास लाविला आहे, तो खालसा हिंदुस्थानापुरता नाहीं. त्यांत संस्थानी अंमलाखालील व ब्रिटिश अमलाखालील हिंदुस्थान असा फरक केला नाहीं. सर्व मुलूख म्हणून ' अखिल हिंदुस्थान ' या दृष्टीनें ही शब्दयोजना केली आहे. तेव्हां या तत्त्वावर ब्रिटिश सरकारनें असें संस्थानिकांस म्हणावयास पाहिजे कीं, आम्हीं जें जबाबदार राज्यपद्धतीचें तत्त्व मान्य केलें आहे तें तुम्हीं मानावयास पाहिजे. हें त्यांना निक्षून सांगितलें पाहिजे अलीकडे Federation ची कल्पना पुढें आली आहे. पण या कल्पनेंत सुद्धां फीडरल गव्हर्मेंटची सुद्धां राज्यघटना एक स्वरूपाची असल्याशिवाय ती बरोबर चालत नाहीं. अशा प्रकारची राज्यव्यवस्था मेक्सिको व अमेरिकेंत दिसून येते. तेव्हां खालसा मुलुखांत ज्याप्रमाणें सरकारनें ध्येय जाहीर केलें आहे, त्याप्रमाणें संस्थानिकांनीं ध्येय जाहीर करून सदर ध्येय सिद्धीस नेण्याची त्यांची ( संस्थानिकांची ) कबुली घेतली पाहिजे. अशी अट त्यांचेवर लादली पाहिजे. अशी आतां मागणी जोरानें संस्थानी प्रजाजनांनीं, खालसांतील लोकांनीं केली पाहिजे. तेव्हां तशी घटना आपआपल्या संस्थानांत सुरू करण्याची विनंति सर्व संस्थानिकांस या परिषदेमार्फत करण्यांत येत आहे. तेव्हां सर्वांच्या हिताचा हा ठराव आहे. ठरावाचें महत्त्व लक्षांत घेऊन आपण तो मंजूर करावा अशी विनंति आहे. " या ठरावास बनहट्टीचे रा. रा. तम्मणापा चिकोडी यांनीं अनुमोदन दिलें. अनुमोदन

देतांना ते म्हणाले, " या ठरावास अनुमोदन देण्याकरतां मी उभा राहिलों आहें. काठेवाडच्या दौऱ्यांत जो उपदेश लहान मोठ्या संस्थानिकांस व्हॉईसरॉयसाहेबांनीं केला आहे तो ते योग्य रीतीनें ऐकतील असें वाटतें. दक्षिणी संस्थानांतील प्रजा फारच अशिक्षित आहेत, त्यांना शहाणे करणें प्रजाधिपतीचें कर्तव्य आहे व त्याप्रमाणें त्यांनीं आतांच वरील ठरावांत सुचविल्याप्रमाणें व्यय जाहीर करून प्रजेचे धन्यवाद घ्यावेत. सबब हा ठराव सर्वांनीं पास करावा अशी विनंति आहे " हा ठराव सर्वानुमतें पास झाला.

**ठराव १३ वा अध्यक्षांनींच** सभेपुढें मांडला. सदर ठराव सभेपुढें मांडतांना अध्यक्ष म्हणाले, "हा ठराव अगदीं साधा आहे. त्यांत असें सुचविलें आहे कीं, संस्थानिकांनीं वाटेल तर आपल्या खासगी पैशांनूनच बाहेर मिळकती घ्याव्यात. संस्थानांच्या तिजोरींतून पैसा घेऊन मिळकती घेण्याची पद्धत अजिबात बंद केली पाहिजे. त्यांत संस्थानचें अतिशय नुकसान आहे. हैद्राबाद संस्थानचें उत्पन्न ७॥ कोट पण निजाम साहेबांच्या खासगी मिळकतीचें उत्पन्न २ कोटींचें आहे. यावरून हें काय गोडबंगाल आहे हें कळत नाहीं. वर्तमानपत्रांतून एका राजेमहाराजांचीं खासगी मिळकत बरीच लाखांपर्यंत बुडाल्याचें वाचलें आहे त्यामुळें त्यांचेंच नुकसान झालें असें नव्हे, तर प्रजेचें नुकसान झालें आहे. तेव्हां निदान आमच्या प्रजेच्या पैशानें तरी मिळकत विकत घेऊं नका. अशी या ठरावांत मागणी आहे. आपण सर्वांनीं तो पास करावा अशी विनंति आहे. " या ठरावावर रा. **दादासाहेब** साने म्हणाले, " साम्राज्य **सरकारचीं** अगाऊ परवानगी घेतल्यावांचून त्यांना मिळकती विकत घेतां येत नाहींत असें त्यांत एक कलम आहे असें वाटतें. " यावर **अध्यक्ष** म्हणाले, ' जरी परवानगी मिळाली तरी मिळकत घेऊं नका, असें आमचें त्यांना सांगणें आहे. " ठराव सर्वानुमतें पास झाला.

**ठराव १४ वा.** हाही **अध्यक्षांनीं** सभेपुढें मांडला. तो मांडतांना ते म्हणाले, " या ठरावांत परकी हा शब्द योजला आहे त्यावरून कळून येईल कीं, संस्थांनी प्रजाजनांचे हाल न्यायकोर्टांतसुद्धां कसे होत आहेत, याबद्दल एक केस " रामप्रसाद तिवारी " याची चालून निकाल झाला आहे. पण ' परकी ' ही शब्दयोजना १८६४ च्या ॲक्टांत केलेली आहे. ती काढून टाकण्यांत यावी. असें साधें मागणें या ठरावांत आहे तें मंजूर करावें. " हा ठराव चर्चा न होतां मंजूर झाला.

**ठराव १७ वा.** हा सभेपुढें मांडतांना **अध्यक्ष** म्हणाले, " पूर्वी ज्या कॉंग्रेसच्या बैठकी झाल्या त्यांतील अध्यक्षांस अगर सभासदांस संस्थानी प्रश्न सभेपुढें घेणें भानगडीचें वाटलें म्हणून त्यांनीं त्यांचा समावेश केला नाहीं. सार्वजनिक सभेचे पूर्वी अध्यक्ष एक संस्थानिकच होते. असो हल्लीं खालसा इलाख्यांत जी स्वराज्याची चळवळ चालली आहे त्यांत संस्थानें हीं बालेकिल्ल्याप्रमाणें आहेत. हल्लीं संस्थानिकांनीं ' आम्ही बादशहाचे बरोबरीचे आहोंत ' वगैरे बोलणें सुरू केलें आहे. यावरून त्यांची मनोरचना दिसून येईल. महमद अल्लींनीं कोकोनाडामध्यें झालेल्या आपल्या भाषणांत हा संस्थानांचा प्रश्न तूर्त घेऊं नये असें सांगितलें. पण महात्मा गांधींनीं आतां याची उपेक्षा करणें बरोबर होणार नाहीं असें काठेवाडामधील भाषणांत सांगितलें आहे. मागील सालीं कॉंग्रेसचे अध्यक्ष यांनीही आतां संस्थानी प्रश्न हातीं घेणें जरूर आहे असें सांगितलें आहे. लिबरल फेडरेशननेंही हा प्रश्न आतांपर्यंत हातीं घेतला नाहीं सबब या ठरावांत त्या त्या सभांच्या चालकांनीं परिस्थित्यनुरूप हा प्रश्न सभेपुढें ठेवणें जरूर आहे असें सुचविलें आहे. सबब हा ठराव मंजूर करावा अशी परिषदेस विनंति आहे. " हा ठराव सर्वानुमतें पास झाला.

यानंतर **११ वा ठराव** रा. रा. **राघवेंद्रराव शर्मा** यांनीं मांडला. तो मांडतांना ते म्हणाले, " जे ठराव सभेपुढें आले आहेत त्या ठरावांत हैद्राबादची परिस्थिति कशी आहे हें दाखविण्याचा हा एकच ठराव आहे. तेथें दुसरे कोणी हैद्राबादचे प्रतिनिधी फारसे आले नाहींत तव्हां तेथील कारभाराबद्दल विशेष चर्चा करण्याचें कारण नाहीं. कारण तेथील कारभार कसा आहे हें सर्वांस माहीत आहेच. परंतु सरकारतर्फे जे पाहुणे आज सभेस हजर आहेत त्यांच्याकरतां तरी निदान तेथील कांहीं लीला सांगणें भाग आहे व तसें झालें म्हणजे त्यांचेंही येणें फुकट झालें असें वाटणार नाहीं, सबब एकच गोष्ट मी सांगणार आहें. हैद्राबाद संस्थानची सुधारणा करण्याकरितां इंग्रज सरकारनें आपले गोरे अधिकारी जरी तेथील राजकारभारांत नेमिले आहेत तरी अद्याप कोणत्याच प्रकारची सुधारणा झाली नाहीं. दक्षिण हैद्राबाद प्रजापरिषदेनें ठरविलेप्रमाणें एक शिष्टमंडळ पाठविण्यांत येणार आहे त्यास मुलाखत द्यावी म्हणून वरिष्ठ सरकारकडे मागणी केली होती; परंतु त्या मागणीचा योग्य विचार न होतां ती आजच घेतां येणार नाहीं असें उत्तर देण्यांत आलें आहे.

असो. तेथील नजराणा घेण्याचें मात्र बंद झालें आहे असें ऐकितों, पण लांचलुचपतीचा प्रकार फारच वाढला आहे, त्याला कोणत्याच प्रकारचा आळा नाहीं. कलेक्टरसारखे अधिकारी बेसुमार लांच घेतात मग इतरांची कथा सांगावयास नको. आपल्यास एक गम्मत म्हणून गोष्ट सांगतों; ही काल्पनिक नव्हे; ती वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध झालेली आहे, लांच घेण्याची गोष्ट मुंबई येथें निघणाऱ्या ' इतेहाद ' पत्रांतून प्रसिद्ध झाली आहे; तेव्हां मुसलमानी पत्रांतून प्रसिद्ध झालेली गोष्ट प्रमाणभूत धरण्यास हरकत नाहीं. आतां वर सांगितल्याप्रमाणें कांहीं जबाबदारीच्या अधिकारांवर गोरे अधिकारी आहेत तरी सुद्धां फर्मानें चालूंच आहेत. एक गुलबर्ग्याचे कलेक्टर आहेत. लहान जागेवरून वाढत वाढत जाऊन हल्लीं कलेक्टरच्या रांकेस गेले आहेत, यांनीं लाखों रुपये नजराणा निजामसाहेबांस दिला; या त्यांच्या कामगिरीबद्दल त्यांना ' हसन यार जंग ' ही पदवी देण्यांत आली. त्यांनीं इटगी येथील देवालयाचे जमा झालेले पैसे हिंदु रयतेचे होते; ते आजवर सरकारी खजिन्यांत होते. ते पैसे सुमारें ६०००० रुपये होते; ते सर्व निजामसाहेबांना दिल्याचें कळलें; त्याच्याबद्दल हिंदूंनीं तक्रार केल्यावरून मि. टास्करसाहेब आल्यावेळीं हे कलेक्टरबहादूर रजा वगैरे न घेतां, कोणास न सांगतां, पळून गेले व निजामसाहेबांस भेटले. ' नजराणा आम्हांस तुम्हीं दिला उलट सरकारी पैसे आम्हीं कसें घेऊं. ' म्हणून कानावर हात ठेवले व त्यांचेकडून पैसे वसूल करून घेण्यास हुकूम दिला आहे. त्यांस आंतून खासगीरीतीनें कांहीं काळजी करूं नको. तुला पेन्शन देऊं असें सांगितलें आहे असें म्हणतात. आमचे येथील दुसरी हलाखीची गोष्ट अशी आहे कीं, संस्थानचे लायक लोक येथील राज्यकारभारांत न नेमतां बाहेरील गैरमुल्खी अलीगडमधील पंजाब, उत्तरहिंदुस्थान इ. बाहेरील नालायक अधिकारी नेमले जातात ही गोष्ट फारच वाईट हें सांगण्याची गरज नाहीं. अधिकाऱ्यांना पगार पांचशें व त्यांचा खर्च दोन हजार रुपयांचा असेंही असतें, तेव्हां लांचलुचपत घेतल्याशिवाय हा कसा खर्च करतात हें लक्षांत आणा. हैद्राबाद संस्थानांत बरीच पड जमीन आहे. तीपैकीं मुंबई येथील सर फाझलभाई करीमभाई यांना बरीच जमीन दिली आहे. ती सुमारें १३१००० एकर आहे. त्यांचेकडून सुमारें पांच लक्ष रुपये नजराणा म्हणून घेतले आहेत. या जमिनींत लांकडेंच सुमारें १ कोट रुपयांची निघतील. यावरून प्रजाजनांचा तोटा किती होत

आहे हें आपल्या ध्यानांत येईल. हा सोदा पटवितांना अधिकारीवर्गास निरनिराळे तऱ्हेनें फायदा झाला असावा. कॉंट्रॅक्ट घेतांना कांहीं तरी देणगी दिल्याशिवाय तें मिळू शकत नाहीं हा सर्वांचा अनुभव आहे. असो अशा रीतीनें सर्व बाजूनें प्रजा गांजली आहे. सबब ही स्थिति बंद करून कोणत्याही प्रजाजनांच्या हक्काची पायमल्ली होऊं नये अशी त्यांत विनंति केली आहे. तर हा ठराव सर्वांनीं मंजूर करावा " या ठरावास अनुमोदन रा. रा. वझे, सर्व्हंटस् ऑफ इंडिया सोसायटीचे सभासद व सर्व्हंट ऑफ इंडिआ पत्राचे संपादक यांनीं व रा. रा. **शिरोडकर** यांनीं योग्य शब्दांत पुष्टी दिली. रा. **शिरोडकर** म्हणाले, सरकारनें Noninterference च्या तत्वाचा बाऊ करूनच ही परिस्थिति आणली आहे. हैद्राबाद येथें परिस्थिति कशी आहे याचें सुंदर चित्र रा. राघवेंद्रराव यांनीं काढलेंच आहे, तेव्हां मी जास्त सांगूं इच्छित नाहीं, तरी या ठरावास पाठिंबा द्यावा असें मी इच्छितों. " हा ठराव सर्वानुमतें पास झाला.

**ठराव १६ वा.** हा रा. रा. **दादासाहेब साने** बडोदे यांनीं मांडला. तो मांडतांना ते म्हणाले, " हा सर्वव्यापक तऱ्हेचा प्रश्न आहे. फक्त शेवटच्या भागांत भोर दरबारांतील प्रजेस याचा कटु अनुभव आला आहे असें म्हटले, आहे. त्यावरून मी हा ठराव मांडण्यास उभा आहें. भोर दरबारची जी हल्लीं जागा अगर संस्थानचें क्षेत्र आहे तें एके काळीं श्री. शिवछत्रपतिस्वराज्यांत मोडत आहे. तेथील जमिनीची डोंगराळ परिस्थिति असल्यानें तेथें ताली वगैरे घालून नदीचें पाणी चारपांच ठिकाणीं अडविल्यामुळें तेथील शेतकऱ्यांची स्थिति अतिशय असहाय्य झाली आहे. त्यांच्या जमिनी जाऊन त्यांना योग्य कॉंपेनसेशन मिळालें नाहीं; त्यामुळें त्यांचे फार हाल होत आहेत व झाले आहेत. खालसा इलाख्याच्या फायद्याकरतां जीं दोन भाटघर व खडकवासला येथील धरणें ब्रिटिश सरकारनें केलीं आहेत त्यांनें संस्थानची बहुतेक जागा व्यापली आहे. तेव्हां ज्यांची जमीन जाते त्यांस योग्य मोबदला मिळाल्याशिवाय त्यांना जमीन सोडण्यास भाग पडूं नये असें या परिषदेचें मत आहे. सबब वरिष्ठ सरकारनें यांचा विचार करावा. आपण या ठरावास अनुमोदन देऊन हा ठराव पास कराल, अशी आशा आहे." या ठरावास रा. रा. **पुरुषोत्तम सदाशिव आठवले**, रा. रा. **ताम्हणकर** व

रा. रा. **कालेंकर** यांनीं योग्य शब्दांत अनुमोदन दिल्यावर हा ठराव पास झाला.

**ठराव १८ वा व १९ वा हे अध्यक्षां**नीं सभेपुढें मांडले व त्यावर चर्चा न होतां ते पास झाले.

**ठराव २० वा.** रा. एस. सी. जोशी अॅडव्होकेट यांनीं सभेपुढें मांडला. तो मांडतांना ते म्हणाले, "या ठरावांत साधी मागणी आहे. हिंदुस्थानसरकारनें अल्पवयी कारकीर्दींचा कारभार कसा हांकला जावा याबद्दल मागें एकदां ठराव केलाच आहे. त्या ठरावाबरहुकूम अल्पवयी कारकीर्दींत कारभार चालवावा अशी या परिषदेची विनंति आहे. तेव्हां या ठरावाचें महत्त्व लक्षांत घेऊन तो पास करावा." या ठरावास अनुमोदन देतांना रा. रा. वामनराव पटवर्धन म्हणाले कीं, "अल्पवयी कारकीर्दींत निरनिराळ्या चार पद्धतींनीं राज्यकारभार चालवावा असें वरिष्ठ सरकारनें ठरविलें आहे. जव्हारचे अधिपति वारल्यामुळें व तेथें राजमाता नसल्यामुळें जव्हारचे बालराजे अल्पवयी असेपर्यंत संस्थानचा कारभार कौन्सिल ऑफ अॅडमिनिस्ट्रेशन स्थापन करून त्यांच्यामार्फत चालविण्यांत यावा, इतर संस्थानांत म्हणजे कुरुंदवाड, जंजिरा व जमखंडी वगैरे संस्थानांत सरकारास जो अनुभव आला आहे, त्यांत सुधारणा होणें इष्ट आहे. या कौन्सिलमध्यें संस्थानी प्रजेपैकीं सभासद असावेत" वगैरे सांगून अनुमोदन दिलें. हा ठराव सर्वानुमतें पास झाला.

**ठराव २१ वा** रा. रा. **तमणाप्पा चिकोडी** (बनहट्टी) यांनीं मांडला. तो मांडतांना ते म्हणाले, "या ठरावानें आम्हीं साधी मागणी मागितली आहे. बहुजन लोकसमाजाच्या मातृभाषेंतच सर्व शिक्षण मिळावें व सरकारी कामकाज चालावें असें मागणें या ठरावाच्या द्वारें मागितलें आहे. आमच्या जमखंडी संस्थानांत परवां जी परिषद् भरली होती त्यांत असा ठराव पास केला आहे; आमच्या संस्थानांत कानडी शाळा आहेत. परंतु हायस्कूलच्या बाबतींत थोडीशी विषमता आहे; सांगली संस्थानांतही अशा शाळा आहेत. आमच्या जवळ मुधोळ संस्थानची हद्द लागते तेथें मात्र मातृभाषेंतून शिक्षण देणारी एक सुद्धां शाळा नाहीं. आम्ही तसें करण्याबद्दल एकदां श्रीमंतांस विनंति करण्याकरतां म्हणून भेट घेण्यास गेलों होतों. श्रीमंतांनीं भेट देऊन उद्देश वगैरे विचारला. आम्ही वरील

कारण सांगितलें व संस्थानिक मराठी आहेत म्हणून दप्तर व शाळा कानडी करतां येणार नाहीं असेंही पर्यायानें त्यांनीं सुचविलें. नंतर आमच्या खर्चानेंच एक शाळा ( कानडी ) महालिंगपूर येथें काढली. त्या शाळेंत सरकारी शाळेपेक्षां जास्त मुलें आहेत अशी स्थिति थोड्याबहुत प्रमाणांत जिकडे तिकडे आहे; सबब या ठरावाचें महत्त्व लक्षांत घेऊन हा ठराव पास करावा अशी विनंति आहे." हा ठराव शिरहट्टीचे रा. रा. **अश्वत्थ राघवेंद्र महिषी** वकील यांनीं योग्य शब्दांत अनुमोदन दिल्यानंतर पास झाला.

**ठराव ११ वा.** रा. रा. **गणेश लक्ष्मण पागे** यांनीं सभेपुढें मांडला व त्यास रा. रा. गो. रा. बिनिवाले यांनीं अनुमोदन दिलें व तो सर्वानुमतें पास झाला.

शेवटचा आभारप्रदर्शनाचा **२३ वा ठराव** रा. शिरोडकर ( सांवतवाडी ) यांनीं अध्यक्ष, द. सं. हि. सभेचें कार्यकारी मंडळ, व सर्व्हंटस् ऑफ इंडिया सोसायटीचे मुंबई शाखेचे सेक्रेटरी या सर्वांचे उचित शब्दांत त्यांच्या मदतीबद्दल आभार मानलें. आभार मानल्यावर **अध्यक्षांनीं** खालीलप्रमाणें समारोपाचें भाषण केलें.

## अध्यक्षांचें समारोपादाखल भाषण.

समारोपादाखल भाषण करतांना अध्यक्ष म्हणाले, " आज आपण दोन दिवस येथें येऊन समाधानपूर्वक सभेचें काम पार पाडण्यास मदत केली त्याबद्दल मी सर्वांचे आभार मानतों. हल्लीं जी कमेटी नेमली गेली आहे तिच्यापुढें आपलें म्हणणें सविस्तर रीतीनें मांडणें जरूर आहे. संस्थानी प्रजेचें हें कमिशन काय करणार असा सवाल त्यांना टाकणें जरूर आहे. मेमोरँडम् व मुलाखत पाठविण्याची व घेण्याची खटपट या सभेमार्फत केली पाहिजे. परंतु सर्व संस्थानांतील प्रजाजनांचा लोकमताचा पाठिंबा या खटपटीस पाहिजे म्हणून त्या ठिकाणीं योग्य ती चळवळ सुरू करावी. आपले संस्थानाधिपती कांहीं देऊं इच्छित नाहींत म्हणून असें करणें भाग पडत आहे. प्रजेचा पाठिंबा मिळून आपल्या कायदेशीर हक्काकरतां इंग्रज सरकारशीं भांडण मांडलें पाहिजे

हें तत्त्व अजून आमच्या संस्थानिकांना कळत नाहीं. याचा प्रत्यय परवांच्या **लीग ऑफ नेशनसमध्यें** येथून गेलेल्या एका महाराजसाहेबांना आलाच आहे. व्यक्तिशः त्यांना किंमत कांहीं नाहीं. या काळांत संघटित प्रयत्नाशिवाय चळवळ फलद्रूप होत नसते हें त्यांच्या ध्यानांत येत नाहीं, याचेंच वाईट वाटतें. राजांना आपल्या मागें प्रजेची मोठी शक्ती पाठिंबा देण्यास असेल तरच त्यांच्या कार्यास नेट लागेल व त्यांना आपलें व प्रजजनांचें मागणें नेटास लावतां येईल, हें लक्षांत त्यांनीं घेतलें पाहिजे; तेव्हां आपल्या प्रजाजनांच्या मागण्यांचा इनकार करून त्यांचा राग आपल्यावर कां संस्थानिकांनीं करून घ्यावा याचें कारण कळत नाहीं. लोकप्रतिनिधिसत्ताक राज्यांपद्धति आपले राज्यांत सुरू करा म्हणजे प्रजा व तुम्ही संतोषानें राहाल. पुढेंमागें असा राजा एकाद्या प्रजापरिषदेचा अध्यक्षसुद्धां होईल. भरतपूरच्या महाराजांच्या कराभारानें बरीच भानगड झाल्यामुळें कमिशन नेमलें आहे. याच्या उलट प्रातिनिधिक सत्ता याचे पूर्वींच स्थापन झाली असती तर असें कमिशन अंतर्गत राज्यकार-भाराच्या चौकशीकरितां खात्रीनें नेमलें गेलें नसतें. असो. संस्थानिकांनीं या परिस्थितीकडे जर दुर्लक्ष्य केलें तर काळाच्या तडाक्यांत काय होईल हें सांगता येत नाहीं. या काळांत हल्लीं रयत ही राजा व राजा हा रयतेचा नोकर ही घोषणा सर्वत्र ऐकूं येते. अशा सामर्थ्यवान् रयतेबरोबर टक्कर द्यावी लागेल हें त्यांनीं लक्षांत ठेवावें आणि आपल्या डोळ्यांवर हा जो मद आला आहे तो त्यांनीं दूर सारून अविकृत दृष्टीनें त्यांनीं प्रजाजनांच्या मागण्यांकडे लक्ष द्यावें, आतां पुन्हां एकदां सांगणें जरूर आहे कीं, रयतेच्या मनांत संस्थानिकांच्या खासगी खर्चांत काटकसर करून त्यांची आबाळ करावयाची नाहीं व केव्हांही नसते, त्यांनीं एकदां आपला खासगी खर्च कायमचा नेमून द्यावा, त्यांत केव्हांही प्रजा ढवळाढवळ करणार नाहीं; मात्र बाकीचा पैसा प्रजेच्या अनुमतानेंच खर्च झाला पाहिजे. वेळ प्रसंग आल्यास जादा रक्कम खर्चास संस्थानिकांनीं मागितल्यास ती देण्यास प्रजा केव्हांही अनमान करणार नाहीं. संस्थानच्या मानानें शेंकडा १० रक्कम त्यांनीं खासगीकडे घ्यावी व बाकीची ९० टक्के रक्कम प्रजेच्या स्वाधीन करावी. असें झालें असतां त्यांचे मानमरातबांत व इज्जतींत कमीपणा येणार नाहीं हें त्यांनीं पक्कें ध्यानीं ठेवावें. असें केल्यावर खासगीच्या खर्चाच्या बाबतींसंबंधीं

गैरसमज झाला आहे तो दूर होईल. संस्थानच्या फायद्याकरितां अधिकार प्रजेस देण्यांत संस्थानिकांचें व प्रजेचें दोघांचें हित आहे. याच्या उलट वागल्यास काळ बघून घेईल. निरनिराळ्या संस्थानांतून आपण आलां आहां त्या ठिकाणीं सर्व तऱ्हेची प्रगति होईल अशी खटपट करा. माझा लोकमतावर दृढ विश्वास आहे. तें बळकट करण्याची सक्त खटपट करा व तसें करण्यास आपल्यास परमेश्वर बुद्धि देवो अशी प्रार्थना करून पुन्हां एकवार आपणां सर्वांचे आभार मानून मी माझें भाषण संपवितों व परिषद् खलास झाली असें जाहीर करतों.

येणेंप्रमाणें समारोपाचें भाषण झाल्यानंतर दुसऱ्या दिवसाचें काम संपलें व परिषदेची बैठक खलास झाली.

---

# भोर संस्थान प्रजापरिषद्.

## अधिवेशन पांचवें.

### अध्यक्ष, दे. भ. श्री. ल. ब. भोपटकर, एम. ए., एल एल. बी., एम. एल. सी. यांचें भाषण.

**मुक्काम उरवडे ( ता. १० माहे एप्रिल १९२७ इ. )**

प्रारंभी चिंचवड शाळेंतील मुलांनीं राष्ट्रगीत म्हटल्यावर श्रीयुत एन्. सी. केळकर यांचें भाषण झालें.

### श्री. तात्यासाहेब यांचें भाषण.

आजचे सभेंत पहिलें भाषण स्वागताध्यक्षांचें व्हावयाचें; परंतु मला कांहीं जरूरीचे कामासाठीं परत पुण्यास संध्याकाळीं जावयाचें असल्यामुळें स्वागताध्यक्षांचा अधिकार मी स्वतः आपलेकडे घेऊन अध्यक्षांचें स्वागत करतों. रा. पटवर्धन, रा. बाबूराव गोखले वगैरे गृहस्थ व इनामदार, सभेसाठीं आलेले पाहुणे मंडळी यांचें सर्वांचें मी आपले वतीनें स्वागत करतों. स्वागत करणारे तुम्ही कोण असा जर मला प्रश्न केला तर तुमचा व आमचा संबंध फार जुना आहे. मी तुमच्यांतीलच आहें. भोरास जेव्हां प्रथम सभा झाली तेव्हांपासून तुमचा व माझा संबंध झाला. तेव्हांपासून ही एकपणाची भावना आली, मी आज आपलेतर्फे स्वागत करीत आहें. या संस्थानांत माझें शेत नाहीं घर नाहीं कांहीं नाहीं. तरी मी आज आपला बनलों आहों. राज्य म्हटलें म्हणजे आमच्यासारखे पुष्कळ लोक उपरे असतात व अशा लोकांसाठीं ज्यांची दाद लागत नाहीं त्यांच्यासाठींच सभा करावयाच्या. आम्ही पुष्कळ ठिकाणीं जातों. तेथील पुढारी, लोक आमचेकडे येतात, आमचा सल्ला घेतात, आमचेवर ममता करतात सबब आपलेपणा वाटतो म्हणून आम्ही येतों. आजच्या या आपले सभेची कल्पना बऱ्याच लोकांस पटली आहे. त्याची मुळी

येथें खोल रुजली आहे. शहरांत सभा भरविण्यास बरेच प्रयास पडतात. सभेला आल्यापासून आपला फायदा होतो ही कल्पना तुम्हांला पटली आहे ,अशी या सभेंत जमलेल्या लोकांच्यावरून कल्पना येते. तुमचे पंतसाहेबांना सुद्धां या सभेच्या योगानें फायदा होतो अशी खात्री आहे. त्यांना कांहीं फायदेशीर तत्त्वें उत्पन्न होतात अशींही खात्री झालेली दिसते. सभा भरली म्हणजे कांहीं तरी चांगला मार्ग निघतो. आपले पहिले यजमान व हल्लींचे यजमान यांचे हल्लींचे धोरणावरून त्यांना असल्या सभेपासून बंड करावयाचें नहीं, संस्थान बुडवावयाचें नाहीं अशी खात्री आतां झालेली आहे. एका इसमाची दाद लागत नाहीं, एकट्याची कोणी भेट घेत नाहीं. तुम्ही पंतसाहेबांकडे अर्ज केला तर तो खालीं कारभाऱ्याकडे येतो. कारभारी तो तालुक्याकडे पाठवितात. तालुक्यांतून तो गांवकामगारापर्यंत येतो. गांवकामगार खुष असला तर ठीक, नाहीं तर दाद ना फिर्याद्! सभेमुळें राजाला दहशत बसते, चिमटा बसतो असें आतां पंतसाहेब यांना वाटूं लागलें आहे. तर आज उद्यां सभेचें काम करून तुमच्या तक्रारी आपल्या यजमानांपुढें मांडा, तुमच्या तक्रारी दोन चार बाबींपुरत्या आहेत असें ऐकितों, सुधागडचे आठवले परवां भेटले होते. त्यांनीं त्या तालुक्यांतील फॉरेस्टचा लढा समाधानकारक मिटवल्याचें सांगितलें. तुमच्या इकडील फॉरेस्टबद्दल चौकशी करणेबद्दल कमिशन नेमलें असें ऐकिलें. पण निकाल काय झाला हें माहीत नाहीं. तुमचे यजमानसाहेब शांत आहेत. उतावीळ नाहींत. माझें घरदार नाहीं तरी मला संस्थान आपलेंसें वाटतें. ब्रिटिश सरकारबद्दल असें वाटत नाहीं. ते आले तसे जातील, तुम्ही आम्ही व आपले हे संस्थानिक राहतील असें वाटतें. प्रजेचें ऐकिलें नाहीं तर संस्थानेंही कालांतरानें जातील. कोणी सांगावें! पण तसें वागतील तर पाहूं. हे राजे आमचेपैकींच आहेत. येथें परकेपणा व भेदभाव नाहीं. त्यांची व आपली भाषा एक, संस्कृति एक. इंग्रजांसारखे ते परके नाहींत. राजा व प्रजा एकत्र बसून प्रजेच्या हिताची चर्चा करतात. साहेब तर परके. साहेब लोक पूर्वी थट्टा करीत असत कीं तुम्हाला स्वराज्य पाहिजे असेल तर अमुक संस्थानांत जा असें बोट दाखवीत म्हणजे त्या ठिकाणीं स्वराज्य मिळेल. साहेब परके. आमचे संस्थानिकांच्या कारभाराकडे कशाला पाहतील. संस्थानांत प्रजेवर जुलूम होतो. संस्थानिकांना संस्थानचा कारभार नीट करतां येत नाहीं. एका लहानशा संस्थानचा अधिकार नीट करतां आला नाहीं तर तुम्ही स्वराज्य कसें मागतां अशी थट्टा करतात.

आधीं घरचा कारभार करा, तो तुम्हांला नीट करतां आला तर गांवाचा कारभार करा आणि नंतर संस्थानचा कारभार पहा. तुमचें संस्थान फार लहान आहे. येथील कारभार तो कितीसा असेल ? यजमान तुमचे आहेत ते दूर नाहींत, मध्यस्थही दूर नाहींत, मग शेतकरी, हक्कदार, इनामदार वगैरे सर्व एकत्र बसून राज्यकारभार कां चालवीत नाहींत ? हें संस्थान नमुनेदार व्हावें असें आमचें मत आहे. आणि लोकांना तें आदर्शभूत व्हावें अशी इच्छा आहे. इतर संस्थानांस त्याचें उदाहरण अनुकरणीय होईल असें करावें. संस्थानें बरींच आहेत तीं सुधारावीं कशीं ? एका लहान संस्थानास सुधारण्यास इतके दिवस तर त्याहून मोठ्या संस्थानाबद्दल विचारच नको ? परंतु सुधारणा ही हळुहळू होत असते. चार वर्षांपूर्वीं तुम्हास एकत्र होतां येत नसे तें आतां एकत्र जमतां आहां हा सुधारणेचा फायदा आहे. जंगल, जमीनबाब, दारू, याबद्दल तक्रारी तुम्हीं सभेपुढें आणल्या. या तक्रारी सलोख्यानें मिटल्या म्हणजे काय राहिलें ? मग पोलीस चौकी ठेवावी, दवाखाना घालावा, सडका कराव्या, या किरकोळ गोष्टी राहातात. त्या सुधारणेस वेळ तो किती लागेल ? परंतु राजा एकीकडे व प्रजा एकीकडे अशी स्थिति ? वर निर्दिष्ट केल्या बाबींशिवाय तुमचा राजाशीं संबंध येत नाहीं. तुम्हाला वांटणी मागावयाची नाहीं. तुमच्या त्यांच्यामध्यें समुद्रही आडवा आलेला नाहीं. जें काय मागावयाचें असेल तें त्यांजपाशीं निर्भिडपणें मागा. आपलें म्हणणें त्यांचे पुढें मांडा. कोणालाही टाकून बोलूं नका. मग तो राजा असो अगर त्याचा अधिकारी असो. सलोख्यानें कामगिरी होते. परमेश्वराचे घरीं पुण्य रुजू आहे म्हणून ते आज अधिकारावर आहेत. गरीबाला त्याचेप्रमाणें हक्क आहे. तुमचें घर हा किल्ला आहे. त्यांत येण्यास तुमची परवानगी लागते हाही तुमचा अधिकारच नाहीं काय ? इनामदार व कोळी यांचेमध्यें तंटे असल्याचें कळतें. सभा करून कोणावरही जुलूम करूं नका. सावकार, इनामदार हे तुम्ही सारखेच आहां. हे सर्व तंटे तुम्हीं पंचायतीनें तोडा म्हणजे सर्वांना सुख लागेल.

## अध्यक्षांचें भाषण.

स्वागताध्यक्ष रा. पोतनीस यांचें भाषण झाल्यावर अध्यक्ष श्रीयुत **अण्णासाहेब भोपटकर** यांनीं भाषण करण्यास सुरवात केली. ते म्हणाले कीं, " प्रतिनिधि व सभ्य गृहस्थहो, आजच्या सभेचें अध्यक्षस्थान तुम्हीं

मला दिलें याबद्दल मी तुमचा फार आभारी आहें. मी ब्रिटिश मुलखांतील रहिवाशी असल्यामुळें संस्थानिकांनीं मी अध्यक्षपद स्वीकारलें याजबद्दल हरकत घेतली नाहीं याजबद्दल मी त्यांचाही आभारी आहें. आजच्या सभेंत प्रजेचीं गाऱ्हाणीं मांडावयाचीं आहेत. प्रजेचीं गाऱ्हाणीं कोणतीं आहेत याबद्दल दोन भाषणें आतांच झालीं. स्वागताध्यक्षांनीं सविस्तर भाषण केलें त्यांत त्यांनीं निरनिराळ्या लोकांचीं दुःखें चटकदार भाषेंत सांगितलीं. तें भाषण आपण सर्वांनीं लक्ष्यपूर्वक ऐकलें असेलच. मींही तें ऐकलें आहे. भाषण सविस्तरपणें चटकदार भाषेंत केल्यामुळें भाषणाकडे सारखें लक्ष्य लागून राहिलें होतें. भाषण चालूं असतांना माझ्या मनांत विचार घोळत होता. कोणाला रस्ता, कोणाला दवाखाना, कोणाला पैसे न खाणारे अंमलदार, कोणाला कांहीं, तर कोणाला कांहीं, असें निरनिराळें मागणें पुढें येत आहे. याचें मूळ काय व तें निवारण करण्यास अगर उखडून काढण्यास उपाय काय याचा विचार करीत असतांनां मला आपल्या भाषेंतील एका म्हणीची आठवण झाली. " पानें कुजलीं, घोडा बुजाला, भाकरी जळाली " या तिन्ही गोष्टींचा संबंध एकमेकांशीं कांहीं नाहीं, पण या वाईटाचें कारण एकच आहे. विड्याचीं पानें चाळलीं नाहींत, घोडा चालविला नाहीं, व भाकरी चाळविली नाहीं. या तिन्हींचें कारण एकच म्हणजे न चालविणें. तेव्हां स्वागताध्यक्षांनीं सांगितलेल्या तुमच्या अनेक दुःखाचें कारण एकच असूं शकेल काय ? आणि त्याबद्दल कोणती उपाययोजना करावी, याजबद्दल माझ्या मनांत विचार चालला होता. ब्रह्मदेश वगळला तर हिंदुस्थानांत एकंदर ५६२ संस्थानें आहेत. भोर संस्थानाहून दुसरीं मोठमोठीं संस्थानें आहेत. त्या मानानें विचार करतां हें तुमचें संस्थान आंगठीवरील खड्यापेक्षांही लहान आहे. याचें क्षेत्रफळ १००० चौरस मैल व उत्पन्न पुणें म्युनिसिपालिटीच्या उत्पन्नाच्या निम्या इतकें आहे, असें हें संस्थान आहे. याची लोकसंख्या सुमारें १३०००० असून यांत ९०० खेडीं आहेत. सकाळीं उठलें तर संध्याकाळीं दुसऱ्या हद्दींत सहज चालत जातां येतें. कोणीं मनांत आणल्यास आठ दिवसांत सबंध संस्थानचा प्रवास पायीं होऊं शकेल. कोणत्याही लहान मोठ्या संस्थानांत जा, प्रजेचीं हींच गाऱ्हाणीं ऐकूं येतात; सर्वांचीं एकाच प्रकारचीं दुःखें आहेत; **संस्थानिक फार उद्दाम, प्रजेच्या संबंधाच्या त्यांच्या कर्तव्याबद्दल बेफिकीर, अधिकारी आळशी, खाबू, व प्रजेविषयीं बेमुर्वतखो। : अशीं हीं ५६२**

**संस्थानें आहेत.** सर्वांच्या आतां स्वागताध्यक्षांनीं वर्णन केल्याप्रमाणें एकच स्वरूपाच्या तक्रारी ऐकूं येतात. याचें कारण काय ? हीं दुःखें निवारण झालीं तर तुम्हांस सुख लागेल काय ? तुम्ही सुखी झाल्यावर गप्प बसणार काय ? असें जर होईल तर आमचे पोटांत धस्स होईल. ब्रिटिश हद्दींत प्रजेला जास्त हक्क कसे मिळतील याबद्दल जोरानें चळवळ चालू आहे. जवळ असलेल्या ब्रिटिश हद्दींतील गांवाकडे आणि त्याप्रमाणें संस्थानी हद्दींतील गांवाकडे पहा. आंबेगांव ब्रिटिश हद्दींत आहे व उरवडे संस्थानांत आहे. आंबेगांवास राहणाराला जुलूम होईल असें वाटत नाहीं. तेंच शींव ओलांडून उरवड्यास आलों तर प्रजा दुःखी कष्टी असलेली दृष्टीस पडते. गेल्या महिन्यांत सांगली प्रजापरिषदेकरितां गेलों होतों; त्या ठिकाणीं असाच अध्यक्ष होतों. लोकांनीं तीच तक्रार केली. अप्रत्यक्ष रीतीनें संस्थानिकांच्या जुलुमास मदत करणारे तुम्ही प्रजाजन आम्ही ब्रिटिश हिंदुस्थानांत चालविलेल्या कार्यांत बिघाड करणार काय म्हणून भीति वाटत आहे. खालसांतील मंडळी म्हणूनच अशा सभेस येत असते. मी भोर संस्थानचा प्रजाजन नाहीं. मला एक इंच जमीन या संस्थानांत नाहीं. तुमचीं दुःखें निवारण झाल्यावर म्हणजे रस्ते, दवाखाने, प्रातिनिधिक संस्था वगैरे तुमचे म्हणण्याप्रमाणें दिले तर तुम्ही दुसरीकडे लक्ष्य देणार नाहीं काय? जर देणार नसाल तर आम्ही तुम्हांला स्वार्थी आहां असें म्हणूं; तुम्ही आम्ही एकाच हाडामांसाचे; परिस्थितीनें प्रजा ब्रिटिश अगर संस्थानी मुलखांत गेली तर आपला एकमेकांचा संबंध तुटतो काय ? दुःखाचें निवारण झालें म्हणजे परिषदेचें काम संपलें असा स्वार्थी विचार मनांत आणूं नका. तुमचे आमचे संबंध हरळीचे मुळ्यांसारखे गुंतले आहेत. तुमचीं दुःखें निवारण झालीं तर तुम्हीं आमचीं दुःखें निवारण करण्याच्या कामीं मदत केली पाहिजे. आमच्यापेक्षां तुमचीं दुःखें जास्त म्हणून आम्ही आज येथें आलों आहों. उद्यां आमचीं दुःखें जास्त झालीं तर उद्यां आपल्यास आमचे मदतीस धावून यावें लागेल; असा पोक्त व मातबर विचार केला पाहिजे. आपण आपल्या राजाशीं भांडतां तसेंच खालसांतील प्रजाजन आपल्या राजाबरोबर ४०।५० वर्षें सारखे भांडत आहेत. **स्वराज्य** मिळेपर्यंत आमची चळवळ चालूं राहील. **संपूर्ण स्वराज्य** मिळेपर्यंत आम्ही आपला भुंगा राजाच्या मागें लाविला पाहिजे. **करापासून उत्पन्न होणारा पैसा प्रजेचा आहे. प्रजेचा पैसा प्रजेच्या सुखसोईकडे खर्च करण्याचा हक्क प्रजेला पाहिजे.** अशाबद्दल आम्ही

आज ४०।५० वर्षें भांडण भांडत आहों. त्यासाठीं हजारों लोक तुरुंगांत गेले; वर्तमानपत्रांतून लेख लिहिले गेले व जात आहेत. परिषदा भरत आहेत. पुण्याचा मनुष्य कलकत्त्यासारख्या एक हजार मैलांवरच्या ठिकाणीं जाऊन, एकत्र होऊन, जोरानें मागणी करीत आहे. याबद्दल आमरण चळवळ करूं असें स्पष्ट बजावीत आहेत. त्याप्रमाणें भोर संस्थानांतील प्रजेनें परिषदेंत ठराव आणून एकमुखानें मागणी केली पाहिजे. सबंध हिंदुस्थानच्या दृष्टीनें पाहिलें तर ५६२ संस्थानांनीं ⅓ मुलूख व्यापलेला आहे. ब्रिटिश हिंदुस्थानांत २१ कोटी प्रजा तर संस्थानचे अंमलाखालीं ७ कोटी प्रजा आहे. बाकी संस्थानांत विलक्षण तऱ्हा दृष्टीस पडतात. आश्चर्य असें कीं, हे प्रकार दृष्टीसमोर चालतात. ५६२ संस्थानांपैकीं १३ मुख्य संस्थानें काश्मीर, हैद्राबादप्रमाणें आहेत; त्यांत संस्थानी मुलुखांपैकीं ⅔ मुलूख गेला आहे. उत्पन्नाच्या दृष्टीनें विचार केला तर ५३ संस्थानें १० ते १०० लाखांपर्यंतच्या व वरच्या उत्पन्नाचीं आहेत. १२७ संस्थानें १ ते १० लाखापर्यंतचीं आहेत; तुमच्या संस्थानचें उत्पन्न सहा लक्ष आहे. आणि ३७२ संस्थानें १ लाखापेक्षां कमी उत्पन्नाचीं आहेत. तुमचें संस्थान वरील १२७ संस्थानांत मोडलें जाईल. १३७ संस्थानें दहा हजार वसूलही न येणारांपैकीं आहेत. इतकीं हीं संस्थानें लहान आहेत. नाईकसाहेब यांच्या संस्थानचें उत्पन्न १६० रु. आहे. त्यांचें नांव राजे गंगाराम अंकुश हे आहे. मी जो हल्लीं घरीं गडी ठेवला आहे, त्याचा पगार साळीना २०० रुपये होतो. या मानानें संस्थानचें उत्पन्न किती किंमतीचें आहे याची कल्पना येईल. दुसरे एक संस्थानिक ९० रुपये उत्पन्नाचे आहेत. त्यांचें नांव बिब्रीचे राजेसाहेब. आठ आणे रोज मिळविणाऱ्या मुजराचें उत्पन्न यांचेपेक्षां जास्त आहे. वरील दोन्ही संस्थानाधिपतींचे ताब्यांत प्रजा आहे. वरच्या १६० रुपये उत्पन्नाच्या आधिपतींचा अंमल ५४ लोकांवर व दुसऱ्या राजेसाहेबांचा ३२ लोकांवर आहे. पण त्यांचे अधिकारच तसे अनियंत्रित आहेत. उत्पन्न वरील प्रकारचें पण अधिकार बेसुमार असल्यामुळें वाटेल तसें करावें, वाटेल त्यास उचलून फांशी द्यावें अगर त्यांचें वाटोळें करावें. अशीं हीं छोटीं संस्थानें म्हणजे एक लाख उत्पन्नापेक्षां कमी उत्पन्नाचीं **संस्थानें कां ठेवलीं हेंच कळत नाहीं. त्यांचीं उत्पन्नें त्यांना देऊन त्यांचा मुलूख ब्रिटिश मुलखांत सामील करावा. आणि संस्थानिकांना सरंजामदार बनवावेत**

**व त्यांचे विषारी अधिकार काढून घ्यावे.** साधारण वकिलाचें छोटेखानी उत्पन्न कांहीं कमी नसतें. पुण्यांत वर्षास दहा बारा हजार रुपये मिळविणारे वकील आहेत, वकिलास अधिकार नाहीं पण या संस्थानिकांना मात्र अधिकार भरपूर आहेत. लहान संस्थानचे आधिकार मोठ्या संस्थानिकांप्रमाणें असल्यामुळें खर्च वाढल्यामुळें उत्पन्न वाढविण्याचा दुष्ट प्रयत्न ते करतात. वीस वर्षांपूर्वी संस्थानाचें उत्पन्न किती होतें व आतां किती वाढलें आहे याचा चौकसबुद्धीनें शोध केल्यास हें उत्पन्न कसें वाढलें हें कळणार आहे. हे संस्थानिक अधिकाराचा दुरुपयोग कसा करतात हें तेव्हांच कळणार आहे. स्वतः कांहीं उद्योग करीत नसतांना त्यांचें उत्पन्न आतांच वाढलेलें दिसतें. गेल्या १५।१६ वर्षांखालीं ज्या एका संस्थानचें उत्पन्न १५।१६ लाख होतें तें आतां चाळीस लाख झालें आहे. संस्थानिक पहावा तर तोंडावरची माशीसुद्धां उडत नाहीं, आणि अधिकार पहावेत तर फांशीचे! यांचे अधिकारी पहावे तर त्यांची पगारावर नजर, आपल्या या भोरांत अशी स्थिति आहे कीं काय हें मला माहीत नाहीं. इनामदार, हक्कदार, देवस्थानें बेवारस यांचे मागें लागून हीं उत्पन्नें या संस्थानांचीं वाढलेलीं दिसतील, पैशाची उधळपट्टी कशी करतां येईल, यांत संस्थानिक दंग असल्यामुळें हे वरील ढंग त्यांना सुचतात. आपली चैन भागविण्याकरतां अन्यायानें हे वरील उत्पन्नें खालसा करीत आहेत असें दिसून येईल. अशा वेळीं त्यांना भाऊ दिसत नाहीं, आप्तइष्ट दिसत नाहीं, इनामदार दिसत नाहींत, फक्त चैन चालविण्यासाठीं कोणतीं उत्पन्नें खालसा करावींत याच विवंचनेंत ते असतात. ५६२ पैकीं पुष्कळ संस्थानिक अशा तऱ्हेचे आहेत त्यांनां किंमत अशी कळत नाहीं. त्यांचीं अधिकाररूपी कवचकुंडलें काढून घेतलीं तर कोणीही त्यांना आपल्या ऑफिसमध्यें **कारकून** म्हणून सुद्धां ठेऊन घेणार नाहीं. संस्थानिकांनीं आपली किंमत काय आहे याचा विचार करूनच वागलें पाहिजे. अधिकारपदच्युत झाल्यावर आपल्यास जगाचे बाजारांत काय किंमत येईल याचा त्यांनीं विचार केला पाहिजे. चैनीसाठीं गरीबांचीं उत्पन्नें खालसा करणें हें पाप आहे असें त्यांना समजलें पाहिजे. प्रत्येक संस्थानिकानें आपल्या पूर्वेतिहासाकडे नजर फेंकावी म्हणजे आपले पूर्वज कसे होते व आपण त्यांचे वंशज म्हणवून घेण्यास पात्र आहोंत कां हें ध्यानांत येईल. पंतसाहेबांचे पूर्वज श्रीमंत शंकराजी नारायण यांचा इतिहास पाहिला तर मावळे प्रांतांतील सैन्य जमवून स्वराज्यास मदत करण्याचा हिय्या त्यांनीं कसा केला हें ध्यानीं येईल. त्याच

दृष्टीनें प्रत्येक संस्थानिकानें विचार करावयास पाहिजे. इतिहासाच्या दृष्टीनें पहातां प्रत्येक संस्थान मिळविणारा **दुसरे ठिकाणीं शागिर्द तरी होता किंवा कारकून तरी होता.** गोविंदपंत बुंदेल्यांचें उदाहरण घ्या; ते पेशव्यांचे शागिर्द होते. अशीच गोष्ट इतर संस्थानिक यांचीही आहे. त्यांनीं स्वराज्यस्थापनेच्या वेळीं मदत करण्याची प्रचंड कामगिरी केली म्हणूनच स्वराज्य स्थापन झालें. या दृष्टीनें विचार केला तर तुमच्या पूर्वजांच्या सहाय्यानें हल्लीं अवशिष्ट असलेल्या संस्थानाधिपतींनीं आपलीं संस्थानें स्थापन केलीं आहेत. स्वराज्याची पूर्वीची बिनमोल कामगिरी लक्षांत आणा. कोणताही **फाटका साहेब** दृष्टीस पडला तर त्याचेपुढें **गोंडा घोळून** आपलें संस्थान कायम ठेवतांना आपल्या पूर्वेतिहासाकडे जरा पहा, म्हणजे दिसून येईल कीं, संस्थानाधिपतींचे पूर्वज एक मोठे बंडखोर होते. सातारच्या अष्टप्रधानांपैकीं तुमच्या संस्थानिकांचे पूर्वज आहेत. मावळ जिंकणाराचे हल्लींचे संस्थानिक वंशज आहेत. प्रजेच्या सुखसोईकडे नजर दिली तरच माझी **गादी राहील** ह्याची जाणीव राजास पाहिजे. या प्रजेच्या पूर्वजांच्या मदतीनेंच आपलीं हल्लींचीं संस्थानें अस्तित्वांत आलीं याचें स्मरण या संस्थानिकांस असावयास पाहिजे व म्हणून या लोकांशीं हितगुज करून त्यांचें योग्य पालन करणें आपलें पवित्र कर्तव्य आहे ही जाणीव यानीं ठेवण्यास नको काय? प्रजाजनांच्या पूर्वजांनीं रक्ताचा सडा शिंपला नसता तर कोणतेंही संस्थान अस्तित्वांत आलें नसतें व पुढें टिकलें नसतें. प्रजेची सहानुभूति मिळविली नाहीं तर भविष्य काळीं फार धोका येईल हें सर्व संस्थानांबद्दल मी म्हणत आहें. आपलें उत्पन्न वाढविणें तादृश फल आहे तरी खोल विचार करतां हें कायम टिकणारें नाहीं. कांहीं संस्थानिक तर अंगांत चेव आल्याप्रमाणें वागतात व हुच्च्या मुलाप्रमाणें वर्तन करतात. संस्थानिकांस १८ वर्षें पुरीं झाल्यावर लगेच मुखत्यारी देण्यांत येते व तो सर्वाधिकारी बनतो ही आश्चर्याची गोष्ट आहे. अशा संस्थानिकांस भरपूर अधिकार असणें हें कसेंसेंच वाटतें. निसर्गानें मदत केल्यानें संस्थानी घराण्यांत जन्मले ही त्यांची लायखी. आम्ही खालसांतील गांवढळ लोक. वकील व इंजिनियर होण्यासाठीं आम्हास अभ्यास करावा लागतो. संस्थानिकांना एकच कळतें कीं गव्हर्नरसाहेबांच्या बंगल्यावर गेलें तर लगेच अधिकारदान होतें. बाईला सुद्धां अधिकार मिळतात. मग तिला इंग्रजी येवो अथवा न येवो; कायदा माहीत

असो वा नसो सहा हजार मैलांवरून आलेले लोक ही आपली चेष्टा तर करीत नाहींतना असें वस्तुतः संस्थानिकांस वाटलें पाहिजे. मला कोणी म्हटलें कीं, तुम्ही Veterinery Surgeon व्हा तर 'मी घोडा डॉक्टर कसा होऊं ? मला घोडा कसा असतो हें सुद्धां समजत नाहीं;' वयाचीं १८ वर्षें पुरीं झालीं तर सर्व अधिकार मिळतात; मनुष्य जिवंत असला म्हणजे १८ वर्षें हीं केव्हांतरी पुरीं व्हावयाचींच; विशिष्ट कुलांत जन्मास आल्यावर ज्ञान हें त्याचे मागें येतें हा कुठला नियम ? मग अशा स्थितींत दुःखें वाढलीं तर यांत काय नवल ? पुरणाची पोळी जिला करतां येत नाहीं तिला पुरणाची पोळी करण्यास सांगणें व आमटी येत नाहीं तिला आमटी करण्यास सांगण्यापैकींच आहे. तेव्हां पहिली मागणी अशी करा कीं, संस्थानिकांनीं पैसा पाहिजे तर घ्यावा; पण आपली लायकी सिद्ध केल्याशिवाय त्यांना **अधिकार देऊं नयेत.** लायकी दाखवा व अधिकार मागा. आय. सी. एस्. सारख्या हुशार मंडळीस तीन महिने उमेदवारी केल्यावर मग त्यांना क्रमाक्रमानें अधिकार मिळत जातात. सहा महिन्यांनीं सेकंड क्लास मॅजिस्ट्रेटचे अधिकार देतात; पुढें फर्स्ट क्लास मॅजिस्ट्रेट व सबडिव्हिजनल ऑफिसर होऊन नंतर डि. मॅजिस्ट्रेटचे अधिकार २० वर्षांनंतर देण्यांत येतात. परंतु संस्थानिकांचे बाबतींत सर्व अधिकार चालविणेचें ज्ञान त्यांना केव्हां व कसें मिळतें हेंच आश्चर्य आहे. ब्रिटिश हद्दींत निकामी झालेले इसम संस्थानांत सर्वाधिकारी होतात; म्हणजे संस्थान ही काय चीज आहे हें कळत नाहीं. यापुढें दुसरी मागणी म्हणजे संस्थानच्या मानानें संस्थानिकांत **नक्की नेमणूक** होणें ही आहे. संस्थानच्या उत्पन्नाचें हें प्रमाण १ ते पांच टक्के आहे अगर लहान संस्थानांचे बाबतींत १ ते १० टक्के असावें. बाकीच्या संस्थानच्या उत्पन्नावर त्यांची मालकी असूं नये अशी मागणी जोरानें करावी. नुकतीच उत्तरेकडील एका संस्थानिकाची माहिती मला समजली. ८० लाख उत्पन्नापैकीं ६० लाख खानगीकडे खर्च दाखविले आहेत. ही काय लोकांच्या पैशाची उधळपट्टी चालविली आहे, आहे तरी काय ? क्रिकेटसाठीं एखादा संस्थानिक मुंबईस येतो, त्यानें किती खर्च करावा याचा ताळच नाहीं. संस्थानिकांस अधिकार देऊं नयेत असें नाहीं, त्यांना एलएल्. बी. होऊं द्या मग अधिकार द्या. एका संस्थानिकास स्नानास ४० घागरी पाणी लागतें. गांवांतील कुटुंबवत्सल घरांतील सुनेस दिवसभर करटीनें पाणी भरावें लागतें. व इकडे पाण्याची योजना म्युनिसिपालटीकडून तयार झाली म्हणून ती या राजेश्रींनां मान्य

होत नाहीं. काय हें प्रजावात्सल्य ! माणसें रात्रंदिवस पाणी पाणी म्हणून ओरडतात तरी दाद नाहीं, परंतु हे संस्थानिक हातांत चिपळ्या घेऊन 'रामा माझें कल्याण कर, मी फार गरीब आहें. माझें रक्षण कर ' म्हणून धांवा करतात ! रामचंद्रास काय डोळे नाहींत ! तो अशा **प्रजाछलक** संस्थानिकांस मनःस्वास्थ कसें देणार ? ब्रिटिश सरकारच्या फायद्याकरतां ही स्थिति कांहीं काळ चालेल, परंतु त्यांची सत्ता कमी कमी करण्याचे जबरदस्त प्रयत्न इकडे चालले आहेत. तें कार्य शेवटास जाणार, संस्थानिकांनीं भलत्याच मोहाला बळी पडूं नये. संस्थानिकांनी प्रजेच्या दुःखाकडे वेळींच लक्ष पुरवलें पाहिजे, नाहींतर त्यांच्या संकटकाळीं प्रजेचा उलट जबाब येण्याचा संभव आहे. प्रजेची भेट घेण्यास संस्थानाधिपतींना वेळ नसतो, मात्र एखादा खाकी सूटमधला फॉरेस्ट रेंजर आल्यास त्याची भेट ताबडतोब. प्रजेला हक्क मिळण्याबद्दल खालसामध्यें जोरानें चळवळ चालू आहे. देशी संस्थानें हा नोकरशाहीचा **शेवटला खंदक** आहे. स्वराज्यासाठीं हे खंदक भरावे लागतील. नोकरशाही घोड्याचे शेपटीवर घसरत आली आहे. कालाचा फक्त अवधि आहे. एकदां कला मिळाली म्हणजे संस्थानांचा प्रश्न बिकट होईल त्याचेबरोबर हीही पडतील. सरकारचा जोर कमी झाला म्हणजे ही स्थिति येणार. तेव्हां संस्थानिकांनीं प्रजेकडे लक्ष दिलें पाहिजे. पूर्वीचा काल गेला. तेराव्या शतकांतील कल्पना उराशीं बाळगू नका. पूर्वीं भाल्याचें टोक नाचवून अटकेपार झेंडा रोंवला. आतां या कालास अनुसरून तोफा व विमानें घेऊन लढलें पाहिजे. तुरे व कलगे पूर्वीं १७ व्या शतकांत वापरलीं. तें वापरण्याचा काल आतां नाहीं. मुलाचे लग्नासाठीं हायस्कुलची इमारत उलथीपालथी केली व एका फुसकट निमित्तानें दुसरीकडे नवीन जानोशाची जागा पाहिली हें आहे काय ! १२।१४ लाख रुपये उत्पन्नाचे संस्थानिकानें मुलीच्या लग्नासाठीं ४।५ लाख रुपये खर्च करावयाचे ! हे पैसें कोठून आले असें एकाद्या माथेफिरूनें प्रश्न केला तर त्याला उत्तर काय ! लायकी अंगीं असल्याशिवाय संस्थानिकांना अधिकार देऊं नयेत अशी प्रथम मागाणी करावी. राजा हा विष्णूचा अवतार अशी कल्पना नष्ट होऊन **प्रजा 'जनताजनार्दन'** आहे ही कल्पना रूढ होत चालली आहे. **राजा हा प्रजेचा नोकर आहे** किंवा पुजारी आहे. संस्थानांत सर्वच विचित्र. एका संस्थानिकानें कुस्तीवर म्हणे पुस्तक लिहिलें, म्हणून तो इंजिनियरिंग वगैरेवर अभिप्राय देण्यास समर्थ ठरतो हें सर्व पाहून

आमचेसारखीं गरीब माणसें घाबरून जातात. तुमच्या संस्थानाचें उत्पन्न सहा लाख आहे. त्यांतील हक्कदारी वजा जातां १० टक्के यजमानसाहेबांनीं घ्यावेत. बाकी उत्पन्नावर मालकी प्रजाजनाची असावी. **संस्थानचे अधिकारी संस्थानी प्रजेपैकींच असावेत.** भोर संस्थानांत काय कमी लायक लोक आहेत ? भोर संस्थानपैकीं मुंबईस सालिसिटर नांवाजलेले आहेत, वकील आहेत, डॉक्टर आहेत, उत्तम लेखक आहेत. त्यांना आधिकार द्या; त्यांचें कार्यकारी कौन्सिल बनवा; कारभारी भोरास मिळतच नसला तर मग पुण्याची सदाशिव पेठ धुंडाळा. सत्ता एका इसमाला देण्यापेक्षां पांचामुखी परमेश्वर असें कौन्सिल नेमा. भोरचे श्रीपंतसाहेब सज्जन गरीब आहेत. त्यांनीं राज्यारोहणप्रसंगीं बऱ्याच बाबी सोडल्या त्याबद्दल त्यांचे आभार मानले पाहिजेत; आजपर्यंत त्यानीं बऱ्याच गोष्टी प्रजेकरितां केल्या आहेत त्याबद्दल ते स्तुतीस पात्र आहेत; राज्यारोहणप्रसंगीं हडसन साहेबांच्या भाषणास उत्तर देतांना त्यांनीं आपल्यास बदललेल्या काळाची माहिती आहे व लोकांच्या आकांक्षा काय आहेत याची आपल्यास जाणीव असल्याचेंही सांगितलें आहे. प्रजेच्या मानपत्रास उत्तर देतांना त्यांनीं 'सुधारणा घडवून आणण्यास कांहीं मुदत पाहिजे व ती प्रजेनें द्यावी, मग पाहावें' अशी विनंती केली आहे. संस्थानिकांना आपल्या संस्थानांत अनियंत्रित सत्तेमुळें वाटेल तसा धुडगुस घालतां येतो म्हणून सर्वच काहीं बेकायदेशीर त्यांनीं करूं नये. त्यांचे अनियंत्रित अधिकार काढून घेतल्यास काय राहील याचा विचार त्यांनीं करावयास पाहिजे. **बापु गोखले व विंचूरकर** यांचीं उदाहरणें पहा. तत्त्वासाठीं त्यांनीं संस्थानें गमाविलीं. पेशवाईचें उदक सोडण्याचे अगोदर या वरील सरदारांना इंग्रजसरकारांबरोबर गुप्त तह करतां आले असते, परंतु त्यांनीं तसें न करतां तत्त्वाकरतां आपल्या ताब्यांतील पुष्कळ मुलूख गमावला.

संस्थानिकांना जें करावयास प्रजाजन सांगतात त्याप्रमाणें स्वतः वागण्यास प्रजाजनांनींही तयार झालें पाहिजे. **ईश्वराच्या घरीं सर्व माणसें सारखीं आहेत.** जन्मानें उच्च नीच कोणी नाहीं. लोकांनीं या तत्त्वाच्या जोरावर **आपल्या अस्पृश्यांस** आपले जवळ केलें नाहीं तर बोलण्यांत नुसती समता व कृतींत ती उतरत नसेल तर काय उपयोग ? त्यांना जवळ करा म्हणजे आपलें सर्वांचें कल्याण होईल. संस्थानाधिपती अगर त्यांचे अधिकारी यांच्यासंबंधानें अपमानाचे शब्द काढून त्यांचा अवमान करूं नका. ब्रिटिश मुलुखांत

जी चळवळ चालू आहे ती अगदीं सनदशीर आहे असा शिक्कामोर्तब तीवर झाला आहे. तुम्ही आपली तशी चळवळ चालवा. सर्वांस त्याच पद्धतीनें सारख्या भावानें व समतेनें वागवा; ईश्वर आपल्या कार्यांत यश देईल अशी माझी खात्री आहे. "

## दिवस दुसरा.

( ता. ११।४।२७ )

आज सकाळीं परिषदेच्या कामास सुमारें १० वाजतां सुरुवात झाली. अध्यक्षांनीं पहिला राजनिष्ठेचा ठराव परिषदेपुढें मांडला व तो सर्वानुमतें पास झाला. **दुसरा ठराव** संस्थानी प्रजेच्या हक्काचें योग्य संरक्षण होण्यासाठीं Princes Protection बिलाचे धर्तीवर Indian States Subjects' Protection Bill तयार करण्यांत यावें वगैरे आशयाचा **रा. वामनराव पटवर्धन** यांनीं मांडला. तो मांडतांना ते म्हणाले " या ठरावाचे चार पोटभाग आहेत. पहिल्या भागांत ब्रिटिश हद्दींतील वर्तमानपत्रांपासून संस्थानिकांचा बचाव करण्यासाठीं ज्याप्रमाणें संस्थानिकांनीं चळवळ करून Princes Protection Bill पास करून घेतलें त्याचप्रमाणें आपणही संस्थानी प्रजेचा बचाव करून घेण्यासाठीं Indian States Subjects' Protection Bill पास करून घेणें जरूर आहे. यंदाचे सालीं अगर १९२९ सालाचे पूर्वी केव्हां तरी नेमण्यांत येणाऱ्या रॉयल कमिशनमध्यें संस्थानिकांबद्दलचें वरिष्ठ सरकाराचें धोरण काय असावें हें ठरणार आहे, त्या करतां कांहीं संस्थानिक सिमला येथें मे महिन्यांत वाटाघाट करण्याकरतां जमणार आहेत व या रॉयल कमिशन-मध्यें संस्थानिकांच्या हक्काचें संरक्षण करण्याकरितां त्यांचे प्रतिनिधी असावेत असे प्रयत्न चालू आहेत. अशा वेळीं संस्थानी प्रजेचा बचाव करण्या-साठीं आपल्या तर्फेचे प्रतिनिधी त्या रॉयल कमिशनवर नेमले जावेत अशी खट-पट करणें जरूर आहे. येथून जवळच असलेल्या आंबेगांवच्या लोकांना प्रधान निवडून देण्याचा हक्क आहे; आम्हांला मात्र तो नाहीं. तो मिळण्यासाठींच आपली खटपट आहे; तरी हा ठराव आपण एकमतानें पास करावा अशी विनंति आहे. " या ठरावास अनुमोदनपर **रा. दा. वि. गोखले** यांनीं भाषण केलें. अनुमोदन देतांना ते म्हणाले " या ठरावांतील पहिल्या कलमावर रा. वामनराव पटवर्धन यांनीं इंडियन स्टेट्स सबजेक्टस् प्रोटेक्शन बिल कां पास करून

च्यावें याबद्दल ऊहापोह केला आहे. संस्थानिक म्हणजे संस्थानें असें आजवर मानण्यांत येत आहे. परंतु ही स्थिति आतां पालटली आहे. यापुढें **रयत हा राजा व संस्थानिक हा आम्ही निवडून दिलेला प्रतिनिधि** असें व्हावयाचें आहे. पूर्वीचे गुण हल्लीं राजे लोकांतही नाहींत व प्रजेमध्येंही नाहींत. राम राज्यासारखी परिस्थिति आज असती तर या परिषदा भरविण्याचें कांहीं कारणच नव्हतें. मायबापाप्रमाणें रामराज्याचे गुण होते. " स्नेहं दयांच सौख्यंच यदि वा जानकीमपि ॥ आराधनाय लोकस्य मुंचतो नास्ति मे व्यथा ॥" श्रीरामचंद्राप्रमाणें हल्लींच्या संस्थानिकांची भावना आहे काय ? राज्य कोणासाठीं आहे असा प्रश्न व्हाइसरॉयसाहेबानीं नुकताच भोपाळच्या नबाबसहेबांना मेजवानीचे वेळच्या भाषणांत केला. ब्रिटिश हिंदुस्थानांत आम्ही जे अधिकार वापरतों ते केवळ वैयक्तिक हिताकरतां नसून प्रजेच्या हितासाठीं त्यांचा उपयोग करतों. त्याप्रमाणें तुम्हीही आपले अधिकार प्रजेच्या सुखसोईकडे लावा म्हणजे त्यांतच तुमचें हित आहे. आम्ही ज्या प्रातिनिधिक संस्था बनविल्या आहेत त्याही प्रजेच्या हिताकरतांच आहेत. सबब तुम्हीही प्रातिनिधिक संस्था आपल्या संस्थानांत निर्माण करा, म्हणजे वादाचा प्रश्न आपसुखच मिटेल. कस्टम्स अबकारीसारख्या बाबी सर्वांना सारख्या लागू आहेत, तेव्हां संस्थानी प्रजेच्या हक्कांचें संरक्षण करण्यासाठीं एक स्टॅच्युटरी कमिशन नेमण्यांत यावें व ज्या ज्या लोकांचा वरील बाबींशीं संबंध प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष पोंचतो त्याचे प्रतिनिधि या कमिशनमध्यें नेमण्यांत यावेत अशी मागणी या ठवरानें सुचविली आहे. संस्थानिक व प्रजा यांचे हितसंबंध जरी भिन्नभिन्न आहेत तरी संस्थानिकांनीं संस्थानें आपली खाजगी मत्ता आहे असें यापुढें मानूं नये. हल्लींच्या संस्थानिकांचे पूर्वज व आमचे पूर्वज यांनीं स्वराज्य स्थापनेसाठीं एकत्रच रक्त सांडल्यामुळें हीं हल्लींचीं संस्थानें निर्माण झालीं आहेत आणि तीं यापुढें कायम टिकावीं अशी जर संस्थानिकांची इच्छा असेल तर संस्थानांतील प्रजेला त्यांनीं जवळ घेतले पाहिजे. संस्थानी प्रजेचें प्रेम संपादलें पाहिजे. याचा त्यांच्या भविष्यत् कालावर चांगला परिणाम होणार आहे. सबब आतांच संस्थानिकांनीं सावध राहावें असा प्रेमाचा इषारा मी त्यांना देत आहें व ते आपली प्रजेबद्दलची जबाबदारी ओळखून वागतील अशी आशा आहे, सबब हा ठराव पास करण्यांत यावा अशी विनंति आहे. नंतर रा. **राघवेंद्रराव शर्मा** हे याच ठरावास अनुमोदन देतांना

म्हणाले कीं "मी एक हैद्राबादचा रहिवाशी आहें. हैद्राबाद संस्थान किती मोठें आहे हें आपल्यास माहीत आहे. या भोरसारखीं पांच पन्नास संस्थानें निजाम राज्यांत आहेत. संस्थानिकांनीं प्रजेला आजपर्यंत निरनिराळ्या रीतीनें छळलें, त्यांच्यावर जुलूमजबरदस्ती केली. हल्लींही तेच प्रकार बहुतेक संस्थानांत चालू आहेत. तेव्हां या त्रासापासून संस्थानी प्रजेचें संरक्षण होणें अगदीं जरूर व आवश्यक आहे. संस्थानिक संस्थानांत पाहिजे तसा गोंधळ घालतात. अनेक संस्थानांत फार भयंकर जुलमाचे प्रकार दृष्टोत्पत्तीस येतात. संस्थानिक प्रजेच्या पैशावर वाटेल तशी चैन मारतात. इंदूर व काश्मीर यांसारख्या संस्थानिकांचें उदाहरण आपल्यापुढें आहेच. या बाहेरख्याली संस्थानिकांनीं प्रजेचे कोट्यावधी रुपये उधळले. संस्थानिकांचें संरक्षण ब्रिटिश सरकार करतें. संस्थानी प्रजेचें संरक्षण करण्याची ग्यारंटी कोठें आहे? Gross Misrule झाला तर कोठें सार्वभोमसरकार त्यांना "असें कां" म्हणून विचारतें. तेव्हां अशा प्रकारचा जुलूम न होईल असें "संरक्षण" ( Protection ) प्रजेस मिळावें म्हणूनच हा ठराव पुढें मांडण्यांत आला आहे. तो सर्वांनीं एकमतानें पास करावा अशी विनंति आहे.

नंतर **प्रो. दत्तो वामन पोतदार** म्हणाले "ब्रिटिश सरकारनें शक्य तो मुलूख १०० वर्षांपूर्वी आपल्या ताब्यांत घेतला व आपल्यास मिळाफी होते तेवढे संस्थानिक शिल्लक ठेवले. संस्थानिकांचे मुलखाप्रमाणें येथील प्रजाही त्यांचे स्वाधीन केली. मग त्या प्रजेचें कांहींही होवो. सार्वभौम सरकार तिकडे लक्ष घालीत नाहीं. फक्त आपल्याच हक्काबद्दल मात्र तें जपत असतें आणि आपले हक्क पूर्णपणें पाळतें. खालसांतीत १८५७ सालापासून राजा व प्रजा यांचेमध्यें हा झगडा सुरू झाला आहे व तो आजमित्तीसही चालू आहे. अलीकडे थोडे अधिकार दिले आहेत, जास्त अधिकार देण्याचा प्रश्न चालू आहे. संस्थानी मुलूख असो वा ब्रिटिश मुलूख असो, त्यांतील प्रजा ही एकाच हाडामांसाची आहे. एकमेकांचीं सुखदुःखें अगदीं संलग्न आहेत. आमचें दुःख पाहून तुम्हालाही सुख होणार नाहीं अगर तुमचें दुःख पाहून आम्हांलाही सुख होणार नाहीं. खालसांतीत ज्याप्रमाणें न्यायाचें राज्य चालतें त्याप्रमाणें सर्व संस्थानांतून न्यायाचें राज्य व्हावें, एवढेंच मागणें आहे. कोणीकडून तरी प्रजेला माणसाप्रमाणें वागविलें जाईल एवढें करा. संस्थानांत व खालसातींत एकच प्रकारचें

वातावरण राहिलें पाहिजे यांतच सर्वांचें हित आहे. संस्थानिकांनीं चळवळ करून आपल्याभोंवती एक मखराचा कायदा निर्माण केला आहे त्या प्रमाणेंच संस्थानी प्रजेच्या हिताकरतां ठरावांत सांगितल्याप्रमाणें कायद्याचें मखरही आपल्यास निर्माण केलें पाहिजे अगर त्यांच्या मखराजवळ आपला तंबू तरी ठोकला पाहिजे. सबब हा ठराव सर्वांनीं एकमतानें मान्य करावा अशी सर्वांस विनंति आहे. नंतर टाळ्यांच्या कडकडाटांत हा ठराव पास झाला.



# अखिल भारतीय संस्थान प्रजा परिषद्.

## मद्रास येथील अधिवेशन.

ता. २६ व २७ डिसेंबर इ. स. १९२७ रोजीं अखिल भारतीय संस्थान प्रजापरिषद् मद्रास येथें भरविण्यांत आली. राष्ट्रीय सभेच्या अधिवेशनाचा आठवडा हा निरानिराळ्या राष्ट्रीय चळवळींच्या कामांचा आढावा घेण्याचा आणि पुढील कार्यक्रम आंखण्याचा आठवडा अलीकडे कित्येक वर्षांपासून बनला असल्यामुळें त्याला राष्ट्रीय आठवडा असें अन्वर्थक नामाभिधान प्राप्त झालें आहे. राष्ट्रीय सभेच्या अधिवेशनाची पर्वणी साधून सामाजिक, औद्योगिक, व्यापारविषयक, शैक्षणिक, धार्मिक वगैरे अनेक परिषदांचीं अधिवेशनें या राष्ट्रीय आठवड्यांत भरविण्याचा परिपाठ अलीकडे कित्येक वर्षांपासून चालत आला आहे. या विविध परिषदांसाठीं येणाऱ्या नागरिकांत संस्थानी प्रश्नांसंबंधानें आस्था बाळगणारेही पुष्कळ गृहस्थ अनायासें एकत्र जमलेले असतात. म्हणून मुंबई येथें अखिल भारतीय संस्थानी प्रजाजनांची परिषद् नुकतीच भरली असतांनाही तशाच प्रकारची व त्याच उद्देशानें आणखी एक अखिल भारतीय संस्थानी परिषद् मद्रास येथेंही राष्ट्रीय सभेच्या अधिवेशनाच्या संधीला भरविण्यांत आली. या सभेच्या स्वागत मंडळाचे अध्यक्ष मि. एस. सत्यमूर्ती हे असून अध्यक्षस्थानीं मि. श्रीनिवास अयंगार यांची योजना करण्यांत आली होती. संस्थानी प्रश्न काँग्रेसनें विचारासाठीं घेण्याची वेळ आतां आली आहे असें मि. श्रीनिवास अयंगार यांनीं गुदस्तां काँग्रेसचे अध्यक्ष या नात्यानें गोहत्ती येथें केलेल्या भाषणांत आपलें मत व्यक्त केलें होतें, मद्रास येथें भरलेल्या या संस्थानी प्रजा-परिषदेला हजर असलेल्या प्रमुख गृहस्थांत, मुंबईच्या संस्थानी परिषदेचे अध्यक्ष दि. ब. रामचंद्रराव, ना. व्ही. रामदास पंतलू, पंडित तारकानाथ राव, श्री. वामनराव नाईक, म्हैसूरचे होसकाप्पा कृष्णराव, त्रावणकोरचे मि. ई. व्ही. कृष्ण पिले, कोचीनचे ए. बी. सालेम, दि. ब. सी. कृष्णराव, पदुकोटचे मि. के. स्वामीनाथ अय्यर, हैद्राबादचे राघवेन्द्र शर्मा, इंदूरच्या श्रीमती कमलाबाई साहेब व माधवराव सा. किबे इ. गृहस्थ होते. मि. सुभाषचंद्र बोस, कर्नाटक व इंडियन रिव्ह्यू ऑफ रिव्ह्यूचे संपादक मि. डी.

व्ही. गुंडाप्पा व म्हैसूरचे मि. जी. आर. जॉसयार यांनीं परिषदेला हजर राहतां न आल्याबद्दल दिलगिरीप्रदर्शक पत्रें पाठविलीं होतीं. संस्थानी प्रजाजनांनाही ब्रिटिश नागरिकत्वाचा दर्जा प्राप्त करून देण्याची जबाबदारी ब्रिटिश सरकारवर आहे व हें उद्दिष्ट साध्य करण्यासाठीं संस्थानच्या अन्तर्गत राज्यपद्धतींत जरूर ते फेरफार संस्थानिकांकडून त्यांनीं करविले पाहिजेत अशी मागणी केली पाहिजे, तसेंच बटलर कमिटीच्या घटनेंत वैगुण्य असलें तरी त्या कमिटींत सर विश्वेश्वर अय्यांसारखे संस्थानचे नागरिक घ्यावे, संस्थानांची राज्यघटना सदनशीर करण्याचा तसेंच संस्थानी प्रजाजनांना नागरिकत्वाचे हक्क देण्याच्या प्रश्नाचा सदर कमिटीच्या चौकशीच्या योजनेंत समावेश करावा, सदर कमिटीनें संस्थानांतील सार्वजनिक संस्था व पुढारी यांचे अभिप्राय घ्यावेत, त्या कमिटीचा रिपोर्ट लोकमत व्यक्त करण्यास संधि मिळण्यासाठीं प्रसिद्ध करण्यांत यावा अशा मागण्या अखिल भारतीय संस्थानी प्रजा परिषदेनें कराव्या अशा सूचना मि. गुंडाप्पा यांनीं आपल्या दिलगिरीप्रदर्शक पत्रांत केल्या होत्या. संस्थानांतील नोकरशाही हिंदी आहे, म्हणून संस्थानांत स्वराज्य नांदत आहे असा पुष्कळांना भ्रम असतो तो चुकीचा आहे. लोकशाही किंवा जबाबदारीचें स्वराज्य तूर्त राहो, परंतु सुराज्य मिळालें तरी पुष्कळ संस्थानी प्रजाजन संतुष्ट होतील असें मि. जोशियर यांनीं आपल्या पत्रांत म्हटलें होतें.

---

## ता. २६ माहे दिसेंबर १९२७.

## स्वागताध्यक्ष मि. एस. सत्यमूर्ती, एम्. एल्. सी.

## यांचें भाषण.

प्रतिनिधि बांधव, व सभ्य स्त्रीपुरुष हो, आज मद्रास शहरीं अशा प्रकारचें हें पहिलेंच अधिवेशन भरत आहे. तेव्हां अशा समयीं या परिषदेचा स्वागताध्यक्ष या नात्यानें मी तुमचें सर्वांचें येथें मोठ्या प्रेमानें स्वागत करतों. हा आठवडा म्हणजे खरोखर मोठ्या धामधुमीचा आहे. अखिल भारतीय हिताच्या दृष्टीनें पुढील स्वराज्याची रूपरेषा कशी असावी याचा खल

करण्याकरितां मोठमोठे मुत्सद्दी या आठवड्यांत अनायासें जमले असतांना या-सारख्या परिषदेंत भाग घेण्यास आपण येणार नाहीं असें म्हणणें म्हणजे कदाचित् मर्यादातिक्रम होईल, परंतु या चालू परिषदेचें महत्व जरी काँग्रेसइतकें नसलें तरी तें कोणत्याही अधिवेशनापेक्षां कमी नाहीं हें खास. तेव्हां या परिषदेंत होणाऱ्या चर्चेंत आपण भाग घ्यावा अशी निराळी विनंति करण्याचें कांहीं कारण दिसत नाहीं. अखिल भारतीय राष्ट्रीय सभेनें आतां संस्थानी प्रश्नांस आपल्या चर्चेंत स्थान दिलें पाहिजे असा हल्लींचा काळ आला आहे. आतां-पर्यंत काँग्रेसनें याकडे जरी दुर्लक्ष्य केलें असलें तरी त्यांस अनेक ऐतिहासिक कारणें आहेत; परंतु खालसा व संस्थानी मुलखांत हल्लीं जो वरचेवर फेरबदल होत चालला आहे त्यामुळें एकमेकांचीं सुखदुःखें एकांत एक गुरफटून गेल्या-मुळें अखिल भारताच्या भावी स्वराज्याकडे दृष्टि ठेवून हा संस्थानांचा प्रश्न उभयतांच्या हिताकरितां सोडविणें हल्लीं क्रमप्राप्त झालें आहे व याउपर त्याची उपेक्षा करणें बरोबर नाहीं.

काँग्रेसच्या कक्षेंत संस्थानी प्रश्नांचा ऊहापोह केल्यानें संस्थानिकांना अगर त्यांच्या हितचिंतकांना भावी सुरक्षिततेची भीति वाटते व या प्रश्नाच्या चर्चेमुळें त्यांच्या दर्जास कमीपणा येतो असें त्यांना वाटल्याचें कानीं येतें, पण जरा खोल विचार केला तर त्यांची ही भीति अगदीं निराधार आहे असें मी स्पष्ट आश्वासन देतों. व ब्रिटिश इंडियांतील लोकपुढारी, गव्हर्नमेंट ऑफ इंडियाचे अधिकारी जशी मित्रत्वाची भावना त्यांच्याबरोबर ठेवीत आले आहेत त्याच प्रकारची भावना व बुद्धि संस्थानिकांशीं ठेवतील अशी मी त्यांच्यातर्फे ग्वाही देतों. हिंदी हिंदुस्थान व संस्थानी भाग यामध्यें मोठी थोरली भिंत बांधून प्रग-तीचा मार्ग कांहीं कोणी खुंटवूं शकत नाहीं. हिंदुस्थानास आज नाहीं उद्यां **स्वराज्य** हें मिळणारच तेव्हां याची झळ संस्थानी प्रजाजनांस खात्रीनें लागून त्यांच्यामध्यें जागृति ही होणारच. परंतु आतांपर्यंत जरी राष्ट्रीय सभेनें हा प्रश्न आपल्या कक्षेंत घेतला नाहीं तरी तो घेईपर्यंत आपण संस्थानी प्रजाजनांनीं कांहींच हातपाय हालवूं नयेत असें नाहीं. आपण सर्वांनीं एकत्र जमून विचार-विनिमय करून अखिल भारतीय संस्थानांच्या हिताच्या दृष्टीनें राजकीय सुधारणा कशा प्रकारें करावी याची रूपरेषा ठरविणें अगदीं जरूर आहे. ही गोष्ट आपल्यासच करणें भाग आहे. असें झालें म्हणजे आपणांस पुढील

मार्गांचें अवलंबन ध्येय गांठण्याकरतां कसें करावें हें सुचेल. तसेंच ब्रिटिश मुलखांतील प्रजेबरोबर भागीदार या नात्यानें कसे राहतां येईल या प्रश्नाचाही उलगडा होईल.

ब्रिटिश मुत्सद्यांनीं सायमन कमिशनबरोबरच एक संस्थानी प्रश्नांची चौकशी करण्याकरतां एक चौकशी कमिटी नेमली आहे, पण त्या कमिटीवर आमचा विश्वास नाहीं हेंही येथें सांगणें मला भाग आहे. असें जरी आहे तरी आज या परिषदेंत आपल्या पुढील धोरणाबद्दल कांहीं तरी एक मार्ग सुचवून तो राष्ट्रीय सभेच्या पुढाऱ्यांपुढें विचारास ठेवणें आज अगदीं अगत्याचें आहे असें मला वाटतें.

हिंदुस्थानांत संस्थानांनीं सुमारें ६८६००० स्क्वेअर मैलांचें क्षेत्र व्यापलें आहे व त्यांचे अमलाखालीं सुमारें ६२५००००० इतकी लोकसंख्या नांदत आहे. व सर्व संस्थानांचें उत्पन्न अजमासें १५०० लक्ष आहे. अशीं हीं लहानमोठीं संस्थानें सुमारें ७०० आहेत. वरील सर्व गोष्टींचा विचार सर्व बाजूंनीं केला तर या संस्थानांची उपेक्षा करण्याइतकी स्थिति नाहीं. सन १८८९ च्या इंटरप्रिटेशन ॲक्टप्रमाणें पाहिलें असतां "इंडिया" या शब्दाची जी व्याख्या केली आहे त्यावरून गव्हर्नर जनरल यांचे प्रत्यक्ष हुकमतीखालील अगर देशी संस्थानिकांचे ताब्यांतील जो मुलूख नांदत असेल त्या सर्वांचा "इंडिया" या सदराखालीं समावेश केला आहे. त्यावरून आपल्या ध्यानांत आलें असेल कीं सर्व हिंदुस्थानचे भागास हा शब्दप्रयोग लावला आहे. म्हणजे संस्थानी मुलूख त्यांतून आपल्यास वगळतां येत नाहीं. तेव्हां संयुक्त हिंदुस्थानाची भावी रूपरेषा आंखीत असतांना संस्थानांची स्वतंत्रता कशी राखली जाईल असा प्रश्न विचारणारे बरेच हितचिंतक व इतर टीकाकार आपल्यास भेटतील. त्यांतलेत्यांत संस्थानें हीं ब्रिटिश मुलखाचे विरुद्ध आहेत असें प्रतिपादन करणारे आमचें शत्रू संस्थानांचें भवितव्य अमूक एक प्रकारचें होईल याबद्दल जीं कारणें दाखवितात तीं सुद्धां न पटणारीं आहेत. लॉव्हेट फ्रेझर आपल्या India under Curzon and After या पुस्तकांत असें प्रतिपादन करतात कीं "राजे महाराजे हे आपल्या राजवाड्यांत स्वस्थ बसून आपल्या राज्यकारभारांत कांहींच न करतां बसतील असें वाटत नाहीं. तसेंच ब्रिटिश अधिकारी व व्हॉईसराय हे त्यांचा पाठपुरावा

करणारे असले तरी त्यांच्या हातांतील सर्व सत्ता जाऊन हिंदुस्थानांतील कायदे-पंडित, वकील व शाळा मास्तर यांचे हातीं ती सत्ता जाईल असें कांहीं वाटत नाहीं. तसेंच पाश्चात्य राज्यघटनेप्रमाणें आपल्या संस्थानचा कारभार लोकमतानुवर्ती मंत्रिमंडळाकडे सोंपवितील असा काळ येईल असेंही वाटत नाहीं." अशा प्रकारचे उद्गार आपल्यास वाचावयास मिळतात. अडाणी प्रजेची अशा भाषणानें दिशाभूल होईल. परंतु संस्थानांची प्रस्तुतची स्थिति ज्यांना माहित आहे त्यांना मात्र अशा लिहिण्याचा फोलपणा तेव्हांच दिसून येतो. उईल्यम हंटर आपल्या "Indian Empire" या पुस्तकांत पुढील-प्रमाणें लिहितात "हिंदुस्थानच्या सुमारें ⅓ भागावर अद्याप संस्थानिकांचा अंमल चालत आला आहे व इंग्रजी राजसत्तेनें संस्थानिकांची इज्जतही आज-पर्यंत राखिली आहे. या इंग्रजी सार्वभौम सत्तेनें या संस्थानांशीं जे करार-मदार केले आहेत त्यांत संस्थानिकांनीं आपआपसांत लढाया करूं नयेत अगर पर-राष्ट्रीय राजकारण बांधूं नये असें स्पष्ट म्हटलें आहे. तसेंच एकाद्या संस्थानाधिपतीचें वर्तन **आपल्या प्रजेशीं** जुलमी होईल त्याला बंधन घालण्याचे किंबहुना गादी-वरून काढण्याचें कारण पडल्यास त्यास काढतां येईल असेंही त्यांत नमूद आहे. यावरून त्यांची स्वतंत्रता कोणत्या दर्जाची आहे हें ध्यानांत येईल." प्रोफेसर वेस्टलेक आपल्या सार्वजनिक आंतरराष्ट्रीय कायद्यामध्यें असें प्रतिपादतो कीं "या संस्थानिकांना एकमेकांशीं राज्यकारभारासंबंधीं प्रश्नांचा ऊहापोह करतां येत नाहीं अगर साम्राज्याबाहेरील कोणत्याही परराष्ट्रीय राजसत्तेशीही पत्रव्यवहार करतां येत नाहीं. त्यांना कलकत्ता येथें ( हल्लीं दिल्ली ) आपले प्रतिनिधी पाठ-वितां येत नाहींत व पाठवावयाचे असतील तर रेसिडेंटामार्फतच ब्रिटिश राजसत्तेशीं पत्रव्यवहार करणें जरूर आहे. तसेंच एक्स्ट्राडिशन कायद्या-संबंधीं संस्थाना-संस्थानांत कांहीं कायदे करून एकमेकांचे कैदी वगैरे देतां येत नाहींत. हल्लींच्या पद्धतीप्रमाणें म्हणजे ब्रिटिश सरकारनें कायदे करावयाचे व ते उभय संस्थानांनीं ( ज्यांचेमध्यें रेसिप्रॉसिटी व्हावयाची असते ) मान्य केल्यानंतर एक्स्ट्राडिशनचे कायदे अमलांत आणावयाचे, तसेंच अखिल संस्थानांच्या हिताच्या दृष्टीनें कांहीं विचार करणें त्यांना ( संस्थानिकांना ) योग्य व जरूर वाटल्यास एकत्र जमतां येत नाहीं. प्रत्येक संस्थानानें आप-आपली बाजू निरनिराळी स्वतंत्रच मांडली पाहिजे. परराष्ट्रीय व्यापारी एजंटांशीं

कांहीं करारमदारसुद्धां अगोदर हिंदुस्थान सरकारची परवानगी घेतल्या-वांचून करतां येत नाहीं अगर बिगर हुकुमानें त्यांच्याशीं पत्रव्यवहा-रही करतां येत नाहीं. त्यांना हिंदुस्थान सरकारच्या परवानगीशिवाय परराष्ट्राकडून आलेले मानमरातब अगर पदव्या स्वीकारतां येत नाहींत तसेंच आपल्या प्रजाजनाखेरीज दुसऱ्या लोकांना पदव्या देतां येत नाहींत. तसेंच अमेरिकन अगर इतर युरोपियनांस ब्रिटिश राजसत्तेच्या हुकुमाशिवाय आपल्या संस्थानांत नोकरीस ठेवतां येत नाहीं. या वरील सर्व विवेचनावरून संस्थानांची स्वतंत्रता कशा प्रकारची आहे हें ध्यानीं आलेंच असेल. तेव्हां भावी स्वराज्यांत त्यांची सर्व स्वतंत्रता लुबाडून घेतली जाईल असें म्हणणें अगदींच निराधार आहे हें आपल्यास समजेल. परकी राजसत्तेबरोबर आपलें स्वत्व गमावून त्यांच्या सैन्याच्या पाठिंब्यावर हे आमचे संस्थानिक हल्लीं जर रहात आहेत तर भावी स्वतंत्र अशा हिंदुस्थानाचे स्वराज्यघटनेंत ते कां नांदूं शकणार नाहींत हें मला कळत नाहीं. परकीसत्तेंत जर नांदूं शकतात तर त्यांच्याच जातीच्या लोकसत्ताधारी जनतेंत ते कां राहूं शकणार नाहींत ? कित्येक संस्था-निकांनीं आपण ब्रिटिश मुलखांतील प्रजेच्या ज्या इच्छा आकांक्षा आहेत त्यांच्याशीं आमचा विरोध नाहीं असें बोलून दाखविलें आहे. तेव्हां ते आमचे बरोबर सुखानें नांदूं शकतील असें वाटतें. ब्रिटिश मुत्सद्दी त्यांचा योग्य तो मान भावी स्वराज्यकाळांत राखतील अशी खात्री वाटते. कांहीं जरी असलें तरी हल्लीं संस्थानांत कशा प्रकारची राजसत्ता आहे हें पाहणें जरूर आहे. संस्थानांत वैयक्तिक राजसत्तेचा पगडा आहे ही गोष्ट नाकबूल करतां येणार नाहीं. इंपीरियल गॅझेटकारांचेंही मत याप्रमाणेंच आहे. हिंदुस्थानांत जीं निरनिराळीं संस्थानें अस्तित्वांत आहेत त्यांकडे जर नजर फेकली तर त्यांत एकच प्रकारची राजसत्ता नांदत असलेली आपल्यास दिसून येईल. मग तीं संस्थानें प्रागतिक असोत अगर रानटी स्थितींत असोत, अगर सुधारणेच्या मार्गावर असोत. वैयक्तिक राजसत्ता ही मूलभूत सत्ता त्या ठिकाणीं नांदत आहे व संस्थानांतील न्यायकोर्टें व कायदे यांवर त्यांची अबाधित व अनियंत्रित सत्ता असते हें आपल्यास कबूल केलें पाहिजे. या वैयक्तिक राजसत्तेचे कांहीं फायदे असतील, परंतु तोटेही तितकेच आहेत ही गोष्ट अगदीं निःसंशय आहे. कारण सर हेन्री लॉरेन्स यांनीं बऱ्याच वर्षांमागें जे उद्गार

काढले आहेत ते आजमितीसही खरे आहेत. ते एके ठिकाणीं म्हणतात, " जर कधीं कोठें अव्यवस्था व अराजकता जबाबदार अधिकाराच्या जोरावर नांदत असलेली पाहणें असेल तर ती हिंदीसंस्थानिकांच्या राजधानींत पाहण्यास मिळेल आणि ती ब्रिटिश रेसिडेंटच्या नजरेखालीं व ब्रिटिश सैनिकांचे संगिनीचे जोरावर नांदत असलेली पाहणें म्हणजे खरोखरीच गमतीची गोष्ट आहे. " वरील स्थितीचा पाठपुरावा सर जॉन स्ट्रॅची यांनींही केला आहे. " कोणत्याही प्रागतिक संस्थानिकाची गोष्ट घ्या. त्याच्या एकट्याच्या हातांत आपल्या जनतेचें बरें वाईट करण्याची अनियंत्रित सत्ता एकवटलेली दिसेल. परराष्ट्राकडून उपसर्ग न पोंहचूं देण्याची ब्रिटिश सरकारनें हमी घेतली आहे. त्याला स्वसंरक्षणाकरतां सैन्य ठेवावें लागत नाहीं. फक्त आपल्या संस्थानांत दंगाधोपा होऊं नये एवढाच बंदोबस्त टेवण्याकरतां जे कांहीं आडहत्यारी सैनिक ठेवावे लागतील तेवढेच. अधिकार अनियंत्रित असल्यानें पैसे उकळण्याचे त्याचेजवळ अनंत मार्ग आहेत. ब्रिटिशसरकारनें ब्रिटिश प्रजाजनांच्या सोईकरितां रेल्वे व इतर जीं लोकोपयोगी कामें केलीं आहेत त्यांचा संस्थानिकांना एक पैसाही न खर्च करतां फायदा घेतां येतो, तसेंच ब्रिटिश सरकारला राज्यकारभाराचे दृष्टीनें जशी सर्व बाजूंनीं अडचण सोसावी लागते तशी यांना सोसावी लागत नाहीं. जर एकादा संस्थानिक न्यायी आणि उदात्त विचाराचा व आपल्या पूर्वजांच्या धवल कीर्तीस पूज्य मानणारा असेल तर तो खरोखरीच आपलें संस्थान सुधारणेचें आगर करील, पण त्याबरोबर हेंही पण लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, या एकतंत्री अमलाबरोबर निरनिराळे मोहही आहेत. आणि या मोहांना तो बळी पडला तर इतरत्र या एकतंत्री व अनियंत्रित राजसत्तेचे जे वाईट परिणाम दिसून येतात ते सर्व त्यांचे संस्थानांत दृग्गोचर होतील. " लोव्हेट फ्रेजर हा एक निराळेंच दृश्य आपल्यापुढें मांडीत आहे तेंही लक्षांत ठेवण्यासारखें आहे. तो म्हणतो " कांहीं संस्थानिक हिंदुस्थानचा किनारा देखील सोडीत नाहींत तर कांहीं आपल्या संस्थानची हद्द सुद्धां ओलांडून जात नाहींत, तर याचे उलट कांहीं संस्थानिक वरचेवर परदेशीय प्रवासास जात आहेत. या परदेशाच्या सफरीवर मागचा पुढचा विचार न करतां व आपल्या रयतेच्या पैशाकडे न पाहतां बेगुमानपणें हे राजेलोक पैसा पाण्यासारखा खर्च करीत आहेत. " यावरून त्याचे म्हणण्याचा आशय ध्यानांत येईल.

माझ्या स्वतःच्या अनुभवावरून या वैयक्तिक राजसत्तेचा दोष कसा असूं शकतो हें एक उदाहरण घेऊन मांडण्याची परवानगी घेतों. मी पदुकोटा संस्थानांतून या प्रांतांत आलों. त्या संस्थानचे अधिपति आज कित्येक वर्षें आपल्या संस्थानांतून जे एकदां परदेशीं गेले आहेत ते आजपर्यंत तेथें आले नाहींत. रयत कशी आहे, काळी आहे किंवा गोरी आहे हेंही त्यांस माहीत नाहीं व तसेंच रयतेस अधिपतींचीही ओळख नाहीं ! आपल्यास माहीत आहे कीं कांहीं वर्षांमागें त्यांनीं आपण होऊन राजसंन्यास केला आणि आपल्या भावास तेथील रीजंटही नेमलें आहे. या राजसंन्यासाकरतां त्यांस संस्थानाच्या तिजोरींतून २० लाख रुपये रोख देण्यांत आले. मजा ही कीं या संस्थानचें उत्पन्न सुद्धां इतकें नाहीं. यावरून बेजबाबदारास्थिति किती व कोठपर्यंत जाऊन पोंहचली आहे हें ध्यानांत येईल. जरी आज ते आपल्या संस्थानच्या कारभाराकडे ढुंकून पाहत नाहींत तरी त्यांच्या खासगीकडे पूर्ववत् खर्च चालू आहेतच. या सर्व बाबींचा विचार केला असतां संस्थानांत कोणच्या सुधारणा करणें आतां अगदीं जरूर आहे याचा विचार केला पाहिजे. एकाच शब्दांत सांगावयाचें म्हटलें तर वैयक्तिक राजसत्तेच्या ऐवजीं कायद्याचें राज्य सर्व संस्थानांत एकदम सुरू झालें पाहिजे. खालील सुधारणा संस्थानांत जारी कराव्यात असें आमचें मत आहे.

( १ ) संस्थानिकांचें खासगी उत्पन्न व संस्थानचें उत्पन्न यांत कायमचा भेद करून खासगी उत्पन्न ठरवून घेणें जरूर आहे व तें तसें एकदां ठरवून घेतल्यावर बाकीच्या उत्पन्नाचा विनियोग संस्थानांत विद्यमान असलेल्या अधिकाऱ्यांनीं प्रजेच्या हिताकडेसच केला पाहिजे.

( २ ) कायदेकानू, हक्क, वहिवाट संस्थान मजकुरीं चालू असतील त्यांत फेरबदल बिलकूल होतां कामां नये. जर फेरबदल करणें असेल तर कायदेमंडळांच्या अनुमतीनें तसा फेरबदल करण्यांत यावा.

( ३ ) संस्थानांत स्वतंत्र न्यायकोर्टें स्थापून लोकांना न्याय अगदीं निःपक्षपातानें मिळेल अशी तजवीज होणें जरूर आहे.

( ४ ) जमिनीचा सारा जो वसूल करावयाचा असतो तो ठराविक नियमानें वसूल करण्यांत यावा, जमिनीवरील लोकांचे हक्क एकदां निश्चित

स्वरूपाचे ठरवून ते पाळण्यांत यावे. कायद्यानें जो दंड अगर कर वसूल करणें असेल तो करण्यांत यावा व जमिनीवर निराळा कर लादूं नये.

( ५ ) संस्थानच्या एक्झिक्यूटिव्ह मंडळाच्या कारभारांत संस्थानाधिपतीनें स्वतः कांहीं ढवळाढवळ करूं नये. लोकमतानुवर्ति कायदे मंडळास जबाबदार अशा दिवाणांच्या हातीं एक्झिक्यूटिव्ह खात्याचा अधिकार देण्यांत यावा.

( ६ ) व्यक्तिस्वातंत्र्य, भाषणस्वातंत्र्य, वगैरे सारखे जे नागरिकांचे नैसर्गिक हक्क आहेत त्यांची पायमल्ली करण्यांत येऊं नये. तसेंच आपआपल्या धर्माप्रमाणें ज्यानें त्यानें आपल्या देवदेवतांची पूजाअर्चा करावी. त्यावर कोणत्याही तऱ्हेचें नियंत्रण असतां कामा नये.

वरील सुधारणा संस्थानिकांनीं आपल्या संस्थानांत केल्या तर संस्थानी प्रजेची त्यांना भीति बाळगण्याचें कारणच नाहीं. संस्थानाधिपतींच्या मर्जीप्रमाणें वाटेल तसे चाळे संस्थानी प्रजाजन पुरवणार नाहींत हें अगदीं खरें आहे; तरी संस्थानाचा कारभार चांगला कार्यक्षम व्हावा एतदर्थ ते योग्य प्रयत्न खात्रीनें करतील असें वाटतें. संस्थानाधिपतीस आपल्या कर्तव्याची योग्य जाणीव आहे व तो खराच कर्तबगार व निश्चयी आहे अशी प्रजाजनांची खात्री झाल्यास संस्थानी प्रजाजन त्याच्या क्षेत्रास वाव देतील अशी खात्री आहे.

संस्थानिकांचे जे जानीदोस्त आहेत ते सुद्धां संस्थानांत संस्थानिकांनीं चालविलेल्या राज्यकारभारांसंबंधानें नाकें मुरडतात व ही स्थिति कायमची टिकणारी नाहीं असाही इषारा देतात. संस्थानिकांचे अत्यंत जिव्हाळ्याचा कळवळा बाळगणारे माजी व्हॉईसरॉय लॉर्ड कर्झन यांनीं सुद्धां एके ठिकाणीं त्यांना स्पष्ट बजावलें आहे. तें लक्षांत घेतलें असतां त्यांची कल्पना आपल्यास समजून येईल. ते म्हणतात, “संस्थानाधिपतीवर आपल्या प्रजेसंबंधानें एक प्रकारची जबाबदारीही आहे गोष्ट वेळ आली असतां मी नेहमीं त्यांचे मनावर ठसवीत असतों. हे करणें म्हणजे निवळ औपचारिक नव्हे व त्यांचीं संस्थानें कायम राहावीं याचकरतां नव्हे अगर हल्लीं जशी स्थिति आहे तशीच अतएव चालू असावी म्हणून नव्हे तर त्यांच्यावर संस्थानाधिपति म्हणून जी मोठी जबाबदारी आहे ती पार पाडण्याचें त्यांनीं आपण होऊनच करावें म्हणूनच होय.

ज्या वेळीं ब्रिटिश हिंदुस्थानांत एकादी आक्षेपार्ह गोष्ट होते तेव्हां जनते-कडून त्याबद्दल टीकेचा भडिमार होतो व तो सहन करणें भाग पडतें. तशीच गोष्ट संस्थानांतील कामकाजाबद्दल आहे. ते सुद्धां अशा तऱ्हेच्या टीकेच्या सपाट्यांतून सुटतील असें मात्र त्यांनीं केव्हांही समजतां कामा नये. जी स्थिति ब्रिटिश इंडियाची तीच स्थिति संस्थानांची तेव्हां संस्थानिकांना त्यांनीं आपल्या संस्थानांत लोकमतानुवर्ती राज्यपद्धति सुरू करावी अशी मनापासून जर विनंती करतों. त्यांचा कारभार लोकमतानुवर्ती अगर लोकहितैषि झाला नाहीं तर संस्थानाधिपतींना गादीवर असण्याचे कांहींच कायदेशीर हक्क नाहींत. पूर्वींचे संस्थानाधिपति तसेच कर्तबगारीचे होते. त्यांनीं लोकांकरतां आपल्या जीविताची आहुती दिली व म्हणूनच ते अधिपति म्हणून राहण्यास लायक होते. केवळ ब्रिटिश सरकारच्या संगिनीचे बळावरच हीं संस्थानें व त्यांचे अधिपति हे स्थिरावले आहेत असें मी जें म्हणतों त्याचें कारण आप-ल्यास समजून येईल. ही स्थिति स्वतः संस्थानाधिपतींस व त्यांचे प्रजाजनांस सर्वथैव कमीपणा आणणारी आहे असें मला वाटतें. ब्रिटिशसरकारशीं अगर आपसांत कलह करण्याचें अगर दोन हात करण्याची वेळ आतां पार निघून गेली आहे. हल्लींचा काळ म्हणजे वैयक्तिक कल्पनांप्रमाणें राज्याधिकार हाकण्याचा नसून पुष्कळांचें हित कशाप्रकारचें आहे व लोकांची इच्छा काय आहे हें सम-जावून घेऊन राज्याधिकार चालविण्याचा आहे हें लक्षांत घेऊनच काम चाल-विलें पाहिजे.

दुसरी महत्त्वाची गोष्ट म्हटली म्हणजे भावी हिंदी स्वराज्याच्या घटनेंत संस्थानांचें भवितव्य काय होणार ही होय! माझ्या मतें ब्रिटिश मुत्सद्दी हल्लीं जशी संस्थानांची स्थिति आहे तशीच कायम ठेवण्यास झटतील. कारण संस्थानाधिपति हे त्यांच्या धोरणाचा पाठपुरावा करणारे आहेत. लॉव्हेट फ्रेझर एके ठिकाणीं म्हणतो " हिंदुस्थानांतील राजेरजवाडे व साम्राज्यसरकार यांचे हितसंबंध एकजीवी व समानत्वाचे आहेत. हल्लीं आहे तशीच स्थिति कायम रहावी म्हणून दोघेही आपआपल्या परीनें झटत आहेत. लोकमतानुवर्ती जर राज्यकारभार चालविला तर आपला नाश खात्रीनें होईल असें त्यांना वाटत आहे. ब्रिटिश सरकारच्या राज्यकारभाराचें जर यदाकदाचित उच्चाटन झालें तर माझ्या मतें एक दोनच संस्थानें शिल्लक राहतील. संस्थानाधिपतींची नितांत

राजनिष्ठा हा एक ब्रिटिश साम्राज्यसत्तेला शेवटचा पण महत्वाचा आधार आहे." यावरून आपल्यास उभयतांची मनःस्थिति कशी आहे याची चांगली कल्पना येईल व स्वराज्याच्या मार्गांत खरा अडथळा कसा येईल, हेंहि ध्यानांत येईल. लॉर्ड कॅनिंग म्हणतात, "आम्ही राजकारणाचे वादळांत सांपडलों असतां या संस्थानाधिपतींचा आम्हांत पाठपुरावा नसता तर खात्रीनें वाहूनच गेलों असतों." यावरून आपल्यास सर्व कळून येईल. तेव्हां लोकमताचा वारा कोणत्या दिशेस वाहात आहे याची जाणीव मनांत ठेवून हिंदुस्थानच्या भावी स्वराज्याचे बाजूनें प्रयत्न जे करीत आहेत त्यांच्या मार्गांत विघ्न न उपस्थित करतां त्यांचे बरोबरच प्रयत्न करणें हें संस्थानाधिपतींस सर्व दृष्टीनें हितावह आहे असें माझें मत आहे. कारण कालाचा ओघ कोणीहि थांबवूं शकत नाहीं. तरी पण संस्थानांच्या भवितव्यतेचा प्रश्न शिल्लक राहतोच. जीं लहान लहान संस्थानें आहेत त्यांचा समावेश सर्व दृष्टीनें जवळच्या ब्रिटिश प्राव्हिन्सेसमध्यें माझ्या मतें करावा. पण ही गोष्ट मी त्यांचे वरच सोंपवितों. त्यांना निराळेंच राहून आपला राज्यकारभार चालवावा असें वाटल्यास भावी गव्हर्नमेंट ऑफ इंडियाचे कायद्यांत त्याप्रमाणें व्यवस्था करतां येईल. व जीं मोठीं संस्थानें आहेत त्यांचा संयुक्त संस्थानें म्हणून एक गट करतां येणें शक्य आहे. मि. पणिकर यांनीं लिहिलेल्या 'संस्थानें व हिंदुस्थान सरकार' या पुस्तकास प्रस्तावना लिहितांना लॉर्ड ऑलिव्हर यांनीं पुढील उद्गार काडले आहेत. ते म्हणतात "हिंदुस्थानास वसाहतींचें स्वराज्यदान देतांना एकतंत्री व अनेकतंत्री अशा दोन घटना करणें जरूर पडेल. हिंदुस्थानच्या एकंदर परिस्थितीबद्दल विचार केल्यास कांहीं बाबी संस्थानिकांस व साम्राज्यसरकारास सारख्याच लागू आहेत त्यांत महत्त्वाच्या म्हटल्या म्हणजे देशाचें संरक्षण, रेल्वे, पोस्ट व अबकारी या बाबी होत. देशाच्या संरक्षणाची जबाबदारी पार पाडण्याकरतां साम्राज्य सरकारनें जी योजना केली आहे व जी अमलांत आहे ती सर्व बाजूंनीं योग्य आहेच. त्याचा आज विचार करण्याचें कारण नाहीं. या दोहोंकडे लागू असणाऱ्या बाबींची जी व्यवस्था हल्लीं साम्राज्य सरकारकडे आहे तीच व्यवस्था हिंदुस्थानांत उदय पावणाऱ्या संयुक्त संघाच्या राष्ट्रीय सरकारकडे देणें कालानुक्रमानें प्राप्त होईल. निराळ्या शब्दांत म्हणावयाचें झाल्यास पुढें मागें होणाऱ्या राष्ट्रीय पार्लमेंटच्या एक्झिक्यूटिव्ह खात्याकडेच ही सर्व जबाबदारी जावयाची आहे.

राष्ट्रीय पार्लमेंटच्या घटनेंत संस्थानचा जो मुलूख हल्लीं ब्रिटिश प्राव्हिन्सेसलगत आहे तेथील संस्थानीप्रजेच्या मानानें व संस्थानांच्या मानानें, त्याच्या प्रमाणांत प्रतिनिधींना आपली बाजू मांडण्यास वाव मिळेलच. वरील प्रकारचे घटनेकडे जे अधिकार सोंपविण्यांत येतील त्याव्यतिरिक्त इतर अधिकार प्रांतांच्या कायदेमंडळांकडे सोंपविण्यांत येतील."

हिंदुस्थानांत जीं संस्थानें अस्तित्वांत आहेत त्यांच्याकरतां एक सर्व साधारण घटना असावी अशाबद्दलचे प्रयत्न मागें झालेच आहेच. परंतु ते मर्यादित स्वरूपाचे आहेत. १९२१ च्या फेब्रुवारी महिन्यांत नरेन्द्रमंडळाच्या उद्घाटन-समारंभाचे वेळीं बादशहांनीं जो जाहिरनामा प्रसिद्ध केला, त्यांत ते म्हणतात: "संस्थानी मुलखासंबंधानें ज्या गोष्टीबद्दल चर्चा अगर धोरण स्वीकारण्यांत येईल त्यासंबंधानें आमचे व्हाईसरॉय त्याबाबत खुल्या दिलानें संस्थानाधिपतींच्या या घटनेशीं चर्चा करतील; संस्थानी मुलुख व ब्रिटिश मुलुख यांच्या हितसंबंधाच्या बाबींबद्दल अगर साम्राज्याच्या प्रश्नाबद्दल चर्चेंत ते भाग घेतीलच. संस्थानिकांच्या अंतर्गत बाबीसंबंधानें अगर संस्थानिकांसंबंधानें अगर संस्थानें व ब्रिटिश सरकार यांचेमध्यें जें त्यांचें वैयक्तिक नातें आहे त्यासंबंधानें झालेल्या चर्चेंत ते कांहींएक भाग घेणार नसून त्यांच्या वैयक्तिक प्रश्नाचा विचार साम्राज्यसरकार करील त्यासंबंधानें ते जें आपलें प्रामाणिक मत प्रतिपादितील त्याबद्दल त्यांच्या मार्गांत अडचणीही आणणार नाहींत. "चेंबर ऑफ प्रिन्सेस" ही संस्था तुमच्यापैकीं जीं मोठीं संस्थानें आहेत त्यांना मान्य नाहीं व ते याकडे हल्लीं पहात सुद्धां नाहींत. यावेळीं खालसा मुलखांतील प्रांतांत ज्या सुधारणा होत आहेत त्याबरहुकूम तुम्ही आपापली सुधारणा करा व त्या करतांना अमुक अमुक तुम्हीं केलें पाहिजे अशा तऱ्हेचे निर्बंध मी आज कांहींच घालीत नाहीं. हिंदुस्थानच्या स्वराज्याच्या घटनेसंबंधानें राष्ट्रीय कांग्रेसनें जशी कमिटी नेमली आहे त्याप्रमाणें एक कमिटी नेमून आपल्या मंडळाची घटना कशी असावी याचा विचार करा. व ती राष्ट्रीय काँग्रेसच्या घटनेशीं जर विसंगत नसेल तर तिचाही योग्य विचार करण्यास हरकत नाहीं.

माझें म्हणणें मीं आतांपर्यंत थोडक्यांत सांगितलें आहे; पण एका मुद्याचा विचार करणें अगदीं जरूर आहे. तो म्हणजे "वारसाहक्काचा" होय.

सन १८८४ मध्यें हिंदुस्थान सरकारनें आपलें म्हणणें यासंबंधानें काय आहे याबद्दल खुलासा केला आहे. " संस्थानिकांनीं जरी दत्तक घेतला आणि त्यांस हिंदुस्थान सरकारची जर संमति मिळाली नाहीं तर तो गादीस कायदेशीर वारस ठरत नाहीं." याचाच अनुवाद सन १८९१ सालीं सेक्रेटरी ऑफ स्टेटनीं केला आहे; पण शब्द मात्र निराळे आहेत. " गादीवर येणाऱ्या प्रत्येक वारसास जर हिंदुस्थान सरकारची संमति नसेल तर तो कायदेशीर अधिपति म्हणून समजला जाणार नाहीं." दत्तकाची परवानगी प्रत्येक संस्थानिकास आहेच व त्याप्रमाणें संस्थानाधिपतींना सनदा लॉर्ड कॅनिंग यांनीं दिल्याच आहेत. हिंदुधर्मशास्त्राप्रमाणें हिंदी राजघराणीं सरळ वारसा असेल तरच तीं राहावयाचीं असें नाहीं तर धर्मशास्त्राप्रमाणे ते ज्यांना दत्तक घेतील त्याकडेच चालावयाचीं असें आहे. महंमदी धर्माप्रमाणें जीं संस्थानें असतील त्यांना त्यांचें संस्थान चालेल म्हणून हमीही देण्यांत येऊन त्यांच्या शास्त्राप्रमाणें जो कायदेशीर वारस असेल त्याचा हक्क मानण्यांत येतच आहे. याचा उल्लेख करण्याचें कारण इतकेंच कीं, हल्लीं पदुकोटा संस्थानच्या वारसा हक्काबद्दल जो प्रश्न उपस्थित झाला आहे त्याचा विचार येथें व्हावा म्हणून मी करीत आहें. पदुकोटा संस्थानांत यासंबंधानें जो. घोटाळा उत्पन्न झाला आहे तसा घोटाळा पुढें मागें इतर संस्थानांत होणें शक्य आहे म्हणूनच याचा विचार करणें जरूर आहे. पदुकोटाच्या अधिपतींनीं एका ऑस्ट्रेलियन बाईशीं विवाह केला आहे. ती अर्थात् हिंदु नाहीं. तिच्यापासून झालेला पुत्रही हिंदु ठरत नाहीं किंवा मिताक्षराप्रमाणें तो दासीपुत्रही ठरत नाहीं. म्हणून हिंदुधर्मशास्त्राप्रमाणें तो गादीचाही वारस होऊं शकत नाहीं. आणि या पुत्रास वारसा म्हणून जर ब्रिटिश राजसत्तेनें अनुमति दिली तर हिंदु संस्कृतीस एक जबरदस्त धक्का बसून सर्वत्र अनवस्था प्राप्त होईल. असें झालें तर नाहिंदुर्न यवनः अशांस अगर कोणत्याही लुंग्या सुंग्यास गादीचे अधिकार प्राप्त होतील. पदुकोटाच्या प्रजाजनांस हें करणें संमत होणार नाहीं. हिंदुस्थानांतील एका प्रमुख हिंदु राजघराण्यामध्यें अशी स्थिति व्हावी अशी प्रजाजनांची मुळींच इच्छा नाहीं. संस्थानांत सर्वतोपरी जुलूम असल्यानें प्रजेचें म्हणणें पुढें मांडण्यास वावच नाहीं व अधिकारी तसें होऊं देऊं इच्छित नाहींत. म्हणून मी याचा उल्लेख आज येथें करीत आहें. तसेंच पदुकोटा दरबारच्या व हिंदुस्थान सरकारच्या अधिकाऱ्यांस

मी अशी विनंति करतों कीं, त्यांनीं या बाबतींत लोकांची इच्छा काय आहे व ती न्याय्य आहे किंवा नाहीं याचा विचार करून मग या बाबतींत त्यांना काय जें धोरण स्वीकारावयाचें असेल तें त्यांनीं स्वीकारावें. असो.

आमच्या हितशत्रूंना अगर उघड उघड शत्रूंना संमत असो अगर नसो, हिंदुस्थानास लौकरच स्वातंत्र्य मिळेलच. हिंदुस्थानास स्वराज्य मिळावें म्हणून आम्ही व आमचे संस्थानिक उभयतांनीं प्रयत्न करावेत असें माझें म्हणणें आहे. तसें झालें असतां हिंदुस्थानास स्वराज्य खात्रीनें लौकरच मिळेल. अलवारच्या महाराजांनीं पुढील उद्गार काढलेले आहेत " हिंदुस्थानांत जीं संस्थानें आहेत त्यांचा विचार करतां अखिल भारताच्या हिताच्या दृष्टीनें हिंदुस्थानचा एक **संयुक्तहिंदुस्थान** म्हणून एक संघ बनावा अशी माझी इच्छा आहे, या संघांत अर्थात् जिल्ह्यांचा, प्रांतांचा, संस्थानांचा व पर्यायानें अखिल भारताचा समावेश होणारच. तेव्हां प्रत्येक घटकानें आपल्या संस्कृतीस, धर्मास व ऐतिहासिक परंपरेस साजेल अशी कृति करून आपल्या ज्ञानानें, अनुभवानें श्रमानें अखिल भारताचा दर्जा कसा वाढेल याचा विचार करून कार्यास लागलें पाहिजे. माझ्या मतें दिल्ली येथें सर्वस्वी लोकनियुक्त व लोकमतास जबाबदार असें पार्लमेंट स्थापन होणें जरूर आहे. त्या पार्लमेंटांत संस्थानांतर्फे प्रतिनिधी असावे, संस्थानें व अखिल ब्रिटिश हिंदुस्थान यांच्या उपयोगी ज्या बाबी असतील त्यांची चर्चा त्यांत व्हावी. लहान संस्थानांचा एक संघ निर्माण करून प्रत्येक जण मायभूमीचे उद्धाराकरतां सर्वतोपरीनें पुढें यावें असें मला वाटतें. हीच माझी स्वराज्याबद्दलची कल्पना आहे. मी आतां फार वेळ घेऊं इच्छित नाहीं. कारण आपल्यास आतां श्री. **एस. श्रीनिवास अयंगार** यांच्या आधिपत्याखालीं जें अधिवेशन आतां सुरू होणार आहे तें पाहाण्यास आपण अगदीं उत्सुक आहों. तेव्हां आपण सावधान चित्तानें त्यांचें भाषण ऐकावें. त्यांच्या सारख्याचे मायभूमीचे उद्धाराकरतां प्रयत्न किती झाले व त्यांची बुद्धिमत्ता किती अगाध आहे व वकील म्हणून त्यांची योग्यता किती आहे आणि त्यांच्या देखरेखीखालील हें अधिवेशन कसें पार पडेल वगैरेबद्दल तर्क करण्याची जरूरीच नाहीं. तें आपल्यास कळून येईल. असो. आपले सर्वांचे प्रयत्न सर्वतोपरी यशस्वी होवोत अशी प्रार्थना करून मी आपली रजा घेतों.

**वंदेमातरम्.**

## अध्यक्ष दे. भ. श्री. श्रिनिवास अयंगार

# यांचें भाषण.

टाळ्यांच्या गजरांत रा. श्रीनिवास अयंगार म्हणाले—ह्या परिषदेचा विषय माझ्या परिचयाचा फार दिवसांपासून आहे व हिंदुस्थानच्या स्वराज्यविषयक चळवळींत, ह्या संस्थानी प्रजेची सुस्थिति आणण्याची खटपट करणाऱ्या पुढाऱ्यांचा व माझा परिचय पण चांगला झाला आहे. शिवाय स्वराज्यघटनेचा विचार करतेवेळींही ह्या गोष्टीचा मला अभ्यास करावा लागला आहे. रा. सत्यमूर्ती ह्यानीं आपलें विस्तृत व माहितीपूर्ण भाषण वाचून दाखविलें व त्याचें महत्त्व, त्यांचा त्या विषयाचा व्यासंग माझ्यापेक्षां जास्त असल्यामुळें विशेष आहे. जेव्हां त्यांना पकडण्याविषयीं पदुकोटा संस्थाननें वारंट काढलें आहे असें मीं ऐकलें तेव्हां मला फारच अश्चर्य वाटलें ( धिःकार ) ते कांहीं लोडातक्याशीं टेकणारे पुढारी नाहींत कीं सरकारास त्यांचेविषयीं कांहीं वाटू नये. त्यांचे स्वभावानुसार सणसणित असें त्यांचें भाषण झालें आहे. आपल्या भाषणांत त्यांनीं महत्त्वाचे मुद्दे पुढें आणले आहेत व त्यांच्यावर आपल्याला जोर दिला पाहिजे व या दृष्टीनें पाहतां आजची माझ्यावरची जबाबदारी त्यांनीं बरीच हलकी केली आहे. दि. ब. रामचंद्रराव ह्यांनीं सुद्धां आपल्या अनुभवाचा व व्यासंगाचा फायदा अलीकडे ह्या बाजूस लावला आहे.

मला फक्त दोनच गोष्टींवर जोर द्यावयाचा आहे. हिंदुस्थानचें स्वातंत्र्य अगदीं पूर्ण राष्ट्रीय स्वातंत्र्य व राष्ट्रीय एकी. ह्याच दोन गोष्टींकरितां मी प्रयत्न करणार आहें व उभा आहें. गोहट्टी येथें केलेल्या अध्यक्षाच्या भाषणांत ह्याचसंबंधीं मी बोललों आहें; ह्यासंबंधीं मी चांगला व्यासंग केला आहे व माझें पूर्ण मत झालें आहे कीं इंग्रजी हद्दींतील प्रजाजन व संस्थानी प्रजा ह्यांत वास्तविक कांहींच फरक नाहीं. मला ' सब्जेक्टस् ' ( हाताखालीं किंवा ताब्यांत मग तो हिंदुस्थानच्या प्रजेसंबंधीं असो किंवा संस्थानी प्रजेसंबंधीं असो ) हा शब्दच अगदीं आवडत नाहीं. ते फक्त स्वतंत्र राष्ट्राचे प्रतिनिधी आहेत. ( ऐका ) मी तुम्हाला हा शब्द अगदीं विसरण्यास सांगणार आहें व त्यांनीं अगदीं तसें केलें पाहिजे.

## इंग्रजी प्रजा व संस्थानें

खालसा हद्दींतील लोकांनीं ह्यापुढें संस्थानी लोकांविषयीं असलेली बेफिकीर वृत्ति सोडून दिली पाहिजे. ह्या लोकांचे बाबतींत आतांपर्यंत अगदीं निष्काळजीपणाचें वर्तन झालें आहे. हें ह्यापुढें सोडून दिलें पाहिजे. जर त्यांनीं ही वृत्ति सोडली नाहीं तर ते स्वराज्यासच लायक नाहींत असें म्हणावें लागेल. उत्तर हिंदुस्थानांतील संस्थानिकांची दानत दक्षिणेंतील संस्थानांपेक्षां फारच खराब आहे. ब्रिटिश हिंदुस्थानांत आतांपर्यंत असा एक गैरसमज वसलेला असे कीं संस्थानी प्रजेवर करांचें ओझें कमी असतें व जातिविषयक भेद नसल्यामुळें दादही पण लौकर लागते, ही कल्पनाच अजीबात सोडली पाहिजे. कित्येक संस्थानांत अद्याप छापखाने नाहींत व असले तरी त्यांचा गवगवा हद्दीबाहेर येत नाहीं. ह्या बाबतींत चळवळ म्हणजे ते सध्या, 'ओ, न, मः' गिरवीत आहेत.

यापुढें या दोन्ही हद्दींतील लोकांत दळणवळण वाढलें पाहिजे. माझी सूचना आहे कीं, आजच्यासारख्या परिषदा केव्हां संस्थानी हद्दींत तर केव्हां बाहेर अशा सारख्या भरविल्या पाहिजेत. संस्थानी राजांना ईश्वरी अवतार मानणें म्हणजे धर्माचा व सत्याचा अपलाप करणें आहे असें माझें मत आहे. मनुस्मृतींत सुद्धां वाईट राजांना गादीवरून काढल्याचीं उदाहरणें दिलीं आहेत. जुन्या धार्मिक भावना ह्या अगदीं अमलांत आणल्या जात असत व त्यामुळें लोकांतही समाधान वृत्ति नांदत होती पण आतां पाश्चात्य संस्कृतीशीं संबंध आल्यावर राजाच्या डोक्यावर धर्माचें गांठोडें बांधणें व जुन्या गोष्टी गिरविणें हें वेडगळपणाचें आहे. ती पूर्वीची आर्य संस्कृति ऊर्जित करणें अगदीं अशक्य आहे. ही स्वतःची एकतंत्री राजशाही व्यवहार्य नाहीं. वेळ अशी आली आहे कीं, इंग्रजी मुलुखापासून धडा घेऊन संस्थानी प्रजेनें आतां आपला असा कांहीं तरी मार्ग निश्चित केला पाहिजे. त्यांनीं मनाचा धडा करून जबाबदार राज्य-पद्धतीची मागणी केली पाहिजे. ठरावक भाषेंत बोलावयाचें म्हणजे जेथें पूर्ण प्रातिनिधिक मंडळ नाहीं तेथें जबाबदार राज्यपद्धतिच असूं शकत नाहीं. शिवाय दुसरें म्हणजे कायदे करण्याची पूर्ण सत्ता असली पाहिजे. कार्यकारी मंडळ हें ह्या प्रातिनिधिक मंडळाला जबाबदार असलें पाहिजे व कार्यकारी मंडळा-वरील विश्वास उडाला कीं त्यांनीं राजिनामे दिले पाहिजेत. अगदीं मूळापासूनच

पूर्ण प्रातिनिधिक पद्धति पाहिजे म्हणजे ती जबाबदार राज्यपद्धति होऊं शकते. भांडवलवाल्यांना पहिल्यांदा अधिकार मिळेल का शेतकऱ्यांना मिळेल हा वाद नाहीं. मतदानाच्या बाबतींत हितसंबंधाचे वाद टाळले पाहिजेत. अगदीं पूर्ण मतदारसंघ हे पाश्चिमात्य देशांत सुद्धां शक्य झाले नाहींत. संस्थानांत स्वतंत्र मतदारसंघ स्थापूं नयेत व जातिभेदांना वाव मिळूं नये. नेमणुकीच्या पद्धतीनें सरकार, प्रजा व शेजारी तिघांचाही तोटा होतो. ज्याला नेमणूक करून घ्यावीशी वाटते तो स्वदेशाभिमानी व सद्‌गृहस्थ म्हणवून घेण्यास अगदीं लायक नाहीं. तिजोरीवर ताबा मिळविला पाहिजे, अगदीं सुरूपासूनच पूर्ण जबाबदार पद्धतीकरितांच त्यांनीं प्रयत्न केला पाहिजे. ध्येय पूर्णपणें समोर ठेवून तें पदरांत जितक्यास तितकें पाडून घेण्याचा प्रयत्न झाला पाहिजे. आंत बाहेर असा मार्ग चोखाळणें धोक्याचें आहे. त्यांना स्वातंत्र्यच पाहिजे तर त्यांनीं स्वार्थत्याग करण्यास सिद्ध झालें पाहिजे व दुःख भोगल्याशिवाय सुख मिळत नाहीं हें ध्यानांत ठेविलें पाहिजे.

## रजवाड्यांचें स्थान.

रजवाड्यांचें स्थान ह्या बाबतींत सांगावयाचें म्हणजे, तें हिंदी ह्याच दृष्टीनें फक्त त्यांना वंशपरंपरागत प्रांताधिकारी व त्यांच्या क्षेत्रांचे अधिकारी येवढेंच क्षेत्र ते कबूल असतील तर तर त्यांना शिल्लक ठेवावें. मला वाटत नाहीं कीं ह्या योगानें कांहीं त्यांचें नुकसान होणार आहे. ह्या संस्थानांचें एकीकरण करणें बरें होईल असें मला वाटतें. व इंग्रजी हद्दींतील इतर प्रांतांबरोबर त्यांची व्यवस्था व्हावी. सर्व हिंदुस्थानाकरितां ' हिंदी ' येवढेंच राष्ट्रीय नामाभिधान असावें. सध्यां जरी अवघड वाटत असलें तरी पुढें मागें संस्थानी प्रजाजन व खालसांतील लोक ह्यांत फारसा भेद राहणार नाहीं अशी माझी पूर्ण खात्री आहे. इकडे काय किंवा तिकडे काय उगीच अधिकाऱ्यावर चिखल उडविणें मला बरें वाटत नाहीं. हिंदी अधिकाऱ्यांची अवस्था आधींच कठीण आहे व लोकांनीं त्यांचेकडे समतोलपणानें व आपलेपणानें पहावें व त्यांना आपल्याकडे वळवून घ्यावें. हा प्रश्न अर्थात मनुष्याच्या स्वभावावर अवलंबून आहे व म्हणून मी म्हणतों कीं, अधिकारी वर्ग व इतरजन असा भेदभाव करण्यांत येऊं नये. चांगले व वाईट दोन्ही तऱ्हेचे अधिकारी असतात. विश्वास, सहानुभूती, व चांगुलपणा हा त्यांच्याकडून आपणास पाहिजे आहे. ब्रिटिश हिंदुस्थानांत सर्वांत मोठ्या अधिकाराच्या

जागा नोकरशाहीच्या ताब्यांत आहेत पण अशी परिस्थिति संस्थानांतून नाहीं. वाईट लोकांचे विरुद्ध चांगले हे असणारच. पुष्कळ संस्थानिकांना, ते नादान व हलकट लोकांवर विसंबले म्हणून आतां पश्चात्ताप होत आहे. संस्थानांत लोकांनीं आपल्या मतांची इतकी छाप पाडली पाहिजे कीं, वाईट लोकांना नौकरींत वावच मिळूं नये. वाईट दिसलें कीं तेथें बहिष्कार पडलाच पाहिजे. बहिष्कार हें शास्त्र आजकाल लोकमताचा दाब दर्शविण्यास फार उपयोगी असें आहे.

अर्थात त्यांनीं ध्यानांत धरावें कीं आतांपर्यंत पुष्कळ पुढाऱ्यांना फार त्रास झाला आहे. देशाची सेवा ज्यांना करावयाची असेल त्यांनीं तीन गोष्टी ध्यानांत धराव्या. पहिली म्हणजे ह्या बाबतींत बरें म्हणणारा कोणी भेटणार नाहीं. सार्वजनिक चळवळींत सारखे पडून लोकांची सेवा बजावित असलें पाहिजे. जर अपयश आलें तर तें आनंदानें पत्करून दुप्पट उत्साहानें पुनः कामास लागलें, पाहिजे. अर्थात लोकसेवेंत निर्भीडपणा पाहिजे. पण उगीच आपसांत भांडणें नकोत. मवाली वृत्ति नको. पदव्यांचा लोभ सोडला पाहिजे. इंग्रजी हिंदुस्थान काय व संस्थानें काय, दोघांनाही सुटका करून घेणें आहे. त्यांचें यश त्यांच्या आत्मविश्वासावर अवलंबून राहील व कार्यांतील कळकळीवरही आहे. संकटांना तोंड दिल्यामुळें माझा तर आत्मविश्वास फार वाढला आहे. मार्ग भिन्न असोत, बेत बदलोत, पण आत्मविश्वास अखेरपर्यंत कायम असला म्हणजे पुरे. ''

अखेरीस भाषण संपवितांना अध्यक्षांनीं बजावून सांगितलें कीं, संस्थानी प्रजाजनांनीं राजकारणांत धर्माची भेसळ करूं नये व आपल्या कार्यावर अढळ श्रद्धा ठेवून व स्वतःवर पण विश्वास वाढवून जर कार्यांत यश मिळविण्याचा निश्चय केला तर खात्रीनें जय त्यांतच आहे.

---

# अखिल भारतीय संस्थान प्रजा परिषद्.



## सन १९२८ डिसेंबर २६।२७ मुक्काम मद्रास.

### परिषदेंत पास झालेले ठराव.

( १ ) सर्व संस्थानांत स्वराज्य अगर जबाबदारीच्या राज्यपद्धतीची घटना जाहीर करण्यांत यावी व ती शांततेच्या व सनदशीर चळवळीच्या पुरस्कारानें संस्थानी प्रजेनें मिळविण्याचें आपलें ध्येय आहे असें एकदां जाहीर करावें असें या परिषदेचें मत आहे.

( २ ) संस्थानी लोकांचे हक्कांचें संरक्षण करण्याकरतां संस्थानी प्रजाजनांनीं एक हक्क संरक्षणमंडळ स्थापन करावें व संस्थानाधिपतींनीं त्यांस मान्यता देऊन सहानुभूति दाखवावी असें या परिषदेचें मत आहे.

( ३ ) कानडा अगर आस्ट्रेलिया या देशाची जशी राज्यघटना आहे त्या पद्धतिवर भावी स्वराज्याची घटना संस्थानांचा संयुक्त संघ बनेल अशा स्वरूपाची ठरवावी व मध्यवर्ती सरकारनें संस्थानें व ब्रिटिश प्रांत यांवर सारखी हुकमत चालवावी असें ह्या परिषदेचें मत आहे.

( ४ ) अखिल भारताची भावी स्वराज्याची घटना तयार करण्याकरतां जी कमिटी नेमली जाणार आहे त्या कमिटीवर खालीं लिहिलेल्या लोकांची निवड करण्यांत यावी. त्यांनीं संस्थानें व ब्रिटीशप्रांत यां उभयतांना सोयीची व संस्थानी प्रजेची प्रगति सर्व बाजूंनें होईल अशी घटना तयार करावी, असें या परिषदेचें मत आहे.

### मंडळ.

( १ ) मि. एस. सत्यमूर्ती
( २ ) ,, होसकोप्पा कृष्णराव
( ३ ) ,, व्ही. अच्यूत मेनन
( ४ ) ,, व्ही. आर. नायक
( ५ ) ,, डी. व्ही. गोखले
( ६ ) ,, एस. विश्वनाथ अय्यर

( ७ ) मि. बी. एस. पथिक
( ८ ) ,, मणिलाल कोटारी
( ९ ) ,, राघवेंद्र शर्मा
(१०) ,, एस. टी. द्रविड
(११) ,, पुस्तके
(१२) ,, जी. आर. अभ्यंकर
(१३) ,, के. टी. भाष्यम् अयंगार
(१४) ,, ए. वी. सालेम

( ५ ) संस्थानें व हिंदुस्थान सरकार यांचे संबंध कशाप्रकारचे असावेत याचा निश्चय करण्याकरतां हल्लीं जी तज्ज्ञांची बटलर कमेटी नेमली आहे त्याचा ही सभा जोरानें निषेध करते. तसेंच या कमेटीच्या कामाचें क्षेत्र संस्थानिकांचे हक्क, अधिकार वगैरे काय आहेत एवढेंच पाहण्याचा आहे व संस्थानिक व संस्थानी प्रजा यांचा संबंध कसा असावा याचा त्या क्षेत्रांत समावेश केला नाहीं. यामुळेंही ही परिषद् त्या गोष्टीचा अत्यंत जोरानें निषेध करीत आहे.

( ६ ) इंडियन नॅशनल कॉंग्रेसनें हिंदुस्थानच्या भावीस्वराज्याची घटना तयार करतांना त्यांत संस्थानी प्रजाजनांचें मत योग्य प्रमाणांत घेतलें जाईल, तसेंच संस्थानी प्रश्नांचा समावेश सदरहू घटनेंत केला जाईल, इतकें आपल्या कार्याचें क्षेत्र वाढवावें असें या परिषदेचें मत आहे.

( ७ ) संस्थानांमध्यें खालील सुधारणा ताबडतोब अमलांत याव्या अशी या परिषदेची सूचना आहे:—

[ १ ] संस्थानिकांची खासगी मालमत्ता कोणची, दरबारची मालमत्ता कोणती हें एकदां कायमचें ठरविलें जावें. तसेंच प्रत्येक संस्थानिकांनीं आपला एकदां खासगीचा खर्च ठरवून घ्यावा व बाकीचें सर्व उत्पन्न लेजिस्लेटिव्ह असेंब्लीच्या धोरणानें व हुकमतीनें खर्च व्हावें.

[ २ ] हल्लीं अस्तित्वांत असलेल्या वहिवाटीस अनुसरून, कायद्यानें, वहिवाटीनें ज्यांचे संस्थानानें हक्क मानले आहेत ते कायम राखण्याची जबाबदारी दरबारवर आहे व त्यांत कांहीं फेरफार करणें झाल्यास तो लेजिस्लेटिव्ह असेंब्लीच्या संमतीनें करावा.

[ ३ ] न्यायासनें स्थापन करून निःपक्षपातानें न्याय मिळवून देण्याची तजवीज केली जावी.

[ ४ ] सान्याची वसूली कायद्यास अनुसरून व ठराविक वेळेस करण्यांत यावी. जमिनीसंबंधी येणाऱ्या सर्व हक्कबाबींची कायमची नोंद करून ते यथायोग्य पाळण्याची व्यवस्था व्हावी. तसेंच लेजिस्लेटिव्ह असेंब्लीच्या संमती शिवाय कोणताही नवीन कर जमिनीवर लादला जाऊं नये.

[ ५ ] लेजिस्लेटिव्ह असेंब्लीस जबाबदार असे दिवाण कार्यकारी कौन्सिलचें काम करण्यास संस्थानाधिपतींनीं नेमावेत.

[ ६ ] व्यक्तिस्वातंत्र्य, भाषण स्वातंत्र्य, व मुद्रणस्वातंत्र्य यांस कोणत्याही प्रकारचा अडथळा नसावा तसेंच धार्मिक व्यवहारास ज्याच्या त्याच्या धर्माप्रमाणें मुभा असावी आणि गळचेपी करणारे सर्व कायदे रद्द करावेत.

[ ७ ] बहुमतानें निवडलेलें कायदे मंडळ स्थापावें.

( ८ ) संस्थानिक आपलें संस्थान सोडून बरेंच दिवस परदेशांत जाऊन राहतात त्यामुळें संस्थानचें हित करण्याची जी त्यांची वैयक्तिक जबाबदारी आहे ती ते योग्य रीतीनें पाळण्यास असमर्थ होतात तसेंच परदेशी प्रवासानें संस्थानच्या तिजोरीवर नाहक भुर्दंड बसतो तेव्हां ही पद्धत संस्थानिकांनीं एकदम बंद करावी असें या परिषदेचें मत आहे.

( १० ) ( अ ) संस्थानिक हिंदु असो अगर अन्य धर्मीय असो, त्यानें आपल्या जातींतच विवाह करून घेतला पाहिजे व अशा विवाहानें होणारी संतती त्या गादीस कायदेशीर वारस म्हणून समजली जावी. भिन्न धर्मातील लोकांशीं हिंदु अगर मुसलमान संस्थानिकांनीं लग्नें लावल्यास त्या संबंधापासून जी संतती अर्थात पुत्रसंतति होईल ती गादीचा वारस म्हणून समजली जाऊं नये असें या परिषदेचें मत आहे.

( ब ) मद्रास प्रांतांतील पदुकोटा संस्थानिकांनीं एका ऑस्ट्रेलियन बाईशी विवाह करून घेतला आहे व तिच्यापासून पुत्रसंतति झाली आहे. ती गादीस वारस म्हणून समजली जावी अशी त्या संस्थानिकांनीं खटपट चालविली आहे ती हिंदु धर्माच्या मूलभूत तत्त्वास विरुद्ध आहे व संस्थानच्या

रीतिरिवाजांसही पोषक नाहीं तेव्हां अशा त्यांच्या उपक्रमाबद्दल ही परिषद् त्यांचा जोरानें निषेध करते. तसेंच पदुकोटा संस्थानांत लोकमत दाबून टाकण्याचे जे जुलमी प्रकार दिसून येत आहेत त्यांचाहि ही सभा जोरानें निषेध करते.

( ११ ) मद्रास इलाख्यांतील सोंडूर संस्थानांतील प्रजेच्या विनंतीस मान देऊन माजी राजेसाहेबांची कन्या राजकुमारी सुशीला राजे यांना संस्थानचे वारस म्हणून गादी द्यावी असें या सभेचें मत आहे.

( १२ ) निजामसाहेबांनीं गदवाल इस्टेट व पायगा व इतर जाहगिरी ज्यांच्या त्यांस तावडतोब परत द्याव्यात.

( १३ ) नाभा संस्थानच्या माजी महाराजांसंबंधानें नाभा ॲडमिनिस्ट्रेशननें जें धोरण स्वीकारलें आहे त्याबद्दल ही परिषद् जोरानें निषेध करते. व माजी महाराजांसारख्या लोकप्रिय राजास आपले पूर्वजांचे गादीवर पुन्हां स्थापून या प्रश्नांचा निकाल करावा असें या परिषदेचें मत आहे.

( १४ ) हल्लीं संस्थानिकांनीं आपला हिंदुस्थान सरकारशीं कोणत्याही प्रकारचा संबंध नाहीं असें जें म्हणणें पुढें मांडलें आहे त्यांस त्यांचे पूर्वीचे तह व करार पाहता हें म्हणणें विरुद्ध दिसून येत आहे. व अखिल भारतीय स्वराज्याचे भावी घटनेकडे पाहतां हें म्हणणें विघातक आहे असें या परिषदेचें मत आहे.

---

# मद्रास कॉंग्रेस आणि देशी संस्थानें.



ता. २६ दिसेंबर इ. स. १९२७ रोजी मद्रास येथें डॉ. एम. ए. अन्सारी यांच्या अध्यक्षतेखालीं भरलेल्या राष्ट्रीय महासभेंत देशी संस्थानांत **जबाबदार राज्यपद्धति** स्थापन करण्याबद्दल खालील ठराव पास करण्यांत आला.

## हिंदी संस्थानांतील सुधारणा.

रा. मणिलाल कोठारी यांनीं हिंदी संस्थानासंबंधीं खालील पहिला ठराव मांडला.

" ह्या कांग्रेसचें असें आग्रहाचें मत आहे कीं हिंदी संस्थानें व त्यांतील प्रजाजन ह्या दोघांच्याही हिताकरितां म्हणून संस्थानिकांनीं आपल्या राज्यांत तावडतोब प्रातिनिधिक संस्था व जबाबदार राज्यपद्धति स्थापन करावी. " .

ह्या ठराव मांडतांना वक्त्यांनीं सांगितलें कीं, ह्या अशा तऱ्हेचा ठराव कांग्रेसमध्यें पहिल्यांदांच मांडला जात आहे. दि. ब. रामचंद्रराव यांच्या अध्यक्षतेखालीं भरलेल्या मुंबईच्या सं. प्र. परिषदेमध्यें व दे. म. श्रीनिवास अयंगार यांचे अध्यक्षतेखालीं मद्रास येथें भरलेल्या संस्थान प्रजापरिषदेंत, अशा या दोन्ही सभेंत हिंदी संस्थानांत लोकमतानुवर्ती जबाबदार राज्यपद्धति तेथील राजांच्या हाताखालीं स्थापिली जावी अशा तऱ्हेचे ठराव पसार झाले. ह्या पुढें मांडलेला ठराव पसार केल्यानें हिंदुस्थानांतील आणखी सात कोटी बांधवांविषयीं आपली सहानुभूति व पाठिंबा दिसून येणार आहे. निरनिराळ्या संस्थानांतील स्वानुभवावरून मिळालेल्या तेथील परिस्थितीच्या माहितीवरून असें म्हणतां येईल कीं, सात कोटी आपले बांधव हाल, अपमान व तेथील राजांच्या हस्तें होत असलेल्या जुलूमजबरदस्तीखालीं दिवस काढीत आहेत. एकतंत्री राज्यव्यवस्था ही राजास व प्रजेस दोघांसही बाधक आहे; त्यामुळें राजे जुलमी बनले व इंग्रज सरकारनीं त्याचा फायदा घेऊन त्यांना आपल्या हातांतील खेळणीं बनविलीं. साधे सामान्य हक्क सुद्धां नाकारण्यांत आले व स्वतंत्र लेखन व संस्थांना बंदी झाली. कांहीं संस्थानांतून

तर मनुष्य व मालमत्ता यांची शाश्वती राहिली नाहीं व खर्चावर त्यांचा ताबा राहिला नाहीं. यानंतर वक्ते पोलिटिकल डिपार्टमेंट व संस्थानिक यांच्यामध्यें असलेल्या संबंधाविषयीं बोलले व संस्थानिकांनीं आपली किंमत व अब्रू दोन्हींही कशीं गमावलीं हें विशद करून सांगितलें. हें असें होण्याचें कारण म्हणजे प्रजेचा त्राता कोणीच नाहीं. शिक्षित लोक अगदींच थोडे व जें शिक्षण राजकुमारांना देण्यांत येतें त्याचा परिणाम त्यांच्यावर राष्ट्रीयत्वाचे दृष्टीनें विपरीत घडतो.

राजे व प्रजाजन दोघांच्याही फायद्याकरितां म्हणून हा ठराव महत्त्वाचा आहे. त्यांचा रजवाडयांच्या विरुद्ध असा कोणताच हेतु ह्यांत नाहीं. उलट आहे ती परिस्थिति चालूं शकेल पण जेव्हां ते सच्छील, पापभीरु व प्रजेचे दास म्हणून अफगाणच्या अमीरासारखे मिरवितील तेव्हां. आमचे संस्थानिक म्हणजे जुन्या काळांतील राजासारखे झाले पाहिजेत आणि तरच लोकांचे नोकर म्हणून खरें स्वराज्य स्थापिलें जाईल.

**श्री. सत्यमूर्ति** ह्या ठरावास दुजारा देतानां म्हणाले कीं, यंदाची ही कांग्रेस म्हणजे निरनिराळ्या तऱ्हेनें अगदीं संस्मरणीय अशी झाली आहे आणि ज्या ठरावाला मी पाठिंबा देत आहें तोही असाच कांग्रेसच्या एकंदर इतिहासांत नमूद करण्यासारखा आहे; कारण आपल्या मातृभूमीच्या स्वातंत्र्याच्या झग-ड्यांत त्याचें महत्त्व आहे. जवळ जवळ एकतृतीयांश हिंदुस्थानचा भाग ह्या संस्थानिकांच्या हाताखालीं आहे. आतांपर्यंतचें कांग्रेसचें धोरण संस्थानांच्या अंतरव्यव्यस्थेंत ढवळाढवळ न करण्याचें होतें. ठराव म्हणजे सुद्धां कांहीं त्या उद्देशानें मांडलेला नाहीं. तर पहिल्यांदांच ही आपली पवित्र व अधिकारी कांग्रेस हिंदीराष्ट्राच्या वतीनें ह्या संस्थानिकांना व तेथील प्रजेला प्रार्थना करते कीं, दोघांच्याही गुंतलेल्या हिताच्या दृष्टीनें पाहतां तेथें आतां जबाबदार व प्रातिनिधिक राज्यव्यवस्था स्थापन झाली पाहिजे.

मला एकच शब्द संस्थानिकांना सांगावयाचा आहे व तोही विनयपूर्वक सांगतों कीं, त्यांच्या सर्व जी. सी. बी. जी. सी. आय्. ई. व जी. सी. एस्. आय्. सारख्या पद्व्या, सलाम्या आणि तोफा, ह्या सर्व धरून सुद्धां गुलामगिरीचा प्रश्न जेव्हां येतो तेव्हां हें खरें आहे कीं, ते आम्ही सर्वच जण इंग्रजसरकारचे

गुलाम आहोंत. फरक एवढाच आहे कीं, आमच्या शृंखला लोखंडाच्या आहेत व त्यांच्या सोन्याच्या आहेत. अर्थात आहेत दोन्हीही बेड्याच. इतिहास जरी वेळेस बाजूस ठेवला तरी एच्. ई. एच्. **निझाम**सरकारना, लार्ड रीडिंगनीं जातां जातां दिलेली लाथ, व त्यांच्या सार्वभौमत्वाचा ढिला, नाभाच्या व भरतपूरच्या महाराजांशीं केलेली वागणूक, व प्रत्येक संस्थानचे बाबतींत प्रत्येक व्हाइसरायनें वापरलेली अधिकारी वाणी, ह्या सर्व गोष्टींनीं त्यांना जाणीव व्हावयास पाहिजे कीं, ते म्हणजे निव्वळ खेळणीं होत व त्यांच्या दरबारींसुद्धां किल्या फिरविणारा 'बोलविता धनी' वेगळाच म्हणजे रेसिडेंट व पोलिटिकल एजंट हे आहेत. दुसरी आणखी ध्यानांत आणण्यासारखी गोष्ट म्हणजे ही कीं, ज्याप्रमाणें आतांपर्यंत एकमुखी सत्ता लोपली तशीच ह्या आजकालच्या लोकसत्ताक युगांतही एकतंत्री राज्यपद्धति गेली पाहिजे. **झार** व **कैसर** हे आतां बेपत्ता झाले आहेत. इंग्लंडला राजा आहे कारण तो फक्त नामधारी आहे म्हणून. अर्थात ह्या सर्व राजे, महाराजे व नबाबांनीं हें ध्यानांत आणावें कीं, त्यांचें भवितव्य व त्यांचें कल्याण हें फक्त ह्यापुढें लोकशाहीच्या मर्जीवर व त्यांना संतुष्ट ठेवण्यावरच अवलंबून आहे. तेव्हां अति नम्रपणानें मी त्यांना सांगतों कीं, त्यांनीं ह्यापुढें आपल्या राज्यांत लोकशाही व प्रातिनिधिक जबाबदार राज्यपद्धति स्थापन करावी व पुढील हिंदी लोकसत्ताक राष्ट्रांत मानाची व अब्रूची जागा पटकवावी.

दुसरे ह्या ठरावाचे द्वारें ह्या संस्थानी बांधवांना माझी ही विनंति आहे कीं, त्यांनींही ह्यापुढें डोळे मिटून स्वस्थ बसूं नये व मेंढरासारखें मागून जाऊं नये तर कांग्रेसच्या इतिहासाकडे दृष्टि फिरवावी व आपल्या राज्यांत योग्य व सदनशीर मार्गांनीं आपल्या हक्काविषयीं चळवळी चालू कराव्या. हा ठराव म्हणजे हातांत हात घालून व पूर्ण मदत करून पुढें चालण्याचें सुचिन्हच आहे. या ठरावाच्या द्वारें मी आपल्या परवानगीनें असें बजावतों कीं, ह्या आपल्या रक्तबांधवांना ह्यापुढें आम्ही त्यांच्या राज्यांत जाचांत व हालांत दिवस काढूं देणार नाहीं तर स्वराज्य मिळविण्याकरितां त्यांच्याबरोबर हातांत हात घालूनच चालूं.

अखेरीस आपणास सांगावयाचें म्हणजे बहुतेक संस्थानांत जबाबदार व प्रातिनिधिक राज्यपद्धति तर नाहींच पण कायदेशीर अशी सुद्धां पद्धत नाहीं. खाजगी व प्रजेच्या खर्चांत तफावत नाहीं. न्यायकोर्ट म्हणजे अधिकाऱ्यांची सत्ता व राजे व त्यांचे जानी दोस्त यांची मर्जी, वेळ असती तर ह्या राजांच्या चंचल

स्वभावाचीं उदाहरणें दिलीं असतीं. सर्वांनाच माहीत आहे कीं, हे राजे म्हणजे जुलमाचे पुतळे व त्यांच्या ध्यानांत हें आणलेंच पाहिजे कीं, त्यानाही भविष्य काळ आहे व काळाप्रमाणें योग्य मार्गानें त्यांनीं चालावें व हे चाळे सोडून देऊन लोकांना त्यांचे अधिकार द्यावे. कांहीं नाहीं तरी काँग्रेस ही त्यांच्याबरोबर इंग्रज सरकार इतकी तरी मैत्रीच्या नात्यानें वागेल. आमच्यापासून त्यांना भिण्याचें कांहींच कारण नाहीं व एक संस्थानी प्रजाजन ह्या नात्यानें आपण आमची निर्वाणीची परिस्थिति ओळखून आमच्या सोडवणुकीस आलां ह्याबद्दल मी आपला अंतःकरणपूर्वक आभारी आहें. व हेंही त्याबरोबर सांगतों कीं, स्वराज्य स्थापनेच्या झगड्यांत राजांच्या बरोबर इंग्रज सरकार जी नीति अवलंबतील त्यांत आम्ही भाग घेणार नाहीं. एवढं सांगून व सर्वानुमतें हा ठराव पास करण्यास विनंति करून, कीं ज्यायोगें तेथील प्रजाजनानांही ही राष्ट्रीय कांग्रेस म्हणजे आशेचे व उन्नतीचें माहेर घर वाटेल व पुन्हा दुजोरा देऊन मी आपली रजा घेतों.

**ठराव सर्वानुमतें पसार झाला.**

# देशी संस्थानें व बटलर कमेटी.

## बटलर कमिटी हें काय गूढ आहे ?

( **प्रो. ग. र. अभ्यंकर**, बी. ए. एलएल. बी. ),

संस्थानी प्रश्नाबद्दलची चौकशी करण्याकरितां एक कमिटी नेमली, हें ऐकून पुष्कळांना नाना प्रकारच्या कल्पना वाटूं लागल्या. आजपर्यंत ब्रिटिश हिंदुस्थानांतील राजकारणांत किंवा ब्रिटिश प्रजाजनांनीं चालविलेल्या राजकीय चळवळींत, राष्ट्रीय सभेसारख्या संस्थांतून संस्थानविषयक प्रश्नास मज्जाव होता. शिक्षणसंस्था, दळणवळणाचीं साधनें, वर्तमानपत्रें व राजकीय सभा या सर्वांतून उत्पन्न होणाऱ्या चैतन्याच्या लाटा संस्थानांवर आज सुमारें चाळीस वर्षे आदळत आहेत. संस्थानी प्रजेमध्येंहि आत्मप्रत्यय उत्पन्न झाला आहे. खालसांतील लोकांप्रमाणें स्वातंत्र्याच्या व स्वयंनिर्णयाच्या कल्पना त्यांच्यांत वावरूं लागल्या आहेत. संस्थानी प्रजेला वाचा फुटून त्यांचें हृद्गत सर्वत्र कळूं लागलें आहे. यामुळें संस्थानी प्रजेला वाटलें कीं आपली गाऱ्हाणीं कमिटीच्या वेशीवर टांगून आपली कांहीं उन्नति होते का पाहावें अशी त्यांच्यांत बलवत्तर इच्छा उत्पन्न झाली व या कमिटीकडे त्यांचे डोळे लागून राहिले. पुष्कळ संस्थानिकांनाहि वाटलें कीं, पोलिटिकल अधिकाऱ्यांच्या सासुरवासांतून आपली मुक्तता करून घेण्यास ही उत्तम संधि प्राप्त झाली आहे. तेव्हां या वेळीं आपल्या हक्काबद्दल जोराची चळवळ करून आपला दर्जा वाढेल असा प्रयत्न करावा. तसेंच खालसा मुलूख व संस्थानी मुलूख ह्या उभयतांच्या हितसंबंधाचे जे प्रश्न आहेत—म्हणजे आगगाड्या, तारायंत्रें, पोस्ट ऑफिसें, मीठ, अफू, अबकारी, मादक पदार्थ इत्यादि बाबी, आयात व निर्गत मालावरील कर, चलनपद्धति या योगानें संस्थानी प्रजेस जो चट्टा बसत आहे व त्यांच्यावर अप्रत्यक्षपणें जो ह्या कराचा बोजा पडत आहे—त्यासंबंधीं कांहीं तरी मोबदला या चौकशीच्या अंतीं मिळेल. अशीही भावना उत्पन्न झाली. संस्थानिकांपैकीं कांहीं धूर्त लोक व नोकरशाहीपैकीं कांहीं कावेबाज अधिकारी यांनीं एक निराळाच बूट काढला व त्यांनीं एक प्रचंड गुप्त कारस्थान चालू केलें आहे. सबब ह्या कमिटीसंबंधीं यथार्थ ज्ञान होणें अगदीं अवश्य झालें आहे.

## पूर्वपीठिका

ही कमिटी कशी अस्तित्वांत आली ह्यासंबंधाची पूर्वपीठिका पाहाणें अगदीं जरूर आहे. कमिटी नेमण्याची सूचना कोणीं केली, काय कारणावरून केली, काय हेतूनें केली हें समजल्याखेरीज कमिटीच्या खऱ्या स्वरूपाची परीक्षा मुळींच होणार नाहीं. व याच साठीं ही हकीकत समजून घेणें अगत्याचें आहे. १९२६ च्या जानेवारीमध्यें लॉर्ड रेडिंग यांच्या वेळीं नरेंद्रमंडळाची बैठक झाल्यावेळीं भावी सुधारणांचा परिणाम संस्थानिकांवर काय होईल यासंबंधीं खल झाला व एक कमिटीही नेमण्यांत आली. व त्याचें बिकानेर, पतियाळा, नवानगर व अलवार यांचे महाराज, ग्वालेरचे कर्नल हस्कर, बडोद्याचे त्या वेळचे दिवाण सर मनुभाई, म्हैसूरचे कौन्सिलर बालसुंदरम् व प्रो. रशबुक बुइल्यम्स असे सभासद होते. या कमिटीनें बराचसा खल केला व नंतर १९२६ च्या नोव्हेंबरमध्यें नरेंद्रबैठक भरल्यावेळीं असा एक ठराव पास करण्यांत आला कीं, नरेंद्रमंडळाच्या कार्यकारी कमिटीनें व्हाइसरॉयसाहेबांशीं त्या प्रश्नासंबंधीं वाटाघाट करावी. यानंतर जामनगर येथें संस्थानिकांनीं आपल्या म्हणण्याची रूपरेखा मुक्रर केली; व १९२७ च्या मे महिन्यांत सिमला येथें व्हाइसरॉयसाहेबांची नरेंद्रमंडळाच्या कार्यकारी मंडळानें गांठ घेतली व दोनचार बैठकींत त्या प्रश्नाचा ऊहापोह केला. व्हाइसरॉयसाहेबांनीं आपल्या कार्यकारी मंडळाची एक पोटकमिटी विचार करण्याकरितां नेमली होती. १९२७ च्या मेअखेर संस्थानिकांचे दोन हेर, कर्नल हस्कर व पतियाळाचे अमात्य डॉ. बुइल्यम्स या दोघांस विलायचेस पाठविण्यांत आलें. ह्या गृहस्थांनीं विलायतेंत जाऊन आपली एक कैफीयत तयार केली. तिघां कायदेपंडितांचा त्यानीं सल्ला घेतला. प्रतिगामी धोरणाच्या नोकरशाहीच्या व हिंदुस्थानाच्या कट्ट्या हितशत्रूंच्या म्हणजे सर मायकेल ओड्वायर, लॉर्ड सिडनहॅम इत्यादिकांच्या मुलाखती घेतल्या. ह्या गृहस्थांनीं तेथील वर्तमानपत्रांतून संस्थानिकांच्या वतीनें लेख लिहिण्यास प्रारंभ केला. भावी स्वराज्यापासून संस्थानिकांच्या अनियंत्रित सत्तेस धोका पोंचेल, संस्थानिकांचे संबंध खुद्द बादशहांशीं आहेत, हिंदुसंस्थानसरकारशीं त्यांचा कोणताही संबंध नाहीं. भावी स्वराज्याची, किंवा जबाबदार मंत्रिमंडळाची त्यांच्यावर कोणतीहि हुकमत चालणार नाहीं. पोलिटिकल खातें, भावी स्वराज्य गव्हर्नर-जनरल यांचे ताब्यांतून काढून व्हाईसरॉय साहेब यांच्या ताब्यांत देण्यांत यावें व संस्थानिकांचा

स्वतंत्र सुभा निर्माण करण्यांत यावा. अशा तऱ्हेची मागणी संस्थानिकांची आहे. व संस्थानिकांनीं तयार केलेल्या योजनेचें स्वरूप वरील प्रमाणें आहे असें लंडन टाईम्सनें आपल्या सिमल्याच्या बातमीदाराचें पत्र म्हणून दोन लेख प्रसिद्ध केले. याचाच अनुवाद सप्टेंबरच्या राऊंड टेबल मासिकांत करण्यांत आला. द्विदलपद्धतीचे उत्पादक मि. लायोनेल कर्टिस हे ह्या राऊंडटेबल पत्राचे मुख्य संपादक आहेत. वरीलप्रमाणें संस्थानिकांनीं आपली योजना तयार केली, आपलें म्हणणें मुक्रर केलें, लाखों रुपये खर्चून कायदेपंडितांचा सल्ला मिळविला व अशा तऱ्हेनें त्यांनीं आपली बाजू समर्थन करण्याची जय्यत तयारी केली. व्हाइसरॉयसाहेबांनीं नरेंद्रमंडळाच्या कार्यकारी मंडळाशीं जें सल्लामसलत केलें होतें त्यास अनुसरून त्यांनीं आपल्या कार्यकारी मंडळाचा सल्ला घेतला, १९२७ च्या जूनमध्यें सिमल्याला पोलिटिकल ऑफिसरांची एक परिषद बोलावली व सेक्रेटरी ऑफ स्टेटशीं विचारविनिमय करून 'स्टेटस इन्क्वायरी कमिटी' या नांवाची कमिटी नेमल्याचें आपल्या काठेवाडाच्या दौऱ्यांत त्यांनीं जाहीर केलें. कमिटीचें अध्यक्षस्थान ब्रह्मदेशचे गव्हर्नर सर हारकोर्ट बटलर यांस देण्यांत आलें आहे व दुसरे कमिटीचे समासद एक कायदेपंडित आहेत व एक अर्थशास्त्रविशारद आहे. त्याप्रमाणें कमिटी नेमल्यावर त्या त्रिमूर्ती ह्या वर्षाच्या जानेवारी महिन्याच्या १५ तारखेच्या सुमारास दिल्लीस पोंचल्या व त्यांनीं आपल्या कामास सुरुवात केली. कमिटीचा असा पूर्वेतिहास आहे. ह्यांत लक्षांत ठेवण्याची मुख्य गोष्ट ही कीं, संस्थानी प्रश्नास एक बाजू नसून हा एक चौरंगी सामना आहे. ह्यांत चार लोकांचे हितसंबंध निगडित झाले आहेत. (१) खुद्द संस्थानिक (२) संस्थानांवर नियंत्रण चालविणारे पोलिटिकल अधिकारी किंवा गोऱ्या नोकरशाहीचा वर्ग (३) संस्थानी प्रजाजन (४) ब्रिटिश हिंदुस्थानांतील लोक ह्या चारहि वर्गांचें म्हणणें ऐकून घेतल्याखेरीज, किंवा चौकशीच्या कमिटीमध्यें किंवा कमिशनमध्यें ह्या चारहि वर्गांचे प्रतिनिधी असल्याखेरीज ही कमिटी लोकादरास मुळींच पात्र होणार नाहीं, किंवा तिच्या कार्यापासून स्वराज्य स्थापण्याचे कामीं तिळमात्रहि उपयोग होणार नाहीं. लॉर्ड आयर्विनसाहेबांनीं ह्या बाबतींत जी अत्यंत मोठी चूक केली आहे ती हीच आहे. संस्थानिकांच्या प्रतिनिधींशीं त्यांनीं सल्लामसलत केलें व एका पक्षाचें म्हणणें ऐकून घेतलें त्याबद्दल कोणाचीहि तक्रार नाहीं. त्याप्रमाणें पोलिटिकल अधिकारी

व आपल्या स्वतःच्या कार्यकारी मंडळांतील कांहीं थोड्या अधिकाऱ्यांचा त्यांनीं सल्ला घेतला ह्यांतहि कांहीं वावगें झालें नाहीं. म्हणजे ह्या प्रश्नाशीं संबंध असलेल्या दुसऱ्या पक्षाचें म्हणणें त्यांनीं ऐकून घेतलें. परंतु यासंबंधाचे जे दुसरे दोन पक्ष, म्हणजे संस्थानी प्रजाजन व ब्रिटिश हिंदुस्थानांतील प्रजाजन, ह्यांचें म्हणणें लॉर्ड आयर्विनसाहेबांनीं बिलकुल ऐकून घेतलें नाहीं. कमिटी नेमण्याच्या महत्त्वाच्या प्रसंगीं कमिटीच्या कामाचा ज्या लोकांच्या हितसंबंधावर खास परिणाम व्हावयाचा आहे अशा ह्या दोन पक्षांचें म्हणणें मुळींच ऐकून न घेतां कमिटी नेमण्याचा जो एकतर्फी निकाल केला आहे तो अत्यंत गैर आहे. इतकेंच नव्हे तर यापासून या दोनहि पक्षांचें मनस्वी अहित होण्याचा संभव आहे, किंबहुना भावी स्वराज्याच्या मार्गांत मोठी अडचण उत्पन्न होणार आहे असें आजमितीस दिसत आहे.

## कमिटीच्या कामाची पद्धति.

ही कमिटी हिंदुस्थानांत येऊन त्यांनीं कामास प्रारंभ करतांच जी रीत त्यांनीं स्वीकारली आहे ती पाहतां त्या कमिटीबद्दल अत्यंत साशंक वृत्ति उत्पन्न होते. संस्थानी लोकांच्या वतीनें कमिटीच्या सेक्रेटरीस कमिटीपुढें संस्थानी प्रजेचें म्हणणें मांडण्यास संधि मिळेल का असें विचारलें होतें. कमिटी आल्यावर काय तें ठरविण्यांत येईल, असें उत्तर मिळालें व कमिटी आल्यावर असें कळविण्यांत आलें कीं, ही कमिटी सार्वजनिक स्वरूपाची नाहीं व हिची चौकशी उघडपणें होणार नाहीं. त्याचप्रमाणें संस्थानिक व संस्थानी प्रजा यांच्या अन्योन्य संबंधाबद्दल ही कमिटी बिलकुल विचार करणार नाहीं. कमिटीच्या ह्या पत्रानें संस्थानी प्रजेची सर्वथैव निराशा झाली. यानंतर फिरून या कमिटीनें जे दोन प्रश्न विचाराकरितां घेतले आहेत, त्या दोहोंसंबंधींहि प्रजेची बाजू व संस्थानिकांचीं बाजू अशीं त्या प्रश्नांचीं निरनिराळीं स्वरूपें असून त्या दोन प्रश्नांबद्दल प्रजेचें म्हणणें समजून घेतल्याखेरीज केलेला कोणताहि निर्णय सदोष होईल, एकतर्फी होईल. ह्यासाठीं संस्थानिक व संस्थानी प्रजा यांच्या परस्परसंबंधाचा विचार जरी कमिटीनें केला नाहीं, तरी ज्या अवश्य गोष्टींचा विचार कमिटी करणार आहे, त्यांच्याचसंबंधीं प्रजेची बाजू–संस्थानी प्रजेची बाजू–ऐकून घेणें भाग आहे असें कळविल्यावरून या कमिटीनें संस्थानी प्रजेचें म्हणणें लेखी कळविण्यास परवानगी दिली आहे. परंतु तोंडी साक्ष घेण्यास परवानगी

दिली नाहीं. तसेंच ही कमिटी नेमल्याबरोबर पतियाळाच्या महाराजसाहेबांनीं, नरेंद्र मंडळाचे चॅन्सेलर या नात्यानें एक तार प्रसिद्ध केली होती व त्यांत नरेंद्र–मंडळाच्या कार्यकारी मंडळाच्या म्हणण्यास मान देऊन ही कमिटी नेमण्यांत आली ह्याबद्दल आनंद प्रदर्शित करण्यांत आला होता. संस्थानी प्रजेच्या पुढाऱ्यांनीं कार्यकारी मंडळाचें म्हणणें काय होतें तें आपणांस कळवावें असेंही मागणें केलें होतें. परंतु कमिटीनें दिलेलें उत्तर फार मौजेचें आहे. नरेंद्र मंडळाच्या कार्यकारी मंडळानें ( Standig Committee ) जें आपलें म्हणणें मांडलें होतें तें तोंडीं असल्यामुळें त्याची नक्कल देतां येत नाहीं असें हास्यास्पद उत्तर देण्यांत आलें कमिटीचें म्हणणें तोंडीं कळविलें असलें तरी, ज्याअर्थीं त्यावर विसंबून व्हाइसरॉस व सेक्रेटरी ऑफ स्टेट यांनीं एवढी कमिटी नेमली आहे त्याअर्थीं त्याचा गोषवारा अगर मथितार्थ लोकांच्या माहितीसाठीं खास प्रसिद्ध करतां आला असता. पण कमिटीचें हें उत्तर पाहून संस्थानी प्रजाजनांना किंवा खालसांतील प्रजाजनांना आपल्या विश्वासांत घेण्याची कमिटीची मुळींच इच्छा नाहीं असें दिसून येईल. संस्थानिकांच्या ज्या म्हणण्यास मान देऊन एवढी महत्त्वाची कमिटी नेमण्यांत आली तें निवळ तोंडींच होतें असें मानणें फार चमत्कारिक आहे. शिवाय व्हाइसरॉयसाहेबांनीं संस्थानिकांचें म्हणणें स्टे. सेक्रेटरी यांस कळविल्यानंतर त्यांनीं कमिटी नेमण्यास आपली संमति दिली आहे. तेव्हां संस्थानिकांचें म्हणणें व्हाइसरॉयसाहेबांनीं सेक्रेटरी ऑफ स्टेट यांस पाठविलेल्या खलित्यांत खास असलें पाहिजे. लोकांना तें न कळविल्यानें कमिटीच्या संबंधाची भीति अतिशय वाटत आहे. तसेंच कमिटीनें आपल्या दोन प्रश्नांपैकीं एका प्रश्नासंबंधीं लागू पडणारे कांहीं मुद्दे प्रश्नमालिकेच्या रूपानें संस्थानिकांकडे पाठविलें आहेत. त्याचा सारांश टाईम्स ऑफ इंडिया पत्रांत आला होता व याच पत्राच्या संपादकांनीं आपल्या एका लेखांत ह्या प्रश्नमालिकेबद्दल कांहीं विचार प्रदर्शित केले होते. टाईम्स ऑफ इंडियाला जर ही प्रश्नमालिका मिळाली तर संस्थानी प्रजेच्या पुढाऱ्यांसही ती देण्यांत यावी अशी कमिटीस विनंति करण्यांत आली. कमिटीनें असा खुलासा केला आहे कीं, आपण होऊन ही प्रश्नमालिका टाईम्स ऑफ इंडिया पत्रास दिली नाहीं व ती सामान्य जनतेस दिली जाणार नाहीं. वरील सर्व हकीकतीवरून संस्थानी प्रजेस ह्या कमिटीच्या कामकाजाबद्दल यत्किंचित् सुद्धां सुगावा लागूं नये, कोणतीहि माहिती मिळूं नये याबद्दल

किती विचित्र खटाटोप कमिटी करीत आहे तें दिसून येणार आहे. यावरून कमिटीचें काम संस्थानी प्रजेस किंवा खालसांतील प्रजेस घातक झाल्यास त्यांत विलक्षण असें कांहींच वाटण्याजोगें नाहीं. ही कमिटी कांहीं दिवस दिल्लीस राहून, पोलिटिकल खात्याशीं विचारविनिमय करून, संस्थानिकांचा पाहुणचार घेण्यासाठीं तिनें दौरा काढला. अलवार, बिकानेर, पतियाळा, जामनगर, हैद्राबाद, म्हैसूर, भोपाळ, ग्वालेर, बडोदें, काश्मीर या ठिकाणीं स्पेशल ट्रेननें कमिटी प्रवास करीत आहे. ठिकठिकाणीं राजकीय थाटास शोभेल अशी त्यांची बडदास्त ठेवण्यांत येत आहे व ही सफर करण्याचें कारण संस्थानांतील परिस्थिति समजून यावी असें असल्याचें जाहीर करण्यांत आलें आहे. सुख-सोयींच्या स्पेशल ट्रेनमधून प्रवास करून व संस्थानिकांचा यथेच्छ पाहुणचार घेऊन जिवाचे सोहाळे करून घेणाऱ्या ह्या कमिटीस संस्थानांतील खरी परि-स्थिति काय कळणार हें मोठें गूढ आहे. ह्या दौऱ्यांत त्यांनीं कोणत्याही संस्थानी प्रजेची मुलाखत घेतली नाहीं, प्रजेचें म्हणणें समजून घेतलें नाहीं, किंवा राज्य-कारभाराबद्दल उघड चौकशी केली नाहीं. थाटाच्या मेजवानीच्या वेळीं परस्प-रांनीं आपापली प्रशंसा करून 'अहो रूपं अहो ध्वनिः' असाच प्रकार केलेला दिसतो. ह्यांत एक लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे कीं, ह्या संस्थानिकांनीं आपलें म्हणणें कमिटीच्या घशांत नीट उतरविण्याकरितां इंग्लंडांतून एक कायदे-पंडित आणले आहेत. त्याला त्यांनीं दहा लक्ष रुपये फी व बयाणा दिला आहे असें म्हणतात व त्यांचा रोजचा मुशाहिरा तीन हजार रुपये आहे असें प्रसिद्ध झालें आहे. ह्या गृहस्थास कमिटीच्या पंचायतनांत स्थान मिळून त्यांचीही मिरवणूक या दौऱ्यांत होत आहे. कमिटी स्वतंत्रपणानें त्रयस्थ या नात्यानें आपल्याकडे सोंपविलेल्या कामाचा विचार करणार आहे असें प्रतिपादन करीत आहे, संस्थानिकांचा वकील जर त्यांच्या प्रभावळींत खुशालपणें चालतो तर संस्थानी प्रजेचे पुढारी आसपास सुद्धां येऊं देण्यास कमिटी कां घाबरते हें समजणें दुरापास्त आहे. परंतु या सर्व प्रकारांवरून कमिटीचा झोक पुरा लक्षांत येईल.

# बटलर कमिटीचें कार्य

( **प्रो. ग. र. अभ्यंकर,** बी. ए., एलएल्. बी. )

या कमिटीच्या सभासदांची योजनाही कांहीं विशिष्ट हेतूनेंच केलेली दिसते. तिचे अध्यक्ष सर हारकोर्ट बटलर हे जरी अलीकडे ब्रह्मदेशचे गव्हर्नर होते तथापि ते पोलिटिकल खात्यामध्यें मुरलेले आहेत. लॉर्ड कर्झनसाहेबांची कारकीर्द जरी खालसा मुलुखांतील राज्यव्यवस्थेच्या बाबतींत प्रतिगामी धोरणाची होती तथापि संस्थानांच्या बाबतींत ती निस्संशय कार्यक्षम झालेली आहे. आपल्या अनेक भाषणांतून त्यांनीं संस्थानिकांच्या कर्तव्याबद्दल फार निर्भीडपणें टीका केली आहे. संस्थानिकांनीं प्रजेचे आपण ट्रस्टी आहों ही जाणीव सदैव लक्षांत ठेवावी असा त्यांनीं उपदेश केला. संस्थानिकांच्या खासगी खर्चास आळा घालण्याचा त्यांनीं प्रयत्न केला. स्वतःचें राज्य सोडून परदेशांत उच्छृंखलपणें मौज मारणाऱ्या संस्थानिकांची त्यांनीं कानउघडणी करण्याचा प्रयत्न केल्यामुळें संस्थानिक खडबडून जागे झाले. संस्थानांच्या कारभाराकडे उदासीन वृत्तीनें पाहण्याचें १८५७ च्या बंडानंतरचें धोरण कर्झनशाहीमध्यें समूळ पालटलें. ब्रिटिश मुत्सद्यांना ह्या नवीन धोरणाबद्दल साशंक वृत्ति वाटूं लागली व ह्याचसाठीं मिंटोसाहेबांनीं उदेपूर येथील आपल्या भाषणांत संस्थानांच्या अंतर्गत कारभारांत आपण हात घालणार नाहीं, हें पूर्वीचें धोरण जोरानें प्रतिपादन केलें. मिंटोसाहेबांच्या पांच वर्षांच्या कारकीर्दींत या धोरणाचाच अनुवाद करण्यांत आला व एका दृष्टीनें संस्थानांच्या प्रगतीची पिछेहाट यानें झाली. मिंटोसाहेबांचें हें धोरण पांच वर्षें कृतींत उतरविण्याचा मान हल्लींचे ह्या कमिटीचे अध्यक्ष बटलरसाहेब यांस मिळालेला आहे. मिंटोसाहेबांच्या अमदानींतील फॉरेन व पोलिटिकल सेक्रेटरीचें काम सर हारकोर्ट बटलर यांजकडे होतें. त्यायोगानें पोलिटिकल खात्याचें बेजबाबदारपणाचें धोरण त्यांचे अंगीं मुरलेलें आहे. संस्थानी ऐषआराम व थाटमाट यांचा त्यांनीं संपूर्ण आस्वाद घेतला आहे. पुष्कळ संस्थानिकांचा त्यांच्याशीं लोभ जडला आहे; व एका दृष्टीनें संस्थानिकांचे ते पुरस्कर्तेच आहेत असें म्हणण्यास हरकत नाहीं. व या कारणामुळें कमिटीचें अध्यक्षस्थान यांच्याहून भिन्न गृहस्थास द्यावयास पाहिजे होतें. कमिटीचे दुसरे दोन सभासद मि. हॉल्डस्वर्थ व नामदार पील ह्यांना संस्थानिकांच्या

परिस्थितीची मुळींच माहिती नाहीं. त्यांतील एक गृहस्थ उत्तम कायदेपंडित आहेत व दुसरे उत्तम फडणवीस असून अर्थशास्त्रांत पारंगत आहेत, संस्थानिकांच्या दर्जाबद्दलच्या त्यांच्या कल्पना पुस्तकावरूनच झालेल्या आहेत.

## संस्थानिकांचा दर्जा

पिढीजाद राज्यपदाचा लाभ, स्वतंत्र राज्यघटना व खालसातीहून भिन्न अशी परिस्थिति ह्या तीनहि गोष्टींमुळें परस्थ मनुष्यास व संस्थानचा निकट सहवास नसलेल्या इसमास संस्थानिकांचा दर्जा म्हणजे पाश्चिमात्य राष्ट्रांतील स्वतंत्र परराज्याच्या दर्जाप्रमाणेंच भासतो. निकट सहवासानें संस्थानिक हीं नुसतीं बाहुलीं आहेत हा प्रत्यय पदोपदीं येतो व याच कारणामुळें अशा चौकशीच्या कामीं संस्थानाच्या प्रत्यक्ष स्थितीचें अज्ञान असलेल्या इसमाची नेमणूक करण्यानें कोणताहि तादृश फायदा होण्याजोगा नाहीं. त्यांतून अशा गृहस्थास संस्थानी प्रश्नाची दुसरी बाजू म्हणजे संस्थानी प्रजेची बाजू ही मुळींच कळूं न दिल्यानें किंवा बुद्धिपुरस्सर त्यांच्यापासून दूर ठेवल्यानें ह्या गृहस्थांची दृष्टि ते स्वतंत्र विचाराचे असले तरी व्यापक व दूरदर्शित्वाची खास होणार नाहीं. वस्तुतः या दोन अवस्थांबरोबर संस्थानिक व संस्थानी प्रजा व ब्रिटिश हिंदुस्थानांतील प्रजाजन त्यांचे प्रतिनिधी त्या कमिटीवर नेमले असते तर कमिटीचें काम समतोलपणाचें होऊन तें एकपक्षीय कधींच झालें नसतें. ज्या लोकांचा हितसंबंध या चौकशीशीं आहे व ज्यांची माहिती सभासदांस संपूर्ण आहे असा एकहि गृहस्थ सभासदांत नाहीं व यामुळें कमिटीची घटना सर्वस्वी टाकाऊ झाली आहे. कमिटीचें काम एककल्लीपणाचें दिसून आल्यास किंवा तें संकुचित झाल्यास त्यांत आश्चर्य वाटण्याजोगें कांहीं नाहीं.

## कमिटीचें कार्यक्षेत्र

या कमिटीकडे जे दोन प्रश्न सोंपविले आहेत ते खालीलप्रमाणें आहेत—

( १ ) साम्राज्यसरकार व हिंदी संस्थानें ह्यांचे परस्पर संबंध, तहनामे, सनदा, करार व वहिवाट यांस अनुसरून किती आहेत याबद्दलची चौकशी करणें.

( २ ) खालसांतील मुलूख व संस्थानें यांच्या अन्योन्य संबंधांत सांपत्तिक व औद्योगिक बाबतींत कोणत्या अडचणी येतात त्यांचा विचार करून त्याबद्दल सूचना करणें.

या दोन प्रश्नांपैकीं पहिला प्रश्न अत्यंत व्यापक आहे. साम्राज्यसरकार व हिंदी संस्थानें यांच्यावरील संबंध हा शब्दप्रयोग स्पष्टपणें कळण्यासारखा नाहीं. साम्राज्य-सरकार ह्याचा अर्थ ब्रिटिश सरकार व संस्थानें असाहि होईल. सेक्रेटरी ऑफ स्टेट व संस्थानें असाहि होईल व हिंदुस्थानसरकार व संस्थानें असाही होईल. तेव्हां हे संबंध ठरवितांना साम्राज्य-सरकार या शब्दसमूहाची व्याप्ति काय आहे हें कमिटीच्या धोरणांत नमूद केलें नाहीं व या योगानें अनेक तर्क-वितर्क, दीर्घ शंका व असंबद्ध कोटिक्रम ऐकूं येत आहेत. कित्येकांचें म्हणणें सार्वभौम सत्तेचें अधिष्ठान म्हणजे पंचम जॉर्ज हेच सार्वभौम सत्तेचे द्योतक आहेत व संस्थानाचे संबंध प्रत्यक्षपणें इंग्लंडच्या राजघराण्याशीं आहेत. कांहीं धूर्त संस्थानिकांनीं या म्हणण्याचाच अनुवाद चालू केला आहे. कित्येकांच्या मतें हिंदुस्थानचे बादशहा यांच्या नांवानें जरी राज्यकारभार चालतो तथापि हिंदुस्थानांतील एकतंत्री राजाप्रमाणें इंग्लंडचे बादशहा नसून ते तेथील राज्यव्यवस्थेचे म्हणजे पार्लमेंटाच्या हुकमतीखालीं चाललेल्या राज्यपद्धतीचे मुख्य घटक आहेत. राज्यव्यवस्था पार्लमेंटाच्या हुकमतीनेंच चालते. पार्लमेंटानेंच हिंदुस्थानास राज्यघटना दिली आहे. सेक्रेटरी ऑफ स्टेट फॉर इंडिया हा अधिकारी पार्लमेंटास जबाबदार आहे. १८५८ च्या कायद्यानें हीच गोष्ट प्रस्थापित केली आहे. सेक्रेटरी ऑफ स्टेटनें आपली जबाबदारी हिंदुस्थानसरकारकडे सोंपविली आहे व हिंदुस्थानसरकार आपलें नियंत्रण संस्थानिकांवर चालवितें. ह्या पूर्व परंपरेमुळें साम्राज्य-सरकार व संस्थानिक यांच्यांतील संबंध आहे असा कित्येक पहिल्या प्रश्नाचा अर्थ करतात.

या कमिटीच्या बाबतींत जी कारवाई चालू आहे तीहि याचसंबंधानें आहे. संस्थानिक लोक आपण बादशहाचे मांडलिक आहों ही गोष्ट नाकबूल करीत नाहींत. इंग्लंडच्या राजांनीं हिंदुस्तानचे बादशहा ही पदवी धारण केल्यापासून व संस्थानिकांनीं लिटनसाहेबांच्या दिल्लीदरबारास हजर राहून आपल्या स्वतःच्या कृतीनें ह्या मांडलिकपणाची कबुली दिल्यामुळें आतां त्या प्रश्नास फारसें महत्त्व उरलें नाहीं. शिवाय इंग्लंडच्या पार्लमेंटानें मंजूर केलेल्या इंटरप्रिटेशन ॲक्ट यांतील व्याख्यानें संस्थानिक म्हणजे इंग्लंडच्या बादशहाचे मांडलिक असाच अर्थ केला आहे. पार्लमेंटानें हा कायदा कोणत्याही संस्थानिकांचें मत घेऊन किंवा त्यांची कबुली घेऊन केलेला नाहीं. किंबहुना हा कायदा संस्थानिकांवर

लादण्यांत आला आहे. कांहीं झालें तरी ह्या कायदा अस्तित्वांत आहे. तेव्हां संस्थानिकांची स्थिति मांडलिकांची आहे ही गोष्ट त्यांस कबूल आहे. परंतु त्यांचें म्हणणें आपण बादशहांचे मांडलीक आहों, स्टेटसेक्रेटरीचे नव्हे, हिंदुस्थान–सरकाराशीं आपला संबंध नाहीं. रेग्युलेटिंग ॲक्टापासून १९१९ च्या कायद्यापर्यंत हिंदुस्थानावर पार्लमेंटानें जें निरंकुश प्रभुत्व गाजविलें आहे त्याचा ते मुळींच विचार करीत नाहींत.

## हिंदुस्थानसरकार म्हणजे मुनीम

त्यांचें म्हणणें बादशहांचे हिंदुस्थानसरकार हे नुसते मुनीम आहे. ह्या मुनिमाकडेच बादशहांनीं संस्थानिकांवर नजर ठेवण्याचें काम निरंतर सोंपवावें असा कांहीं निर्बंध नाहीं. आजपर्यंत तो सोंपविला आहे; परंतु ज्याअर्थीं हिंदुस्थानाचा राज्यकारभार आपल्या नोकरशाहीमार्फत न चालवितां बादशहा तो हिंदुस्थानच्या प्रजेच्या प्रतिनिधिंकडे सोंपविणार आहेत त्याअर्थीं संस्थानिकांवर देखरेख करण्याचें काम भावी हिंदुस्थानसरकाराकडे म्हणजे भावी प्रजासत्तात्मक राज्याकडे न सोंपवितां बादशहांनीं स्वतंत्र प्रतिनिधी नेमून त्यांजकडे सोंपवावें असा संस्थानिकांचा आग्रह आहे. यांतील हेतु संस्थानिकांवर आजपर्यंत हिंदुस्थानसरकार व त्याचें एक घटक म्हणजे पोलिटिकल खातें हें बादशहांचे नोकर या नात्यानें हुकमत चालवीत. बादशहांच्या नोकराऐवजीं हिंदी प्रजेस जबाबदार असें लोकनियुक्त मंत्रिमंडळ स्थापन झाल्यास व हिंदुस्थानसरकारचा कायदा तत्त्वतः आहे ह्याप्रमाणेंच राहिल्यास गोऱ्या नोकरशाहीच्या ऐवजीं काळी नोकरशाही संस्थानिकांवर नियंत्रण चालवील.

हल्लींची गोरी नोकरशाही गव्हर्नर–जनरल व सेक्रेटरी ऑफ स्टेट् यांस जबाबदार असते, काळी नोकरशाही मंत्रिमंडळाच्या हुकमतीखालीं वागेल व कायदे मंडळास जबाबदार राहील. म्हणजे संस्थानिकांवरचें नियंत्रण हिंदुस्थानाच्या भावी स्वराज्याच्या पुढाऱ्यांचे हातीं क्रमशः प्राप्त होईल. संस्थानिकांना हेंच नको आहे. ह्या कमिटीच्या बाबतींत जें खलबत चाललें आहे तें याचसाठीं आहे. संस्थानिकांचें म्हणणें खालसांतील राज्यकारभार बादशहखुशालपणें लोकांच्या स्वाधीन करोत. तेथें स्वराज्य नांदो, जबाबदार मंत्रिमंडळ अस्तित्वांत येवो, आम्हांस त्याच्याशीं कांहीं कर्तव्य नाहीं. ह्या भावी स्वरा-

ज्याच्या कक्षेंतून आम्हांस बाहेर काढावें व मांडलिक ह्या नात्यानें आमच्यावर बादशहांनीं स्वतंत्र मुनीम नेमून स्वतःच्या नजरेखालीं आमचा योगक्षेम चालवावा, यावच्चंद्रदिवाकरौ आमच्या प्रजेवर एकतंत्री सत्ता गाजविण्याचा आम्हांस अधिकार द्यावा व खालसांतीच्या बाबतींत गव्हर्नर–जनरलसारखा एक नामधारी मुनीम नेमून खरी राज्यव्यवस्था लोकांच्या स्वाधीन खुशाल करावी; ह्याच म्हणण्याच्या समर्थनार्थ सार्वभौम सरकार या शब्दांचा अर्थ हिंदुस्थानचे बादशहा व त्यांच्याशींच आपला प्रत्यक्ष संबंध आहे असा संस्थानिक करतात. वरील विवेचनावरून कमिटीकडे सोंपविलेल्या पहिल्या प्रश्नाबद्दल किती तीव्र मतभेद आहे व संस्थानिकांनीं काढलेला विलक्षण अर्थ ग्राह्य मानल्यास संस्थानी प्रजा व खालसांतील प्रजा ह्यांचें केवढें अपरिमित नुकसान होणार आहे हें दिसून येणार आहे. व याचसाठीं ऐतिहासिक दृष्ट्या संस्थानांचे संबंध कोणाशीं आहेत हें पाहाणें जरूर आहे व याच प्रश्नाचा साधार विचार केल्याखेरीज संस्थानिकांनीं चालविलेल्या गुप्त कटापासून भावी स्वराज्यास कसा धोका आहे हें नीट समजणार नाहीं.

तसेंच ह्या पहिल्या प्रश्नांतच जो महत्त्वाचा विचार दिसून येतो तो हा आहे कीं, संस्थानिक लोक असें प्रतिपादन करतात कीं आपण जरी मांडलिक आहों तरी कांहीं एका विशिष्ट बाबीपुरती आम्हीं आपली सत्ता मर्यादित करून घेतली आहे. बाकी संस्थानाच्या इतर सर्व कारभारांत आपण संपूर्णपणें स्वतंत्र आहों, आपला दर्जा मांडलिकाचा नाहीं व आपल्या कारभारांत ढवळाढवळ करण्याचा अधिकार ब्रिटिश सरकारास नाहीं. स्वतंत्र संस्थानिक ह्या शब्दांचा अर्थ संस्थानांच्या प्रत्येक बाबतींत अप्रतिहत सत्ता चालविण्याचा हक्क एवढाच आहे. कोणत्याहि संस्थानिकांची किंवा राष्ट्राची सत्ता या चार लक्षणांनीं युक्त असते.

( १ ) प्रजेवर कर बसविणें व त्याचा उपयोग करणें. ( २ ) कायदेकानू करणें. ( ३ ) राज्यकारभार चालविणें. व ( ४ ) राज्याचा बंदोबस्त ठेवणें. ह्या गुणचतुष्ट्याचा समुच्चयानें ज्या व्यक्तीमध्यें अगर राष्ट्रामध्यें वास आढळून येतो त्यास स्वतंत्र राजा किंवा स्वतंत्र राष्ट्र म्हणतात. संस्थानिकांच्या बाबतींत ह्यापैकीं एक गुण किंवा एक अधिकार त्यांस प्राप्त झालेला नाहीं. राज्यांत शांतता ठेवणें, बंदोबस्त ठेवणें, परचक्रापासून संस्थानाचें संरक्षण करणें, अन्तःकलहापासून संस्थानाचा बचाव करणें या गोष्टी हिंदी संस्थानिकांकडे सोंपविल्या

नाहींत, त्या साम्राज्यसरकारनें आपल्या हातीं ठेवल्या आहेत ही गोष्ट संस्थानिकांना मान्य आहे. ह्या बाबतींत मतभेद नाहीं. कर बसविणें व तो खर्च करणें, संस्थानापुरते कायदे करणें व संस्थानचा राज्यकारभार हांकणें या गोष्टी पुष्कळ संस्थानिकांना दिल्या आहेत हेंही खरें आहे व या प्रत्यक्ष परिस्थितीवरून संस्थानिक लोक असें म्हणतात कीं जर हे तीन हक्क आम्हांस अबाधितपणें दिले आहेत तर आमच्या राज्यकारभारांत ब्रिटिश सरकारनें हात घालणें अन्यायाचें आहे. ह्या तीन गोष्टींपुरतें आम्ही स्वतंत्र आहों, ह्याच स्वरूपाचे आमचे तहनामे व करारमदार झाले आहेत. सबब जोंपर्यंत परचक्र किंवा बंड ह्या संबंधाची अडचण येत नाहीं तोंपर्यंत ब्रिटिश सरकारनें कोणत्याहि कारणाकरितां आमची संस्थानांतील अन्तर्गत राज्यकारभाराची जी संपूर्ण हुकमत आहे तिचा बिघाड करूं नये, त्यांत हात घालूं नये. या योगानें तहनामे निरर्थक होतील, ब्रिटिश सरकारचे पदरीं वचनभंगाचें पातक येईल असें संस्थानिक म्हणतात.

## संस्थानिक व सार्वभौम सरकार

संस्थानिक व सार्वभौम सरकार यांचे संबंध तीन गोष्टींनीं मर्यादित झालेले आहेत ( १ ) संस्थानिकांशीं केलेले तहनामे व करारमदार, ( २ ) संस्थानिकांच्या बाबतींत स्वीकारलेलें वहिवाटीचें धोरण, ( ३ ) सार्वभौम सरकार या नात्यानें तहनाम्याव्यतिरिक्त अस्तित्वांत असणारी जबाबदारी. या तीनहि गोष्टींचें योग्य आकलन केलें असतां संस्थानिक लोक वर जे चार प्रकारचे अधिकार सांगतात त्यांपैकीं कोणत्याहि प्रकारबद्दल स्वतंत्र आहेत, पराधीन नाहींत असें म्हणतां येणार नाहीं. तहनामे व करारनामे विशिष्ट परिस्थितींत विशिष्ट कारणाकरितां केलेले आहेत. प्रत्येक बाबतींत तहनाम्याकडे बोट दाखवून चालणार नाहीं. तहनामे केल्यावेळची परिस्थिति पार बदलून गेली आहे. नवीन प्रश्न रोज उत्पन्न होत आहेत, तेव्हां तहनाम्यावर भिस्त ठेवून संस्थानिकांच्या हक्काचें संरक्षण होईल ही समजूत चुकीची आहे. वहिवाटीच्याबद्दलही तशीच गोष्ट आहे. बलाढ्य सार्वभौम सरकार व कमकुवत संस्थानिक यांच्या नित्य दळणवळणामध्यें जी वहिवाट, जो रिवाज, जो दाखला घालण्यांत आला तो ' बळी तो कान पिळी ' या न्यायानें सार्वभौम सत्तेच्या जोरावर मांडलिक संस्थानिकांवर लादण्यांत आला आहे. तेव्हां वहिवाटीच्या मुद्द्यावरहि फारशी भिस्त आहे अशांतला

प्रकार नाहीं. संस्थानिकांचें खरें स्वातंत्र्य या तिसऱ्या गोष्टीवर म्हणजे सार्वभौम सरकार या नात्याचा जो हक्क आहे त्यावर अवलंबून आहे. हा हक्क स्पष्टपणें लक्षांत यावा यासाठीं उघडपणें त्यांतील रहस्य समजून घेतलें पाहिजे व तें खालीं दिल्याप्रमाणें आहे.

एखादा संस्थानिक दुर्वृत्त झाला, त्याची प्रजा त्याचें ऐकेना, बंड करण्यास तयार झाली तर त्यांतून निभावण्याचा मार्ग कोणता ? संस्थानिक व त्यांची प्रजा ह्या दोहोंमधीलच हा प्रश्न असतां तर हल्लींच्या काळीं हा लढा एका निमिषार्धांत मिटला असता. संस्थानिक हतवीर्य आहेत, हतबल आहेत, गांजलेल्या प्रजेस नामोहरम केव्हांच करतां येईल व तसें करण्याचा प्रजेचा नैसर्गिक हक्क आहे. इतिहास त्याची साक्ष देत आहे. प्रजेच्या या जन्मसिद्ध हक्काचा उल्लेख हिंदुस्थानाचे माजी सेक्रेटरी ऑफ स्टेट् लॉर्ड क्रॅमब्रुक ह्यांनीं एका ठिकाणीं केला आहे; परंतु संस्थानी प्रजा हक्क बजावीत नाहीं याचा अर्थ प्रजेचा भलेपणा हा नसून प्रत्येक संस्थानिकाच्या गादीमागें ब्रिटिश संगिनींचा कोट उभा केला आहे. संस्थान कितीहि लहान किंवा मोठें असो, त्यांतील प्रजेला सार्वभौम सत्तेशीं तोंड मुळींच देतां येणार नाहीं. निमिषार्धांत तिचा संहार होईल व याच कारणासाठीं हल्लींच्या काळीं संस्थानिकांचे राजमुगुट, संस्थानिकांचीं तख्तें अढळ राहिलीं आहेत याचें कारण ब्रिटिश सरकार संस्थानिकांचें जें संरक्षण करतें त्यांतच आहे. ह्या संरक्षणाबरोबरच जी जबाबदारी संस्थानिकांवर आहे व जी जबाबदारी सार्वभौम सरकारावर आहे ती ही कीं संस्थानिकांनीं आपल्या प्रजेस सतावूं नये, बंड करण्यास प्रवृत्त करूं नये, सुराज्यानें त्यांचें संरक्षण करावें व त्यांचा संतोष संपादन करावा. सार्वभौम सरकारावर ही जबाबदारी आहे कीं जो संस्थानिक जुलमानें आपल्या प्रजेला वैतागून सोडील त्यास पदच्युत करणें, संस्थानाच्या कारभारांत हात घालून संस्थानी प्रजेला स्वराज्य देणें ही होय. संस्थानिक व साम्राज्यसरकार यांची ही जबाबदारी नजरेपुढें ठेविली व ही तहनाम्यानें उत्पन्न झाली नसून सार्वभौम सरकार व मांडलीक या नात्यानें उत्पन्न झाली असल्यामुळें ती दृष्टीपुढें ठेवल्यास कमिटीपुढील पहिल्या प्रश्नाचा विचार करतांना फारच मदत होणार आहे. हीच दृष्टि नजरेपुढें ठेवून आम्ही पहिल्या प्रश्नाबद्दल विचार करणार आहों.

---

# बटलर कमिटीचें कार्यक्षेत्र

## जकाती.

संस्थानें व खालसांतील मुलूख या दोहोंसही समाईक असलेली अशी एक बाब म्हणजे जकातीचें उत्पन्न. आयात मालावर हल्लीं जी जकात बसविण्यांत येते तिचें उत्पन्न सुमारें दहा वर्षांपूर्वी पांचसहा कोटि रुपयांचें होतें. परंतु हल्लीं हें उत्पन्न दरसाल अठ्ठेचाळीस कोटि झालें आहे. याचें कारण हिंदुस्तानसरकारचें जकातीचे बाबतींत धोरण अगदीं पालटलें आहे. इंग्रजी अमलापासून सुमारें १९२० पर्यंत इंग्रज सरकारनें खुल्या व्यापाराचें तत्त्व स्वीकारलें होतें. हिंदुस्तानच्या हिताच्या दृष्टीनें तें अत्यंत घातक होतें. देशी उद्योगधंदे ठार बुडून परदेशी मालाचा प्रसार सर्वत्र होण्यास हेंच तत्त्व कारणीभूत झालें. लढाईनंतर हा मनु पालटला व जकातीला संरक्षित व्यापाराचें तत्त्व लावण्यांत येऊं लागलें. ह्याचा परिणाम हल्लींची झालेली जकातीची प्रचंड वाढ होय. हिंदुस्थानसरकारचें एकंदर निवळ उत्पन्न सुमारें सवाशें कोटींचें आहे व त्यांतील जवळ जवळ चाळीस टक्के उत्पन्न जकातीपासून येत आहे. संस्थानांच्यासंबंधीं ह्या उत्पन्नाच्या बाबींचा इतिहास थोडा मनोरंजक आहे. पुष्कळ संस्थानांतून आयात व निर्गत मालावर जबर जकाती बसविण्यांत येत असत व ब्रिटिश मालाच्या प्रसाराला यायोगानें बराच आळा बसत होता. सार्वभौम सरकारनें आपल्या स्वार्थपरायण राजनीतीनें संस्थानिकांस हीं बंधनें काढून टाकण्यास भाग पाडलें. अर्थात् ह्या कामीं खुषीची सक्ती होती. खुल्या व्यापाराच्या तत्त्वावर संस्थानांमधील ह्या जकाती उठविण्यांत आल्या. हिंदुस्थानाच्या अन्तस्थ व्यवस्थेंत जकातीची अडचण नाहींशी झाल्यानंतर ब्रिटिश मालाचा फैलाव झपाट्यानें सर्वत्र झाला. परंतु हें तत्त्व आतां झिटकारून सरकारनें जकाती बसविण्याचें धोरण अंगिकारलें आहे. मुंबई व इतर बंदरांत येणारा माल क्रमानें सर्व संस्थानांत जातो. बंदरांतील आयातीच्या वेळीं जो कर या मालावर बसतो तो लोकसंख्येच्या मानानें संस्थानी प्रजा हिस्सेरशीनें ब्रिटिश हिंदुस्थानांतील तिजोरींत भरत आहे. एवढ्या मोठ्या अप्रत्यक्ष कराचा मोबदला संस्थानी प्रजेस मिळणें अत्यंत न्याय्य आहे. परंतु तो आजपर्यंत मिळत नाहीं व हीच मुख्यतः संस्थानी प्रजेची तक्रार आहे.

## मक्तेबाबी

जकातीप्रमाणेंच भांग, मक्तेबाबी दारू ( स्वदेशी व परदेशी ), अफू, असलीं मादक द्रव्यें, मिठासारखी जीवनाला अवश्य लागणारी वस्तू व संस्थानांतील टांकसाळी बंद करून जें सामान्य चलन सार्वभौम सरकारनें आपल्या सत्तेच्या जोरावर सर्वत्र चालू केलें आहे, त्या पद्धतीचा मिळणारा फायदा ह्या तीनहि गोष्टींमध्यें संस्थानी प्रजेचा हिस्सा आहे. अफू, गांजा, दारू इत्यादिकांचा सर्व व्यापार सरकारनें आपल्या ताब्यांत ठेवला आहे व संस्थानिकांच्याकडून ह्या बाबी मोठ्या युक्तीनें हिरावून घेतल्या आहेत. त्याचप्रमाणें सर्व मिठागरें सरकारनें आपल्या ताब्यांत घेतलीं आहेत. कांहीं संस्थानांत पूर्वींचीं मिठागरें होतीं तींहि सरकारनें कायम फंडानें आपल्याकडे ठेविलीं आहेत. त्याचप्रमाणें नाणीं पाडण्याचा प्रकार संस्थानांतून बेताबातानें नामशेष केला आहे. लोकसंख्येच्या मानानें मादक पदार्थांचा खप संस्थानांत होत आहे व त्या जिनसांची किंमत ब्रिटिश खजिन्यांत जमा होत आहे. तसेंच मिठावरील कराचा बोजा संस्थानी प्रजा खालसांतील तिजोरींत अप्रत्यक्षपणें देत आहे. त्याचप्रमाणें नाणीं पाडण्यापासून उत्पन्न होणारा फायदा व कागदी चलन ऊर्फ नोटा ह्यापासून व हुंडणावळीच्या फायद्यापासून होणारा सर्व नफा हिंदुस्थानसरकारास मिळतो. आगगाड्या, तारायंत्रें व पोस्ट खातें, जकाती व वरील तीनही प्रकारच्या मक्तेबाबी यांच्या उत्पन्नाची भर संस्थानी प्रजेकडून हिस्सेरशीनें होत आहे व त्याचा मोबदला त्यांस कांहींच पोंचत नाहीं.

बटलर कमिटीकडे जे दोन प्रश्न सोंपविले आहेत त्यांपैकीं दुसरा प्रश्न वर नमूद केलेल्या बाबतींत संस्थानी प्रजेचें जें नुकसान होत आहे व आर्थिक दृष्टीनें संस्थानाची जी हानी होत आहे ती कशी भरून येईल याबद्दल उपायाची योजना करण्याचा आहे. वस्तुतः हा दुसरा प्रश्न संस्थानी प्रजेच्या प्रत्यक्ष हितसंबंधाचा आहे. संस्थानी प्रजेचें म्हणणें या बाबतींत काय आहे, कोणत्या मार्गानें त्यास दाद देतां येईल व जर या उत्पन्नापैकीं कांहीं परत मोबदला संस्थानी प्रजेस द्यावयाचा झाला तर तो खरोखरी त्यांच्या पदरांत कसा पडेल व तो कोणत्या मार्गानें पडेल हें संस्थानी प्रजेसच सांगतां येईल, परंतु ह्या महत्त्वाच्या प्रश्नाचा विचार, संस्थानी प्रजेचें म्हणणें ऐकून न घेतां करण्याचा संकल्प कमिटीनें केला आहे.

## हा पैसा प्रजेसाठीं खर्च व्हावा

संस्थानिक लोक कमिटीपुढें जें मागणें ठेवीत आहेत तें दोन प्रकारचें आहे. आपली अनियंत्रित सत्ता यावच्चंद्रदिवाकरौ अबाधित रहावी हें एक त्यांचें मागणें आहे. दुसरें मागणें असें आहे कीं, वर नमूद केलेल्या सामान्य हित-संबंधाच्या बाबतींत म्हणजे आगगाड्या वगैरे खातीं, जकातीं व मक्तेखातीं ह्यापासून संस्थानांचें जें नुकसान होत आहे तें आपल्यास परत मिळावें. हें दुसरें मागणें संस्थानी प्रजेची सबब पुढें करून ते करीत आहेत. परंतु या-संबंधी संस्थानी प्रजचें असें स्पष्ट मत आहे कीं जोंपर्यंत ही मदत, हा परत मोबदला, संस्थानी प्रजेच्या पदरांत पडणार नाहीं तोंपर्यंत तो संस्थानिकांना मुळींच देण्यांत येऊं नये. या उत्पन्नाच्या बाबी हळूहळू लोकांच्या प्रतिनिधींच्या ताब्यांत येत आहेत. व स्वयंशासित वसाहतीचा दर्जा ब्रिटिश हिंदुस्थानास मिळाल्यास ह्या उत्पन्नाचें नियंत्रण प्रतिनिधींच्या हातीं जाईल. संस्थानिक अरे-रावांनीं हें उत्पन्न घेऊन आपली चैन वाढविण्यापेक्षां तें खालसांतील प्रजेस मिळाल्यासहि संस्थानी प्रजेस वैषम्य वाटणार नाहीं. यासाठीं ह्या बाबतींत जर कांहीं दाद खालसांतील सरकार देणार असेल तर ह्या पैशाचा विनियोग लोकांच्या हिताकडे खर्च केला जाईल, अशी स्पष्ट व खरोखरीची हमी संस्थानि-कांनीं दिल्याशिवाय त्यांस कोणतीहि दाद देण्यांत येऊं नये.

## संस्थानी प्रजेची संमति घ्या

याचसंबंधीं दुसरा एक प्रश्न असा आहे कीं, संस्थानें व खालसा मुलूख या दोहोंचाहि हितसंबंध असणाऱ्या वर नमूद केलेल्या बाबींसंबंधीं जें धोरण ठरविण्यांत येतें तें वस्तुतः यांत हितसंबंध असणाऱ्या लोकांच्या प्रतिनिधींनींच ठरविलें पाहिजे. आगगाड्या किंवा तारायंत्रें किंवा पोस्टाचीं कार्डे, पाकिटें वगैरेंचे दर वाढविणें झाल्यास, जकातीचा कर वाढविणें झाल्यास, मिठाचा कर वाढविणें झाल्यास किंवा मादक पदार्थांवरील किंमत वाढविणें झाल्यास खालसांतील लोक व संस्थानांतील लोक ह्यांचें सारखेंच नफानुकसान आहे. सबब अशा प्रसंगीं दोघां-च्याहि प्रतिनिधींच्या संमतीनें कारभार बसविला व ह्या खात्याच्या कारभाराचें धोरण ठरविलें तरच तें हितावह होईल, व खऱ्या लोकशाहीचें निदर्शक होईल. परंतु खालसांतील व संस्थानांतील लोकांच्या प्रतिनिधींची एकत्र वाटाघाट

कशी करावयाची त्याची कांहीं तरी मूर्त योजना सुचविणें अत्यंत जरूर आहे. त्यासंबंधीं एका योजनेचें ठोकळ स्वरूप मॉंटफर्ड रिपोर्टांत सुचविलें आहे. ब्रिटिश हिंदुस्थानाच्या बाबतींत मध्यवर्ती लोकनियुक्त अशीं दोन मंडळें म्हणजे असेंब्ली व कौन्सिल ऑफ स्टेट हीं दोन निर्माण झालेलीं आहेत व त्या दोहोंच्या संमिश्र अशा सभासदांना खालसातीचें लोकमत प्रतिपादन करतां येईल. परंतु सुमारें सात कोटि संस्थानी प्रजेचें लोकमत अजमावण्यास व त्यांचे प्रतिनिधि निवडण्यास एखादी संस्था निर्माण झाली पाहिजे. अशा तऱ्हेच्या संस्थेचे प्रतिनिधी व मध्यवर्ती कायदेमंडळांतील दोनहि संस्थांचे संयुक्त बैठकींत निवडलेले प्रतिनिधी यांचें एखादें मंडळ निर्माण करावें लागेल व त्याच्याकडे या संयुक्त बाबींचा विचार सोंपवावा लागेल. यासंबंधींहि एक गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे कीं, लोकसंख्येच्या मानानें खालसा मुलखाच्या एक-तृतीयांश इतकी संस्थानी प्रजा आहे व संस्थानी प्रजेचे प्रतिनिधी केव्हांहि अल्पसंख्याकच राहणार व याचसाठीं या बाबतींत होणाऱ्या नवीन संस्थेमध्यें संख्येच्या जोरावर अल्पसंख्याक प्रतिनिधींचें मत सर्वस्वी धुडकावून टाकण्यांत येणार नाहीं, एवढी काळजी बाळगावी लागेल. बटलर कमिटीनें जर संस्थानी प्रजेचे पुढारी व खालसांतील प्रजेचे पुढारी यांस या बाबतींत उपाययोजना सुचविण्याकरितां निमंत्रण केलें असतें तर व्यवहार्य योजना सहज मांडतां आली असती. तथापि या गोष्टींचा विशेष अभ्यास भावी स्वराज्याच्या हितचिंतकांनीं करावा अशी आमची विनंति आहे.

## १९१७ चा व्यापक जाहिरनामा

सार्वभौम सरकार या नात्याची जबाबदारी, तहनामे व राजकीय वहिवाट या तिहींवरून संस्थानी व सार्वभौम सरकार यांचे अन्योन्य संबंध ठरविण्याचे आहेत. परंतु हल्लींचा हा खल भावी स्वराज्याच्या दृष्टीनें उपस्थित झाला आहे व त्या दृष्टीनें विचार करण्यासारखा महत्त्वाचा प्रश्न म्हणजे भावी स्वराज्यांत संस्थानांस कोणतें स्थान देतां येईल ? भावी स्वराज्याचें ध्येय १९१७ च्या जाहिरनाम्यांत स्पष्टपणें नमूद करण्यांत आलें आहे. हिंदुस्थानांत जबाबदार राज्यपद्धति स्थापन करावी हें ध्येय असल्याचें व तदनुसार क्रमशः वागण्याचें अभिवचन बादशहांनीं दिलें आहे. याला अनुसरूनच हें ध्येय संस्थानिकांनीं अंगिकारिलें पाहिजे व तदनुरोधानें त्यांनीं वागलें पाहिजे. ही जबाबदारी सर्वा-

भौम सरकारची असून हे अन्योन्यसंबंध ठरवितांना त्यांस प्राधान्य दिलें पाहिजे. १९१७ चा जाहिरनामा फार बारकाईनें वाचावा व त्याचें हृद्गत लक्षांत ठेवावें असें मंत्रिमंडळाकडून वरचेवर सांगण्यांत येत आहे. जाहिरनाम्यामध्यें जबाबदार राज्यपद्धतीचा विकास नुसत्या ब्रिटिश हिंदुस्थानांत व्हावयाचा नसून हिंदुस्थानांत व्हावयाचा आहे असें स्पष्टपणें नमूद असून त्याची द्विरुक्ति केली आहे. हिंदुस्थान या शब्दांत संस्थानें व खालसा मुलूख या दोहोंचाहि समावेश होतो. या शब्दप्रयोगानें खुद्द संस्थानांतहि जबाबदार राज्यपद्धतीचा विकास व्हावा असा बादशहांचा हेतु असल्याचें अगदीं उघड होत आहे. परंतु या शब्दांची स्पष्ट कल्पना संस्थानिकांस आणून देण्याची खटपट ब्रिटिश मुत्सद्यांनीं केली नाहीं. संस्थानिक लोक वेळीं अवेळीं बादशहांबद्दल आपण स्वामिनिष्ठ आहों असें दीर्घ स्वरानें सांगत असतात. परंतु प्रामाणिक स्वामिनिष्ठा असल्याचें खरें दृश्य स्वरूप म्हणजे स्वामींच्या इच्छेप्रमाणें वागणें, स्वामींचे उद्देश सफळ करणें, हें होय. बादशहांनीं आपले उद्देश अगदीं उघडपणें सांगितले आहेत. ते सातशें संस्थानिकांनीं ऐकले आहेत. परंतु त्यांपैकीं एकानेंहि काडीमात्र आपल्या आचरणांत ते दाखविले नाहींत इतकेंच नव्हे तर निदान हे उद्देश आपल्यास मान्य आहेत व आपणहि तदनुरोधानें वागण्यास तयार आहों एवढी फुकाची तोंडची वाफ सुद्धां दवडण्यास ह्या सातशें मेरुमण्यांपैकीं एकहि तयार नाहीं. अशा संस्थानिकांस राजनिष्ठ म्हणणें म्हणजे हा शब्दाचा विपर्यास आहे.

## राजनिष्ठेचा खरा अर्थ

राजनिष्ठा शब्दाचा अर्थ विद्यमान प्रिन्स ऑफ वेल्स यांनीं एका महत्वाच्या प्रसंगीं निवेदन केला. ब्रिटिश राज्याबद्दल, ब्रिटिश सिंहासनाबद्दल राजनिष्ठा या शब्दाचा अर्थ ब्रिटिश राजनीतीच्या उच्चतम ध्येयाबद्दल व संस्कृतीबद्दल खरा निष्ठा हा होय असें त्यांनीं सांगितलें आहे. जबाबदार राज्यपद्धति ( Responsible government ), लोकशाहीचा विचार ( Sovereignty of Parliament ) व कायद्याचें राज्य ( Rule of Law ) हीं तीन ब्रिटिश राजनीतींचीं राजमान्य अशीं तत्त्वें आहेत. खुद्द बादशहांनीं या नीतीचा विस्तार व फैलाव हिंदुस्थानांत व्हावा अशी घोषणा केली. राजनिष्ठ संस्थानिकांनीं या बादशाही जाहिरनाम्यास काय उत्तर दिलें ? संस्थानिकांच्या राजनिष्ठेच्या दांभिकपणाचा स्फोट याच वेळीं झाला पाहिजे व हेंच कार्य बटलर

कमिटीनें करणें अत्यंत जरूर आहे. १९१७ च्या जाहिरनाम्यान्वयें बादशहांनीं निर्दिष्ट केलेलें धोरण संस्थानिकांनीं पाळलें पाहिजे असा निर्बंध घालणें हें सार्वभौम सरकारचें पहिलें कर्तव्य आहे.

संस्थानिकांनीं हें धोरण स्वीकारणें हें दुसऱ्या एका दृष्टीनें अपरिहार्य आहे. हिंदुस्थानच्या भावी राज्यव्यवस्थेचें स्वरूप संयुक्त राष्ट्राचेंच होणार आहे. या स्वरूपाची राज्यघटना अमेरिकेमध्यें, स्वित्झर्लंडमध्यें, मेक्सिकोमध्यें, आणि कानडा, आस्ट्रेलिया व आफ्रिका या स्वयंशासित वसाहतींमध्यें आजमितीस नांदत आहे. परंतु अशा तऱ्हेच्या राज्यघटनेचें एक अवश्य तत्त्व असें आहे कीं, या संयुक्त राज्याच्या प्रत्येक घटकामध्यें प्रचलित असणारी राज्यव्यवस्था एकाच प्रकारची असली पाहिजे. एका घटकांत संस्थानासारखी एकतंत्री राज्यपद्धति, दुसऱ्यामध्यें लोकमतानुयायी राज्यपद्धति, अशा तऱ्हेच्या निरनिराळ्या राज्यपद्धति असलेल्या घटकांमध्यें समवायानें किंवा सहकारितेनें कोणतेंही राज्यसूत्र चालवितां येणार नाहीं. हिंदुस्थानांत संयुक्त राज्यपद्धति अस्तित्वांत यावयाची तर तिचे घटकावयव संस्थानें व खालसांतील मुलूख हेच झाले पाहिजेत व ह्या संयुक्त राज्याची घटना जबाबदार राज्यपद्धतीच्या स्वरूपाची असून ती प्रत्येक घटकानें मान्य केली पाहिजे. भावी स्वराज्याला अवश्य लागणारें हें तत्त्व संस्थानिकांवर बिंबवणें अत्यंत जरूर आहे व बटलर कमिटीच्या योगानें हाच प्रसंग प्राप्त झाला आहे. या संधीचा जर या दृष्टीनें उपयोग केला नाहीं तर संस्थानिकांची भवितव्यता कालाच्या पोटांत काय लिहिली आहे हें अजमावणें फार कठीण आहे.

---

परिशिष्ट

भाग चौथा

# हैद्राबाद व देशी संस्थानें.

हिंदुस्थानांतील एकंदर संस्थानांसंबंधींची

संक्षिप्त माहिती.

# अ

## मोठीं संस्थानें आणि संस्थानिक जे नरेंद्र-मंडळाचे सभासद आहेत

आणि

ज्यांना आपल्या संस्थानांसंबंधीं दिवाणी व फौजदारीचे व आपले कायदेकानू करण्यासंबंधाचे अनियंत्रित व पूर्ण अधिकार प्राप्त आहेत व ज्यांची लोकसंख्या तीन लक्षांच्या वर आहे अशा संस्थानिकांचीं नांवें व त्यांच्या पदव्या खालीं दिल्या आहेत.

## खास हिंदुस्थान सरकारच्या ताब्यांतील संस्थानें.



१ **हैद्राबाद**– लेफ्टनेंट जनरल–हिज एक्झाल्टेड हायनेस आसफजाह मुजफरुलमुल्क वल मुमालिक निझामुल मुल्क निझामुद्दौला नवाब सर मीर उस्मान अलीखान बहादुर फतेहजंग, फेतफुल अलाय ऑफ दि ब्रिटिश गव्हर्नमेंट, जी. सी. एस. आय, जी. बी. ई. निझाम ऑफ हैद्राबाद

२ **म्हैसूर**– कर्नल एच. एच. महाराजा सर श्रीकृष्णराज वडियोर बहादुर जी. सी. एस. आय., जी. बी. ई.

३ **बडोदा**– एच. एच. फरजंदेखास दवल ते इंग्लीशिया महाराजा सर सयाजीराव गायकवाड सेनाखासखेल समशेर बहादुर, जी. सी. एस. आय., जी. सी. आय. ई.

४ **काश्मीर आणि जम्मू**– कर्नल एच. एच. महाराजा सर हरीसिंग इंद्र महेंद्र बहादुर सिपारे सलतनत, के. सी. आय. ई., के. सी. व्ही. ओ.

## सेंट्रल इंडिया एजन्सी.

५ **ग्वाल्हेर**– एच. एच. महाराजा मुखतारुल मुल्क, अझीमुल एक्तेदार, रफीउःशान, वालाशिकोह, मोहतषमुद्दौरान, उमदतुल उमरा महाराजाधिराज

आलीजाह, हिसामुःसलतनत जार्ज जयाजीराव शिंदे बहादुर श्रीनाथ मनसूरुलः-झमां, फिद्वी हजरत मलिके मोअझमा, रफियुद्दर्जत इंग्लिस्तान.

६ **इंदूर**– एच. एच. महाराजाधिराज राजराजेश्वर सवाई श्री. यशवंतराव होळकर बहादुर.

७ **भोपाळ**– लेफ्टनेंट कर्नल एच. एच. नवाब हाजी महम्मद हमीदुल्ला-खान बहादुर, सी. एस. आय., सी. व्ही. ओ.

८ **रेवा**– एच. एच. महाराजा सर गुलाबसिंग बहादुर के. सी. एस. आय.

९ **ओर्छा**– एच. एच. सरमदे राजाय बुंदेलखंड महाराजा महींद्रसवाई सर प्रतापसिंग बहादुर, जी. सी. एस. आय., जी. सी. आय. ई.

## रजपुताना एजन्सी.

१० **जोधपूर** ( मारवाड )– मेजर एच्. एच्. राजराजेश्वर महाराजा-धिराज सर उमेदसिंग बहादुर के. सी. एस. आय., के. सी. व्ही. ओ.

११ **उदेपूर** ( मेवाड )– एच. एच. महाराजाधिराज महाराणा सर-फतेहसिंग बहादुर, जी. सी. एस. आय., जी. सी. आय. ई., जी. सी. व्ही. ओ.

१२ **जयपूर**– एच. एच. सरमदे राजाय हिंदुस्थान राजराजेंद्र श्री-महाराजाधिराज सवाईमानसिंग बहादुर.

१३ **भरतपूर**– लेफ्टनेंट कर्नल एच. एच्. महाराजा श्री ब्रजेंद्रसवाई श्री कृष्णसिंग बहादुर, बहादुरजंग, के. सी. एस. आय.

१४ **बिकानेर**– मेजर जनरल एच. एच. महाराजाधिराज राज राजेश्वर शिरोमणी, श्री. सर गंगासिंग बहादुर, जी. सी. एस. आय., जी. सी. आय. ई., जी. सी. व्ही. ओ., जी. बी. ई., के. सी बी., एल. एल. डी., ए. डी. सी.

१५ **कोटा**– लेफ्टनेंट कर्नल एच. एच. महाराव सर उमेदसिंग बहादुर जी. सी. एस. आय., जी. सी. आय. ई., जी. बी. ई.

१६ **अलवर**– कर्नल एच. एच. सवाई महाराजा श्री. जयसिंगजी जी. सी. एस. आय., जी. सी. आय. ई.

## बलुचिस्तान.

*१७ किलात– एच. एच. बेगलर बेगी मीर सर महम्मदखान जी. सी. आय. ई., वालीए.

## मद्रास.

१८ त्रावणकोर– एच. एच. श्री. पद्मनाभदास वंचिपाल रामवर्मा कुलशेखर किरीट पतिमान्य सुलतान महाराजा राजा रामराजा बहादुर समशेर-जंग महाराजा

१९ कोचीन– एच. एच. महाराजा श्री सर रामवर्मा जी. सी. आय. ई.

२० पदुकोटा– एच. एच. श्री. सर बृहदंबादास राजा मार्तंडभैरव तोंडिमन बहादुर जी. सी. आय. ई. ( यांना देवाज्ञा झाली )

## मुंबई.

२१ कोल्हापूर– लेफ्टनेंट कर्नल एच. एच. श्री. सर राजाराम छत्रपति महाराज, जी. सी. आय. ई, महाराजा.

२२ कच्छ– एच. एच. महाराजाधिराज मिरझा महाराव श्री. सर खेंगरजी सवाई बहादुर, जी. सी. एस. आय., जी. सी. आय. ई.

२३ भावनगर– एच. एच. महाराजा श्री. कृष्ण कुमारसिंहजी भावसिंहजी.

२४ जुनागड– एच. एच. नवाब सर महाबतखान रसूलखान, के. सी. एस. आय.

२५ नवानगर– लेफ्टनेंट कर्नल, एच. एच. महाराजा जाम श्री सर रणजीतसिंगजी विभाजी, जी. सी. एस. आय., जी. बी. ई., महाराजा जामसाहेब.

## युनायटेड प्रॉव्हिन्सेस.

२६ रामपूर– कर्नल एच. एच. आलीजाह फरजंद दिल पिजीर दवलत इंग्लीशिया मुखलिसुद्दोला नसीरुल मुल्क अमीरुल उमरा नवाब सर सय्यद महम्मद हमीद अलीखान बहादुर मुस्तएदजंग जी. सी. एस. आय. जी. सी. आय. ई., जी. सी. व्ही. ओ., ए. डी. सी.

---

* नरेंद्र मंडळाचे सभासद नाहींत.

**२७ बनारस**— लेफ्टनेंट कर्नल एच. एच. महाराजा सर प्रभू ना सिंग बहादुर, जी. सी. एस. आय., जी. सी. आय. ई., एल. एल. डी.

## पंजाब.

**२८ पतियाला**— मेजर जनरल एच. एच. फरजंद खास दौलत इ शिया, मनसुरुःझमान अमीरुल उमरा महाराजाधिराज राजेश्वर श्री. महा ए–राजगान सर भूपेंद्रसिंग महेंद्र बहादुर जी. सी. एस. आय., जी. सी. आ जी. सी. व्ही. ओ., जी. बी. ई., ए. डी. सी.

**२९ भावलपूर**— क्यापटन एच. एच. रुकनुद्दोला नुसरत जंग हाफि मुल्क मुखलिसुद्दोला नवाब सर सादिक महम्मदखान अब्बासीबहादुर के व्ही. ओ.

**३० कपूर्थला**— कर्नल एच. एच. फरजंद दिलबंद रासिखुल एअते दौलत इंग्लीशिया राजाय राजगान महाराजा सर जगतजीतसिंग बहादुर सी. एस. आय, जी. सी. आय. ई.

**३१ नाभा**— एच. एच. फरजंद अर्जुमंद अकीदत पयवंद दौलत इ शिया बरारबन्स सरमूर राजा ए राजगान महाराजा गुरुचरण सिंग ( रिपु सिंग, माजी ) मालवेंद्र बहादुर ( ह्या नाभाच्या महाराजांना इंग्रज सरका इ. स. १९२८ मध्यें राजद्रोहाच्या आरोपावरून कोडेकिनाल येथें नजर ठेविलें आहे. व त्यांचा मुलगा श्री. टिक्कासाहेब यांना गादीवर बसविलें )

**३२ झिंद**— कर्नल एच. एच. फर्जद दिलबंद रासिखुल एतेकाद दे इंग्लीशिया राजा ए राजगान महाराजा सर रणवीरसिंग राजेंद्रबहादुर जी. आय. ई., के. सी. एस. आय.

## बंगाल.

**३३ कूचबिहार**— एच. एच. महाराजा जगद्वीपेंद्रनारायण भूपबहादु

**३४ भूतान**—क्षेत्रफळ २००००, लोकसंख्या चारलक्ष, तोफा १५

# ब

## मोठीं संस्थानें व संस्थानिक
## जे नरेंद्र-मंडळाचे सभासद आहेत
### आणि

ज्यांना आपल्या संस्थानांसंबंधीं दिवाणी व फौजदारीचे व आपले कायदेकानू करण्यासंबंधाचे अनियंत्रित व पूर्ण अधिकार प्राप्त आहेत. व ( ज्यांची लोकसंख्या तीन लक्षांचे खालीं आहे. )

## रजपुताना एजन्सी.

१ **टोंक**– एच. एच. अमीनुद्दौला वझीरुलमुल्क नवाब सर महम्मद इब्राहिम अलीखान बहादुर सौलत जंग, जी. सी. एस. आय., जी. सी. आय. ई.

२ **धोलपूर**– लेफ्टनेंट कर्नल एच. एच. रईसुद्दौला सिपाहदारुलमुल्क महाराजाधिराज श्री सवाई महाराज राणा सर उदयमानसिंग लोकेंद्र बहादुर दिलेर जंग जयदेव, के. सी. एस. आय., के. सी. व्ही. ओ.

३ **बुंदी**– एच. एच. महाराव राजा ईश्वरीसिंग बहादुर

४ **बांसवाडा**– एच. एच. श्री रायरायान महारावळ पृथीसिंह बहादुर

५ **करौली**– एच. एच. महाराजा भूमपाल देव बहादुर यदुकुल चंद्रभाल

६ **डुंगरपूर**– एच. एच. रायरायान महारावळ श्री. लक्ष्मीसिंग बहादुर

७ **किशनगड**– एच. एच. उमदाय राजाय बलंद मकान महाराजाधिराज यज्ञनारायणसिंग बहादुर महाराजा

८ **झालवार**– एच. एच. महाराजा राणा सर भवानीसिंग बहादुर के. सी. एस. आय.

९ **जेसलमीर**– एच. एच. महाराजाधिराज महारावळ सर जवाहिरसिंग बहादुर, के. सी. एस. आय.

१० **प्रतापगड**– एच. एच. महारावळ सर रघुनाथसिंग बहादुर, के. सी. आय. ई.

## सेंट्रल इंडिया.

११ **दतिया**– मेजर एच. एच. महाराजा लोकेंद्र सर गोविंदसिंग बहादुर, के. सी. एस. आय.

१२ **धार**– एच. एच. महाराजा आनंदराव पवार.

१३ **जावरा**– लेफ्टनेन्ट कर्नल एच. एच. फखरूदौला नवाब सर महम्मद इफतेखार अलीखान बहादुर सौलत जंग बहादुर. के. सी. आय. ई.

१४ **देवास** ( मोठी पाती )– एच. एच. महाराजा सर तुकोजीराव पवार, के. सी. एस. आय.

१५ **देवास** ( धाकटी )– एच. एच. महाराजा सर मल्हारराव बाबा साहेब पवार, के. सी. एस. आय.

## मुंबई.

१६ **पालनपूर**– क्यापटन एच. एच. नवाब सर ताले महम्मदखान शेर महम्मद खान, के. सी. आय. ई, के. सी. व्ही. ओ.

१७ **खैरपूर**– एच. एच. मीर अली नवाज खान तालपूर

१८ **ईडर**– लेफ्टनेंट कर्नल एच. एच. महाराजा सर दौलतसिंगजी, के. सी. एस. आय.

१९ **गोंडळ**– एच. एच. महाराजा श्री. सर भगवतसिंहजी सगरामजी, जी. सी. आय. ई.

२० **राजपिंपळा**– क्यापटन एच. एच. महाराणा श्री सर विजयसिंहजी छत्रसिंहजी. के. सी. एस. आय. महाराजा

२१ **मोरवी**– एच. एच. महाराजा श्री लखधीरजी वाघजी

२२ **पोरबंदर**– एच. एच. महाराजा श्री. नटवरसिंहजी भावसिंहजी महाराजा राणासाहेब

**२३ क्यांबे–** एच. एच. नवाब मिरझा हुसेन यावर खान साहेब बहादुर.

**२४ धांगध्रा–** एच. एच. महाराजा श्री सर घनःश्यामसिंहजी अजितसिंहजी जी. सी. आय. ई., के. सी. एस. आय, महाराजा राजासाहेब

**२५ राधनपूर–** एच. एच. नवाब जलालुद्दीन बिसमिल्ला खान बाबी

## बेंगाल.

**२६ त्रिपुरा–** एच. एच. महाराजा मनिक्या वीर विक्रम किशोर देव वर्मन बहादुर

**२७ सिकिम–** एच. एच. महाराजा सर ताशि नामगयळ, के. सी. आय. ई.

# क

## ज्यांचे राज्याधिकार संशयात्मक आहेत अशा संस्थानिकांची यादी

### मद्रास.

* १ **बैगनपल्ली**– नवाब सैय्यद फजल अलीखान बहादुर

२ **सोंडूर**– राजा श्रीमंत व्यंकटराव रावसाहेब हिंदुराव घोरपडे मुमलिकतमदार सेनापती

### मुंबई.

३ **भोर**– मेहरबान श्रीमंत रघुनाथराव शंकरराव पंतसचिव

### काठेवाड एजन्सी.

४ **सचीन**– मेजर एच. एच. नवाब सिद्दी इब्राहिम महम्मद याकूबखान मुबजरदौला नुसरत जंग बहादुर

५ **वांकानेर**– क्यापटन एच. एच. माहाराणा श्री. सर अमरसिंहजी बनेसिंहजी, के. सी. आय. ई, राजासाहेब

६ **पालीठाणा**– ठाकुरसाहेब श्री बहादुरसिंहजी मानसिंहजी

७ **ध्रोल**– ठाकुरसाहेब श्री दौलतसिंहजी हरीसिंहजी

८ **लिमडी**– ठाकुरसाहेब श्री सर दौलतसिंहजी जसवंतसिंहजी के. सी. आय. ई.

९ **राजकोट**– ठाकुरसाहेब श्री. सर लेखजीराज बावजीराजे, के. सी. आय. ई.

१० **वढवाण**– ठाकुरसाहेब श्री. जोरावरसिंहजी जसवंतसिंहजी

### रेवाकांठा एजन्सी.

११ **बालासिनोर**– नवाब जमीअत खान मुनवर खान

---

* नरेंद्र मंडळाचे सभासद नाहींत.

**१२ बारिया**– क्यापटन एच. महारावळ श्री सर रणजितसिंहजी मानसिंहजी, के. सी. एस. आय., राजा

**१३ छोटा उदेपूर** ( मोहन )– माहारावळ श्री नटवरसिंहजी फते-सिंहजी राजा

**१४ लुनावाडा**– एच. एच. महाराणा श्री वखतसिंहजी दलेलसिंहजी के. सी. आय, ई., राजा

**१५ सूंथ** ( Sant ) महाराणा श्री. जोरावरसिंहजी प्रतापसिंहजी राजा

## सुरत एजन्सी.

**१६ बांसदा**– महारावळ श्री इंद्रसिंहजी प्रतापसिंहजी राजा

**१७ धरमपूर**– माहाराणा श्री विजय देवजी मोहन देवजी राजा

## मुंबई ( ठाणा एजन्सी )

**१८ जव्हार**– सेकंड लेफ्टनेंट विक्रमशहा पतंगशहा राजा.

## सदर्न मराठा कंट्री स्टेटस

**१९ सांगली**– एच. एच. लेफटनेंट मेहरबान सर चिंतामणराव धोंडेराव उर्फ आप्पासाहेब पटवर्धन के. सी. आय. ई., चीफ

**२० मिरज** ( सीनियर )– मेहरबान सर गंगाधरराव गणेश उर्फ बाळा साहेब पटवर्धन, के. सी. आय. ई., चीफ

**२१ मिरज** ( जूनियर )– मेहरबान माधवराव हरीहर उर्फ बाबासाहेब पटवर्धन चीफ

**२२ कुरुंदवाड** ( सीनियर )– मेहरबान भालचंद्रराव चिंतामणराव उर्फ आण्णासाहेब पटवर्धन चीफ

**२३ कुरुंदवाड** ( जूनिअर )– मेहरबान माधवराव गणपतराव उर्फ भाऊ साहेब पटवर्धन चीफ

२ मेहरबान विनायकराव हरीहरराव उर्फ नानासाहेब पटवर्धन

**२४ मुधोळ**– लेफटनंट मेहरबान राजा सर मालोजीराव व्यंकटराव राजे घोरपडे उर्फ नानासाहेब के. सी. आय. ई. राजा

**२५ जमखंडी**– मेहरबान शंकरराव परशरामराव उर्फ आप्पासाहेब पटवर्धन चीफ

२६ रामदुर्ग– मेहरबान रामराव व्यंकटराव उर्फ रावसाहेब भावे चीफ

## धारवाड एजन्सी.

२७ सावनूर– क्यापटन मेहरबान बहादुर नबाब अबदुल मजीद खान् दिलेर जंग बहादुर

## बेळगांव एजन्सी.

२८ सावंतवाडी– क्यापटन. एच. एच. राजे बहादुर श्रीमंत खेमसांवत्त भोसले उर्फ बापूसाहेब सर देसाई.

---

## मुंबई प्रांत

* जंजीरा– एच. एच. नबाब सिद्दी महम्मद खान सिद्दी अहमदखान

## सातारा एजन्सी

* औंध– मेहेरबान भवानराव उर्फ बाळासाहेब पंतप्रतिनिधी

* फलटण– मेहेरबान लेफ्टनेंट मालोजीराव माधोजीराव उर्फ नानासाहेब नायक निंबाळकर सरदार

## सोलापूर एजन्सी

* अक्कलकोट– श्रीमंत मेहरबान विजयसिंह फत्तेसिंह राजे भोसले

## विजापूर एजन्सी

* जत—मेहरबान रामराव अमृतराव ऊर्फ बाबासाहेब डफळे.

---

## पंजाब

२९ बिलासपूर ( काहलूर ) मेजर एच. एच. राजा सर विजयचंद्र के. सी. आय. ई., सी. एस. आय.

३० चंबा–एच. एच. राजा रामसिंग

३१ फरीदकोट–एच. एच. फरजंद सादत निषान हजरत केसर हिंद बरारबंस राजा हर इंद्र सिंग बहादुर

३२ मालेर कोटला–लेफ्टनेंट कर्नल एच. एच. नबाब सर अहमद्द अली खानबहादुर के. सी. एस. आय., के. सी. आय ई.

३३ मंडी -लेफ्टनेंट एच एच. राजा जोगेंद्र सेन बहादुर

---

* नरेंद्र मंडळाचे सभासद नाहींत. व अ. ब. क. यादींत येत नाहींत.

३४ **सिरमूर** ( नाहन ) लेफ्टनेंट कर्नल एच. एच. महाराजा सर अमर प्रकाश बहादुर के. सी. एस. आय., के. सी. आय ई.

३५ **सुकेत**– एच. एच. राजा लक्ष्मण सेन

३६ **लोहारु**– नबाब मिरझा अमीनोद्दीन अहमदखान फखरुद्दौला बहादुर

## बिहार व ओरीसा

*३७ **मयूरभंज**– लेफ्टनेंट महाराजा पूर्णचंद्र भंजदेव

*३८ **कालाहंडी**– महाराजा ब्रिज मोहन देव, ओ. बी. ई. ( महाराजा ही पदवी वैयक्तिक असून राजा ही वंशपरंपरा आहे )

*३९ **पटणा**– महाराजा राजेंद्र नारायण सिंगदेव

*४० **सोनपुर**– महाराजा सर वीर मित्रोदय सिंगदेव, के. सी. आय. ई.

## आसाम

४१ **मणीपूर**– एच. एच. महाराजा चुरींचंद्रसिंग, सी. बी. ई.

## सेंट्रल इंडिया

४२ **रतलाम**– कर्नल एच. एच. महाराजा सर सज्जनसिंग, के. सी. एस. आय, के. सी. व्ही. ओ.

४३ **सैलाना**– एच. एच. राजा दिलीपसिंग

४४ **सितामौ**– एच. एच. राजा सर रामसिंग के. सी. आय. ई.

४५ **नरसिंगगढ**– एच. एच. राजा विक्रमसिंग

४६ **राजगढ**– एच. एच. राजा सर वीरेंद्रसिंग, के. सी. आय. ई.

४७ **खिलचीपूर**– राव बहादुर दुर्जनसाल सिंग

४८ **झाबवा**– एच. एच. राजा उदयसिंग

४९ **बरवानी**– क्यापटन एच. एच. राणा सर रणजितसिंग, के. सी. आय. ई.

५० **अलीराजपूर**– एच. एच. राजा प्रतापसिंग, सी. आय. ई.

५१ **अजयगढ**– एच. एच. महाराजा सवाई भूपालसिंग बहादुर

५२ **बावनी**– एच. एच. आझमुल उमरा इफतेखारुद्दौला इमादुलमुल्क साहेबजादा मिर्दीन सरदार नबाब महम्मद मुषताकुल हसनखान सफदर जंग.

---

* नरेंद्र–मंडळाचे सभासद नाहींत.

**५३ बिजावर**– एच. एच. महाराजा सवाई सर सावंतसिंग बहादुर, के. सी. आय. ई.

**५४ चरखारी**– एच. एच. महाराजाधिराज सिपाहदारुल्मुल्क अरिमर्दन सिंगजदेव बहादुर

**५५ छत्रपूर**– एच. एच. महाराजा विश्वनाथसिंग बहादुर

**५६ पन्ना**– एच. एच. महाराजा महेंद्र सर यादवेंद्रसिंग बहादुर, के. सी. आय. ई.

*__५७ बरौंधा__ ( पथ्थर कछर )– राजा गया प्रसादसिंग

**५८ मैहर**– राजा ब्रिजनाथसिंग

*__५९ नागोद__ ( अंछेरा )– राजा महेंद्रसिंग

| | |
|---|---|
| १ तीन लाखावर ज्यांची लोकसंख्या आहे अशीं संस्थाने | ३४ |
| २ तीन लाखांखालील लोकसंख्येचीं मोठीं संस्थानें | २७ |
| ३ संशयात्मक स्थितींत ज्यांचे अधिकार आहेत अशीं संस्थानें | ५९ |
| ४ वरील तिन्ही प्रकारांत न येणारीं लहान संस्थानें | १२ |
| एकूण | १३२ |

| | |
|---|---|
| अ– यादीमधील संस्थानांची लोक संख्या | ४८०४५८३५ |
| ब– यादींतील ,, ,, ,, | ३४४२०९६ |
| क– यादींतील संस्थानांची लोकसंख्या | ६४२५२४४ |
| एकूण | ५७९१३१७५ |
| इतर लहान संस्थानांची लोकसंख्या | १२०००००० |
| एकूण | ६९९१३१७५ |

**वैय्यक्तिक तोफांची सलामी असलेले संस्थानिक**

**१ याँगत्व्यू नाँग्त्यू २ भोर, ३ दांता, ४ धतला, ५ कांकेर, ६ लोसबला, ७ जमखिंडी, ८ टांगपेंग.**

* नरेंद्र–मंडळाचे सभासद नाहींत.

# देशी संस्थानांतील सैन्य.

| संस्थान | सैन्य | संस्थान | सैन्य |
|---|---|---|---|
| बारिया | १७६ | ईडर | १५० |
| खैरपूर | ४७२ | मुधोळ | ११५ |
| राजपिंपळा | १७८ | सचीन | ९८ |
| अलीराजपूर | ११४ | भोपाळ | ११९६ |
| दतिया | ३०४ | धार | २४५ |
| इंदूर | १४३७ | पन्ना | १५३ |
| रतलाम | ५ क्याव्हलरी | रेवा | ४६५ |
| ग्वाल्हेर | ८४५२ | हैद्राबाद | १०८८ |
| जम्मू व काश्मीर | ६२७० | म्हैसूर | ३६६६ |
| भावलपूर | ६७५ | चंबा | १६ क्याव्हलरी<br>२०० इन्फंट्री |
| फरीदकोट | ३११ | झिंद | ९६२ |
| कपुर्थला | ७९१ | लोहारु | १६३ |
| मालियरकोटला | ५७७ | मंडी | २०१ |
| नाभा | ४५० | पतियाला | ४७६९ |
| सिरमुर नाहन | ३७१ | अलवार | २००२ |
| भरतपूर | १४८१ | बिकानेर | १७१२ |
| धोलपूर | २२८ | जयपूर | ३२७८ |
| जोधपूर ( मारवाड ) | १७०४ | शाहपूर | ७५ |
| उदेपूर ( मेवाड ) | १५५ | बनारस | ८४५ |
| रामपूर | २६१७ | टेहरी ( गढवाल ) | ३३० |
| भावनगर | ४७४ | कच्छ | ३९४ |
| ध्रांगध्रा | ४६१ | जुनागड | ३७३ |
| लिमडी | ३६ | नवानगर ( जामनगर ) | ६१८ |
| पालनपूर | २३७ दोन कंपन्या | पोरबंदर | ४[illegible] |

# शुद्धिपत्रक—भाग चौथा.

| पान | संस्थान. | विषय | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|---|
| २ | हिंदुसंस्थानिक संख्या. | | २२६ | ५२६ |
| ३ | किलात | तोफा | २१ | १९ |
| *३ | बडोदा | हेडिंग | बलुचिस्थानचे सदरांत | स्वतंत्र पाहिजे |
| ३ | सोनपूर | तोफा | ० | ९ |
| ४ | खैरपूर | उत्पन्न | २९४१००० | २३४१००० |
| ४ | सांगली | तोफा | ११ | ९ वंशपरंपरा व ११ व्यक्तिशः |
| ५ | बरवानी | उत्पन्न | १०३३०० | १०३१००० |
| ५ | दतिया(धा) | लोकसंख्या | ६६०९९८ | ६६९९८ |
| ६ | झिंद, | तोफा | ११ | १३ |
| ६ | बस्तर | तोफा | ९ | ९ वंशपरंपरा नसून व्यक्तिशः |
| | | लोकसंख्या | ८९०७७ | ८६०७७ |
| ६ | बांसवाडा | उत्पन्न | ५११०० | ६११००० |
| ७ | भरतपूर | उत्पन्न | २०६६००० | २९६६००० |
| ७ | जेसलमीर | क्षेत्रफळ | १६०६२ | १६६६२ |
| ८ | राजकोट | उत्पन्न | ११०००० | ११००००० |
| ८ | भोर | तोफा | १९ | ९ |
| ९ | बमरा, | क्षेत्रफळ | ९,८८ | १९८८ |
| १२ | राणासाऊ | उत्पन्न | ३००० | ३०००० |
| १३ | विहोरा, | क्षेत्रफळ | ९ | १ |
| १३ | माडवोर पद | लोकसंख्या | २३३५ | ५२३४ |
| १६ | जोबट | उत्पन्न | १०८०००० | १०८००० |

---

* तिसऱ्या पानांत बलुचिस्थान ह्या सदराखालीं बडोदा छापलें आहे. बडोदाला हेडिंग निराळें पाहिजे.

# देशी संस्थानें,

## संस्थानिक आणि चीफ,

## Ruling Princes and Chiefs.

ज्यांना तोफेची सलामी मिळते,

एकंदर ११९.

# हिंदुस्थानांतील एकंदर देशी संस्थानें.

| | |
|---|---|
| संस्थानें ज्यांना तोफेची सलामी मिळते | ११९ |
| संस्थानें ज्यांना सलामी नाहीं | ४४४ |
| त्यांची प्रांतवारी | |
| बलुचिस्थान | १ |
| बिहार आणि ओरीसा | २२ |
| मुंबई | १३२ |
| सेंट्रल इंडिया | ६२ |
| सेंट्रल प्रॉव्हिन्सेस | १५ |
| ग्वाल्हेर | १ |
| मद्रास स्टेट्स एजन्सी | १ |
| पंजाब | २० |
| रजपुताना | २ |
| वेस्टर्न इंडिया स्टेट्स एजन्सी | १८९ |
| | एकूण ५६३ |
| हिंदू | २२६ |
| मुसलमान* | ३७ |

* पुढील यादींत ज्या संस्थानचे संस्थानिक मुसलमान आहेत त्या स्थानपुढें मु. अशी खूण केली आहे.

# देशी संस्थानें.

## हिंदुस्थानांतील एकंदर संस्थानें.

### ज्यांना तोफेची सलामी वंशपरंपरा मिळते.

### एकंदर ११९.

| नं. | संस्थान. | क्षेत्रफळ चौ. मैल | लोकसंख्या. | वार्षिक उत्पन्न. | तोफांची सलामी. |
|---|---|---|---|---|---|
| | **आसाम** | | | | |
| १ | मणीपूर | ८४५६ | ३८४०१६ | ७९१००० | ११ |
| | **बलुचिस्तान** | | | | |
| २ | किलात मु. | ७३२७८ | ३२८२८१ | १६४९००० | २१ |
| ३ | वडोदा | ८१३५ | २१२६५२२ | २३७०७००० | २१ |
| | **बंगाल** | | | | |
| ४ | कुचबिहार | १३०७ | ५९२४९० | ३८६७००० | १३ |
| ५ | त्रिपुरा | ४११६ | ३०४४३७ | २९७१००० | १३ |
| | **बिहार व ओरिसा** | | | | |
| ६ | कालाहंडी | ३७४५ | ४१५८२७ | ५७३००० | ९ |
| ७ | मयूरभंज | ४२४३ | ७५४३१४ | २८२५००० | ९ |
| ८ | पटना | २३९९ | ४९४४५६ | ७२६००० | ९ |
| ९ | सोनपूर | ९०६ | २२६७५१ | ३४३००० | |

# मुंबई प्रांत

| नं. | संस्थान. | क्षेत्रफळ | लोकसंख्या. | उत्पन्न. | तोफांची सलामी. |
|---|---|---|---|---|---|
| १० | बालासिनोर मु. | १८९ | ४४०३० | ३०२००० | ९ |
| ११ | बांसदा | २१५ | ४०१२५ | ७९४००० | ९ |
| १२ | बारिया | ८१३ | १३७२९१. | ११४५००० | ९ |
| १३ | खंबायत मु. | ३५० | ७१७१५ | ९९४००० | ११ |
| १४ | छोटा उदेपूर (मोहन) | ८९० | १२५७०२ | १५४३००० | ९ |
| १५ | दांता | ३४७ | १९५४१ | १४८००० | ९ |
| १६ | धरमपूर | ७०४ | ९५१७१ | १२४५००० | ९ |
| १७ | ईडर | १६६९ | २२६३५५ | १४४८००० | १५ |
| १८ | जंजीरा मु. | ३२४ | ८५५३४ | ६००००० | ११ |
| १९ | जव्हार | ३१० | ४९६६५ | ६०६००० | ९ |
| २० | खैरपूर मु. | ६०५० | १९३१५२ | २९४१००० | १५ |
| २१ | कोल्हापूर | ३२१७ | ८३३७२६ | ९०८०००० | १९ |
| २२ | लूनावाडा | ३८८ | ८३१३३ | ४८२००० | ९ |
| २३ | मुधोळ | ३६८ | ६०१४० | ४७२००० | ९ |
| २४ | राजपिंपळा | १५१७ | १६८४५४ | ३२३१००० | १३ |
| २५ | सचीन मु. | ४९ | १९९७७ | ४१२००० | ९ |
| २६ | सांगली | ११३६ | २२६३२१ | १२४०००० | ११ |
| २७ | संत | ३९४ | ७०९५७ | ३८८००० | ९ |
| २८ | सावंतवाडी | ९२५ | २०६४४० | ७६३००० | ९ |

## सेंट्रलइंडिया.

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| २९ | अजयगड | ८०२ | ८४७९० | ५००००० | ११ |
| ३० | अलीराजपूर | ८३६ | ८९३६४ | ५५१००० | ११ |
| ३१ | बावनी | १२१ | १९७३४ | १९५००० | ११ |

| नं. | संस्थान. | क्षेत्रफळ | लोकसंख्या. | उत्पन्न. | तोफांची सलामी. |
|---|---|---|---|---|---|
| ३२ | बरौंधा | २१८ | १५९१२ | ४०००० | ९ |
| ३३ | बरवानी | ११७८ | १२०३५० | १०३९०० | ११ |
| ३४ | भोपाळ मु. | ६९०२ | ६९२४४८ | ५६६०००० | १९ |
| ३५ | बिजावर | ९७३ | १११७२३ | ३३४००० | ११ |
| ३६ | चरखारी | ८८० | १२३४०५ | ६००००० | ११ |
| ३७ | छत्रपूर | ११३० | १६६५४९ | ७००००० | ११ |
| ३८ | दतिया | ९११ | १४८६५९ | १९०००० | १५ |
| ३९ | देवास (मो.) | ४४९ | ७७००५ | १०००००० | १५ |
| ४० | देवास (धा.) | ४१९ | ६६०९९८ | ६९९००० | १५ |
| ४१ | धार | १७७७ | २३०३३३ | १६५९००० | १५ |
| ४२ | इंदूर | ९५१९ | ११५१५९८ | १२४००००० | १९ |
| ४३ | जावरा मु. | ६०१ | ८५७७८ | ११६७००० | १३ |
| ४४ | झाबवा | १३३६ | १२३९३२ | ३५०००० | ११ |
| ४५ | खिलचीपूर | २७३ | ४००४३ | २७४००० | ९ |
| ४६ | मैहर | ४०७ | ६६५४० | ३११००० | ९ |
| ४७ | नागोद | ५०१ | ६८१६६ | २४२००० | ९ |
| ४८ | नरसिंगगड | ७३४ | १०१४२६ | ९२४००० | ११ |
| ४९ | ओर्छा | २०७९ | २८४९४८ | १०००००० | १५ |
| ५० | पन्ना | २५९६ | १९७६०० | ९४८००० | ११ |
| ५१ | राजगड | ९६२ | ११४९७२ | ८७५९०० | ११ |
| ५२ | रतलाम | ६९३ | ८५४८९ | ९६८००० | १३ |
| ५३ | रेवा | १३००० | १४०१६७२ | ५५७६००० | १७ |
| ५४ | सैलाना | २९६ | २७१६५ | ३०२००० | ११ |
| ५५ | समथर | १८० | ३३२१६ | ३५०००० | ११ |
| ५६ | सितामौ | २०१ | २६५४९ | २५९००० | ११ |
| ५७ | ग्वाल्हेर | २६३८२ | ३१९५४७६ | २१४००००० | २१ |
| ५८ | हैद्राबाद मु. | ८२६९८ | १२४७१७७० | ६५३५१००० | २१ |
| ५९ | जम्मू व काश्मीर | ८०००० | ३३२२०३० | २२७७७००० | २१ |

# मद्रास प्रांत

| नं. | संस्थान. | क्षेत्रफळ | लोकसंख्या. | उत्पन्न. | तोफांची सलामी. |
|---|---|---|---|---|---|
| ६० | वैगनपल्ली मु. | २५५ | ३६६९२ | ३७८००० | ९ |
| ६१ | कोचीन | १४१७ | ९७९०१९ | ७१६८००० | १७ |
| ६२ | पदुकोटा | ११७९ | ४२६८१३ | २२७९००० | ११ |
| ६४ | त्रावणकोर | ७६२५ | ४००६०६२ | २२१८८००० | १९ |
| ६४ | म्हैसूर | २९४२८ | ५८५९९५२ | ३४६३७००० | २१ |

## पंजाब प्रांत.

| नं. | संस्थान. | क्षेत्रफळ | लोकसंख्या. | उत्पन्न. | तोफांची सलामी. |
|---|---|---|---|---|---|
| ६५ | भावलपूर मु. | १५००० | ७८११९३ | ५०३६००० | १७ |
| ६६ | विलासपूर (का.) | ४४८ | ९८००० | ३००००० | ११ |
| ६७ | चंबा | ३२१६ | १४१८६७ | ७९१००० | ११ |
| ६८ | फरीदकोट | ६४३ | १५०६६१ | १८४८००० | ११ |
| ६९ | झिंद | १२५९ | ३०८१८३ | २८००००० | ११ |
| ७० | कपूर्थला | ६३० | २८४२७५ | ३७५०००० | १३ |
| ७१ | लोहारु मु. | २२२ | २०६१४ | १३१००० | ९ |
| ७२ | मालियर कोटला मु. | १६८ | ८०३३२ | १४०४००० | ११ |
| ७३ | मंडी | १२०० | १८५०४८ | १२४२००० | ११ |
| ७४ | नाभा | ९२८ | २६३३३४ | २३४२००० | १३ |
| ७५ | पतियाळा | ५९३२ | १४९९७३९ | १२८५०००० | १७ |
| ७६ | सिरमूर ( नाहन ) | ११९८ | १४०४६८ | ६००००० | ११ |
| ७७ | सुकेत | ४२० | ५४३२८ | २३०००० | ११ |

## सिमला पहाडी संस्थान.

| नं. | संस्थान. | क्षेत्रफळ | लोकसंख्या. | उत्पन्न. | तोफांची सलामी. |
|---|---|---|---|---|---|
| ७८ | वस्तर | ३८२० | ८९०७७ | ३३४००० | ९ |

## रजपुताना.

| नं. | संस्थान. | क्षेत्रफळ | लोकसंख्या. | उत्पन्न. | तोफांची सलामी. |
|---|---|---|---|---|---|
| ७९ | अलवर | ३२२१ | ७०११५४ | ५५००००० | १५ |
| ८० | बांसवाडा | १६०६ | १९०३६२ | ५११००० | १५ |

| नं. | संस्थान. | क्षेत्रफळ | लोकसंख्या. | उत्पन्न. | तोफांची सलामी. |
|---|---|---|---|---|---|
| ८१ | भरतपूर | १९९३ | ४९६४३७ | २०६६००० | १७ |
| ८२ | बिकानेर | २३३१५ | ६५९६८५ | ८३८३००० | १७ |
| ८३ | बुंदी | २२२० | १८७०६८ | १२००००० | १७ |
| ८४ | धोलपूर | १२०० | २३०१८८ | १८८०००० | १५ |
| ८५ | डोंगरपूर | १४४७ | १८९२७२ | ५८०००० | १५ |
| ८६ | जयपूर | १५५७९ | २३३८८०२ | १२०००००० | १७ |
| ८७ | जेसलमीर | १६०६२ | ६७६५२ | ४३२००० | १५ |
| ८८ | झालवार | ८१० | ९६१८२ | ८४४००० | १३ |
| ८९ | जोधपूर (मारवाड) | ३४९६४ | १८४१६४२ | १२१९०००० | १७ |
| ९० | करौली | १२४२ | १३३७३० | ७९२००० | १७ |
| ९१ | किसनगड | ८५८ | ७३७७४ | ७००००० | १५ |
| ९२ | कोटा | ५६८४ | ६३००६० | ४६३४००० | १७ |
| ९३ | प्रतापगड | ८८६ | ६७११४ | ५७४००० | १५ |
| ९४ | शहापूर | ७०५ | ६५१४२ | ५२५००० | ९ |
| ९५ | सिरोही | १९६४ | १८६६३९ | १०७०००० | १५ |
| ९६ | टोंक मु. | २५५३ | २८७८९८ | २३९२००० | १७ |
| ९७ | उदेपूर ( मेवाड ) | १२६९१ | १३८००६३ | ५१००००० | १९ |

## सिक्किम

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ९८ | सिकिम | २८१८ | ८१७२१ | ४३३००० | १५ |

## संयुक्त प्रांत ( यू. पी. )

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ९९ | बनारस | ८७५ | ३६२७३५ | २२०९००० | १३ |
| १०० | रामपूर मु. | ८९२ | ४५३६०७ | ५४४२००० | १५ |
| १०१ | टेहरी ( गढवाल ) | ४५०० | ३१८४८२ | १४३१००० | ११ |

# वेस्टर्न इंडिया स्टे. एजन्सी

| नं. | संस्थान. | क्षेत्र फळ. | लोकसंख्या. | उत्पन्न. | तोफांची सलामी. |
|---|---|---|---|---|---|
| १०२ | भावनगर | २८६० | ४२६४०४ | १५७०००० | १३ |
| १०३ | कच्छ | ७६१६ | ४८४५४७ | ३१३१००० | १७ |
| १०४ | ध्रांगध्रा | ११६७ | ८८४०६ | २३२६००० | १३ |
| १०५ | ध्रोल | २८२ | २३६४० | २५९००० | ९ |
| १०६ | गोंडळ | १०२४ | १६७०७१ | २५००००० | ११ |
| १०७ | जाफराबाद मु. (जंजीरा) | ५३ | १०९९६ | १०१००० | ११ |
| १०८ | जुनागड मु. | ३३३६ | ४६५४९३ | ८१९३००० | ११ |
| १०९ | लिमडी | ३४३ | ३५४२२ | ६००००० | १३ |
| ११० | मोर्वी | ८२२ | ९६६५७ | १७३२००० | ९ |
| १११ | नवानगर (जामनगर) | ३७९१ | ३४५३५३ | ६०७५००० | ११ |
| ११२ | पालनपूर मु. | १७६५ | २३६६९४ | ९७०००० | १३ |
| ११३ | पालीठाणा | २८८ | ५७९२९ | ९४९००० | १३ |
| ११४ | पोरबंदर | ६४२ | १०१८८१ | २२६२००० | ९ |
| ११५ | राधनपूर मु. | ११५० | ६७७८९ | ६५८००० | ११ |
| ११६ | राजकोट | २८२ | ६०६९३ | ११०००० | ९ |
| ११७ | वढवाण | २४२ | ३७९४६ | ५७७००० | ९ |
| ११८ | वांकानेर | ४१७ | ३६८२४ | ७९०००० | ९ |

## मुंबई प्रांत.

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ११९ | भोर ( पुणें ) | ९२५ | १३०४२० | ६००००० | ११ |

भोरच्या संस्थानिकांना इ. स. १९२७ अखेर ९ तोफांच्या सलामीच [मा]न मिळाला आहे.

———

# हिंदुस्थानांतील संस्थानें आणि जहागिरी.

## ज्यांना तोफेची सलामी नाहीं तीं एकंदर ४४४

## बलुचिस्तान.

| नं. | संस्थान. | क्षेत्रफळ | लोकसंख्या. | वार्षिक उत्पन्न. |
|---|---|---|---|---|
| १ | लासबेला मु. | ७१३२ | ५०६९६ | ३८४००० |

## बिहार आणि ओरिसा.

| नं. | संस्थान. | क्षेत्रफळ | लोकसंख्या. | वार्षिक उत्पन्न. |
|---|---|---|---|---|
| २ | अथगड | १६३ | ४२३५१ | १८३००० |
| ३ | अथमॉलिक | ७३० | ५९७४९ | २३९००० |
| ४ | बमरा | १९८८ | १३४७२१ | ५५५००० |
| ५ | बरंबा | १३४ | ३८६३० | १०१००० |
| ६ | बौद | १२६४ | १२४४११ | २७६००० |
| ७ | बोनाई | १२९६ | ६८१७८ | १८९००० |
| ८ | दासपल्ला | ५६८ | ३४५०९ | १२२००० |
| ९ | धनकनाल | १४६३ | २३३६९१ | ५७९००० |
| १० | गंगापूर | २४९२ | ३०९२७१ | ६६६००० |
| ११ | हिंदोल | ३१२ | ३८६१७ | १६५०९० |
| १२ | केओंझर | ३०९६ | ३७९४९६ | ९२५००० |
| १३ | खंडपारा | २४४ | ६४२८९ | ११९००० |
| १४ | खरासवान | १५३ | ३७३०५ | १०५००० |
| १५ | नरसिंगपूर | १९९ | ३३००२ | ९३००० |
| १६ | नायगड | ५९० | १२२८४२ | २५१००० |
| १७ | नीलगिरी | २८४ | ६५२२२ | १९१००० |
| १८ | पाललाहरा | ४५२ | २३७८९ | ६८००० |
| १९ | रायराखोल | ८३३ | ३१२२५ | ८६००० |
| २० | रानपूर | २०३ | ४१२८२ | ६५००० |
| २१ | सेराइकेला | ४४९ | ११५१९२ | ३२८००० |
| २२ | तालचेर | ३९९ | ५१०१५ | २२०००१ |
| २३ | टिगोरिया | ४६ | १९५३४ | २९००० |

# मुंबई प्रांत.

## सोलापूर जिल्हा.

| नं. | संस्थान. | क्षेत्रफळ. | लोकसंख्या. | वार्षिक उत्पन्न. |
|---|---|---|---|---|
| २४ | अक्कलकोट | ४९८ | ८१२५० | ८८१००० |

## सातारा जिल्हा.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| २५ | औंध | ५०१ | ६४५९० | ३६६००० |
| २६ | फलटण | ३९७ | ४३२८६ | ३७४००० |

## विजापूर जिल्हा.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| २७ | जत | ९८१ | ८२६५४ | ३३६००० |

## सदर्न मराठा.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| २८ | जमखंडी | ५२५ | १०११९५ | ९८४००० |
| २९ | कुरुंदवाड (सी.) | १८२ | ३८७६० | ३८९००० |
| ३० | कुरुंदवाड (जू.) | ११४ | ३४२८८ | २८९००० |
| ३१ | मिरज (सी.) | ३४२ | ८२५९० | ३९१००० |
| ३२ | मिरज (जू.) | १९६½ | ३४६६५ | ३५४००० |
| ३३ | रामदुर्ग | १६९ | ३३९९७ | ३८५००० |

## धारवाड जिल्हा.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ३४ | सावनूर म. | ७० | १६८३० | १६९००० |

## महीकांठा एजन्सी.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ३५ | अंबारियारा | ८० | ९०४७ | ८३००० |
| ३६ | भालुसना | ० | ० | ५००० |
| ३७ | बोलुंद्रा | ६ | ९१४ | ४००० |
| ३८ | दाभा | १२ | १४९५ | १२००० |
| ३९ | दाधालिया | २८ | ३००४ | १८००० |
| ४० | देधरोटा | ० | ० | ८००० |

| नं. | संस्थान. | क्षेत्रफळ | लोकसंख्या. | वार्षिक उत्पन्न. |
|---|---|---|---|---|
| ४१ | दलोली | ० | ० | ५००० |
| ४२ | देरोल | १० | ० | ७१०० |
| ४३ | गवट | १० | ९४६ | १०००० |
| ४४ | घोडसर | १६ | ५२१८ | ६३००० |
| ४५ | हाड | २७ | ० | २००० |
| ४६ | हापा | ० | ७८९ | १२००० |
| ४७ | इजपुरा | ० | ० | ३००० |
| ४८ | इलोल | १९ | ३३४९ | ४६००० |
| ४९ | काडोली | ० | १०९२ | ११००० |
| ५० | कासलपुरा | ० | ० | २००० |
| ५१ | कटोसन | १० | ४८१८ | ५३००० |
| ५२ | खाडल | ८ | २२९७ | ३७००० |
| ५३ | खेडवाडा | ० | ० | १२००० |
| ५४ | लिखी | ९ | ० | ७००० |
| ५५ | मागोडी | २३ | २२९२ | १२००० |
| ५६ | मागुना | ० | ० | १४००० |
| ५७ | मालपूर | ९७ | १०२५१ | ५९००० |
| ५८ | मानसा | २५ | १५०१३ | १२५००० |
| ५९ | मेहमाद पुरा | ० | ० | २००० |
| ६० | मोहनपूर | ८९ | ११७०४ | ६०००० |
| ६१ | मोटाकोटासना | ० | ४१३ | १००० |
| ६२ | पालज | ० | ० | ६००० |
| ६३ | पेठापुर | ११ | ३९३८ | ३७००० |
| ६४ | पोलो | १३५ | ४९७२ | ५८००० |
| ६५ | प्रेमपूर | ० | ० | ११००० |
| ६६ | पुनाद्रा | ११ | ३१३६ | २७००० |

| नं. | संस्थान. | क्षेत्रफळ. | लोकसंख्या. | वार्षिक उत्पन्न. |
|---|---|---|---|---|
| ६७ | रामस | ६ | ११८९ | १०००० |
| ६८ | रामपुरा | ० | ० | ३००० |
| ६९ | राणासाउ | ३० | ३५०८ | ३००० |
| ७० | रानीपुरा | ० | ० | ३००० |
| ७१ | रूपाल | १६ | ३३०९ | १४००० |
| ७२ | साठंबा | १८ | ३४२७ | ३५००० |
| ७३ | सातलासना | ० | ० | १७००० |
| ७४ | सुदासना | ३६ | ५९७७ | ३२००० |
| ७५ | ताजपुरी | ० | ० | ४००० |
| ७६ | तेजपुरा(का.) | ० | ० | ३००० |
| ७७ | तिंबा | ० | ० | ६००० |
| ७८ | उमरी | ० | ० | १००० |
| ७९ | वक्तापूर | ० | ० | १०००० |
| ८० | वलासना | २१ | २८३८ | १८००० |
| ८१ | वरसोडा | ११ | ३४२४ | ३२००० |
| ८२ | विरसोडा | ० | ० | ३००० |
| ८३ | वडगांव | २८ | २७३९ | २०००० |
| ८४ | वासना | १० | ३७८२ | २७००० |

## नासिक जिल्हा.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ८५ | सुरगणा | ३६० | १४९१२ | ६०००० |
| ८६ | भोर (पुणें) | यांना तोफेची सलामी मिळाली (१९२७) | | |

## रेवा कांठा एजन्सी.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ८७ | आगर | १७ | ३७२९ | २२००० |
| ८८ | अलवा | ५ | १०५४ | ९००० |
| ८९ | अमरपूर | २ | ३२१ | ४८० |

| नं. | संस्थान. | क्षेत्रफळ. | लोकसंख्या. | वार्षिक उत्पन्न. |
|---|---|---|---|---|
| ९० | अवघड | ४ | ३३३८ | ७००० |
| ९१ | भदरवा | २७ | ९५७० | ९८००० |
| ९२ | भिलोदिया | ९ | २०१५ | १८००० |
| ९३ | बिहोरा | ९ | २४१ | ३००० |
| ९४ | चदालिअर | ११ | २५४७ | १५००० |
| ९५ | चोरंगला | १६ | २०४५ | १४००० |
| ९६ | चुडेसर | २ | ४७७ | २००० |
| ९७ | धमासिया-वनमाला | १० | १६०७ | १६००० |
| ९८ | धारी | ३ | १२१० | ४००० |
| ९९ | दोडका | ३ | ९०१ | ४००० |
| १०० | दुदपुर | १ | ११३ | ७२० |
| १०१ | गाडबोरिपद | १ | ५२१५ | २४००० |
| १०२ | गोटार्डी | ३ | ३३४ | ९६० |
| १०३ | गोथडा | ४ | ५९८ | २००० |
| १०४ | इटवद | ६ | १३९३ | १००० |
| १०५ | जेसर | १ | ४६७ | ५२० |
| १०६ | जिराल कमसोली | ५ | ९५९ | १०००० |
| १०७ | जुमखा | १ | २१५ | ९५० |
| १०८ | कडना | १३० | १५३७० | ९०००० |
| १०९ | कनोडा | ३ | १२०६ | २००० |
| ११० | कसला पागिनु मुवाडु | १ | १०१ | ५०० |
| १११ | मांडवा | १६ | ५७४७ | ५४००० |
| ११२ | मेवली | ५ | १४०४ | ८००० |
| ११३ | मोका, पा. मु. | १ | १५६ | २४० |
| ११४ | नहारा | ३ | ३४६ | ६० |
| ११५ | नालिया | १ | १२८ | ९८० |

| नं | संस्थान. | क्षेत्रफळ. | लोकसंख्या. | वार्षिक उत्पन्न. |
|---|---|---|---|---|
| ११६ | नानगांव | ३ | ४५४ | ५००० |
| ११७ | नारुकोट ( जंबू ) | १४३ | ९५४० | १५१८०० |
| ११८ | नसवाडी | ११ | ४११७ | ८६००० |
| ११९ | पलासनी | १२ | १७६६ | १५००० |
| १२० | पांडू | ९ | ११६० | ११००० |
| १२१ | पान टलवडी | ५ | १७७७ | ११००० |
| १२२ | पोइचा | ३ | ९०९ | २००० |
| १२३ | राइका | ३ | ५१७ | ४००० |
| १२४ | राजपूर | १ | ११९ | ८६० |
| १२५ | रामपुरा | ४ | १६०६ | ७००० |
| १२६ | रागन | ४ | ३५३ | ३००० |
| १२७ | संजेली | ३४ | ६८१४ | ८२००० |
| १२८ | शानोर | ५१ | १५३२ | १६००० |
| १२९ | सिहोरा | १५ | ३८३५ | ३१००० |
| १३० | सिंधिया पारा | ४ | ७५९ | ६००० |
| १३१ | उचड | ८ | २३३० | २४००० |
| १३२ | उमेठा | २४ | ५३५५ | १८००० |
| १३३ | वजीरिया | २१ | ४९९९ | ३२००० |
| १३४ | वखतापुर | १ | ३०४ | १००० |
| १३५ | वरनोलमाल | ३ | ५५३ | १००० |
| १३६ | वरनोली ( मोती ) | २ | २४७ | ७१० |
| १३७ | वरनोली ( नानी ) | १ | ७२ | ३०० |
| १३८ | वसन सेवाडा | १२ | १२०६ | ८००० |
| १३९ | वसन वीरपूर | १२ | ३३५५ | २५००० |
| १४० | विरामपुरा | १ | १४५ | ७५० |
| १४१ | वोरा | ५ | १२६७ | १०००० |

# सुरत जिल्हा.

| नं. | संस्थान. | क्षेत्रफळ. | लोकसंख्या. | वार्षिक उत्पन्न. |
|---|---|---|---|---|
| १४२ | अमाला | ११३ | ४६६२ | ४००० |
| १४३ | अवचार | ७ | ६८० | २२० |
| १४४ | बिबारी | १ | ३२ | ८० |
| १४५ | चिंचोली गाडद | २७ | १०५१ | ६६५ |
| १४६ | डेर भावती | ७६ | २९५५ | ४००० |
| १४७ | गाधी | १७० | ५४४७ | ५००० |
| १४८ | झरी घरखाडी | ८ | ७०० | ८० |
| १४९ | किरली | २१ | १०२१ | ८०० |
| १५० | पलास विहीर | २ | १८९ | १४० |
| १५१ | पिमली देवी | ३ | ७३ | १६० |
| १५२ | पिंपरी | ७२ | २२२३ | ४००० |
| १५३ | शिववारा | ४ | १५२ | ५०० |
| १५४ | वध्यावन | ४ | ५४ | १६० |
| १५५ | वसुर्ना | १३२ | ५३३७ | ४००० |

# सेंट्रल इंडिया.

## जाहगिरदार, चीफ, ठाकुर, आणि ग्यारंटीड तनखादार

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १५६ | अलीपुरा | ७३ | १४५८० | ५०००० |
| १५७ | बखतगड | ६६ | १०४१४ | ७४००० |
| १५८ | बांका पहाडी | ५ | १६९३ | ४००० |
| १५९ | बासोदा (हैदरगड) | ४० | ४२३७ | ३४००० |
| १६० | बेरी | ३२ | ४६२१ | ४०००० |
| १६१ | भाइसोंदा | ३ | ४३९० | २०००० |
| १६२ | भाइसोला (दोत्रिया) | १८ | ३४०१ | २५००० |
| १६३ | भरुदपुरा | ३२ | २०४६ | १४००० |

